# असे होते मोगल




**अनुवादक:**

श्री. ज. स. चौबळ

भाषांतर माला क्र. ४९

# असे होते मोगल

(सारांश अनुवाद)

[STORIA DO MOGOR OR MOGUL INDIA
1653-1708 BY NICCOLAO MANUCCI]

अनुवादक :

श्री. ज. स. चौंबळ




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ, मुंबई

## द्वितीय आवृत्तीचे निवेदन

साहित्य संस्कृतीच्या इतिहासासंबंधी अनेक योजना आहेत. त्यामध्ये जाणकारांकडून "महाराष्ट्राचा लोकइतिहास" लिहून घेण्याची व तो प्रसिद्ध करण्याचीपण योजना आहे. तसेच मंडळातर्फे प्रकाशित झालेल्या "सातवाहन नृपती आणि पश्चिमेचे क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख" या **म. म. डॉ. वा. वि. मिराशी** लिखित ग्रंथाच्या मराठी अनुवादाचापण उल्लेख या योजनेत करता येईल. याच मालिकेत **श्री. ज. स. चौबळ** यांच्या "असे होते मोगल" हा ग्रंथ पण महत्त्वाचा मानावा लागेल. या पुस्तकाची प्रथमावृत्ती सन १९७४ मध्ये प्रकाशित करण्यात आली होती. या आवृत्तीच्या सर्व प्रती अल्पावधीतच संपल्यामुळे मराठी वाचकांची मागणी लक्षात घेऊन मंडळाने या पुस्तकाची द्वितीयावृत्ती काढण्याचे ठरविले. वाचक या आवृत्तीचेही मोठ्या प्रमाणात स्वागत करतील अशी मंडळाची अपेक्षा आहे. या पुस्तकाची द्वितीयावृत्ती प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

सुरेंद्र बारलिंगे,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

मुंबई,
मकर संक्रांत,
पौष २४, शके १९०३,
गुरुवार दि. १४ जानेवारी, १९८२.

# निवेदन

मराठी भाषेला व साहित्याला आधुनिक ज्ञानविज्ञानाच्या व आधुनिक सांस्कृतिक मूल्यांच्या आविष्काराचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृति, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, विविध विद्या व कलांबाबत उत्कृष्ट ग्रंथांची निर्मिती करून मराठी भाषेला जागतिक उच्च स्थान मिळवून द्यावे या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळाने बहुविध वाङ्मयीन कार्यक्रम आखला असून तो व्यवस्थितपणे कार्यवाहीत आणण्याकरिता विश्वकोश समिती, इतिहास समिती, भाषांतर समिती, मराठी वाङ्मयकोश समिती, ललित कला समिती, प्रकाशन समिती आदी समित्या स्थापन केल्या आहेत.

२. इतिहास समितीच्या कार्यक्रमामध्ये महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर उपलब्ध झालेल्या अद्यावत साधनसामग्रीचा उपयोग करून व गेल्या काही वर्षांत महाराष्ट्रेतिहासविषयक नवी उजेडात आलेली अव्वल साधने लक्षात घेऊन, आधुनिक इतिहास रचनेच्या तत्त्वांनुसार महाराष्ट्राचा एक प्रमाणभूत व सलग सांस्कृतिक, राजकीय इतिहास मराठी भाषेत नव्याने संपादून तो प्राचीन कालखंड, मध्ययुगीन कालखंड, मराठा कालखंड, पेशवा कालखंड व आधुनिक कालखंड याप्रमाणे पाच खंडांत प्रकाशित करण्याचे कार्य मंडळाने हाती घेतले आहे. याखेरीज, इतिहास समितीच्या कार्यक्रमामध्ये महाराष्ट्रेतिहासविषयक पोर्तुगीज, फ्रेंच, उर्दू, पर्शियन आणि राजस्थानी भाषांत उपलब्ध असलेल्या कागदपत्रांचे संशोधन, भाषांतर व प्रकाशन आणि महत्त्वाच्या ग्रंथांचे भाषांतर वा सारानुवाद प्रकाशित करणे ही योजनाही अंतर्भूत आहे. या योजनेखाली संकल्पित संशोधन/प्रकाशन कार्यासाठी मंडळ एकतर सुयोग्य संस्थांना अनुदान देते अथवा सदर संशोधन/प्रकाशनाचे कार्य स्वतः हाती घेते.

३. महाराष्ट्राच्या इतिहासाशी संबंधित गोव्याच्या पोर्तुगीज दप्तरातील पोर्तुगीज मराठे संबंध दर्शविणाऱ्या ए. बी. द. ब्रागांस परेरा संपादित कागदपत्रांचे भाषांतर व प्रकाशनाचे कार्य मंडळाने स्वतः हाती घेतले आहे. फ्रेंच दप्तरातील फ्रेंच-मराठे संबंध दर्शविणाऱ्या कागदपत्रांचे संशोधन, संपादन व भाषांतर करण्यासाठी मंडळाने मुंबई विद्यापीठास अनुदान दिले. त्याचप्रमाणे, राजस्थानी राज्यदप्तरात राजस्थानी व डिंगली भाषांमध्ये उपलब्ध असलेल्या महाराष्ट्रेतिहासविषयक कागदपत्रांचे संशोधन, संपादन व प्रकाशन करण्यास मंडळाने भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे या संस्थेस अनुदान दिले आहे. याशिवाय, "काशिराजाची बखर",

"पानिपतची लढाई", "बहामनी राज्याचा इतिहास", "अहमदनगरची निजामशाही", "गुजराथेतील मराठी राजवट", "सिंदखेडचे राजे जाधवराव यांची बखर", "करवीर रियासत", "महाराष्ट्र पुरातत्त्वीय समालोचन", "पेशवे व मराठे सरदार यांच्या स्वाऱ्यांचे मुकाम", "शिवपुत्र संभाजी", "भूषण साहित्य एवं ऐतिहासिक अनुशीलन", इत्यादी मौलिक संदर्भग्रंथांच्या प्रकाशनार्थ मंडळाने संबंधित व्यक्ति/संस्थांना अनुदान दिले आहे. इतिहासविषयक संशोधनाच्या कार्यास वाहिलेल्या इतिहास संशोधक मंडळ, मुंबई या संस्थेच्या "भारतीय इतिहास-व संस्कृति" आणि भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे या संस्थेच्या "भारतीय इतिहास" या त्रैमासिकांना मंडळ दरवर्षी अनुदान देते.

४. या योजनेखाली आतापर्यंत मंडळाने के. न्या. म. गो. रानडे लिखित "Rise of Maratha Power" या पुस्तकाचा प्रा. न. र. फाटक कृत अनुवाद, के. शां. वि. आवळसकर लिखित "रायगडची जीवनकथा", श्री. स. शं. देसाई संपादित "मराठ्यांच्या इतिहासाची साधने", "पोर्तुगीज दप्तर खंड ३", श्री. वि. गो. खोबरेकर लिखित "महाराष्ट्रातील दप्तरखाने", के. ना. ह. गद्रे लिखित "महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग" या पुस्तकाची संस्कारित आवृत्ती आणि डॉ. भा. कृ. आपटे लिखित "A History of Maratha Navy and Merchantships" हे महाराष्ट्राच्या इतिहासावर प्रकाश टाकणारे सहा मौलिक संदर्भग्रंथ प्रकाशित केले आहेत. तसेच "पोर्तुगीज दप्तर खंड २", "Portuguese and Marathas", फरिस्ताचे "गुल्शने इब्राहिमी", सर जदुनाथ सरकार यांचे "History of Aurangzeb", "Alberuni's India" इत्यादी ग्रंथांची भाषांतरे क्रमाने प्रकाशित होत आहेत. महाराष्ट्र व गोवा यांच्या इतिहासाशी संबद्ध असलेल्या शिलालेखांची व ताम्रपटांची वर्णनात्मक संदर्भसूची प्रकाशित करण्याचे मंडळाने ठरविले आहे. याशिवाय, महाराष्ट्र व मराठे यांच्या इतिहासावर प्रकाश टाकणाऱ्या नॅशनल लायब्ररी, कलकत्ता या संस्थेत असलेल्या के. डॉ. जदुनाथ सरकार यांच्या "अखबाराते दरबारे मुअल्ला" ह्या दप्तरातील ३० खंडांच्या हस्तलिखितांच्या छायाचित्रित प्रति तयार करून त्या इतिहास संशोधक व अभ्यासक यांच्या उपयोगासाठी उपलब्ध केल्या आहेत.

५. तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत पाश्चात्य देशांतून पोर्तुगीज, इटालियन, इंग्रज, फ्रेंच, रशियन, डच इत्यादी जे प्रवासी भारतात आले त्यांनी आपले प्रवासवृत्तान्त लिहून ठेवले आहेत. सतराव्या शतकात सर टॉमस रो, पाद्री टेरी, लॅकॅस्टर, बाऊरे, डेलॉन, अंबे कॅरे, मनुची, नॉरिस इत्यादी प्रवासी भारत भ्रमणार्थ हिंदुस्थानात आले व त्यांनी आपले प्रवासवृत्तान्त लिहून ठेवले आहेत. मनुची हा इटालियन प्रवासी होता. हिंदुस्थानात आल्यावर मनुची हा

दाराच्या पदरी तोफखान्यावर अधिकारी होता. पुढे काही काळानंतर शाहाआलम-कडे त्याचा खाजगी डॉक्टर म्हणूनही तो राहीला होता. पोर्तुगीज व इंग्रज यांच्या-तर्फे मोगलाकडे व मराठ्यांच्याकडे राजदूताची भूमिकाही त्याने बठविली होती. अशाप्रकारे त्याचा मोगल, मराठे, पोर्तुगीज व इंग्रज यांच्याशी घनिष्ठ संबंध आला होता. त्याच्या सुमारे पन्नास वर्षांच्या या अनुभवांची, अनेक घटनांची त्याने "Storia Do Mogor" मध्ये माहिती दिली आहे. त्याने १६५३ ते १७०८ या कालखंडासंबंधी भारताच्या परिस्थितीचे वर्णन आपल्या वरील पुस्तकात दिले आहे. मनुचीच्या वर्णनातून तत्कालीन राजकीय, आर्थिक व सामाजिक परिस्थिती-बद्दल फार समर्पक माहिती मिळते. मनुचीच्या "Storia Do Mogor" या ग्रंथाचा सारांश अनुवाद मंडळाच्या वतीने श्री. ज. स. चौथळ यांनी केला असून तो त्रिशत शिवराज्याभिषेक महोत्सव प्रसंगी मंडळाच्या महाराष्ट्रेतिहास योजनेखाली "असे होते मोगल" या शीर्षकाने प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी,

अध्यक्ष,

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ,

सचिवालय, मुंबई.

वाई : ८ ज्येष्ठ १८९६.

दिनांक २९ मे १९७४.

# अनुवादकाचे दोन शब्द

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने मराठी अनुवादाकरिता निवडलेल्या निकोलाव्ह मनुचीच्या "Storia Do Mogor" या ग्रंथाच्या संक्षिप्त अनुवाद करण्याचे काम मंडळाने माझ्याकडे दिले. या कामात मला मार्गदर्शन करण्यासाठी मंडळाने श्री. सेतु माधवराव पगडी यांना विनंती केली. ती त्यांनी मान्य केल्यामुळे मला त्यांचे बहुमोल मार्गदर्शन लाभले. या ग्रंथातील माहिती निवडीची बरीच काही तळटीपा गाळाव्या लागल्या व काही नवीन द्याव्या लागल्या. ही निवड, हे बदल करणे श्री. पगडी यांच्या मार्गदर्शनामुळेच शक्य झाले. ही गोष्ट येथे कृतज्ञता-पूर्वक नमूद करण्यास मला आनंद वाटत आहे.

मनुचीचा मूळ ग्रंथ पोर्तुगीज भाषेत आहे. त्याचा इर्विनने इंग्रजीत अनुवाद केला आहे. त्याचे चार खंड असून, जवळ जवळ तो दोन हजार पानांचा आहे. या ग्रंथाचा सुमारे पाचशे पानांचा अनुवाद तयार करताना मराठी वाचकांकरिता अनावश्यक असलेल्या गोष्टी व पाल्हाळांनी भरलेला मजकूर वगळण्यात आला. उदाहरणार्थ, ख्रिश्चनामधील पंथोपंथाची आपापसातील भांडणे किंवा हिंदु धर्म देवदेवता, हिंदूंच्या चालीरीती इत्यादी संबंधीची मनुचीने दिलेली माहिती, तसेच पूर्वीच्या मोगल बादशहासंबंधीची ऐकीव हकीकतीवरून लिहिलेली माहिती इत्यादी गोष्टी वगळाव्या लागल्या.

इ. स. १६८५ नंतर मनुची हा मोगल छावणीतून निघून मद्रास आणि पांडिचेरी येथे जाऊन राहिला. तो परत मोगल छावणीत आला नाही. या काळासंबधीची त्याची माहिती ऐकीवच म्हटली पाहिजे. ही इतर साधनावरून तपासून घेण्यात आली आहे आणि जी खोटी किंवा अतिशयोक्तीची दिसून आली ती गाळण्यात आली आहे.

बहुतेक ठिकाणी शब्दशः अनुवाद देण्यात आला आहे. पण जेथे अतिशय पाल्हाळ आढळला तेथे संक्षिप्त अनुवाद देण्यात आला. विशेषनामाविषयी मराठी वाचकांच्या सोयीसाठी काही बदल करणे आवश्यक झाले. उदाहरणार्थ, मनुची हा औरंग-जेबाचा उल्लेख द प्रिन्स, द मोगल, द ओल्ड मॅन, द किंग असा करतो. तसेच मराठ्यांच्या कोणत्याही राजाचा अथवा सैनिकाचा उल्लेख तो शिवाजी असा एक-वचनी अथवा अनेकवचनी करतो. मोगलांची नावेही त्याने नीट दिली नाहीत. स्थळांच्याबद्दलही त्याने अशाचप्रकारे गल्लत केली आहे. या दुरुस्त्या करणे आव-श्यक झाले.

इर्विनच्या तळटीपा अत्यंत माहितीपूर्ण आहेत. पण अनेक ठिकाणी स्थळांच्या (राजकीय) भौगोलिक बदलामुळे त्या कालबाह्य झाल्या आहेत. उदाहरणार्थ,

मलखेडचा उल्लेख निजाम राज्यात करण्यात आला आहे. ते आता कर्नाटक राज्यात आहे. टॉडने अनेक ठिकाणी ग्रँट डफसारख्या जुन्या संदर्भांचा उल्लेख केला आहे. त्याऐवजी भीमसेन सक्सेना, फारशी अखबार, राजस्थानी पत्रे, मराठी साधने इत्यादी नवीन साधनांचा वापर करून नवीन तळटीपा देण्यात आल्या आहेत.

सारांश हा संक्षिप्त अनुवाद मराठी वाचकांना माहितीप्रद आणि मनोरंजक वाटेल अशी दृष्टी या कामात ठेवण्यात आली आहे.

या ग्रंथाचा संक्षिप्त का होईना, अनुवाद करण्याची संधी मला साहित्य आणि संस्कृति मंडळाने दिली याबद्दल मंडळाचा मी आभारी आहे.

ज. रा. चौबळ.

## इंग्रजी अनुवादाची प्रस्तावना

रॉयल एशिॲटिक सोसायटीचे सभासद व बेंगाल सिव्हील सर्विसचे सेवानिवृत्त अधिकारी मि. विल्यम आर्यविन, आय. सी. एस. यांनी या ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर केले व टिपा तयार केल्या. त्यांनी या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेचा सारांश पुढीलप्रमाणे आहे :

हिंदुस्तान सरकारच्या औदार्यामुळे निकोलस मनुचींच्या "स्टोरी ऑफ मोगल्स" हा ग्रंथ प्रसिद्ध करणे शक्य झाले. तो आता जनतेला सादर केला जात आहे (१९०७). दोनशे वर्षांपूर्वी हा ग्रंथ युरोपला पाठविण्यात आला होता, या ग्रंथाचा काही भाग फ्रेंच, काही भाग इटालियन व काही भाग पोर्तुगीज भाषेमध्ये लिहिला गेला. त्या सर्व भागांचे आता इंग्रजीत भाषांतर होत आहे. ज्या अविश्रांत श्रमांनी हा ग्रंथ मनुचीने लिहिला, त्या ग्रंथाचे व्हावे तितके चीज झालेले नाही. त्याच्या हयातीतच त्याच्या ग्रंथाचे हस्तलिखित एका जेस्युइट संपादकाने हस्तगत केले आणि मूळ ग्रंथ जवळजवळ दडपून टाकून विकृत स्वरूपात ते प्रकाशित केले. अशा स्वरूपात ते हस्तलिखित प्रकाशित करण्यात आल्यामुळे मनुचीच्या ग्रंथावर सतत प्रतिकूल अशी टीका होत आली आहे.

जून १९०३ मध्ये, या ग्रंथासंबंधी रॉ. ए. सोसायटीपुढे मी वाचलेला निबंध, व त्यासंबंधी सोसायटीच्या मासिकात लिहिलेला लेख (ऑक्टोबर १९०३, पा. ७२३–३३) यांचा विचार करून, या ग्रंथाचा रॉ. ए. सोसायटीच्या ग्रंथमालेत समावेश करून घेण्याचे श्रेय इंडिया ऑफिसचे मि. वॉलिस्टन, सी. आ. ई. यांना आहे.

कात्रुच्या त्या ग्रंथाचे नाव होते "मोगल साम्राज्याचा, त्याच्या स्थापनेपासून, सामान्य इतिहास, व्हेनिसचा रहिवाशी मनुची, याच्या आठवणीवर आधारित" या ग्रंथाचा कर्ता पेअर फ्रान्सिओ कात्रु हा होता. २७२ पानांचा हा ग्रंथ फ्रान्सचा बादशहा १४ वा लुई याचा नातू बूर्जोन्या ड्यूक याला अर्पण करण्यात आलेला आहे.

आपल्या दुसऱ्या प्रस्तावनेत (१७१५) कात्रू हा म्हणतो "हे हस्तलिखित आपल्याला मनुचीकडून मिळाले" हे धादांत खोटे विधान आहे. नऊ वर्षांपूर्वी म्हणजे इ. स. १७०६ मध्ये आपल्या संमतीशिवाय आणि माहितीशिवाय आपले हस्तलिखित जेस्युइट लोकांना देण्यात आले आहे, अशी जोरदार तक्रार खुद्द मनुचीनेच केली आहे.

इ. स. १७०५ च्या पहिल्या प्रस्तावनेत कात्रू सांगतो की, आपल्याला मनुचीचे हे हस्तलिखित पाँडिचेरीच्या देलांदे नावाच्या अधिकाऱ्याकडून मिळाले. त्याने ते हस्तलिखित १७०१ अथवा १७०२ मध्ये युरोपात आणले होते. मोगल साम्राज्याच्या

सुरवातीच्या काळातील घटना शुद्ध मनुचीनेच बाजारगप्पांवर विसंबून लिहिल्या आहेत. त्यांना काहीच किंमत नाही. नेमक्या याच घटना कात्रूने आपल्या ग्रंथात दिल्या आहेत. त्याशिवाय आपला ग्रंथ लिहिताना कात्रूने इतर अनेक लेखकांच्या ग्रंथांचा वापर केला आहे. आपल्या विधानांना कात्रूने विशिष्ट ग्रंथांचे संदर्भ न दिल्यामुळे कोणती विधाने मनुचीकडून घेण्यात आली आणि कोणती इतरांकडून हे समजणे अशक्य झाले आहे.

कात्रूच्या या ग्रंथाचा पहिल्या प्रथम वापर ईस्ट इंडिया कंपनीच्या इतिहास लेखक रॉबर्ट ऑर्म याने केला आहे. याचा उल्लेख आपल्याला १७८२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या "हिस्टॉरिकल फ्रॅग्मेंटस" या ग्रंथाच्या प्रथम आवृत्तीत आणि १८०५ च्या दुसऱ्या आवृत्तीत आढळतो. ऑर्मच्या ग्रंथात कात्रू आणि मनुची यांच्यासंबंधी संयुक्त उल्लेख १८ ठिकाणी आले आहेत.

इ. स. १७७८ मध्ये आंक्वेटिल द्युपेरॉन याने ॲमस्टरडॅम येथे "लेजिस्लेशन ओरिएंटल" हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्या ग्रंथाच्या सूचीत त्याने मनुचीचे वर्णन मोगल दरबारातील व्हेनीसचा हकीम असे केले असून, त्याचा ग्रंथ आपण पॅरिसच्या जेसुइट ग्रंथालयात १७६३ मध्ये पाहिला असे सांगितले आहे. त्याने कात्रूच्या ग्रंथातून विसाहून अधिक उतारे दिले आहेत. असेच चुकीचे उल्लेख (१७८४-१८०७) यांच्या जर्मन ग्रंथात आढळतात.

ग्रँट डफ याचा "हिस्ट्री ऑफ दी मराठाज" हा ग्रंथ प्रथम १८२६ मध्ये प्रसिद्ध झाला. ग्रँट डफने आपल्या ग्रंथात कात्रूचा एकाहून अधिक वेळा उल्लेख केला आहे. हाच प्रकार एल्फिन्स्टनच्या "हिस्ट्री ऑफ इंडिया" या १८४१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाचा आहे.

डब्ल्यू. आर्स्किन यांच्या १८५४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या "हिस्ट्री ऑफ इंडिया" आणि १८७१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या एडवर्ड थॉमसच्या दोन ग्रंथांत–दिल्लीचे पठाण राजे, आणि हिंदुस्तानातील मोगल साम्राज्याच्या उत्पन्नाची साधने–यात कात्रूच्या ग्रंथातील उतारे घेण्यात आले आहेत.

एच. जी. कीन याचा ग्रंथ "टर्क्स इन इंडिया" (१८७९), टॅलबॉईज व्हीलरकृत "हिंदुस्तानचा इतिहास" (१८७६) लेनपूलकृत औरंगजेब (१८९३) इत्यादी ग्रंथांतूनही कात्रूचे उल्लेख आले आहेत.

कात्रूपाशी असलेले मनुचीच्या ग्रंथाचे हस्तलिखित देलांदे याने पॉन्डेचरीहून आणले होते हे पूर्वी सांगितले आहे. १७६४ मध्ये मिरमॅन या डच माणसाने ते हस्तलिखित एका लिलावात विकत घेतले. १८२४ मध्ये सर थॉमस फिलिप या इंग्रज माणसाने ते विकत घेतले आणि त्याच्या वारसाकडून बर्लिनच्या ग्रंथालयाने १८८७ त ते विकत घेतले.

मि. विल्यम आयर्विन म्हणतात "माझ्या भाषांतरासाठी मी बर्लिन ग्रंथालयातील हस्तलिखिताचा उपयोग केला आहे. याशिवाय व्हेनीस हस्तलिखिताचाही मी काही पानांकरिता उपयोग केला आहे".

या व्हेनीस कोडेक्सची हकिकत अशी : १७०४ किंवा १७०५ मध्ये मनुचीकडे कारूने आपल्या ग्रंथाची अगर ग्रंथाच्या प्रस्तावनेची, आगाऊ कॉपी पाठविली. आपल्या ग्रंथाच्या विकृत उपयोगाचा मनुचीला अतिशय राग आला. १७०६ च्या जानेवारीत त्याने आपल्या ग्रंथाच्या हस्तलिखिताचा भाग १, २ आणि ३, आणि त्यावेळी तो लिहित असलेला भाग ४ यातील काही पाने, युरोपला पाठविण्याचे ठरविले. त्याबरोबरच व्हेनीसच्या राज्यसभेला (सिनेट) लॅटिन भाषेत एक पत्र पाठवून आपल्या लेखनाची सर्व हकिकत कळविली. मनुचीने आपले हस्तलिखित फादर एफ. युसेबियस याच्याकडे दिले. त्याने ते पॅरिसमध्ये असलेला व्हेनिसचा राजदूत टिएपोलो याच्या हवाली केले तेथून ते १७१२ च्या सुमारास व्हेनिसला आले.

या हस्तलिखिताबरोबर मोगल बादशहा, त्यांचे कुटुंबीय आणि इतर नामवंत लोकांचा चित्रंही होता. हस्तलिखित अद्याप व्हेनीस ग्रंथालयात असून चित्रसंग्रह मात्र नेपोलियनच्या स्वारीच्यामुळे व्हेनीसमधून पॅरिसला आणण्यात आला.

हा चित्रसंग्रह मी पाहिला आहे. यातील बहुतेक चित्रे वैशिष्ट्यपूर्ण आहेत. विशेषतः औरंगजेब आणि शिवाजी, ही लक्षणीय म्हणता येतील. शाहा आलम (औरंगजेबाचा मुलगा), औरंगजेबाची इतर मुले आणि मनुचीला परिचीत असलेली माणसे यांची चित्रे अस्सल असली पाहिजेत. गोवळकोंडा आणि विजापूर यांचे राजे यांची चित्रे, मला हुबेहुब वाटतात आणि ती अस्सल म्हणण्यास काही हरकत नाही.

चित्रांच्या आपल्या वर्णनाच्या प्रस्तावनेत मनुची म्हणतो : "मोगलांचे साम्राज्य सोडण्यापूर्वी (म्हणजे १६८८ च्या पूर्वी) कुतूहल म्हणून मी पुढील माणसांची चित्रे काढवून घेतली. तैमुरलंगापासून औरंगजेबापर्यंत सगळे राजे आणि राजपुत्र, औरंगजेबाची मुले आणि नातु, विजापूर आणि गोवळकोंडा येथील राजे; काही प्रमुख हिंदु राजे, आणि इतर प्रसिद्ध सेनापती. चित्रकार मीर मोहंमद हा शाह आलमच्या पदरी असून माझा मित्र होता. राजवाड्यात असलेल्या मुळावरून त्याने ही चित्रे काढली होती. माझ्या माहितीप्रमाणे अद्यापपर्यंत कोणीही अशी चित्रे काढून जाहीर केली नाहीत. कुणी असे केलेही असेल तर, त्याच्या चित्रांची माझ्या चित्रसंग्रहाशी तुलना होऊ शकणार नाही. माझ्या जवळची चित्रे ही विश्वासार्ह आहेत. इतरांजवळची चित्रे तशी असू शकणार नाहीत. ही चित्रे काढून घेण्यात मी लागेल तितका खर्च करण्यात आणि भेटी देण्यात कसूर केली नाही. हे सर्व काम (चित्रे काढण्याचे) अनेक अडचणींतून करावे लागले, कारण चित्रांच्या प्रतिकृति संपादन करण्यात मला अतिशय गुप्तता पाळावी लागत होती. राण्यांची आणि राजकन्यांची

चित्रे मी दिली नाहीत. त्या नेहमी पडद्यात असल्यामुळे त्यांना पाहणे अशक्य आहे. अशी चित्रे कोणीही काढली असतील तर ती विश्वासार्ह समजू नयेत. दासी आणि नर्तकी यांची ती चित्रे असू शकतात. आणि कलाकाराच्या कल्पनेप्रमाणे काढली गेलेली असतात. ज्या चित्रावर वस्त्र आणि छत्र आहे ती राजघराण्यातील व्यक्तींची समजावी."

मनुचीचे चरित्र त्याच्या "मोगलांचा इतिहास" या ग्रंथावरून सहज मिळू शकेल असे फॉस्केरिनी जरी म्हणत असला तरी परिचित चरित्रकोशांमध्ये त्याच्यासंबंधीचा उल्लेख अत्यंत त्रोटक व चुकीचा आढळतो.

व्हेनीस शहरी चौकशी करता मनुचीसंबंधी मला यत्किंचितही शोध मिळाला नाही. व्हायकौंट बेलोमाँटच्या व्हेनीस येथील वास्तव्यासंबंधी अथवा त्याने समुद्रमार्गे केलेल्या प्रवासासंबंधीही काही निर्देश आढळला नाही. शेवटी मनुचीच्या "मोगलांचा इति-हास" याच ग्रंथाचा आधार घेऊन, जी माहिती मिळते, ती जोडून त्याचा चरित्रपट तयार करावा लागतो आणि तो तयार करण्याचा हा प्रयत्न केला आहे.

जन्मापासून १६५६ पर्यंत : या ग्रंथाच्या आरंभापासून ते १६७८ या वर्षापर्यंत मनुचीने दिलेल्या कालगणनेत सतत दोन वर्षांची चूक झालेली दिसते. बाहेरच्या पुराव्यावरून आपणास असे समजले की, आर्मिनियामध्ये झुल्फा येथे असताना, सूर्यग्रहण आपण पाहिले, असे मनुची म्हणतो, ते १२ ऑगस्ट १६५४ ला आले होते. जानेवारी १६५६ ला मनुची हिंदुस्तानच्या किनारी उतरला आणि आग्र्याजवळील समूगढची लढाई जून ८, १६५८ ला झाली होती. या लढाईत मनुची स्वतः हजर होता. हे लक्षात घेता मनुचीने १६५३ च्या नोव्हेंबर महिन्यात (१६५१ नव्हे) व्हेनीस सोडले असावे. आपण त्यावेळी १४ वर्षांचे होतो असे तो म्हणतो. यावरून त्याचा जन्म १६३९ मध्ये केव्हा तरी झाला असावा. मनुची घर सोडून पळाला आणि स्मर्ना या शहराकडे जाणाऱ्या जहाजात लपून राहिला. जहाजावर त्यावेळी हेन्रीबार्ड (लॉर्ड बेलोमाँट) असून तो पर्शिया व हिंदुस्तानच्या मार्गावर होता. बेलोमाँटला मनुचीची कीव आली आणि त्याने मनुचीला आपल्या नोकरीत घेतले. स्मर्नाहून ते दोघे आशिया मायनरवरून काझ्विन येथे पर्शियाच्या बाद-शहाच्या दरबारात पोहचले (ऑगस्ट १६५४). तेथून ते इस्पाहानला गेले. इस्पाहान येथे ते १६५४ सप्टेंबर ते १६५५ सप्टेंबरपर्यंत म्हणजे वर्षभर होते. तेथून निघून ते शिराझ आणि लार या प्रांतातून प्रवास करीत गोम्ब्रून (बंदर-आब्बास) या बंदरास पोहचले. तेथे ईस्ट इंडिया कंपनीच्या "सी हॉर्स" या जहाजावर त्यांना जागा मिळाली. १६५६ च्या जानेवारीत ते सुरतला पोहचले. एप्रिल महिन्यात त्यांनी सुरत सोडले आणि बऱ्हाणपूर, हांडिया, सिरोंज नगर, ग्वाल्हेर आणि धोल-पूर या मार्गाने ते आग्र्याला आले. तेथून ते दिल्लीकडे रवाना झाले. वाटेत होडल या गावी २० जून १६५६ रोजी लॉर्ड बेलोमाँट हा एकाएकी मरण पावला.

१६५६–१६६६ : येथून मनुची दिल्लीला गेला; आणि मरहूम राजदूत लॉर्ड बेलोमौंट याच्या प्रकरणातून त्याला शहाजहानचा मोठा मुलगा दाराशुको याच्या-पाशी हजर होण्याची संधी मिळाली. ८० रुपये मासिक वेतनावर मनुचीला दाराच्या तोफखान्यात नोकरी मिळाली. १६५८ मध्ये औरंगजेब आणि मुरादबक्ष हे आग्र्यावर चाल करून गेले. दाराशुको हा त्यांची वाट अडविण्यासाठी दक्षिणे-कडे निघाला. मनुची हा दाराच्या सैन्यात होता. समुगडच्या लढाईत दाराचा पराभव झाला आणि इतरांप्रमाणे मनुची पळत आग्र्यास पोहचला. नंतर वेषांतर करून तो औरंगजेबाच्या फौजेत राहिला. मुरादबक्षला कैद करण्यात आले त्यावेळी मनुची, औरंगजेबाच्या फौजेत होता. दिल्लीहून मनुची लाहोर येथे दाराशुकोला जाऊन मिळाला व त्याच्याबरोबर मुलतानमार्गे भक्कर या ठिकाणी गेला. तेथे किल्ल्याचे संरक्षण ख्वाजा बसंत याच्याकडे सोपविण्यात आले होते. मनुचीकडे तोफखाना देण्यात आला होता. त्यांनी वेढा लढवला. राजपुत्र दारा कैद झाल्या-नंतरच त्यांनी भक्करचा किल्ला सोडून दिला. भक्करहून निघून मनुची व शिबंदीतील इतर सैनिक लाहोरला आले. तेथे ख्वाजा बसंतवर औरंगजेबाचा अधिकारी खलीलुल्लाखान याने हल्ला केला. हल्ल्यात ख्वाजा बसंत मारला गेला आणि मनुची मोठ्या मुष्कीलीने वाचला. त्यानंतर इतर गोलंदाजाबरोबर हा दिल्लीस आला. तेथे औरंगजेबाने दिलेली नोकरी त्याने नाकारली. कारण त्याच्याबद्दल मनुचीच्या मनात तिटकारा निर्माण झाला होता. औरंगजेबाने काश्मीरला जाण्यासाठी दिल्ली सोडल्यावर (८ डिसेंबर १६६२) मनुची पूर्वेकडे रवाना झाला. पाटणा येथे त्याने नाव ठरविली आणि तो राजमहाल, आणि ढाका येथे पोहचला. ढाक्याहून सुंदर-बनच्या मार्गे तो हुगळीला आला आणि कासीम बाजार वाटेवरून तो आग्र्याला परतला.

दिल्ली आणि आग्रा येथे याने हळुहळु वैद्यकीय व्यवसाय सुरू केला. त्या सुमा-रास राजा जयसिंगाचा दुसरा मुलगा कीरतसिंगामार्फत जयसिंगाशी मनुचीची ओळख झाली. त्याने आपल्या तोफखान्यावर दहा रुपये रोज देऊन त्याला अधि-कारी म्हणून घेण्याचे ठरविले. मग मनुची त्याच्या नोकरीत राहिला. मार्च-सप्टेंबर १६६४ च्या दरम्यान जयसिंगाची दख्खनचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. मनुची त्याच्याबरोबर दक्षिणेकडे गेला. वाटेत मुंबईच्या आसपास (उत्तरेस) असलेल्या काही लहानसहान राजांच्या बरोबर वाटाघाटी करण्यासाठी त्याला जयसिंगाने रवाना केले. सात महिन्यांनी तो जयसिंगाला औरंगाबादेस जाऊन मिळाला. तेथे जयसिंग व शाहा आलम यांच्या फौजा एकत्र झाल्या होत्या. जून-जुलै १६६५ च्या सुमारास जयसिंगाच्या छावणीत मनुचीची व शिवाजीची गाठ पडली. पुढे जयसिंगाने दक्षिणे-कडे विजापूरवर केलेल्या चढाईत मनुचीने भाग घेतला.

१६६६–१६७७ : परिस्थितीला कंटाळून मनुचीने नोकरीचा राजीनामा दिला आणि कल्याणमार्गे तो वसईस आला. १६६७ च्या ईस्टर मध्ये तो तेथे होता. तेथे तो इन्क्विझिशन छळातून शिकस्तीने वाचला. तो १६६७ च्या मे महिन्यात गोव्यास पोहचला. गोव्यात तो १६६७ च्या मेपासून १६६८ च्या ऑगस्टपर्यंत म्हणजे १५ महिने होता. गोव्यातून कारमेलाइट पाद्री म्हणून वेषांतर करून तो निसटला आणि आग्रा येथे परत आला. दिल्ली येथे तो जयसिंगाचा मुलगा कीरतसिंग याच्या पदरी लागला. त्याला रोजी ५ रुपये मिळत त्याशिवाय एक घोडा बक्षीस मिळाला. पुढे एक वर्षानंतर कीरतसिंगाची काबूलला बदली झाली. मनुचीने लाहोरला जाऊन वैद्यकीय व्यवसाय करण्याचे ठरविले.

(१६७० अखेर—१६७१ सुरवात).

लाहोर येथे ६-७ वर्षे वैद्य म्हणून त्याने व्यवसाय केला. त्यात त्याला थोडी बहुत प्राप्ती झालेली दिसते. मग युरोपियनांच्या अंमलाखाली असलेल्या इलाख्यात आपण जावे असे त्यांनी ठरविले. ही घटना १६७६ मधली असावी. त्या वर्षी तो दमण येथे होता. इ. स. १६७७ मध्ये मनुची साष्टी बेटातील मुंबईच्या उत्तरेला ९ मैलांवर असलेल्या वांद्रा या ठिकाणी स्थायिक झाला.

१६७८–१६८२ : वांद्रा येथे एका सट्ट्याच्या व्यापारात मनुचीचे पैसे नाहिसे झाले. त्यामुळे मोगल दरबारात जाऊन आपल्या नशिबाची परीक्षा पाहणे त्याला भाग पडले. तो दिल्लीला परत गेला. दरबारातील एका अधिकाऱ्याच्या मार्फतीने त्याला राजपुत्र शाहा आलमच्या एका राणीचा उपचार करण्यासाठी बोलावण्यात आले. त्याच्या उपचारामुळे राणीला आराम वाटला. राणीने आस्थेवाईकपणे मनुचीची शाहा आलमच्या दरबारातील एक वैद्य म्हणून नेमणूक करून घेतली. ही घटना जानेवारी २०, १६७८ च्या नंतरची असली पाहिजे. कारण त्या तारखेला शाहा आलम काबूलहून दिल्लीला परतला. २८ सप्टेंबर १६७८ रोजी शाहा आलम याची दक्षिणेचा सुभेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. मनुची हा शाहा आलमबरोबर दक्षिणेकडे गेला. आपण १६७९ मध्ये आग्र्यात होतो असे तो एके ठिकाणी म्हणतो. शाहा आलमच्या बरोबर तो दक्षिणच्या वाटेवर असताना, मनुची हा १६७९ मध्ये आग्र्यास आला असला पाहिजे. ६ सप्टेंबर १६७९ रोजी शाहा आलमचा ३७ वा वाढदिवस होता. त्या दिवशी शाहा आलम आणि मनुची हे औरंगाबादेस होते.

यापूर्वी थोडे दिवस आधी म्हणजे १८ डिसेंबर १६७८ रोजी जोधपूरचा राजा जसवंतसिंग याचा काबूल येथे मृत्यु झाला होता. जसवंतसिंगाच्या मुलांचा ताबा घेण्याचा प्रयत्न फसल्यावर औरंगजेबाने जोधपूरचे राज्य जिंकून खालसा करण्याचे

ठरविले. या मोहिमेत भाग घेण्यासाठी शाहा आलम याला दक्षिणेतून बोलावण्यात आले. मनुची हाही शाहा आलमच्या बरोबर होता. त्या दोघांनी १६८० चा पावसाळा उज्जैन येथे काढला. १६८१ च्या जानेवारीत ते अजमीर येथे असलेल्या मुख्य मोगल सैन्याला मिळाले. उज्जैन आणि अजमीरच्या वाटेवर मनुचीने धूमकेतू पाहिला. ही घटना २४ डिसेंबर १६८० ची होय. या सुमारास राजपुत्र अकबर बादशहाजवळून निघून गेला होता. त्याने बंडाचे निशाण उभारले होते. २६ जानेवारी १६८१ रोजी शाहा आलमला त्याचा पाठलाग करण्यास पाठविण्यात आले. या कामावर तो १६८१ च्या मार्चअखेरपर्यंत होता. औरंगजेबाने इतर राजपुत्रांच्या बरोबर कोणत्या ना कोणत्या प्रकारचा तह केला. राजपुत्र अकबर हा पळून दक्षिणेस मराठ्यांच्या आश्रयास गेला, त्यामुळे औरंगजेबाने १५ सप्टेंबर १६८१ रोजी अजमीर सोडून दक्षिणेकडे कूच केले. दक्षिणेतून परत येणे त्याच्या नशिबी कधीच आले नाही.

१६८२–१६८४ : आपली परिस्थिती फार त्रासदायक होत आहे, हे मनुचीला जाणवू लागले. गोव्याच्या थिएटाईन पाद्र्यांच्यापाशी त्याने पैसा गुंतवला होता. यामुळे मनुचीने दोन महिन्यांची रजा काढली. पण हे केवळ निमित्त होते. त्याचा हेतु मोगल दरबारातून निघून जाण्याचा होता. ही गोष्ट बहुधा १६८२–८३ च्या सुरवातीस घडलेली दिसते. सुरतेस पोहचल्यावर फ्रेंच कंपनीच्या फ्रान्सिस्कॉ मार्टिन याच्याकडून त्याने एक गलबत घेतले आणि तेथून तो प्रथम दमण आणि नंतर गोव्याला गेला. त्यावेळी गोव्याचा गव्हर्नर कोंडीद आल्व्होरो हा होता. तो १६८१ च्या ११ सप्टेंबरपासून गव्हर्नरचे काम पाहू लागला होता. मनुची गोव्याला पोहोचला, त्यावेळी संभाजीच्या अधिपत्याखाली मराठ्यांच्या सैन्याने या गव्हर्नराला आणि गोव्याला अतिशय पेचात आणले होते. १६८३ च्या ऑगस्टमध्ये या पोर्तुगीज गव्हर्नराने फोंडा मुक्कामी मराठ्यांशी लढाई केली. त्यात पोर्तुगीजांची वाताहत झाली. मराठ्यांच्या बरोबर पोर्तुगीजांनी तहाची बोलणी सुरू केली. गव्हर्नराने संभाजीची मुलाखत घेण्यासाठी मनुचीला पाठविले. ती भेट निष्फळ ठरली. १६८३ च्या २५ नोव्हेंबरच्या रात्री संभाजीने गोव्याजवळील सँटो एस्टेव्हॉ हे बेट काबीज केले. मनुची पुनः एकदा संभाजीस भेटण्यास गेला. याच सुमारास औरंगजेबाचा मुलगा शाहा आलम हा मोठे सैन्य घेऊन गोव्याच्या सीमेवर उतरत होता. मनुची हा शाहा आलमलाही भेटला. पोर्तुगीजांनी शाहा आलमकडे वाटाघाटीसाठी जे मंडळ पाठविले त्यात मनुची होता. ही कामगिरी बजावल्यानंतर पोर्तुगीज गव्हर्नराने त्याला सँट इयगोच्या ऑर्डरमधील सरदारकी बहाल केली. सरदारीच्या या कागदावरील तारीख २९ जानेवारी १६८४ ही आहे.

१६८४–१६८६ : मनुची हा पोर्तुगीज शिष्टमंडळाचा सभासद म्हणून शाहा आलमच्या भेटीला गेला, त्यावेळी शाहा आलमने त्याला अडकावून ठेवले. मनुची

हा आपला नोकर असून, नोकरी सोडून पळून गेलेला असा इसम आहे, अशी भूमिका त्याने घेतली. मनुचीने मोगल छावणीतून पळून जाण्याचा प्रयत्न केला. पण त्याची मर्जी नसतानाही त्याला परत मोगल छावणीत आणण्यात आले. यानंतर शाहा आलम आणि त्याचे सैन्य कोंकणातून घाटावर चढून आले. या प्रवासात मोगल सैन्याला भयंकर प्रसंगाना तोंड द्यावे लागले. या प्रवासात मनुची शाहा आलम बरोबर होता. शाहा आलम यानंतर औरंगजेबाला अहमदनगरच्या छावणीत जाऊन मिळाला.

यानंतर काही दिवसांनी गोवळकोंड्यावर स्वारी करण्यासाठी औरंगजेबाने शाहा आलमची नेमणूक केली. या स्वारीत मनुची मोगल छावणीत होताच. शाहा आलमच्या सैन्याचा तळ मळखेड[1] येथे होता. मनुचीने गोवळकोंड्याच्या सेनाधिकाऱ्याबरोबर गुप्त पत्रव्यवहार केला. त्यांच्या मदतीने मनुचीला मोगल छावणीतून गोवळकोंड्याला पळून जाणे शक्य झाले. १६८६ मध्ये शाहा आलमने गोवळकोंडा ताब्यात घेतले. यामुळे मनुची तेथून पळून पूर्व किनाऱ्यावर असलेल्या नरसापूर-मच्छलीपट्टणच्या युरोपियन वसाहतीत जाऊन राहिला. शिपायांनी त्याला तेथून गोवळकोंड्याला परत आणले. तोपर्यंत शाहा आलम हा गोवळकोंडा सोडून निघून गेला होता. शाहा आलमच्या अधिकाऱ्यांनी मनुचीला आपल्या हवाली करण्यात यावे अशी त्यांच्याकडे निकड लावली. परंतु मनुचीने ही गोष्ट मोठ्या सफाईने टाळली. मनुची गोवळकोंड्यास दोन महिने राहिला. एका ऑगस्टिनीन पाद्र्याच्या मदतीने तो गोवळकोंड्याहून निघाला. तो मद्रास–फोर्ट सेंट जॉर्ज, येथे जाऊन पोहोचला. ही घटना १६८६ च्या उत्तरार्धातील होय.

१६८६ ते विवाहापर्यंतचा काळ : पाँडिचेरी हे स्थळ मद्रासच्या दक्षिणेस ८६ मैलांवर आहे. मनुचीचा मित्र फ्रॉसोआ मार्टिन हा त्यावेळी पाँडिचेरीला होता. मनुची मार्टिनला भेटण्यास पाँडिचेरीला गेला. आपण युरोपला परत जावे असा मनुचीचा बेत होता. पण मार्टिनने या बेतापासून त्याला परावृत्त केले. येथेच तू लग्न कर आणि स्थायिक हो, असा मार्टिनने त्याला सल्ला दिला. ख्रिस्टोफर हार्टले आणि आवीदा परेरा याच्या मुलीशी त्याची ओळख करून देण्यात आली. या बाईने थॉमस क्लार्क नावाच्या इसमाशी लग्न केले होते. थॉमस क्लार्क हा १६८३ च्या ६ ऑक्टोबर रोजी मरण पावला. मिसेस क्लार्क या विधवा बाईशी, मनुचीने १६८६ च्या २८ ऑक्टोबर रोजी विवाह केला. या संबंधापासून त्याला एक मुलगा झाला. पण तो अल्प वयातच वारला. मनुचीने आपला वैद्यकीय व्यवसाय पुनः सुरू केला.

१६८६–१७०० : मनुची हा मद्रासला येऊन पोहोचताच तेथील गव्हर्नर विल्यम गिफोर्ड ( जुलै १६८१ ते जुलै १६८७ ) याने त्याच्याकडे एक कामगिरी सांगितली.

---

१. मळखेड हे ठिकाण गुलबर्गा जिल्ह्यात ( कर्नाटक राज्य ) आहे.

गिफोर्डने १६८७ च्या १७ फेब्रुवारी आणि २७ मार्च या रोजी औरंगजेबाला दोन पत्रे पाठविली. ही पत्रे मनुचीच्या दुतांच्या द्वारे रवाना करण्यात आली. मोगलांचे उत्तर येण्यापूर्वी गिफोर्डची बदली होऊन त्याच्या जागी येलीहू येल (जुलै १६८७ ते २३ ऑगस्ट १६९२) याची मद्रासचा गव्हर्नर म्हणून नेमणूक झाली होती. नव्या गव्हर्नरने वरील वाटाघाटीची कामगिरी मनुचीकडून काढून घेतली. गोवळकोंडा येथे ख्वाजा इब्नूस उर्फ जोन डी मार्क हा एक आर्मिनियन व्यापारी होता. त्याच्याकडे वरील वाटाघाटीची कामे सोपविण्यात आली. या व्यापाऱ्याबरोबर मद्रास गव्हर्नरचा पत्रव्यवहार १६८६ च्या जुलैपर्यंत चालू होता. येल (१६८७ ते १६९२) आणि हिगीन्सन (१६९२) यांच्या कारकीर्दीत मनुचीला कोणतेही सरकारी काम सांगण्यात आले नाही. या उलट गव्हर्नर थॉमस पिट (१६९२ ते १७०९) यांना मनुचीवर विश्वास असावा असे दिसते. त्याने त्याच्याकडे बरीच कामे सोपविली.

१७०० ते १७०३ : इ. स. १७०० त जुन्या ईस्ट इंडिया कंपनीला प्रतिस्पर्धी अशी नवी कंपनी स्थापन झाली. तिच्यातर्फे काम करण्यासाठी सर विल्यम नॉरिस आणि जॉन पिट हे हिंदुस्थानात आले. दुभाषा म्हणून मनुचीने आपल्या कंपनीस येऊन मिळावे असा त्यांनी प्रयत्न केला. पण आपले आता वय झाले आहे आणि डोळ्यांनी नीट दिसत नाही या सबबीवर त्याने त्यांची ही सूचना नाकारली. पण मनुचीची खरी इच्छा मद्रासचा गव्हर्नर थॉमस पिट याला दुखवावयाचे नव्हते.

मोगलांनी १६८७ मध्ये गोवळकोंड्याचे राज्य जिंकून घेतले. यानंतर जिंजीला वेढा घालण्यासाठी ते पुढे सरकले. जिंजीचा किल्ला मद्रासच्या नैर्ऋत्येस ८२ मैलांवर आहे. १६९८ पर्यंत मोगलांना जिंजी जिंकता आली नाही. जिंजी घेतल्यानंतर त्यांनी तडफेने कर्नाटकमध्ये जम बसविण्यास सुरुवात केली. मोगलांचा नायब सुभेदार दाऊदखान पन्नी हा बादशहाच्या आज्ञेने इंग्रजांना नाँगलाच उपद्रव देऊ लागला. इ. स. १७०२ मध्ये त्याने मद्रासला वेढा दिला. हा वेढा कित्येक आठवडे चालला होता. मद्रासचा गव्हर्नर पिट याने दाऊदखानाकडे वाटाघाटीसाठी मनुची आणि एक ब्राह्मण, दूत म्हणून रवाना केले. १७०३ च्या फेब्रुवारी आणि मार्च महिन्यात मनुचीने दाऊदखान पन्नी याची कडपा या गावातील त्याच्या वाड्यात भेट घेतली. कडपा हे शहर मद्रासच्या वायव्येस १३७ मैलांवर आहे.

१७०३ ते १७०६ : इ. स. १७०३ मध्ये खिस्ती धर्मातील कापुच्चिन आणि जेस्युइट या दोन पंथांत भांडणे लागली. मनुचीने या मतामतांच्या भांडणात बराच भाग घेतलेला दिसतो. या विषयाने त्याच्या ग्रंथाची पानेची पाने व्यापिली आहेत.

१७०६ ते १७१७ (मृत्युपर्यंतचा काळ) : इ. स. १७०६ मध्ये मनुचीची पत्नी वारली. १७०६ आणि १७१२ च्या दरम्यान कधीतरी तो मद्रास सोडून पाँडिचेरी येथे स्थायिक झालेला दिसतो. १७१२ मध्ये त्याने शाहा आलम (बहादूरशहा)

याच्या आग्रहावरून लाहोरला जाण्याचा बेत केला. मद्रासचे गव्हर्नर आणि त्याचे कार्यकारी मंडळ यांची काही प्रकरणे मोगल दरबारात अनेक दिवसापासून रेंगाळत होती. ती निकालात काढावी आणि काही नवीन हक्क मिळवावे यासाठी मद्रासच्या कार्यकारी मंडळाने मनुचीच्या मध्यस्थीचा उपयोग करून घ्यावा असा बेत केला. या अवधीत शाहा आलमचा मृत्यू झाला. त्यामुळे मनुचीची योजना बारगळली.

दाऊदखानाने मद्रासवर जेव्हा हल्ला केला होता, त्यावेळी मनुचीने चांगली कामगिरी बजावली होती. त्याचे बक्षीस म्हणून मद्रासचा गव्हर्नर व कार्यकारी मंडळ यांनी १४ जानेवारी १७१२ रोजी मनुचीला मद्रास येथील त्याचे घर आणि बाग ही कायमची देणगी म्हणून दिली. ही मालमत्ता त्याच्याकडे पूर्वी वापरपट्टीने (लीज होल्ड) होती. मद्रास येथील ब्लॅक टाऊन म्हणून माहीत असलेल्या खाळाच्या वायव्य कोपऱ्याच्या पलीकडे मनुचीचा वाडा आणि बाग ही होती. मद्रासमध्ये मनुचीचे दुसरेही घर असावे. हे फोर्ट सेंट जॉर्जपासून आठ मैलावर सेंट थॉमस माऊंट येथे होते. याच घरात मनुचीने दाऊदखानाची मेजवानी केली असली पाहिजे.

मनुचीचा मृत्यू हा १७१७ मध्ये झालेला दिसतो. मृत्यूसमयी त्याची मालमत्ता १० हजार पॅगोडाच्या (१० हजार पौंड) किंमतीची असावी.

मनुचीची मातृभाषा इटालियन होती. तरी त्याने आपल्या ग्रंथाचा बराचसा भाग पोर्तुगीज भाषेत लिहिला. मूळ ग्रंथाचा १/३ भाग इटालियन मध्ये होता. पण संस्करण करून त्याने ग्रंथाच्या ज्या प्रती युरोपात पाठविल्या त्या फ्रेंच आणि पोर्तुगीज या भाषांतून होत्या. त्यातल्या त्यात पोर्तुगीज भाषेतील प्रतही मोकळेपणा आणि प्रभाव या दृष्टीने फ्रेंच प्रतीहून अधिक सरस आहे. फ्रेंच प्रतीतील भाषा टंकसाळी नसून एक बोलभाषेप्रमाणे दिसते. कथा कथनात मनुचीचा दर्जा श्रेष्ठ म्हटला पाहिजे. चांगली कथा कशी सांगावी, स्थळ आणि काळ यांचा योग्य आणि अचूक उल्लेख कसा करावा आणि कथेत समर्पक आणि समाधानकारक तपशील कसे भरावे ही उत्तम कथेची मर्मे मनुचीला ठाऊक होती. त्याच्या वर्णनात वाचक वाहून जातो. त्या काळातील भारतातील शहरी जीवनाचा रसरशीतपणा आणि वैभव एकीकडे तर दुसरीकडे दारिद्र्य, याचे उत्तम चित्रण त्याच्या लेखनातून आढळते. क्वचित ठिकाणी त्याची भाषा सद्‌भिरुचीला सोडून आहे असे आपल्याला वाटेल. पण यात तो आपल्या कालचे आणि देशाचे संकेतच पाळत होता. अर्थात त्याच्या ग्रंथात अश्लीलता ही क्वचितच आढळते.

इतिहासकार म्हणून पाहता, मनुचीने वास्तव आणि कल्पित या गोष्टींची थोडीबहुत मिसळ केली आहे असे आपल्याला आढळून येते. शहाजहानच्या पूर्वीच्या कारकीर्दीची वर्णने आपण मोगलांच्या अधिकृत दप्तरांतून घेतली आहेत, असे तो म्हणतो. पण ही वर्णने म्हणजे बाष्कळ बडबडी वाटतात. अशा गप्पा लोकात रूढ

असतील. पण बाबराशी त्याचा काही संबंध नसे. शहाजहानच्या कारकीर्दीपासून मात्र मनुचीच्या लेखनात बदल आढळतो. शहाजहानची शेवटची वर्षे आणि औरंगजेबाच्या कारकीर्दीची ५० वर्षे याबद्दल मनुचीने जे काही लिहिले आहे ते उपेक्षणीय नाही. तो जे काही सांगतो त्या सर्वांवर विश्वास ठेवलाच पाहिजे असे मी म्हणणार नाही. काही ठिकाणी त्याला चुकीची माहिती मिळालेली दिसते. आपल्या आयुष्याच्या उतारवयात तो लिहीत होता. त्याने वर्णन केलेल्या घटना ३०–४० वर्षांपूर्वी होऊन गेल्या होत्या. तो जाणूनबुजून खोटेपणा करतो असे मला वाटत नाही. आपल्याला माहिती कोठून मिळाली हे सांगण्यात सामान्यपणे तो प्रामाणिक आहे. त्याला व्यक्तींच्याबद्दल लहानसहान तपशील सांगण्यात मोठा रस वाटतो. सामान्यपणे मनुचीला लोक "पक्का गप्पीदास" म्हणतात. परंतु यामुळे विश्वासास अपात्र म्हणून त्याला दोष देता येईल असे मला वाटत नाही.

पौर्वात्यांनी लिहिलेल्या इतिहासग्रंथांत घटनांची अंतस्थ कारणे अगर ऐतिहासिक व्यक्तींचे खरे स्वभाव क्वचितच आढळून येतात. ती उणीव मनुची भरून काढतो. त्याने सांगितलेल्या गोष्टी व्यक्तींना न शोभणाऱ्या व त्यांना दुर्लौकिक करणाऱ्या आहेत, म्हणून त्या गोष्टी त्याज्य मानाव्यात असे मला वाटत नाही. त्या कालाला आणि देशाला अनुसरून त्या घडलेल्या दिसतात. मद्रासचा गव्हर्नर पिट याने या ग्रंथाचे वर्णन ठग टॉम याची कहाणी असे केले आहे. हे विधान मूर्खपणाचे आहे. पुस्तक वाचून न पाहताच त्याने हे मत प्रदर्शित केले असल्यामुळे त्याला काही किंमत देता येत नाही.

मनुचीच्या ग्रंथाला मी जागजागी तळटीपा दिल्या आहेत. मनुचीने केलेली विधाने मी इतिहासावरून तपासून पाहिली. क्वचित अपवाद सोडता, ती विधाने मला ऐतिहासिक दृष्टीने खरी असल्याचे आढळून आले. यावरून त्याच्या इतर काही विधानांना इतिहासातील पुरावे मला आढळले नाहीत, तरी तीही विधाने तितकीच विश्वासार्ह असली पाहिजेत असे म्हणण्यास काही हरकत नाही. माझ्या मते मनुचीने इतरांच्या ग्रंथांचा आपल्या पुस्तकात वापर केला नाही. फक्त बर्नियरच्या ग्रंथाचा थोडा बहुत उपयोग त्याने केलेला दिसतो. एकाच घटनेबद्दल जेव्हा दोघेही लिहितात, तेव्हा मनुचीने आपला विषयानुक्रम बर्नियरवरून घेतलेला दिसतो. पण त्यात सुद्धा विषयाचा उल्लेख मनुची आपल्याच आठवणी देण्याकडे करतो, हे लक्षात घेतले पाहिजे. औरंगजेब व दारा यांच्या युद्धात मनुची हा दाराच्या बाजूला तर बर्नियर हा औरंगजेबाच्या बाजूने होता. यामुळे आपल्याला दाराच्या पराजयाची हकीकत तपशीलाने कळते. एके ठिकाणी मात्र मनुचीने बर्नियरचा मजकूर जसाच्या तसा उतरून घेतला असे दिसते. पण १६६७ मध्ये बर्नियर हिंदुस्थान सोडून गेला; त्यामुळे त्यानंतरच्या घटनांबद्दल बर्नियरवरून मनुचीने काही घेण्याचा प्रश्नच उद्भवत

नाही. बर्नियर हा कुशल वैद्य होता आणि उच्च शिक्षण मिळविलेला मनुष्य होता. पण मनुचीची दृष्टी तितकीच तीक्ष्ण होती. त्याबरोबरच या देशात अनेक वर्षे राहण्याचा योग मिळाले. बर्नियरच्या मानाने मनुचीचा हा मोठा लाभच म्हणावा लागेल. एक दोन घटनांच्या बाबतीत, उदाहरणार्थ, मक्केचा वेढा, बर्नियरची माहिती मनुचीवर आधारलेली दिसते. १६६७ पूर्वी बर्नियरच्या लक्षात पुढील गोष्ट आली होती, ती ही की, मोगलांचे लष्करी सामर्थ्य हे आतून पूर्णपणे सडलेले आहे. उत्तम नेतृत्व असलेल्या एखाद्या युरोपियन ब्रिगेडला मोगलांची ही सत्ता उलथून पाडणे सहज शक्य होईल. मनुचीने पण तीस वर्षांनंतर पुढील भवितव्य पुढील शब्दांत अचूकपणे सांगितले आहे. मनुचीचे हे श्रेय नाकारता येणार नाही. इ. स. १७०० मध्ये लिहिताना तो म्हणतो "मी जे काही पाहिले, आणि अनुभविले त्यावरून मी निश्चितपणे म्हणू शकतो की, मोगल सत्ता नाहीशी करून सर्व साम्राज्य ताब्यात घेणे हे सहज शक्य आहे. त्यासाठी हव्या आहेत फक्त ३० हजार युरोपियन शिपायांचे सैन्य आणि कार्यक्षम सेनाधिकारी. त्यांना मोठे विजेते होण्याचे श्रेय मिळू शकेल."

राग, लोभ, द्वेष, आग्रह, तिटकारा इत्यादी बाबतीत मनुची हा काहीसा आत्यंतिक म्हणावा लागेल. बादशहा औरंगजेब, पोर्तुगीज आणि जेस्युइट यांच्यासंबंधी मनुचीला तिटकारा वाटतो. या बाबतीत त्याचे समर्थन करण्यासारखे नाही, असे खात्रीपूर्वक कोणी म्हणू शकेल काय ? दारा हा त्याचा पहिला मालक. त्याच्याबद्दल त्याला जिव्हाळ्याच्या भावना होत्या. यामुळे औरंगजेबाच्या बाबतीत त्याची मते प्रतिकूल झाली असणे शक्य आहे. पण मी विचारतो की ज्या माणसाने आपल्या दोघा भावांवर हल्ले करून त्यांना ठार मारले, आपल्या म्हाताऱ्या बापाला कैद केले, आणि रक्ताच्या पाटातून सिंहासन गाठले, त्या माणसाला सद्‌गुणाचा आदर्श म्हणून मानणे शक्य आहे काय ? पोर्तुगीजांचे अधःपतन होत होते. मनुचीने त्यांच्यावर जे कोरडे ओढले, ते योग्य नाहीत असे कोण म्हणेल ? धर्मप्रसारक म्हणून जेस्युइटांनी वापरलेले मार्ग आणि पोपची त्यांनी केलेली उघड उघड अवज्ञा ही निंद्य नव्हती काय ? इतर बाबतीत मनुची हा सामान्यपणे सहिष्णु आहे. अर्थात अधूनमधून हिंदु आणि मुसलमान या धर्मासंबंधी तो कडक आणि असहिष्णुतेचे उद्‌गार काढतो हे ही तेवढेच खरे. भारतीयांच्या शीलासंबंधी मग ते हिंदु असोत की मुसलमान, त्याचे मत फार वाईट होते. अर्थात हे मत पूर्णांशाने खरे होते असे मुळीच म्हणता येणार नाही. पण बहुसंख्य युरोपियनांचे हे मत होते हे विसरता येणार नाही. एक विचित्र गोष्ट अशी तो ही की, तो फल ज्योतिषाची टिंगल उडवतो आणि त्याच्याविषयी तिटकारा दाखवितो. असे असूनही चेटूक अगर मांत्रिक याबद्दलच्या कोणत्याही गोष्टी तो मुकाट्याने मान्य करतो. कोणताही मोठा मनुष्य एकाएकी मरण पावला की त्याचा मृत्यु विषप्रयोगानेच झाला असला पाहिजे असे तावडतोब मानण्याकडे मनुचीचा कल दिसतो. ही आणखी एक चमत्कारिक बाब म्हटली पाहिजे.

औरंगजेबाविरुद्ध लिहितांना असे आरोप तो नेहमी करतो. अर्थात अशा व्यापक आरोपाच्या मागे सत्याचा थोडा अंश असणे शक्य आहे. मनुची हा इटालियन असल्यामुळे आणि त्याच्या देशातील अशा प्रकारच्या घडामोडींची त्याला माहिती असल्यामुळे त्याचा असा कल होणे शक्य आहे असे म्हणता येईल.

मनुचीच्या ग्रंथाचे पहिले तीन भाग हे १६९९ आणि १७०० या साली लिहिले गेला. चौथा भाग १७०१ आणि १७०५ या वर्षांच्या दरम्यान लिहिला गेला. पाचवा भाग १७०६ आणि १७०९ मधील होय. फ्रांसिओ मार्टिन, बुल देलांदे यांच्या आग्रहावरून त्याने हा ग्रंथ लिहिण्यास घेतला. फ्रान्सचा राजा १४ वा लुई याला तो अर्पण करावा यासाठी ग्रंथ युरोपला पाठविण्याचा त्याचा हेतु होता. त्यामुळे त्याचे प्रकाशन होऊ शकेल अशी त्याला आशा वाटत होती.

टॅव्हर्नियरच्या ग्रंथात मनुचीचा उल्लेख आढळत नाही. पण मनुची मात्र टॅव्हर्नियरचा एकदाच ओझरता उल्लेख करतो आणि तोही काहीशा हेटाळणीच्या स्वरूपात. एन्सिली लेग्रेन्झी नावाचा एक व्हेनीसचा वैद्य १६७९ च्या सुमारास औरंगाबादेस आला. त्याचा उल्लेख मनुचीने आपल्या ग्रंथात केला आहे. लेग्रेन्झीनेही १७०५ मध्ये एक ग्रंथ लिहिला त्यामध्ये मनुचीचा उल्लेख आला आहे.

मनुची हा उच्च शिक्षण घेतलेला विद्वान नव्हता. त्याने कोठल्याही विद्यालयात शिक्षण घेतले नव्हते. ते त्याने स्वानुभवातून मिळविलेले होते. तो चतुर, हुशार आणि हजरजबाबी होता. त्याची निरीक्षणशक्तिही लक्षणीय अशी होती. त्याच्या गोष्टी वेल्हाळपणामुळे आणि संभाषणपटुत्वामुळे कोणत्याही मेफलीत तो फड गाजवू शके. त्याने काही दिवस शिपाईगिरी केली खरी पण त्या क्षेत्रात पराक्रम गाजविण्याची त्याला विशेष आस्था नव्हती असे दिसते.

पैशाच्या बाबतीतील त्याची प्रकरणे पाहता तो काहीसा खुनशी व चिकट वाटतो. वागणुकीत तो निर्व्यसनी आणि गंभीर असावा. आपल्या रंगेलपणाच्या गप्पा तो मारीत असला तरी त्या क्षेत्रात तो फार पुढे गेला होता असे दिसत नाही. तो पक्का कॅथलिक होता आणि मुसलमान करावे म्हणून झालेल्या सगळ्या प्रयत्नांचा त्याने प्रतिकार केला. वार्धक्यात धार्मिक भांडणातच त्याचे मन बरेच गुंतून राहिले. तो धर्माच्या बाबतीत बराच कट्टर बनला असावा. पोर्तुगीजांबद्दल त्याला तिटकारा होता. इंग्रजांच्यामध्ये तो वीस वर्षे राहिला. त्यांचा तो आदर करी. पण त्यांच्याबद्दल त्याला जिव्हाळा दिसत नाही. फ्रेंचांच्यावर मात्र त्याचे पूर्ण प्रेम होते. त्यांची त्याने अनेक वेळा स्तुति केलेली आढळते. त्याचे वैद्यकीय ज्ञान मर्यादित असले पाहिजे. पण जे होते त्यावरून त्या व्यवसायात त्याला थोड्या बहुत कीर्तीचा लाभ झालेला दिसतो. वासरात लंगडी गाय शहाणी असेच म्हणावे लागेल.

# मूळ ग्रंथाची प्रस्तावना

## वाचकास सूचना

काही लोकांनी आपली प्रवासवर्णने प्रसिद्ध केली आहेत. त्यात ज्या देशामधून त्यांनी प्रवास केला, ज्या राज्यात त्यांचे काही काळ वास्तव्य झाले, त्यांची वर्णने आलेली आहेत. अनेकदा त्यात मोगल साम्राज्यासंबंधीही हकीकती आल्या आहेत. याची मला जाणीव आहे. त्यामुळे व्हेनिसहून निघून मी हिंदुस्थानपर्यंत प्रवास केला, मोगल साम्राज्यात काही काळ राहिलो. हा माझ्या आयुष्यातील उमेदीचा काळ होता. या संबंधीचा सर्व वृत्तांत प्रसिद्ध करण्याचे परिश्रम घेणे व्यर्थ आहे, असे मागेच माझे मत बनले होते. परंतु या देशासंबंधीचे माझे ज्ञान अत्यंत विश्वसनीय आहे असे माझ्या मित्रांना वाटते. त्यांची अशीही समजूत झालेली आहे की, काही लोकांनी आपल्या ग्रंथात असत्य गोष्टी (ज्या अनेक ठिकाणी माझ्याही निदर्शनास आल्या) दिलेल्या आहेत. अशा माझ्या मित्रांची आग्रहाची विनंती मी मोडू शकलो नाही. म्हणून मी आता वृद्ध झालो आहे तरी, जे माझ्या परिचयाचे आहेत, व ज्यांनी मला पत्रे पाठविली आहेत, त्यांच्या प्रोत्साहनाने, माझ्या काळी व तत्पूर्वी मोगल साम्राज्यात काय घडले, याचा सत्य वृत्तांत, ज्याचे दुसऱ्यांना ज्ञान असण्याची शक्यता नाही, अशा कित्येक तपशीलांवर भर देऊन वाचकाला सादर करण्याचा मी निश्चय केला आहे. माझ्या बाबतीत जे काही घडले, जे काही मी पाहिले, ते सर्व मी सांगणार आहे. कोणत्याही गोष्टीची मी अतिशयोक्ति करणार नाही. कारण त्याचा मला तिट-कारा आहे. ११ वा मोगल बादशहा औरंगजेब याचे राज्य, त्याचे राजकारण आणि त्याने मिळविलेले विजय या संबंधीची मी माहिती देणार आहे. तसेच, या देशातील दुसऱ्या थोर राजांच्या प्रतिमा, मी जिज्ञासु वाचकाला सादर करणार आहे. हिंदु-स्थानात येण्याकरिता युरोपहून निघण्यापूर्वी या पुस्तकाचे वाचन करण्याची माझी वाचकाला विनंती आहे. इतर खोट्या वर्णनाने, अथवा स्वतःच्या मनात बनलेल्या खोट्या कल्पनांनी त्याने फसून जाऊ नये. कारण मी असे अनेक लोक पाहिले आहेत की, जे युरोप सोडून हिंदुस्तान या परक्या देशात आल्यावर पस्तावले आहेत. देवाच्या कृपेने जे सद्भाग्य मला लाभले ते सर्व जगाला मिळेलच अशी शक्यता नाही.

माझ्या वृत्तांताचे मी तीन भाग करणार आहे. पहिल्या भागाची दोन पुस्तके होतील. पहिल्या पुस्तकात व्हेनिस सोडल्यापासून दिल्ली शहरी पोहचेपर्यंतच्या प्रवा-सात मला आलेल्या अनुभवांचा वृत्तांत येईल. दुसऱ्या पुस्तकात त्याच्या भावांच्या मृत्यूनंतर औरंगजेब गादीवर येईपर्यंतचा संक्षिप्त वृत्तांत असेल.

दुसऱ्या भागात औरंगजेबाच्या लढाया व त्याचे विजय यांचे मी वर्णन करीन. तिसऱ्या विभागात मोगलांच्या राजकारणासंबंधी मी काही माहिती सांगेन. हिंदुस्थानातील राजांची योग्यता व महसूल यांची माहिती यात येईल. नंतर अनेक गोष्टी मी देईन. शेवटी हिंदूंच्या धर्माविषयी थोडी माहिती मी सांगेन.

अनुक्रमणिका

# माझा हिंदुस्तानचा प्रवास

मी अगदी लहान होतो तेव्हापासून सर्व जग पाहण्याची मला अनावर इच्छा होत असे. परंतु माझे मूळ गाव व्हेनिस सोडण्याची मला माझ्या पित्याची परवानगी नव्हती. तेव्हा या ना त्या रीतीने ते सोडण्याचा मी मनाशी ठाम निर्धार केला. म्हणून कोठे जाणार आहे हे माहित नव्हते तरी एक तरतान[1] (जहाज) व्हेनिसहून निघण्याच्या बेतात आहे हे कळताच मी त्या जहाजावर गेलो. हे साल १६५१[2] होते. मी त्यावेळी चौदा वर्षांचा होतो. जहाजावर आलेल्या व्यापाऱ्यांपैकी कोणाचा तरी मी मुलगा असेन, या समजुतीने मला कोणाही अधिकाऱ्याने हटकले नाही; व पुढे जहाजावर राहू दिले. व्हेनिस सोडले असेल नसेल तोच आम्ही एका प्रचंड वादळाच्या कराल दाढेत शिरलो. हे वादळ चोवीस तास टिकले. समुद्र प्रवासाला मी अपरिचित असल्यामुळे या अवधित मला मनस्वी क्लेश झाले व मी आजारी झालो. चोवीस तासानंतर भुकेमुळे मला कप्तानासमोर उभे राहणे भाग पडले. "येथे तुझा सांभाळ कोण करत आहे"? असे त्याने मला विचारले. मी करुणा भाकून म्हणालो की, मी येथे जहाजावर आलो व तुम्ही प्रवासास निघण्यापूर्वीच झोपी गेलो. मला कोणाचाच आसरा नसल्यामुळे आता आपणाकडे आलो आहे. हे ऐकून त्याने जहाजावरील त्याच्या लोकांना माझी काळजी घेण्याबद्दल हुकूम केला. सुदैवाने लॉर्ड बेलोमौंट नावाचा एक इंग्रज गृहस्थ या जहाजावर असल्याचे मला कळले. त्यावेळी इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस फ्रान्समध्ये वास्तव्य करत होता व इंग्लंडमध्ये क्रॉम्वेल हा त्या राज्याचा रक्षक (Protector) म्हणून काम करत होता. दुसऱ्या चार्लस् राजाचा पक्ष घेतल्याबद्दल क्रॉम्वेलने, लॉर्ड बेलोमौंटला देहान्ताची सजा दिली होती. ती चुकविण्यासाठीच तो वेषांतर करून जहाजावर प्रवास करत होता. ह्या माणसाने मजवर फार माया केली. आपल्याबरोबर येण्याविषयी त्याने मला विचारले. तेव्हा तुम्ही कोठे जाणार असे मी त्याला विचारले. आपण तुर्कस्तान, इराण व हिंदुस्तानला जात आहोत, असे त्याने सांगितल्यावर मला फार हर्ष झाला. आपणाबरोबर येण्यास मी आनंदाने तयार आहे असे त्यास उत्तर दिले. हे ऐकताच त्याने आपल्या वस्त्रांच्या

---

१. तरतान—एक मजल्याचे जहाज. एक डोलकाठी व एक लॅटिन शिड. भूमध्य समुद्रात याचा वापर होतो.

२. कोडेक्स ४४ (झानेटी) मध्ये नोव्हेंबर महिना दिला आहे. खरे वर्ष १६५३.

पेल्याच्या किल्ल्या मला दिल्या. तो मजवर पुत्रवत प्रेम करीत आहे असे पाहून मी त्याची मनोभावे सेवा करू लागलो. या प्रवासात डाल्मेशियाच्या किनाऱ्याने व इतर अनेक बेटांच्या किनाऱ्या-किनाऱ्याने आम्ही गेलो, आणि चार महिन्यांच्या प्रवासानंतर आम्ही स्मर्ना या बंदरात येऊन पोहोचलो.

तुर्कस्तान व इराण येथे काही दिवस काढून आम्ही बंदर-आब्बासला आलो. तेथे तीन दिवस काढल्यानंतर राजदूताने (लॉर्ड बेलोमाँटने) मला तेथील इंग्लिश वखारीच्या प्रमुखाला भेटण्याची आज्ञा केली. दुसऱ्या दिवशी वखारीचा प्रमुख राजदूताच्या भेटीस आला. त्याने राजदूताची सर्वप्रकारे सेवा करण्याची इच्छा दर्शविली. त्यावेळी एका खाजगी माणसाचे इंग्लिश जहाज सुरत बंदराला निघण्याच्या बेतात होते. वखारीच्या प्रमुखाने राजदूताला या जहाजातून प्रवास करण्याचे सुचविले कारण चालू पावसाळ्यातील बंदर-आब्बासहून निघणारे ते शेवटचेच जहाज होते.

इंग्लिश वखारीच्या प्रमुखाने राजदूताची भेट घेतल्यानंतर दोन दिवसांनी म्हणजे १५ डिसेंबर सोळाशे बावन्ना (खरे वर्ष १६५५) आम्ही त्याने सुचविलेल्या जहाजावर चढलो. आमच्या सर्व सफरीत जहाजाच्या कप्तानाने आम्हाला फार आदराने वागविले. वारा अनुकूल असल्यामुळे जहाज सुटल्यापासून बारा दिवसांनी आम्ही मोगल बादशहाच्या प्रदेशातील सिंदी[1] या बंदरात पोहोचलो. तेथे जहाजाने नांगर टाकला. नदीच्या उगमाकडे रात्रभर प्रवास केल्यावर आम्ही वस्ती असलेल्या ठिकाणी आलो. हे ठिकाण समुद्रापासून बारा तास प्रवासाच्या अंतरावर होते. ही नदी फार मोठी आहे. सप्त-सिंधू ही नदी देशाच्या आतील प्रदेशात वाहणाऱ्या सात नद्यांचा संगम होऊन बनलेली आहे. येथे आम्हाला बरीच अरबी व इराणी जहाजे दिसली. खजूर, घोडे, गोंद, पर्ल, राळ, सोनामुखी इत्यादी माल या जहाजांतून आयात करतात. हा सर्व माल मक्केहून आलेला असतो. याच्या बदली काळी व पांढरी साखर, लोणी, ऑलिव्ह तेल, कोकोस (हिंदुस्तानी शेंगा) असा माल ते निर्यात करतात. शिवाय ते अनेक प्रकारचे पांढरे ताभी (सुती कापड) कापड आणि छापाचे कापड निर्यात करतात. हे सर्व येथेच तयार झालेले असते. कप्तानाचे या ठिकाणी असणारे काम संपल्यावर आम्ही जहाजाकडे परतलो. जहाज हाकारल्यावर थोड्याच दिवसांनी म्हणजे १२ जानेवारी सोळाशे त्रेपन्ना (खरे वर्ष १६५५/५६) आम्ही सुरत बंदरी पोहोचलो.

आम्ही नांगर टाकताच माझा मालक शहरात उतरण्याची जागा शोधण्याकरिता गुप्तपणे किनाऱ्यावर गेला. हा सल्ला त्याला जहाजाच्या कप्तानाने व एका खाजगी व्यापाऱ्याने दिला होता. कारण इंग्रज लोक त्याला पकडून बंदरात उभ्या असलेल्या

1. हे सिंधमधील लारी बंदरच असावे. (मुळ पाहा. ३२०, ४०७, ८३७).

व लगेच इंग्लंडला निघणाऱ्या एकाद्या जहाजावर जबरदस्तीने नेऊन ठेवणार होते. सर्व सामान घेऊन सुरतेस उतरलो तेव्हा मला ही गोष्ट पुढे समजली. सुरतेस आम्हाला मि. जॉन (हेन्री यंग) भेटला. हा आमच्या पूर्वी थोडे दिवस आधी इराणहून निघाला होता. माझ्या मालकाने मग आपण मोगल बादशहाकडे राजदूत म्हणून आलो असल्याचे जाहीर केले.

सुरतेच्या सुभेदारास राजदूताच्या आगमनाची बातमी कळल्यावर त्याने आपल्या दिवाणाला राजदूताकडे जाऊन भेटण्याचा हुकूम केला व राजदूतास निरोप पाठविला तो असा :—आपण राजदूत आहात अशी अफवा आहे. तिच्या खरेखोटेपणाबद्दल कळविण्याची तुम्हास विनंती आहे. हल्लीचा मोगल बादशहा शहाजहान याजकडे मला त्यासंबंधी वृत्त पाठविणे आहे. यावर राजदूताने कळविले, "मी राजदूत आहे हे खरे आहे. आपण अगदी विश्वासपूर्वक तसे लिहा व माझे आगमन जाहीर करा".

सुरत : तीन वेळा मी सुरत बंदराला भेटी दिल्या. एका मोठ्या नदीच्या तीरावर वसलेले हे शहर समुद्रापासून सत्तावीस (९ लीग) मैल आत आहे. मी प्रथम येथे आलो होतो, तेव्हा येथील वस्ती फार दाट होती. पण त्याच्या भोवती तटबंदी नव्हती. शहराच्या रक्षणाकरिता नदीच्या काठी एक किल्ला होता. माझ्या दुसऱ्या व तिसऱ्या भेटीच्या वेळी मला गावाभोवती एक चांगली भिंत दिसली. शिवाजी बरोबरच्या लढाईमुळे औरंगजेबाने ती बांधली होती.

मी प्रथम जेव्हा येथे आलो होतो, तेव्हा अनेक जहाजे असलेली थोड्या पाण्याची इतकी मोठी नदी पाहून मला फार आनंद वाटला. ही जहाजे आकाराने लहान होती. मध्यम आकाराची जहाजे रिकामी असली तरच पुढे येऊ शकत. म्हणून व्यापारी आपला माल नावांतून समुद्रापर्यंत नेत व तेथे जहाजे भरीत. तसेच समुद्रावरून आत येणारा माल नावांतूनच आणला जाई. या नदीच्या काठी बसून असंख्य नावा, तीरासारख्या वेगाने जात असताना पाहून मनाला अतिशय प्रसन्न वाटते.

हिंदुस्तानातील हे सर्वांत मोठे बंदर आहे. आणि ही सर्वोत्कृष्ट नदी आहे आणि म्हणून युरोपातील निरनिराळे भाग, इराण, अरबस्तान, मक्का, बसोरा, मलबार व कोरामंडल किनारा, मच्छलीपट्टम, बंगाल, अचीन, केड्डा, मालदीव, मलाक्का, बटाव्हिया, मनीला, चीन यातून आणि जगाच्या इतर अनेक भागांतून येथे जहाजे येत असतात.

जेव्हा मालाने भरलेले एखादे जहाज बंदरात येते, तेव्हा येथील हिंदू व्यापारी जहाजावर येतात; आणि कप्तानाला विचारतात की, जहाजावरील सर्व माल तो विकण्यास तयार आहे का? तसे असेल तर पैसे देऊन सर्व माल ते खरेदी करतात.

अथवा त्याच्या बदला दुसरा माल देतात. जे त्यास पसंत असेल त्याप्रमाणे करतात. हे सर्व काम अति त्वरित केले जाते. म्हणजे व्याच्या शोधात ते असतात, व त्याकरिता त्यांनी धर मांडलेले असते, असा पाहिजे तो माल व्यापाऱ्यांना मिळू शकतो.

या नदीकाठी अल्पावधीत मोठी व सुरेख जहाजे बरीच तयार करण्यात येतात. कारण आवश्यक त्या सर्व गोष्टी येथे मिळतात. जहाजाला लागणारे लाकूड तर उत्कृष्ट असते. यामुळेच युरोपात बनविलेल्या जहाजापेक्षा ही जहाजे अधिक काळ टिकतात.

माझ्या पहिल्याच भेटीच्या वेळी या बंदरात मला फक्त दोनच वखारी दिसल्या. एक इंग्लिश व एक डच. नंतर फ्रेंच आले व त्यांनी येथे एक सुरेख वखार बांधली. फ्रेंच कापुचीनांचे एक लहानसे चर्च होते. त्याचा ॲम्ब्रोजीओ हा प्रमुख पाद्री होता. अशा रीतीने सधन मुसलमान, हिंदू, इंग्रज व डच व्यापाऱ्यांनी वस्ती केलेले सुरत, फ्रेंचांच्या आगमनाने आणखी गजबजले.

नदीच्या दुसऱ्या तीरावर समुद्रकाठी युरोपियन लोकांच्या बागा होत्या. मुसलमानांनी हल्ला करण्याचा प्रयत्न केल्यास ते, या बागांत जाऊन राहत असत. कारण तेथे जहाजांवरील लोकांच्या साह्याने ते आपले रक्षण करू शकतात.

मी येथे जहाजातून उतरलो तेव्हा मला बहुसंख्य लोक शुभ्र कपडे वापरत असलेले दिसले. आणि हात पुरुषांप्रमाणे स्त्रियाही होत्या हे सर्व पाहून मला मोठी गंमत वाटली. या बहुतेक स्त्रिया हिंदू होत्या. त्या बाहेर जाताना पर्शिया अथवा तुर्कस्तानमधील स्त्रियांप्रमाणे बुरखा घेत नव्हत्या.

इतर अनेक गोष्टी मी येथे पाहिल्या. त्यातील एका गोष्टीबद्दल फार अचंबा वाटला. ती अशी की, जो तो मनुष्य एक प्रकारचे रक्तासारखे द्रव थुंकत होता. मला वाटले, याचे कारण या देशातील सर्व लोकांना हा एक रोग असावा. किंवा त्यांचे दात तरी तुटलेले असावेत. की, इथल्या लोकांची दात उपटून घेण्याची पद्धत आहे की काय? या माझ्या सर्व शंकांच्या बद्दल मी एका इंग्रज बाईजवळ चौकशी केली. तिने मला सांगितले की हा काही कोणत्या रोगाचा परिणाम नाही. हे लोक एका विशिष्ट प्रकारची स्वादिष्ट पाने खातात. त्याचा हा परिणाम असतो. येथील भाषेत त्यांना 'पान' व पोर्तुगीज भाषेत 'बीटल' असे म्हणतात. तिने काही पाने मागविली. आपण स्वतः काही खाल्ली व मला काही खाण्यास दिली. ती खाल्ल्यावर माझे डोके इतके भणभणू लागले की मी आता मरणार, असे मला वाटू लागले. मी खाली कोसळलो आणि माझा चेहरा फटफटीत पडला. मला वेदना होऊ लागल्या. त्या बाईने माझ्या तोंडात थोडे मीठ टाकले; व मला शुद्धीवर आणले. हे पान प्रथमच खाणारावर असाच परिणाम होतो असे मग त्या बाईने मला सांगितले.

'बीटल' अथवा 'पान' हे आयव्ही पानासारखे पण अधिक लांबट असते. हे औषधी आहे. आणि हिंदुस्तानात ते प्रत्येकजण खातो. ते सुपारी बरोबर चावून खातात. बरोबर थोडा काथ असतो. हा एका झाडाचा वाळलेला चीक आहे. पानाला थोडा काथ लावून ते सर्व एकत्र करून खातात. त्यामुळे ओठांना लाल भडक रंग येतो. व वासही चांगला सुगंधी येतो. तंबाखू खाणाराप्रमाणे लोकांना दिवसातून अनेक वेळा ते खाल्ल्याशिवाय राहावत नाही. हिंदुस्तानातील स्त्रियांचा गप्पागोष्टी सांगणे व पान खाणे हा मुख्य व्यवसाय असतो. आणि म्हणून त्यांना सारखे तोंडात पान असावे लागते.

सुरतमध्ये लोकांची एक जमात आहे. तिला पारशी म्हणतात. हे लोक अग्निपूजक आहेत. पूर्वीच्या काळी ते पर्शियाचे रहिवाशी होते. परंतु जेव्हा मुसलमानी धर्म प्रथमच पर्शियामध्ये आला, तेव्हा शाहाने त्यांना सक्तीने मुसलमान करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे या लोकांनी सुरतच्या हिंदू राजाकडे निरोप पाठवून विनंती केली व आपल्या कुटुंबियांच्यासह या देशात प्रवेश करू देण्याची परवानगी मागितली. आपण येथे कायमचे प्रजाजन होऊ असे त्यांनी ह्या राजास कळविले. गोवध करणार नाही व गोमांस खाणार नाही या अटीवर त्या हिंदू राजाने त्यांना प्रवेश करण्याची परवानगी दिली. त्यांना इतर प्रजेप्रमाणे सर्व हक्क देण्याचे राजाने मान्य केले. त्याप्रमाणे पारशी लोक सुरतेस आले. आणि आजतागायत ते तेथे मोठ्या संख्येने राहात आहेत. खंडोपाडी, तसेच शेजारच्या दमण या पोर्तुगीज भागातही ते राहातात.

मी तेथे असताना सुरतच्या सुभेदाराबाबतीतील घडलेली एक गोष्ट. या सुभेदाराने बादशहा शहाजहानकरिता एक पाणीदार व बहुमोल मोती मिळवून त्याजकडे पाठविला नव्हता. याबद्दल बादशहाने त्याची चांगली कानउघाडणी केली. सुरतेला सुभेदार म्हणून पाठविलेली व्यक्ती उच्च दर्जाची, चांगल्या सन्माननीय आणि बादशहाच्या मर्जीतली असते. त्याला असे हुकूम झालेले असतात की, त्याने सुंदर, बहुमोल व दुर्मिळ वस्तू विकत घेऊन त्या बादशहाकडे पाठविल्या पाहिजेत. परंतु वर निर्देशिलेला मोती सुभेदाराला त्याची दाद न लागता, बादशहापर्यंत पोहोचला. त्याने तो चांगल्या किंमतीस विकत घेतला. मग बादशहाने वर सांगितल्याप्रमाणे त्याला चांगली ताकीद दिली व बजावले की, "तुम्ही बंदरात येणाऱ्या सर्व उत्तम वस्तू, विशेषतः अरबस्तान व पर्शिया येथून येणारे मोती व घोडे विकत घेण्याबद्दल दक्ष राहिले पाहिजे". या सर्व वस्तू राजांना व दरबारातील अधिकाऱ्यांना भेटी म्हणून देण्याकरिता बादशहाच्या उपयोगी पडतात. आणि म्हणून दुर्मिळ व किमती वस्तू शोधण्याकरिता, येणारा सर्व माल तो अत्यंत बारकाईने तपासतो.

या शहराचा महसूल बादशहा शहाजहानने आपली कन्या बेगम साहेब हिला पानसुपारीच्या खर्चाकरिता बहाल केला होता. या ठिकाणचे हे एवढे वैपुल्य पाहून

मला फार संतोष वाटला. व्हेनिस सोडल्यापासून मला असे समाधान मिळाले नव्हते. आणि येथे काही दिवस वास्तव्य करण्यात विशेषतः फ्रेंचांच्या आगमनानंतर, मला उत्साह वाटला. आम्ही येथे होतो त्या अवधीत येथील इंग्रज माझ्या मालकाची हर-प्रकारे सरबराई करीत. पण त्यांच्यावर विश्वास न ठेवण्याबद्दल त्याला त्याच्या मित्रांनी सांगितले होते. आम्ही सुरतेला ७५ दिवस राहिलो. या मुदतीत मोगल बाद-शहाच्या दरबारी जाण्याची तयारी चालली होती. आम्ही आमच्या सामानाची जुळवाजुळव करत होतो. पण त्याकरिता पैसा पाहिजे होता. मि. जॉन (हेन्री यंग) ने पुरविलेल्या पैशात आणि वस्तूंत, बादशहाला देण्याचा नजराणा तयार झाला. त्यात उत्तम कापड, सुरेख पखाल, एक अरबी घोडा, तलवारी, पिस्तुले, बंदुका, अनेक युरोपियन खेळांचे सामान इत्यादि गोष्टींचा समावेश होता. आम्ही सुरतहून निघालो. त्याकरिता लागणारा परवाना तेथील सुभेदाराने दिलेला होता. पंधरा दिवसांनी आम्ही बऱ्हाणपूरला पोहोचलो. येथे राजपुत्र औरंगजेब आपल्या लवा-जम्यासह राहत होता. त्याच्याबरोबर आम्हाला बराच खल करायचा होता. परंतु आम्ही त्याला भेटू शकलो नाही. कारण तो त्यावेळी औरंगाबादेस गेला होता.

बऱ्हाणपूर : बऱ्हाणपूर हे मध्यम विस्ताराचे गाव दिसले. गावाभोवती तट नव्हता. हे एका नदीच्या काठी वसलेले आहे. १६७९ त औरंगजेब बादशहा असताना, त्याने नदीकाठाकाठाने शहराभोवती तटबंदी करून घेतली. तशी ती नदी काही मोठी नाही. पण नदीचे पाणी स्वच्छ व गोड आहे. त्या गावात अर्मिनीयन व इराणी व्यापाऱ्यांची बरीच वर्दळ आहे. कारण येथे अनेक प्रकारचे उत्कृष्ट शिरो-वस्त्र व अतितलम पांढरे आणि तांबडे कापड तयार होते. त्याकरिता हे व्यापारी येतात. त्याशिवाय येथे लोखंडही निर्माण होते, या करिताही ते येथे येत असतात.

या गावात फळे भरपूर मिळतात. हिंदुस्तानातील सर्वोत्कृष्ट फळ आंबा तसेच संत्री, मोसंबी, लिंबे आणि द्राक्षे ही सर्व फळे विपुल प्रमाणात होतात. सर्व मोगल राज्याप्रमाणे, या गावातही अनेक प्रकारच्या भाजीपाल्याचा पुष्कळ पुरवठा आहे. या गावाला जाताना मार्गावर आम्हाला निर्मळ पाण्याचे अनेक ओढे व नाले लागले. तशीच खेडी व गर्द आणि रम्य झाडीही वाटेत लागली. छोटी, मोठी काळविटे, हरणे, गवे असे शिकारीचे विविध प्रकारचे प्राणी, आणि मोर, कोकीळ, तितर, लाव, बदक, पाणकोंबड्या, व इतर अनेक प्रकारचे पक्षी यांनी जंगले समृद्ध होती. येथे वाचकाला मी एक इशारा देत आहे. त्याने आपल्या सोबत्यापासून कधीही दूर जाऊ नये. कारण येथे रानावनात त्याला चोरांचा उपद्रव होण्याची शक्यता असते.

बऱ्हाणपूरला आम्ही आठ दिवस काढले. नंतर प्रवास सुरू करून सहा दिवसांनी नर्मदेच्या काठी हांडिया या गावी आलो. याच नदीच्या काठी तिच्या उताराजवळ

एक किल्ला होता. येथे नदीचे पात्र फार रुंद होते. त्यात मोठमोठ्या शिळा होत्या. ह्या नदीमुळे दख्खन व हिंदुस्तान असे विभाग पडतात. हिंदुस्तान म्हणजे हिंदुंचा देश होय.

सिरोंज : आम्ही नदी ओलांडली. आणि आठ दिवस रानावनातून प्रवास करून सिरोंज या मोठ्या गावी पोहचलो. प्राचीन काळी एका हिंदु राजाने हे वसविले होते. परंतु आता ते मोगल बादशहाच्या अंमलाखाली आले आहे. आजूबाजूला रजपूत जातीच्या हिंदु राजांची राज्ये आहेत. यापैकी अगदी जवळचा व बलाढ्य राजा चंपतराय बुंदेला याचा देश पसरलेला आहे. याने या गावावर हल्ला करून ते लुटण्याचा अनेकवार प्रयत्न केला. अनेक लढाया झाल्या. कित्येक वेळा मोगलांचा चांगलाच पाडाव झाला होता. यामुळे हे मार्ग प्रवाश्यांना फार धोक्याचे झाले आहेत. पथिकांच्या उपयोगाकरिता म्हणून मोगल राज्यात प्रत्येक मार्गावर अनेक सराया आहेत. या सराया म्हणजे बुरूज व बळकट दरवाजे यांनी युक्त असलेल्या किल्लेवजा इमारतीच होत. प्रत्येक सराईवर एक एक अधिकारी नेमलेला असतो. एकेका सराईत ८०० ते १००० लोक राहू शकतात. काही तर यापेक्षाही मोठ्या आहेत. सूर्यास्ताबरोबर सराईंची दारे बंद करून घेणे हे त्यांचे काम असते. दरवाजे बंद करून घेतल्यानंतर ओरडून पथिकांना जाहीर करतो की प्रत्येकाने आपापले सामान संभाळावे.

सकाळी सहा वाजता सराईचे दरवाजे उघडण्यापूर्वी पहारेकरी तीन वेळा प्रवाशांना ताकीद देतो, व ओरडून सांगतो की, प्रत्येकाने आपापल्या चीजवस्तूंची काळजी घ्यावी. त्या सूचनेनंतर एखाद्याला संशय आला की आपली एखादी वस्तू हरवली आहे, तर त्याची ती वस्तू सापडेपर्यंत सराईचे दरवाजे उघडले जात नाहीत. या उपायाने ते चोर शोधून काढू शकतात. आणि मग त्या चोराला सराईसमोर टांगण्यात येते. यामुळे एखादी तक्रार केलेली ऐकताच, आपण सापडू नये म्हणून चोर, तेथेच चोरलेला माल टाकून देतात.

या सराया पथिकांच्या करिताच असतात. सैनिक त्यांत जात नाहीत. त्यांत खोल्या, दिवाणखाने, आणि सोपे असतात. आतील आवारात झाडे लावलेली आढळतात. खाद्यवस्तूंची दुकानेही आत असतात. प्रवाशांच्या खोल्यांची व बिछान्यांची व्यवस्था करणाऱ्या पुरुषांच्याकरिता आणि स्त्रियांच्याकरिता घरे वेगवेगळी ठेवली जातात.

सिरोंजला आमचा चार दिवस मुक्काम झाला. नंतर आम्ही पुढे निघालो. आमचा प्रवास आता दुर्गम पर्वतामधून झाला. वाटेत अनेक सुंदर झाडे लागत होती. स्फटिकासारख्या निर्मळ पाण्याचे ओढे भेटत. या ओढ्यांचे पाणी अतिशय पथ्यकर होते. अनशेपोटी पाणी पिणारांनासुद्धा यापासून अपाय न होता उलट ते अतिशय

हितकर असे. सहा दिवसानंतर आम्ही नरवर येथे पोहोचलो. डोंगराच्या एका रांगेच्या पायथ्याशी हे शहर वसलेले आहे. डोंगराच्या एका अत्युच्च शिखरावर एक किल्ला आहे. या किल्ल्याचा परिघ सुमारे दोन मैलांचा आहे. हा किल्ला फार पूर्वी एका हिंदु राजाने बांधला होता. आत पुष्कळ इमारती आहेत. परंतु वाईट हवा व मोगल बादशहांचे दुर्लक्ष यामुळे यांच्या भिंती पडू लागल्या आहेत. हिंदूंची जी जी मजबूत ठिकाणे त्यांच्या हाती पडत ती ती नाश करण्याचा मोगलांचा प्रयत्न असे. यात त्यांचा उद्देश असा असे की, पराभूत राजे, बादशहा विरुद्ध बंड करण्यास समर्थ राहू नयेत.

ग्वाल्हेर : नरवर येथे मुक्काम न करताच आम्ही पुढे निघालो. आणि पाच दिवसांनी प्रसिद्ध ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर पोहोचलो. राजपुत्र व मोठ्या हुद्याचे लोक यांच्यासाठी ग्वाल्हेरचा किल्ला कैदखाना म्हणून उपयोगात आणला जात असे. नऊ मैल परीघ असलेल्या एका मोठ्या डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. त्यावर जाण्याचा एकच रस्ता आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस भिंती आहेत. रस्त्यावर प्रवेश रोखून धरणारे मधूनमधून दरवाजे आहेत. प्रत्येक दरवाज्यावर पाहरेकरी व रक्षक सैनिक होते. डोंगराचा बाकीचा भाग खडकाळ आणि भिंतीसारखा खडा आहे. ही एक निसर्गाने निर्माण केलेली भिंतच वाटते. या डोंगराभोवती जो तट आहे, त्याचे सज्जे, ओवऱ्या, दालने, मंडप, हे वेगवेगळ्या हिंदुशिल्पाच्या कलाकृती आहेत. हा सर्व देखावा पाहून पाहाणाराचे मन आनंदित होते. डोंगरावर मोठा माळ आहे. त्यावर भव्य राजवाडे आहेत. त्यावरील सज्जे व खिडक्याकरिता तऱ्हेतऱ्हेचे दगड वापरलेले आहेत. माळावर अत्यंत शोभिवंत अशा बागा आहेत. त्याना स्वच्छ झऱ्यांचे पाणी पुरविले जाते. बागामधील डोकावणारी सुरूची सुंदर झाडे बऱ्याच अंतरावरून दिसत. सर्व साम्राज्यातील अप्रतीम असे चमेलीचे तेल किल्ल्याच्या आवारात तयार करीत. या जिल्ह्यात लोखंडाच्या खाणी बऱ्याच आहेत. त्यातील काच्च्या लोखंडापासून तयार केलेल्या वस्तू मोगल प्रदेशात प्रमुख शहरी पाठविल्या जात.

डोंगराच्या पायथ्याशी जो गाव होता, त्यात पुष्कळ गवई आणि वाजवय्ये रहात असून त्यांची उपजीविका त्यांच्या वाद्यावर होई. अनेकांच्या मते हिंदु संगीताला सुरुवात या डोंगरावर झाली.

मार्गस्थ होऊन तीन दिवसांनी आम्ही चंबळ नदीकाठच्या धौलपूर या गावी पोहचलो. नंतर चार दिवसांनी आम्ही आग्र्यात प्रवेश केला. सुरत ते आग्रा हा ४६० मैलांचा प्रवास आता आम्ही पुरा केला होता. आग्र्याच्या सुभेदाराने आमच्या रहाण्याकरिता एका प्रशस्त वाड्याची योजना केली होती.

आम्ही येथे आल्यावर थोड्या दिवसांनी येथील वखारीत राहणारे इंग्रज, राजदूताच्या भेटीस येऊ लागले. ते त्याला मदत करण्याची वारंवार इच्छा दर्शवीत होते;

त्याच्यापुढे चांगली आश्वासने ठेवीत होते. पण राजदूताने ती मुळीच स्वीकारली नाहीत. अनेक गाठीभेटी झाल्यानंतर त्यांनी त्याला आपल्या घरी येण्याचे आमंत्रण दिले व तेथे त्यास एक बडी मेजवानी दिली. यावेळी राजदूताने या देशातील उष्णतेचा आपणास त्रास होत आहे, अशी तक्रार केली.

थोड्या दिवसांनी आम्ही दिल्लीस जाण्यास निघालो. त्यावेळी शहाजहान बादशहा तेथे रहात होता. आग्रा सोडल्यानंतर तिसऱ्या दिवशी संध्याकाळी मुक्कामाच्या ठिकाणी आम्ही जवळजवळ पोहोचलो होतो. जेथे उतरायचे ते घरही दिसू लागले होते; तोच राजदूताने अत्यंत आर्त स्वरात मला हाक मारून पाणी मागितले. त्यास पाणी देण्याचा मला अवकाश मिळण्यापूर्वीच त्याचे प्राणोत्क्रमण झाले. ते त्याचे शेवटचेच शब्द होते. जून २०, १६५३ (खरे वर्ष १६५६)ला सायंकाळी ५ वाजता त्याचे देहावसान झाले. त्याचा मृत देह आम्ही चटकन आग्रा व दिल्ली यांच्या दरम्यान असलेल्या होडल येथील सराईत नेला. रात्र फार झाली असल्यामुळे आम्ही त्याचे दफन केले नाही. सराईच्या अधिकाऱ्याने न्याय खात्याच्या स्थानिक अधिकाऱ्यास राजदूताच्या मृत्यूची वर्दी दिली. तो तावडतोब त्या जागी हजर झाला. सर्व सामानावर त्याने आपली मोहोर करून, ते हलविण्यास मनाई हुकूम काढला. सामान ताब्यात घेऊन मोहोर करण्याचे कारण मी (मनुची) त्यास विचारताच तो म्हणाला, "ही या राज्याची पद्धत आहे. ही राजदूताची मालमत्ता असल्यामुळे दरबारच्या हुकूमाशिवाय ती मुक्त करता येत नाही." चांगले उजाडल्यावर गावाजवळील एका तलावाच्या काठी राजदूताचे दफन केले. राजदूतासारख्या मोठ्या हुद्याच्या माणसाच्या अस्थी योग्य ठिकाणी हलविता याव्यात, म्हणून तिथे एक खूण करून ठेवली. पंधरा महिन्यांनी त्या अस्थि आग्रा शहरी हालविण्यात आल्या.

राजदूताचे दफन केल्यावर सर्व नोकर निघून गेले. मी एकाकी राहिलो. दुःखी व चिंताक्रांत होऊन बसलो होतो. माझे समाधान होईल असे काही नव्हते. मी चिंता करत होतो की, जरी किल्ल्या माझ्या ताब्यात होत्या, तरी माझ्या वस्तू मी कशा मिळवायच्या, कोणाची मदत घ्यायची? कारण राजदूताच्या मालमत्तेबरोबर माझ्याही सामानावर मोहोर करण्यात आली होती.

राजदूताचे दफन झाल्यावर आग्र्याच्या इंग्लीश वखारीच्या अधिकाऱ्यांना मी पत्र लिहिले. आणि त्यांना राजदूताच्या मृत्यूचे व स्थानिक अधिकाऱ्यांनी राजदूताच्या व माझ्या मालमत्तेवर घातलेल्या बंदी (हलविण्याबद्दल) हुकूमाचे कळविले. शिवाय त्यांना विनंती केली की, आपण मला आवश्यक ती शिफारसपत्रे द्यावीत. त्याचे मला काहीच उत्तर मिळाले नाही. परंतु आठ दिवसांनी सरकारी तोफखान्यावरील दोन इंग्रज अधिकारी–थॉमस रोच व रुबेन स्मिथ–हे हजर झाले.

ते मला भेटण्याकरिता आले होते. मी त्यांना पाहिल्यावर विचारले की तुम्ही कशाकरिता आला आहात? त्यांनी उत्तर दिले की राजदूताची मालमत्ता आता सरकारजमा झाली आहे. आणि ती घेऊन जाण्याकरिता आम्ही आलो आहोत. मी उलट जबाब विचारला "तुम्ही बादशहाचा हुकूम आणला आहे का ? " त्यावर ते हसले आणि म्हणाले ? "तू रे कोण " मी सांगितले "मी राजदूताचा नोकर आहे. ही त्याची मालमत्ता माझ्या स्वाधीन केलेली आहे. यात दोन बंदुका, चार पिस्तुले, लहान सहान वस्तू हे माझे सामान वेगळे ठेवले आहे. हे मला मिळाल्याखेरीज मी ही मालमत्ता सोडणार नाही." ही सर्व मालमत्ता आता सरकारची (बादशहाची) आहे असे म्हणून ते सर्व सामान दिल्लीस नेण्याची त्यांनी व्यवस्था केली.

मला ती मालमत्ता सोडायची नव्हती. मी त्यांच्या बरोबरच जाण्याचे ठरविले. वाटेने जाताना, "कृपा करा माझी मालमत्ता मला द्या" म्हणून मी त्यांना विनंती केली. पण मी पोरसवदा आहे हे पाहून व मला तुच्छ लेखून ते म्हणाले "तोंड बंद कर ! एक शब्द बोललास तर तुझा घोडा व हत्यारे हिसकावून घेऊ."

तीन दिवसांनी आम्ही दिल्लीस पोहोचलो. सर्व सामान त्यांनी एका सराईत टाकले. खोलीच्या दरवाज्यावर आपल्या मोहोरा ठोकल्या. तेथून ते निघून जाण्यापूर्वी मी त्यांना म्हटले "मेहरबानी करून तुमची नावे तरी मला सांगा. माझ्या मालमत्तेबद्दल कोणी चौकशी केली, तर ज्यांनी तिचा ताबा घेतला आहे त्यांची नावे व ते लोक कोण हे मला सांगता यावे. ही राजाची (बादशहाची) मालमत्ता आहे असे तुम्ही म्हणता, ती एका सराईतल्या खोलीत बंद करून ठेवल्याबद्दल मला फारच आश्चर्य वाटत आहे." त्यांना पक्की जाणीव होती की ही मालमत्ता आपली नाही. बादशहाचे खोटेच नाव आपण घेत आहोत. "आमची नावे माहीत होण्याची तुला काही एक जरूरी नाही." असे म्हणून ते निघून गेले.

सराईत सामान ठेवले होते तेथेच जवळच्या एका खोलीत मी राहिलो. काही तरी उपाययोजना करता यावी म्हणून मी त्या दोन इसमांची नावे मिळविली. याच सुमारास एकंदर काय परिस्थिती आहे, याबद्दल काळजी वाटून एक फ्रेंच मनुष्य, मला भेटण्याकरिता आला. त्याचे नाव होते क्लॉदिओ मोलिए. शहाजहानचा वडील मुलगा दारा याच्या तोफखान्यात हा ओतकामावर होता. त्या दोन इसमांच्या बाबतीत काय घडले होते ते सर्व मी त्याला सांगितले, व म्हणालो "मोगल बादशहाला आपली स्वतःची मालमत्ता ठेवण्यासाठी सराईसारख्या क्षुल्लक जागेखेरीज इतर जागा नाही, हे मला शक्य वाटत नाही." हे ऐकून त्या फ्रेंच माणसाने जे सांगितले ते असे : त्या इसमांनी ते सामान, बादशहाच्या हुकमाने जप्त केलेले नाही. राजदूताच्या मृत्यूचे ऐकून थॉमस रोचने राजपुत्र दाराकडे एक अर्ज सादर केला. राजपुत्र दाराची त्याच्यावर मर्जी आहे. या अर्जात त्याने म्हटले होते : "खाविंदाच्या

चरणाची सेवा करण्याकरिता माझा एक देशबंधू व नातेवाईक युरोपहून आला होता, परंतु त्याचे सद्भाग्य हे इतके अल्प काळाचे व अपुरे की, त्याची मनीषा पुरी होण्यापूर्वीच होडल येथील सराईत पोहचताक्षणीच मृत्यूने त्यास गाठले. त्यानंतर तेथील अधिकाऱ्यांनी त्याच्या सामानावर बंदी हुकूम बजावला. खाविंदांच्या चरणी विनंती करत आहे की मला या मालमत्तेचा ताबा देण्याबद्दल आज्ञा व्हावी."

राजपुत्र दाराने रोचच्या मागणीप्रमाणे अर्ज मंजूर केला. पण ही बातमी रूबेन स्मिथच्या कानावर गेली. ही मालमत्ता एकट्या रोचने घेणे योग्य नव्हे. ती दोघांमध्ये वाटली जावयास पाहिजे, म्हणून तो रोचबरोबर होडलपर्यंत गेला. स्मिथने रोचला अशी धमकी दिली की, वाटणीला जर तू तयार झाला नाहीस तर सर्व हकिकत मी बादशहाच्या कानावर घालीन. सर्व मालमत्ता गमवायला नको म्हणून रोच वाटणीला तयार झाला. अशी ही कथा मोलिएने मला सांगितली. मला मदत करण्याची तयारी दाखवून तो निघून गेला. अशा रीतीने काय चालले आहे, याची मला माहिती मिळाली.

मग माझ्या तुर्की भाषेच्या, पण विशेषकरून पर्शियन भाषेच्या ज्ञानावर भिस्त ठेवून (कारण ही चालू व दरबारात अधिक प्रचारात असलेली भाषा म्हणून) बशीरखान[1] नावाच्या बादशहाच्या चिटणीसाकडे मी, माझे गाऱ्हाणे नेण्याचे ठरविले.

दरबारात बादशहाला मुजरा करण्याचा रिवाज काय असतो, तो तुला ठाऊक आहे का, म्हणून चिटणीसाने मजजवळ चौकशी केली. "मला तो ठाऊक आहे," असे मी त्यास सांगितले; आणि त्याच्या सांगण्यावरून तो करून दाखविला. तो पाहून चिटणीस अगदी खूप झाला. मी त्यावेळी तुर्की पद्धतीचा पोषाख केला होता. निळ्या पट्ट्याने बांधलेले, तांबड्या मखमलीचे पागोटे घातले होते. त्याच रंगाच्या सॅटिनचा पोषाख घालून वर तांबड्या भुईवर जरीची फुले असलेला कंबरपट्टा बांधला होता. माझ्या तशा पोषाखावरून प्रश्न निघाल्यामुळे मी त्याला माझ्या सर्व प्रवासाची हकीकत सांगितली.

मी त्याच्या समोर तेथे असतानाच, त्याला खबर मिळाली की, बादशहाने त्याच दिवशी सकाळी दरबार भरविण्याचे ठरविले आहे. चटकन उठून, त्याने मला आपल्याबरोबर राजवाड्यात नेले. मी परी करून दाखविला होता, तसाच मुजरा बादशहाला करण्यास वाटेने त्याने मला बजावले.

**शहाजहान बादशहाचा दरबार :** आम्ही राजवाड्यावर पोहचलो, तेव्हा बादशहा यापूर्वीच सिंहासनावर येऊन बसलेला दिसला. "आपण बादशहाशी बोलत असू,

१. बशीरखान—हा त्याचा वजीर (चिटणीस) असा नसून, बशीरखान, राजपुत्र दारासुकोचा मुख्याधिकारी अथवा दिवाण हा होय. मुहम्मदभाली (बशीरखान) हा सामुगडच्या लढाईत जून १६५८ ला मारला गेला. (१०६८ हि.)

त्यावेळी त्याला बादशहासमोर हजर करा" असे निरणीसाने दोन माणसांना सांगितले. ठरल्याप्रमाणे बादशहाच्या स्थानापासून पन्नास पावलांचे अंतर राहिल्यावर त्या माणसांनी मला उभे राहण्यास, आणि बादशहाचे मजकडे लक्ष जाईल तेव्हा त्याला मुजरा करण्यास सांगितले.

सिंहासनाजवळील कठड्यापर्यंत गेल्यावर निरणीसाने बादशहाला मुजरा केला. आणखी पुढे जाऊन तो त्याच्याशी बोलू लागला. मग मजकडे बोट दाखवून मी (मनुची) हजर आहे असे त्याला सुचविले. बादशहाने मजकडे पाहिले; तशी मी त्याला ठरल्याप्रमाणे मुजरा केला. दरबारात हजर असलेले सर्व लोक उभेच होते. एकच मनुष्य फक्त सिंहासनाच्या बाजूस बसला होता. त्याचे आसन थोडे खाली होते. तो बादशहाचा थोरला मुलगा राजपुत्र दारा होता.

सिंहासन, राजघराण्यातील स्त्रियांच्या अंतःपुराला लागून समोरच ठेवले होते. त्याचा आकार टेबलासारखा होता. ते सर्व प्रकारची रत्ने, आणि मिना व सोन्याची फुले यांनी सुशोभित केलेले होते. सिंहासनावर तीन तक्के होते—एक गोलाकार टेकण्याकरिता व दोन्ही बाजूंस चौकोनी आकाराचे दोन असे होते. सिंहासनावर एक अति सुरेख वस्त्र पसरलेले होते. तुर्कस्तानात व हिंदुस्तानात सर्व दूर, लोक खुर्च्यांच्यावर बसत नाहीत. तर सुंदर वस्त्राच्या गादीवर अथवा गालीच्यावर मांडी मोडून बसतात. सिंहासनाभोवती एका पावलाच्या अंतरावर दीड फूट उंचीचे सोन्याचे कठडे होते. त्याच्या आत राजपुत्रांशिवाय इतर कोणीही प्रवेश करीत नाहीत. बादशहाला मुजरा केल्यावर, त्याने खुणावल्यानंतर कठड्याच्या आत सिंहासनाच्या पायाजवळील एका बाजूला असलेल्या आपल्या आसनावर राजपुत्र बसतात. ते बसल्यानंतर, छत्र, चामर, पानदान, तस्त, तलवार आणि पंखा घेऊन हुजरे प्रवेश करतात. सिंहासनाच्या आजुबाजूची अनेक फूट खाली असलेली जागा निरणीस व श्रेष्ठ अधिकारी यांच्याकरिता राखून ठेवलेली होती. ह्या जागेभोवती चांदीचे कठडे होते. जवळच सोनेरी दंड घेतलेले चोपदार उभे राहिलेले होते. दरबारचे हुकूम राजघराण्यातील राजपुत्रांना पोहोचविणे हे यांचे काम होते. आणखी काही पायऱ्यांच्या खाली, समोवर विस्तृत जागा आहे, त्यावर लष्करी अधिकारी व इतर अधिकारी उभे होते. येथे चांदीचे दंड घेतलेले चोपदार उभे राहिले होते. सुभेदार, लष्करी अधिकारी व इतर राजे यांना दरबारचे हुकूम पोहोचविण्याचे हे काम करत होते. हे चोपदार लाकडी कठड्यांना टेकून उभे राहिले होते.

सिंहासन असलेला दिवाणखाना वीस उत्कृष्ट कलाकुसरीच्या खांबांनी सुशोभित झाला आहे. छताने चांदीच्या कठड्यापर्यंतचा भाग झाकलेला आहे. त्याला मध्यापर्यंत जरीचा चांदवा लावलेला आहे. सिंहासनावरील चांदवा चार सोनेरी खांबांवर उभा केला आहे.

लाकडी कठड्यांच्या बाहेर एक मोठे पटांगण आहे. तेथे कठड्याजवळ जीन व सर्व साज घातलेले ९ घोडे एका बाजूला व ९ घोडे दुसऱ्या बाजूला उभे असतात. या घोड्यांच्या मागे शृंगारलेले चार हत्ती उभे असतात. ही योजना दरबार भरतो त्याच वेळी केलेली असते. चौकात अनेक सैनिक पहाऱ्यावर होते. शेवटी एक दालन असे होते की, त्यात नौबती, नगारे व इतर वाद्ये वाजविणारे असतात. बादशहाचे दरबारात आगमन जाहीर करण्याकरिता मोठमोठ्याने वाद्ये वाजविली जातात.

दरबारातील एकंदर शांतता विस्मित करणारी होती. कसल्याच प्रकारचा गोंधळ नव्हता. सर्व दर व्यवस्था राखण्याकरिता अधिकारी नेमलेले असत. लोकांना योग्य जागी उभे करणे हे त्यांचे काम असे. यापैकी काही अधिकाऱ्यांच्या हातात सोन्याच्या काठ्या होत्या व ते चांदीच्या कठड्यांच्या आत उभे होते. दुसरे जे अधिकारी होते त्यांच्या हातात चांदीच्या काठ्या होत्या. बादशहा नाराज होईल अशी कोणतीही गोष्ट घडू न देण्याची ते काळजी घेत होते.

मला जाण्याचा निरोप मिळाल्यावर, मी दरबारच्या त्या दोन माणसांच्या बरोबर निघालो व सरांईत आलो. मी कोठे उतरलो होतो, ती जागा व सामान असलेली खोली मी त्यांना दाखविली. त्यावर त्यांनी मोहोर तोडून सामान बाहेर काढले व ते सर्व सामान ते घेऊन गेले.

दुसऱ्या दिवशी सकाळी ९ च्या सुमारास चिटणीसाचे दोन नोकर मला घेऊन जाण्यासाठी आले. ते मला चिटणीसाच्या वाड्यावर घेऊन गेले. तेथे तो आदल्या दिवशीच्याच दिवाणखान्यात बसला होता. मी रीतीप्रमाणे मुजरा केला. हासरा चेहरा करून व दिवाणखान्याच्या एका कोपऱ्याकडे बोट दाखवून त्याने मला विचारले "ते दोन चोर तू ओळखलेस का? मी तिकडे पाहातो तो, बिड्या व खोडे घातलेले ते दोन इंग्रज तोतये माझ्या दृष्टीस पडले. ते फार शरमिंदे झालेले होते. त्यांना भिती वाटली की, आता आपला शिरच्छेद होणार.

पुनः चिटणीसाकडे वळून मी त्या दोन इंग्रजांशी बोलण्याची परवानगी मागितली. आणि त्यांच्याजवळ जाऊन मी त्यांना म्हणालो "माझे जे काही थोडे सामान होते ते मला देण्यात सबंधपणा झाला नसता का? पण तुम्हाला जे होते त्यापेक्षा अधिक मिळवायचे होते. तुमच्या आधाशीपणाचा परिणाम तुम्ही भोगता आहा. सर्व हबकण्याच्या प्रयत्नात तुमच्या हाती काहीच राहिले नाही, तुम्ही मला हसलात, माझी टर उडविलीत. माझी तुम्हाला दया आली नाही. मला मात्र तुमच्याबद्दल जो जिव्हाळा वाटतो, त्यामुळे तुमची ही दशा पाहून मला फार दुःख होत आहे. होडलच्या रस्त्यावर तुम्ही जी वृत्ती दाखविलीत त्यापेक्षा अधिक विवेकी व परोपकारी बुद्धि दाखविण्यास मी चुकणार नाही. याबद्दल खात्री असू द्या."

चिटणीसाने मला सर्व सामान बरोबर आहे का, एखादी वस्तू गहाळ झाली आहे की काय, ते पाहाण्यास सांगितले. गहाळ होणाऱ्या वस्तूंची किंमत त्या दोघा-कडून वसूल करण्याचा चिटणीसाचा विचार होता. सर्व वस्तू बरोबर असल्याचे, मी त्याला सांगितले. माझ्या वस्तू वेगळ्या ठेवलेल्या होत्या. त्या मला परत मिळण्या-बद्दल मी चिटणीसाला विनंती केली. शिवाय असे सांगितले की, राजदूताचे बरेचसे सामान हे सुरतेत राहाणाऱ्या मि. जॉन (मि. यंग) नावाच्या इंग्रज व्यापाऱ्याकडून परतफेडीच्या बोलीने घेण्यात आले होते.

चिटणीसाने आपल्या मुलांमध्ये समोरच मला बसायला सांगितले. गोड गोड बोलून आपल्या घरीच राहण्याची गळ घातली. आपले न ऐकल्यास, काही मिळणार नाही. अशी मला धमकी दिली. यावर मी उत्तर दिले. "मला येथे राहाता येणार नाही. माझ्या वस्तू मला मिळाल्या नाहीत, तरी त्याबद्दल मला काही वाटणार नाही. परंतु मि. जॉनला त्याच्या वस्तू परत केल्या गेल्या नाहीत तर मला फार दुःख होईल."

मग चिटणीसाने माझ्याजवळ, मरहूम राजदूत व मि. जॉन यांच्या वस्तू कोण-कोणत्या याबद्दल चौकशी केली. मी अगदी तपशीलवार त्या दाखविल्या. एका कारकुनास त्याने ते लिहून घेण्यास सांगितले. याशिवाय मि. यंग याने राजदूताला चार हजार पटाका कर्जाऊ दिले होते. आणखी एक घोडाही दिला होता. (तो चिटणीसाच्या ताब्यात होता) मग मी घरी जाण्यास निघालो. दोन दिवसांनंतर त्याच्याच घरी येऊन भेटण्यास त्याने मला सांगितले.

दोन दिवसांनी मी चिटणीसांकडे गेलो. सर्व गोष्टी बादशहाच्या (शहाजहानच्या) कानावर घातल्याचे चिटणीसाने मला सांगितले. मि. जॉनला देण्याची मालमत्ता सुरतच्या सुभेदाराकडे पाठविण्याचे ठरले. अरबी घोडा बादशहाने आपणाकडे ठेऊन घेतला. त्याची ठरविलेली किंमत एक हजार पटाका मि. जॉनला देण्याचा हुकूम झाला.

माझी मालमत्ता मला परत मिळावी म्हणून मी चिटणीसाला परत विनंती केली. यावर त्याने मला सांगितले "सर्व मालमत्ता सुरतला मि. जॉनच्या हवाली केली जाणार आहे. त्याची इच्छा असली तर ती तो तुला देईल. मी स्वतः ह्या माल-मत्तेची विल्हेवाट लावण्यास असमर्थ आहे." तो पुढे असेही म्हणाला "पण जर तू माझ्याकडे राहण्याचे कबूल केलेस तर यापेक्षा पुष्कळ मालमत्ता मी तुला देईन. माझ्या मुलाप्रमाणे तुला वागवीन." पण त्याच्या घरी राहण्याचे मी मान्य केले नाही. मी ख्रिस्ती असल्यामुळे तसे करणे मला योग्य वाटत नाही असे मी त्याला सांगितले. चिटणीसाने माझे भाषण एकदम तोडून टाकले. तो रागावून म्हणाला, "तू बाद-शहाचा गुलाम आहेस, हे तुला ठाऊक नाहीसे दिसते." –

हे शब्द ऐकताच मी ताडकन उठलो, व त्यास उत्तर दिले "युरोपियन लोक कोणाचे गुलाम नव्हते व ते कधीही गुलाम होणार नाहीत." मग चटकन दिवाणखान्यातून

बाहेर पडलो. प्राण गेला तरी या घरात राहणार नाही असा निश्चय केला. दरवाज्याजवळ येऊन चटकन घोड्यावर स्वार होऊन मी घाईने निघालो. न जाणो त्याने पाठीस माझ्यामागून माझ्यावर हल्ला करायला एखादा कोणी तरी पाठवायचा. युरोपियन लोकात जाऊन राहण्याच्या इराद्याने सुरतेस परतण्याचा मी निश्चय केला.

अशा वेळी मला क्लॉडियो मोलिए भेटला. त्याने मला आपल्या घरी नेले. तेथे मी त्याला माझा बेत सांगितला. त्याला तो पसंत पडला नाही. माझ्याशी चर्चा करून त्याने माझे मन वळविण्यात यश मिळविले. "एथपर्यंत तू आलास, तर या राज्यात काय आहे हे पाहिल्यावाचून ते सोडून निघून जाण्यात काय अर्थ आहे?" असे त्याने म्हटले.

मी त्यावेळी तरुण होतो. त्यात कोवळे वय असल्यामुळे मला कुतूहल होते. पण त्याहीपेक्षा क्लॉडिओने दाखविलेल्या मैत्रीची ओढ अधिक होती. विचार असा केला की, या राज्यात क्लॉडिओसारखा आपले कल्याण करणारा मित्र मिळाला आहे व तो आपल्याला एखाद्या कामात सहाय्य करीलच. शेवटी मी येथेच राहण्याचा निश्चय केला.

तीन दिवसांनी क्लॉडिओ मोलिएला राजपुत्र दाराच्या वाड्यात बोलावणे आले. "इंग्लंडच्या राजदूताबरोबर एक युरोपियन तरुण आलेला होता. तोफखान्यावरील दोन इंग्रज माणसांनी त्याला त्रास दिला. म्हणून थोड्या दिवसांपूर्वी बादशहासमोर आपले गाऱ्हाणे मांडण्याकरिता तो आला होता. त्याच्याबद्दल तुला काही माहिती आहे का?" असे राजपुत्र दाराने क्लॉडिओला विचारले. "तो माझ्या चांगला परिचयाचा आहे. त्याला कोणी मित्र नाही. असे पाहून मीच त्याला आपल्या घरी नेले" असे क्लॉडिओने उत्तर दिले. यावर राजपुत्राने त्याला सांगितले. "मला त्याच्याशी बोलायचे आहे. कसेही करून त्याला येथे माझ्यासमोर आण." क्लॉडिओ मोलिए घरी येताक्षणीच आनंदाने मला म्हणाला "बघ, तुझे नशीब उघडले. युवराजाने (दाराने) तुझ्याबद्दल आपुलकी दाखवून, तुला भेटायला बोलावले आहे." ही बातमी ऐकून मला अतिशय आनंद झाला. या राजपुत्राची चाकरी करणारे युरोपियन चांगले जीवन जगत होते व त्यांना पुरेसा पगार मिळत होता, हे मला माहीत होते. म्हणून राजपुत्राची भेट घेण्याचे लांबणीवर टाकायचे नाही असे मी ठरविले. मी राजपुत्राच्या भेटीबद्दल चौकशी करता क्लॉडिओ म्हणाला की, "ही भेट लांबणीवर टाकणे योग्य नाही. आलेली संधी गमावून चालणार नाही."

आम्ही दोघे त्याच दिवशी राजपुत्राच्या (दाराच्या) दरबारात गेलो; व तेथे त्याच्यासमोर हजर झालो. "तुला पर्शियन येते का?" असे त्याने मला विचारले. इतरही काही प्रश्न विचारले. प्रसन्न व स्नेहार्द्र असा भाव त्याच्या चेहऱ्यावर दिसत होता. परदेशी तरुण असूनही मी बिनचूक मुजरा केलेला पाहून त्याला आश्चर्य वाटले. त्याच्या प्रश्नांची उत्तरे, पर्शियनमधून समर्पकपणे देऊन, माझा या भाषेशी चांगलाच परिचय आहे हे मी त्याला दाखवून दिले.

मग मरहूम राजदूताचे पत्र मला ( मनुचीला ) वाचे असा दाराने हुकूम केला. ते पत्र लॅटिन भाषेत होते. मला त्याने त्याचे पर्शियन भाषेत भाषांतर करण्यास सांगितले. अशाच स्वरूपाचे पत्र पर्शियाचा शाहा यालासुद्धा लिहीलेले होते. ते मला परिचित असल्यामुळे त्या पत्राचे भाषांतर करण्यास काहीच अडचण पडली नाही.

**मनुची राजपुत्र दाराकडे नोकरी पत्करतो :** त्यानंतर राजपुत्राने मला विचारले की "मोगल राज्यात नोकरी करण्याची तुझी तयारी आहे का ?" "आपली नोकरी करण्यास मला आनंदच वाटेल" असे मी त्याला सांगितले. मग, मला दरमहा रु. ८० ( ४० पटाका )[1] पगार देण्याची त्याने आज्ञा केली. मला पोषाख ( शिरपाव ) तीस रुपये व एक घोडा, तावडतोब देण्यात यावा अशी आज्ञा केली.

राजपुत्र दाराच्या दरबारातून मी बाहेर आलो. राजपुत्र दाराची इच्छा अशी होती की, ख्वाजा मिस्किनने मला दरबारी रिवाज शिकवून मानकरी बनवावे. यासाठी मी मिस्कीनकडे रहावे असे त्याला वाटत होते. मुसलमान न होण्याची काळजी घेण्याचे मात्र मी मनाशी ठरविले. त्यासाठी मिस्कीनकडे न राहता युरोपियनांच्या बरोबर मी राहिलो. या युरोपियनांच्या पैकी काही शल्य वैद्य होते. पण बहुसंख्य मोगलांच्या नोकरीत तोफखान्यावर होते. ही नोकरी मोठी मानाची समजली जाई.

काही दिवस मी क्लॉडिओच्याच घरात रहात होतो. मजजवळ पुरेसा पैसा जमल्यावर मी माझ्याने वेगळे घर घेतले. मला आता पुरेसे वेतन मिळत आहे. हे दिसल्यावर मी मि. जॉनला सुरतेस पत्र लिहीले. बादशहाच्या हुकुमासंबंधीची त्यास माहिती दिली. मरहूम राजदूताची ( लॉर्ड बेलमाँट ) सर्व मालमत्ता सुरतेच्या सुभेदाराच्या हाती देऊन ती त्याच्या ( मि. जॉनच्या ) स्वाधीन करण्याचा हुकूम झाल्याचे त्यास कळविले. सर्व मालमत्ता पोहोचल्याचेही त्याचे मला उत्तर आले.

मी व्हेनिस सोडले त्यावेळी इटालियन भाषा बोलण्याचा मला बराच सराव झाला होता. शिवाय फ्रेंच थोडथोडी येत होती. या प्रवासात मी तुर्की व पर्शियन भाषा शिकलो. हिंदुस्थानात माझा चांगला जम बसला आहे हे पाहून हिंदुस्थानी भाषा शिकण्याच्या कामाला मी आता लागलो. शिवाय मोगल राज्यातील घडामोडींची आपणास माहिती व्हावी ही माझी इच्छा होती. अशा वेळी या कामाकरिता मला एक वयोवृद्ध[2] पंडित भेटला. त्याने मोगल बादशहा व राजपुत्र यांच्या बखरी वाचून दाखविण्याची तयारी दर्शविली तेव्हा आता मला असे वाटते की, माझ्याजवळ काही विशेष माहिती आहे. ती ऐकण्यात वाचकाला आनंद वाटेल. माझ्या दुसऱ्या पुस्तकात मी सर्व मोगल बादशहांच्या बद्दल माहिती सांगेन. ही माहिती औरंगजेबाच्या बंधुच्या मृत्युपर्यंतची आहे. आणि त्यात माझ्या बाबतीत काय काय घडले तेही दिसेल.

१. यावरून हेच सिध्द होते की पटाका नाणे हे दोन रुपये किंमतीचे आहे.

२. मनुचीचा वयोवृद्ध पंडित हा अगदीच अविश्वसनीय ठरला. कारण शहाजहानची कारकीर्द शेवटपर्यंत त्याच्या "राजांच्या बखरी" तून अफाट व असंबद्ध दंतकथांच्या गोंधळाखेरीज काहीच निघालेले नाही.

# शहाजहानची राजवट : उत्तरकाळ

## २. यादवी युद्धे–३. औरंगजेबाचे राज्यारोहण १६५८

[ मनूचीने दिलेली पहिली सर्व माहिती तैमूरलंग ते जहांगीर या मोगल बादशहांच्या संबंधीची आहे. ती सर्व येथे वगळण्यात आली आहे. मनूची १६५५ (मनूची सांगतो त्याप्रमाणे १६५३ साली नव्हे) साली हिंदुस्तानात आला त्यावेळी शहाजहान बादशहा राज्य करीत होता. आपली सावत्र आई नूरजहान व आपले भाऊ यांच्याशी लढून त्याने हे राज्य मिळविले होते. ]

### शहाजहान

**सुलतान बुलाखी याचा मृत्यू, त्याच्या मुलांची हत्या :** पळून गेलेल्या बुलाखी या आपल्या भाच्याला[1] पकडण्याचा आटोकाट प्रयत्न करणे ही बादशहा झाल्यानंतर शहाजहानने हाती घेतलेली पहिली कामगिरी होय. परंतु अनेक प्रयत्न करूनही त्याला बुलाखीला गाठता आले नाही. तो जो पळाला तो त्याने इराण गाठले. तेथेच त्याचा दारिद्र्यात अंत झाला. म्हणूनच बादशहांच्या यादीत त्याचा समावेश केला नाही. बादशहा हा किताबही त्याला कधी देण्यात आला नाही. बुलाखीला आपल्याला पकडता आले नाही, हे पाहून शहाजहानने लाहोरकडे दुसरे सैन्य पाठविले. तेथे बुलाखीचे दोन मुलगे राहत होते. शहाजहानचे असे सक्त हुकूम सुटले की जेथे ते सापडतील तेथल्या तेथेच त्यांना तावडतोब गिरफदार करून भिंतीत चिणून टाकावे. जेथे जहांगीर दरबार भरवीत असे त्या दिवाणखान्यात ते दोघे लिहित बसले होते. दयामाया न दाखविता शहाजहानच्या गुप्त दूतांनी त्यांना भिंतीत चिणून टाकले. पुढे त्या भिंती तशाच राहिल्या होत्या. मोगल बादशहांची अशी एक चाल होती की, ज्या खोलीत त्यांचा मृत्यू होई, ती भिंती घालून बंद करण्यात येई; आणि ती परत कधी उघडली जात नसे.

---

१. बुलाखी हे आवडते नाव बुलाखवरून आलेले आहे. बुलाख हा स्त्रियांचा एक अलंकार आहे. नाकाच्या कूर्चेपासून तो लोंबत राहतो. बुलाखीचे खरे नाव होते दावर बक्ष. हा जहांगीरचा मुलगा नसून नातू होता. त्याचा बाप खुश्रू हा जहांगीरचा सर्वांत वडील मुलगा होता. तो बाप हयात असतानाच १०३१ हि. (१६२२) साली मरण पावला. दावर बक्षाला मुसलमानी कायद्याप्रमाणे वारसाहक्कातून वगळण्यात आले म्हणून त्याला तख्ताचा अधिकार नव्हता. असफखानाने लाहोरला त्याला गादीवर बसविले. परंतु तो इराणमध्ये पळून गेला (एल्फिन्स्टन ५९२), तेथेच तो मरण पावला. युरोपियन्स व मनूची तसेच म्हणतात.

गादीवर आल्यानंतर शहाजहानने हुगळीच्या पोर्तुगीजांच्यावर स्वारी केली. कारण पोर्तुगीजांनी ताजमहाल (मुमताज महाल) या त्याच्या राणीच्या दोन दासी पळविल्या होत्या. शहाजहानने त्यांच्यावर कासीमखान या सेनापतीस धाडले. शक्य होते तोवर पोर्तुगीजांनी आपले रक्षण केले. परंतु अधिक वेळ टिकाव धरणे शक्य नाही असे पाहून ते शरण गेले. कासीमखानने पाच हजार पोर्तुगीजांना एकदम कैद केले. त्यामध्ये काही ऑगस्टीनियन व जेसुइट पंथाचे पाद्री होते. ते सर्व कैदी त्याने राजधानीला पाठविले. हुगळी हे गाव गंगा नदीवर वसले आहे. त्या गंगा नदीमधून पोर्तुगीजांना पळून जाणे शक्य झाले नाही. परमेश्वरानेच हुगळीच्या पोर्तुगिजांना शिक्षा करण्याचे ठरविले असावे; कारण नदीचे पाणी तळाला गेले; व त्यामुळे नावा रुतून पडल्या होत्या. अशी गोष्ट पूर्वी कधीच घडली नव्हती.[1]

राणी मुमताज महालचा मृत्यू. शहाजहान ताजमहाल बांधतो : परंतु ईश्वराची इच्छा अशी होती की, ते तेथे पोहचेपर्यंत ताजमहाल (मुमताज महाल) राणीचा[2] मृत्यु व्हावा. आग्र्याला राजवाड्यासमोर तिची कबर बांधण्याचा शहाजहानने हुकूम केला. त्याकरिता खूप पैसा खर्च करण्याचे त्याने ठरविले. त्या इमारतीचे दोन मजले बांधले गेले. तळमजल्यावर त्याच्या प्रियतम पत्नीचे दफन करण्यात आले. हे थडगे कोणासही पाहता येत नसे, कारण त्यावर स्त्रिया व खोजे यांची देखरेख होती.

ताजमहालच्या (मुमताज महालच्या) हयातीत जर हे पोर्तुगीज दरबारी पोहचले असते तर छळ करून त्यांचे तुकडे तुकडे करून टाकण्याचा तिने हुकूम दिला असता. कारण तिने अशा प्रकारची शपथ घेतली होती. तरीही तेथे पोर्तुगीजांची कडक शिक्षेतून सुटका झाली नाही. काहींनी आपल्या धर्माचा त्याग केला. मग तो देहदंडाच्या भितीने असो अगर आपल्या बायका परत मिळविण्याच्या उद्देशाने असो. त्यांच्या बायकांना शहाजहानने आपल्या अधिकाऱ्यांत वाटून टाकले. त्यांतील अतिसुंदर स्त्रियांना, शाही अंतःपुरासाठी राखून ठेवण्यात आले.

पाद्र्यांनी आपल्या धर्माला चिकटून राहण्याची अधिक चिकाटी दाखविली. आमचे रक्षण करणाऱ्या स्वामींबद्दल आम्हाला भक्ती आहे. बादशहाने काहीही आमिष दाखविले तरी आपण धर्म सोडणार नाही असे ते म्हणाले. काही थोडे सामान्य लोक होते, त्यांना सोडून देण्यात आले. दरबारात लोकप्रिय असलेल्या एका अर्मिनियन माणसामुळे त्यांची सुटका झाली. तसेच हिरोनोमो व्हेरोन्को नावाचा एक व्हेनिसचा रहिवाशी होता. त्याला मागे पोर्तुगीजांनी खंडणी भरून सोडविले

१. कासीमखान हा मीर मुरादजुवयानीचा मुलगा. तो रबी, १०४२ (१ ऑक्टोबर १६३२) ला मरण पावला. ज्याअर्थी हुगळी घेतल्यानंतर तीन दिवसांनी तो मरण पावला, म्हणजे ही घटना सप्टेंबर १६३२ च्या शेवटी घडली असावी. एल्फिन्स्टन हे साल १६३१ देतो. बील आणि मा-असीर-उल-उमरा (iii ७८) हे १६३१ देतात. कजुल-हमीदचा पादशाहानामा कैद्यांची घटना (सप्टेंबर १६३२) मध्ये देतात.

२. ताजमहाल (मुमताज महाल) जुलै ६,१६३२ ला (न.प.) मरण पावली.

होते. त्याने यावेळी पैसे भरून काहींची मुक्तता करविली. असे मुक्त झालेले लोक आग्र्यात राहू लागले.

शहाजहानने आपली कायम आठवण राहावी म्हणून राजधानीचे एक नवीन शहर वसविण्याचे ठरविले. यासाठी उत्तम हवा-पाणी असलेल्या दिल्ली शहराची त्याने निवड केली. प्राचीन दिल्लीच्या व तुघलकाबादच्या भग्नावशेषांचा त्याने हे नवीन शहर बांधण्यास उपयोग करून घेतला. त्याने या शहराला शहाजहानाबाद हे नाव या नव्या शहरास दिले.

**दिल्ली ( शहाजहानाबाद )** : हे शहर यमुना नदीच्या काठी, एका मोठ्या मैदानात वसलेले आहे. त्याचा आकार काहीसा अर्धचंद्राकृती आहे. याला बारा प्रवेशद्वारे होती. जुनी दिल्ली व इतर काही खेडी ही त्याची उपनगरे बनली. या शहराच्या भिंती निम्म्या विटांच्या व बाकीचा भाग दगडांचा अशा बांधलेल्या आहेत. प्रत्येक शंभर पावलावर एक बुरूज आहे, पण त्यावर तोफा ठेवलेल्या नव्हत्या. मुख्य दरवाजे दोन–एक आग्र्याच्या दिशेने जाणारा व दुसरा लाहोरच्या दिशेने जाणारा. शहरात चांगले बांधलेले मोठे बाजार आहेत. त्यात सगळ्या प्रकारच्या वस्तूंची विक्री होते. हे बाजार वर सांगितलेल्या प्रवेशद्वारापाशी थांबतात. दिल्लीत सरदारांचे सुरेख प्रासाद आहेत. इतर अनेक घरांना गवती छपरे आहेत. पण ती घरे आतून प्रशस्त व सजविलेली असतात. शहराच्या पूर्व भागाला यमुनेच्या काठावर तटबंदी नाही. उत्तरेकडे शहराच्या एका कोपऱ्यात व पूर्वाभिमुख बादशहाचा किल्ला आहे. किल्ल्याच्या समोर, नदीच्या काठापर्यंतच्या भागाची पुरेशी जागा हत्तींच्या झुंजीकरिता राखून ठेवलेली आहे. झुंज पाहण्याकरिता बादशहा एका खिडकीपाशी बसतात. राजघराण्यातील स्त्रियादेखील हा देखावा पाहत असतात. पण त्या जाळीच्या मागे बसत. तेथूनच बादशहा, या मैदानावर होणाऱ्या उमरावांच्या, राजपुत्रांच्या व सरदारांच्या कवाईती पाही. बादशहाच्या सज्जाख्याली शोभा म्हणून एक मस्त हत्ती रात्रंदिवस बांधण्यात येत असे.

किल्ल्याच्या भोवती तांबड्या दगडाच्या भिंती आहेत. किल्ल्याला लागूनच बारा कमानींचा एक पूल असून तो सलिमगडच्या किल्ल्याला जोडलेला आहे. हा किल्ला यमुना नदीत निर्माण झालेल्या एका बेटावर बांधलेला आहे. वर निर्देशलेल्या पुलाने या किल्ल्यात प्रवेश करता येई. हा किल्ला सलिमशहा पठाणाने बांधला होता. लाल किल्ल्याला दोन दरवाजे आहेत, त्यातून शहराकडे रस्ता जातो. त्या दरवाज्यांच्या दरम्यान विस्तृत मोकळी जागा होती त्यात शहाजहानने दोन मोठे बगीचे बांधले, एक दक्षिणेकडे व एक उत्तरेकडे. यमुना नदी उंचावरून वाहत नसल्यामुळे या बगीचांना पाटाने पाणीपुरवठा होऊ शकत नव्हता. म्हणून शहाजहानने खूप पैसा व श्रम खर्च केले. दिल्लीपासून तीनशे मैलावर ( १०० लीग ) असलेल्या सरहिंद जवळील

नदीमधून एक खोल कालवा तयार केला. हा कालवा किल्ल्यात खेळवला आहे, त्यामुळे पाट पाण्याने भरून जातात. त्या पाटांत सुंदर मासे सोडण्यात आले होते. एक माणिक व दोन बारिक मोती लावलेल्या सोन्याच्या साखळ्या माशांच्या डोक्यात बसविलेल्या होत्या. यमुनेच्या बाजूलेरील किल्ल्याच्या सर्व भागांतून हा पाट वाहत जातो. किल्ल्याच्या समोर पश्चिम बाजूला शाही मशिद होती. तेथे आठवड्यातून एक दिवस बादशहा प्रार्थनेकरिता जाई.

**शहाजहान बादशहा व त्याचे मुलगे यांचे संबंध :** शहाजहानने आपला मुलगा औरंगजेब यास दमण घेण्यासाठी पाठविले. कारण त्यास माहित होते की हा शूर व धीट आहे. म्हणूनच त्याने औरंगजेबाला बल्कच्या[1] राज्यावर मोहिम करण्यास पाठविले. त्या राज्यावर त्याने चढाई केली. मैदानात शत्रुसैन्याशी त्याचा सामना झाला. शत्रु प्रबळ असल्यामुळे त्याचा जय झाला. औरंगजेबावर कैद होण्याची पाळी आली होती. जर त्याचा चुलभाऊ मीरबाबा तातडीने त्याच्या मदतीला आला नसता तर औरंगजेब कैद झाला असता. जरी राजपुत्र औरंगजेब हा धैर्याचा व मोठा पराक्रमी गणला जाई, तरी तो मोठा कपटी व दांभिक होता. आपण सन्यस्त वृत्तीचे आहोत असे तो ढोंग करी. रणांगणावर असताना स्वतः विणलेल्या गवताच्या चटईवर तो झोपे. टोप्या आपण स्वतः शिवून त्या विकण्यास पाठवून देई. त्या उत्पन्नावरच आपली उपजीविका होते असे तो सांगी. मुळा, मसूर, जव अशा प्रकारचा भाजीपाला व धान्य यांच्या स्वस्त अन्नावर तो राही. जाहीरपणे भिक्षा वाटत असे. आपण कडक उपासतापास करतो हेही तो जाहीर करी. प्रार्थना करताना, कुराण पठण करताना अथवा हातात स्मरणी घेऊन जाताना आपण दिसावे अशी त्याची योजना असे. सदासर्वकाळ मुखात अल्लाचे नाव असे. जणू काही ऐहिक गोष्टींबद्दल तो उदासीन होता. असे असून सुद्धा या सर्व बाहाण्यांच्या पांघरूणाखाली तो अगदी विरुद्ध असे जीवन घालवी.

अलीमर्दानखान या इराणी माणसाने, आपल्या शहाविरुद्ध बंड करून कंदाहारचा किल्ला शहाजहानला मिळवून दिला. शहा अब्बासने तो परत घेतला. शहाजहानने किल्ला परत जिंकून घेण्यासाठी प्रयत्न केला, पण त्याला यश मिळाले नाही.

शहाजहानला औरंगजेबाचा स्वभाव माहित होता. यासाठी त्याने त्याला यापूर्वी दिलेल्या लहान मनसबीत वाढ केली नाही. उलट आपल्या इतर मुलांना, विशेषतः मोठा मुलगा दारा याला त्याने अनेक प्रकारे आपले वात्सल्य दाखविले. औरंगजेबाला याबद्दल आपल्या भावाचा हेवा वाटत असे. विशेषतः तो दाराच्या विरुद्ध होता. आणि त्याला उपसर्ग देण्याची संधि शोधत असे.

१. बल्कवरची ही मोहीम १६४७ साली झाली होती (एलफिन्स्टन ५११).

आपल्या दरबारात काही विपरीत प्रकार घडेल की काय याची शहाजहानला काळजी लागली. यासाठी दरबारात रोज फक्त एकाच राजपुत्राने हजर राहावे अशी त्याने आज्ञा केली. परंतु मत्सराने पेटलेल्या औरंगजेबाला, दाराला इजा करण्याची इच्छा होती. याकरिता एकदा घोड्यावर बसून हातात भाला घेऊन तो दारा किल्ल्याच्या बाहेर येण्याची वाट पाहत राहिला. जेव्हा दारा पालखीतून बाहेर पडला तेव्हा औरंगजेबाने आपल्या घोड्याला टाच दिली. घोड्याचे पाय दाराच्या पाल-खीला लागले. त्यामुळे ती जमिनीवर जवळ जवळ कोसळली. त्यामुळे संतापलेल्या व अपमान झालेल्या दाराने तळमळीने आपले गाऱ्हाणे बापाला सांगितले.

आपल्या मुलांमध्ये एकोपा नाही, हे पाहून आणि त्यामुळे काही तरी आपत्ती ओढवणार या भितीने शहाजहानने त्यांना वेगळे केले. शाहाशूजाची मुलगी वयात आल्यावर तिचे लग्न औरंगजेबाचा मुलगा सुलतान मुहम्मद याजबरोबर करण्याचा या दोघा भावांचा नक्की बेत झाला होता, हे शहाजहानला माहित होते. म्हणून शाहाशूजाला त्याने बंगालला सुभेदार, राजपुत्र औरंगजेबाला मुलतान शहराला, आणि राजपुत्र मुरादबक्षला गुजरातला सुभेदार म्हणून पाठवून दिले. राजपुत्र दारा-वर त्याचे फार प्रेम होते. तो त्याचा फार लाडका होता, म्हणून त्याला शहाजहानने आपल्या जवळच ठेवले.

आपल्या पित्याचा आपल्यावर विश्वास नाही, व आपल्यावर त्याचे प्रेम नाही, हे औरंगजेबाला ठाऊक होते. म्हणून त्याने जहाजहानला मोठ्या नम्रतेने पत्रे लिहिली; व दूरदृष्टीने दाराचाही उपयोग करून घेतला. दाराला त्याने पुष्कळ पत्रे लिहिली; त्यात कळविले की, "मी आपला जो उपमर्द केला त्याबद्दल आपली, सहस्रशः क्षमा मागत आहे. या गोष्टी कोत्या बुद्धिमुळे मजकडून घडल्या. जर आपण माझ्यावर व माझ्या मुलांवर दया दाखवाल तर माझे कुटुंब व मी आपली सेवा करण्यास तयार आहोत. मी आपणास पित्यासमान मानतो." दारा हा मनमिळाऊ व दयाळू स्वभा-वाचा असल्यामुळे उत्तरादाखल त्याने मोठ्या जिव्हाळ्याची पत्रे लिहीली. मग सर्व गोष्टी व्यवस्थित जुळल्या आहेत असे पाहून, त्याने थोरल्या भावाला एक पत्र लिहिले आणि त्यात त्याला अशी विनंती केली की, आपण पित्याकडून मला मुलतान सोड-ण्याची परवानगी मिळवून यावी. येथील हवा मला मानवत नाही. मी सतत आजारी पडतो. म्हणून माझी बदली दख्खन मध्ये करण्यात यावी.

दख्खनमध्ये विजापूर, गोवळकोंडा ही राज्ये आहेत. दख्खनचा प्रदेश अतिशय समृद्ध आहे. तेथे अन्नाचा साठा भरपूर आहे. विविध प्रकारच्या कपड्यांचा भरपूर पुरवठा होतो. तेथे अनेक खनिज द्रव्ये निपजतात. या कारणामुळे तेथे मोगलांच्या लष्करी हालचाली नेहमी चालू असतात. अशा हालचालींच्या द्वारे आपण आपली शक्ती (वर्चस्व) स्थापन करू शकू असे औरंगजेबाने ओळखले. म्हणून त्या धूर्त

माणसाने दारापाशी वरीलप्रमाणे विनंती केली. दाराने आपल्या पित्याला इतक्या वेळा अत्याग्रहाची विनंती केली की शेवटी शहाजहानने औरंगजेबाची मागणी बहाल केली. मुलतानहून काढून त्याला दख्खनमध्ये जाण्याचा हुकूम देण्यात आला. दाराची विनंती मान्य करण्यास शहाजहान तयार नव्हता. तरी दाराच्या आग्रहामुळे त्याने त्याची मागणी मान्य केली. परंतु त्यावेळी दाराला तो म्हणाला, "एका विषारी सर्पाची तू भलामण करत आहेस. पण लक्षात ठेव तुला त्याची विषबाधा झाल्याशिवाय राहणार नाही."

औरंगजेब दक्षिणेला गेला. तेथे त्याचे बळ वाढू लागले. दौलताबादेजवळ त्याने एक नगर वसविले. त्याचे नाव औरंगाबाद ठेवले. तेथे, बापाचा व भावाचा नाश करण्याच्या हेतूने तो बंडाचे जाळे विणू लागला.

**शहाजहान बादशहाचा स्वभाव :** शहाजहाने केलेली युद्धे व त्याचे झालेले पतन याविषयी सांगण्यापूर्वी त्याच्या स्वभावाविषयी काही सांगणे आवश्यक होय. त्याने आपल्या बापाविरुद्ध बंड केले, यावरून त्याची लढाऊ वृत्ति दिसून येते. या बरोबर जहांगीरप्रमाणे व जवळ जवळ त्याच्या इतकेच शहाजहानला संगीत व नृत्य यांची आवड होती. विविध प्रकारच्या वाद्यांचे संगीत, गाणे आणि कविता ऐकणे ही त्याची नेहमीची करमणुकीची साधने होती.

शहाजहान हा फक्त संगीताचाच भोक्ता होता असे नाही, तर त्याला इतरही अनेक छंद होते. आपल्या दरबारात सर्व प्रकारचे मल्ल असावेत याची त्याला फार हौस होती. हे लोक फार ताकदवान असतात. बादशहासमोर त्यांच्या अनेक वेळा कुस्त्या होत. तो पुष्कळ वेळा मुष्टियुद्ध बघून आणीत असे. परंतु वाघाची शिकार करणे हा त्याचा नेहमीचा छंद होता. त्याकरिता त्याने लांब शिंगांचे अतिक्रूर रेडे बाळगले होते. रेड्यांच्या आपसात झुंजी होत. आणि रेडे आणि वाघ यांच्याही झुंजी होत. हे फार क्रूर प्राणी असतात. आणि वर निर्देशिलेल्या खेळात ते अतिशय तरबेज असत.

बादशहाला शिकारीला जाण्याची इच्छा झाली की तो आधी शिकाऱ्यांना इशारा देई. हे लोक वाघ शोधून ठेवण्याचे काम करत. वाघांनी आपल्या जागा बदलू नयेत म्हणून ते जंगलात गाढवे, गायी, शेळ्या, मेंढ्या बांधीत. शिकारीच्या वेळी बादशहा आपल्या सर्वांत उंच हत्तीवर बसे. आणि इतर राजपुत्र तरबेज झालेल्या हत्तीवर स्वार होत. ते उघड्या हौद्यात बसत. प्रत्येकाबरोबर आपली बंदूक असे. जंगलाभोवती उंच जाळी बांधीत. एक बाजू उघडी ठेवण्यात येई. बादशहा व शिकारी त्यांतून जाळ्यात जात. जाळ्याच्या भोवती बाहेरच्या बाजूने अनेक शिपाई उभे राहतात.

बादशहाची शिकारीच्या वेळची पद्धत पुढीलप्रमाणे असते :— पहिल्या प्रथम रेड्यांची रांग जंगलात असते. कधी कधी यांची संख्या १०० हून अधिक असते. प्रत्येक रेड्यावर एक एक मनुष्य स्वार असतो. त्याच्या पायाला कातडी बांधलेली असतात. त्याच्या एका हातात एक रुंद तल्वार व दुसऱ्या हातात रेड्याची वेसण असते. रेड्यांच्या रांगेच्या मागे हत्तीवर बसलेला बादशहा आणि त्याच्यामागे राजपुत्र व विश्वासू अधिकारी असा क्रम असतो. वाघ दिसले की भोवती कडे करण्यात येते. वाघांना जायची वाट राहत नाही. ते बाहेर निसटून जाण्याचे प्रयत्न करतात. प्रत्येक वाघ जमेल त्या ठिकाणी उडी मारू पाहतो. रेड्यावर बसलेला स्वार पटकन खाली उडी मारतो. ते रेडे मोठ्या वडफेने वाघांना आपल्या शिंगावर घेतात आणि त्याचे तुकडे तुकडे करतात. एखादा वाघ शिंगावरून निसटतो, अथवा आपल्या जागेवरून हाल्लतच नाही. अशा वाघाला बादशहा आपली बंदूक झाडून ठार करतो. अथवा त्याला मारण्याचा हुकूम करतो.

काही वेळा ते रेडे बरोबर घेत नाहीत. मी मागे सांगितल्याप्रमाणे फक्त हत्तीवर बसून शिकारीला जातात. शिकारीच्या या पद्धतीत शिकाऱ्यांना फार धोका असतो. एकदा शहाजहानच्या बाबतीत असे घडले की, एका अतिशय घायाळ झालेल्या वाघाने जी झेप टाकली ती हत्तीच्या गंडस्थळावर. त्यावर त्याने आपले पंजे रुतवले. भयभीत झालेला माहूत जमिनीवर आदळला. आपला जीव फार धोक्यात आहे असे पाहून शहाजहानने आपली बंदूक दंडुक्यासारखी धरून त्या वाघाच्या डोक्यावर एक टोला लगावला. पण तरीसुद्धा वाघाने आपली पकड सोडली नाही. हत्ती आपल्या सोंडेचा उपयोग करू न शकल्यामुळे धावत सुटला. शेवटी त्याला एक झाड सापडले. त्यावर त्याने वाघास चिरडले. यावरूनच पुढे शहाजहानने संरक्षणासाठी हत्तीचे डोके सोंडेपर्यंत झाकण्याची योजना केली. त्याकरिता, तीक्ष्ण खिळे वर असलेल्या जाड कातड्याचा उपयोग करत. शिकाऱ्यांच्या व्यतिरिक्त एक अधिकारी नेहमी शिकारीच्या वेळी बरोबर असतो. वाघाचे कल्ले ताब्यात घ्यावयाचे हे याचे काम असते. म्हणून वाघ मेल्याबरोबर त्याच्या डोक्यावर एक कातडी पिशवी घालतात. ती मानेपर्यंत आलेली असते. ती पिशवी बांधून टाकतात व त्यावर तो अधिकारी आपली मुद्रा करतो. मग तो वाघ बादशहाच्या तंबूच्या दारासमोर नेतात. तेथे विषारी पदार्थांची जबाबदारी असलेला अधिकारी येतो. आणि वाघाचे कल्ले काढून नेतो. यांचा उपयोग विष म्हणून केला जातो.[1]

शहाजहान हा विषयासक्त होता या बाबतीतील सुखोपभोगांच्या तो सतत मागे लागलेला असे. राजवाड्यात असणाऱ्या स्त्रियांवर संतुष्ट न राहता दरबारातील

१. या शिकारीचा वृत्तान्त बर्नियरनेही दिलेला आहे (पा.) (२), (३, ३७८, ३७९). तो जाळ्यांचा निर्देश करतो परंतु रेड्यांचा करत नाही. आणि त्याचे वर्णन मनूचीइतके सुस्पष्ट नाही.

सरदारांच्या बायकांशी संबंध ठेवी. यामुळे त्याच्याबद्दल वाटणारा आदर त्याने गमाबला होता. आणि हेच त्याच्या नाशास व मृत्यूस कारणीभूत झाले.

मात्र आपल्या साम्राज्याची व्यवस्था पूर्ण निर्दोष ठेवण्याकरिता शहाजहान फार लक्ष घाली. त्याच्या आड त्याची कामुकवृत्ति कधीही आली नाही. खऱ्या न्यायाचा नेहमी आग्रह धरावा. गुणीजनांच्या कार्याचा गौरव व्हावा व अपराध्यांना शिक्षा व्हावी ह्या त्याच्या पित्याच्या बोधवचनांचा त्याने पुरस्कार केला. त्याने आपल्या अधिकाऱ्यांवर कडक नजर ठेवली. त्यांच्या कर्तव्यात न्यूनता आढळल्यास तो त्यांना कडक शासन करी. एखादा सेनापति रणांगणातून पळून गेला अथवा त्याने कर्तव्यपालन केले नाही, तर त्याला कठोर शिक्षा होई. शहाजहान मोठे गुन्हे करणारांना कडक शिक्षा देत असेच, त्याचप्रमाणे संधी मिळेल तेव्हा आपल्या सरदारांनाही कडकपणे वागवी. इतरांना त्यात दहशत बसावी व त्यामुळे राज्याचा कारभार निश्चितपणे व्हावा हा त्यात त्याचा हेतु असे.

**शहाजहान बादशहाची मुले :** शहाजहानच्या मुलांच्या विषयी आता सांगण्याचे मी योजिले आहे. शहाजहानची पहिली व सर्वांत मोठी मुलगी ही त्याची अतिशय लाडकी होती. ती सुस्वरूप, विवेकी, प्रेमळ, उदार, मोकळ्या मनाची आणि दान-शूर होती. ती वैभवात राहत असे. तिला बेगम साहेब म्हणत. या राजकन्येचे वार्षिक उत्पन्न तीस लाख रुपये होते. शिवाय सुरत बंदराचा महसूल तिला पान-विड्याच्या खर्चासाठी मिळालेला होता. याव्यतिरिक्त तिच्या जवळ बापाने दिलेली पुष्कळ रत्ने होती. तिचा भाऊ दारा याची ती हितचिंतक होती. यामुळे दरबारातील सरदार दाराच्या पक्षात राहतील आणि त्याच्या प्रतिस्पर्ध्यांना मिळणार नाहीत याची तिने व्यवस्था केली. आपला भाऊ दारा यासच गादी मिळावी याकरिता तिने अतोनात श्रम घेतले. ती बापाशी प्रेमळपणे वागे व त्याची सर्व प्रकारे सेवा करी. हलक्या लोकांनी याचा विपरीत अर्थ केला. अशा, हलक्या लोकांच्या गप्पांवर विसंबून बर्नियरने या राजकन्येबद्दल बऱ्याच गोष्टी लिहिल्या आहेत. पण तो जे काही सांगतो ते असत्य आहे, हे मला येथे सांगितले पाहिजे.

आपली स्मृति चिरकाल टिकावी म्हणून या राजकन्येने शहर व किल्ला यांच्या मधील मैदानात एक सुंदर सराई बांधण्याचा हुकूम दिला. हिंदुस्तानातील सर्व सराईत ही अतिशय सुंदर आहे. या सराईत वरच्या मजल्याच्या दालनांतून सुंदर चित्रे काढण्यात आलेली आहेत. सराईला लागूनच एक सुंदर बाग आहे; त्यात पाण्याचे शोभिवंत हौद आहेत. या सराईमध्ये फक्त प्रतिष्ठित मोगल व इराणी व्यापाऱ्यांना राहण्याची परवानगी असते.[1]

१. या जागेवर सध्या दिल्लीतील एक सार्वजनिक उद्यान आहे.

शहाजहानचा पहिला मुलगा राजपुत्र दारा हा होय. त्याची वागणूक मोठी रुबाबाची असे. तो सुस्वरूप होता. वृत्तीने आनंदी होता. संभाषणात तो योग्य शिष्टाचार पाळी. त्याचे संभाषण मोकळे व मधुर होते. त्याची दयाळूवृत्ती आणि औदार्य ही असामान्य होती. पण त्याला स्वतःसंबंधी फाजिल आत्मविश्वास असे. प्रत्येक गोष्टीत आपल्याला सर्व काही समजते, आणि सल्लागाराची आपणास आवश्यकता नाही, असे तो समजे. सल्ला देणारांना तो तुच्छ लेखी. यामुळे त्याचे जिवलग मित्रही अत्यावश्यक गोष्टींबद्दल सुद्धा त्याला माहिती सांगण्याची कधीच हिंमत करीत नसत. तरीपण त्याचे हेतु काय असत, हे समजणे अतिशय सोपे असे. भाग्य सदैव आपल्या पाठिशी राहिल असे तो धरून चाले. प्रत्येकजण आपल्यावर लोभ करतो अशी त्याने समजूत करून घेतली होती. संगीत व नृत्य याचा तो फार शौकीन होता. एकदा तो राणादिल या सामान्य नर्तकीच्या प्रेमात सापडला. हे प्रेम उत्कट म्हणावे लागेल. तिच्याशी विवाह करण्याची त्याची इच्छा होती. पण त्याच्या बापाने त्या गोष्टीला संमती दिली नाही. त्यामुळे दारा झुरणीस लागला. त्याची अशी स्थिती पाहून त्याच्या या विवाहाला संमती देणे शहाजहानला भाग पडले. इतर राजस्त्रियांना जी प्रतिष्ठा असे ती राणादिललाही मिळू लागली.

दाराचा आणखी एक छंद म्हणजे विदूषकांच्या नकला ऐकणे व त्यांच्या चाळ्यांची गंमत पाहणे हा होता. यावेळी दाराचे वय चाळीस वर्षांचे होते. पुढे गादीवर येण्याची तो अपेक्षा बाळगून होता. या माणसाने, अशा बालीश करमणुकीत रस घ्यावा यामुळे विवेकी लोकांना मोठा धक्का बसे.

युरोपियन माणसे त्याला फार आवडत. आणखी एक गोष्ट अशी की, तो कोणत्याही धर्माला चिकटून नव्हता. मुसलमानांच्या संगतीत तो महम्मदी धर्म तत्त्वांची स्तुति करी. यहुद्यांच्या संगतीत यहुदी धर्माची स्तुति करी. त्याचप्रमाणे तो हिंदुंच्यामध्ये असला की हिंदू धर्माची स्तुति करी. यामुळे औरंगजेब त्याला काफर म्हणे. जेसुइट पाद्र्यांच्या बरोबरही धर्मासंबंधी चर्चा करताना त्याला मोठा आनंद होई. मुसलमान पंडितांच्या बरोबर आणि सरमद नावाच्या एका नास्तिक हिब्रु माणसाबरोबर तो जेसुइट पाद्र्यांचे वादविवाद घडवून आणी. सरमद हा दाराला फार आवडत असे. तो सदासर्वकाळ नग्नावस्थेत फिरत असे. फक्त दाराच्या समोर तो कमरेला वस्त्र गुंडाळून येई. जेसुइट पाद्र्यांनी आपल्या वादविवादाने इतरांच्यावर मात केली की दाराला खूप आनंद होई. माझ्या वेळी दाराच्या दरबारात तीन पाद्री होते. एकाचे नाव होते पाद्री इस्टानिलास मालपिका. हा नेपल्सचा रहिवाशी होता. दुसरा पेद्रो जुझार्ट. हा पोर्तुगीज होता. आणि तिसरा हेन्रिक बुस्यो हा फ्लँडर्सचा राहणारा होता. हा दाराचा विशेष लाडका होता. हा दरबाराला जाई तेव्हा दरवेळी त्याला पन्नास रुपये व दोन शाली दिल्या जात. दरबारातील सरदारही याच्यावर लोभ करीत व

त्याचा आदर करीत. काही वेळा दारा हा पाद्र्यांच्या बरोबर मद्यपान करी. दाराला मद्यपानाची आवड होती. पण तो या व्यसनाला गाजावाजा होऊ देत नसे.

फलज्योतिषावर विश्वास, हे दाराचे आणखी एक वेड म्हणावे लागेल. त्याच्या पदरी अनेक ज्योतिषी होते. प्रमुख ज्योतिषी भवानीदास नावाचा होता. तो माझ्या-वर प्रेम करी, कारण माझ्याबरोबर मद्यपान करणे त्यास आवडत असे.

दाराला दोन मुलगे होते. थोरल्याचे नाव होते सुलतान सुलेमान शुको, आणि धाकट्याचे सुलतान सिपीहर शुको असे नाव होते. ही मुले त्याच्या ज्येष्ठ पत्नीची होती. ती राजघराण्यातील होती.

शहाजहानने जेव्हा प्रत्येक राजपुत्राकरिता स्वतंत्र व्यवस्था करून दिली, तेव्हा दाराला त्याने आपल्या जवळ ठेवले. त्याच्याकडे काश्मीर, लाहोर व काबूल हे तीन सुभे सोपविले. दारा हा शहाजहानचा अतिशय लाडका होता. म्हणून त्याने दाराला अनेक सवलती दिल्या. उदाहरणार्थ, हत्तींच्या झुंजी लावण्याचा अधिकार फक्त बादशहालाच असे, किंवा दरबारात सोने आणि चांदीचे दंडधारी हे केवळ बादशहाच्या दरबारातच असत. पण या सवलती दाराला देण्यात आल्या होत्या. इतकेच नव्हे तर शहाजहानने एक लहानसे सिंहासन आपल्या जवळ ठेवले. त्यावर बसण्याची दाराला सवलत देण्यात आली होती. पण बापाबद्दलच्या आदरामुळे दारा, त्या सिंहासनावर बसण्यास तयार होत नसे, हे मात्र सांगितले पाहिजे. शहाजहानने सर्व सरदारांना अशी आज्ञा केली होती की, रोज सकाळी मुजरा करण्याकरिता प्रथम युवराज दाराकडे त्यांनी गेले पाहिजे. व नंतर आपल्या दर-बारात यावे. अनेक प्रसंगी त्याने जाहीर केले की आपल्या मागून दारानेच गादीवर यावे अशी आपली इच्छा आहे. ती मिळवून देण्यासाठी शक्य ते प्रयत्न करू. परंतु ही गोष्ट ईश्वरेच्छेवर अवलंबून होती.

वरील गोष्टीमुळे दाराचे डोके फिरले. राज्यातील सरदार हे त्याच्या खिजगणतीत नव्हते. बोलण्यात व वागण्यात तो त्यांच्याबद्दल तुच्छबुद्धी दाखवू लागला. महाबतखानाच्या प्रकरणात तो वरीलप्रमाणे वागला. अशाच प्रकारे दाराने राजा जयसिंगाचा अपमान केला. राजा जयसिंग हा एक बलाढ्य हिंदू सरदार होता. त्याच्या ताब्यात ४० हजार घोडदळ आणि दीड लक्ष पायदळ होते. दारा म्हणे की, जयसिंग हा एखाद्या गवयाप्रमाणे दिसतो. हिंदुस्तानात या धंद्याला फार हलका मानतात. कारण हे सर्व लोक खुषमस्कऱ्यांसारखे वागतात. दाराने केलेला हा अपमान जयसिंगाने वरकरणी सहन केला. पण त्याने ही गोष्ट मनात ठेवली. दाराला कधी काळी आपली गरज लागेलच. त्यावेळी या अपमानाचा सूड घ्यावा असे

त्याने ठरविले. पुढे त्याने आपला हा हेतु अंमलात आणला. ती हकीगत पुढे सांगण्यात येईल.

इतक्या लोकांचा अपमान करणे पुरेसे वाटले नाही म्हणून की काय, आपल्या बापाच्या दरबारात आलेल्या मीर जुमला या सुप्रसिद्ध ल्ढवय्याची दाराने टिंगल केली. मीर जुमला हा पूर्वी गोवळकोंड्याच्या बादशहाच्या पदरी होता. शहाजहानला मदत करावी म्हणून मीर जुमल्याने गोवळकोंड्याच्या बादशहाविरुद्ध बंड केले, आणि तो शहाजहानला येऊन मिळाला. गोवळकोंडा जिंकून घेण्यासाठी शहाजहानने त्याला दक्षिणेकडे पाठविले. मीर जुमलाच्या पदरी अनेक युरोपियन गोलंदाज होते. दाराने मीर जुमलाची वरीलप्रमाणे टिंगल केली. इतकेच नव्हे तर त्याने मीर जुमलाच्या पदरी असलेल्या ८० युरोपियन गोलंदाजांना पैसे चारून आपल्याकडे फोडले. मीर जुमला, दक्षिणेकडे जाण्यास निघत होता. त्याच्या तीन दिवस आधी ही गोष्ट घडली. ती मीर जुमलाच्या लक्षात आली. हे गोलंदाज या पुढेही आपल्या हुकूमाप्रमाणे वागावेत, असा त्याने प्रयत्न केला. आणि कालांतराने त्यात मीर जुमलाला यश आले.

सारांश, दारा हा दरबारातील सरदारांना तुच्छ लेखीत असे. त्यातल्यात्यात सेनाधिकाऱ्यांच्यावर त्याची विशेष वक्रदृष्टी होती. उदाहरणार्थ, बर्कंदाजखान या आपल्या तोफखान्याच्या अधिकाऱ्याची तो अतिशय स्तुति करी. आणि इतर सर्व सेनाधिकारी मिळून शौर्यात बर्कंदाजखानाच्या शतांशही उतरणार नाहीत असे तो म्हणे. यामुळे सर्व सेनाधिकारी दारावर चिडलेले असत. या सर्व गोष्टी एक झाल्या आणि दाराचा नाश आणि मृत्यु याला प्रामुख्याने कारणीभूत ठरल्या. स्वतःला आवर कसा घालावा हे त्याला समजले असते तर तो हिंदुस्तानचा बादशहा झाला असता.

शहाजहानचा दुसरा मुलगा शाहाशुजा हा होता. तो फार गर्विष्ठ होता. पण तो शूर, दृढनिश्चयी, आणि विवेकी आहे, असा त्याचा लौकिक होता. आपल्या कामात मदत करू शकतील असे मित्र कसे जोडावे हे त्याला ठाऊक होते. दाराचा पक्षपाती राजा जसवंतसिंग याच्या बरोबर त्याने मैत्रीचे चांगले संबंध राखले होते.

शाहाशुजाला स्त्रिया, गायन, नर्तन यांचा नाद असे. बाबाबतीत तो आपल्या बापाचे अनुकरण करीत असे, असे म्हणावे लागेल. या नादामुळे तो कित्येक दिवस दरबारही भरवीत नसे. तो मर्यादेबाहेर मदिरापान करी. नर्तकींच्यावर तो अतिशय खर्च करी. त्यांना उत्तम वस्त्रे, मूल्यवान रत्ने देत असे. त्यांची योग्यता लक्षात न घेता तो त्यांचे मन मानेल तसे पगार वाढवी.

तो स्वतःला अतिशय मोठा समजे. आपल्या शौर्याने आपण सर्वांना जिंकू शकू अशी त्याची समजूत होती. त्यामुळे तो आपल्या प्रतिस्पर्ध्यांना तुच्छ लेखी. आणि

महत्त्वाच्या कामात तो अनेक वेळा निष्काळजीपणाने वागे. त्यानेच पहिल्या प्रथम आपल्या बापाविरुद्ध बंड केले. काहींच्या मते तो अलीच्या (शिया) पंथाचा होता.

सध्याचा बादशहा औरंगजेब हा शहाजहानचा तिसरा मुलगा होय. हा राजपुत्र इतरांपेक्षा वेगळा होता. स्वभावाने तो पक्का आतल्या गाठीचा व गंभीर होता. तो आपली सर्व कामे गुप्तपणे व अत्यंत नेटाने करी. तो अतिशय गंभीर वृत्तीचा होता. तो नेहमी कोणत्या ना कोणत्या तरी कामात गढलेला असे. न्याय द्यावा व योग्य निर्णय घ्यावा अशी त्याची इच्छा असे. आपण शहाणे, चतुर आणि सत्याचे भोक्ते आहोत असे जगाने आपल्याला म्हणावे, अशी त्याची सारखी तळमळ असे. तो उदार होता, पण त्याच्या औदार्याला मर्यादा असे. पण या सर्वांहून अधिक अशी गोष्ट ही की, बराच काळपर्यंत त्याने आपण फकिरी वृत्तीचे असल्याचे सोंग आणले. आपण संसाराचा त्याग केला आहे. राज्यावरील सर्व हक्क आपण सोडून दिले आहेत, देहदंड व प्रार्थना यातच काळ घालविण्यात आपणास समाधान आहे असा देखावा त्याने केला.

यावेळी तो दक्षिणेत होता. वरीलप्रमाणे देखावा करीत असूनही त्याने दरबारातील आपले हेतू पूर्ण व्हावेत म्हणून आपली बहीण रोशन आरा बेगम हिच्या मध्यस्थीने प्रयत्न करण्याचे कधीच सोडले नाही. हे प्रयत्न त्याने अतिशय गुप्तपणे आणि धूर्तपणे केले. त्याच्या भावांना यापैकी काही कळू शकले नाही. इतकेच नव्हे तर त्यांना संशयही आला नाही.

सर्वसंगपरित्यागाचे हे पांघरूण घेऊन औरंगजेबाने अनेकांना फसविले. गरीब फकीरांशी त्याने घनिष्ठ सलगी केली. ते त्याच्याशी निष्ठा बाळगून असत. त्यांपैकी कित्येक जण त्याचे हेर म्हणून काम करीत. अनेक घटनांची ते त्याला खबर आणून पोहचवीत. हे फकीर मोठे चतुर असत. पण औरंगजेब इतका धूर्त की तो फकीरांना आणि इतर भल्या भल्या हुशार लोकांना फसवीत असे. आपण फकीर आहोत, असे भासवून औरंगजेब थांबला नाही. तो एखाद्या मुल्लाप्रमाणेही वागू लागला. औरंगाबादेस असताना तो एका रजपूत सरदाराशी धर्मासंबंधी चर्चा करी. त्याला मुसलमान बनविता येईल अशी औरंगजेबाला आशा होती. पण त्यात त्याला यश आले नाही. असे असूनही त्याने हिंदू व खिस्ती लोकांबरोबर वाद घालण्याची सवय सोडली नाही. त्यांपैकी काहीजण मुसलमान झाले. त्यातूनही काही जणांनी धर्मांतर केले ते नोकरीच्या किंवा बढतीच्या किंवा बक्षिसाच्या आशेने होय.

औरंगजेबाच्या अंतःपुरात एक नर्तकी होती. तिच्यावर त्याचे अतिशय प्रेम होते. त्या प्रेमापायी त्याने काही दिवस प्रार्थना व व्रते या धार्मिक कामाकडे दुर्लक्ष केले. तो आपला काळ संगीत व नृत्य यांचा आस्वाद घेण्यात घालवू लागला. इतकेच नव्हे तर त्या नर्तकीच्या सांगण्यावरून तो मदिरापानही करू लागला.

त्या नर्तकीच्या मृत्यूनंतर आपण यापुढे मदिरापान करणार नाही, आणि संगीत ऐकणार नाही अशी त्याने शपथ घेतली. तो नेहमी म्हणे की, त्या नर्तिकेचा मृत्यु घड-वून आणून ईश्वराने आपल्यावर कृपाच केली. तिच्यामुळे आपल्या हातून अनेक प्रमाद घडले, त्यामुळे आपल्याला राज्यही न मिळण्याचा धोका निर्माण झाला होता.

औरंगजेब हा औरंगाबाद येथे असताना गोवळकोंड्याचा वजीर मीर जुमला याने त्याला एक पत्र पाठविले. "गोवळकोंड्याचा बादशहा हा आपला व आपल्या कुटुंबाचा नाश करण्यास टपलेला असून, मला तुमचे रक्षण हवे; तो मला इजा पोहचविण्याची इच्छा करत आहे. मी त्याची काय व किती सेवा केली हे सर्व जगाला माहित आहे. मला त्याचा सूड उगवायचा आहे. आपण गोवळकोंड्याच्या दिशेने तडक मजल मारली पाहिजे. राजदूत, गोवळकोंड्याचा बादशहा आणि मीर जुमलाचा नातेवाईक असलेला त्याचा चिटणीस, असे मुख्य प्रधान यांच्याशी बाटा-घाटी करण्यास जात आहे, अशी बातमी पसरवावी, सदर चिटणीस आणि मुख्य प्रधान, हा आपल्या विश्वासातील माणूस आहे." असे त्याला कळविले.

"आपण लगबग येण्याची व्यवस्था करावी, म्हणजे पुरे. मी अशी योजना करीन की, आपण भागानगर[1]च्या किल्यापाशी येईतोपर्यंत आपण येत आहात याची चाहूलही कोणास लागणार नाही. शिरस्त्याप्रमाणे गोवळकोंड्याचा बादशहा जेव्हा पत्र स्वीकारण्यासाठी बाहेर येईल तेव्हा त्याला विनायासे पकडता येईल. आणि त्यामुळे त्याचे सर्व कुटुंब आपल्या हातात पडेल. सैन्याची रोजची जी कूच होणार त्याच्या खर्चाकरिता मी स्वतः रोजी पन्नास हजार रुपये देईन." असे मीर जुमलाने पत्रात पुढे लिहिलेले होते.

पित्यावरील आपली निष्ठा दाखविण्याची व त्याच्या साम्राज्याचा विस्तार कर-ण्याची संधि शोधत असलेल्या औरंगजेबाने मीर जुमलास उत्तर पाठविले की "मी कसूर न करता औरंगाबादेहून, तातडीने कूच करीन व तुमच्या पत्रातील सूचना तंतोतंत पाळीन." नंतर तो सैन्य घेऊन निघाला.

दरबारला परतण्याचे पुनःपुनः पाठविलेले हुकूम मीर जुमला पाळत नाही हे पाहून गोवळकोंड्याच्या बादशहाने मुहम्मद अमीनखान (मीर जुमलाचा मुलगा) यास कैद करण्यात यावे अशी आज्ञा केली. त्याने आपल्या वाड्याची बंदिस्ती केली व स्वतःचे रक्षण करण्याचा चंग बांधला. बादशहाच्या सैनिकांशी त्याची तीन दिवस झटापट चालली. इतक्यात औरंगजेब भागानगरला येऊन पोहचला. गोवळ-कोंड्याच्या बादशहाने शहापुरापासून जवळ असलेल्या गोवळकोंड्याच्या किल्ल्याचा आश्रय घेतला.

---

१. भागानगर दक्षिणमधील हैद्राबादचे जुने नाव.

औरंगजेबाने राजवाडा व त्यातील सर्व संपत्तीचा ताबा घेतला. गोवळकोंड्याच्या माजी बादशहाचे दर्गे लुटले. बादशहाच्या मोठ्या संपत्तीचा साठा मिळविला. परंतु त्याने स्त्रियाना कोणत्याही प्रकारचा उपद्रव दिला नाही. त्या बादशहाकडे निघून गेल्या. स्त्रियांना त्रास न देण्याची ही पद्धत हिंदुस्तानात सगळे पाळतात.

औरंगजेबाने किल्ल्याला दोन महिनेपर्यंत कडक वेढा घातला. त्यात त्याला मुहम्मद अमीनखान व त्याचे सैनिक यांचे साह्य झाले. दरम्यानच्या काळात मीर जुमला हा येऊन पोहचला. बादशहावर युद्ध उगविण्याकरिता तो नुसता जळत होता. शहाजहानला धामधुमीची बातमी लागली. औरंगजेबाने वेढा उठवावा, व औरंगाबादेस परतावे अशी त्याने आज्ञा केली. पण वेढा उठवण्यापूर्वी औरंगजेबाने युद्ध खर्च म्हणून आणि शिवाय अधिक रक्कम गोवळकोंड्याच्या बादशहाकडून वसूल केली. बादशहाला आपली मुलगी औरंगजेबाचा मुलगा सुलतान मुहम्मद[1] याला देणे भाग पडले. शिवाय आंदण म्हणून रामगीर हा जिल्हाही द्यावा लागला. आपल्या मृत्यूनंतर सुलतान मुहम्मद याने आपल्या गादीवर यावे, हे बादशहाने मान्य केले. गोवळकोंड्याच्या नाण्यावर एका बाजूस शहाजहानची मुद्रा असावी, हेही मान्य करण्यात आले. नंतर औरंगजेब परतला. त्याच्या बरोबर मीर जुमला, त्याचे कुटुंबीय हे होते. मीर जुमलाने आपली सर्व संपत्ति बरोबर घेतली. गोवळकोंड्याच्या बादशहाने मीर जुमलाच्या वाड्यांना आणि इतर मालमत्तेला धक्का लावता कामा नये, आणि मीर जुमलाला ज्या सवलती पूर्वी होत्या त्या तशाच चालू रहाव्यात असे औरंगजेबाने बादशहाला बजावले. गोवळकोंड्याच्या बादशहाने अशा प्रकारची हमी दिली.

गोवळकोंड्याचा बादशहा औरंगजेबाच्या हाती सापडावा ही गोष्ट बेगमसाहिब व दारा यांना परवणारी नव्हती. एकदा का गोवळकोंडा औरंगजेबाच्या हाती आला की त्याचे बळ पूर्वीपेक्षा अधिक होईल आणि हिंदुस्तानच्या सिंहासनावर हक्क सांगणे त्याला अधिक सुलभ होईल असे त्यांना वाटले. गोवळकोंड्याचा वेढा उठवावा आणि बादशहाला सोडून द्यावे अशी आज्ञा निघण्याचे खरे कारण हे होते.

मीर जुमला हा एक शूर सरदार होता. त्याच्यापाशी मुबलक संपत्ति होती. त्याला आपल्या पक्षात ओढावा हा औरंगजेबाचा मुख्य हेतु होता. त्याने मीर जुमलाला अनेक आश्वासने दिली आणि त्याच्याशी गोड बोलणे चालू ठेवले. आपण गादीवर आलो तर तुम्हाला दरबारातील सर्वांत मोठा हुद्दा देऊ व तुमच्या मुलाला त्याच्या

१. सुलतान मुहम्मद—हा औरंगजेबाचा थोरला मुलगा. जन्म डि. २९, १६३९. मृत्यु १६७७–७८. ही मोहीम १६५६ ला झाली. (एलफिन्स्टन ३१३) अबदुल्ला कुतबशाहाच्या मुलीशी राजपुत्राचे लग्न झाले होते. (खानखान I ७४४, ७४९) त्यात लेखक, राजपुत्राला वऱ्हाड-बिदर सरहद्दीजवळील सरकार रामगीर हा प्रदेश आंदण म्हणून मिळाल्याचा उल्लेख करतो.

लालोखालच्या हुद्दा मिळेल आणि तुम्हा दोघांना राजपुत्रांना असलेले सर्व हक्क देण्यात येतील असे औरंगजेबाने वचन दिले. औरंगजेब आपल्यावर विश्वास ठेवतो हे पाहून मीर जुमलाही त्याच्याशी स्नेहभावाने वागू लागला. वेळ येईल तेव्हा आपण सर्व प्रकारे तुम्हाला मदत करू असे त्याने औरंगजेबास आश्वासन दिले.

शहाजहानने मीर जुमलाला स्नेहाची अनेक पत्रे लिहिली. "तुम्ही दरबारात या. तुम्हाला कुल-मुखत्यारी देण्यात येईल." असे त्याने लिहिले. कंदहारचा किल्ला जिंकून घेण्यासाठी मीर जुमलाचा उपयोग करावा असा त्याचा विचार होता. मीर जुमला दिल्लीकडे जाण्यास निघाला. दिल्लीत त्याचे अतिशय थाटाने स्वागत झाले. त्यावेळी मी (मनुची) तेथेच होतो. शहाजहानने त्याला मुख्य वजीर केले आणि त्याला मुअज्जमखान ही पदवी दिली.[1]

काही काळाने शहाजहानने त्याला आज्ञा केली की "इराणविरुद्ध चढाई करण्याची तयारी करा. कंदहारचा किल्ला इराणच्या शहाकडून हिसकावून घेण्याचा मी निश्चय केला आहे. मीर जुमलाने शहाजहानला कळविले की आपण थोड्याच अवधीत गोवळकोंडा व विजापूर ही राज्ये जिंकून देऊ. शहाजहानने ते ऐकून कंदहारच्या वाटेवर असलेला आपला तोफखाना परत बोलाविला.

काही महिन्यानंतर शहाजहानने दक्षिणेकडे मोठे सैन्य पाठविण्याचे ठरविले. या सैन्याचे नेतृत्व मुअज्जमखान याजकडे देण्यात आले. आपल्या बापाच्या या मसलतीची दाराला चीड आली. ती अमलात येऊ नये म्हणून त्याने शक्य तितका प्रयत्न केला. या सैन्याचे साह्य औरंगजेबाला मिळेल ही भीती दाराला होती. इतर प्रसिद्ध अधिकाऱ्यांव्यतिरिक्त मुअज्जमखानाबरोबर नजाबतखान, महाबतखान, आणि सलाबतखान यांना पाठविण्यात आले. मुअज्जमखानाचा मुलगा व इतर कुटुंबीय ही दिल्लीतच ठेवून घेण्यात आली. दख्खनवर झपाट्याने चाल करून तो औरंगाबादेहून पुढे गेला आणि विजापूरच्या प्रदेशावर हल्ला करून मुअज्जमखानाने कल्याणीला वेढा दिला.

औरंगजेबाची बहिण रोशन आरा बेगम, ही दरबारात त्याच्या हिताचे रक्षण करी. दारा व बेगम साहेब यांचे व तिचे वैर होते ही गोष्ट लपविता येणे तिला शक्य झाले नाही. ती राजवाड्यातच राहत असल्यामुळे महत्त्वाच्या घटना तिला सहज कळत असत. त्यांची माहिती ती गुप्तपणे औरंगजेबाला कळवित असे.

शहाजहानला चौथा मुलगा मुरादबक्ष. हा सर्व भावांत लहान होता. संगीत नृत्य, मद्यपान इत्यादि करमणुकींपलीकडे त्याला काही सुचत नसे. तसा तो फार शूर होता. धनुर्विद्येत तो परिपूर्ण होता. शस्त्रांचा तो नेहमी अभ्यास करी. तो चिवट व कसलेला शिकारी होता. तो भाल्याने लांडगे व रानडुकरे यांची शिकार करी. तीत तो अनेक

१. मीर जुमला रमझानच्या पंचवीसाव्या दिवशी (जुलै ८, १६५७) दिल्लीला पोहोचला.

वेळा आपला जीव धोक्यात घाली. युद्धाच्या कथा ऐकण्यात त्यास आनंद वाटे. त्याच्या फाजील विश्वासाने दरबारातील घडामोडींकडे तो तुच्छतेने पाही. आपल्या बाहुबलावर आणि तलवारीवर त्याचा विश्वास असल्यामुळे तो कोणाचीही परवा करीत नसे.

शहाजहानची चौथी मुलगी होती मिन्नुन्निसाबेगम, ही मुरादबक्षचा पक्ष घेत असे. ती लहान होती. राज्यातील अस्वस्थतेच्या काळी ती अंतःपुरात राहत असे.

**शहाजहान बादशहाचा आजार व दरबारातील अशांतता :** मुअज्जमखानाने कल्याणीला वेढा घातला होता, त्या सुमारास शहाजहान एकाएकी आजारी पडला. ते वर्ष सोळाशे चौपन्न, व तारीख सतरा नोव्हेंबर होती (खरे वर्ष १६५७ होय). शहाजहान त्यावेळी दिल्लीत होता. मी त्यावेळी दाराच्या पदरी होतो. आपली अशी स्थिती झाल्याचे पाहून शहाजहानने किल्ल्याचे दरवाजे बंद करण्याची आज्ञा केली. फक्त दोन लहान दरवाजे उघडे ठेवण्यात आले. आपल्या मुसलमान सेनाधिकाऱ्यांवर शहाजहानचा विश्वास न राहिल्यामुळे राजा जसवंतसिंग याची एका दरवाज्यावर त्याने नेमणूक केली. दुसऱ्या दरवाज्यावर राजा रामसिंग (किशनगडचा राजा) याला नेमण्यात आले. त्यांच्याबरोबर तीस हजार रजपूत सैनिक होते. दाराला दिवसातून फक्त दोन वेळा आणि तेही अवघी दहा माणसे बरोबर घेऊन राजवाड्यात येण्याची परवानगी होती. पण त्याला रात्रीचे राजवाड्यात राहू देण्यात येत नसे. बेगम साहेबने आपल्या बापाच्या खाण्यापिण्याची व्यवस्था पहावी म्हणून राजवाड्यात राहण्याचे ठरविले. पण आपण बादशहाशी एकनिष्ठ राहू अशा प्रकारची कुराणावर शपथ तिला आणि किल्ल्यात राहण्यास परवानगी असलेल्यांना घ्यावी लागली. आपल्यावर विषप्रयोग होईल अशी शहाजहानला भिती वाटत असे.

शहाजहानचे आयुष्य आता थोड्या दिवसांचे राहिले आहे अशी कल्पना करून दाराने शक्य तितके मोठे सैन्य उभे करण्याचे प्रयत्न केले. लाहोर, आग्रा आणि दिल्ली या साम्राज्यातील प्रमुख शहरी सैन्यात लोकांची भरती करण्याचे हुकूम सोडले. शहाजहान आजारी पडला. ठिकठिकाणी दंगेधोपे होतील, आणि लोक आपल्या संरक्षणासाठी शस्त्रास्त्रांची तयारी करू लागतील असे त्याला वाटत होते.

शहरात हा गोंधळ तीन दिवस चालू होता. दुकाने बंद होती. मालाचा पुरवठा अपुरा होता. राजपुत्रांच्या वकीलांनी बादशहाच्या आजारासंबंधी आपल्या मालकांना तातडीने लिहून कळविले. यावर प्रत्येकाने योजना करून आपापल्या सैन्याची तयारी करण्यास सुरवात केली. सराफ सावकारांनी आपल्या संबंधितांना पत्रे लिहून मोघमपणे कळविले की, "लोण्याचे भांडे ताकाने काठोकाठ भरले आहे, पण त्यातील लोणी नाहीसे झाले आहे." यावरून त्यांना असे म्हणावयाचे होते की, बादशहाचा मृत्यु झाला आहे. अशा अफवा पसरण्याचे कारण बादशहा नेहमीप्रमाणे दरबारात हजर राहू शकत नव्हता हे होय. या गोष्टीची शहाजहानला मोठी काळजी लागली होती.

वरील बातमी शहाशुजाकडे पोहोचली, तेव्हा त्याने युद्धाकरिता मोठी फौज तयार केली. बरोबर बंगालमध्ये असताना गोळा केलेला मोठा खजिना घेतला. हा देश फार सुपीक आहे. याच्या जोडीला हिंदु राजांची लूट करून त्याने मिळविलेला मोठा साठा होताच. चाळीस हजार घोडेस्वार व मोठे पायदळ घेऊन तो निघाला. हिंदुस्थानात पायदळ शिपायांना महत्त्व देत नाहीत. त्याने एक नौकांचा काफिला गंगेत ठेवला होता. त्याचे आधिपत्य त्याच्या पदरी असलेल्या पोर्तुगीझांकडे होते. ठरल्याप्रमाणे त्याने तयारी पूर्ण केली. घोड्यावर बसताना तो म्हणाला "आया तख्त, या ताबूत" ("एक सिंहासन तरी, नाहीतर शवपेटिका तरी").

शहाशुजा मोठ्या आत्मविश्वासाने निघाला. त्याचा आपल्या शौर्यावर विश्वास होता. या शिवाय शहाजहानच्या दरबारात त्याच्या पक्षाचे काही सरदार होते. पण त्यापैकी बरेचजण मुअज्झमखान (मीर जुमला) बरोबर दख्खनला गेलेले होते. शहाशुजाने आपल्या कूच करण्यासाठी आग्र्याची वाट निवडली. त्याने अफवा पसरविली की, दाराने शहाजहानला विषप्रयोग केला असून बादशहा मृत्यु पावला आहे. यासाठी आपण दाराचा सूड उगविण्यास जात आहोत.

शहाजहानला आपल्या मुलांच्या बंडाची बातमी कळली. तोपर्यंत तो काहीसा बरा झाला होता. तरीपण त्याला बरीच अशक्तता होती. शहाजहानने शहाशुजाला पत्र लिहून पुढे न येण्याबद्दल कळविले. त्यात त्याने लिहिले होते की, "माझा आजार काही गंभीर स्वरूपाचा नाही. आणि आता मला बरेही वाटू लागले आहे." आणि त्या पत्रात असेही कळविले की, "तू आपल्या मुक्कामाला परत जा." दाराच्या दृष्टीने हे पत्र शहाशुजाला मिळणे अत्यंत आवश्यक होते. कारण शहाशुजाखेरीज इतर कोणा-नेही त्याला भय वाटत नव्हते. पण दरबारातील शहाशुजाच्या मित्रांनी याच्या उलट त्याला कळविले की, "तुझा बाप या आजारातून उठण्याची शक्यता नाही." शहाशुजाला शहाजहानचे पत्र मिळाले. पण ही गोष्ट लपवून ठेवून तो पुढे चाल करून येऊ लागला. आणि त्याने जाहीर केले की, माझा पिता मरण पावला आहे. तो जिवंत असेल तर आग्र्याला पोहोचल्यावर आपण त्याची क्षमा मागून त्याच्या आज्ञांचे पालन करत राहू.

शहाशुजाने त्याची आज्ञा मानली नाही, असे शहाजहानला कळविण्यात आले. प्रकृति अगदी क्षीण झाली असूनही त्याला दिल्ली सोडून आग्र्याकडे जाण्यास निघावे लागले. आपण जिवंत आहोत, हे साम्राज्यभर कळावे असा त्याचा हेतु होता. यामुळे आपली मुले व इतर बंडखोर यांना धाक बसेल असे त्याला वाटले. पण याचा काही उपयोग झाला नाही शहाशुजा हा कूच करून येत होता. आता साम्राज्य ताब्यात घ्यावे असे त्याने ठरविले. त्याच्या या वागणुकीमुळे शहाजहानला त्याच्या विरुद्ध सैन्य पाठविणे भाग पडले. त्याने दाराचा मुलगा व २५ वर्षांचा तरुण राजपुत्र सुलतान

सुलेमान शुको याला पुरेसे सैन्य देऊन पाठविले. सुलेमान शुकोच्या बरोबर सुप्रसिद्ध सेनापति राजा जयसिंग याला देण्यात आले, हा सुलेमानच्या पक्षाचा होता. तो प्रबळ आणि धनाढ्य होता. त्याची कीर्ति हिन्दुस्तानभर पसरली होती. कामगिरी बजावण्यात तो अद्वितीय होता. सुलेमान शुकोबरोबर दिलेरखान या पठाण सेनापतीलाही देण्यात आले होते. शहाजहानने त्यांना गुप्तपणे आज्ञा केली होती की, "अगदी निरुपाय झाल्याखेरीज तुम्ही युद्ध करू नये. शाहाशुजाने बंगालला परत जावे यासाठी जे काही करता येईल ते करावे." दोन्ही फौजा समोरासमोर आल्या, शाहाशुजाने आपल्या तोफा शत्रूवर रोखल्या. राजा जयसिंगाने तिकडे लक्ष न देता शाहाशुजाला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, "आपल्या बापावर कोणी विषप्रयोग केला व त्यामुळे तो मृत्यु पावला असे ऐकून आपण युद्ध घेण्याच्या उद्देशाने आपल्या प्रांतातून इकडे आला, अशी बातमी शहाजहानला कळली. बादशहाच्या मृत्युची बातमी खोटी आहे. बादशहा अद्याप जिवंत असून त्यांची प्रकृति खणखणीत आहे. आपला मित्र म्हणून आपल्याला कळवित आहे की, आपण आपल्या प्रांतात परत जावे. यावेळी आपण जे पितृप्रेम दाखविलेत त्याबद्दल बादशहाने आपल्याला पाटणा प्रांताचाही अधिकार दिला आहे. बादशहाच्या मृत्युची बातमी ऐकताच आपण सैन्य घेऊन निघाला यावरून आपले शौर्य आणि नेतृत्वाचे गुणही दिसून आले. पण आपले वडील जिवंत आहेत हे पाहून आपण परत जावे. हे अधिक उत्तम होईल. यामुळे आपण बंड केले आहे, असे त्यांना वाटणार नाही. आणि आपल्या विरुद्ध मोठे सैन्य पाठविण्याचे त्यांना भाग पडणारही नाही. आपण माझा सल्ला ऐकाल, आणि वेळ न लावता परत फिराल अशी मला आशा आहे. वेळ पडेल तेव्हा आपणास साहाय्य करीन असे मी आपणास वचन देतो.

हे पत्र मिळाल्यावर आपले समाधान झाले असे शाहाशुजाने भासविले. आपण आता परत जाऊ असे त्याने जाहीर केले. पण तो मोठा कावेबाज असल्यामुळे त्याने राजा जयसिंगाला चकविण्याचा निश्चय केला. राजा जयसिंग हा अनुभवी सेनापती असल्यामुळे शाहाशुजाला त्याची भिती वाटत होती. म्हणून त्याने जयसिंगाला पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले :

"बंगाल प्रांतातून माझे येणे सर्व हिंदुस्थानभर जाहीर झाले आहे. माझ्या पित्याच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर मिळेल ती फौज घेऊन दिल्लीचा रस्ता धरणे मला भाग पडले. परंतु माझे वडील हयात आहेत आणि त्यांची प्रकृती चांगली आहे अशी तुम्ही मला खात्री देत आहात तेव्हा माझे समाधान झाले आहे. आता मी आपल्या प्रांतात परत जाईन. परंतु माझ्यासारख्या राजपुत्राच्या प्रतिष्ठेला धरून आपण मांडलिक असल्यामुळे आपण प्रथम माघार घ्यावी. त्यानंतर मी परत जाईन, असे मी आपणास वचन देतो."

आपण माघार घेत असताना शाहाशुजाचा आपणावर हल्ला करण्याचा बेत आहे असा जयसिंगाने अंदाज बांधला. आणि आपल्या सैन्याला प्रथम मागे जाण्याबद्दल केलेली सूचना आपण मान्य केल्याचे भासविले. दुसऱ्या दिवशी सकाळी हत्ती घोडे, गाड्या यांजवर सामान भरण्याबद्दल त्याने सूचना दिल्या. त्याने सैन्य मागे घेण्याचा इशाराही दिला. यामुळे शाहाशुजाच्या हेरांची दिशाभूल झाली. परंतु ज्यावेळी निघण्याकरिता पहिल्या वाजतील तेव्हा घोडदळाने दक्ष राहावे अशी जयसिंगाने गुप्तपणे सूचना दिली. शाहाशुजाला कळले की सुलेमान शुकोच्या सैन्याला कूच करण्याकरिता नगारे वाजत आहेत. त्यांचा आवाज ऐकून शाहाशुजाने आपल्या पुतण्यावर पिछाडीकडून हल्ला करण्याची तयारी केली. परंतु त्याला ही संधी मिळाली नाही. कारण राजा जयसिंगाने पहाटेला एकाएकी शाहाशुजाच्या सैन्यावर हल्ला केला. या हल्ल्यात बरीच प्राणहानी झाली. शाहाशुजाला आपले सैन्य पुनः जमविण्यास अवसरही मिळाला नाही. जयसिंगाच्या हल्ल्यापुढे त्याचे सैन्य पळत सुटले. जयसिंगाने काही तोफा, काही हत्ती आणि अनेक सैनिक आपल्या ताब्यात घेतले. वरील कैद्यांपैकी चाळीस जणांना विजयाचे प्रमाण म्हणून आग्र्याला पाठविण्यात आले. एखाद्या शूर योद्ध्यास उचित होईल असे काही या कैद्यांबरोबर दारा वागला नाही. त्याने अन्याय्य असा हुकूम दिला आणि कैद्यांचा एकेक हात तोडण्याची शिक्षा फर्माविली.

सुलेमान शुकोने शाहाशुजाचा पाठलाग चालू ठेवला. त्याला आपल्या चुलत्याचा संपूर्ण नाश करावयाचा होता. राजा जयसिंगाला हे पटले नाही. शाहाशुजाने माघार घ्यावी. आणि स्वतःला वाचवावे असे जयसिंगाने घडवून आणले. मनात आणले असते तर राजा जयसिंग शाहाशुजाला कैद करू शकला असता. पण तसे करण्याची त्याची इच्छा नव्हती. याची तीन कारणे होती. पहिले कारण असे की, शहाजहान अद्याप जिवंत होता. त्याने शाहाशुजाला बंधमुक्त केले असते. याचा परिणाम म्हणजे जयसिंगाला आणखी एक शत्रु निर्माण झाला असता. दुसरे कारण, बादशहाचा हुकूम लढाई टाळण्याचा होता. दाराने जयसिंगाला गवार म्हटले होते हे पूर्वी सांगितलेच आहे आणि तिसरे कारण म्हणजे यामुळे दाराबद्दल त्याच्या मनात असलेली अढी हे होय. मोठ्या युक्तीने त्याने शाहाशुजाला पळवून लावले. याला दोन कारणे. शाहाशुजाच्या सैन्याच्या पिछाडीवर हल्ला केला असता, तर पराजयाचा धोका होता, दुसरे कारण म्हणजे शाहाशुजाला आणखी धाडस करून दरबारात गोंधळ माजविण्यास वाव मिळू नये हे होय.

शाहाशुजाने निघून जावे असे राजा जयसिंगाला वाटत होते. तो सुलतान शुकोला म्हणाला, "आपण आता दरबारात परत जाऊ या. तेथे अजून काही महत्त्वाची प्रकरणे चालू आहेत. आणखी एखादे बंड झाले तर आपल्याला दक्ष राहावे लागेल."

पण सुलेमान शुकोह म्हणाला की, "असे काही बंड उद्भवले तर नवीन सैन्य उभारून नर्मदा-उत्तरेच्या अशा बंडखोरांच्या विरुद्ध पाठविणे आपल्या वडिलांना शक्य होईल; म्हणून पाठलाग थांबविण्याची आवश्यकता नाही." पण मग जयसिंगाने शाहशुजाला परतण्याची सतत संधी दिली. शुजाचे सैन्य पुढे आणि जयसिंगाचे मागे असे करत करत बंगालच्या सरहद्दीपर्यंत ते पोहचले.

आपले वडील आजारी असल्याची बातमी औरंगजेबाला कळाली तेव्हा तो औरंगाबाद येथेच होता. त्याने युद्धाची तयारी करण्याची गुप्तपणे सुरवात केली. या बाबतीत मुरादबक्षपेक्षा तो अधिक पोक्तपणे वागला. जमेल ते सैन्य घेऊन मुरादबक्षाने पुढे कूच केले. आपण बंडखोर आहोत, आणि बादशहाला सोडविण्यासाठी दिल्लीला चाललो असे त्याने जाहीर केले.

शाहशुजाची माघार पाहून आता आपल्याला धोका राहिला नाही असे शहाजहान व दारा यांना वाटले. मुरादबक्षच्या बंडाला त्याने महत्त्व दिले नाही. त्याला भेटी पाठवून आणि पत्रे लिहून परत आपल्या हुकमतीत आणता येईल असे त्यांना वाटले. पुढे काय घडणार आहे, याची त्यांना कल्पना आली नाही. यामुळे शहाजहानने आपले सर्व सामान दिल्ली शहराकडे पाठविण्याचा हुकूम दिला. आपण आता आजारातून बरे झालो असून लवकरच आग्रा सोडणार आहोत असे त्याने जाहीर केले. या निर्णयाच्या अनुरोधाने सैन्याचा बराच मोठा भाग दिल्ली शहरी पोहचला देखील होता. आणि रात्रंदिवस कूच करणाऱ्या सैनिकांनी सर्व रस्ते भरून गेले होते.

आपण बादशहा व्हावे अशी औरंगजेबाची बऱ्याच काळापासून इच्छा होती. पण नानाप्रकारच्या युक्तीने त्याने आपली ही महत्त्वाकांक्षा लपून ठेवली होती. इतर राजपुत्रांनी बंडे केली, त्याचा त्याने आता लाभ घेतला. शिवाजीने विजापूरकरांविरुद्ध बंड केले होते. औरंगजेबाने त्याला पत्र लिहिले. आपल्या मसलतीत अपयश आले तर शिवाजी हा आपल्या पक्षात असावा हा त्याचा हेतू होता.

शिवाजी तटस्थ राहणार याची खात्री झाल्यावर औरंगजेबाने आपण आपल्या बापाला आता विरोध करणार असे जाहीर केले. शहाजहान हा दिल्लीस निघण्याच्या तयारीत असताना औरंगजेबाने बंड केले याची बातमी त्याला मिळाली.[१] यामुळे दरबारात गोंधळ उडाला. दाराला अतिशय काळजी वाटू लागली. दिल्लीला गेलेले

१. म्हणजे आग्रा ते दिल्लीचा परतीचा प्रवास. शहाजहानने राजवटीच्या अठराव्या (एप्रिल २१, १६५८) आग्रा सोडले. आग्र्याच्या वायव्येस असलेल्या सिलोचपूर या गावी (मे, ५) त्याने जसवंतसिंगाच्या पूर्ण पराभवाचे ऐकले. ही लढाई एप्रिल ३० ला झाली होती हे ऐकून मे १२ ला तो आग्र्याला परत गेला. (शाह. आलमगीरनामा. पा. ८१, ८२).

सर्व सैनिक आग्र्याला परत आले. मी (मनुची) स्वतः दिल्लीत होतो. मीही आग्र्याला परत आलो.

शहाजहानने पूर्वीच शाहाशुजाला लिहिले होते, तसेच पत्र औरंगजेबाला लिहिले. दाराने पण पत्र लिहिले. पण त्या पत्रात चांगल्याच धमक्या होत्या. शाहाशुजाने जे उत्तर पाठविले तसेच औरंगजेबानेही केले. औरंगजेबापाशी असलेले सैन्य थोडे होते. म्हणून त्याने मुरादबक्षाला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले :

"मला अशी बातमी लागली आहे की राजपुत्र दाराने आपल्या वडिलांना विष देऊन मारले आहे. आणि राज्याचा ताबा मिळवून बादशहा ही पदवी घेण्याचा त्याचा उद्देश आहे. यामुळे राजपुत्र शाहाशुजा तख्त मिळविण्यासाठी व दाराचा सूड घेण्यासाठी मोठी फौज घेऊन गेला. ही घटना घडल्यामुळे तुम्हाला हे पत्र लिहिणे मला भाग पडले. मी तुम्हाला कळवू इच्छितो की, मोगल साम्राज्याचा बादशहा होण्यास तुमच्या खेरीज दुसरा कोणीही योग्य नाही. दारा हा एक काफर आणि मूर्तिपूजक आहे. तो मुसलमानी धर्माचा विध्वंसक आहे. शाहाशुजा हा अली पंथाचा (शिया) असल्यामुळे आपल्या धर्माला विरोधी आहे. मी कुराणाचा अनन्य भक्त आहे. म्हणून आपली सर्व शक्ती खर्च करून तुम्हाला सम्राट बनवणे माझे कर्तव्य ठरते. मी फार पूर्वीच ऐहिकाचा त्याग केला आहे. माझे उर्वरित आयुष्य मक्केत काढण्याची मी प्रतिज्ञा घेतलेली आहे, हे प्रत्येकास ठाऊक आहे. परमेश्वराची कृपा झाल्यास मी तुम्हाला तख्तावर बसवीन. तुम्ही मात्र एक गोष्ट केली पाहिजे. तुम्ही कुराणाची शपथ घ्यावी. गादीवर आल्यावर माझ्या कुटुंबियांवर दया दाखवावी. आणि माझ्यासाठी म्हणून त्यांचे पितृतुल्य पालन करावे. असे वचन तुम्ही दिलेत तर मी आपली सर्व शक्ती आणि युक्ति पणास लावीन. आणि तुम्हाला दिल्लीच्या गादीवर बसविण्यासाठी शक्य तितका प्रयत्न करीन. माझ्या वचनाची हमी म्हणून मी तुम्हाला एक लाख रुपये पाठवीत आहे. यामुळे आपल्यात चिरकाल टिकणारे सख्य व भ्रातृभाव निर्माण होईल. आपण एकाच बापाच्या पोटचे आहोत, एकाच धर्माचे व दोघेही कुराणाचे संरक्षक आहोत. तुमच्या आगमनाची मी वाट पहात आहे."

हे पत्र मिळाल्यावर मुरादबक्षने त्यावर विश्वास ठेवला. त्यास अत्यानंद झाला. सैन्यातील लोकांचा उत्साह वाढावा आणि इतर अधिकारीही आपल्याला मिळावेत म्हणून त्याने हे पत्र सैन्यातील सर्व लोकांना दाखविले. तसेच मोठ्या व्यापाऱ्यांनी गोडीगुलाबीने पैसा द्यावा म्हणून त्याने या पत्राचा उपयोग केला. त्याचा उत्साह वाढला. आपण आताच बादशहा झालो असे त्यास वाटू लागले. त्याने प्रत्येकास भरमसाठ आश्वासने दिली. अशा उपायांनी त्याने मोहिमेकरिता मोठे सैन्य उभे केले. त्याने औरंगजेबास पुढीलप्रमाणे पत्र लिहिले.

"तुमचे पत्र मिळाले. तुम्ही माझ्याबद्दल सद्‌भाव व्यक्त केलात याबद्दल मला फार आनंद वाटला. तुम्ही कुराणाबद्दल इतकी निष्ठा व्यक्त केलीत, आणि इतर दोघा भावांपैकी कोणीही बादशहा झाल्यास आपला धर्म बुडणार. तो वाचविण्यासाठी इतकी तत्परता दाखविलीत यामुळे मला अतिशय आनंद झाला. तुम्ही माझ्यावर पुष्कळच कृपा केली. मी कुराणावर शपथ घेऊन सांगतो की तुमच्या सूचना मला मान्य आहेत तुमच्या मुलाबाळांना राजपुत्राचा दर्जा राहील. आणि तुम्हाला मी आपल्या वडीलांच्या ठिकाणी मानेन. आपण पाठविलेले एक लाख रुपये नवीन सैन्य उभे करण्यास खर्च करीत असून ते (सैन्य) सुरतेचा किल्ला घेण्यासाठी रवाना करीत आहे. आपली दोन्ही सैन्ये एकत्र होतील आणि परमेश्वराची मर्जी असेल तसे घडून येईल. आणखी बातमीकरिता वाट पहात आहे. आपण दिलेल्या वचनाबद्दल संदेह न बाळगता पूर्ण विश्वास ठेवीत आहे."

मुरादबक्षने तीन हजार घोडेस्वार निवडले आणि आपला इमानी व शूर ख्वाजा शहाबाझ यांच्या नेतृत्वाखाली त्यांना सुरतेचा किल्ला घेण्याकरिता पाठविले.

औरंगजेबाचा मुलगा सुलतान मुहमद याचे लग्न गोवळकोंड्याच्या राजकन्येशी झालेले होते, हे पूर्वी सांगितलेच आहे. औरंगजेबाने, मीर जुमलाला आपल्याकडे आणण्यासाठी सुलतान मुहमदला त्याच्याकडे पाठविले. मीर जुमला हा त्यावेळी कल्याणीच्या वेढ्यात गुंतला होता, आपल्या औरंगाबादेच्या मुक्कामी तो औरंगजेबाला भेटणार होता. महत्त्वाच्या प्रकरणात तुमचा सल्ला घ्यावयाचा आहे, असे औरंगजेबाने त्याला कळविले. मीर जुमलाने खोटा देखावा केला. आपण शहाजहानचे नोकर आहोत, औरंगजेबाचे ताबेदार नाही. बादशहा मेलेला नसून जिवंत आहे आणि आपले (मीर जुमलाचे) कुटुंब आग्र्याला दाराच्या ताब्यात आहे, यामुळे आपण औरंगजेबाचा पक्ष घेऊ शकत नाही, असे त्याने सुलतान मुहंमदला कळविले. सुलतान मुहंमद हा औरंगाबादेला परतला.

दुसऱ्या खेपेस औरंगजेबाने आपला दुसरा मुलगा सुलतान मुअज्जम यास मीर जुमलाकडे पाठविले. शहाजहानने आपल्याला किती प्रेमळ पत्रे लिहिली आहेत, हे दाखविण्यासाठी त्याने ती पत्रे मीर जुमलाकडे पाठविली. वास्तविक पहाता ती पत्रे बनावट होती. आता आपण औरंगाबादला गेल्याखेरीज गत्यंतर नाही, असे मीर जुमल्याने भासविले. तो औरंगाबादेस आला. औरंगजेबाने त्याचे अतिशय प्रेमपूर्वक स्वागत केले. त्याने आपल्या पक्षाला मिळावे अशी त्याने मीर जुमलाला विनंती केली. यावर मीर जुमलाने आपण अतिशय चिडलो आहोत, असा देखावा केला. आपण शहाजहानचे एकनिष्ठ सेवक आहोत असे तो म्हणाला. उघड दरबारात त्याने औरंगजेबाचा निषेध केला. अर्थात हे सर्व सोंग होते. त्याचा हेतु असा की दाराच्या हेरांनी, मीर जुमला हा बादशहाला किती एकनिष्ठ आहे हे कळावे. मीर जुमलाच्या संमतीने त्याला दौलताबादेत ठेवण्यात आले.

औरंगजेबाने मीर जुमलाचे पायदळ, तोफखाना आणि संपत्ती ही आपल्या ताब्यात घेतली. प्रतिकाराचा बरून देखावा करावा पण कोणालाही इजा पोहचवू नये, अशी मीर जुमलाने या पूर्वीच आपल्या सैन्याला गुप्तपणे ताकीद केली होती. हे हुकूम पाळले गेले. मीर जुमलाच्या तळापासून काही अंतरावर शहाजहानच्या अनेक सेनाधिकाऱ्यांचे तळ होते. त्यांच्यापैकी प्रत्येकाकडे औरंगजेबाने आपला दूत पाठविला. त्याने सेनाधिकाऱ्यांना पुढील प्रमाणे कळविले, शहाजहान बादशहा मरण पावला आहे, म्हणून आपण आता माझ्या बाजूस यावे. आपण जर याल तर आपल्या चालू हुद्याच्या वरचा हुद्दा देण्याचे मी आपणास वचन देतो. नाहीतर आता तुम्ही दाराच्या नोकरीत जाणार. मी पण शहाजहानचा मुलगा आहे. आपण माझी नोकरी पसंत करणे योग्य होईल. तुमच्या सारख्या थोर मनाच्या अधिकाऱ्यांनी एका नास्तिक (काफर) राजपुत्राची, मुसलमानी धर्माच्या शत्रुची नोकरी करणे गैर आहे. मी मात्र मुसलमानी धर्माचा खरा अनुयायी आहे.

सेनाधिकारी महाबतखानाला मात्र हे मुळीच पटले नाही. त्याने आग्र्याचा रस्ता धरला. तो परत फिरावा म्हणून औरंगजेबाने पुष्कळ प्रयत्न केला. त्याकरिता त्याने त्याला अनेक निरोप आणि भेटी पाठविल्या. पण महाबतखान पुढे कूच करत राहिला. तो आग्र्याला पोहचल्यावर शहाजहानने त्याची काबूलच्या सुभ्यावर नेमणूक केली.[1]

इतर सेनाधिकाऱ्यांना संशय निर्माण झाला. ते म्हणाले "बादशहाच्या मृत्यूची निश्चित वार्ता नाही. खरे काय ते कळल्याखेरीज आपण औरंगजेबाची बाजू घेणार नाही. पण बादशहा खरोखरीच मरण पावला असेल तर आपण औरंगजेबाला येऊन मिळू. आपल्याला पन्नास दिवसांचा अवधि देण्यात यावा, म्हणजे दरम्यान खरोखर काय घडत आहे हे आपल्याला कळेल. पण या अवधीत काही बातमी मिळाली नाही तर मात्र आपण औरंगजेबाचा पक्ष स्वीकारू अशी औरंगजेबाने त्यांच्याकडून कुराणावर शपथा घेण्यास लावल्या.

**शहाजहान व दाराविरुद्ध औरंगजेब. यादवी युद्धास प्रारंभ :** शहाजहान जिवंत आहे, हे औरंगजेबाला पक्के ठाऊक होते. तो जिवंत असल्याची पत्रे उत्तरेकडून येत असतील, तर ती नर्मदेकाठी थांबविण्यात यावीत, अशी त्याने व्यवस्था केली. ठरलेल्या अवधीत काहीच बातमी न मिळाल्यामुळे सेनाधिकाऱ्यांनी औरंगजेबाची बाजू घेतली. औरंगजेबाने युद्धाची तयारी करण्याला वेळ दवडला नाही. त्याने आपल्या मित्रांना आपल्याला हवी असलेली पत्रे लिहिली.

औरंगजेब बऱ्याच मजला चालून गेला. मुरादबक्षचा अधिकारी शहाबाज याने सुरत घेतल्याची बातमी त्याला पोहचली. सुरतेच्या किल्ल्यात सापडली तितकी संपत्ति

१. अलम-ई-नामीहप्रमाणे ही नेमणूक जमादाच्या ११ ला १०६८ हि. (फेब्रुवारी १४, १६५८) ला केली गेली.

न मिळाल्यामुळे किल्ला लुटण्यात आला. आपल्या सर्व सैन्यासह येऊन मिळावे अशी औरंगजेबाने मुरादबक्षला विनंती केली. त्याचप्रमाणे मुराद हा पुढे निघाला.

ख्वाजा शाहाबाझ याचा औरंगजेबाच्या शब्दावर विश्वास नव्हता. त्याने आपला मालक मुरादबक्ष याला सांगितले की, आपण काही झाले तरी गुजरात सोडू नये, फार काय अहमदाबादही सोडून जाऊ नये, मी तुम्हाला सर्व मजबूत स्थळे मिळवून देतो. याने तुमच्या संपत्तित भर पडेल. औरंगजेबाच्या गोड गोड व दिशाभूल करणाऱ्या शब्दांवर विश्वास ठेऊ नका. औरंगजेब म्हणतो तेथे जाण्याचे टाळा. आपण काय करायला पाहिजे हे भावी काळच दाखवील.

औरंगजेबाने मुरादबक्षच्या दिशेने कूच केले. तो आपल्या पत्राला उत्तर पाठवणार नाही ही शंका आल्यामुळे औरंगजेबाने त्याला आतल्या गाठीची पण गोड भाषेत पुष्कळ पत्रे लिहिली. मुरादबक्षला त्याने पुनः सांगितले की, पूर्वी वचन दिल्याप्रमाणे मी तुम्हाला दिल्लीचा बादशहा करतो. माझा हेतु तुम्हाला बादशहा करण्याचा व माझी मुले तुमच्या ताब्यात देण्याचा आहे. तुम्ही त्यांना तुमच्या पदरी असलेल्या इतर माणसांप्रमाणे वागवावे. मुरादबक्षच्या दरबारात त्याचे अनेक हेर होते. औरंगजेबाच्या खटपटीचा एकच उद्देश आहे. आणि तो म्हणजे आपण व आपले कुटुंबीय यांना मुरादबक्षाचे रक्षण मिळावे. मुरादबक्षाने बादशहा झाल्यावर औरंगजेबाची मक्केच्या यात्रेची सोय करून द्यावी. आणि तेथे त्याच्या राहण्याची व्यवस्था करावी. म्हणजे ठरविल्याप्रमाणे औरंगजेब आपला काळ तेथेच घालवील. औरंगजेबाच्या हितचिंतकांनी मुरादबक्षला वरीलप्रमाणे सांगून त्याचे मन वळविले.

मुरादबक्षने शाहाबाझचा सल्ला ऐकला नाही. बादशहा होण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळे त्याला सारासार विचार राहिला नाही. त्याची दिशाभूल झाली. आणि तयारी करून तो निघाला. मांडवगड जवळील डोंगराळ प्रदेशात औरंगजेब त्याची वाट पाहत होता. औरंगजेब त्याला भेटण्याकरिता पुढे आला. त्याच्याबरोबर त्याचा मुलगा सुलतान मुहंमद हा होता. औरंगजेबाने मोठ्या आदराने मुरादबक्षाचे स्वागत केले. त्याला बादशहा म्हणूनच संबोधिले. आणि तो त्याच्या पुढे आदबीने उभा राहिला. यावेळी मागच्या सगळ्या अचळपचळ वचनांचा पुनरुच्चार करण्यात आला.

दोन्ही फौजा सारख्या टप्प्यांनी कूच करू लागल्या. वाटेने औरंगजेब हा मैत्रीच्या वचनांचा सतत पुनरुच्चार करत होता. मुरादबक्षला तो मोठ्या आदराने वागवी. खाजगीत काय आणि उघडपणे काय, बादशहा म्हणूनच त्याचा उल्लेख करी. ऐहिक गोष्टीबद्दल मला आस्था असती आणि बादशहा होण्याची इच्छा असती, तर गोवळकोंड्याचे प्रकरण मला पुरे होते. मी एव्हाना गोवळकोंड्याचा बादशहा झालो असतो. अशी औरंगजेबाने मुरादबक्षची समजूत घातली. मुरादबक्षाला वाटे की, औरंगजेबाचे

आपल्यावर मनःपूर्वक प्रेम आहे. तो आपला खरा मित्र आहे. आणि सांगतो तसे केल्याखेरीज राहणार नाही. मुरादबक्षने औरंगजेबाला भक्कम आश्वासने दिली.

आपले शत्रु प्रबळ आहेत, ते चिकाटीने पुढे चाल करून येत आहेत, औरंगजेबाची युक्ति व मुरादबक्षचे शौर्य यांचा मेळ झाला आहे याची शहाजहान व दारा यांना जाणीव झाली. वणवा पेटला आहे, आता तो विझवणे कठीण हे त्यांना स्पष्ट दिसत होते. शहाजहानने त्यांना आग्रहाची अनेक पत्रे आणि ताकीदीचे खलिते पाठवून आपापल्या सुभ्यात परतण्यास सांगितले. तुमच्या वंडाची मी कोणत्याही प्रकारे दखल घेणार नाही असे बादशहाने त्यांना वचन दिले. पण हे सर्व निष्फळ ठरले. औरंगजेबाने तर सोंगच आणले होते. तो मुरादबक्षला म्हणाला "दारानेच ही सर्व बनावट पत्रे तयार केली आहेत. शहाजहान हा खरोखरच मरण पावलेला आहे. आणि जरी नसला तरी तो दाराच्या कैदेत असला पाहिजे. कारण तो दरबारात कधीच येत नाही. म्हणून दाराच्या तावडीतून त्याची सुटका करणे हेच योग्य होय. आपले वडील जिवंत असले तर आपण त्यांची क्षमा मागू. दाराच्या तावडीतून तुमची सुटका करणे एवढाच आमचा हेतु होता, असे त्यांना सांगू आणि आपापल्या सुभ्यांना परत जाऊ."

अर्थात हे सर्व खोटे होते. एक दिवस शहाजहानने आजारी असूनही आपल्या राजवाड्यात अर्धा तासपर्यंत लोकांच्या भेटी घेतल्या. त्यावेळी तो नदीच्या दिशेकडे असलेल्या खिडकीपाशी बसला होता. हे मी (मनुची) प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे.

बादशहाचे द्रोही, पण औरंगजेबाचे मित्र अशी माणसे दरबारात होती. शहाजहान या आजारातून वाचत नाही. दाराचा मुलगा सुलेमान शुको हा बंगालकडे आहे. त्याने आग्र्याला परत यावे असे दाराने त्याला लिहिले आहे. तो आग्र्याला येण्या-पूर्वी तुम्ही येऊन पोहचले पाहिजे, असे वरील मंडळींनी औरंगजेबाला कळविले. अशी पत्रे शाइस्ताखान[1] आणि मीर जुमल्याचा मुलगा महम्मद अमीरखान यांनी लिहिली. ही पत्रे हाती पडली. यावर दाराने वरील दोन सरदारांना कैद करून आपल्या वाड्यात ठेवले. त्यांच्या शिरच्छेदाची तो आज्ञा करील असे सर्वांना वाटत होते. या घटनेचा शेवट काय होतो ते ऐकण्यासाठी मी (मनुची) दिवसभर दरबारात होतो. रोशन आरा बेगम आणि इतर राजकन्या यांनी बादशहाला सांगि-तले की, पकडलेली पत्रे बनावट आहेत. शहाजहानला त्यांचे म्हणणे खरे वाटले. राजकन्यांच्या विनंतीवरून संध्याकाळी सात वाजता शाइस्ताखान व मुहम्मद अमीनखान यांची सुटका झाली. आपण त्याच वेळेस त्या दोन सरदारांचा शिरच्छेद केला नाही, याचा दाराला नंतर पश्चाताप झाला.

१. शाइस्ताखान हा राणी मुमताज महालचा भाऊ होता; म्हणजे शहाजहानच्या मुलांचा तो मामा होता.

आपल्या मुलांना आपल्याबद्दल काही आदर राहिला नाही, ते आपल्या आज्ञेचे यत्किंचितही पालन करत नाहीत, हे तो दुःखी शहाजहान पहात होता. लांब लांब मजला मारून औरंगजेब व मुरादबक्ष दाराशी युद्ध करण्याच्या निश्चयाने येत होते. बादशहा जरी स्वतः त्यांना विरोध करण्यास गेला असता तरी सुद्धा हल्ला करण्यास त्यांनी माघार घेतली नसती. औरंगजेब व मुरादबक्ष यांच्या सैन्यात बहुतेक लोक हे बादशहाचे द्रोही होते. बादशहा मरण पावला आहे, असे ते ठासून सांगत, खरे म्हणजे बादशहा जिवंत होता. तो अतिशय अशक्त झाला होता इतकेच. दाराला त्याने सांगितले की, अशक्त अवस्थेत जरी मी असलो तरी स्वतः लढाईस जाणे योग्य होईल. त्यामुळे विरोधकांना काबूत राहता येईल.

हा बेत ऐकून राजद्रोह्यांनी, विशेषतः खलीलुल्ला खानाने[१] त्याला विरोध केला. खलीलुल्ला खान दाराला म्हणाला की, "बादशहा हा युद्धात हजर राहिला तर नाव त्याचेच होईल."

**धर्मतची लढाई :** आपला थोडा बहुत उपयोग होईल या विचाराने, आजारी असूनही म्हातारा शहाजहान युद्धात भाग घेण्याची तयारी करू लागला. पण राजद्रोह्यांच्या सल्ल्यामुळे आणि आपल्या प्रतिष्ठेच्या कल्पनेमुळे दाराचे मन बदलले होते. आपण युद्धात आलात तर, मी आपल्या समोरच खंजीर खुपसून घेऊन आत्महत्या करीन असे त्याने म्हटले. त्या दुःखी म्हाताऱ्याच्या डोळ्यात पाणी आले. तो म्हणाला "माझा सगळा अधिकार मी तुला देतो. परमेश्वर तुला सहाय्य करो." राजद्रोही लोकांच्या वर दाराचा पुरेपुर विश्वास होता. आपण ही लढाई जिंकू असे त्याला वाटत होते. त्याचा उत्साह खूपच वाढला होता. तो म्हणाला "माझ्या धनुष्याच्या दोरीने मी शत्रूंना यशस्वीपणे बांधून आणीन."

दाराकडे शहाजहानने सत्ता आणि संपत्ती ही सोपविली. आयुष्याच्या उत्तरार्धात त्याची अशी ससेहोलपट झाली, यामुळे शहाजहान फार दुःखी झाला. मग त्याने छत्रसाल[२] (बुंदीचा राजा) व राव रामसिंग राठोड[३] (किशनगडचा राजा), यांना बोलावणे पाठविले. आणि त्यांना दरबारातील इतर सेनापतींवर नेमले. वरील सेनाधिकाऱ्यांपैकी कोणाचे दाराशी सलोख्याचे संबंध नव्हते. वेळ प्रसंग आला तर आपल्याला स्वतःच्या मुलांशी लढावे लागेल. त्यावेळी वरील दोन सरदारांनी आपल्या कडून लढावे अशी त्याने त्यांना विनंती केली. इतके करूनही आपल्या सर्वनाशाची भीती आणि साम्राज्यातील गोंधळ यामुळे बादशहाला रात्रंदिवस अतिशय

१. शहाजहानला प्रमुख म्हणून स्वतः लढाईवर जावयाचे होते. हे विधान मा-सीरे-उल्-उमरा iii ८२७ पान, ओळ १४ वर आहे. एस. बी. नजाबतखान मध्येही हे विधान दिसते

२. राव छत्रसाल हाडा हा बुंदीचा राव रतनचा नातू होता. (मा-उ-उ. २६०)

३. रामसिंग राठोड–हा कर्मसिंग राठोडचा मुलगा उदेपूरच्या राणाचा भाचा.

काळजी लागून राहिली होती. आपल्या संततीपैकी पुष्कळांचा शिरच्छेद होईल असे त्यास खात्रीने वाटत होते.

"शाहाशुजावरची मोहिम थांबवा. आणि आपल्या अधिकाऱ्यासह मला येऊन ताबडतोब मिळा. औरंगजेब आणि मुरादबक्ष तडक मजला मारीत चालून येत आहेत. त्यांच्या विरुद्ध आपल्याला लढावयाचे आहे." अशा अर्थाचा तावडतोबीचा हुकूम दाराने सुलेमान शुकोला पाठविला. लढाईच्या पूर्वी आपली सैन्ये एकत्र होणे हे अतिशय महत्त्वाचे आहे; म्हणून तुम्ही अजिबात विलंब लावू नये अशी दाराने सुलेमान शुकोला कडक आज्ञा केली. असा घेतलेला हा निर्णय फार चांगला होता. पण तो घेण्यास फार उशीर झाला होता. दाराचे ग्रहच प्रतिकूल होते. सुलेमान शुको वेळेवर येऊन पोहचणे अशक्य झाले. ही दोन्ही सैन्ये एकत्र झाली असती तर ती औरंगजेब व मुरादबक्षाच्या सैन्याहून अतिशय प्रबळ झाली असती. आणि मग त्यांना दारावर हल्ला करण्याची हिंमत झाली नसती.

आग्र्याला सैन्याची जमवाजमव चालू असतानाच औरंगजेब व मुरादबक्ष यांनी बऱ्हाणपुर जवळ नदी ओलांडली असून मांडू जवळील डोंगराळ व घनदाट अरण्य असलेली अशी अवघड खिंड पार केली आहे अशी बातमी येऊन थडकली. त्यांचे मार्ग रोखून धरता येतील अशी दाराची अपेक्षा होती. परंतु आता या बातमीने दरबारातील गोंधळ अधिक वाढला. शहाजहानने दोन प्रसिद्ध सरदारांना बोलावणे पाठविले. एक राजा जसवंतसिंग राठोड. हा बादशहाचा एकनिष्ठ सेवक होता. दुसरा होता कासिमखान. याचे दाराशी फारसे सख्य नव्हते. औरंगजेब व मुरादबक्ष यांनी परतावे म्हणून शक्य तो प्रयत्न करण्यात यावा आणि ते जमले नाही तरच बळाचा वापर करण्यात यावा असे त्या दोघा सरदारांना हुकूम करण्यात आले.

शहाजहानला बरे वाटावे म्हणून कासीमखान, जसवंतसिंगला येऊन मिळाला. पण ही मोहिम दाराने घ्यावी आणि बादशहाचा दरबार सोडावा असे त्याला वाटत नव्हते. त्याना निरोप देण्याच्या वेळी, दाराने जसवंतसिंग आणि कासीमखान यांना चांगल्या चांगल्या भेटी दिल्या. त्यात अनेक हत्ती, सजवलेले घोडे व काही किंमती शस्त्रास्त्रे होती. दारा त्यांच्याशी मोठ्या स्नेहाने वागला आणि त्याने त्यांना निरोप दिला.

सैन्य कूच करीत असताना या सरदारांनी औरंगजेब व मुरादबक्ष यांना अनेक पत्रे लिहिली. आणि त्यांना आपापल्या सुभ्यास जाण्यास सांगितले. परंतु त्याचा काहीही उपयोग झाला नाही. त्यांच्या पत्रांना उत्तर मिळाले नाही. पत्रे नेणारे जासूसही परत आले नाहीत. औरंगजेब व मुरादबक्ष हे तातडीने कूच करत येत होते. शहाजहानच्या सरदारांना हे अनपेक्षित होते. त्यांनी पाहिले तोपर्यंत उज्जयनी जवळील नदीपासून काही अंतरावर असलेल्या पठारावर त्या राजपुत्रांचा तळ पडलेला वरील सरदारांना

दिसला. एप्रिल महिना संपत आला होता. उन्हाळा अतिशय जाणवत होता. नदीच्या पात्रात पाणी फार थोडे होते. सरदारांनी यथाशक्य लढाईची तयारी केली. परंतु औरंगजेबाने त्यांच्या हालचालींची कोणतीच दखल घेतली नाही. औरंगजेबाचे सर्व सैन्यही येऊन पोहोचले नव्हते. त्याची युद्धाची तयारीही नव्हती. शत्रु नदीला येऊन भिडू नये म्हणून त्याने आपल्या तोफा सुरू करण्याचा हुकूम दिला. हेतु हा की कूच करून येत असलेल्या आपल्या सैन्याला विश्रांती मिळावी, आणि उरलेले सैन्य येऊन पोहचावे. युद्धासाठी योग्य अशी जागाही त्याला हवी होती. हे सर्व करण्यास त्याला वेळ मिळाला. त्या अवधीत जर सरदारांनी हल्ला केला असता तर फारसा प्रतिकार करणे औरंगजेबाला शक्य झाले नसते. त्याचा पराजय झाला असता. मी (मनुची) त्यावेळी आग्र्याला होतो. मी युद्धात हजर नव्हतो. पण या युद्धात भाग घेणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांशी माझी मैत्री होती. याशिवाय औरंगजेबाच्या तोफखान्यावर असलेल्या काही युरोपियनांच्याकडूनही मला चांगलीच माहिती मिळाली.

राजा जसवंतसिंगाला जे हुकूम देण्यात आले होते, त्यास अनुसरून त्याने नदीचा काठ रोखून धरण्यातच समाधान मानले. औरंगजेबाच्या सैन्याला विश्रांती मिळाली. तोफांची सरबत्ती चालू रहावी आणि तिच्या आश्रयाने मुरादबक्षाने आपल्या सैन्यासह नदीत घुसावे असे औरंगजेबाने ठरविले. नदीचे पात्र असे काही मोठे नव्हते. मी (मनुची) स्वतः अनेक वेळा ती नदी ओलांडली आहे. पण काठ मात्र चढण्या-उतरण्यास अतिशय अवघड आणि मोठमोठ्या शिळांनी व्यापलेले होते.

इकडे कासीमखानाने आपल्या तोफा चालू करण्याचा हुकूम केला. शत्रूशी लढून त्याचा रस्ता रोखण्याचे त्याने नुसते सोंग केले. औरंगजेबाबरोबर त्याचे अंतस्थ सूत जमले होते. युद्धाच्या आधल्या रात्री त्याने दारूगोळा लपवून ठेवला होता. तोफांच्या तीनच फेरी झाडण्याइतका दारूगोळा त्याच्या सैनिकांच्या हाती राहिला होता. सुरवातीस लढाईचे स्वरूप फार उग्र होते. जसवंतसिंगाच्या लोकांनी नदी ओलांडण्याच्या मार्गाचे उत्तम रक्षण केले. परंतु शेवटी मुरादबक्ष नदीच्या पात्रात इतक्या तडफेने घुसला की, त्याचा प्रतिकार करणे जसवंतसिंगाला अशक्य झाले. कासीमखानाने या पूर्वीच माघार घेतलेली होती. शेवटी जसवंतसिंगाजवळ फारच थोडे सैन्य राहिले.

**जसवंतसिंगाचा पराभव :** औरंगजेबाचे सैन्य नदी पार करून पलिकडे पोहोचले. आपल्या बरोबर फारच थोडे सैन्य शिल्लक राहिले आहे, आता आपण परत फिरावे असा जसवंतसिंगाला, त्याच्या सहकाऱ्यांनी सल्ला दिला. यातून वाचलात तर सैन्य गोळा करून लढाया लढता येतील, असे त्याला सांगण्यात आले. नाईलाजाने, आणि मनात नसतानाही जसवंतसिंगाला आपल्या पन्नास घोडेस्वारांसहित माघार घेऊन आपल्या राज्याकडे परतावे लागले. विजयाच्या स्थानी एक सराई व एक

बाग बांधण्याचा औरंगजेबाने हुकूम दिला. उज्जयनिपासून बारा मैलांवर असलेल्या या स्थानाला त्याने "फत्तेहाबाद" असे नाव दिले. औरंगजेबाने शत्रूचा दारूगोळा, तोफखाना, आणि सरंजाम ही ताब्यात घेतली. त्याच्या सैन्याचे बळ वाढले.

या दुर्दैवी पराभवाची बातमी शहाजहानला मिळाली. तो म्हणाला " माझी कारकीर्द संपत आली, हे मला माहित होते. पण माझ्यावर इतकी मोठी आपत्ती कोसळेल याची मला कल्पना नव्हती. परमेश्वरा तुझी मर्जी ! माझ्या अपराधांची शिक्षा मला मिळत आहे आणि ती योग्यच म्हणावी लागेल."

औरंगजेब आणि मुरादबक्ष यांनी नदी ओलांडली हे ऐकून दाराचा संताप अनावर झाला. कासीमखान त्याच्यासमोर असता, तर त्याने निश्चितपणे त्याचे तुकडे तुकडे केले असते. मीर जुमलावरही तो असाच संतापला. "या सर्व दुर्घटनेचे कारण आपण (शहाजहान) आहात. आपण एक फौज जर मीर जुमलावर सोपविली नसती, तर ती त्याने बदखोर औरंगजेबाच्या हवाली केली नसती. पण आज आमची शस्त्रे आमच्यावर उलटली आहेत. आपण सुरवातीलाच माझा सल्ला ऐकला असता, तर आपली अशी दुर्दशा झाली नसती " असे तो शहाजहानला म्हणाला. शाइस्ताखान व महम्मद अमीनखान यांच्यावरही त्याने आरोप केला. ते देखील राजद्रोही आहेत, असे त्याचे मत होते. त्यांचा शिरच्छेद करून त्यांच्या कुटुंबियांची विटंबना (दैन्यावस्था) करावी असा त्याचा हेतु होता. तो इतका रागावला होता की त्याने हे निश्चितपणे घडवून आणले असते. दाराच्या या वागणुकीने शहाजानची स्थिती अधिकच केविलवाणी झाली. त्याने शहाणपणाने आणि सौम्यपणाने आपल्या मुलाचा राग शांत केला. त्याने दाराच्या मनावर बिंबविले की, मुहम्मद अमीनखान आणि शाइस्ताखान यांना संकटात सापडण्याची मुळीच इच्छा नव्हती. मीर जुमलाला कैद करून त्याची मालमत्ता ताब्यात घेणे हे औरंगजेबाचे कारस्थान होय. दाराने हे सर्व विचार ऐकून घेतले, आणि जरी त्याचा मतभेद झाला, तरी तो गप्प बसला, आणि आपल्या फौजेच्या सर्व तयारीस लागला.

आपल्या सैन्याचे मनोधैर्य वाढावे म्हणून औरंगजेबाने जाहीर केले की, दाराच्या सैन्यातील तीस हजार मोगल आपणास येऊन मिळण्यास तयार आहेत. [ वेळ आली तेव्हा हा अंदाज खरा ठरला हे माझ्या (मनुचीच्या) पाहण्यात आले ].

आपला मालक मुरादबक्ष याला औरंगजेब फसवित असल्यामुळे मुरादबक्ष जीव गमावून बसेल हे खोजा शाहाबाझला स्पष्टपणे दिसून आले. धर्मत युद्धानंतर त्याने एक भयंकर प्रकार घडवून आणण्याचा निश्चय केला. औरंगजेब आपला मुलगा सुलतान मुहम्मदला घेऊन अनेक वेळा मुरादबक्षला भेटण्यास येई. असाच तो परतताना, तंबूतून बाहेर पडताना त्याचा खून करण्याचा शाहाबाझने निर्धार केला. हे तिथे राजपुत्र

संभाषणात गुंतले असताना, शाहाबाझ मुरादबक्षला विशेष अर्थाने म्हणाला की आपण जर परवानगी द्याल तर मी कनातीचे थोडे कापड फाडतो. मुरादबक्षाचे ग्रह प्रतिकूल असल्यामुळे त्याने उत्तर दिले, की त्याची काही आवश्यकता नव्हती. त्याला त्या खोजाचा बेत काय होता हे माहित होते. जर तो होय म्हणाला, तर खोजाने, औरंगजेब आणि सुलतान मुहम्मद यांना ठार करण्याचा निश्चय केला होता. आणि त्या दृष्टीने त्याने काही माणसे पूर्वीपासूनच दबा धरून बसविली होती. कापड फाडणे हे शब्द त्याने दोन अर्थांनी वापरले होते. औरंगजेबाची व सुलतान मुहम्मदाची हत्या झाल्यानंतर आपल्या मर्जीने ते झाले आहे असे तो सांगू शकला असता. त्या प्रयत्नात त्याचा प्राण गेला असता तर स्वामी कार्यात आपण जीव देत आहोत, याचे त्याला समाधान लाभले असते. मुरादबक्षाला औरंगजेबाने शिल्लक ठेवले नसते, कारण मोगलांच्यात तसा प्रघातच नव्हता, हे शाहाबाझ पूर्णपणे समजून होता. शाहाबाझचे व मुरादबक्षचे वरील संभाषण ऐकून आपला जीव धोक्यात आहे हे औरंगजेबाने तत्काळ ओळखले. यानंतर मात्र तो कधीच मुरादबक्षच्या तंबूत गेला नाही. वरीच कामे असल्यामुळे स्वतःला येता येत नाही, हे कारण तो दाखवी.

सुलतान सुलेमान शुको हा आपला बाप दारा याला येऊन मिळण्यास अवसर न देता आपण जय मिळवावे, अशी मुरादबक्षला तळमळ होती. म्हणून सैन्याला विश्रांति न देता युद्धाच्या दुसऱ्या दिवशीच आपण कूच करावे असा त्याने बेत केला. त्याने आपल्या सैनिकांचे पगार वाढविले. आणि (धर्मतच्या विजयाच्या) तिसऱ्या दिवशी तो मोठ्या दिमाखाने निघाला. औरंगजेबाने कोणत्याही बाजवी प्रयत्नाची कसूर केली नाही. हेरांकरवी त्याने आपल्या मित्रांना पत्रे पाठवून त्यांना अनेक आश्वासने दिली. दरबाराची परिस्थिती जाणून घ्यावी म्हणजे आपली मसलत अधिक सुरक्षितपणे पार पाडता येईल, हा वरील पत्रे लिहिण्यात त्याचा हेतू होता. आपण काहीही संकोच न बाळगता कूच करून यावे असे राजद्रोह्यांनी त्याला एकमताने कळविले. पुढील युद्धे पूर्वीपेक्षा सहजपणे जिंकता येतील अशी आश्वासने त्यांनी दिली.

औरंगजेब व मुरादबक्ष या दोन राजपुत्रांचा निर्धार आणि आक्रमक वृत्ती ही आता शहाजहानला स्पष्टपणे जाणवली. त्यांना आपापल्या सुभ्यांना परतवून लावणे आता अशक्य आहे हेही त्याने ओळखले. आपण काय करावे हे शहाजहानला समजेना. भविष्यात अनर्थ परंपरा आहे याची त्याने अटकळ केली. या परिस्थितीतून बाहेर पडण्याचे त्याने मोठे यत्न केले पण दैवापुढे त्याचे काही चालले नाही. दाराचे समाधान व्हावे म्हणून त्याने आपले सर्व अधिकार त्याला सोपविले. आणि प्रत्येकाने दाराची आज्ञा मानावी असा हुकूम दिला. औरंगजेब आपल्याला कैद करील आणि आपले अधिकार हिसकावून घेईल, याची भीति त्याला होतीच. ही आणि इतर अनेक संकटे टाळून सुटण्याचा उपाय म्हणजे वर स्वीकारलेला मार्ग होय असे त्याला वाटले.

दाराने बापाला कैद करून त्याची सत्ता बळकावली असे, ऐकीव माहितीवर विसंबून, काही ग्रंथकार म्हणतात. पण हे साफ खोटे आहे असे मी म्हणेन. दारा हा बापाचा आज्ञाधारक होता, हे मला (मनुचीला) माहित आहे. आणि मी अनेक वेळा त्याची प्रचीति पाहिलेली होती.

शहाजहानने आपली सर्व सत्ता व सेना दाराच्या हवाली केली. हे समजल्यावर प्रत्येकाने आपली शस्त्रास्त्रे घेतली, आणि सगळीकडे एकच गडबड उडाली. जो तो आपल्या कलाप्रमाणे वागू लागला. एक लाख घोडेस्वार, व वीस हजारांच्यापेक्षा अधिक पायदळ जमा झाले. ८–१२ पौंड वजनाचे गोळे फेकणाऱ्या शंभर तोफा, २० पौंड वजनाचे तोफगोळे फेकणारी एक तोफ आणि दोनशेच्या वर युरोपियन गोलंदाज, असा दाराचा तोफखाना होता. कनिष्ठ अधिकारी, रसद पुरविणारे दुकानदार, सावकारी करणारे सराफ, अनेक उत्कृष्ट हत्ती, पाचशे उंट, असा सर्व सरंजाम जमला. प्रत्येक उंटावर एक स्वार असे. आणि त्याच्याबरोबर मोठ्या वजनाचे गोळे मारता येतील अशा बंदुका असत. उंटावरून न उतरताही आणि हव्या त्या दिशेने या बंदुका चालविता येत असत, या बंदुकांना सुतरनाले म्हणतात. शिवाय पाचशे हत्ती होते. त्यांच्यावर हौदे होते. प्रत्येक हौद्यात दोन दोन माणसे होती, व त्यांच्या जवळ उंटावरील माणसाप्रमाणे दोन दोन बंदुका असत.

ही सर्व तयारी झाल्यावर आम्ही चौदा मे सोळाशे छप्पन्न रोजी[१] (१६५८ साल असावयास पाहिजे) आग्र्याहून निघालो. इतके सैन्य असूनही दाराला जय मिळू शकेल असे कोणीही म्हणत नव्हता. माझ्या (मनुची) मते याची कारणे पुढीलप्रमाणे असावीत :— अमीर-उमरावांच्या स्त्रियांच्या बाबतीत शहाजहानची अति सैल वागणूक यामुळे दुखावले गेलेले सरदार बादशहाचा सूड उगविण्याची संधी पाहत होते. ती त्यांना मिळाली. दाराचा दोष असा की, आपल्या सरदारांचे समाधान करून त्यांना आपले मित्र बनविणे त्याला जमले नाही. पण त्याच्या दुर्दैवाचे मुख्य कारण म्हणजे सुलेमान शुकोह त्याला वेळेवर येऊन मिळू शकला नाही हे होय. राजा जयसिंगाचा सल्ला न जुमानता तो शहाशुजाच्या मागे विनाकारण फार लांब निघून गेला. त्यामुळे त्याला वेळेवर दाराला येऊन मिळणे शक्य झाले नाही. यामुळे दाराला सुलेमान शुकोह बरोबर असलेल्या आपल्या उत्कृष्ट सैन्याचा काही उपयोग झाला नाही.

दाराच्या सैन्यात नवीन भरती झालेले लोक खाटीक, न्हावी, लोहार, सुतार, शिंपी, अशा प्रकारचे होते. शस्त्रे हातात असताना व कवायतीच्या वेळेला ते छान दिसत. पण युद्धात त्यांना उत्साह नव्हता आणि युद्ध कशाशी खातात हे त्यांना माहित नव्हते. जर सुलेमान शुकोह वेळेवर येता तर दाराला अशा माणसांची अथवा खलीलुल्लाखानाची आवश्यकता भासती ना. खलीलुल्लाखानाच्या बायकोने

१. बरोबर वर्ष १६५८ हे आहे. महिन्याचा दिवस बरोबर दिसतो.

दाराला बजावले होते "तुम्ही माझ्या नजन्याबर मुळीच विश्वास ठेऊ नका. त्याच्या गोड बोलण्याने फसू नका. मी त्याला चांगली ओळखते. संधि आली तर तो विश्वासघातकी कारस्थान करील. त्याबरोबरच शहाजहानच्या चाकरीत असलेल्या तीस हजार मोगल सैनिकांच्यावरही तुम्ही मुळीच विश्वास ठेवू नका."

शहाजहानची मनापासूनची इच्छा होती की सुलेमान शुको येऊन पोहचेपर्यंत दाराने लढाई करू नये. परंतु दाराचे दोन भाऊ इतक्या तडफेने आले की, दाराला वेळच मिळाली नाही. औरंगजेबाने दाराशी लढण्याचा निश्चय केला होता. दाराच्या सैन्यातील राजद्रोही आपल्याला येऊन मिळतील अशी त्याला खात्री होती.

शहराबाहेरच्या मैदानात आमच्या सैन्याचा तळ इतका चांगला दिसत होता की, एक सुंदर शहरच असे वाटावे. राजपुत्र दारा बादशहा शहाजहान व बेगम साहेब यांचा निरोप घेण्यास गेला. दाराला पाहून त्यांच्या नेत्रांतून अश्रूंची धार लागली. बादशहाने दाराला म्हटले "प्रिय मित्रा, तू माझा सर्वांत वडील मुलगा, तुझा आज्ञाधारकपणा आणि इतर चांगले गुण, यामुळे माझा तुझ्याकडे नेहमीच ओढा राहात आला आहे. शांततेच्या मार्गाने तुला हे राज्य मिळेल अशी मला आशा होती. पण परमेश्वरी योजना अगम्य आहेत. तुला किल्ल्यात ठेवावे आणि तुझे भाऊ होण्यास अपात्र असलेले ते बंडखोर औरंगजेब आणि मुरादबक्ष यांच्यावर स्वतः चालून जावे अशी माझी इच्छा होती. माझ्या शत्रूंचा पक्ष घेणारे, बंडखोर आणि राजद्रोही यांना शासन करावे अशी मी आशा करीत होतो. पण माझे वार्धक्य आणि अशक्तपणा यांची तुला दया आली. राज्यातील शांतता, आपल्या बाबाची मुक्तता, आणि सुरक्षितपणा, यासाठी तू आपला जीव धोक्यात घालण्याचे ठरविले आहेस. तुझे मन मोडू नये म्हणून मी तुझ्या मर्जीप्रमाणे वागतो. पण माझे एक ऐक. तुझा मुलगा सुलतान सुलेमान शुको तुला येऊन मिळेपर्यंत तू लढण्याचा प्रसंग येऊ देऊ नकोस. यामुळे तुला विजय मिळण्याची शक्यता वाढेल. तू आपल्या उतावीळपणाला व उत्साहाला आवर घाल एवढीच माझी विनंती आहे. ईश्वरापाशी माझी प्रार्थना आहे की, हिंदुस्तानची बादशाही मिळण्याकरिता तुला आयुष्य लाभावे आणि आपल्या शत्रूंचा नाश व्हावा. परमेश्वराने आपल्याला बंडखोर आणि राजद्रोही यांच्यावर जय मिळवून द्यावा. परमेश्वराच्या हाती मी तुला सोपवितो."

आपल्या पित्याचा निरोप घेऊन दारा सैन्यात दाखल झाला. परंतु त्याच दिवशी कूच करता आले नाही. कारण युद्ध सामग्री अपुरी होती आणि निघण्याचा शुभकाळ ठरविला नव्हता तिसऱ्या[1] दिवशी. हे प्रचंड सैन्य निघाले. चार दिवस कूच करीत

१. मे महिन्याची १७ वी तारीख बरोबर असे संभवनीय वाटते.

चंबळ नदीकाठी धोलपूर येथे पोहचले[1] तेथे आमच्या प्रबळ सैन्याने तळ दिला. नदीचे उतार रोखून धरण्यात आले आणि आग्र्याच्या वाटेवर तोफा ठेवण्यात आल्या.

**समूगढची लढाई, दाराची औरंगजेब व मुरादबक्ष यांच्याशी लढाई :** शत्रुची आम्ही वाट पाहात राहिलो. तो जवळ आला होता. तीन दिवसानंतर[2] त्याचे सैन्य आम्हाला दिसले. आमची तयारी पुरी झाली होती. लढण्यास आम्ही उत्सुक होतो. शत्रुवर हल्ला करण्याची दाराकडे परवानगी मागितली पण दारा संमती देईना. याला दोन कारणे होती सुलतान शुकोची तो वाट पाहत होता. त्याला येऊन मिळण्यास फार वेळ लागणार नाही, असे दाराला वाटले. सुलेमान शुकोस येण्यास वेळ लागला तरी शत्रु नदीपार करण्याची हिंम्मत करणार नाही याची त्याला खात्री वाटत होती. दुसरे कारण असे की, हल्ला करण्यास ती जागा मोठ्या अडचणीची व धोक्याची होती कारण ती जागा खडकांनी आणि खोल दऱ्यांनी व्यापलेली होती.

या काळात औरंगजेबाचे डावपेच सतत चालूच होते. नदीच्या पलीकडे काही अंतरावर त्याचा तळ होता. आपल्या अधिकाऱ्यांना एकत्र बोलावून त्यांना तो म्हणाला, "तुम्ही सर्व लढाईच्या अगदी तयारीत राहा, प्रत्येकाने आपले घोडदळ सज्ज राखावे घाईगर्दी करण्यातच आपल्याला यश मिळण्याची शक्यता आहे. तुमच्या धैर्यावर माझा पूर्ण विश्वास असल्यामुळे थोड्याच वेळात आपण विजयी होऊ अशी मला आशा वाटते. सुलतान शुको येऊन पोहचण्याचा धोका असल्यामुळे आपणास लढाई लांबणीवर टाकता येत नाही.' या भाषणाचा वृत्तांत दाराच्या सैन्याला मिळाला. आमच्या सैन्याला त्यामुळे मोठे समाधान वाटले. प्रत्येकाने मोठ्या आतुरतेने आपली तयारी केली. शत्रुच्या हल्ल्याची वाट पाहत राहिलो.

१ चार दिवसानंतर म्हणजे मे २१ ला होय. धोलपूर हे चंबळ नदीच्या दक्षिण तीरापासून सुमारे एक मैलावर आहे. आणि आग्र्याच्या सुमारे ३० मैलावर आहे.

२. हे घडले असावे मे २४ ला. इथे आपण मनुचीची हकीकत आणि "आलमगीर नामा" मध्ये अधिकृतरित्या दिलेली माहिती ही पडताळून पाहू. दारा शुकोने आपला थोरला मुलगा सिपिहर शुकोसह शब्बानच्या २५ ला आग्रा सोडले. (मे २८, १६५८) त्यापूर्वी शब्बानच्या १६ ला (मे १९) खलील-उल्लाखान, रामसिंग राठोड आणि इतर लोक, यांना धोलपूरजवळील होडी पकडून ठेवण्यास व सर्व उतार आणि नदी ओलांडण्याच्या संभाव्य जागा यावर सक्त नजर ठेवण्यास सांगितले. दरम्यान, औरंगजेब हा ग्वाल्हेरला आला होता. त्याला समजले की धोलपूर येथील होडीवर पहारा आहे, व सर्व उतारावर तोफा ठेवल्या आहेत. स्थानिक जमीनदाराकडे चौकशी करता त्याला एक उताराची जागा असल्याचे समजले. तेथून २४-२५ मैलावर आग्र्याच्या पूर्वेकडील भदोरिया भागात ही उताराची जागा होती. येथे पहाराही नव्हता. औरंगजेबाने खान जहान व इतर सेनाधिकाऱ्यांना तिकडे पाठविले. चंबळवरील त्या जागी ते. दुसऱ्या दिवशी म्हणजे शब्बानच्या शेवटच्या दिवशी (जून १) पोहोचले. औरंगजेबाने (मे ३१) त्याच दिवशी ग्वाल्हेर सोडले. आणि दोन मजल्यांत तो त्या जागी येऊन पोहचला. रमजानच्या पहिल्या दिवशी (जून २, १६५८) त्याने नदी ओलांडली.

राजा चंपत[1] (बुंदेला) याला आपल्याकडे वळवून घेण्याची औरंगजेबाने गुप्त योजना आखली. त्याने चंपतकडे मूल्यवान भेटी पाठविल्या. बक्षिसे आणि बढत्या यांची आश्वासने दिली. औरंगजेबाच्या तळापासून २४-२५ मैलाच्या (१२ लीगच्या) अंतरावर चंबळ नदीला एक उतार होता. तो विशेष प्रसिद्ध नव्हता. त्या उतारापर्यंत पोहचण्यासाठी चंपतच्या इलाख्यातून जावे लागत होते. ते चंपतने मान्य करावे म्हणून औरंगजेबाने वरील आश्वासने त्याला दिली. चंपतने औरंगजेबाची मागणी मान्य केली. शहाजहान बादशहावर त्याला सूड उगवायचा होता. आपल्यावर पुढे काय संकटे येणार आहेत, याची राजा चंपतला कल्पना नव्हती. रस्ता अडचणीचा आणि जंगलाने व्यापलेला होता. औरंगजेबाला आपले सर्व सैन्य बरोबर घेता आले नाही. आपला बेत गुप्त राहावा हा त्याचा हेतु होता म्हणून त्याने तळावर काही तंबू व काही पथके तशीच राहू दिली. माझ्या (मनुचीच्या) माहितीप्रमाणे त्याने आठ हजार सैनिक घेऊन, सर्व थकले होते तरी, ३० मे १६५६ रोजी (खरे वर्ष १६५८), नदी ओलांडली.

नदीचा उतार पूर्णपणे त्याच्या ताब्यात आला. हा दिवस औरंगजेबाला मोठा आनंदाचा तर दाराला तो मोठा दुःखाचा होता. चंपतने, आपण, काहीही झाले तरी औरंगजेबाला नदी पार करू देणार नाही असे दाराला वचन दिले होते. त्यामुळे दाराने वरील उतार अडवून धरला नव्हता. औरंगजेबाने तो उतार ताब्यात घेतला हे ऐकून तर दारा चंपतवर भयंकर रागावला. औरंगजेबाने नदीपार केली हे कळल्यावर दाराने स्वतः त्याचा पाठलाग करण्याचे ठरविले.

---

१. दातियाच्या राजाचा एक आश्रित भीमसेन याने आपल्या "नुस्खा-इ-दिलखुशा" (ब्रिटिश म्युझियम ओरिएंटल फो. २३, १५ ब) मध्ये ज्या पद्धतीने औरंगजेबाने धोलपुरच्या समोर तळ टाकला. दातियाचा ओरिएंटल फो. २३, १५ब) मध्ये ज्या पद्धतीने औरंगजेबाने आपली माहिती मिळविली यावर अधिक प्रकाश टाकला आहे. "चंबळला पोहचल्यावर औरंगजेबाने धोलपूरच्या समोर तळ टाकला. दातियाचा राजा शुभकरणसिंग बुंदेला हा दरोडेखोरी खेरीज काहीच शिकला नव्हता. त्याला औरंगजेबाने बक्षिसांची मोठी आशा दाखविली. अनेक वल्गनांनी त्याला वळविले. पंचहजारी केले. त्याने (शुभकरणने) बातमी दिली की, धोलपूर शहरावर मोठा पहारा आहे. गोरखता या ठिकाणापासून थोड्या अंतरावर उताराची जागा आहे. हे गोरखता ठिकाण येथून एक दिवसात पोहचता येईल. औरंगजेबाने रात्री कूच करण्याचा हुकूम केला. आणि दुसऱ्या दिवशी दुपारपर्यंत समुगडच्या रणांगणावर औरंगजेबाचे सैन्य हजर केले. चंबळमधील आपल्या तोफा दाराला हलविता आल्या नाहीत. उन्हाने व तहानेने त्याचे बरेच लोक मरण पावले. लढाईत शुभकरणसिंग जखमी झाला. औरंगजेबाने लढाईच्या जागी एक बाग बनविण्यास व सराई बांधण्यास सांगितले (फतेहबाद).

पण अलीमर्दानखानाचा मुलगा इब्राहिमखान[1] याने दाराला सल्ला दिला की, बारा हजाराचे घोडदळ, औरंगजेबावर हल्ला करण्यासाठी ताबडतोबीने पाठविण्यात यावे. कारण त्याचे सैन्य यावेळी थकलेले असून नदीच्या काठावर पांगलेले आहे. असेच करण्याचे दाराने ठरविले. पण राजद्रोही खलीलुल्लाखानाने सल्ला दिला की, असे करणे योग्य होणार नाही. विजय मिळाला तर त्याचे श्रेय तुम्हाला न मिळता तुमच्या सेनाधिकाऱ्यांना मिळेल. यामुळे तुमच्या लौकिकात काही भर पडणार नाही. तुम्ही या पोरासोराचे ऐकू नका. त्यांना युद्धाचा अनुभव नाही. आपल्या सैन्यातून बारा हजारांचे घोडदळ वेगळे करून पाठविणे योग्य होणार नाही. त्यामुळे आजच्या विजयाची खात्री पुढे राहीलच अशी शक्यता नाही. दुसऱ्या दिवशी आम्ही औरंगजेबाच्या पाठलागावर निघालो. परंतु तोपर्यंत वेळ निघून गेली होती. आदल्या-रात्री आणि दुसऱ्या दिवशीच्या पहाटेपर्यंत औरंगजेबाचे सगळे सैन्य त्याला येऊन मिळाले होते. आम्ही नदी काठ सोडून एका मोठ्या मैदानात येऊन दाखल झालो.

ती होती सोळाशे छपनच्या[2] जूनची पहिली तारीख. मैदानात ठिकठिकाणी पाणी साचून डबकी बनली होती. आम्ही त्या डबक्यातील पाण्याचा उपयोग केला. हवे-तील उष्णतेमुळे गुदमरल्या सारखे होत होते. दोन्ही सैन्यात २–३ मैलापेक्षा अधिक अंतर नव्हते. आम्ही जेव्हा आमच्या सैन्याचा तळ ठोकत होतो, तेव्हा औरंगजेबाचे सैन्य त्याला येऊन मिळत होते. परंतु त्याचे सर्व सामान व तोफा अजून येऊन पोह-चल्या नव्हत्या. औरंगजेबाच्या फौजेची सर्व सविस्तर माहिती मिळाल्यामुळे आणि त्याचे सैनिक थकले आहेत हे ठाऊक असल्यामुळे दाराची लढाईस सुरवात करण्याची इच्छा होती. पण मुहूर्त चांगला नाही, म्हणून थोडे थांबावे असे राजद्रोह्यांनी सांगि-तले. नाहीतरी तुमचा विजय निश्चितच आहे. तुमचे सैन्य उत्कृष्ट आहे. तुमचे सैनिक शूर आहेत, आणि संख्येने अधिक आहेत. तुमच्या समोर औरंगजेब म्हणजे काहीच नाही. असे सांगून त्या राजद्रोह्यांनी दाराला लढाईची वेळ पुढे ढकलण्यास लावली. औरंगजेब व त्यांचे लोक यांना विश्रांती मिळावी, आणि त्यांचा तोफखाना येऊन पोहोचावा हा त्यांचा हेतू होता. राजद्रोह्यांनी औरंगजेबाशी गुप्तपणे करार केला होता की तुमची लढाईची तयारी झाली की तुम्ही तोफेचे तीन बार काढून इशारा द्या; म्हणजे दाराला कैद करून तुमच्या हाती देण्याची व्यवस्था करतो.

जूनच्या दोन तारखेला (१६५८) दाराला शहाजहानकडून पत्र आले. दाराने आग्र्याला परत येऊन तेथे ठाण मांडून राहावे व सुलेमान शुकोची वाट पहात बसावे, असे त्या पत्रात लिहिले होते. याप्रमाणे काही करणे दाराला शक्य नव्हते. कारण

१. इब्राहिम खान हा अलीमर्दानखान अमीर-उल-उमराचा मुलगा. १६५८ ला तो सव्वीस वर्षांचा असावा. सफरच्या शेवटी अथवा रव्वी १ च्या सुमारास (११२२ हि. एप्रिल ३०, १७१०) काश्मीरचा सुभेदार असताना ८० व्या वर्षी तो मरण पावला.

२. नेहमी प्रमाणे हे वर्ष चुकीचे आहे. खरे वर्ष १६५८ हे आहे.

दाराने जर माघार घेतली असती तर शत्रुने आणखी जोराने पुढे चाल केली असती. आणि आमच्या सैनिकांना दारावरील विश्वासच उडाला असता. हल्ला करण्याची त्याला हिम्मतच नाही, असे सैन्याला वाटले असते. आणि त्यांतील बहुतेक निरुपाय म्हणून शत्रुला मिळाले असते.

आपल्या पित्याचा हा सल्ला मानण्याच्या प्रश्नच नव्हता. दाराने लढण्याचा निश्चय केला होता. पत्राचे उत्तर म्हणून त्याने पित्याला असे कळविले की, "आपण निश्चित राहा. तीन दिवसांत औरंगजेब व मुरादबक्ष यांना बंदिस्त करून तुमच्या समोर आणतो. मग आपण हवी ती शिक्षा करा." असे दाराने आपल्या बापाला कळविले. खरी गोष्ट अशी की दारा हा शनिवार ३ रोजी जून लढणार होता. त्या दिवशी आमच्या छावणीत पाऊस पडला. राजद्रोह्यांनी त्याला सांगितले की, लढण्यास ही वेळ योग्य नव्हे. पाहा, तुम्ही लढून पराजित व्हाल, या कल्पनेने आकाश सुद्धा अश्रु ढाळीत आहे. त्यापेक्षा दुसऱ्या दिवशी लढावे. मुहूर्त चांगला आहे. आपल्याला निश्चित विजय मिळेल. दाराने शनिवारी हल्ला केला असता तर त्याला खात्रीने जय मिळाला असता कारण औरंगजेबाची सैन्य रचना पूर्ण झाली नव्हती. आणि राजद्रोह्यांना त्याने ठरविलेला इशारा ही दिला नव्हता.

एकीकडे राजद्रोह्यांच्या सल्ल्यावर विश्वास, तर दुसरीकडे आपल्या शक्तीचा फाजिल अभिमान; ही दाराची वागणूक पाहून मला वाईट वाटले. पण इतक्या लहान वयात आपल्याला युद्धाचा अनुभव मिळतो या कल्पनेने मी स्वतःचे समाधान करून घेतले. एवढ्या मोठ्या सैन्याची नीट व्यवस्था करण्यास हवे ते प्रयत्न दारा करत नव्हता हे पाहून मी एकंदरीने अस्वस्थच होतो. दाराला युद्ध विषयक गोष्टींचा पुरेसा अनुभव नव्हता. दरबारातील नर्तकी, खुषमस्करे यांच्या संगतीत तो वाढला होता. राजद्रोह्यांच्या शब्दावर तो फाजील विश्वास टाकून होता.

तीन जूनच्या[१] (आलमगीरनामात लढाईची तारीख ८ जून आहे) मध्यरात्री ठरल्याप्रमाणे शत्रुने तोफेचे तीन बार काढले. आपली तयारी पूर्ण झाली असून सकाळी लढाई करणार आहोत, असा तो इशारा होता. आम्हीही तीन बार केले. एक तासानंतर दारा आपल्या तंबूतून बाहेर पडला. त्याला व त्याच्या काही घोडेस्वारांना मार्ग देण्याकरिता माझा (मनुचीचा) तंबू पाडणे आवश्यक झाले.

थोड्याच वेळाने मी माझ्या घोड्यावर स्वार झालो. आणि काय चालले आहे ते पाहण्याचे कुतुहल म्हणून पुढे निघालो. लढाई काय असते, ते पाहता येण्याची ही माझी (मनुचीची) पहिलीच वेळ होती. मी पुढे गेलो, आणि एका निर्जन खेड्याजवळील टेकडीवर जाऊन थांबलो. अद्याप अंधार होता. तरी पण अनेक घोडेस्वार

१. बर्नियरने केलेल्या समुगडच्या लढाईच्या वर्णना करिता कॉन्स्टेबल पाहा पा. ४९-५४ आलमगीरनामा पा. ९४ मध्ये लढाईची तारीख रमजान ७ (जून ८ न. प.) अशी दिली आहे.

आमचे सैन्य सोडून औरंगजेबाच्या सैन्याला मिळत होते, हे मी पाहिले. ते परत आले नाहीत.

उजाडताना औरंगजेबाच्या सैन्यातून निघालेले बरेच उंट समोर आले. त्यांच्यावर तोफगोळे होते. त्यांच्याबरोबर स्वार आणि बरेच पायदळ शिपाई होते. ते उंट खेड्यात थांबले, आणि परस्परापासून दूर-दूर अंतरावर उभे राहिले. फटफटीत उजाडल्यावर मला दिसले की, आपल्या सर्व सैन्यानिशी औरंगजेब धीमे धीमे पुढे चालून येत आहे. या सैन्याची विभागणी घोडदळाच्या पाच तुकड्यांनी झालेली होती.

पहिल्या तुकडीत मधोमध औरंगजेब एका मोठ्या हत्तीवर स्वार झाला होता. त्याच्याबरोबर पंधरा हजार घोडेस्वार होते. औरंगजेबाच्या उजव्या फळीला त्याचा मुलगा सुल्तान महमंद आणि त्याचा (औरंगजेबाचा) दूधभाऊ मीरबाबा हे होते. या प्रसंगी औरंगजेबाने मीरबाबाला बहादूरखान ही पदवी दिली[1] बहादूरखानच्या नेतृत्वाखाली पंधरा हजार स्वार होते. ही झाली दुसरी तुकडी. तिसरी तुकडी ही सुलतान महमदाच्या उजव्या बाजूस होती. त्या तुकडीतही पंधरा हजार स्वार असून त्यांचे नेतृत्व नजाबतखान[2] आणि इतर सरदार करीत होते. चौथी तुकडी ही पंधरा हजार स्वारांची होती. मुरादबक्ष या तुकडीत होता. तो एका मोठ्या हत्तीवर बसला होता. त्याच्याबरोबर त्याचा लहान मुलगाही[3] होता.

उरलेल्या सैन्याची पाचवी तुकडी बनविण्यात आली होती. तीत बीन लढाऊ माणसे आणि बुणगे हे होते. शिवाय सामान, गाड्या, उंट, व सुटे बैल ही होते. या तुकडीला मुरादबक्षच्या डाव्या बाजूस ठेवण्यात आले होते. तोफखाना हा सर्व तुकड्यांच्या मागे होता. हे सर्व सैन्य शांतपणे कूच करत येत होते. म्हणून मीही संथपणे मागे सरकू लागलो. शेवटी ते सैन्य वर सांगितलेल्या निर्जन खेड्या-जवळ येऊन पोहचले. यानंतर तोफखाना पुढे आणण्यात आला. तोफखान्याच्या मागे बंदूकच्यांची रांग होती. यांच्यामागे सुतरनाळे असलेले काही उंट होते. या सर्वांच्या मागे मी (मनुची) वर सांगितलेल्या घोडदळाच्या तुकड्या होत्या.

१. मीर मलीक हुसेन हा अबुल मीजाबनाफीचा मुलगा. त्याला बहादूरखान ही पदवी देण्यात आली. औरंगजेबाच्या सैन्याच्या उजव्या तुकडीचा हा सेनाधिकारी होता. पुढे याला खान जहान बहादूर कोकलताश करण्यात आले हा (१६९७-९८) ११०९ हि.त मरण पावला. (मा-सीर-उल-उमरा. ७९,८-९९).

२. नजाबतखान म्हणजे मागे उल्लेख केलेला मिर्झा शुजाच होय. हा बदकशानच्या राजाचा मुलगा. तो तैमूरलंगाचा वंशज होता. औरंगजेबाच्या कारकीर्दीत सातव्या वर्षापर्यंत तो हयात होता. (पाहा मी-सीरे-उल-उमरा-iii) (२१).

३. "त्याचा लहान मुलगा" लहान मुलांना लढाईवर नेण्याच्या या प्रथेची आणखी उदाहरणेही आहेत.

आमच्या सैन्यात माझी जागा घेण्यासाठी मी आमचे सैन्य येण्याची वाट पाहत होतो. पण सैन्याच्या हालचालीचे काहीच चिन्ह दिसेना. म्हणून मी जवळ गेलो. तेथे घोडेस्वार पांगलेले आहेत असे दिसले. आमच्या सैन्याची रचना कशी झाली आहे हे पाहण्यासाठी थांबलो. मी औरंगजेबाच्या सैन्याची रचना पाहण्यासाठी गेलो असतानाच दाराने आपल्या सैन्याची रचना पुढील प्रमाणे केल्याचे मला आढळून आले. सर्व तोफखाना एका रांगेत होता. प्रत्येक तोफगाडीवर दोन लाल निशाणे होती. या तोफांची एक भिंतच बनली होती. तिच्या मागे पंचवीस हजार बंदुकचे उभे होते. त्यांच्या जोडीला सुतरनाळे असलेले पाचशे उंट होते. त्यांच्या पाठीमागे चिलखती हत्ती होते. त्यांच्या मागे अठ्ठावीस हजारांचे घोडदळ उभे होते. सर्वांच्या शेवटी आपल्या प्रचंड हत्तीवर बसलेला दारा हा होता. त्याच्या पाठीमागे अनेक हत्ती चालले होते. त्यांच्यावर नगारे, तुताऱ्या व इतर वाद्ये होती. त्यातच त्याचा सरंजाम होता.

दाराच्या उजव्या फळीला पंधरा हजार रजपूत सैनिक असून त्यांचे नेतृत्व रामसिंग रोटेला (राठोड) करीत होता. त्याच्या उजवीकडे खलीलुल्लाखान हा आपल्या तीस हजार मोगल सैन्यासह होता. शत्रूच्या बुणगे असलेल्या फुटकळ तुकडीवर हल्ला करण्याचे काम त्याला देण्यात आले होते. दाराची डावी फळी रुस्तुमखान दख्खनीने पंधरा हजार घोडेस्वारानिशी संभाळली होती. त्याच्याही डावीकडे राजा छत्रसाल[१] हाडा हा आणखी पंधरा हजार घोडेस्वारांनिशी उभा होता. त्याच्या सैन्यातील बहुसंख्य सैनिक रजपूत होते.

दोन्हीकडून अजून तोफांचा मारा सुरू झाला नव्हता. मी उभा होतो ती जागा सुरक्षित होती. सकाळचे आठ वाजून गेले होते. आमच्या सैन्याला हुकूम आला की, आजुबाजूला पसरलेल्या घोडेस्वारांनी मागे जावे. कारण आता तोफांची सरबत्ती होणार होती. कित्येक घोडेस्वार मागे आले. तोफांचा मारा सारखा चालू ठेवा, असे सतत हुकूम सुटत होते. आमच्या सरबत्तीने शत्रूचे काहीच नुकसान झाले नाही. कारण औरंगजेबाचे सैन्य बरेच लांब होते. तोफगोळे त्यांच्या माणसापर्यंत पोहचतच नव्हते. या सरबत्तीचे मला आश्चर्य वाटले. आमच्या सरबत्तीच्या वेळी शत्रु आमच्यावर काही बाण फेकत होता.

औरंगजेबाने राजद्रोह्यांना इशारा म्हणून यापूर्वी तोफेचा बार काढला होता. आमच्या पहिल्या सरबत्तीनंतर त्याने आणखी एक बार काढला. आमच्याकडून

१. रुस्तुम खान दखीनी हा उत्तर इराणमधील फरकत वंशाचा होता. हा प्रथम निजामशाही बादशाहाच्या नोकरीला होता. पुढे तो शहाजहानच्या बाजूला येऊन मिळाला. समुगढ येथे सैन्याच्या उजव्या तुकडीचे अधिपत्य सिपहीर शुको याने केले होते. त्यात हा रुस्तुमखान होता. (मा. आसीर उल-उमरा २७०-२७६) मनुचीने यांच्या मृत्युचा उल्लेख थोडा पुढे केलेलाच आहे.

२. छत्रसाल हाडा (पाहा मा. आसीर उल-उमरा ii २६०) हाही मारला गेला.

अनेकसर वत्या झाल्यानंतर त्याने एकाच वेळी दोन तोफांचे गोळे सोडले. त्यानंतर आम्ही दहा वेळा गोळे सोडले. त्यानंतर औरंगजेबाने तीन तोफांचे बार एकदमच काढले. याद्वारे त्याने आमच्याकडील राजद्रोह्यांना इशारा दिला की, मी तयार आहे, तुम्ही दाराचे सैन्य पुढे आणा. हा इशारा मिळाल्यानंतर खलीलुल्लाखान दाराकडे आला आणि म्हणाला, "आपण आपल्या तोफखान्याने शत्रूचे बरेच सैन्य नष्ट केले आहे. आता थोड्या श्रमाने संपूर्ण विजय आपल्या हाती येईल. आता तोफांना भडिमार चालू ठेवण्याची आवश्यकता नाही. आपण आता पुढे कूच करून शत्रुवर तुटून पडले पाहिजे.

तोफांची सरबत्ती थांबवावी म्हणून हुकूम देण्यात आला. आणि रुस्तुमखानाचा सल्ला ऐकण्यासाठी त्याला बोलविण्यात आले. त्याने खलीलुल्लाखानाचे बोलणे ऐकून घेतले. आणि दाराला तो म्हणाला, "शत्रुलाच प्रथम हल्ला करू द्या. इतक्या लांब चालून आल्यानंतर हल्ला करणे हे त्याला भागच आहे. तो चालून आला की, आमची बाजू बळकट असल्यामुळे आपण त्याच्याशी निकराची झुंज देऊ शकू."

हा सल्ला अतिशय दूरदर्शीपणाचा होता. पण कावेबाज खलीलुल्लाखान दारास म्हणाला, "मोठे आश्चर्य आहे! आम्ही शत्रुचा जवळ जवळ नाशच केला आहे. असे असूनही आपण पुढे चाल करून जाण्यास भीत आहात. आम्ही असा भ्याड-पणा दाखवावा, रुस्तुमखानासारख्या सेनापतींने असा सल्ला द्यावा याला काय म्हणावे? दाराने दुसरा कोणताच विचार न ऐकता खलीलुल्लाखानाचा सल्ला मानला. त्याने आपला हत्ती चालविला. आणि आपल्या सैन्यानिशी शत्रुवर चाल केली. तुम्ही आपल्या तुकडीला जाऊन मिळाला. शौर्याची शर्थ करा. असे रुस्तुमखानाला सांगण्यात आले. सैन्याला पुढे चालून जाण्यास वाट मिळावी म्हणून तोफांच्या साखळ्या मोकळ्या करण्यात आल्या.

दाराला मूळच्या खाईत लोटण्याचा आपला हेतू सफल झाल्याबद्दल खलीलुल्लाखान खुश झाला. अर्ध्या वाटेवरून तो परत आपल्या तुकडीत गेला. शत्रु अजून काही अंतरावर दूर होता. दारा आपले सैन्य घेऊन शत्रुवर चालून गेला तेव्हा बुणग्यांच्या तुकडीत गोंधळ माजला. ते तोंड फिरवून जाऊ लागले. तोफखान्यावरील अधिकारी तोफा सोडून निघून गेले. पुष्कळांनी सामानाच्या गाड्यांची लूट केली. यात अनेक माणसे मारली गेली.

दारा पुढे चाल करून जात होता. सर्वांनी पुढे यावे व विजयात भाग घ्यावा म्हणून तो सारखे इशारे करीत होता. नगारे वाजविण्याची त्याने आज्ञा केली. दाराच्या धैर्याचे मला (मनुचीं) कौतुक वाटले पण शत्रू जागचा हलत नाही असे मला दिसून आले. दारा अगदी जवळ येऊन पोहोचल्यावर शत्रूने तोफा, बंदुका, सुतरनाळे यांचा एकदम मारा केला. त्यामुळे आमचे अनेक सैनिक घाबरले आणि

इकडे तिकडे पांगले. आपण धोक्यात आहोत याची दाराला जाणीव झाली. आपल्या तोफा पुढे आणाव्या आणि बंदुकच्यानी पुढे चाल करून यावे अशी त्याने आज्ञा केली. युरोपियन गोलंदाजानाही पुढे येण्याचा हुकूम देण्यात आला. पण वेळ निघून गेली होती. कारण सर्वत्र गोंधळ माजला होता.

शत्रूच्या तोफांच्या भडिमाराने रुस्तुमखान व राजा छत्रसाल यांचीही हानी झाली होती. तरीपण त्यांनी पुनः माणसे गोळा केली. आणि ते दाराजवळ येऊन पोहोचले. दारानेही असेच केले; आणि शत्रुवर तोफांचा इतका हल्ला चढविला की, शत्रूच्या तोफखान्यामधून घुसून त्याचे सैन्य शत्रूच्या छावणीपर्यंत पोहोचले आणि वाटेतल्या पायदळ सैन्य, ऊंट, इत्यादिंचा आणि इतरांचा त्यांनी धुव्वा उडविला.

दाराचे हे साहस पाहून औरंगजेबाने त्या ठिकाणी आपली मोठी तुकडी पाठविली. तिचे नेतृत्व औरंगजेबाचा शिक्षक शेखमीर[1] आणि इतर सरदार करीत होते. ती तुकडी अतिशय त्वरेने आली. तेथे अतिशय निकराची लढाई झाली. उभी दळे तलवारीने लढू लागली. दारा ठाण मांडून होता. तो हाताने व ओरडून इशारा करत होता. अतिशय निग्रहाने तो पुढे चाल करून जात होता. शेवटी त्याचा कणखर प्रतिकार सहन न झाल्यामुळे शत्रुला मागे हटावे लागले.

या लढाईत आणि मी पुढे हजर असलेल्या अनेक लढायांतून, मला एक गोष्ट जाणवली. अगदी समोरचे लोकच लढत. मागे असलेले सैनिक नागव्या तलवारी हातात घेऊन नुसते तोंडाने ओरडत असत. मोगल 'बकुश, (मारा, मारा अशा अर्थाचा फारशी शब्द) 'मार, मार, असे ओरडत. समोरचे सैनिक पुढे झाले की हे त्यांच्या मागे निघत. आणि ते मागे हटले की हे मागे पळू लागत. एकदा का ते पळू लागले की, कोणत्याही प्रकारे त्यांना आवरणे अशक्य होई.

दाराच्या पराक्रमाने शत्रूच्या सैन्यात गोंधळ माजला. औरंगजेब कचळून होता. तो कैद होण्याचा धोका निर्माण झाला. परंतु त्याची पर्वा न करता त्याने आपल्या उत्कृष्ट घोडदळाला दाराच्या प्रतिकारासाठी पुढे जाण्याची आज्ञा केली. जे थोडे लोक राहिले होते त्यांना धीर देण्याकरिता, त्यांच्यातील प्रमुख लोकांना नावाने हाक मारून तो ओरडून सांगत होता. "मर्दानी-दिलावर-ई-बहादूर! वक्त अस्त! (मर्द हो, वीरांनो, बहादरांनो! हीच वेळ आहे.) मग आकाशाकडे हात उचलून तो म्हणत होता. हे परमेश्वरा तुझ्यावर माझी श्रद्धा आहे. मी मरून जाईन पण माघार घेणार नाही." आपल्या निश्चयाची साक्ष म्हणून त्याने आपल्या शिरस्त्राणावर हात ठेवून आपल्या हत्तीच्या पायाला साखळदंड बांधून त्याला जखडून ठेवण्यास सांगितले आणि आजूबाजूच्या लोकांना उत्तेजन देण्याकरिता आपल्या हत्तीला थोडा अंकुश

१. शेख मीरखाफी हा जमादा ii १०६९ हि. (मार्च १२, १६५९ इ. प.) ला अजमीरच्या लढाईत मारला गेला (पाहा. बीलचे ओरिएंटल बायग्राफिकल ३७१).

लावला. सर्वांनी शपथा घेतल्या की, तुमच्या समोर जीवदान करू पण आम्ही एक पाऊलही मागे घेणार नाही.

आपली प्रगती चालू ठेवून, औरंगजेबाची गाठ घेऊन त्याच्यावर हल्ला करण्याचा दाराचा विचार होता. परंतु ऊंच-नीच, जमीनीच्या अडचणीमुळे व त्याला आलेल्या थकव्यामुळे तो थोडा वेळ थांबला. त्यामुळे जय दुरावला. कारण जर त्याने आपल्या मुळच्या प्रगतीचा वेग टिकवला असता आणि त्याच जोराने हल्लाही चालू ठेवला असता तर विजय त्याचाच होता. औरंगजेबाच्या भोवती थोडी माणसे होती. त्याच्याने प्रतिकार शक्य झाला नसता. इतक्या थोड्या माणसांनिशी शूर आणि आक्रमक शत्रूंना दडावणे त्याला शक्य झाले नसते.

परंतु औरंगजेबाचे नशीबच बळकट. यावेळी बातमी आली की, छत्रसालरायाच्या सैन्याचा नजाबतखानाने पाडाव करून त्याला ठार केले. त्यानंतर सुलतान मुहम्मद व बहादुरखान यांच्याबरोबर लढत असताना रुस्तुमखानही मरण पावला अशी बातमी दाराला मिळाली. त्याच्या तुकडीत गोंधळ निर्माण झाला. छत्रसाल काय आणि रुस्तुमखान काय, यांना त्यांच्या सैन्यातील राजद्रोह्यांनी मारले. कारण ते हत्तीवर असल्यामुळे त्यांना मारणे सोपे गेले. असे असूनही त्या उभय सरदारांची सैन्ये शौर्याने लढत होती. हे पाहून दारा त्यांच्या मदतीला धावला. एक शूर सेनापतीने जे जे करावयास हवे ते त्याने केले. त्याने सुलतान मुहम्मद खान याची दाणादाण उडवली. राजद्रोही खलीलुल्लाखानाने, दाराला यावेळी थोडी जरी मदत केली असती तर त्यादिवशी शत्रूचा निःपात झाला असता. शहाजहानला समाधान लाभले असते. दाराची कीर्ति वाढली असती. हिंदुस्तानला शांततेचा लाभ झाला असता; यात काही शंका नाही. कारण दाराचा दुसरा भाऊ शाहशुजा शूर असला तरी त्याच्यापाशी फारसे सैन्य नव्हते. आणि त्याला सारासार विचार शक्तीही नव्हती. त्याचा लवकर पाडाव करणे दाराला शक्य झाले असते.

पण शहाजहानची कामुकता व इतर पापे आणि अहंकार याबद्दल कडक शिक्षा देण्याचे परमेश्वरानेच ठरविले असावे. त्यावेळी आणखी एक भयंकर बातमी दाराला समजली. त्याचा सरदार रामसिंग राठोड हा मारला गेला. त्याची हकीकत अशी : रामसिंगाने मुरादबक्षवर अतिशय त्वेषाने हल्ला केला शत्रूच्या रांगेत तो घुसला त्याने त्याची आघाडीची पथके मोडून काढली. आणि शत्रूचा तोफखाना त्याने हस्तगत केला. मुरादबक्षच्या जवळ येऊन रामसिंग व त्याचे रजपूत यांनी त्याच्या हत्तीवर हल्ला चढवला. माहुताला ठार मारले. मुरादबक्षाच्या अंबारीत बाणांचा खच झाला मुरादबक्षाच्या तोंडावर तीन बाण लागले. मुरादबक्षचा लहान मुलगा बापाबरोबर होता. त्याला इजा होऊ नये म्हणून मुरादबक्षने त्याच्या अंगावर आपली ढाल ठेवली. पोराच्या डोक्याला लागू नये म्हणून आपला पाय ठेवला. मुरादबक्ष हा एकाच

वेळी हत्तीला चालवित होता. आपल्या मुलाची काळजी घेत होता. आणि शत्रूशी लढत होता.

मुरादबक्ष जितक्या शौर्याने लढला इतके औरंगजेबाच्या बाजूस कोणीच लढले नाही. त्याला ठार मारणे अशक्य आहे असे पाहून रामसिंग राठोड व त्याचे रजपूत घोड्यावरून खाली उतरले. आणि पिसाळल्याप्रमाणे हत्तीवर तुटून पडले. हत्तीचे दोर कापून टाकावे आणि मुरादबक्षला जमिनीवर पाडावा हा त्यांचा हेतु होता. त्याच वेळी मुरादबक्षने संधि साधून रामसिंगाला बाण मारून खाली पाडले. हत्तीने वळून रामसिंगाला आपल्या सोंडेत घेऊन पायाखाली चिरडून मारून टाकले. रामसिंग मेलेला पाहून त्याचे रजपूत अधिक त्वेषाने लढले.

ही बातमी लागताच दारा रजपूतांच्या मदतीस धावला. मुरादबक्ष मारला गेला की लढाई जिंकली, याची त्याला खात्री होती पण त्याचे दुष्ट ग्रह त्याच्या आड आले. नेमके याच वेळी विश्वासघाताचा न भुतो न भविष्यति असा प्रकार घडला. राजद्रोही खलीलुल्लाखान हा दारापाशी आला आणि म्हणाला "मी अनेक युद्धे पाहिली आहेत. आणि अनेक योध्यांचे पराक्रम पाहिले आहेत. पण युद्धाचा पहिलाच अनुभव असूनही, आपण गाजविलेले असे शौर्य हे माझ्या ऐकण्यातही नाही. आता औरंगजेबाला कैद करणे ही एकच गोष्ट शिल्लक राहिली आहे. आपण थकला आहात हे खरे. पण ही संधि आपण सोडू नये. तो पाहा औरंगजेब थोडी माणसे घेऊन उभा आहे. त्याला पकडणे अवघड नाही आपण चटकन तेथे जाऊ या. आपण हत्तीवरून खाली उतरावे, आणि घोड्यावर स्वार व्हावे. माझ्या आणि आपल्या घोडदळाच्या आघाडीवर आपण राहून त्याच्यावर चाल करून जाऊ. यासाठीच मी आपले घोडदळ शिल्लक ठेवले आहे."

बिचारा दारा! आपण काय करतो याचा त्याने पूर्ण विचार केला नाही. तो हत्तीवरून खाली उतरला. त्याचे हत्तीवरून खाली उतरणे म्हणजे विजय हातचा घालवण्यासारखे झाले. तो हत्तीवर दिसला नाही, हे पाहून सैनिकांची आणि अधिकाऱ्यांची समजूत झाली की तो मारला गेला असावा. यामुळे सैन्यात एकच गोंधळ उडाला.

मी चकीत झालो. माझ्या मनाचा गोंधळ झाला. काय करावे हे मला समजेना. सर्वत्र गोंधळ उडाला होता. दारा हत्तीवर दिसत नव्हता. औरंगजेब अद्याप दूर होता. तरी तो आपल्याला येऊन भिडला आहे, अशा समजुतीने सर्व सैन्य जीव घेऊन पळत सुटले. हा गोंधळ आणि सैन्याची पळापळ पाहून दारा काळजीत पडला. खलीलुल्लाखानाचे कारस्थान आणि स्वतः केलेली चूक याची त्याला जाणीव झाली. आपल्या चुकीचा त्याला पश्चाताप झाला. पण आता वेळ निघून गेली होती. अतिशय क्रोधाने खलीलुल्लाखानाचा तो शोध घेऊ लागला. "त्याला पकडून आणा. मी

त्याला ठार मारीन." असे तो म्हणू लागला. परंतु तो राजद्रोही तोपर्यंत दूर निघून गेला होता. दारा हत्तीवरून उतरून घोड्यावर स्वार होताच खलीलुल्लाखान हा आपल्या तुकडीला जाऊन मिळाला. औरंगजेबाला जाऊन मिळावे हा त्याचा हेतु होता. त्याच्या तुकडीतील पाच हजार स्वार त्याच्या बरोबर औरंगजेबाला जाऊन मिळाले. बाकी राहिलेले स्वार शहाजहानच्या पक्षाचे होते हे नेतृत्वाच्या अभावी आणि वरील कारस्थानामुळे अतिशय गोंधळून गेले.

लढाई तीन तास चालली होती. ती सकाळी नऊला सुरू झाली. दुपारी १२ च्या सुमारास पळापळ होऊ लागली. लढाईत बऱ्याच माणसांची, आणि त्याहूनही अधिक घोड्यांची व इतर जनावरे यांची हानी झाली. ते घोडे तयार नव्हते. युद्ध प्रसंगाची त्यांना सवय नव्हती. या उलट औरंगजेबाचे घोडे तयार होते. आणि त्यांना हाल-चालीची सवय झाली होती. कडक उन्हाळा, पाण्याचा अभाव, आणि मनस्वी धूळ ही या पराजयाची इतर कारणे म्हणता येतील. शस्त्रांच्या जखमांपेक्षा वरील कारणांनी अधिक माणसे मेली असावीत.

खलीलुल्लाखान हा औरंगजेबाला जाऊन मिळाला. जय हाती आलाच होता. म्हणून औरंगजेबाने त्याचे मोठ्या चतुरपणे स्वागत केले. तो आल्यावर औरंगजेबाने विजयाचे नगारे वाजविण्याची आज्ञा केली. मुरादबक्ष व त्याचे सैन्य औरंगजेबापाशी आले. औरंगजेब आणि मुरादबक्ष यांनी परस्परांचे अभिनंदन केले. तुमच्या शौर्या-मुळेच हा जय मिळाला, असे म्हणून औरंगजेबाने मुरादबक्षाची स्तुती केली. खली-लुल्लाखान हा बादशहा मुरादबक्ष यांचा एकनिष्ठ सेवक असून कोणत्याही अडचणीच्या प्रसंगी तो कामी येऊ शकेल असे औरंगजेब म्हणाला. मुरादबक्षाला तो आता बाद-शहा या पदवीनेच संबोधू लागला.

यानंतर शिस्तीने ते दाराच्या तळाकडे निघाले. तळावर काही घातपाताचा प्रकार नाही याची खात्री करून घेऊन औरंगजेब आणि मुरादबक्ष हे दाराच्या तंबूत शिरले तेथे औरंगजेबाने पुनः एकदा मुरादबक्षाला बादशहा म्हणून अत्यंत आदबीने वागविले. मुरादबक्षाला दाराच्या तंबूत सोडून ते सर्वजण बाहेर आले.

बहुतेक लोकांना औरंगजेबाच्या हेतुचा सुगावा लागला होता. आपल्याला राज्य नको, आपण फकीरी पत्करणार, असे वरवर म्हणत असताना, बादशाही मिळ-विण्याचा औरंगजेबाचा सतत प्रयत्न चालू होता. संधि येताच मुरादबक्षचा नाश होणार, हे निश्चित होते. औरंगजेबाने राज्यातील प्रत्येक सुभेदाराला पत्र पाठविले. औरंगजेब हा आपला मामा शाइस्ताखान याचा सल्ला घेत असे. शाइस्ताखान हा शहाजहानचा द्वेष करी. दाराबद्दल त्याला मुळीच प्रेम नव्हते. तो औरंगजेबाच्या मनाप्रमाणे वागत होता. शाइस्ताखान हा राज्यातील सर्वात मोठा अमीर होता. इतर अनेक सरदारांशी त्याचे नात्यागोत्याचे संबंध होते. "इतर अमीरांना माझ्या

बाजूने लिहा आणि दाराचा शक्य तितका सतत पाठलाग व्हावा, असे करा." असे त्याने शाइस्ताखानला सांगितले.

औरंगजेबाने राजा जयसिंग आणि दिलेरखान यांनाही पत्रे लिहिली. सुलतान सुलेमान शुको याच्या सैन्याचे नेतृत्व यांच्याकडे होते. औरंगजेबाने त्यांना पुढील अर्थाचे पत्र लिहिले "दाराला मदत करू नका. त्याला लढाईत अपयश आले तो गादीवर येण्याची आता आशा नाही. त्याचे सगळे सैन्य मला येऊन मिळाले आहे. दाराही पळत सुटला आहे. तो निसटून जाणे शक्य नाही. त्याला पकडण्याचे हुकूम सैन्याला सर्वत्र देण्यात आले आहेत. तो माझ्या हाती निश्चितच सापडेल. तुम्ही शहाजहानलाही विचारण्याची आवश्यकता नाही. तो अतिशय आजारी असून त्यातून ते वाचतील याची मुळीच शक्यता नाही. तुम्ही सारासार विचार करणारे आहात. तुम्ही काय करावे हे स्पष्टच आहे. तुमचा उत्कर्ष हवा असेल, तुम्हाला माझा स्नेह हवा असेल तर तुम्ही माझा सल्ला ऐका. आणि सुलेमान शुकोला कैद करून माझ्यासमोर हजर करा."

या पत्राने राजा जयसिंगाची मोठी कुचंबणा झाली. शाहाजहान व दारा यांचे जीवित सुरक्षित नाही, हे त्याला जाणवू लागले. राजपुत्राबर हात टाकावा हेही त्याला योग्य वाटले नाही. आज वा उद्या, बादशाहाकडून काय, दाराकडून काय, अथवा औरंगजेबाकडून काय, आपली मोठी दुर्दशा होणार असे त्याला वाटू लागले. मोगल घराण्यातील कोणाही राजपुत्रावर हात टाकणाराचा औरंगजेबाने पुढे निकालच लावला हे मी (मनुची) पाहिले आहे. त्याची हकीकत पुढे येईलच. सुलतान शुको हा शूर आहे, तो सहज आपल्या हाती पडणार नाही. वेळ पडल्यास तो लढता लढता मरून जाईल. याची पण जयसिंगाला जाणीव होती.

या परिस्थितीत काय करावे या संबंधी त्याने आपला परममित्र दिलेरखान याचा सल्ला घेतला. राजा जयसिंगाने सुलेमान शुकोची गाठ घेण्याचे ठरविले. सुलेमान शुको हाही जयसिंगाची वाट पाहत होता. दाराचा पराजय झाला हे त्याला कळले होते. भेटीच्या वेळी जयसिंगाने सगळी हकीकत सांगितली. त्याने औरंगजेबाकडून आलेले पत्र सुलेमान शुकोस दाखविले. दाराने जयसिंगाला गवय्या म्हटले होते, हे तो विसरला नव्हता. त्याबद्दलची सूडाची भावना त्याच्या मनात होती. पण औरंगजेबाचे पत्र सुलेमान शुकोला दाखविताना त्याने ही भावना लपवून ठेवली. तो सुलेमान शुकोला म्हणाला, "तुम्हाला फार धोका आहे. तुमच्या सैन्यातील बहुतेक अधिकारी हे राजद्रोही आहेत. त्यांच्यावर तुम्हाला विसंबून राहता येणार नाही. तुम्ही श्रीनगरच्या (गढवालच्या) डोंगराळ भागात ताबडतोब निघून जावे. ते स्थान सुरक्षित आहे. तेथील राजा तुम्हाला आपणहून आश्रय देईल. तेथे तुम्हाला औरंगजेबाची भीति राहणार नाही. आणि पुढे काय घडामोडी होतील यावर तुम्हाला लक्ष ठेवता येईल.

राजा जयसिंग काय किंवा त्याचा मित्र दिलेरखान काय यांच्यावर विसंबून राहता येणार नाही, हे सुलेमान शुकोला आढळून आले. या कठीण प्रसंगी काय करावे याबद्दल त्याने आपला अधिकारी दाऊदखान याचा सल्ला घेतला. दाऊदखान म्हणाला की, निरोप घेण्याच्या आणि महत्त्वाची बातमी सांगण्याच्या निमित्ताने तुम्ही साऱ्या अधिकाऱ्यांना बोलवावे. ते सगळे आले की त्यांची ताबडतोब कत्तल करावी. आणि त्यांची सैन्ये ताब्यात घ्यावीत. असे एकत्र झालेले सैन्य बरोबर घेऊन निर्धाराने औरंगजेबवर चाल करावी. दाराबद्दलचा सूड उगवावा. असे केल्यास औरंगजेबाला आपला हेतु अमलात आणणे इतक्या सहजपणे शक्य होणार नाही.

हा सल्ला पोक्त होता. पण तो पुरेसा गुप्त ठेवता आला नाही. सुलेमान शुकोचा वैद्य अर्मिनियन जातीचा सिकंदर बेग याच्याकडून ही बातमी जयसिंगाला कळली. जयसिंगानेच मला (मनुचीला) ही हकीकत सांगितली. सुलेमान शुकोने राजा जयसिंग आणि दिलेरखान यांना बोलावू पाठविले. पण त्यांना त्याच्या हेतुचा आधीच इशारा मिळाला होता. त्यांनी सुलेमान शुकोला सांगून पाठविले की, आम्ही दिलेल्या सल्ला पुरेसा आहे. तो जितक्या लवकर पाळाल तितके बरे. तुम्ही आमची वाट पाहू नका. आमच्या येण्याचा काहीही उपयोग होणार नाही.

सुलेमान शुकोला आता काहीही आशा राहिली नाही. आपल्याला कैद करण्यात येईल या भीतीने त्याने श्रीनगरच्या डोंगराळ भागाची वाट धरली. त्याच्या बरोबर फारच थोडी माणसे होती. मागे राहिलेले सैनिक व अधिकारी हे आपल्या घरोघर तरी निघून गेले किंवा जयसिंग व दिलेरखान यांना मिळाले. सुलेमान शुकोचा तळ लुटला गेला. वाटेतही त्याचे हाल झाले. श्रीनगरला पोहचला तेव्हा त्याच्या बरोबर त्याची कुटुंबांव आणि जेमतेम चाळीस माणसे होती. श्रीनगरच्या राजाने त्याला आश्रय दिला.

**दाराचा पराभव. तो दिल्लीची वाट धरतो तेथून लाहोरकडे जातो :** दुःखी दारा धावपळ करून रात्री नऊ वाजता आग्र्याच्या किल्ल्याजवळ येऊन पोहोचला. त्याला विश्रांतीची आवश्यकता होती. परंतु औरंगजेब किल्ल्यास वेढा देईल आणि आपणास कैद करील या भितीने त्याने किल्ल्यात प्रवेश केला नाही. त्याला आपल्या बापासमोर जाण्याची लाज वाटली. बादशहा स्वतः लढाईत हजर राहू इच्छित होता. आपण त्याला विरोध केला. या गोष्टीचे दाराला फार दुःख झाले. तो इतका गोंधळून गेला होता की, आपण काय करतो, काय बोलतो याचे आपणास भान कसे राहिले नाही, इतकी कशी आपली बुद्धी फिरली, या विचाराने तो कष्टी झाला.

"तुमची भाकिते खरी ठरली आहेत" असे दाराने शहाजहान बादशहा व बेगम साहेब यांना कळविले. हे ऐकून त्यांना फार वाईट वाटले. मागील सर्व गोष्टी विसरून वृद्ध बादशहाने दाराचे सांत्वन करण्याकरिता एका विश्वासू खोजाला त्याच्याकडे

पाठविले. दारास कळविले, "माझे तुझ्यावर पूर्वीइतकेच प्रेम आहे. तुझ्यावर ओढवलेल्या आपत्तीने मला अतिशय दुःख झाले. पण तुला निराश होण्याचे कारण नाही. सुलेमान शुकोचे सैन्य अद्याप शाबूत आहे. मोठी फौज घेऊन औरंगजेबावर परत हल्ला कर व त्यांची दाणादाण उडवून त्यांचा सूड घे." बादशहाने दाराकडे पुष्कळ पैसा पाठविला. त्याने दाराला तबेल्यातील घोडे व हत्ती घेऊन दिल्लीची वाट धरावी असे सांगितले आणि दिल्लीच्या सुभेदाराला पुढीलप्रमाणे हुकूम पाठविला. "दिल्लीची दारे खुली करा व सर्व मालमत्ता दाराच्या हवाली करा. दाराच्या ठिकाणी मीच आहे असे समजून त्याचा सत्कार करा." दाराला दिल्लीतच राहण्याचा सल्ला दिला. "औरंगजेबाला पकडून जे काही करता येईल ते करीन. आणि तुम्हाला वडामोडी कळवित जाईन." असे शहाजहानने दाराला कळविले. परंतु तो इतका दुःखात होता की, त्याच्या तोंडातून नीट शब्दही बाहेर पडत नव्हता.

दाराची बहिण बेगम साहेब हिने आपल्या विश्वासू खोजाकरवी दाराकडे काही मूल्यवान रत्ने पाठविली. तिने त्याचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. यानंतर दारा आपल्या वाड्यात गेला. बरोबर नेता येतील अशी मूल्यवान रत्ने त्याने बरोबर घेतली. मध्यरात्री तो आग्रा सोडून निघाला. त्याच्या बरोबर त्याच्या तीन बायका, मुलगी जानी बेगम, धाकटा मुलगा सिफहीर शुको आणि काही निवडक दासी होत्या. दाराने दिल्लीची वाट धरली, त्यावेळी त्याच्याबरोबर ५०० सैनिक होते. ही त्याची दुर्दशा पाहून दुःख होत होते.

दिल्ली शहरी पोहचल्यावर त्याने आपल्या पित्याची आज्ञापत्रे सुभेदाराकडे पाठविली. किल्ला आपल्या ताब्यात देण्याबद्दल त्यास कळविले. पण औरंगजेबाच्या पत्रांनी सुभेदाराचे मन आधीच वळविले गेले होते. त्याचा औरंगजेबाकडे ओढा होता. त्याने शहाजहानच्या हुकुमाची अंमलबजावणी करण्याचे नाकारले. त्यामुळे दुर्दैवी दाराला बादशहाच्या तबेल्यातील मिळतील तेवढे घोडे घेऊन आपला प्रवास पुढे चालू ठेवावा लागला. त्याने लाहोरचा मार्ग धरला.

आमचा पराभव झालेला पाहून मी घाईने आग्र्याला निघालो. मी रात्री दहा वाजता आग्र्याला पोहोचलो. अँटोनिओ डी ॲझवेडो या पोर्तुगिजाने लढाईनंतरची लुटालूट पाहिली होती. तो आग्र्याला आल्यावर दाराच्या पराभवाची बातमी पसरली. सर्वत्र गोंधळ माजला. दारा आल्यावर तो अधिकच वाढला. दारा दिल्लीकडे चालला आहे हे कळल्यावरून मी त्याला जाऊन मिळण्याचे ठरविले. पण माझा घोडा फार थकला होता. चोवीस तास विश्रांती घेऊन आपण दाराच्या मागे जावे असे मी ठरविले.

औरंगजेबाने आपले पुढील बेत तडफेने अमलात आणले. बहादूरखानाला पुढे पाठवून त्याने आग्र्याचे रस्ते रोखून धरले. दाराला कोणी जाऊन मिळू नये हा

त्याचा हेतु होता. आग्र्याहून जे बाहेर पडले ते दाराकडे निसटून जाऊ शकले. त्यात बरेच युरोपियन होते. इतर मात्र लुटले गेले, आणि त्यांना आग्र्यास परतावे लागले. मला हे माहित नसल्यामुळे मी (मनुची) बाहेर पडलो. माझ्याबरोबर माझा घोडा सामान लादलेला उंट व काही नोकर होते. पण बहादूरखानाच्या अधिकाऱ्यांच्यामुळे मला आग्र्याला परत यावे लागले. मी तसाच पुढे गेलो असतो तर मी लुटलो गेलो असतो. ज्या अधिकाऱ्याने मला काही त्रास न देता घरी परत आणले त्याने मला घर सोडून बाहेर न जाण्याचा सल्ला दिला.

औरंगजेबाला जय मिळालेला असून जुनी राजवट बदलली होती. मी आग्र्यातच राहिलो. औरंगजेबाच्या हालचाली पहात होतो. औरंगजेबाने आपला हुशार आणि विश्वासु खोजा फाहिम याच्याबरोबर शहाजहानकडे पुढीलप्रमाणे प्रेमाचे व शरमिंदे-पणाचे पत्र लिहिले. त्यात म्हटले होते "जे काही घडले याचे मला वाईट वाटते. दाराची महत्त्वाकांक्षा आणि त्याचा दुष्ट विचार यामुळे मला या थराला गोष्टी आणाव्या लागल्या. या घटनेबद्दल मला दुःख होत आहे. आपली प्रकृती चांगली झाली हे ऐकून मला अतिशय आनंद वाटतो. आता मी येथे आलो असून आपण कराल ती आज्ञा पाळण्यास तयार आहे."

फाहिमने मुजरे, गोड व नम्र भाषणे याबाबतीत दरबारात गेल्यावर यत्किंचितही उणीव पडू दिली नाही. औरंगजेबाला अपेक्षित असलेला सलोखा व त्याचे सद्हेतू यावर त्याने भर दिला. शहाजहानला आपली गादी टिकवायची होती. त्याला औरंगजेबाचा स्वभाव आणि अतस्थ कुटिलपणा याची माहिती होती. आपल्यावर ओढवलेल्या दुर्दशेतून काय मार्ग काढावा याचा तो विचार करू लागला. आपण किल्ल्याच्या बाहेर यावे आणि आपले अधिकारी आपल्याला साह्य करतील किंवा कसे हे पहावे असे त्याला प्रथम वाटले. वेळ निघून गेली होती. ते सर्व औरंगजेबाला जाऊन मिळाले होते. शहरातील रहिवाश्यांनी सहाय्य केले असते तरी त्याला काही करता आले नसते. म्हणून शहाजहानने औरंगजेबाशी मुत्सद्दिगिरीने वागण्याचे ठरविले.

त्याने आपला खोजा अलमास याच्याबरोबर औरंगजेबास पुढीलप्रमाणे निरोप पाठ-विला, "दारा किती नालायक आणि दुष्ट आहे हे मला पुरते ठाऊक आहे. तुम्ही आलात याचा मला आनंद झाला. तुमच्यावरील माझ्या प्रेमामुळे मी तुम्हाला दक्षिणचा विशाल सुभा बहाल करीत आहे. तुमच्याशी स्वतः बोलावे, आणि राज्या-तील गोंधळ दूर कशी करता येईल याबद्दल चर्चा करावी अशी माझी फार इच्छा आहे. म्हणून मी तुझ्या भेटीची आतुरतेने वाट पहात आहे." या पाठिमागे औरंगजेबाला किल्ल्यात ओढण्याचा शहाजहानचा बेत होता. तो जर गेला असता, तर शहाजहानने त्याचा खून केला असता, यात काही संशय नाही.

**शहाजहान राहत असलेल्या आग्रा किल्ल्याला वेढा :** पण शहाजहानच्या शब्दावर विश्वास ठेवू नये हे धूर्तपणाचा अर्क असलेल्या औरंगजेबाने ओळखले. बेगम साहेबाचा दाराकडे अतिशय ओढा होता. ती शहाजहानबरोबर असे. दाराच्या बाजूने आणि आपल्याविरुद्ध ती हरप्रकारे प्रयत्न करीत राहील, हे त्याला पक्के ठाऊक होते. शहाजहानच्या शब्दाकडे लक्ष देण्याची जरूरी नव्हती. उशीर न करता राज्यावर ताबा मिळविणे हेच त्याला करायचे होते. आपला जीव धोक्यात घालण्याचे त्याने नाकारले.

असे असूनही आपण शहाजहानला भेटण्यास जात आहोत, अशा अफवा तो रोज पसरवीत होता. आणि या ना त्या कारणाने तो भेटण्याचे टाळीत होता. त्या अवधीत त्याने गोड बोलून दरबारातील मोठे सरदार आपणाकडे वळविण्याचे काम चालूच ठेवले होते. त्याने सर्व तयारी पूर्ण केली. तो शहाजहानला भेटण्यास जाईल, अशी सर्वांची अपेक्षा होती. त्याचवेळी औरंगजेबाने, आपला मुलगा सुलतान मुहम्मद याला शहर कोतवालीचा ताबा घेण्यास सांगितले. या निमित्ताने, सुल्तान मुहम्मदाने किल्ल्याला वेढा देऊन, लोकांचे आत येणे जाणे बंद करायचे असे ठरविले. सुलतान मुहंमदाने आपल्या बापाची आज्ञा तंतोतंत पाळली.

किल्ल्याला वेढा बसला असून, औरंगजेबाचे सैनिक किल्ल्याच्या समोर ताजमहाल जवळ उभे राहिले आहेत, हे शहाजहानने पाहिले. या विश्वासघाताने तो थक्क झाला. त्याच्या राजवाड्यात असलेल्या सर्व प्रकारच्या स्त्रियांची संख्या दोन हजार होती. बादशहाच्यासाठी वेळ पडल्यास प्राण देण्याचे त्यानी ठरविले. हे पाहून औरंगजेबाने फार ताणून धरले नाही. न जाणो काही दुर्घटना व्हावयाची. त्याने शहाजहानला पुढीलप्रमाणे निरोप पाठविला, "आपण अंतःपुरात सुखाने रहावे. आपल्याच्याने यापुढे राज्यकारभार होणे शक्य नाही. आता निश्चितपणे अंतः पुरात विलास करावेत. साम्राज्याचा सगळा भार आता मी आपल्या शिरावर घेत आहे. औरंगजेबाने ही योजना जेव्हा अमलात आणली तेव्हा शहाजहान एकसष्ट वर्षांचा होता. आणि त्याने बत्तीस वर्षे व तीन महिने राज्य केले होते[1].

यातून आपली सुटका होणे शक्य नाही हे पाहून शहाजहानने एक नवीन बेत आखला. तो सफल झाला असता तर औरंगजेबाचा निकाल लागला असता. गरज ही मोठी मार्मिक सल्लागार आहे. त्याची शकल अशी होती की, सुल्तान मुहम्मदला आपणाकडे येण्याबद्दल आमंत्रण द्यावयाचे. तु इतका कर्तृत्ववान आहेस असे

१. शहाजहानचा जन्म १ रबी ॥ १००० हि. (जाने. १६, १५९२ न. प.) ला झाला. तो आपल्या बापाच्या गादीवर आला. फे. १४, १६२८ (न.प.) त्याला १७ रमझानला १०६८ हि. (१८ जून १६५८ न.प.) पदच्युत केले. त्यावेळी तो (६८॥) साडे अडुसष्ट चांद्र वर्षांचा व साडेसहासष्ट सौरवर्षांचा होता. आणि त्याने एकतीस वर्षे, तीन महिने आणि नऊ दिवस (अथवा तीस वर्षे चार महिने आणि चार दिवस) (पदच्युत झाला त्यावेळी) राज्य केले होते.

दिसल्यावरून मी तुलाच बादशहा करावयाचे ठरविले आहे, ही सबब सांगायची. राजपुत्र या आमिषाला बळी पडून राजवाड्यात आल्याखेरीज राहणार नाही, अशी त्याची संधि तो गमावणार नाही. आपल्या आजोबाच्या हातून तख्त मिळण्याची व तरीच त्याच्या जोडीला अन्याय व छळ झालेल्या एका माणसाला मुक्त केल्याबद्दल परमेश्वराला व सर्व जगाला संतुष्ट करणारी गोष्ट केल्याचे श्रेय मिळविण्याची ही संधि होती. परंतु सुलतान मुहम्मद हा व्यवहार चतुर होता. तो आपल्या आजोबाच्या वरील शब्दांना भुलला नाही. आपले अधिकारी आणि शहरातील बहुसंख्य लोक यांचा कल औरंगजेबाकडे आहे, आणि त्यांनीच औरंगजेबाला बोलाविले होते, याची त्याला खात्री होती. शहाजहानच्या सांगण्याप्रमाणे आपण वागलो तर त्याच्या सारखीच आपली गत होईल हे तो ओळखून होता. म्हणून त्याने ही सूचना ऐकण्याचे मान्य केले नाही. व राजवाड्यात पायही टाकला नाही. "तुम्हाला भेटावे असा काहीही हुकूम मला माझ्या बापाकडून मिळालेला नाही." असे कडक पत्र त्याने शहाजहानला पाठविले. वरील उत्तराने शहाजहान गडबडला नाही. "तुम्ही निःशंकपणे व मोकळेपणाने राजवाड्यात यावे, तुम्हाला भेटण्याची मला फार इच्छा आहे. तुम्ही भेटलात की हा किल्लाच काय, सगळे साम्राज्यच तुम्हाला देऊन टाकीन." असे त्याने सुलतान मुहम्मदला कळविले. राजपुत्र मुल्तान मुहम्मदाने काही ऐकले नाही. तुमचे शब्द पोकळ आहेत. मला तुमच्याशी बोलण्यास वेळ नाही. तुम्ही किल्ल्या आधी पाठवून द्या. नाहीतर तुमची अधिक दुर्दशा होईल." असे त्याने शहाजहानला कळविले. त्याचा निर्धार पाहून शहाजहानने त्याच्याकडे किल्ल्या पाठविण्याचे ठरविले. कारण सुलतान मुहम्मद व त्याच्या हाताखालील लोक हे अधिक कडकपणे वागू लागले होते. राजवाड्यातील रसद त्यांनी तोडली. किल्ल्यातील लोकांचे अन्नपाण्याच्या अभावी हाल होऊ लागले. हळू हळू शहाजहानची दिवाणीखासची जागा सोडून द्यावी लागली.

औरंगजेब आग्र्याला शाइस्ताखान, मीर जुमलाचा मुलगा मुहम्मद अमीनखान आणि इतर अनेक सरदार त्याला भेटण्यास गेले. त्याने मिळविलेल्या यशाबद्दल त्यांनी औरंगजेबाचे अभिनंदन केले. फक्त दोनच सरदार दानिशमन्द खान[1] व मुकर्रम खान (तकर्रबखान) हे तटस्थ राहिले.

१. दानिशमंदखान हा वैद्यकीय व्यवसाय करण्याकरिता हिंदुस्थानात आला होता. शहाजहानच्या कारकीर्दीच्या २४ या वर्षी त्याला बादशहाच्या नोकरीत घेण्यात आले. तो १० रबी ।। १०८१ हि. (जुलै ८, १६७०) ला मरण पावला. हा बर्नियरचा आश्रयदाता होता. "मुकर्रम" च्या ऐवजी तकर्रबखान (हकीम दाऊद) असे वाचावे. हा शहाजहानचा आग्र्याला हकीम होता. (१०७३ हि. मरण पावला.) ऑगस्ट १५, १६६२ पासून शहाजहानकडे होता. औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या पहिल्याच वर्षी याने राजिनामा दिला.

बिचाऱ्या शहाजहानजवळ किल्ल्यात फक्त असदखान हा होता. राजवाड्यातून निघून शहाजहानने किल्ल्यात फेरी मारली. जे सैनिक राहिले होते त्यांना शस्त्रास्त्रे पुरविण्याचा व तोफखान्याला तयारी करण्याचा हुकूम केला. औरंगजेबाचे लोक जवळ येत आहे असे दिसताच त्यांच्यावर तोफांचा मारा करावा असा त्याने हुकूम केला. औरंगजेबाची गाठ पडेल याची त्याला आशा राहिली नव्हती. किल्ल्यावरून होणाऱ्या गोळीबाराकडे औरंगजेबाने लक्ष दिले नाही. किल्ल्याच्या भोवती घरांच्या रांगा होत्या. त्यांच्या आडोशाने औरंगजेबाने आपले सैन्य उभे केले. पिंजऱ्यात सापडावे त्याप्रमाणे जरी शहाजहानची गत झाली होती, तरी किल्ल्याला वेढा देणारे सैन्य जवळ येऊ नये म्हणून तोफांचा, बंदुकांचा मारा करण्याचे त्याने कमी केले नाही. परंतु घरांच्या आडोशामुळे त्यांना पुरता आसरा मिळाला होता. शत्रूचे काही नुकसान झाले नाही. त्यांना उलट मारा करण्याचे कारण पडले नाही. तीन दिवस आणि तीन रात्री किल्ल्यावरून तोफा, बंदुकांचा मारा चालू होता. त्यानंतर किल्ल्यातील तोफखान्यावरील अधिकारी पळून जाऊन औरंगजेबाला मिळू लागले. तोफखान्यावरील मुख्य होता एक इंग्रज मनुष्य, त्याचे नाव होते रुबेन स्मिथ. तो आणि त्याची माणसे हे सर्व दोरांच्या साह्याने खाली उतरले. औरंगजेबाने किल्ल्यात एक बाण सोडून त्याच्याशी संपर्क साधला होता. त्यांना लाच देऊ केली होती. किल्ल्यातील सैनिकांनी जेव्हा पाहिले की गोलंदाज अधिकारी निघून जात आहेत, तेव्हा त्यांचा धीर सुटला व तेही पळून जाण्याचा बेत करू लागले.

ह्याच सुमारास औरंगजेबाने शहाजहानला एक विनंती पत्र पाठविले. येऊन भेटण्यास उशीर झाला याच्या त्याने अनेक सबबी सांगितल्या. आपण आजारी होतो, त्यामुळे येऊ शकलो नाही. आणि याच अवधीत माझ्या अस्वस्थ झालेल्या सैनिकांनी चाल केली. आता माझ्या मुलाला, सुल्तान मुहम्मदला आपणाकडे पाठवितो आणि मला बरे वाटल्यानंतर, मी पण लगेच येईन, असे त्याने कळविले.

वरील गोष्ट शहाजहानने मान्य केली. कारण अजूनही आपला बेत पार पाडता येईल ही त्याला आशा वाटत होती. या हेतूने सुलतान मुहम्मदला भेट म्हणून देण्याकरिता त्याने अनेक भुंर्चा कपडे तयार ठेवली. त्याचे तो थाटाने स्वागत करणार होता. या उपायांनी आपण औरंगजेबाला आपल्या जवळ ओढू शकू का, हे त्याला पाहायचे होते. परंतु त्या मोठ्या कारस्थानी माणसाच्या भावना फार वेगळ्या होत्या. मुल्तान मुहम्मदला त्याने (औरंगजेबाने) पुढील प्रमाणे हुकूम केला. "किल्ल्याच्या प्रवेश दारापाशी पोहोचताच तुम्ही ताबडतोब आत घुसावे आणि दरवाज्याचा ताबा घ्यावा. मग आपल्या सर्व माणसांना आत घ्यावे. कोणी प्रतिकार करील तर त्याला ठार मारावे."

आपली अशी परिस्थिती पाहून शहाजहानने किल्ल्या पाठवून दिल्या. सुलतान मुहम्मद आणि त्याची माणसे अंतःपुराकडे येऊ लागली तर त्यांचा प्रतिकार करत

आपण, वाड्यातील बायका, खोजे, आणि असदखान यांनी प्रतिकार करून मरून जावे असे शहाजहानने ठरविले. असदखानाने अंतःपुराचा दरवाजा रोखून धरला. "एका महत्त्वाच्या गोष्टी बद्दल तुमचा सल्ला घ्यावयाचा आहे, तर तुम्ही तावडतोब भेटण्यास यावे" असा किल्ल्या पाठविल्यावर शहाजहानने औरंगजेबाला निरोप पाठविला. अशाने औरंगजेब अंतःपुरात येईल, मग त्याला ठार मारता येईल असे त्याला वाटले. परंतु बुद्धिमान औरंगजेबाला वरील निरोपाने हसू आले. त्याने आपला विश्वासु खोजा इतिबारखान याला शहाजहानकडे पाठविले. "औरंगजेबाची रोहनआरा ही लाडकी बहिण होती. तिला औरंगजेबाकडे पाठविण्यात आले. या खोजाने शहाजहान, बेगम साहेब व इतर स्त्रिया या अंतःपुरातून बाहेर पडणार नाहीत याची पक्की व्यवस्था केली. इतिबारखानाने किल्ल्यावर ठिकठिकाणी लहान दरवाजे व खिडक्या बसवून घेतल्या. आणि त्यावर कडक स्त्री पहारेकरी नेमले. परक्या माणसांशी बोलणे, लिहिणे वगैरे गोष्टी शहाजहानला अशक्य झाल्या. इतकेच काय पण अंतःपुरातून बाहेर येऊन खोजाच्या परवानगीशिवाय बागेत सहल करणेही त्याला शक्य होईना. इतके करूनही औरंगजेब थांबला नाही.

लोकांनी शहाजहानकडे पाठ फिरवावी, आणि आपले कृत्य समर्थनीय ठरावे म्हणून औरंगजेबाने शहाजहानाच्या सहीचे एक बनावट पत्र तयार करण्याचे ठरविले. हे बनावट पत्र दाराला लिहिले होते. आणि त्यात पुढील मजकूर होता. "तुम्ही आग्र्याहून फार लांब जाऊ नये. तुमचे भाऊ, म्हणजे नीच राक्षस आहेत. त्यांचा बाप होण्याचे दुर्भाग्य माझ्या वाट्याला आले आहे, माझ्या हातूनच त्यांचा वध होण्याची वेळ आली आहे. औरंगजेब आणि मुरादबक्ष हे लवकरच मला भेटण्यास येतील."

औरंगजेब दरबारात असताना हे पत्र आणले. तेव्हा शाइस्ताखानाने ते फोडले. पत्रातील मजकूर ऐकून औरंगजेबाचा चेहरा पांढरा फटफटीत पडला. तो हातपाय आपटू लागला. काही तरी भयंकर बातमी आपणास कळली असा त्याने देखावा केला. अर्थात हे सर्व सोंग होते. ते पत्र मोठ्याने वाचले जावे, आणि ज्याला हवे असेल त्याने ते वाचावे अशी त्याने सूचना केली. असे पाहून प्रत्येक जण घाबरला. औरंगजेब म्हणाला "मी बापाला जाऊन भेटतो." अर्थात हेही ढोंगच होते. सहाजिकच तुम्ही हा धोका पत्करू नये अशी सर्व जण त्याला गळ घालू लागले. औरंगजेबाने धूर्तपणाने सर्वांची मते घेतली. सर्वांनी त्याचे जाणे योग्य होणार नाही. इतकेच नव्हे तर आम्ही तुम्हाला जाऊ देणार नाही, असे त्याला सांगितले.

या उत्तराने औरंगजेबाला आतून आनंद झाला. पण वरकरणी आपल्याला फार दुःख झाले आहे असे त्याने दाखविले. त्याने आपल्या बापाला पत्र लिहून सर्वांना ऐकविले. पत्रातील मुख्य मजकूर पुढील प्रमाणे होता, "आपल्या पत्रात आपण

माझ्याबद्दल प्रेम व्यक्त केले आहे, आणि दाराबद्दल नाराजी दाखविली आहे, तरी-पण आपण निरोपाच्या वेळी दाराकडे खेचरे भरभरून सोन्याची नाणी पाठविलीत. त्याने नवीन सैन्य उभे करून माझ्या विरुद्ध उभे रहावे हाच त्यात हेतु असला पाहिजे. असे असूनही या सर्व अनर्थाचे मूळ जो दारा त्याला पकडल्याशिवाय मी गप्प बस-णार नाही. तो एकदा हाती आला की मी त्याच दिवशी आपल्या भेटीला येईन. आपण माझ्यावरचा राग चालू ठेऊ नये. मला क्षमा करावी. दाराचा एकदा पाडाव झाला की मी स्वतः अंतःपुराचे दरवाजे उघडून आपल्या हाती सत्ता देईन" लोकांचे समाधान व्हावे व आपल्या कृत्याकडे त्यांनी काना डोळा करावा या हेतुनेच औरंग-जेब अशा अफवा पसरवी. सर्व दोष दारा व शहाजहान यांचे असून आपल्याला जे काही करावे लागले ते समर्थनीय होय, असे तो दाखवू इच्छित होता.

**बादशहा शहाजहानचा बंदिवास :** दरबारातील सर्व सरदार आता औरंगजेबाच्या ताब्यात आले होते. शहाजहान आपल्या वाड्यात बंदिस्त झाला होता. औरंगजेबाने आपला मामा शाइस्ताखान याची आग्र्याचा सुभेदार म्हणून नेमणूक केली. खजिन्यात असलेला पैसा काढून घेऊन तो व मुराद हे दाराच्या पाठलागावर निघाले. सुलेमान शुकोकडून मदत मिळण्याची आशा नष्ट झालेली पाहून दारा हा लाहोरमध्ये नव्याने फौजेच्या तयारीस लागला होता.

जूनच्या सुरुवातीला ज्या दिवशी या दोन फौजांनी आग्रा शहर सोडले, त्यावेळी फकीराचा वेष घेऊन मी त्यांच्यात जाऊन मिसळलो. दाराला जाऊन मिळावे हा माझा हेतु होता. "औरंगजेबाला दाराचा पाठलाग करू द्या. तुम्ही आपल्या सैन्यानिशी दिल्ली आणि आग्रा या शहरांना वेढे घाला" असा खोजा शहाबाझ आणि इतर मित्र यांनी मुरादबक्षला सल्ला दिला. परंतु औरंगजेबाचा कावा न समजून त्याने कुराणावर घेतलेल्या शपथांवर विश्वास ठेवून बसला. त्याने आपल्या एकनिष्ठ सेवकांच्या सल्ल्या-कडे दुर्लक्ष केले.

**औरंगजेब व मुरादबक्ष दिल्लीकडे कूच करतात :** दोन्ही फौजांनी दिल्लीचा रस्ता धरला त्या आपापसात एक मैलाच्या अंतराने जात होत्या. यमुना नदीच्या काठाने जात जात शेवटी ते मथुरा या हिंदुंच्या प्राचीन शहरी आले. हे गाव आग्र्यापासून १८ लीग (सुमारे ३८ मैलांवर) अंतरावर आहे. येथे एक भव्य मंदिर आहे. सैन्याचे हे कूच चालले होते, तेव्हा दाराचे बरेच सैनिक व सेनाधिकारी त्यांना येऊन मिळत होते. हे मुरादबक्षकडे नोकरीस राहिले. त्याने त्यांना मोठ्या पगारावर घेतले. सुलेमान शुकोची नोकरी सोडून दिलेरखान आला, व औरंगजेबाला भेटला. त्याने त्याचा सत्कार करून त्याला अनेक भेटी दिल्या. त्याचा पगार वाढविला. जयसिंग आपल्या स्वतःच्या राज्यात निघून गेला होता.

वाटेने मुरादबक्षला आदबीने वागविण्याचे ढोंग करण्यात औरंगजेबाने काही उणीव राहू दिली नाही. दिवसातून अनेक वेळा माणसाच्या बरोबर तो मुरादबक्षला भरपूर फळे, फुले पाठवीत होता. दरवेळी त्याला तो हेच सुचवित असे की, तू आता तयारीत राहा. लवकरच मी तुला बादशहाच्या तख्तावर (गादीवर) बसवणार आहे. यासाठी त्याने नवीन तंबू, वस्त्रे, अलंकार, झुली घातलेले हत्ती, घोडे इत्यादी सरंजाम तयार करण्याचा हुकूम दिला. मुदपाकखान्यात उंची प्रकारचे अन्न तयार होऊ लागले. तसेच सुगंधी द्रव्ये, फुले, मिठाई गोळा करण्यात आली. सर्व कलावंती-णींना, गवयांना, त्यांनी उत्सवासाठी तयारीत रहाण्यास सांगण्यात आले.

**मुरादबक्षाची औरंगजेबाकडून फसवणूक :** औरंगजेबाच्या सैन्यात सारखी कुज-बुज चालू असे. त्याचे काय हेतू आहेत, हे त्याच्या सैन्याला पुरेसे ठाऊक होते. परंतु मुरादबक्षच्या सैन्यात, गाणे, बजावणे आणि मद्यपान यांचा एकच जल्लोष चालू होता. "औरंगजेबाचे हेतू चांगले नाहीत. काही तरी लबाडी होणार हे निश्चित असे मुरादबक्षच्या अनेक मित्रांनी विशेषतः खोजा शाहाबाजने त्याला सांगितले. औरंगजेब तुमच्या विरुद्ध जाळे पसरवित आहे, हे आम्हाला अनेक मार्गांनी कळले आहे, असेही त्यांनी सांगितले. पण मुरादबक्षावर आपल्या भावाच्या शब्दांनी मोहिनी पडली होती, त्याला सत्तेचा मद चढला होता. औरंगजेबाच्या आणाशपथा खऱ्या आहेत, असे समजून तो आपल्या मित्रांच्या सल्ल्याकडे लक्ष देईनासा झाला.

मथुरेच्या अलीकडे यमुनेच्या काठी कोली का घाट[1] हे स्थळ औरंगजेबाने आपल्या छावणीसाठी निवडले. ती जागा चांगली प्रशस्त व मोकळी होती. राज्याभिषेकसारख्या उत्सवाच्या दिवसाला साजेशी होती. वरील ठिकाणी चार दिवस[2] मुक्काम झाल्या-वर पंधरा जून रोजी औरंगजेबाने आपला मुलगा सुलतान मुहम्मद आणि इतर थोर अधिकारी यांना मुरादबक्षकडे पाठवून त्याला आपल्या छावणीस भेट देण्याची विनंती केली. बरोबर निरोप दिला की आजचा मुहुर्त चांगला असून आज बादशाही मुकूट तुमच्या शिरावर ठेऊन मी आपल्या वचनातून मुक्त होईन. हा निरोप औरंगजेबाचा होता. मग मुरादबक्षने निघण्याची तयारी केली. आपण बंदीखान्याच्या वाटेवर आहोत, याची त्याला कल्पनाही आली नाही. परंतु विश्वासू शाहाबाज व इतर अधि-काऱ्यांनी त्याची विनवणी केली की, आपण थोडे आजारी आहोत ही सबब सांगून

१. कोली घाट हा मथुरेच्या सहा मैल दक्षिणेकडे आहे. आणि अलिकडच्या औरंगाबाद ह्या ठिकाणा-पासून सुमारे एक मैलावर आहे. ते आग्रा रस्त्यावर आहे. औरंगजेबाने उभारलेले तबेले अद्याप त्या जागी आहेत. याच ठिकाणी त्यांच्या सैन्याचा तळ होता. त्याने तेथे एक मशीद बांधली व अलीगडीस नाव दिले. आलमगीर नामा पा. १३८. (जुलै ५, १६५८).

२. तारीखी-ई-मुहम्मदी वर्ष १०७१ हि. मध्ये ऐकिव माहितीवरून सांगितले आहे की मुरादबक्षला औरंगजेबाच्या हुकमाने ग्वाल्हेरला ठार मारण्यात आले. तो दिवस होता. २१ रबी ।। १०७१ हि. (डिसेंबर २५, १६६०) मुरादबक्षचे वय अडतीस होते.

या दिवशी न जाता, आपले जाणे पुढे एखाद्या दिवसावर ढकलावे. दरम्यान औरंगजेबाची योजना काय आहे ते निश्चितपणे समजून घेण्याचा आपण प्रयत्न करावा. औरंगजेबाच्या अनेक अधिकाऱ्यांच्या भेटीगाठी चालू होत्या. त्यांच्याकडून सत्य परिस्थिती काय आहे, ते काढून अधिक खात्री करावी. परंतु तो त्यांचे ऐकण्याच्या मनःस्थितीतच नव्हता. त्यांनी दिलेला सल्ला मुरादबक्षने लाथाडून लावला. कारण त्याचा औरंगजेबावर अविश्वास नव्हता. ठाम बेत करून व भावाच्या शपथेवर विसंबून तो औरंगजेबाकडे निघाला. घोड्यावर बसून औरंगजेबाच्या तंबूकडे जाताना, त्याने शाहाबाज व इतर अधिकारी बरोबर घेतले होते.

थोड्या अंतरावर त्याला इब्राहिमखान[1] भेटला. मुजरा केल्यावर तो मुरादबक्षजवळ आला व त्याच्या घोड्याचा लगाम धरून त्याने काळज्याबावरा चेहरा करून, मुरादबक्षला हळूच विचारले, "आपण कोठे जात आहात?" मुरादबक्षने शांतपणे उत्तर दिले, "मी स्वतःला सार्वभौम बादशहा म्हणून जाहीर करण्यासाठी जात आहे." यावर इब्राहिमखान म्हणाला, "फार आनंदाची गोष्ट आहे. पण जी आपण आपल्या घरी अधिक सुरक्षितपणे पार पाडू शकतो, त्या गोष्टीकरिता दुसऱ्याच्या घरी जाण्याची आवश्यकता काय?" असे म्हणून त्याने मुरादबक्षचा घोडा हळूच वळवला. मुरादबक्ष संतापला. तो पुढे निघाला. राजपुत्राने जाणूनबुजून हा निश्चय केला आहे, हे पाहून तो अधिकारी मोठ्याने म्हणाला, "शाहेनशहा, आपण बन्दिखान्याचा मार्ग धरत आहात." हे ऐकून शाहाबाज आपल्या धन्याजवळ गेला व त्याला विनंती करून म्हणाला, "आपल्याला परमेश्वराची, मुहम्मद पैगंबराची शपथ आहे, आपण इब्राहिमखानाचा सल्ला ऐकावा." परंतु मुरादबक्षाने आपल्या तलवारीवर हात ठेवला व तो उद्गारला, "माझ्यापेक्षा कोणी शूर नाही." तसाच पुढे जाऊन तो औरंगजेबाच्या तंबूपाशी पोहोचला. तत्क्षणी तंबूतून काजी बाहेर आला आणि मुजरा करून कुजबुजला "आपण चालून आला आहात. पण येथून बाहेर पडणे आपल्या हातात असणार नाही. परंतु औरंगजेबाच्या स्नेहाने भारावून गेलेल्या मुरादबक्षाने त्याच्या बोलण्याच्या आशयावर विचारच केला नाही. औरंगजेबाने बाहेर येऊन मुरादबक्षाचे स्वागत केले. त्याच्याबरोबर शेख मीर, व त्याचा भाऊ अमीरखान, व इतर अधिकारी व अनुयायी होते. औरंगजेबाने त्याचे मोठ्या आदबीने स्वागत करून त्याला उच्चासनावर बसविले. आणि तो त्याला बादशहाप्रमाणे वागवू लागला.

यानंतर गाणे बजावण्याचा कार्यक्रम होऊ लागला. या सर्व देखाव्यावर मुरादबक्ष बेहद्द खुष झाला. आपल्या वैभवाची ही पहिली फळे आपण चाखत आहोत हीच त्याची भावना झाली. तो आल्यानंतर तीन तासांनी म्हणजे दुपारी सुमारे दोन

१. इब्राहिमखान हा अलीमर्दानखानाचा मुलगा होता.

वाजता मेजवानीला सुरवात झाली. मुरादबक्षाच्या अधिकाऱ्यांना मेजवान्या द्याव्या असे औरंगजेबाने आपल्या अधिकाऱ्यांना यापूर्वी बजावून ठेवले होते. त्यामुळे आदल्या रात्री जल्लोष चालू होता. हे पाहून मुरादबक्षाचे सैनिक आपली रसद व घोड्यांना चंदीही मिळविण्यासाठी चोहिकडे पांगले होते.

आता मुरादबक्षाजवळ खोजा शाहबाजशिवाय त्याच्या माणसांपैकी कोणीच उरले नव्हते. मुरादबक्ष जेवत असताना हत्यारबंद असा तो खोजा त्याच्या मागेच उभा होता. मग भोजनास सुरवात झाली. औरंगजेबाचे अधिकारी मुरादबक्षाला अन्नाची वाढप व वेळोवेळी पेल्यात मद्य भरण्याचे काम करत होते. औरंगजेबाने स्वतः अनेक पक्वान्ने पुढे केली. भोजनगृहातील सामान्य नोकराप्रमाणे तो वागत होता. मुरादबक्षला खुष करण्याकरिता मोठ्या ढोंगीपणाने तो हे सर्व करत होता. भोजनानंतर "आपण आता विश्रांती घ्या. मी सिंहासनाची सर्व मांडणी करतो. ज्योतिषाकडून नक्की मुहूर्त काढून आणल्यावर मी आपणास जागे करण्याकरिता हजर होतो." असे औरंगजेबाने मुरादबक्षला सांगितले.

तो कमनशिबी राजपुत्र विश्रांती घेण्याकरिता दुसऱ्या खोलीत गेला. तेथे त्याला एक सुंदर स्त्री बसलेली आढळली. त्या स्त्री बरोबर क्रीडा करण्याचा त्याचा हेतु होता. परंतु खोजा शाहबाजने त्याला ही गोष्ट मना केली. त्या स्त्रीला तेथून घालवून दिले. लवकरच मुरादबक्ष झोपेच्या आधीन झाला. कारण त्याने मद्य फार घेतलेले होते. शाहबाज खाली बसून आपल्या धन्याचे पाय चुरू लागला. त्याचे सारे लक्ष दरवाज्यावर होते. थोड्याच वेळात समोरच्या दुसऱ्या एका दाराने औरंगजेब बाहेर येताना त्याला दिसला. त्याने पांढरा सदरा, चोळणा व साधी टोपी घातली होती. आपली दाढी कुरवाळत तो हसत हसत येत होता. दाराजवळ आल्यानंतर तो थांबला. मान वर करून त्याने त्या खोजाला खुणेने, काही विचारावयाचे आहे असे भासवून, जवळ बोलावले. काय हुकुम आहे हे पाहण्याकरिता शाहबाज चटकन पुढे झाला. त्याने आपले डोके दाराबाहेर काढले असेल नसेल, तोच चार माणसांनी त्याची बगोटी धरून वरच्यावर त्याला असे उचलले, की त्याला ओरडता येईना का शस्त्र चालविता येईना. मग त्याचा गळा दाबून त्यांनी त्याला ठार मारले व गुपचिप पुरून टाकले. दारूच्या धुंदीत असल्यामुळे मुरादबक्ष गाढ झोपेत होता. परंतु औरंगजेब चांगला सावध होता. आपल्या भावाचा विश्वासु खोजा नाहीसा केल्यावर आता आपला बेत सफल होत आहे याची त्याला खात्री वाटू लागली. पण अधिक खात्री करून घेण्याकरिता त्याने आपल्या सुलतान आझम नावाच्या सात वर्षांच्या मुलाला बोलावणे पाठविले.[१] तो आल्यावर औरंगजेबाने त्याला एक सुंदर दागिना दाखविला आणि म्हटले की, "तुझ्या चुलत्याला जागे न करता जर

१. मुहम्मद आझमचा १२ शबानला जन्म झाला. (१०६३ हि. १७ ऑक्टोबर १६५३ म.प.) आणि म्हणून त्याचे वय जून १६, १६५८ ला चार वर्षे आठ महिने आणि अठ्ठाविस दिवस इतके होते.

बाजूला असलेली त्याची तलवार तू काढून आणशील तर तुला हा दागिना बक्षिस देईन. सांगितल्याप्रमाणे त्या मुलाने ते काम केले. आणि जरी हे करताना मुरादबक्ष जागा झाला असता, तरी भावड्या पोराने हे केले असल्यामुळे, काही दगा आहे असा संशयही त्याला आला नसता. आपल्या मुलाला पुनः एक रत्न दाखवून औरंगजेब म्हणाला "परत एकदा आत जाऊन ती कट्यार जर काढून आणशील, तर तुला हे रत्न मिळेल. त्याने ती कट्यार औरंगजेबास आणून दिली. मुरादबक्ष आता पुरा निःशस्त्र झाला होता. त्याचे रक्षण करण्यास कोणीही नव्हता. औरंगजेबाला अतिशय आनंद झाला होता.

**मुरादबक्षाची कैद व सलीमगडकडे रवानगी :** मग त्याने दबा धरून बसलेल्या आपल्या लोकांना बोलावले. व आधीच तयार करून ठेवलेल्या पायाच्या बेड्या आणण्यास सांगितले. यानंतर सहा माणसे मुरादबक्षच्या खोलीत गेली व त्यांनी त्या बेड्या त्याच्या पायात चढविण्यास सुरवात केली. त्याच्या झटक्यानी तो जागा झाला. शहाबाज तर जवळ नाही. आणि अपरिचित क्रुद्ध माणसे बेड्या घेऊन उभी आहेत, हे पाहून त्याने आपला हात तलवार ठेवीत असे त्या जागेकडे नेला. पण आपली सर्व साधने काढून घेतलेली आहेत, हे पाहून तो पूर्ण हताश झाला. त्या क्षणी आपला विश्वासघात झाला, हे ओळखून त्याने काही हालचाल केली नाही. त्याच्या पायात बेड्या घालण्यात आल्या. आपली मान खाली घालून मुरादबक्ष म्हणाला, "कुराणावर घेतलेली शपथ ती हीच ना! काहींनी मला (मनूची) ठासून सांगितले की, औरंगजेबाचा हा बेत फसला असता, तर त्याने त्याच दिवशी आपल्या भावाचा खून करण्याचा निर्धार केलेला होता.

वरील मसलत इतकी गुप्त ठेवण्यात आली होती की, काय घडत होते याची कोणासही कल्पना नव्हती. आणि प्रत्येकाची दिशाभूल करण्याकरिता औरंगजेबाने आतील व बाहेरील सर्व वाद्ये पुन्हा वाजविण्यास सांगितले. वाद्यांचे तेच मंगलसूर पुनः ऐकून सर्व सैन्याला वाटले की, हिंदुस्थानातील (आपल्या) सामान्य पद्धतीप्रमाणे हा उत्सव सारी रात्र चालूच राहाणार. म्हणून शिपायांनी आपल्या करमणुकीचे मार्ग शोधले व ते चोहिकडे पांगले. सैनिकांना संशय येऊ नये म्हणून औरंगजेबाने वरील योजना केली होती. विश्वासघात झाला असे पाहून, मुरादबक्षचे सैनिक बंड करतील अशी त्याला शंका होती. यासाठीच त्याने स्वतःच्या तळाभोवतीचा बंदोबस्त वाढविला.

संध्याकाळी सहाच्या सुमारास एकाएकी, पडदा घातलेले हौदे, ज्यांच्यावर आहेत असे दोन हत्ती बाहेर आणण्यात आले. हत्तींच्या भोवती, औरंगजेबाला नुकताच येऊन मिळालेल्या दिलेरखानाच्या नेतृत्वाखाली, चार हजार घोडेस्वारांचे दळ होते. त्या बरोबरच औरंगजेबाचा दुधभाऊ बहादूरखान याच्या हाताखाली चार हजार

घोडेस्वार त्या ठिकाणी जमले होते. दिलेरखानाने पूर्वेच्या बाजूने, मुरादबक्ष असलेल्या तंबुच्या आवारात प्रवेश केला. थोड्या वेळाने आवारातून दोन हत्ती बाहेर पडले. एक हत्ती दिल्लीकडे चालू लागला आणि दुसरा हत्ती आग्र्याकडे गेला. प्रत्येक हत्ती बरोबर वर उल्लेखिलेली पथके होती. एक हत्ती दिल्लीकडे आणि दुसरा हत्ती आग्र्याकडे पाठविण्यात कोणत्या हत्तीवर मुरादबक्ष आहे हे त्याच्या सैन्याला कळू नये हा होता.

रात्रीची वेळ ही मुद्दाम निवडण्यात आली होती. म्हणजे बंड करू म्हटले असते, तरी ते सहज शक्य होणार नव्हते. मेजवान्यांच्यामुळे मुरादबक्षाच्या अधिकाऱ्यांची व त्याच्या सैनिकांची तारांबळ झालेली होती. क्वचित एखाद्या अधिकाऱ्याने मुरादबक्षच्या बाजूने लढण्याचा प्रयत्न केला तरी त्याला थांबविण्यात यावे असे औरंगजेबाने आपल्या अधिकाऱ्यांना आदेश दिले होते.

तळावरून दोन हत्ती बाहेर पडलेले पाहून मुरादबक्षाच्या सैनिकांना विश्वास-घाताचा संशय आला. पण काय घडले हे माहित नसल्यामुळे त्यांच्यात विलक्षण गोंधळ उडाला. थोड्या वेळाने अनेक घोडेस्वार आणि पायदळ शिपाई औरंगजेबाच्या छावणीतून बाहेर पडून "औरंगजेब चिरायु होवो." शहाजहान, दारा आणि मुरादबक्ष यांच्या सैनिकांनी औरंगजेबाची नोकरी पत्करावी. "त्यांना दुप्पट पगार मिळेल." असे ओरडून म्हणू लागले. मुरादबक्षाचे अधिकारी मेजवानीत गुंतले होते. ते अस्वस्थ झाले. तेथून निघून जाण्याचा ते प्रयत्न करू लागले. परंतु औरंगजेबाच्या अधिकाऱ्यांनी त्यांना हात धरून अडविले आणि सांगितले. "असला धोका तुम्ही पत्करू नका. औरंगजेबाने कबूल केलेला पगार स्वीकारा. वेळ निघून गेली आहे. फुकट मरण्यात काही अर्थ नाही. आपली बाजू शिल्लक राहिली नाही. हे मुरादबक्षने आपल्या कृतीनेच सिद्ध केले आहे."

मुरादबक्षचे अधिकारी आणि सैनिक यांना काय करावे सुचेना. पण दुसऱ्या दिवशी त्यांनी औरंगजेबाच्या सूचना मान्य केल्या. मुरादबक्षाचे सैन्य आणि संपत्ति औरंगजेबाच्या ताब्यात आली. मुरादबक्षाच्या बायका, मुले आणि आश्रित यांना दिल्लीच्या किल्ल्यात पाठविण्यात आले. "मुरादबक्षाचा हत्ती दिल्लीपाशी येताच हौद्याचे पडदे सरकवावे आणि मुरादबक्षाला उघडपणे शहरातून सलीमगडकडे नेण्यात यावे" अशी दिलेरखानाला औरंगजेबाने आज्ञा केली होती. सलीमगड हा किल्ला यमुनेच्या काठावर असून दिल्लीच्या किल्ल्याशी पुलाने जोडला गेला आहे. पठाण बादशहा सलीमशाहा याने तो बांधला होता.

अतिशय केविलवाण्या स्थितीत मुरादबक्षने दिल्लीत प्रवेश केला. त्याचा चेहरा उतरला होता. त्याच्या डोक्यावर कसेबसे बांधलेले निळे पागोटे होते. त्याला सोड-विण्याचा कोणी प्रयत्न केल्यास मुरादबक्षाचा तत्क्षणी शिरच्छेद करावा, म्हणून एक

मनुष्य नागवी तलवार घेऊन त्याच्या मागे बसला होता. पाठीमागच्या हत्तीवर दिलेरखान हा धनुष्याला बाण जोडून बसला होता. अशाच तयारीने त्याची पथके चालली होती. एखादा गुन्हेगार वधस्तंभाकडे नेत आहेत असा देखावा दिसत होता. अशा परिस्थितीत त्या दुर्दैवी राजपुत्राला सलीमगडच्या किल्ल्यात नेण्यात आले. त्याची शुद्ध हरपावी म्हणून त्याच्या पिण्याच्या पाण्यात अफुचे पाणी मिसळून द्यावे अशी आज्ञा देण्यात आली.

आपण गरीब फकीर आहोत, असे सर्वांना सांगण्यात व फकीरासारखे वागण्यात जे ढोंग केले होते, त्यामागे काय हेतु होता तो आता औरंगजेबाने उघड केला. तो असा की, बादशहाची गादी मिळविण्याचा मार्ग सोपा व्हावा व प्रत्येकाची दिशाभूल व्हावी. मुरादबक्ष त्याच्या हाती सापडला, दारा व सुलेमान शुको यांचा पराजय झाला, आणि शहाजहान कैद झाला. हे घडून येताच औरंगजेबाने आपण बादशहा झाल्याचे जाहीर केले. शहाजहान, दारा, मुरादबक्ष आणि सुलेमान शुको यांची माणसे औरंगजेबाला मिळाली. त्यांना त्याने मान मरातब व देणग्याही दिल्या. अशा रीतीने त्याच्या हाताखाली मोठे सैन्य तयार झाले.

**मनुची दिल्लीत थोडा मुक्काम करतो. नंतर लाहोरला जातो :** मी हे सर्व पहात होतो. लाहोर प्रांतात नवीन सैन्य उभे करण्याचा दाराने बेत केला आहे, असे ऐकून मी (मनुची) फकीराचा वेष घेऊन दिल्लीला गेलो. तेथे मी पंधरा दिवस होतो. दिल्ली ते लाहोर या वाटेवर लुटालूट व मारामाऱ्या चालू होत्या. मोठ्या कष्टाने मी बियास नदीच्या काठावर पोहोचलो. तेथे माझी आणि सुलेमान शुको याचा अधिकारी दाऊद खान[1] याची गाठ पडली. दाऊदखान हा सुलेमान शुकोला सोडून दाराला मिळण्याकरिता आला होता. दाराने औरंगजेबाची वाट रोखून धरण्यासाठी दाऊदखानाची नेमणूक केली होती. दाऊदखानाबरोबर पुरेसा तोफखाना, घोडदळ, आणि पायदळही देण्यात आली होती या खानाने मला नीट वागवले. आणि लाहोरला जाण्यासाठी परवाना दिला. मी संध्याकाळी चारच्या सुमारास लाहोरला पोहचलो. त्यावेळी दाराचा दरबार चालू होता. माझी बैलगाडी सोडून मी माझी पिशवी खांद्यावर घेतली. आणि हातात धनुष्य व सात बाण घेऊन मी राजवाड्यात शिरलो. माझा अधिकारी बर्कनदाझखान याने मला पाहिले, मोठ्या प्रेमाने माझे स्वागत केले. प्रवासाच्या माझ्या मलीन कपड्यानिशीच तो मला राजपुत्राकडे घेऊन गेला. दारा मोठा आनंदित होऊन उद्गारला "शाबास ! शाबास !", त्याच्या डोळ्यात अश्रू आले. आपल्या अधिकाऱ्याकडे वळून तो म्हणाला "पाहा, ह्या युरोपियन फिरंगी

१. दाऊदखान कुरेशी हिसार फिरोझाचा शेख जादा, याने दाराला भक्कर येथे सोडून दिले व तो जेसलमीर मार्गे घरी गेला. औरंगजेबाच्या वतीने त्याला पाटण्याचे सुभेदार नेमण्यात आले. (१६५९-६१) १०८१ हि. १६७०-८१ ला तो अलाहाबादचा सुभेदार होता. (मा. आसीर. उल-उमरा २०).

मुलाची निष्ठा. हा ना माझ्या धर्माचा ना माझ्या जातीचा. फार दिवस अजून त्याने माझ्याकडे नोकरी करूनही झालेले नाहीत. तरी सुद्धा संकटांना तोंड देऊन माझ्या मागे इतक्या निष्ठेने तो आला आहे. उलट जे माझ्या पदरी दीर्घ काळ राहिले, भरपूर तनखा घेत गेले, ते माझ्या गरजेच्या वेळी, कृतघ्न व पक्के बेइमान होऊन मला सोडून गेले."

असे बोलून तुझ्याबरोबर अजून कोणी फिरंगी आलेत का ? असे त्याने मला विचारले मार्गातील संकटामुळे पुष्कळांना येता आले नाही, पण संधि मिळाल्यास ते येतीलच, असे मी त्याला उत्तर दिले. मग दाराने मला एक घोडा देवविला. माझा पगार वाढविला ऐंशी रुपयांवरून तो दिडशे केला. मला पाचशे रुपये बक्षिस व सरापा (पोषाख) देण्याचा हुकूम देण्यात आला. जेथे माझे युरोपियन मित्र राहत होते, अशा एका घरात मी राहिलो.

**दारा पुनः लढाईची तयारी करतो :** दाराने आता वेळ दवडला नाही. तर त्याने अतिशय उत्साहाने सैन्यात नवीन लोकांची भरती करून औरंगजेबाशी लढा देण्यासाठी चांगली फौज तयार केली. औरंगजेबाने काय काय केले हे त्याला माहित आहे. दाराजवळ आता तीस हजारांचे घोडदळ तयार होते. त्यात मोगल, सैयद, पठाण इत्यादी अनेक जातींचे लोक होते. यासुमारास दाराने राजा स्वरूपसिंहाला[1] बोलावणे पाठविले. तो आपल्या बरोबर चार हजारांचे घोडदळ व दहा हजारांचे पायदळ घेऊन आला. आपल्याला येऊन मिळण्यासाठी दाराने त्याला विनविले होते. "पुढे अनुकूल संधी येताच मी तुम्हाला विसरणार नाही," असे तो म्हणाला. दाराच्या बायकोनेही स्वतः त्याचे आदरातिथ्य करून गोड गोड शब्दांनी त्याचे मन वळविले. तिने त्याला मौल्यवान मोत्याचा कंठाही दिला. सैन्याच्या तयारीसाठी त्याला १० लाख रुपये देण्यात आले. सैन्य पूर्णपणे सज्ज करून घेऊन येतो, असे म्हणून तो आपल्या राज्याकडे गेला. पण, औरंगजेबाला मिळाल्या असल्यामुळे, दाराने पुनः पुनः विनंती करूनही तो आपल्या जागेवरून हलला नाही. दाराची घोर निराशा झाली.

दाऊदखान हा दाराचा एक कनिष्ठ अधिकारी होता. त्याला मावाकडून काढून घेऊन आपल्या नोकरीत घेण्याचा तो (औरंगजेब) काही मार्ग शोधत होता. नदी ओलांडण्याच्या मार्गावर जेथे दाराने दाऊदखानला ठेवले होते, तेथे औरंगजेबाने जासूद पाठविले. औरंगजेबाकडे येऊन अधिकारी होण्यास तो तयार आहे का,

१. तिसऱ्या विभागात या माणसाला रूपसिंग असे म्हटलेले आहे. खरे नाव राजरूप असे असावे. बारी दो आब मधील गाव व पठाणचा राजा जगतसिंग याच्या मुलाचा तो मुलगा होता. पठाण म्हणजे माझ्या (संपादक) कल्पनेप्रमाणे पठाणकोट असावे. हे काश्मीरच्या रस्त्यावरील नूरपूरच्या पूर्वेकडे चौदा मैलांवर आहे.

अशी त्यांनी चौकशी केली. औरंगजेबाच्या सूचना त्याने धिडकारल्या. यावर जणु-काय दाऊदखानाने आपल्याला पत्र लिहिले आहे, आणि त्यात संधी येताच आपण येऊन मिळू, असे बनावट पत्र लिहून दाराच्या हाती पडेल अशी व्यवस्था केली. त्या पत्राचा परिणाम असा झाला की, दाऊदखानावरील दाराचा विश्वास नाहिसा झाला. यानंतर दाराने काबूलकडे जाण्याचा निश्चय केला. पण तेथील सुभेदार महाबतखान हा दाराचा विरोधी होता. या भागातील पठाणावर विश्वास ठेवता येणार नाही, तर तुम्ही इतर दुसरा कोणता तरी मार्ग स्वीकारावा, असे त्याने दाराला कळविले.

**दाराचे मुलतानकडे प्रयाण** : यानंतर दारा, १६५६ च्या (खरे वर्ष १६५८ च्या) अखेरीस लाहोर[1] सोडून निघाला. त्याने मुलतानची वाट धरली. त्याच्या बरोबर त्याचे सगळे कुटुंबीय आणि आठ हजारांचे घोडदळ होते. लाहोरमध्ये मला (मनुचीला) काही कामे होती म्हणून तीन दिवसानंतर आपण दाराला जाऊन मिळावे असे मी ठरविले. दाराच्या तोफखान्यातील तुर्की अधिकारी यांची माझ्याबद्दलची हेडेलहप्पी वागणूक आणि दारा निघाल्यावर लाहोरच्या स्थानिक अधिकाऱ्यांची औरंगजेबाच्या पक्षाला मिळण्याची वृत्ती, यामुळे मला लाहोर सोडण्यास अडचणी आल्या. माझा पाठलागही झाला. पण मी तीन दिवसांनी दाराच्या सैन्यात येऊन पोहोचलो. तेथून कूच करीत नोव्हेंबरच्या सुरवातीला आम्ही मुलतानला आलो. पूर्वी औरंगजेब जेव्हा या भागाचा सुभेदार होता, तेव्हा तो ज्या वाड्यात राहत होता, तो दाराने दुरुस्त करण्यास सुरवात केली. मुलतान येथे ख्वाजा बाहाओद्दिन[2] याचा दर्गा आहे. या दर्ग्याला दाराने मुल्यवान वस्त्रे भेट म्हणून दिली. दर्ग्याच्या सेवेकऱ्यांना पंधरा हजार रुपये बक्षिस म्हणून दिले. आपल्याला यश मिळावे म्हणून दर्ग्यात प्रार्थना करावी अशी त्याने बाहाओद्दिनच्या वंशजांना विनंती केली.

दाराला जेव्हा समजले की औरंगजेब याने त्याचा पाठलाग करण्याकरिता लाहोर सोडले आहे, तेव्हा मुलतान सोडून जाणे हेच बरे असे त्याने ठरविले. भक्करच्या किल्ल्याकडे जाण्याचा त्याचा विचार होता. नदीमध्ये पाचशे सात नावामध्ये रसद, जड आणि हलक्या तोफा, दारूगोळा आणि इतर युद्धसामग्री भरण्यात आली. प्रत्येक नावेत सुमारे शंभर टन माल भरण्यात आला होता. दाराने या नौकादलाचे नेतृत्व खोजा बसंत[3] याच्याकडे सोपविले. आणि तो स्वतः पाच हजार घोडदळ आणि

१. 'अलमगीर नामा' पा. १८६. या प्रमाणे दाराने, ऑगस्ट २८, १६५८ ला लाहोर सोडले.

२. शेख बाहाओद्दिन झकेरिया हा कुतुबुद्दिनचा मुलगा होता. कुतुबुद्दिन हा मुलतानचा एक साधू कमालुद्दिनचा मुलगा होता. कमालुद्दिनचा जन्म ११७० व मृत्यु १२६६ मध्ये झाला. (बील ओरिएंटल बायों. ९७)

३. खोजा बसंतचा निर्देश "अलमगीर नामा" मध्ये पा. २७४ वर आहे. याला मनूची 'प्रेमबार' असे म्हणतो. दाराने मोहरमच्या शेवटच्या दिवशी (ऑक्टोबर २८, १६५८) भक्कर सोडले. त्याचे पाठलाग करणारे सक्करला व भक्करला नोव्हेंबर २ आणि ३ (अनुक्रमे) ला पोहचलेले.

तितकेच पायदळ घेऊन खुष्कीच्या मार्गे भक्करकडे जाण्यास निघाला. दाराबरोबर त्याचा अधिकारी बर्कनदाज खान हा होता. इतर अनेक अधिकारी आणि सैनिक हे या ठिकाणी त्याला सोडून गेले.

दाऊदखानावरचा दाराचा विश्वास उडाला होता, तरी दाऊदखानाच्या निष्ठेची तारीफच केली पाहिजे. पण दाराने "तू हवे तिकडे जा" असे त्याला लेखी हुकूम देऊन कळविले. हे पत्र हाती पडले तेव्हा दाऊदखान 'उच्छ' या शहरी होता. लहान मुलासारखे अश्रू ढाळीत तो म्हणाला "दाराच्या पाठीशी दुर्दैव हात धुवून लागले आहे हेच खरे." असे म्हणून तो दाराला सोडून गेला.

**औरंगजेब दाराचा पाठलाग करतो :** ही बातमी ऐकून, औरंगजेबाने, मुलतान शहरी पोहचताच, आपल्या फौजेतील एक भाग वेगळा करून तो दाराच्या पाठलागाकरिता पाठविला. "शक्य झाल्यास पकडून आणा. तो जेथे जेथे जाईल तेथे तेथे त्याचा पाठलाग करा" असा त्याने हुकूम दिला. मग त्याने दाऊदखानाला एक प्रेमळ पत्र लिहिले, आणि मोठ्या पगाराचे त्याला आमिष दाखविले. औरंगजेबाने देऊ केलेली ही गोष्ट एका अटीवर त्याने स्वीकारली. ती अट अशी की, दारावर शस्त्र चालविण्याची त्याला आज्ञा होऊ नये. औरंगजेबाने ती मान्य केली. त्याला मोठ्या सन्मानाने वागविले. पुढे औरंगजेबाच्या कारकीर्दीत दाऊदखानाच्या श्रेष्ठ पदावर नेमणुका होत गेल्या.

आमचे कूच चालूच होते. काही वेळा रसद व पाणी यांची टंचाई यामुळे त्रास होत होता. अवघड अशा जंगलातून प्रवास करून आम्ही शेवटी भक्कर किल्ल्याच्या समोर येऊन पोहचलो. हा किल्ला सिंधु नदीच्या मधोमध एका बेटावर आहे. हे ठिकाण मुलतानपासून सुमारे १३० लीगच्या (२६०) मैल अंतरावर आहे. या ठिकाणी नदीला सिंध असे म्हणतात. सात नद्या मिळून हे पात्र बनलेले आहे. भक्कर येथे ख्वाजा बसंत हा किल्ल्यापाशी नावेतील सामान उतरवीत होता. या वेळी दाराला बातमी मिळाली की आमच्या पाठलागाकरिता सेनापती बहादूरखान याच्या हाताखाली पाठविलेली औरंगजेबाची सेना अगदी जवळ येऊन पोहचली आहे. तिचा प्रतिकार करणे शक्य नाही असे दाराला आढळून आले. म्हणून त्याने दोन हजार निवडक पठाण, सैय्यद, मोगल, रजपूत आणि बावीस युरोपियन यांना तो किल्ला ताब्यात घेण्याचा तातडीने हुकूम पाठविला. सेनापती म्हणून ख्वाजा बसंत याची नेमणूक केली. दाराच्या उरलेल्या सैन्याला नदीच्या पार जाऊन तिथे असलेल्या नावा ताब्यात घ्याव्या व शत्रूला नदीपार करू देऊ नये, असा हुकूम देण्यात आला.

मला जेव्हा या हुकुमाची बातमी लागली तेव्हा मी दाराला आपल्या बरोबर घेऊन चालण्याची विनंती केली. मोठ्या प्रेमळ शब्दात त्याने मला सांगितले की,

"प्रत्येकाला बरोबर घेण्याची आपली इच्छा आहे. पण यावेळी महत्त्वाची गोष्ट या किल्ल्याच्या रक्षणाची आहे. त्याकरिता शूर व विश्वासू लोकांची गरज आहे. माझा तुमच्यावर भरवसा आहे." मी डोळ्यात अश्रू आणून त्याला पुनः विनंती केली, आणि म्हटले "सर्वांना मागे राहू द्या, पण मला घेऊन चला." पण दाराने प्रेमळ शब्दांनी माझी बोळवण केली.

मी उदास झालो हे पाहून त्याने मला परत बोलाविले. आणि मागे राहिलेल्या युरोपियनांचे प्रमुख केले. त्यांच्यात वाटून देण्यासाठी मला पाच हजार रुपये देण्याचा हुकूम दिला. माझा पगारही १५० होता तो २०० रुपये केला. आणि ईश्वरकृपेने जर मी बादशहा झालो तर दरबारी तुला सरदार करीन व तुझ्या लोकांना बक्षीसे देईन असे त्याने मला वचन दिले. त्याने मला सरापा (पोषाख) दिला. आणि इराणी व काबुली मद्याच्या बाटल्या आम्हाला पुरविण्यात याव्यात अशा सूचना दिल्या. त्याने खोजा बसंतकडे माझी शिफारस केली व माझ्या लोकांकडे व मजकडे त्यास लक्ष पुरविण्यास सांगितले. मग दारा सर्व नावा घेऊन पुढे निघाला. मी खोजा बसंतबरोबर किल्ल्यात गेलो. दारा गेला असेल नसेल तोच आम्ही शत्रूचे नगारे ऐकले. त्याचबरोबर आम्हाला ही बातमीपण मिळाली की, औरंगजेबाने मुल-तान सोडून आग्र्याच्या दिशेने प्रयाण केले आहे. सुलेमान शुकोे डोंगराळ भागातून चाल करून पुढे येण्याची औरंगजेबाला भीति निर्माण झाली होती.

औरंगजेबाने मुलतान सोडण्याचे हेच एक कारण नव्हते. याहूनही प्रबळ कारण म्हणजे राजपुत्र शहाशुजा हा फार मोठी फौज घेऊन बंगालहून निघाला असून तो आग्र्याच्या दिशेने कूच करून येत आहे, अशी औरंगजेबाला मिळालेली बातमी हे होय. आपल्या पूर्वी तो आग्रा शहरी दाखल होईल या कल्पनेने औरंगजेबाची मोठी तारांबळ उडाली. तो घाईघाईने आपल्या सैन्याच्या पुढे २–३ लीग (५–६ मैल) काही निवडक माणसे घेऊन कूच करी. एखादे वेळेला तो एकट्यानेही पुढे जाई. आपल्या सैन्यानेही जलद चलावे असा त्याचा हेतु होता. अशा रीतीने घाईघाईने औरंगजेब लाहोरला पोहचला. तेथे त्याने खलीलुल्लाखानाची सुभेदार म्हणून नेमणूक केली. लाहोरमध्ये न थांबता औरंगजेब हा आपले सगळे सैन्य घेऊन आग्र्याच्या दिशेने निघाला.

एक दिवस औरंगजेब आपल्या सैन्याच्या पुढे लांब गेला असता त्याच्या बरोबर केवळ पाच घोडेस्वार होते. त्याचवेळी विरुद्ध दिशेने येत असलेला राजा जयसिंग हा त्याला दिसला. लाखी[1] अरण्यामधून जयसिंग हा त्याचा शोध घेत येत होता.

१. सतलज नदीच्या दक्षिण प्रदेशाला "लाखी अरण्य" हे नाव आहे. त्याची पूर्वेकडील मर्यादा लुधियाना आणि सुनामपर्यंत आहे. त्याच्या दक्षिणकडे भाटी वाळवंट आहे. (फॅकलीनच्या "शहाआलम" या पुस्तकातील नकाशा पाहा. पा. १७८८).

जयसिंगाबरोबर ३ हजार सशस्त्र रजपूत सैनिक होते. यापूर्वी औरंगजेबाने जयसिंगाला स्नेहाचे पत्र लिहून महत्त्वाच्या गोष्टींची चर्चा करण्यासाठी भेटण्यास म्हणून बोलाविले होते. पण भेटीची जागा आणि वेळ ही ठरली नव्हती.

राजा जयसिंगाला पाहताच औरंगजेब हा अतिशय घाबरला. यावेळी त्याच्याबरोबर पाच घोडेस्वार होते. शहाजहानबद्दल जयसिंगाला प्रेम आहे हे त्याला माहित होते. आपल्याला आता प्राण गमवावे लागतात की काय अशी त्याला काळजी पडली. खरे पाहता, औरंगजेबाला अशा स्थितीत पाहून त्याला ठार मारा, अगर आम्हाला याला मारू द्या, असे जयसिंगाच्या अधिकाऱ्यांनी त्याला सल्ला दिला. असे केल्यास तुम्ही शहाजहानची मुक्तता केली म्हणून तुमचे नाव अमर होईल; असे त्यांनी सांगितले. ही संधी खरोखर चांगली होती. आणि ती सहजपणे पार पाडता आली असती. पण राजा जयसिंगाने हा सल्ला ऐकला नाही. याचे कारण मला (मनुचीला) तरी असे दिसते– दाराबरोबर जयसिंगाचे संबंध चांगले नव्हते. तो शहाजहानचे बरे करू शकला असता. पण यामुळे दाराचाही फायदा झाला असता आणि दाराचे शक्य तितके वाईट व्हावे अशी जयसिंगाची इच्छा होती. याची कारणे मी (मनुची) यापूर्वी दिली आहेत.

**औरंगजेब राजा जयसिंगाला आपल्या पक्षाकडे वळवून घेतो :** औरंगजेबाने आपल्या मनातील खळबळ दाबली. तो सरळ रस्ता आक्रमित राहिला. राजा जयसिंग थोड्या अंतरावर असताना, त्याने राजाजी! राजाजी! म्हणून जयसिंगाला हाक मारली; आणि जवळ या म्हणून हाताने इशारा केला. राजा जयसिंग जवळ आल्यावर औरंगजेब त्याला म्हणाला "तुमच्या भेटीची मला फार आतुरता लागली आहे. हे मी माझ्या पत्रावरून तुम्हास कळविले आहेच. तुमच्याबद्दल मला फार आदर वाटतो. कारण तुमच्यासारखा शहाणा, सारासार विवेक असलेला, अनुभवी, इतका कर्तबगार मला दुसरा मित्र नाही. माझ्यावर परमेश्वराने टाकलेल्या जबाबदारीच्या कामात मला साहाय्य करू शकाल असे फक्त तुम्हीच आहात. दाराचा पराजय झालाच आहे. त्याच्या पाठीशी सैन्यही नाही. बहादूरखानाला मी त्याच्या पाठलागावर पाठविले आहे. थोड्याच अवधीत तो दाराला शृंखलाबद्ध करून आणल्याशिवाय राहणार नाही. अशा रीतीने तुमच्या शहाणपणाच्या व दूरदर्शीपणाच्या साहाय्याने परमेश्वराने मजवर सोपविलेले कार्य मी सहजपणे पूर्ण करू शकेन."

असे बोलत असता, औरंगजेबाने आपल्या गळ्यातला मोत्याचा मौल्यवान कंठा काढून तो राजाच्या हातात दिला; आणि म्हणाला, "तुम्ही सुलेमान शुकोला सोडून माझ्या शोधार्थ आलात, हे तुमचे माझ्यावर मोठे ऋण आहे. त्याची आणि माझ्या प्रेमाची खूण म्हणजे हा कंठा, मी देत आहे. मी दिल्ली शहराच्या सुभेदारीवर तुमची

नेमणूक केली आहे. तेथे तुम्ही तातडीने जाणे हे महत्त्वाचे आहे. जयसिंगाला त्याने अतिशय आनंदाने निरोप दिला. आपल्यापाशी फार थोडा लवाजमा होता, हे पाहून आणि शहाजहानवर प्रेम असल्यामुळे, राजा जयसिंग हा आपले अरेवाईट करू शकेल, आणि ते करणे सहज शक्य होते, अशी औरंगजेबाला मनोमन भीति वाटत होती. यानंतर औरंगजेब हा शहाशुजावर हल्ला करण्यासाठी आग्रा शहराच्या दिशेत त्वरीत जाऊ लागला. देणगी म्हणून सांभर प्रांत औरंगजेबाने जयसिंगाला दिला. तेथे असलेल्या सरोवरातील मीठाचे उत्पन्न १० लाखांच्यावर आहे. हे सरोवर अजमीर प्रांताला लागून आहे.

आम्हाला निरोप दिल्यावर, दारा खुष्कीच्या मार्गाने सिंदीच्या[1] बंदराकडे निघाला. तेथे पोहोचल्यावर त्याने नावातून नदी ओलांडली. सगळ्या नावा त्याने पलीकडच्या किनाऱ्यावर आणून ठेवल्या. पाठलाग करणाऱ्या शत्रूला अडथळा व्हावा हा त्याचा हेतू होता. तेथून १२ लीग (२४–२५ मैल) अंतरावर असलेल्या टट्टा या शहराच्या दिशेने त्याने कूच केले. थोड्याच दिवसांत तो तेथे जाऊन पोहोचला. तेथे त्याने शक्य तितकी माणसे आपल्या सैन्यात भरती केली. तेथे कारमेलाईट पंथाचा, फ्राय पेट्रोडी सान्टा टेरेसा नावाचा एक महंत होता. त्याला दाराने म्हटले "त्याने मला राज्यपद द्यावे म्हणून मी खिस्ताची करूणा भाकतो. मी बादशहा झालो तर आग्रा शहरात मेरीच्या नावाने मी एक चर्च उभे करीन. आणि माझ्या राज्यात सर्वत्र चर्च बांधण्याची आणि धर्मप्रसाराची परवानगी देईन."

थोड्याच दिवसानंतर दाराने, सहा हजार घोडेस्वारानिशी आपली मजल पुढे चालू केली. पुरेसे सोने दागिने व आपले कुटुंब त्याने आपल्या बरोबर घेतले होते. पुढे तो कच नगर[2] (कच्छ) येथे जाऊन पोहोचला. पुढे तो गुजराथ प्रांताकडे वळला. इराण (पर्शिया) कडे न जाता दारा हा गुजरातकडे वळला हे पाहून औरंगजेबाने त्याला फसविण्यासाठी पुढील युक्ती केली.

औरंगजेबाचा दुसरा मुलगा सुलतान मुअज्जम (शहा आलम) हा त्यावेळी औरंगाबादेस होता. त्याने आपल्या विरूद्ध बंड करण्याचे सोंग करावे, आपण आपले आजे शहाजहान यांना सोडविणार आहोत असे जाहिर करावे, आणि यासाठी आपल्याला येऊन मिळण्यासाठी दाराला पत्र लिहावे; असे औरंगजेबाने मुअज्जमला लिहिले. "दारा आला की त्याला जिवंत अथवा मृत हस्तगत करावे" अशी त्याने मुअज्जमला आज्ञा केली. याप्रमाणे मुअज्जमने दाराला वरील स्वरूपाचे पत्र लिहिले

१. दारा मोहरमच्या २५ ला भक्करला पोहोचला. मोहरमच्या शेवटी त्याने भक्कर सोडले (ऑक्टोबर २३ आणि २८, १६५८). प्रथम तो कंदाहारकडे निघाला होता. नंतर वळून तो टट्टा (सिंधूवरील) ला पोहचला. (नोव्हेंबर २३, १६५८) अलमगीरनामा २७३–२७५, २८१).

२. हे असावे कच्छ + नगर 'अलमगीरनामा पा. २८३ प्रमाणे दारा कच्छच्या रणात दि. ६, १६५८ ला पोहचला. तेथून तो पुढे कच्छकडे गेला.

पण दारा काही मूर्ख नव्हता. आतापर्यंतच्या अनुभवावरून त्याला औरंगजेबाच्या कारस्थानाची व कपटाची ओळख पटली होती. त्याने मुअज्जमचे पत्र थट्टेने उडवून लावले.

**दारा गुजरात प्रांतात शिरतो :** दारा हा गुजरात प्रांतात शिरला. त्याने अहमदाबाद शहराचा ताबा घेतला. त्यावेळी औरंगजेबाचा सासरा शहानवाझखान[1] हा अहमदाबादचा सुभेदार होता. दाराच्या लहान सैन्याचा काहीही प्रतिकार न करता त्याने अहमदाबाद त्याच्या हवाली केले. शहानवाझखानामध्ये शौर्याचा अभाव होता असे नाही. पण बादशहा (शहाजहान) अद्याप जिवंत असताना, आपण युवराजाला विरोध करावा हे योग्य होणार नाही, असे त्याला वाटले. शहानवाझखान हा इराणच्या प्राचीन राजघराण्यातील होता. तो ऐषआरामात काळ घालविण्यात संतुष्ट असे. अहमदाबादच्या किल्ल्यातून बाहेर पडून त्याने दाराचे मोठ्या अदबीने स्वागत केले. आणि आपण एकनिष्ठपणे आपली सेवा करू असे त्याला वचन दिले. दारासाठी त्याने अजमीरच्या प्रांतात आपले प्राण दिले ते मी (मनुची) पुढे सांगेन.

**औरंगजेबाच्या फौजा भक्करच्या किल्ल्याला वेढा देतात :** गुजरात प्रांतात दारा आपले बळ वाढवित असता, आम्ही भक्कर किल्ल्यात होतो. शत्रूने किल्ल्याचा वेढा कडक करण्यास सुरवात केली. भक्करचा किल्ला सिंध नदीच्या मध्ये असलेल्या खडकाळ बेटावर आहे. नदीच्या पूर्व किनाऱ्यावर (येथे पश्चिम पाहिजे) आणि पश्चिम किनाऱ्यावर (येथे पूर्व पाहिजे) रोरी हे गाव आहे. किल्ल्यापासून उत्तरेकडे जवळ असलेल्या बेटावर ख्वाजा खीजर याचा दर्गा आहे.[2]

किल्ल्यात आमची तयारी चांगली होती. किल्ल्यात तोफखाना, दारूगोळा, सोने नाणे आणि इतर बरेच सामान होते. दाराच्या कुटुंबातील काही बायका, त्याचा मुलगा सुलेमान शुकोह याची बायको, आणि दोन लहान नातू ही मंडळी किल्ल्यात होती. गुजरातेत यश मिळाले नाही तर भक्करचा किल्ला आपला तळ म्हणून ठेवावा असा दाराचा बेत होता.

शत्रूने किल्ल्यावर तोफांचा व बंदुकांचा मारा केला. आम्हीही त्याला उत्तर देत होतो. किल्ल्यातून बाहेर पडून आम्ही त्यांचे मोर्चे उधळून लावीत होतो. खलीलुल्लाखानाला वेढा चालविण्यासाठी आणखी माणसे बोलवावी लागली. वेढा घालणारे

१. शहानवाजखान याच्या मुलीचे औरंगजेबाशी लग्न झाले. हे लग्न शहाजहानच्या कारकीर्दीच्या दहाव्या वर्षी (१६३७-३८) मध्ये झाले होते. शहानवाजखान अजमीरच्या लढाईत मारला गेला (मार्च २४,१६५९) (मा. आसीर. उल-उमरा ।।६७०)

२. भक्कर हे ८०० यार्ड लांब व ३०० यार्ड रुंद असे एक बेट आहे. भक्कर किल्ल्याने, ते जवळजवळ सर्वच व्यापिलेले आहे. भक्कर हे पश्चिमेकडे अथवा उजव्या तीरावरील गाव आहे. आणि रोरी (लोहरी) हे विरुद्ध अथवा डाव्या तीरावरील गाव आहे. रोरी येथे चार खडकाळ बेटे आहेत. त्या सर्वांत मोठे भक्कर हे होय. मनुचीने भक्कर व रोरी यांच्या स्थानांची उलटापालट केलेली आहे. या बेटांपैकी एका बेटावर ख्वाजा खीजर याचा दर्गा आहे.

सैन्य सतत वाढत गेले. शेवटी तो किल्ला आम्हाला सोडून द्यावा लागला. त्याची हकिकत पुढे येईल.

श्रीनगरच्या राजाच्या मदतीने सैन्य उभे करून सुलतान सुलेमान शुको हा डोंगराळ भागातून चालून येण्याची तयारी करीत आहे, हे ऐकून औरंगजेबाला काळजी वाटू लागली. त्याने श्रीनगरच्या राजाला स्वतः पत्र लिहून, आणि राजा जयसिंग आणि इतर राजे यांच्याकडून पत्रे लिहून, सुलेमान शुकोला हालचाल करू देऊ नये अशी काळजी घेतली.

**शाहाशूजा व औरंगजेब यांची लढाई :** शाहाशूजाने खजवा[1] (फत्तेपूर जिल्हा) येथे आपला तळ दिला होता. हे स्थळ आग्र्याहून १०० लीग (सुमारे २०० मैल) अंतरावर आहे. औरंगजेबाने शाहाशुजाच्या तळावर हल्ला केला. शाहाशुजाचा तोफखाना चांगला होता. मिर्झा जानी हा तोफखान्यावर अधिकारी होता. तोफखान्यात अनेक युरोपियन होते. शाहाशूजाच्या प्रतिकारामुळे औरंगजेबाचे सैन्य बरेच असूनही त्याला पुढे पाऊल टाकता आले नाही. शाहाशूजा हा आपल्या तळावरून बाहेर येईना. आणि औरंगजेबाला आपण आग्र्याकडे माघार घेतली तर शाहाशूजा चालून येईल अशी भीती वाटू लागली. आपण अडचणीत सापडलो, याची औरंगजेबाला जाणीव झाली. शाहशुजाला पळभरही विश्रांती न देणे हे निकडीचे होते. त्यावेळी औरंगजेबाला दैव अनुकूल झाले. मीरजूमला हा या वेळेस दौलताबादेहून निघून त्याला येऊन मिळाला.

याचवेळी औरंगजेबाने राजा जसवंतसिंग यास आपल्या सैन्याच्या चंदोलाचे (पिछाडी) नेतृत्व करण्यास सांगितले. पण त्याने असे काही न करता औरंगजेबाच्या सरंजामाची व संपत्तीची लूट केली आणि आग्र्याची वाट धरली.

लढाईच्या सुरवातीस मीरजूमलाच्या सल्ल्यावरून औरंगजेबाने शाहाशुजाचा सल्लागार अल्लाविर्दीखान[2] यास पुढील पत्र लिहिले. "मला हिंदुस्थानचा बादशहा बनवायचे असेल तर तुम्ही लढाईच्या धुमश्चक्रीत शाहाशूजाला हत्तीवरून खाली उतरण्यास मन वळवावे. असे कराल तर तुम्ही आणि तुमचे कुटुंबीय यांना मी त्यांच्या सेवेचे भक्कम चीज करीन असे वचन देतो. तुम्ही यावेळी कसूर करणार नाही अशी मला बळकट आशा आहे.

१. खजवा हे फत्तेपूर जिल्ह्यात आहे.

२. अल्लाविर्दीखान शहजुकांचा एक वजीर. जहांगीरच्या कृपेने उच्च पदी चढला. याला व याच्या एका मुलाला सैफुल्लाखानाला शहाशूजाच्या आज्ञेने ठार करण्यात आले. ही घटना राजवाड्या मध्यंतरात (एप्रिल ८, १६५९) अकबर नगर (राजमहल) येथे घडली. (मी. आलीर. उल-उमरा I २०३ मा. आसीर-इ-आलमगिरी पा. २६.)

औरंगजेबाच्या सैन्याची पिछाडी जसवंतसिंगाने लुटली होती. या गोंधळाचा फायदा घेऊन शहाशुजाने औरंगजेबावर हल्ला केला. औरंगजेबाच्या सैन्याची आघाडी उधळली गेली. औरंगजेबाच्या हत्तीचा माहूतही मारला गेला. यावेळी औरंगजेबाने हत्तीवरून उतरू नये म्हणून मीरजुमला त्याला म्हणत होता "कायम कायम!" (ठाण मांडून राहा). औरंगजेबाला युद्ध जिंकण्याची आशा नव्हती. नेमके याच वेळी अल्लाविर्दीखानाच्या सांगण्यावरून शहाशुजा हत्तीवरून खाली उतरला. त्यामुळे त्याचे सैन्य माघार घेऊन पळत सुटले. औरंगजेब हत्तीवर बसून होता. यावेळी त्याच्या भोवती अवघे पाचशे घोडेस्वार राहिले होते. शहाशुजाने माघार घेतली आणि तो अलाहाबादेकडे निघाला.

**शहाशुजाचा पराभव व त्याचे अलाहाबादेकडे प्रयाण :** शहाशुजाला विजय मिळेल असे जसवंतसिंगाला वाटले होते. त्यामुळे तो आग्र्याला काही दिवस राहिला. नंतर अगदी अनपेक्षित असलेली बातमी आली की, शहाशुजाचा पराभव झाला आहे. या बातमीने आग्र्याचा सुभेदार शाईस्तेखान याला हायसे वाटले. राजा जसवंतसिंग हा आपल्या राज्याकडे रवाना झाला. यापूर्वी शहरात अफवा पसरली होती की, औरंगजेबाचा पराजय झाला असून त्याला आणि मीरजुमलाला कैद करण्यात आले आहे. शाईस्तेखानाने राजद्रोह करून औरंगजेबाचा पक्ष घेतला होता. आता आपला निकालच झाला असे तो समजला. विष प्राशन करून आत्म-हत्या करण्याचा त्याने निर्धार केला. जसवंतसिंग शहरात येऊन आपल्याला कैद करणार असे त्याला वाटू लागले. त्यावेळी जसवंतसिंगाने शहरात प्रवेश केला असता तर थोड्याशा धमकीने, तो आग्र्याच्या किल्ल्याचे दरवाजे उघडण्यास लावून शहाजहानची कैदेतून सुटका करू शकला असता; यात काही संशय नाही. पण औरंगजेबाचे दैव बलवत्तर होते. जसवंतसिंगाच्याने इतकी साधी खटपटही होऊ शकली नाही. औरंगजेबाच्या पराजयाच्या अफवेने चोवीस तास पर्यंत आग्रा शह-रात विलक्षण वातावरण निर्माण झाले होते. प्रत्येकाची अपेक्षा ही की जसवंतसिंग शहरात प्रवेश करणार आणि शहाजहानची सुटका करणार. पण नक्की काय घडले आहे हे जसवंतसिंगाला पुरतेपणी ठाऊक होते. त्यामुळे शहाजहानच्या सुटकेची खटपट करून, ते त्याला अडचणीचे झाले असते. शहाजहानची सुटका व्हावी अशी जसवंतसिंगाची इच्छा होती. पण प्राप्त परिस्थितीत ही गोष्ट अशक्य आहे असे जसवंतसिंगाला वाटले. त्याचा पक्ष उचलून धरण्यास कोणीही नव्हता. आणि विजयी औरंगजेबाच्या सैन्याचा एकट्याने तो प्रतिकार करू शकला नसता. वरील कारणांनी त्याने आग्रा सोडून तडक आपल्या राज्याकडे जाण्याची तयारी केली.

शहाजहानच्या बाजूने जसवंतसिंग काही तरी मसलत करील या भीतीने औरंगजेब तडक आग्र्याच्या दिशेने निघाला. शाहाशुजाचा पाठलाग करण्यासाठी त्याने मीर

जुमलाला नेमले. आपला मुलगा सुलतान महम्मद याला त्याने मीर जुमलाच्या हाताखाली ठेवले. त्याला स्वतंत्र नेतृत्व दिले नाही. हे सुलतान महम्मदाला आवडले नाही. पण यावेळी तो गप्प बसला व सूड घेण्याची संधि पाहू लागला.

**सुलतान महम्मद शाहाशूजाला मिळतो :** शाहाशूजाने अलाहाबादेला तळ दिला होता. पण मीर जुमलाच्या पाठलागामुळे त्याला पुनः पुनः माघार घ्यावी लागली. अलाहाबाद, बनारस, पाटणा, मोंघेर आणि राजमहल अशी स्थळे करीत तो ढाक्याला पोहचला. तेथे आपला तळ दिला.

या ठिकाणी सुलतान महम्मद शाहाशूजाला जाऊन मिळाला. औरंगजेबाने दिलेरखानाला सैन्य घेऊन मीर जुमलाच्या मदतीसाठी पाठविले. तोपर्यंत मीर जुमलाने सुलतान महम्मदाच्या नावाने एक पत्र पाठविले. त्यात म्हटले होते "तुम्ही आपल्या वडिलांना (औरंगजेबाला) दिलेली वचने पूर्ण होईपर्यंत, तुम्ही सध्या वागत आहात तसेच वागा!मीर जुमलाने ठरविल्याप्रमाणे हे पत्र शहाशूजाच्या हाती पडले. सुलतान महम्मदबद्दल शाहाशूजाला पूर्वी थोडा बहुत अविश्वास होता. तो या पत्राने पूर्ण झाला. सुलतान महम्मदापाशी त्याने लहानसे पथक तैनात केले होते ते त्याने काढून घेतले. आणि त्याला आपल्या राजवाड्यात येण्याची बंदी केली. वरील पत्राची बातमी सुलतान महम्मदाला लागली. "ते पत्र बनावट आहे. आणि त्याचा हेतू आपल्या दोघांत भांडण लावावे असा आहे. आपण तिकडे लक्ष देऊ नये. मी तुमची निष्ठेने सेवा करण्याची शपथ घेतली आहे. तिचाच मी पुनश्च उच्चार करतो," असे त्याने शहाशूजाला कळविले. पण याने शाहशूजाची खात्री पटली नाही. ते पाहून सुलतान महम्मद मीर जुमलाकडे परत आला. औरंगजेबाने स्नेहाने भरलेले पत्र त्याला पाठविले. आणि त्याला दरबारात पाठवून द्यावे अशी आज्ञा दिली. सुलतान महम्मदाला चांगल्या विश्वासातल्या रक्षकांच्या सोबत पाठविण्याबद्दल मीर जुमलाला हुकूम पाठविण्यात आला. कारण तो मागच्या प्रमाणे पळून जाण्याचा प्रयत्न करील, अशी औरंगजेबाला भीति वाटली. यासाठी त्याला पालखीतून सक्त देखरेखीखाली नेण्यात आले. आपण काय करून बसलो, हे आठवून आणि बापाचा खुनशी स्वभाव ध्यानात घेऊन सुलतान महम्मद मोठ्या काळजीत पडला. आणि श्रीनगरच्या डोंगराळ भागात पळून जावे असे पुनः एकदा विचार त्याच्या मनात येऊ लागले. बरोबरच्या रक्षकांना भिवविण्याकरिता त्याने पालखीतून उडी मारण्याचा अनेकदा प्रयत्न केला. परंतु हे काहीही उपयोगी पडले नाही. कारण त्याला नेण्याचे काम ज्याच्याकडे सोपविले होते, त्यांना या बाबतीत मोठे कडक हुकूम देण्यात आले होते. हे कळल्यावर औरंगजेबाने दानिश या खोज्याला दोन हजार घोडेस्वार देऊन तिकडे धाडले. मुरादबक्षच्या वेळी वापरलेल्या बेड्या औरंगजेबाने खोज्या बरोबर पाठविल्या. त्या तावडतोब सुलतान महम्मदावर घालण्यात आल्या. त्याला बंद हौद्यात हत्तीवर

बसविले. गंगानदी ओलांडून त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात नेऊन ठेवण्यात आले. तेथे त्याला तो भ्रमिष्ट होईतो सतत अफूचे पाणी देत राहण्याचा हुकूम झाला.

**सुलतान महम्मद याला कैद करतात :** इतभागी सुलतान महम्मदाला अशा अवस्थेत एका हलक्या गुलामाप्रमाणे वागविण्यात आले. कोणाशीही संपर्क ठेवण्याची त्याला बंदी करण्यात आली. त्याच्या बाबतीत इतका कडकपणा पाळण्यात आला की त्याच्या समोर कोणी बोलतही नसे. आणि त्याच्या प्रश्नांची उत्तरेही देत नसे. औरंगजेबाचा आपल्या मुलावरचा गैरविश्वास इतक्या थराला गेला होता की, त्याने मुलाला न्हावी मिळू दिला नाही. की जेवताना सुरीचा उपयोग करू दिला नाही त्याच्या शरणागतीची परीक्षा पाहण्याकरिता, गोवळकोंड्याच्या राजाची मुलगी, त्याची पत्नी त्याजकडे पाठवून दिल्यास चालेल का म्हणून त्याच्याकडे विचारणा करण्यात आली. "इतक्या जुलमाने वागविली जात असताना, दांपत्य सुख कसे मिळणार ?" असे त्याने संतापून विचारले. सुलतान महम्मद बंदिवासात असता काय काय घडले ते पुढे योग्य ठिकाणी मी (मनुची) कथन करीनच.

शहाशुजाच्या विरुद्ध मीर जुमलाने आपली मोहिम नेटाने चालू ठेवली. शहाशुजा उरलेल्या थोड्या फौजेनिशी लढत राहिला. अधिक संरक्षणासाठी त्याने गंगेच्या काठाचा आसरा घेतला.

त्याच सुमारास मीर जुमलाच्या सैन्याला बळकटी आणण्याकरिता, औरंगजेब आपल्या फौजेनिशी आग्र्याच्या सरहद्दीवर ठाण मांडून राहिला. त्याने मुरादबक्षला सलीमगड किल्ल्यावरून हालवून ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कडक कैदेत ठेवले. सुलतान महम्मदाप्रमाणे त्याला अफूचे पाणी पिण्यास देण्यात यावे असा हुकूम देण्यात आला. दोघांना सारख्याच कडकपणे वागवू लागले. दोघांना एकमेकांशी बोलू देण्यात येत नसे.

**औरंगजेब दिल्लीस जातो व आपण बादशहा झाल्याचे जाहीर करतो :** दरम्यान औरंगजेबाला कळले की शहाशुजा आणखी बराच काळपर्यंत प्रतिकार करू शकेल अशी शक्यता आहे. हे पाहून औरंगजेब दिल्लीला गेला. आणि तेथून बादशहा म्हणून राज्य करू लागला. त्याने आपल्या नावाची नाणी पाडली. त्या नाण्यावरील शब्द :—

"शिक्का झद् दर जहाँ चूं बद्रि-मुनीर
शाहा-औरंगजेब-इ-आलमगीर."

म्हणजे मी शाहा, औरंगजेब, जगज्जेता, जगात सूर्य चंद्राप्रमाणे स्पष्ट नाणी पाडीत आहे."

औरंगजेब दिल्लीत असताना त्यावेळी दाराने गुजरातमधून निघून तीस हजार घोडेस्वारानिशी आग्र्याच्या दिशेने कूच केले. राजा जसवंतसिंगाने, आपले सर्व सैन्य घेऊन तुम्हाला येऊन मिळू. आणि औरंगजेबाच्या नाशासाठी दोघांचे मिळून अजिंक्य असे सैन्य तयार ठेवू, असे दाराला आश्वासन दिले होते. दाराच्या हालचालींची बातमी कळताच, औरंगजेबाने त्यांची गाठ घेण्यासाठी म्हणून दिल्ली सोडली. जसवंतसिंग हा दाराला मदत देऊ इच्छितो हे ओळखून त्याने जसवंत-सिंगाचे मन वळवावे म्हणून लिहिण्यास राजा जयसिंग यांना सूचना केली. औरंगजेबाने जसवंतसिंगाला वचन दिले की, तुमच्या पूर्वीच्या बंडाबद्दल मी तुम्हाला क्षमा करीन माझी तुमच्यावर कृपा होईल. शाहशुजाच्या लढाईत तुम्ही जी संपत्ती लुटली ती सर्वच्या सर्व तुम्हाला बहाल करण्यात येत आहे. जसवंतसिंग दाराला मिळाल्यास जयसिंग व जसवंतसिंग यांची लढाई होणे अपरिहार्य होते. राजा जयसिंगाने जसवंतसिंगाला कळविले की आपण दोघेही रजपूत आहोत. आपला नाश म्हणजे मुसलमानांचा विजय अशी स्थिती होईल.[1]

वरील पत्रामुळे जसवंतसिंगाने आपले वचन मोडण्याचे ठरविले. दारा हा अजमीरजवळ आला. त्याने जसवंतसिंगाला लिहिले की आपले वचन पुरे करण्याची ही वेळ आहे. मी तुमची वाट पहात आहे. माझे यशापयश तुमच्यावर अवलंबून आहे. तुम्ही त्वरा करावी. जसवंतसिंगाने त्याला उत्तर पाठविले नाही. दाराने आपला मुलगा सिपिहर शुको याला त्याच्याकडे पाठविले पण जसवंतसिंगाने त्याला वाटेतूनच परतून लावले. दाराचा निरुपाय झाला. त्याने अजमीर जवळच्या लहान सहान टेकड्यांमध्ये तळ दिला. जागोजागी खंदक खणले. आणि तोफखाना व्यवस्थितपणे पसरून ठेवला. सैन्याचे नेतृत्व शहानवाझखान व फिरोजखान यांच्याकडे सोपविले.

दाराचा मजबूत तळ पाहून आपल्याला जय मिळणे कठीण आहे, असे औरंग-जेबाला दिसून आले. लढाई सुरू करण्याच्या ऐवजी त्याने आपला नेहमीचा धूर्तपणा उपयोगात आणला. त्याने दिलेरखानाला हुकूम केला की, तुम्ही दाराला पुढीलप्रमाणे पत्र लिहा : "जसवंतसिंगाने वचनभंग केला आहे. मी तुमचा पक्ष घेऊ इच्छितो. लढाईच्या दिवशी मला आपण आपल्या सैन्यात येऊ द्यावे. म्हणजे माझे सैन्य आपल्याशी एकत्रित करून आपण औरंगजेबाची दाणादाण उडवू. आपल्याशी मी एकनिष्ठ राहीन अशी मी कुराणावर शपथ घेतो." दाराने भोळेपणाने दिलेरखानाच्या

१. औरंगजेब अजमीरपासून सहा कोसावर आला. तो दिवस होता, २६ जमादा, १०६९ हि. (मार्च १६,१६५९). जयसिंगाने जसवंतसिंगाला पत्र पाठविले. जसवंतसिंग जोधपूरला निघून गेला. सिपिहर शुकोला तिकडे पाठविण्यात आले होते. पण त्याचा काहीही उपयोग झाला नाही. दाराने देवराय या खेड्याजवळ आपला तळ ठोकला होता.

खोट्या शपथांवर विश्वास ठेवला. लढाईच्या दिवशी दिलेरखानाच्या पथकाशी युद्ध करू नये, असे दाराने आपल्या अधिकाऱ्यांना बजावून ठेवले. औरंगजेबाला जेव्हा या लबाडीचे समजले, तेव्हा त्याला दाराच्या सैन्यात दिलेरखानाच्या प्रवेशाची खात्री वाटली. त्याने दुसऱ्याच दिवशी लढाई करण्याची तयारी केली.

**दारा व औरंगजेब यांची अजमीर जवळ लढाई. दाराचा पराभव :** लढाईच्या एक दिवस आधी म्हणजे पंधरा मे सोळाशे सत्तावन (खरे वर्ष १६५९) या दिवशी रात्री कुतुब बेग नावाच्या ज्योतिषाने औरंगजेबाला खाजगीरीत्या कळविले की, ग्रह स्थितीप्रमाणे सैन्यात प्रमुख स्थानी असणाऱ्याच्या जीवाला धोका आहे. म्हणून आपण हत्तीवर छत्र धारण करून बसू नये. औरंगजेबाचा शिक्षक शेख मीर याने आपण, औरंगजेबाच्या जागी शाही हत्तीवर बसू असे सांगितले. "आपल्या लहानपणी मी आपणास पहिले धडे दिले. आता एकनिष्ठ प्रजा या नात्याने आपल्या कार्यात प्राण अर्पण करण्याची माझी इच्छा आहे." असे तो म्हणाला. ही बातमी गुप्त ठेवणे अत्यंत आवश्यक होते. छावणीच्या आत किंवा बाहेर या गोष्टीचा पत्ता लागला नाही.

औरंगजेबाने आपल्या शिक्षकाची ही विनंती मान्य केली. दुसऱ्या दिवशीच्या लढाईत शेख मीर हा गोळी लागून ठार झाला. हत्तीवर त्याच्या मागे मीर तकी बसला होता. त्याने प्रसंग ओळखून शेख मीर मेला नसल्याचे भासविले. विजयानंतर औरंगजेबाने मीर तकीला बक्षिस देऊन त्याचे नाव फतेनुमा (विजय दर्शक) असे ठेवले.[1] मी (मनुची) या लढाईत नव्हतो. पण मला तिची विशेष माहिती आहे. कारण माझी आणि फतेनुमा आणि लढाईत हजर असलेल्या प्रमुख लोकांची घनिष्ठ ओळख होती. वर सांगितलेल्या गोष्टी मोगल साम्राज्यात सर्वतोमुखी आहेत.

उजव्या बाजूने हल्ला करण्याचे काम दिलेरखानाकडे सोपविले होते. त्याच्या बरोबर बारा हजार पठाण घोडेस्वार होते. दाराने आपल्याला वाट करून देण्यासाठी मोर्चे काढून घ्यावे म्हणजे पत्रात कळविल्याप्रमाणे आपल्याला त्याच्या सैन्यात जाऊन मिळता येईल असा दिलेरखानाने दाराला संकेत पाठविला. दिलेरखान विश्वासघात करणार आहे, याची दाराला कल्पना नसल्यामुळे त्याला विरोध न करता मोर्च्यांतून जाऊ देण्याबद्दल दाराने हुकूम दिला. तरी सुद्धा दाराच्या पुष्कळ लोकांनी तसे करण्याचे नाकारले. पण दिलेरखानाने त्यांच्यामधून वाट काढलीच. दाराचे सैन्य त्यावेळी शत्रूला मागे हटविण्यात गुंतले होते. दिलेरखानाचे लोक आघाडीवर असलेल्या दाराच्या लोकांवर तुटून पडले व त्यांच्यावर शस्त्र चालवून दाराच्या सैन्याचे जितके नुकसान करता येईल तितके नुकसान केले. दाराच्या सैन्यात मग

१. शेख मीर खाफी हा वंशाने (जातीने) सय्यद होता. (मा आसीर-उल-उमरा ६६८) या ग्रंथाप्रमाणे, हौद्याच्या मागच्या जागी बसलेला मनुष्य मीर तकी नसून मीर हाशीम खाफी हा होता.

गोंधळ माजला. काहीहि प्रतिकार करता न ते सैरावैरा पळत सुटले. लढाई तीन तासही चालली नसेल. तेवढ्यात दाराचा पराजय झाला.[1]

**दाराचे अहमदाबादेकडे प्रयाण. तेथून तो भक्कर किल्ल्याकडे जातो :** आपल्या सैन्याची दाणादाण उडालेली पाहून दाराने पळून अहमदाबादचा आश्रय घेण्याचे ठरविले. आपले कुटुंब, आणि तंबूतील मौल्यवान वस्तू इतकेच तो बरोबर नेऊ शकला. दिलेरखान व त्याची माणसे यांनी दाराचा सगळा सरंजाम लुटला. औरंगजेबाने दाराचा पाठलाग करून त्याला जिवंत अथवा मृत हस्तगत करावे असा राजा जयसिंग व बहादूरखान यांना हुकूम दिला.

आपण औरंगजेबाचे सासरे आहोत या गोष्टीवर शहानवाजखानाची फार भिस्त होती. त्यामुळे आपल्याला कोणी त्रास देणार नाही असे त्याला वाटले. औरंगजेबाला आपला भाऊ, आणि मुले यांचा छळ करण्यात काही संकोच वाटला नाही. दाराला गुजरातमध्ये येऊ दिले, आणि स्वतः त्याच्या पाठोपाठ रणांगणावर आला या गोष्टीबद्दल औरंगजेब आपल्या सासऱ्याला थोडीच क्षमा करणार होता ! या कारणाने औरंगजेबाची दिलेरखानाला खास आज्ञा होती की, शहानवाजखान कुठेही सापडला तरी त्याचा प्राण घेण्यास मागे पुढे पाहू नये. तसेच करण्यात आले.

दारा अहमदाबादेस आला तेव्हा त्याच्यापाशी थोडेच सैन्य होते. पण शहराच्या अधिकाऱ्याने शहराचे दरवाजे बंद करून टाकले. या ठिकाणी दाराचे अधिकारी बर्कंदाजखान व खोजा मुल्कीन आणि अनेक शिपायी त्याला सोडून औरंगजेबाला मिळाले.

अवघ्या दोन हजार सैनिकांना बरोबर घेऊन दुर्दैवी दारा सिंध प्रांताकडे रवाना झाला. राजा जयसिंग आणि बहादूरखान हे त्याचा पाठलाग करत होते. राजा जयसिंगाची मसलत अशी की पाठलाग तर चालू राहावा, पण दुर्दैवी राजपुत्राला निसटण्याची संधी मिळावी. दाराबद्दल जयसिंगाचे मत अनुकूल नव्हते हे खरे. तरी पण दाराचा प्राण जावा असे त्याला वाटत नव्हते. दाराला परराज्यात हाकलून लावणे पुरे असे त्याला वाटत होते. औरंगजेबाच्या हाती जर तो पडला तर तो निश्चितपणे मारला जाईल असे जयसिंगाला वाटत होते. शेवटी घडलेही असेच. जयसिंगाच्या मसलतीमुळे दारा कच्छला पोहोचला. पण तेथील राजापाशी पुरेसे सैन्य नसल्यामुळे दाराला तेथून सिंधची वाट धरावी लागली. त्याने मोठ्या कष्टाने

१. ही दोन दिवसांची लढाई जशनच्या शेवटच्या दिवसापूर्वी एक दिवस आधी संपली. (मार्च २३ १६५९.) दुसऱ्या दिवशी जयसिंग आणि बहादुरखान यांना दाराच्या पाठलागाकरिता पाठविण्यात आले. औरंगजेबाने राजवाड्यात परत प्रवेश केला. हा जशनचा शेवटचा दिवस होता. (मे २६, १६५९) (मा. आमीर–आलमगिरी. पा. १९–२२).

सिंधु नदी ओलांडली. त्यावेळी त्याच्याबरोबर ५०० हून अधिक माणसे नव्हती. तिकडून भक्करच्या किल्ल्याकडे जाण्याचे त्याने ठरविले. या किल्ल्याला खलीलुल्लाखानाने मोठ्या सैन्यानिशी कडक वेढा घातला होता. किल्लाही सरळ रस्त्यापाशी नव्हता. आडबाजूला होता.

भक्करला पोहचूनही जयसिंग आणि बहादुरखान यांना टाळता येणे दाराला शक्य नव्हते. त्याने पर्शिया (इराण) कडे जाण्याचा बेत केला. पर्शिया देश तेथून काही लांब नव्हता. मोगल राज्य आणि पर्शिया यांच्या सरहद्दीच्या बाटेवर जीवनखान नावाच्या सरदाराचा इलाखा होता. पूर्वी दाराने शहाजहानला सांगून जीवनखानला[1] तीन वेळा मृत्यूच्या दाढेतून वाचविले होते. काही गुन्हे केल्याच्या आरोपावरून शहाजहानने त्याला हत्तीच्या पायी देण्याची आज्ञा केली होती. पण कृतघ्न जीवनखानने दारा येऊन पोहचताच त्याला कैद करण्याचे ठरविले. या ठिकाणी दाराची आवडती बायको नुरमहाल[2] ही मरण पावली.

**दाराला कैद करण्यात आले :** याच सुमारास पाठलाग करत असलेला बहादूरखान येऊन पोहचला. दाराला पकडण्यात आले. तो आणि कुटुंबीय यांना हत्तीवर बंद हौदात बसविण्यात येऊन भक्करच्या दिशेने नेण्यात आले. सैन्याच्या आघाडीला राजा जयसिंग आणि पिछाडीला बहादूरखान असा दारासाठी बंदोबस्त करण्यात आला होता.

हा सर्व काळ आम्ही भक्करच्या किल्ल्यात होतो. किल्ल्यावर सतत हल्ले होत. पण आम्ही मोठ्या धीटपणे आमचे रक्षण करत राहिलो. शस्त्रबळाचे सर्व प्रयत्न करूनही त्यांना आम्हाला जेरीस आणता येईना. म्हणून त्यांनी तोफखान्यावरील युरोपियन अधिकारी किल्ल्यातून निघून जावेत म्हणून प्रयत्न सुरू केले. त्यासाठी त्यांनी टोकाला पत्र जोडलेले बाण किल्ल्यात सोडले. या पत्रात दाराची नोकरी सोडून किल्ल्यातून निघून जाण्याबद्दल आम्हाला विनंती केलेली असे. यापैकी एक बाण मी रात्री आठ वाजता माझ्या बुरुजावर बसलो असताना माझ्या खांद्याला लागला. मी जखमी झालो. बाण काढून मी तसाच खोजाकडे गेलो. माझ्या एकनिष्ठपणाबद्दल त्याने मला पोषाख (सरापा) व गुलाब पाण्याच्या बाटल्या दिल्या.

खलीलुल्लाखानला औरंगजेबाने बजावून सांगितले होते की, या ना त्या उपायांनी किल्ला जिंकलाच पाहिजे. शस्त्रांच्या बळावर तो जिंकता येईना, मग खलीलुल्लाखानाने

---

१. मलीक जीवन. दादरचा राजा. याला पुढे बख्तयारखान करण्यात आले. (मा. आलमगिरी. पा. २३)

२. नादीरा बानो बेगम ही जहांगीरचा मुलगा सुलतान पारवीझची मुलगी होती. ती रमझानच्या महिन्यात १०६९ हि. (मे-जून १६५९) ला सिंधमध्ये मरण पावली. (मा. आलमगिरी पा. ७४. ५ वी ओळ).

अनेक आमिषे दाखविलेली पत्रे ख्वोजा बसंतला पाठविली. जर तू किल्ला आमच्या ताब्यात देशील तर तुझ्या मागण्या पुऱ्या करू असे त्यास कळविले. ख्वोजा बसंतने शेवटी संतापून त्याला कळविले की, "तुम्ही समक्ष याल तर तुम्हास अपेक्षित असा करार करता येईल. दाराची परिस्थिती एकदर वाईट झालेली पाहून किल्ला तुमच्या ताब्यात देण्याचा माझा विचार आहे." हा किल्ला मिळावा अशी औरंगजेबाची उत्कट इच्छा होती. त्यामुळे हे पत्र मिळताच खलीलुल्लाखानाला आनंद झाला. केव्हा एकदा किल्ला स्वाधीन होतो, याची त्याला कोण घाई झाली होती. म्हणून उरलेल्या सैन्यानिशी तो लाहोरहून निघाला. तो येऊन पोहचल्यावर दोन्ही बाजूंनी शस्त्रसंधी करण्यात आली. खलीलुल्लाखानाने ख्वोजा बसंतला पुढील प्रमाणे पत्र लिहिले. "हा किल्ला स्वाधीन करणे हे तुम्हाला फलदायक आहे. यामुळे तुम्ही औरंगजेबाची मर्जी संपादन कराल. तुमच्या भाग्योदयाचा तोच एक मार्ग आहे."

ख्वोजा बसंतने खलीलुल्लाखानाच्या पत्राचे उत्तर पाठविण्याचे ठरवले. म्हणून त्याने मला बोलावणे पाठविले आणि खलीलुल्लाखानाचा तळ ज्या बागेत होता, त्यादिशेने असलेली तोफ शिंगे व जुन्या पादत्राणांनी भरण्याची त्याने मला आज्ञा केली. त्याला पाठविलेले उत्तर या स्वरूपाचे होते. "मला तुमच्याशी अधिक बोलायचे नाही. मला तुमच्या वागणुकीचे मोठे आश्चर्य वाटते. तुमचा सगळा जन्म भडवेगिरी आणि बायकांचे जोडे खाण्यात गेला आहे. तुमचे गुण आणि लायकी यास अनुरूप अशीच भेट मी पाठवीत आहे. ते त्याने खलीलुल्लाखानाकडे पोहचविण्यास सांगितले. पत्र घेऊन जाणारी नाव बागेजवळ केव्हा पोहचते ते ख्वोजाने पाहिले. बाग किल्ल्यापासून फार दूर नव्हती. खलीलुल्लाखान पत्र वाचत असावा असे दिसले. मग त्या बेताने ख्वोजाने आम्हास ती तोफ सोडण्यास सांगितले. आणि खलीलुल्लाखानाचा तंबू तोफेतील साहित्याने भरून निघाला.

त्या दगलबाजाला फार शरम वाटली. त्याची फार फसगत झाली. दुसऱ्या दिवशी रात्री आम्ही बेसावध असताना खलीलुल्लाखानाने आपल्या सर्व तोफा व बंदुकांचा भडीमार करण्याचा हुकूम केला. किल्ल्यात इतके गोळे पडले की एका निशाणावर लावलेला झेंडा तीन गोळ्या लागून त्याचे तुकडेतुकडे झाले. याच्यात थोडीशीही अतिशयोक्ती नाही. आमचा ख्वोजाही असली फुशारकी चालू देणार नव्हता. दुसऱ्या दिवशी आम्ही आमच्या तोफा, बंदुकामधून भडिमार केला. आम्हाला मुळीच भय वाटत नाही हे दाखविण्याकरिता त्या रात्री आम्ही नावातून दारूकामाची रोषणाई केली. यानंतर आपल्याला काही यश मिळत नाही असे पाहून, खलीलुल्लाखान लाहोरकडे निघून गेला. आमच्या भोवतीचा वेढा तसाच चालू राहिला.

खलीलुल्लाखान गेल्यावर चाळीस दिवसांनंतर एके दिवशी सकाळी किल्ल्यापासून काही अंतरावर नदीवरून पश्चिमेकडून पूर्वेकडे एक मोठे सैन्य जाताना आम्ही

पाहिले. आमच्या तोफखान्याने त्यावर जोराचा भडिमार केला. तोच एक घोडेस्वार एक लहानसे पांढरे निशाण घेऊन नदीकाठी आला. तावडतोब ख्वाजा बसंतने, त्या स्वाराला आणण्याकरिता एक नाव पाठविली. किल्ल्यात आल्यावर, ख्वाजाला एक पत्र देऊन तो म्हणाला "आमच्या बरोबर राजपुत्र दाराला कैदी म्हणून आणलेले आहे. किल्ला आमच्या स्वाधीन करा अशी औरंगजेबाच्या वतीने मी तुमच्यापाशी मागणी करत आहे." ही अनपेक्षित व दुःखदायक बातमी ऐकून आम्ही सर्व कष्टी झालो. आम्ही आपली शस्त्र खाली टाकली. ख्वाजा बसंतने त्या घोडेस्वाराला कळविले की, हा किल्ला मी दाराच्या वतीने लढवीत आहे. त्याच्या हुकुमाशिवाय मी तो देऊ शकणार नाही. हे उत्तर ऐकून घोडेस्वार निघून गेला.

तो स्वार दुसऱ्या काठावर पोहचण्यापूर्वीच सशस्त्र सैनिकांनी भरलेल्या सात नावा येताना आम्ही पाहिल्या. चघाटईखान नावाचा उझबेक जातीचा एक मनुष्य त्यांचा अधिकारी होता तो फार उत्साहात होता. मोठा जय मिळवून आपण आपल्या घरात प्रवेश करीत आहोत असेच त्याला त्यावेळी वाटले. ते जवळ आल्यावर आम्ही त्यांच्यावर तोफांचा मारा केला. त्यांचे पुष्कळ नुकसान झाले. ते माघारी जाऊ लागले. पण आमच्या तोफांचा मारा चालूच राहिला.

आमचा पक्का निर्धार झालेला आहे हे पाहून बहादूरखान राजपुत्र दाराकडे गेला. ख्वाजाला, किल्ला आपल्या स्वाधीन करण्याबद्दल हुकुम करण्याची त्याने दाराला विनंती केली. त्याने दाराला सांगितले की, किल्ल्यातील सैनिकांचा प्रतिकार करण्याचा निश्चय जर कायम राहिला, तर दुर्दैवाने त्यांना किल्ल्यातच मरण आल्यावेरीज राहणार नाही. हे ऐकून दाराला आम्हा सर्वांची दया आली. त्याने स्वतः हाताने ख्वाजा बसंतला चिठ्ठी लिहून कळविले "ज्याच्याकरिता तुम्ही लढलात तोच आता दुर्दैवाला बळी पडला आहे. तुम्ही आता किल्ला देऊन टाकावा अशी मी तुम्हाला विनंती आणि सूचना करतो. ख्वाजा बसंतने दाराचे हस्ताक्षर ओळखले व तो धाय मोकलून रडू लागला. त्याने बहादूरखानाला पत्र लिहिले "आमची अशी मागणी की आम्हा सर्वांस आपले सर्व सामान घेऊन जाण्याची परवानगी असावी. हे जर आपल्याला मान्य नसले तर तोफा व इतर सर्व खजिना नदीत फेकून देऊ आणि आम्ही जीवावर उदार होऊन शेवटपर्यंत लढू". बहादूरखानाने आश्वासन दिले की "तुम्ही आपल्या सर्व सामान सुमानासहित किल्ल्यातून बाहेर जाऊ शकता. पण खजिना, राजपुत्राची मंडळी आणि किल्ल्यावरील लवाजमा आमच्या स्वाधीन करावा लागेल. दुसरी अट अशी की, आपण (बहादूरखान) दिल्लीची वाट धरल्यानंतर आठ दिवसांनी तुम्ही नदीच्या पश्चिम काठावर जावे आणि मग दिल्लीची वाट धरावी." ही अट घालण्याचे कारण त्याला ही भीति वाटली की, न जाणो आम्ही दाराच्या सुटकेचा प्रयत्न करायचे. अनेक हाल अपेष्टा सहन करून आम्ही तीन दिवसांनंतर निघालो त्यापूर्वी दोन दिवस आधी मी (मनुची) दोन वासरे सहाशे रुपयांना

खरेदी केली होती. एक औंस लोण्याकरिता एक रुपया दिला होता. अतिशयोक्ती करत नाही, कोंबडीच्या एका पिलाकरिता मला तेरा रुपये द्यावे लागले.

**दाराची दिल्लीकडे रवानगी :** औरंगजेब अजमीरची लढाई पुरी करून दिल्लीला परत आला होता. तडक मजल मारून दाराला आपल्या समोर हजर करण्याचा बहादूरखानाला त्याचा निरोप मिळाला. अतिशय बंदिस्त अशा अवस्थेत दाराला घेऊन येण्याबद्दल बहादूरखानाला बजावण्यात आले. कोठे गडबड झाल्यास तावडतोब दाराचे शीर उडवावे असा त्यास हुकूम होता.

चाळीस दिवसांनी ते दिल्लीजवळ पोहचले. औरंगजेबाला हे कळविण्यात आले. अधिक सावधगिरी बाळगल्याकरिता त्याने अनेक तुकड्या बहादूरखानाकडे रवाना करण्याचा हुकूम दिला. "दाराला हत्तीवर उघड्या हौद्यात बसवून आणा. बाजूला त्याचा मुलगा सिफिह्र शुको याला बसवा. मागे नागवी तलवार घेतलेला मनुष्य ठेवा." असा त्याने हुकूम पाठविला. अशा अवस्थेत त्यांनी या दुर्दैवी राजपुत्राला शहरात आणले. दाराच्या भोवती नागव्या तलवारी घेतलेल्या घोडेस्वारांची अनेक पथके होती. दाराच्या हत्ती शेजारी बहादूरखान आपल्या हत्तीवर एकटाच बसलेला होता. अशा रीतीने तो दुःखी राजपुत्र १६५७ च्या (खरे वर्ष १६५९) ऑक्टोबरच्या बावीस तारखेस दिल्लीच्या मुख्य रस्त्यातून जाऊ लागला. हात मोकळे होते पण पायात बेड्या होत्या. खिन्न वदनाने तो जात होता. त्याचा चेहरा असे दर्शवित होता की आपले मरण जवळ आले आहे हे जणू काही त्याला दिसत होते. तो किल्ल्याच्या जवळ आल्यावर, त्याच्याकडे पाहून एक फकीर ओरडला "अरे दारा! तू जेव्हा मालक होतास तेव्हा मला नेहमी भिक्षा घालत होतास. आज मला द्यायला तुझजवळ काही नाही हे मला माहित आहे". दाराने आपला हात खांद्याकडे नेला आणि आपली मळलेली शाल फकीराकडे फेकली. पण जवळच असलेल्या बहादूरखानाने, "कैद्याला देणगी देण्याचा अधिकार नसतो" असे म्हणून ती काढून घेण्याचा हुकूम केला.

नंतर दाराला राजवाड्यासमोर दोन तास थांबविण्यात आले. सर्वांच्या नजरा त्याच्याकडे लागल्या होत्या. दुपारच्या उन्हाचा तडाखा तो सहन करीत होता. दाराची वस्त्रे अपुरी व मळलेली होती. हे दुःखदायक दृश्य ज्यांनी पाहिले त्यांना दाराची दया आली. कारण एवढ्या थोड्या अवधित हा ऐश्वर्यवान राजपुत्र पूर्ण विपन्नावस्थेस पोहोचला होता.

बिचारा राजपुत्र! आपल्याला काय शिक्षा दिली जाणार आहे याची वाट पहात बसला. त्याचा आणखी अपमान करण्याकरिता त्याला हत्तीवरून उतरवून पायात बेड्या असताना आपल्यासमोर आणण्यास औरंगजेब सांगणार होता. असे करणे शहाणपणाचे होणार नाही, असा शाहिस्तेखानाने त्यास सल्ला दिला. यमुना नदीच्या

काठी खिजराबाद[1] नावाच्या शहराबाहेर असलेल्या शहाजहानपुरा एका बागेत राजपुत्र दाराला नेण्यात आले.

दाराला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात थोड्याच दिवसांत पाठविण्यात येईल, असा खोटाच हुकूम काढण्यात आला. सामान्य लोकांना अतिशय दुःख झाले आहे हे औरंगजेबाने ओळखले होते. मग दाराच्या विश्वासातील लोकांच्या इच्छा काय आहेत ते कळण्याकरिता औरंगजेबाने एक युक्ती शोधून काढली. दाराला मारावे अथवा ग्वाल्हेरच्या किल्ल्यात पाठवावे यासंबंधी त्याने आपल्या सरदारांचे मत घेतले. दाराला ठार मारावे असा त्याने मनाशी पक्का निर्धार केला होता. सरदारांना औरंगजेबाची इच्छा माहित होती. आपले मत विचारणे हे केवळ ढोंग आहे हेही त्यांना माहित होते. दाराला ठार मारावे, असे त्यांनी आपले मत दिले. असे न केल्यास दाराची कधी ना कधी सुटका होईल अशी लोकांची अपेक्षा राहील आणि यामुळे ते औरंगजेबाची मनापासून सेवा करणार नाहीत असे त्यांचे मत होते. त्यांनी दुसरे असेही कारण दिले की, दारा हा धर्महीन, मूर्तिपूजक आणि इस्लाम धर्माचा शत्रु आहे. दानिशमन्द खान याचे मात्र हे मत नव्हते. वास्तविक पाहाता त्याचे व दाराचे काहीही संबंध नव्हते. दाराला मारण्यात यावे, असे आग्रहाने सांगणाऱ्यात, शाहिस्तेखान, मुहम्मद अमीनखान, बहादूरखान, आणि फकीर दाऊतखान (तकर्रुबखान) हे होते. सरदारांचे मत ऐकून औरंगजेबाला आनंद झाला. दाराचा मृत्यु व्हावा याहून उत्कृष्ट अशी त्याची इच्छा काय असणार. ऑक्टोबरच्या २६ तारखेला (१६५९) त्याने सिफीहर शुकोला दारापासून वेगळे करण्यात यावे आणि त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात नेऊन ठेवण्यात यावे असा कुल्हीसखान[2] (कदाचित किलीची खान अथवा मुखलीसखान असे असावे) याला हुकूम केला, मात्र त्याला (सिफिहर शुको) अफुचे पाणी देण्यात येऊ नये एवढे मात्र मान्य करण्यात आले. आपल्या मुलाला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात पाठविले. त्या हुकूमात आपल्याबद्दल काहीही उल्लेख नाही, हे कळल्यावर दारा समजला की आता आपल्याला फार थोडे दिवस जगायचे आहे.

**दाराचा शिरच्छेद करण्याचा औरंगजेब हुकूम देतो :** दाराच्या देहान्ताच्या शिक्षेचा हुकूम काढण्यापूर्वी औरंगजेबाने त्याला निरोप पाठवून असे विचारले की "दैव आज तुला जितके प्रतिकूल झाले आहे, तितकेच अनुकूल झाले असते, आणि मला (औरंगजेबाला) तू कैद केले असतेस, तर तू काय केले असतेस? काही जरी झाले तरी औरंगजेब आपल्याला जिवंत ठेवणार नाही, आणि हा प्रश्न आपला उपहास

१. दारा शुको याला खिजराबाद येथील खवासपुरा भागात कैद करून ठेवण्यात आले होते. (खाफीखान II ८६, आलमगीर नामा पा. ४३१).

२. आलमगीर नाम्यात "सैफखान" असा उल्लेख आहे.

करण्यासाठीच विचारलेला आहे, हे दारास ठाऊक होते. दाराने राजपुत्र या हुद्यांने आपल्या व्यक्तीत्वास साजेसे उत्तर दिले, "अशी परिस्थिती आली असती तर तुझ्या शरीराचे चार तुकडे करून दिल्लीच्या चार दरवाज्यांच्या पुढे उघडे फेकून देण्यास सांगितले असते."

हे उत्तर औरंगजेबाला कळविण्यात आले. असल्या अवज्ञेबद्दल व फाजिल मोकळीक घेतल्याबद्दल तो अतिशय संतापला. त्याने आपल्या सर्वांत वडील भावाला देहान्ताची शिक्षा फर्मावली. हे कृत्य कोण करू शकेल, असे विचारल्यावरून हे भयंकर आणि अतिशय धोक्याचे काम करण्याची तयारी नसर (नझरबेग चेल्हा) बेग याने दाखविली. नझरबेग हा शहाजहानचा गुलाम असून त्याच्या पदरीच तो वाढला होता. आपल्या बरोबर त्याने सात माणसे घेतली. ती अशी :— मकबुल, महर्रम, मशहूर, असारून, फुराद, मुराद आणि फत्तेबहादूर हे होत. हे सर्व दरबारातून निघाले. यानंतर लोकांची फसवणूक करण्याकरिता औरंगजेबाने सैफखानाबरोबर चार हजार घोडेस्वार, स्वयंपाकाची भांडी व प्रवासाला लागणाऱ्या इतर वस्तू लादलेले उंट तयार ठेवण्यास सांगितले. सगळीकडे जाहीर मात्र असे केले की सैफखान[1] लवकरच दाराला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात घेऊन जाणार आहे.

शिरच्छेद करण्याकरिता आलेले हे लोक खिजराबागेत संध्याकाळी सात वाजता येऊन पोहोचले. त्यांनी दारावर हात टाकला. आणि काहीही दयामाया न दाखविता त्याला खाली पाडून त्याचे डोके कापले. धड तेथेच रक्ताच्या थारोळ्यात पडू देऊन ते शिर घेऊन झटपट औरंगजेबाकडे गेले. त्यावेळी रात्रीचे आठ वाजले होते. तो राजवाड्याच्या बागेत होता. शहाजहानचा लाडका मोठा मुलगा आणि मोगल साम्राज्याचा युवराज, लोकांना आदरणीय असलेला असा हा दुर्दैवी राजपुत्र दारा. त्याचा असा हृदयद्रावक रीतीने शेवट झाला.

**दाराचे शिर शहाजहानकडे पाठविण्यात आले :** दाराचे शिर येऊन पोहोचले आहे, हे औरंगजेबाला समजताच त्याने ते एका थाळीत घालून बागेत आणण्यास सांगितले. तत्पूर्वी चेहऱ्यावरील व पागोट्यावरील रक्त साफ करून घेतले. दिवे आणण्यास सांगितले. त्याच्या प्रकाशात राजपुत्र दाराच्या कपाळावरच्या खुणा तपासून पाहिल्या कारण त्याला खात्री करून घ्यावयाची होती की हे शिर दाराचे की दुसऱ्या कोणाचे आहे. त्याची खात्री झाली. मग त्याने ते खाली जमिनीवर ठेवण्यास सांगितले. आपल्या हातातील तलवारीने त्याने शिराला तीन वेळा डिवचले. औरंगजेबाने गुप्तपणे आज्ञा केली की, ते शिर पेटीत ठेवून शहाजहानच्या कैदखान्यावरील अधिकारी इतिबारखान यांच्याकडे पाठविण्यात यावे. शहाजहान दारावर अतिशय प्रेम करत

१. आलमगीर नाम्यात पा. ४३३ वर सैफखानाचा निर्देश आहे. ग्वाल्हेरहून परत आल्यावर काश्मीरला तो गव्हर्नर (सुभेदार) म्हणून गेला.

असे. त्या उलट औरंगजेबाला तो विचारीतही नव्हता. याचा सूड उगविण्याचा औरंगजेबाने वरील मसलत केली. जणू काय शहाजहानला त्याला म्हणायचे होते "शाहा तुमच्या लाडक्याचा शेवट. तुम्ही ज्याला तुच्छ लेखीत होता, तो आता साम्राज्याचा अधिकारी आहे. आणि तुमचा आवडता दारा मृत्यु पावला आहे." त्या रात्री औरंगजेबाची लाडकी बहीण रोशन आरा बेगम हिने मोठी मेजवानी दिली.

दारा याची लावण्यवती कन्या जानी बेगम हिला राजवाड्यात आणण्याचा औरंगजेबाने हुकूम केला. नुरमहाल बेगमने विष प्राशन करून जीव दिला हे मी (मनुची) या पूर्वीच सांगितले आहे. आपल्या बापाच्या जागी, राजवाड्यात त्याचा खुनी सिंहासनावर बसलेला पाहून, तिला अतिशय दुःख झाले. तिच्या डोळ्यातून अश्रूंची धार लागली. रोशन आरा बेगम तिला फार वाईट वागवत असे. ती तिला मृतांच्या गोष्टींची सतत आठवण देत असे. ही पोरगी सारखी झुरत चालली आहे हे पाहून औरंगजेबाने तिला आग्र्याला शहाजहान आणि बेगमसाहेब (जहानारा बेगम) यांच्याकडे पाठविले. ती आपल्या नजरेत वावरते आहे हे पाहून वृद्ध बादशहाचा दुःखभार थोडा कमी झाला. जहानारा बेगमलाही आनंद झाला. जानी बेगम ही सुंदर होती. आणि आपल्या मातापित्यांची मूर्तिमंत प्रतिकृती होती. आपल्या बापाच्या खुन्याला आता पाहावे लागणार नाही; आणि क्रूर रोशन आरा बेगम हिच्या जाचातून आपली सुटका झाली हे पाहून जानी बेगमला आनंद झाला.

**दाराची जॉर्जियन बायको औरंगजेबाची राणी होते रानादिल राणीपदाचा अव्हेर करते :** औरंगजेबाने दाराच्या दोन बायकांना बोलावणे पाठविले. एक चंचल स्वभावाची उदेपुरी—ही जॉर्जियन वंशाची होती व दुसरी एकनिष्ठ रानादिल, ही जन्माने हिंदू होती. औरंगजेबाची आज्ञा मानून उदेपुरी त्याच्या पुढे हजर झाली तिला त्याने आपली पत्नी म्हणून स्वीकारले. तिच्यापासून त्याला राजपुत्र कामबक्ष[1] हा झाला. परंतु रानादिल, म्हणजे सच्छिल—हिने त्याला निरोप पाठवून विचारले "मला भेटण्याची आपण इच्छा का करता ?" तिला सांगण्यात आले पत्नी म्हणून बादशहा तुझा स्वीकार करू इच्छितो. "ज्येष्ठ भावाच्या विधवा ह्या धाकट्या दीराच्या मालकीच्या होत असा नियम आहे." "माझ्यात आपल्याला काय आवडले म्हणून आपण माझ्यावर मोहित झाला आहात ?" असे रानादिलने विचारून पाठविले. "तुझे केस मला फार आवडतात," असे औरंगजेबाने उत्तर दिले. यावर तिने आपले सगळे केस कापून ते औरंगजेबाकडे पाठविले; आणि सांगितले "तुला जे सौंदर्य हवे होते ते तुला मिळाले. आता मला एकांतवासात काळ कंठू दे परंतु

१. कामबक्ष हा औरंगजेबाचा पाचवा आणि सर्वांत धाकटा मुलगा होता. याचा जन्म रमजानच्या १० तारखेला १०७७ हि. (मार्च ६, १६६७) ला झाला. त्याची आई बेगम उदेपुरी ही होती. (मा. आसीर-इ-आलमगिरी. पा. ५३८).

औरंगजेबाला तिच्याशी लग्न करण्याची इच्छा होती. त्याने तिला पुनः कळविले की "तुझे सौंदर्य अप्रतिम आहे. पत्नीच म्हणून मी तुझा स्वीकार करीन. मी दाराच असे तू समजून चालावेस. राणी म्हणून तुझ्या मानमरातबात यत्किंचितही उणीव राहणार नाही. नाहीतरी तू माझ्या बंधूची पत्नीच होतीस."

रानादिल मोठी धैर्याची होती. ती आपल्या महालात गेली. एक सुरी घेऊन तिने आपल्या चेहऱ्यावर सपासप भोसकून घेतले आणि रक्त एका वस्त्रात गोळा करून ते औरंगजेबाकडे पाठवून दिले. "आपणास जर माझ्या मुखड्याचे सौंदर्य पाहिजे असेल तर तो आता विद्रुप झाला आहे आणि माझे रक्त जर आपणास संतोष देत असेल तर तशी आपणास मोकळीक आहे," असे तिने त्याला कळविले. तिचा असा निर्धार पाहून औरंगजेबाने आपला आग्रह सोडून दिला. तिचा एकनिष्ठपणा पाहून तो तिला आदराने वागवू लागला. रानादिल ही हलक्या कुळात जन्मलेली एक सामान्य नर्तकी होती. ती शहाजहानच्या पदरी होती. तिच्या अनुपमेय लावण्यावर दारा अनुरक्त झाला. त्याला तिच्याशी लग्न करायचे होते. दाराची प्रमुख पत्नी नुरमहाल हिला दुःख होऊ नये, म्हणून शहाजहान या लग्नाच्या विरुद्ध होता. परंतु दाराने ही गोष्ट मनाला इतकी लावून घेतली की तो झुरणीला लागला आणि जवळ जवळ शेवटच्या घटका जणू तो मोजतो आहे इतकी त्याची अवस्था झाली. आपल्या मुलाची ही अवस्था पाहून शहाजहानने या लग्नाला मान्यता दिली. यामुळे रानादिल स्वतःला धन्य मानू लागली. राजपुत्राच्या मृत्यूनंतर ती दुसऱ्या कोणाची पत्नी म्हणून राहाण्यास तयार झाली नाही. नंतर जे काही थोडे दिवस ती जगली, तेवढ्यात तिला कधी आनंदी अथवा ख्यालीखुशालीत कोणीही पाहिले नाही.

दाराच्या मृत्युनंतर सामान्य लोकांनी भाग्य व त्यामुळे येणारे ऐश्वर्य ही किती क्षणभंगूर असतात, यावर एक फटका तयार केला. दैवाने औरंगजेबाला तख्तावर बसविले, शहाजहानला बंदिवान केले आणि दाराचा शिरच्छेद केला. ह्या फटक्यात असे म्हटले होते "दैवाच्या फेऱ्याने फकीराची (औरंगजेबाची) कफनी बदलली आणि जाताजाता एका राजपुत्राचा शिरच्छेद केला. औरंगजेबाने जेव्हा या गाण्या-संबंधी ऐकले तेव्हा त्याने एक दौंडी पिटविण्यास सांगितले, "हे गाणे कोणीही गाऊ नये. गाणारास जीभ छाटली जाण्याची शिक्षा मिळेल." परंतु ते गाणे इतके करुणा-स्पद होते की, प्रत्येक जण लपून लपून ते गुणगुणत असे.

भक्करचा किल्ला आम्ही शत्रूच्या स्वाधीन केला आणि सुलेमान शुकोची दोन मुले, किल्ल्यातील संपत्ति हीही त्यांच्या स्वाधीन केली. सुलेमान शुकोच्या या दोन मुलांचे पुढे काय झाले हे कळले नाही. औरंगजेबाच्या आज्ञेने त्यांना किल्ल्यातच नाहिसे करून टाकण्यात आले असावे, असे वाटते. पंधरा दिवसानंतर ख्वोजा व किल्ल्यातील सर्व माणसे नावातून निघाली. आम्ही मुलतानकडे निघालो. आम्ही प्रवाहाच्या

विरुद्ध जात होतो; पण वारा अनुकूल होता. चोवीस दिवसात आम्ही मुलतानला पोहोचलो. या शहराचा प्रशासक या वेळी लष्करखान[1] हा होता. त्याने आमच्या खोजाला (वसंत) आपल्या घरी भोजनाचे आमंत्रण दिले. "मला आपल्या घरी भोजनास येण्यास आनंदच झाला असता. परंतु मी फार घाईत आहे. त्यामुळे मला आपले आमंत्रण स्वीकारता येत नाही." असे त्याने उत्तर पाठविले. तेथे काही तरी विश्वासघात होईल अशी त्याला शंका आली. पुढे ओढवणाऱ्या संकटाची त्याच्या मनाने त्याला जणू पूर्वसूचना दिली असावी.

मुलतान शहरात आम्ही दिल्लीच्या प्रवासाची तयारी केली. तेथे जाण्यास मुलतानहून पंचवीस दिवस लागत. एके दिवशी ऑगस्तिनो डायस नावाचा एक पोर्तुगीज मजकडे आला व तो खोजाची सोबत सोडून देण्याबद्दल मला विनंती करू लागला. कारण असे की, औरंगजेबाचा असा निश्चित हुकूम सुटला आहे की वसंतला पकडून ठार मारावे. आम्ही मुलतान सोडले व दहा दिवसांत लाहोरला पोहचलो. तेथे खलीलुल्लाखान हा सुभेदार होता. खोजा वसंत नदीकाठावर असलेल्या आपल्या स्वतःच्या घरात राहिला. त्याचे सर्व लोक निरनिराळ्या ठिकाणी पांगले होते. आम्ही युरोपियन लोक खोजा वसंतच्या घरापासून अर्ध्या मैलाच्या अंतरावर राहिलो.

**मुलतान शहरी मनुचीवर बेतलेले कठीण प्रसंग :** तेथे आल्याच्या तिसऱ्या दिवशी खोजाने मला बोलावणे पाठविले. पण संध्याकाळ झालेली असल्यामुळे मी काही गेलो नाही. दुसऱ्या दिवशी पहाटेला घोड्यावर बसून मी निघालो. वाटेत मला दिलावर नावाचा माझा एक जुना नोकर भेटला. कोठे निघाला म्हणून त्याने मला विचारले. मी खोजाच्या घरी जाण्यास निघालो आहे असे मी त्यास सांगितले. ते ऐकून तो घाबरून म्हणाला "कृपा करून तिकडे जाऊ नका. कारण प्रत्येक जण असे म्हणतो आहे की खोजा आज निश्चितपणे मारला जाणार आहे. गावात निरनिराळ्या ठिकाणी सैनिकांची पथके ठेवलेली आहेत हे मला उघड उघड दिसत होते. मला त्याने परत जाण्याचा फार आग्रह केला. पण खोजाबद्दल मला जे प्रेम व कृतज्ञता वाटत होती, त्यामुळे तेथे असलेल्या धोक्याचा विचार न करता मी त्याच्या घराकडे निघालो.

थोड्याच वेळात मी खोजाच्या घरी पोहचलो. आत गेल्यावर मी त्याच्या शेजारी जाऊन बसलो. तो काहीसा अस्वस्थ दिसला. इतक्यात त्याच्याकडे एक घोडेस्वार आला. त्याने खोजाला खलीलुल्लाखानाचा पुढीलप्रमाणे निरोप दिला. "बादशहाने

१. लष्करखान (जान निसार खान) हा अबरदस्त खानाचा मुलगा होता. शहाजहानच्या कारकीर्दीच्या शेवटी हा काश्मीरचा प्रशासक (सुभेदार) होता. आलमगीराने १०६८ हि. मध्ये त्याला मुलतानला बदलले. तो एकामागे एक अशा पुढील ठिकाणांचा प्रशासक होता : पाटणा, बहार, मुलतान. शेवटी तो मीरबक्ष झाला. १०८१ हि. (१६७०–७१) त तो मरण पावला. (मा. आमीरे उल-उमरा-iii-१६८).

आज्ञा केली आहे की, आपण शहरात येऊन दाखल व्हावे. तेथे आपल्यासाठी एक वाडा तयार ठेवण्यात आला आहे. तेथे आपण सुरक्षित राहू शकता."

खोजाने मोठ्या अदबीने खलीलुल्लाखानाला कळविले की "मी एक पान्थस्थ आहे. बादशहाकडे जात आहे, मला या गावाशी काही कर्तव्य नाही. आपल्या मेहरबानी-बद्दल मी फार आभारी आहे." निरोप घेऊन जासूद निघाला. पण सैन्याच्या तुकड्या पुढे येत आहेत, असे पाहून खोजा काहीसा घाबरला. "तुम्ही आपली माणसे ताबडतोब गोळा करू शकाल काय" असे त्याने मला (मनुचीला) विचारले. "ते लांब असल्यामुळे त्यांना वेळेवर येता येणार नाही. थोडा वेळ लागेल." असे मी त्याला सांगितले. याच वेळी खोलीत असलेले सैनिक एकमेकांच्या कानात कुज-बुजून एकेक उठून बाहेर जाऊ लागले. मी इतर दहा जणांबरोबर बसून राहिलो. धोका पाहून मलाही निघून जावेसे वाटले. पण तारुण्याची गुर्मी आणि अनुभवाचा अभाव यामुळे मी उठलो नाही. त्याचा शेवट काय होतो, हे पाहण्याचे मी ठरविले.

मग खलीलुल्लाखानाकडून दुसरा तातडीचा संदेश आला. तो असा होता : "या संदेशाकडे जर आपण लक्ष पुरविले नाही, तर आपल्या जीवितास धोका पोहचेल." परंतु खोजाने तेच उत्तर दिले. घोडदळ व पायदळ ही पुढे सरकत होती. खोजा बसून ते सर्व शांतपणे पाहात होता. आम्ही बसलो होतो ती जागा जरा उंचावर असून तेथून नदीच्या पात्राचा देखावा दिसत होता. आमच्या जागेला लागून काही झाडे होती. आणि सर्व बाजूंनी एक ठेंगणीशी भिंत होती. भिंतीजवळ आम्ही होतो त्याच्या खालच्या बाजूला, खोजाचा एक नातेवाईक रक्षणासाठी, जीवावर उदार होऊन, हातात भाला घेऊन घोड्यावर स्वार झाला होता.

तिसरा निरोप अत्यंत निकडीचा म्हणून आला. "कृपा करून बादशहाच्या आज्ञे-प्रमाणे किल्ल्यावर हजर व्हा. ही शेवटची ताकीद आहे." खोजाने त्याचे उत्तर दिले नाही. जासूद थावतच निघालेला आम्ही पाहिला. परिस्थिती फार गंभीर होती. घोडेस्वार पुढे पुढे येत असलेले आम्ही पाहिले. मग फार गोंधळ माजला. पायदळाने घराला वेढा दिला. आम्ही जेथे होतो त्या ठिकाणावर सैनिकांनी बाणांचा वर्षाव चालू केला. घोड्यावर बसलेला खोजाचा नातेवाईक हे पाहून झटापट करू लागला. झटापटीत तो एका दलदलीत फसला व शत्रूंच्या बाणांना बळी पडला.

पायदळातील सैनिकांनी भिंत चढून येण्याचा प्रयत्न केला. परंतु आम्ही आपले रक्षण केले. आम्ही मारलेल्या लोकांत तेथील कोतवालाचा मुलगा होता. यामुळे संतापून त्यांनी आमच्यावर अधिक जोराचा हल्ला केला. त्यांच्यापैकी एका चिवट माणसाने भिंतीवरून उडी मारली. तो तडक खोजाच्या मागे आला आणि त्याने ताबडतोब खोजाचा शिरच्छेद केला. आता पुष्कळजण भिंत ओलांडून आले.

आमच्यापैकी जे थोडे लोक राहिले होते, त्यांची त्यांनी कापाकाप सुरू केली. ज्याने खोजाला ठार केले तो व इतर माणसे आता माझ्यावर वेगाने चालून आली. आपले आता चालत नाही, असे पाहून मी त्यांच्याकडे गेलो. तलवार जमिनीवर टाकून, मी दोन पावले पुढे झालो व नम्रपणे उभा राहिलो आणि नतमस्तक होऊन म्हणालो "मला ठार मारा." माझ्यावर वार झाला नाही. मी मान वर केली. तोच मला दिसले की माझ्या आणि सैनिकाच्या मध्ये एक शिपाई उभा आहे आणि याला मारू नका असे विनवीत आहे. पण त्या सैनिकाने रक्ताने माखलेली तलवार वर उचलून त्याला रागाने म्हटले की "हो बाजूला." यावर दुसरा म्हणाला "प्रथम मला मारा पण याला वाचवा." माझ्या मारेकऱ्याने आपल्या सहकाऱ्याचा हा निश्चय पाहून तो तेथून निघून गेला. माझ्या रक्षकाने माझा हात धरला. आणि मला घेऊन जात असताना म्हटले "माझ्या बरोबर चल. मी तुझी सुटका करून सुरक्षित ठिकाणी तुला ठेऊ इच्छितो." माझ्या मनातला भाव समजून त्याने आपली तलवार म्यान केली आणि मला वचन दिले की "मी तुला इजा करणार नाही, इतरांनाही करू देणार नाही. तुला सुरक्षित जागी घेऊन जाईन, यात माझा प्राण गेला तरी बेहत्तर."

आम्ही एका पाठीमागच्या दाराने बाहेर आलो. तेथे तीस-एक लोक तलवारी घेऊन माझ्यावर धावले व ओरडले, "याला मारून टाका. हा खोजाच्या सेन्या-पैकीच आहे." माझ्या बरोबरच्या माणसाने माझ्या दंडावर एक हात ठेवला व दुसरा हात हालवून त्याने त्याना सांगितले की, "मी बादशहाच्या नावाने सांगत आहे की, याला मारू नका, याच्यावर हात टाकू नका." पण ते मला लुटण्याच्या इच्छेने आले होते. ते म्हणाले "तू याची बाजू घेतोस, कारण तुलाच याला लुटा-यचे आहे." या उद्गारांचे माझ्या रक्षकाला अत्यंत दुःख झाले. मला खात्री पटली होती की, या लोकांना मला मारून माझे काढेलसेही घ्यावयाचे होते. म्हणून मी माझे पागोटे व इतर मानाची वस्त्रे काढून टाकली. हे कपडे मी त्यांच्या-कडे फेकून दिले. मी फक्त सदरा व तोकडी तुमान ठेवली. माझ्या रक्षणकर्त्याने मला बाजूला नेले व सांगितले, "धोका टळला आहे. तू सुरक्षितपणे जाऊ शक-तोस." सुरक्षित आहे असे समजून मी निघालो. तोच एक लेडबळ शिपाई हातात नंगी तलवार घेऊन माझ्या अंगावर धावला व शिव्या देत त्याने माझ्या अंगा-वरील सदऱ्याची मागणी केली. माझा हा छळ व अपमान पाहून मी संतापलो व त्याला म्हणालो, "मला ठार कर पण मी माझा सदरा देणार नाही." मीपण त्याला शिव्यांची लाखोली वाहिली. हे, मला ठार करण्यास त्याला पुरेसे कारण होते. पण सदरा फाटेल, या विचाराने त्याने तसे केले नाही. शेवटी मरण्यापेक्षा सदरा गमा-वणे बरे, असे पाहून मी सदरा काढून त्याला तो देऊन टाकला आणि मान खाली घालून रस्त्याने चालू लागलो. मी अर्ध-नग्न असल्यामुळे मला फार लाज वाटत

होती. माझ्या दुल्हा नावाच्या एका विद्वान मुसलमान मित्राचा मी शोध घेऊ लागलो. वाटेत मला एक बाई भेटली. तिने अंगावर गुंडाळण्याकरिता एक वस्त्र देऊ केले. घरी गेल्यावर ते मला परत पाठवा, असे ती म्हणाली. उपकाराचे ओझे कशाला ? म्हणून मी नकार दिला आणि पुढे निघालो. माझ्या मित्राचे घर आता जवळ आलेले होते. इतक्यातच समोरून पायदळाचा एक अधिकारी येताना मला दिसला. मी यापूर्वी दगडाने त्याचे दात पाडले होते. त्याने मला ओळखले. पण माझी ही अवस्था पाहून त्याला माझी दया आली असावी. मला इजा न करता खाली मान घालून तो निघून गेला. थोडे अंतर चालून मी माझा मित्र दुल्हा याच्या घरी गेलो. त्याने मोठ्या प्रेमाने माझे स्वागत केले आणि अन्न आणि वस्त्रे पुरविली. माझी या अरिष्टातून मुक्तता केल्याबद्दल त्या कृपाळू परमेश्वराचे मी आभार मानले.

ही गोष्ट सकाळी आठ वाजता घडली. मी नसताना माझ्या नोकराने माझा घोडा पोहचविला आणि घरातील लोकांना माझ्या मृत्यूची बातमी दिली. माझ्या सर्व मित्रांना अतिशय दुःख झाले. त्यांनी आपल्यापैकीच एक, इग्नेशिओ गोमेन्स नावाचा माझा जिवलग मित्र दंगलीच्या ठिकाणी माझ्या प्रेताचा शोध करण्याकरिता पाठविला. माझे प्रेत घेऊन यावे अशी त्याला सूचना दिली, म्हणजे सर्व एकत्र जमून दफनविधी पार पाडता येईल. माझा मृत्यु झाला अशीच सर्वांची खात्री झाली होती. तेथे गेल्यावर त्याला अकरा प्रेतें दिसली. त्यामध्ये खोजाचे धडही होते. खोजाचे डोके खलीलुल्लाखानाकडे नेण्यात आले होते. खोजाने यापूर्वी खलीलुल्लाखानाचा जो अपमान केला होता, त्याचा सूड उगविण्यास तो आतूर झाला होता. गोमेन्सने जाऊन आपल्या लोकांना परिस्थिती सांगितली, व माझे प्रेत सापडले नाही हे त्यांना कळविले. दुसऱ्या दिवशी पुनः प्रेत शोधून काढावे व त्याचे दफन करावे असे त्यांनी ठरविले होते. पण परमेश्वर कृपेने मी अद्यापपर्यंत जिवंत होतो.

संध्याकाळी सहा वाजता मी माझा मित्र दुल्हा याचे घर सोडले व माझे अनुयायी होते त्या घराकडे निघालो. परमेश्वराचे मी आभार मानीत होतो. घरी पोहोचल्यावर त्यांच्याजवळ जाताच मी त्यांना ओळखले. पण जरी ते मजकडे पाहात होते, तरी मला ते ओळखू शकले नाहीत. मी जेव्हा मोठ्याने ओरडलो, तेव्हा त्यांनी माझा आवाज ओळखला. हात पसरून ते धावत माझ्याकडे आले. आनंदातिशयाने त्यांच्या तोंडून शब्द फुटेना. ते सगळे आनंदाश्रू ढाळू लागले. थोडा वेळ मी विश्रांती घेतली. नंतर, त्या दिवशी माझ्यावर बेतलेल्या प्रसंगांचा वृत्तांत आणि त्यातून परम दयाळू परमेश्वराने माझी सुटका कशी केली; हे सर्व मी त्यांना सांगितले.

दुसऱ्या दिवशी खलीलुल्लाखानाकडून आम्हाला सूचना आली की "तुम्ही बादशहासमोर हजर राहण्यासाठी जा. तेथे तुम्हाला नीट वागविले जाईल. यामुळे आम्हाला फार समाधान वाटले. त्याने आमच्या बरोबर एक अधिकारी व तीस

सैनिक पाठविले. या परिवारासह आम्ही आठ दिवसांत सरहिंद या गावी पोहो-चलो. गावात शिरण्यापूर्वी, वेशीजवळ आम्हाला पंधरा प्रेते दिसली. ही कोणाची प्रेते म्हणून चौकशी करता, आम्हाला सांगण्यात आले की ती प्रेते, जीवनखान, त्याचे नातेवाईक व नोकर यांची आहेत. जीवनखानाने राजपुत्र दाराला पकडून औरंगजेबाकडे नेले, त्याचे हे बक्षिस त्याला मिळाले होते. औरंगजेबाने सरहिंदच्या किल्लेदाराला आज्ञा केली होती की, जीवनखान आणि त्याची माणसे आपल्या देशी परत जाण्यासाठी सरहिंदवरून जेव्हा जातील तेव्हा त्यांना लोकांनी दगड घालून मारावे. जीवनखानाच्या कृतघ्नपणाची त्याला योग्य शिक्षा मिळाली हे पाहून आम्हास आनंद वाटला. मुसलमानांनी सुद्धा जीवनखानाच्या प्रेताला शिव्यांची लाखोली वाहिली.

**मनूची दिल्लीस जातो :** सरहिंदहून आम्ही पुढे राजधानीकडे निघालो; आणि सात दिवसांनी दिल्लीला पोहचलो. तेथे कळले की, पादशहाला खोजा बसंतच्या मृत्यूचे वाईट वाटले होते. त्याला धरावे अशी त्याची आज्ञा होती. मारण्याची नव्हती. खलीलुल्लाखानाने लिहून कळविले की, "खोजा बसंतला मारणे आवश्यक होते. खोजा बसंत बरोबर दोन हजार कसलेले सैनिक होते. दाराने भक्करच्या किल्ल्यात ठेवलेले उत्कृष्ट युरोपियन्स त्याच्या (खोजा बसंत) बरोबर होते. त्यांना बरोबर घेऊन श्रीनगरच्या (गढवाल) डोंगराळ भागात राजपुत्र सुलेमान शुको याला जाऊन मिळावे असा खोजा बसंतचा बेत होता." खोजा बसंतला मोकळा रस्ता मिळाला असता तर आम्ही सगळे सुलेमान शुकोकडे गेलो असतो यात काही संशय नाही.

तीन दिवसानंतर आम्हाला औरंगजेबासमोर हजर करण्यात आले. आम्ही त्याच्या नोकरीत राहावे अशी त्याची फार इच्छा होती. ज्या इमानीपणाने व धैर्याने आम्ही दाराची नोकरी केली होती त्याची त्याला जाणीव होती आणि आपल्या लोकांत असा इमानीपणा, अशी चिकाटी आढळत नाही याची पण त्याला जाणीव होती. म्हणून त्याने आता प्रत्येक युरोपियनाकरिता चार रुपये रोज व माझ्या-करिता पाच रुपये ठरविले. माझ्या सोबत्यांनी त्याची नोकरी स्वीकारली, परंतु असे करण्याची माझी इच्छा नव्हती कारण एक तर तो मला आवडत नव्हता. आणि दुसरे म्हणजे आपल्या धन्याच्या खुनेकऱ्याची नोकरी करणे मला पटत नव्हते. "आणि तुला नोकरी का नको? अधिक पगार हवा आहे का?" असे त्याने विचारले. "आपली नोकरी मी आनंदाने स्वीकारली असती. पण माझा देश सोडून मला अनेक वर्षे झाली आहेत मला आता परत जावेसे वाटते." असे मी त्याला कळविले मग त्याने मला निरोप दिला.

शाहाशुजाची स्थिती फार हलाखीची झाली. त्याने आराकानच्या राज्यात आश्रय घेतला. तेथे तो आणि त्याची बायकामाणसे यांचा मोठा हृदयद्रावक असा शेवट झाला.

दोन भावांचे व इतर अनेक लोकांचे मृत्यु एवढ्याने औरंगजेबाची आपल्या नातेवाईकांच्या रक्ताची तृष्णा शांत झाली नाही. दाराचा मुलगा सुलेमान शुको हा श्रीनगरच्या (गढवाल) प्रदेशात व तेथील राजाच्या रक्षणाखाली आहे हे समजल्यावर काहीतरी उपाय करून तो त्याला पकडून आणण्याच्या कामाला लागला. परंतु आपली वचनं आणि देणग्या यांजकडे श्रीनगरचा राजा काही लक्ष देणार नाही याची औरंगजेबाला खात्री होती. त्याने राजा जयसिंगाला मध्यस्त करून श्रीनगरच्या राजाला सुलेमान शुकोला आपल्यापासून अलग करण्याचा घाट घातला.

पुढीलप्रमाणे, श्रीनगरच्या राजाला राजा जयसिंगाने एक पत्र लिहिले. त्या पत्रात असे म्हटले होते की "आपण सुलेमान शुकोला औरंगजेबाच्या हवाली करणे इष्ट आहे. त्यामुळे औरंगजेबासारखा आपणास मित्र जोडता येईल. सुलेमान शुकोपासून कशाचीही आशा नाही. तो एक दुबळा राजपुत्र आहे. त्याच्या बापाचा मृत्यु झालेला आहे. त्याचा आपल्याला पुढेमागे उपयोग होईल. औरंगजेबाजवळ सेनापती, सैनिक आणि पैसा आहे. या गोष्टींच्या साह्याने तो आपले हेतू साध्य करून घेऊ शकेल. औरंगजेबाच्या शत्रुला आश्रय देणारा हाही औरंगजेबाचा शत्रूच होय. हे पत्र, तुमच्या राज्यात शांतता नांदावी या खेरीज दुसऱ्या कोणत्याही हेतूने मी लिहिलेले नाही. तुमच्या व तुमच्या कुटुंबाच्या प्रेमामुळेच आणि आपण दोघेही एकाच धर्माचे असल्यामुळेच ह्याही हेतूने मी हे लिहीत आहे."

**श्रीनगर (गढवाल) ला गेलेल्या सुलतान सुलेमान शुकोला अटक करण्यात येते. ग्वाल्हेरकडे त्याची रवानगी :** श्रीनगरच्या (गढवाल) राजाने जयसिंगाला पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले "जो कोणी माझ्याकडे संरक्षणासाठी आलेला आहे, त्याला माझ्या शत्रूच्या स्वाधीन करून माझ्या लौकिकाला धक्का पोहोचेल असे काही मी होऊ देणार नाही. मी आपल्या मैत्रीबद्दल आपला फार आभारी आहे. औरंगजेबाबद्दल म्हणाल, तर त्याच्या वचनांची काय अथवा धमक्यांची काय मला पर्वा नाही. तुझी शक्ति काय किंवा तुझे विजय काय याबद्दल मला काहीही वाटत नाही, असे आपण माझ्याकडून बादशहाला कळवा. मला त्याच्या स्नेहाची गरज वाटत नाही. त्याच्या पित्याने श्रीनगरवर तीस हजार घोडेस्वार आणि एक लाखांचे पायदळ अशी लहानशी सेना पाठविली होती. त्याची त्याला आठवण करून द्या. यातील बरेचसे पर्वतावरून नाके गमावून परतले. आणि बाकीच्यांनी आपले प्राण गमावले. आणखी त्याला हेही लक्षात ठेवण्यास सांगा की जो नाके कापू शकला तो डोकेही कापू शकतो. या बाबतीत औरंगजेबाला त्याच्या इच्छेला येईल तो निर्णय घेऊ द्या. परंतु पळून आलेल्या राजपुत्राला मी स्वतः त्याच्या (औरंगजेबाच्या) स्वाधीन करणार नाही अथवा स्वाधीन करू देणार नाही."

राजाचा हा निर्णय कळविल्यानंतर औरंगजेबाने श्रीनगरच्या (गढवाल) आजु-बाजूच्या राजांचा त्या राजाशी युद्ध करण्याकरिता उपयोग करण्याचे ठरविले. आपण स्वतः त्याला काही इजा करू शकत नाही हे त्याला ठाऊक होते म्हणून त्याने राजा जयसिंगाला एक हुकूम पाठविला की, "चांगल्या भपकेदार भेटी, भपलपथळ वचने व मुत्सद्दिगिरीची भाषा यांचा वापर करून त्या राजांची मने तयार करा, म्हणजे ते श्रीनगरच्या राजाविरुद्ध युद्ध करण्यास तयार होतील. तुम्ही श्रीनगरच्या राजाला, राजपुत्र सुलेमान शुको माझ्या स्वाधीन करण्यास भाग पाडा. मी तुम्हाला आणखी प्रदेश बहाल करीन." असे तो जयसिंगाला म्हणाला.

श्रीनगरचा (गढवाल) राजा आता वृद्ध झाला होता. त्याला एक तरुण मुलगा होता. तो गादी लवकर मिळविण्याची उत्कटतेने वाट पहात होता. त्यासाठी औरंगजेबाची आपणावर कृपा व्हावी म्हणून आपल्या बापाच्या इच्छेविरुद्ध व मनाविरुद्ध सुलेमान शुको त्याच्या (औरंगजेबाच्या) स्वाधीन करण्याची त्याने बोलणी सुरू केली. सुलेमान शुकोला गुप्तपणे औरंगजेबाच्या माणसांच्या स्वाधीन करण्याची त्याची योजना होती. ही माणसे त्यावेळी प्रत्यक्षात तेथील डोंगराच्या पायथ्याशी हजर होती. राजपुत्र सुलेमान शुकोला राजाच्या मुलाचा हा कट समजला आणि त्याने श्रीनगरपासून दूर राहण्याचे ठरविले. नेहमीच्या सवयीप्रमाणे त्याने शिकारीला जाण्याची संधि साधली. मात्र बेत तिबेटकडे निघून जाण्याचा होता.

सुलेमान शुको गेल्याचे वृत्त राजाच्या मुलास कळविले गेले. त्याबरोबर तो पुरेसे लोक घेऊन त्याच्या पाठलागास निघाला. आपल्या बापास त्याने आपल्या योजनेसंबंधी काहीच पत्ता लागू दिला नाही. सुलेमान शुकोस गाठून त्याने त्याला पकडले. हाता-पायात बेड्या ठोकल्या व आपल्या ह्या कैद्याला औरंगजेबाच्या माणसांच्या स्वाधीन केले. त्याच्या बरोबर त्याने औरंगजेबाला कळविले की, "माझ्या पित्याच्या इच्छे-विरुद्ध मोगल बादशहाकरिता मी हे मित्रांचे कृत्य केलेले आहे. जर एखादे वेळी मला आपल्या मदतीची व कृपेची गरज पडली तर साहाय्य नाकारले जाणार नाही अशी मी आशा करतो."

पळून गेलेल्या ह्या दुर्दैवी राजपुत्राला कैदी म्हणून दिल्लीला नेण्यात आले. तेथे लोक रात्री पोहोचले. ही वर्दी मिळताच औरंगजेबाने त्याला सलीमगड किल्ल्यात बंदिवासात ठेवण्याचा हुकूम केला. दुसऱ्या दिवशी त्याने त्याच्या पायातील बेड्या काढून त्याला आपल्या समोर आणण्यास सांगितले. हातातल्या पितळी बेड्या तशाच ठेवल्या होत्या. अनेकांना वाटले की त्या सोन्याच्या असाव्यात. हा दाराचाच मुलगा आहे की नाही याची औरंगजेबाला खात्री करून घ्यायची होती; म्हणून त्याने सुलेमान शुकोला आपल्या समोर आणवला होता. सुलेमान शुको हा अतिशय देखणा होता. तो जुल्मी बादशहा असुरी आनंदाने सुलेमान शुकोकडे पाहात होता. त्याला टोचणारा हा

शेवटचा काटा. इतर सर्व पूर्वीच मृत झालेले होते अथवा बंदिवासात खितपत पडलेले होते. दुर्दैवी सुलेमान शुको रडू लागला. आपल्याला जीवदान देण्यात यावे अशी त्याने विनवणी केली. मी आपल्याच रक्ताचा आहे, असेही त्याने सांगितले. पण अश्रूंनी द्रवण्याइतके औरंगजेबाचे हृदय दयाळू नव्हते. हा सुलेमान शुकोच आहे ना असे त्याने खात्री करून घेण्याकरिता सरदारांना विचारले. त्यात काहीच शंका नाही, तो सुलेमान शुको असल्याबद्दल सर्वांनी सांगितले.

मग त्याने सुलेमान शुकोला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात नेऊन ठेवण्याचा हुकूम केला; सुलेमान शुको ग्वाल्हेरच्या किल्ल्यात पोहोचल्यावर त्याला अफूचे पाणी पिण्यास देण्याचा त्याने हुकूम केला. एक महिन्याने त्याला विष देऊन ठार मारण्यात यावे अशी औरंगजेबाने आज्ञा केली. त्याप्रमाणे सुलेमान शुकोला मारण्यात येऊन तेथेच पुरण्यात आले.

श्रीनगरच्या वृद्ध राजाला आपल्या एकुलत्या एका मुलाने केलेल्या या नीच कृत्याबद्दल अतिशय खेद झाला. थोड्याच दिवसांत तो मरण पावला. " माझ्या मुलाने असा विश्वासघात करावा यापेक्षा माझे राज्य गमावले असते तर बरे झाले असते," असे तो म्हणत असे. हा राजा जेसुइट पाद्र्यांचा मोठा मित्र होता. त्यांना प्रार्थना मंदिरे बांधण्यास त्याने परवानगी दिली होती. ज्याला ख्रिस्ती धर्म स्वीकारावासा वाटे त्याला तशी पूर्ण मोकळीक देण्यात आली होती. या राजाचे दोन मित्र फादर इटानिलिओ मालापिक्यू आणि फादर चेस्को, हे दोन इटालियन पाद्री माझ्या ओळखीचे होते.

आता आपल्या बादशाहीला इस्लाम धर्मशास्त्राची विधीयुक्त मान्यता मिळवून घेणे हे काम शिल्लक राहिले होते. या बाबतीत सर्वांत मोठा अधिकारी म्हणजे साम्राज्याचा मुख्य काजी, हा होय. मुख्य काजीने धर्मशास्त्रास अनुसरून बादशाही ही विधीयुक्त आहे अशा अर्थाची मान्यता दिली की, बादशाहाला फौजदारी खटले, देहान्ताची शिक्षा, किंवा क्षमा करणे, इत्यादि अधिकार प्राप्त होत. म्हणजे तो सर्वार्थाने बादशहा झाला असे जाहीर होई. अशा प्रकारची मान्यता देण्यास साम्राज्याचा मुख्य काजी आणि इतर कनिष्ठ काजी यांचा आक्षेप होता. कारण शहाजहान बादशहा अद्याप हयात होता आणि त्याने आपल्या भावांची ही हत्या केली होती. त्याबद्दलची दुःखे अद्याप ताजी होती. आपल्या बादशाहीला धर्मशास्त्राकडून रीतसर मान्यता मिळवून घेण्यासाठी त्याने अब्दुल वहाब नावाच्या माणसाची मुख्य काजी म्हणून नेमणूक केली. हा गरीबीतून वर आलेला इसम. त्याला मुख्य काजी केल्यामुळे त्याला औरंगजेबाचे उपकार वाटणे साहजिकच होय. त्याने औरंगजेबाच्या बादशाहीवर हक्क असल्याचे मान्य केले. अन्यायी आणि स्वार्थी न्यायाधिशाने बादशहाच्या राज्यारोहणाला मान्यता देण्यात कारणे थोडीच कमी पडणार होती.

साम्राज्यात आपले स्थान पक्के करण्याकरिता आपण कितीही प्रयत्न केले तरी अजून एक अडचण राहिली आहे, याची औरंगजेबाला खंत वाटत होती. मुरादबक्ष

अजून जिवंत होता. अनेक सरदार त्याचे मित्र होते. त्याच्याबद्दल त्यांना जिव्हाळा वाटत होता. तो बादशहा म्हणून त्यांना पाहिजे होता. कारण एक लढवय्या शूर पुरुष व उदार धनी म्हणून त्याची फार कीर्ति होती. मुरादबक्षला अफूचे पाणी पाजण्यात यावे अशी आज्ञा होती, हे वर सांगितले आहे. औरंगजेब त्याची दर महिन्याला एक तसबीर तयार करवून घेत असे. त्याच्या नैसर्गिक अंगकांतीत काही बदल होत आहे का आणि त्याच्या चेहऱ्यावरून त्याचे मरण जवळ येत चालल्याचे काही चिन्ह दिसत आहे का हे पाहण्याचा त्याचा हेतू असे. परंतु मुरादबक्षाच्या नैसर्गिक सुदृढतेमुळे त्या विषारी रसाचा (अफूचा) काहीच परिणाम झाला नाही, हे पाहून औरंगजेबाने न्याय पद्धतीच्या नावाखाली त्याची हत्या करण्याचे ठरविले. मुरादबक्ष मेला की, सरदारांच्या निष्ठा गुंतलेल्या असा, दुसरा बादशहा राहणार नाही. आणि मग आपली सत्ता स्थिर होईल असे औरंगजेबाला वाटले.

**मुद्दाम भरलेल्या खटल्यात दिल्लीचा काजी मुरादबक्षला देहान्ताची शिक्षा देतो :** मुरादबक्ष गुजरात प्रांताचा सुभेदार असताना, काही मसलतीने त्याने आपल्या चिटणीसाचा प्राण घेतला होता, हे मी वर सांगितले आहे. आपले कारस्थान अमलात आणण्यासाठी औरंगजेबाला हे निमित्त बरे सापडले. मुरादबक्ष हा शूर, वचनाचा पक्का आणि मुत्सद्दी होता. अशा माणसाला शिक्षा तर द्याव्यात; आपण त्याच्यावर अन्याय केला अगर त्याला निष्ठुरपणे वागविले असा आपल्यावर आळ तर येता कामा नये ही औरंगजेबाची इच्छा होती. मुरादबक्षने स्वतः पूर्वी केलेल्या एका मनुष्यवधाचे निमित्त औरंगजेबाला आयते सापडले. मृत चिटणीसाच्या नातेवाईकांना त्याने गुप्तपणे बोलावून पाठविले. त्यांना त्याने मध्यस्थामार्फत कळविले ते असे की, "तुमचा नातेवाईक, जो चिटणीस, त्याचा मुरादबक्षने खून केला आहे. शास्त्राप्रमाणे, खुनाच्या बदली खुनी माणसाचा प्राण घेण्यात यावा, अशी मागणी करण्याला तुम्हाला अधिकार आहे, ती तुम्ही करा. तुम्हाला पूर्ण न्याय देण्यात येईल, आणि मोबदला म्हणून तुम्हाला रकम देण्यात येईल." असे औरंगजेबाने त्यांना कळविले. चिटणीसाच्या नातेवाईकांनी उत्तर दिले की, "राजपुत्र मुरादबक्षची वाताहात झाली आहे. आम्हाला आता भूतकाळातील गोष्टी उकरून काढण्याची इच्छा नाही." या उत्तराने औरंगजेबाचे समाधान झाले नाही. असे उत्तर त्याला नको होते. कारण त्याचे हेतू निष्फळ होणार होते.

आणखी शोध घेता, औरंगजेबाला मृत चिटणीसाचा एक भाऊबंद आढळला. हा मनुष्य दरिद्री पण महत्त्वाकांक्षी होता. त्याला बोलावून पाठविण्यात आले आणि वर सांगितल्याप्रमाणे सूचना व आश्वासने देण्यात आली. त्या दरिद्री माणसाने बादशहाचे म्हणणे मान्य केले. तो मुख्य न्यायालयात गेला आणि सर्वांच्या समोर, आपला भाऊबंद जो चिटणीस, त्याच्या खुनाबद्दल मुरादबक्षचा प्राण घ्यावा, अशी त्याने मागणी केली. मृत चिटणीस हा सैयद जमातीचा असल्यामुळे मुरादबक्ष हा राजपुत्र आहे, म्हणूनही त्याची सुटका होणार नव्हती.

पूर्व सूचनेप्रमाणे काझीने मुरादबक्षाला देहान्ताची शिक्षा सुनवली. तिची अम्मलबजावणी करण्यासाठी बादशहाने आपल्या हुजरातीचे पथक आणि आपले काही गुलाम पाठविले. ते ग्वाल्हेरच्या किल्ल्यात पोहचले. दावा सांगणारा वादी व इतर साक्षीदार यांच्यासमोर त्यांनी मुरादबक्षचे डोके उडविले. त्याला तेथल्या तेथेच पुरण्यात आले. मुरादबक्षच्या मृत्युबरोबर सगळे राजपुत्र संपले. आता फक्त दारा शुकोचा मुलगा सिफिहर शुको आणि मुरादबक्षचा मुलगा इझतबक्ष एवढेच शिल्लक राहिले. त्यांचा उल्लेख मी पुढे करीन. औरंगजेबाला आता साम्राज्याची अनियंत्रित सत्ता प्राप्त झाली होती. प्रतिस्पर्ध्यांच्या रक्तपातामुळे औरंगजेबाची भीती कमी झाली.

ज्यांनी राजघराण्यातील व्यक्तींच्यावर हात टाकला त्यांचा सूड बादशहाने कसा घेतला, हे आता सांगायचे राहिले आहे. ज्याने मुरादबक्षच्या शिरच्छेदाची मागणी केली होती, तो किल्ल्यातून बाहेर पडताच बेपत्ता झाला. त्याचे नाव सुद्धा ऐकू येत नाही. दाराचा शिरच्छेद करणारा काय, आणि मुरादबक्षचा करणारा काय दोघांचाही त्याचदिवशी तेथल्या तेथेच निकाल लावण्यात आला. आता राहता राहिले औरंगजेबाच्या गुलामांच्या पलटणीचे अधिकारी नझरबेग आणि मक्बुल. तेही फार काळ जिवंत राहिले नाहीत. एके दिवशी औरंगजेबाने मक्बुलाला बोलावू पाठविले. त्याला एकांतात म्हटले "तुझ्याकरिता काय करू? काय तुझी अपेक्षा आहे? खरोखर सर्व गुलामांच्या मुख्य अधिकाऱ्याची जागा तुझी आहे. पण हा उद्धट व मूर्ख पशू नझरबेग याला मी कंटाळलो आहे. मी त्याच्याकडून तो अधिकार काढून घेऊ शकत नाही. तुझी जर इच्छा असेल, तर तुझे नुकसान करून अन्यायाने जो हा अधिकार घेऊन बसला आहे, त्याला ठार करून, मुख्याधिकारी होणे तुझ्या हाती आहे. उद्या, मी दरबारात असताना माझ्यासमोर त्याला ठार कर. म्हणजे मी ताबडतोब तुला मुख्याधिकारी केल्याचे जाहीर करीन.

महत्त्वाकांक्षी मक्बुलाला औरंगजेबाच्या शब्दांवर विसंबून राहण्याचा मोह झाला. आपल्या भवितव्यात काय आहे याची त्याला अटकळ झाली नाही. तडक घरी जाऊन मोठ्या हर्षभराने बादशहा काय म्हणाला ते त्याने आपल्या बायकोला सांगितले. आपला बेत सफल करण्याकरिता त्याने एक कट्यार मिळविली. दुसऱ्या दिवशी दरबारात, बादशहा देखत त्याने नझरबेगच्या छातीत इतक्या शांतपणे ती कट्यार खुपसली की तो (नझरबेग) तत्क्षणी तेथेच मरून पडला. ज्या गोष्टीचे मार्गदर्शन त्याने स्वतः केले होते, ती गोष्ट आपणास जणू माहित नाही, असे औरंगजेबाने ढोंग केले आणि आजुबाजूला जे उभे होते त्यांना इशारा केला. त्यांनी आपल्या तलवारींनी मक्बुलाचे तुकडे तुकडे केले. आपले कृष्णकृत्य लपविण्यासाठी औरंगजेबाने असे दाखविले की, भर दरबारात आपल्या अधिकाऱ्याला मारून मक्बुलाने दरबारच्या शिष्टाचाराचा भंग केला आहे. त्यामुळे त्याला ही शिक्षा देण्यात येत आहे.

आपला भाऊ दारा याच्या मृत्युनंतर, औरंगजेबाने, सरमद[1] नावाच्या नास्तिकाला आपल्यासमोर आणण्याचा हुकूम केला. दाराची त्याच्यावर फार भक्ति होती. त्याला औरंगजेबाने विचारले "तुझा भक्त तो राजपुत्र कोठे आहे ?" त्याने उत्तर दिले "येथेच हजर आहे. परंतु तो तुला दिसणार नाही. कारण तू तुझ्या नातेवाईकांच्यावर फार जुलूम करतोस. राज्य बळकावण्यासाठी तू तुझ्या भावांची हत्या केलीस आणि इतर क्रूर कृत्ये केलीस." हे ऐकताच औरंगजेबाने त्याचा शिरच्छेद करण्याचा हुकूम केला.

**आपल्या विजयाची योग्य नोंद करण्याचे काम औरंगजेब बखरकारांना सांगतो :** आता कशाचीही चिंता राहिलेली नाही असे पाहून औरंगजेबाने आपल्या सर्व लढाया, आपले सर्व पराक्रम हे कथन करण्यास बखरकारांना आज्ञा केली. बलाढ्य शत्रूंचा पाडाव आपण कसा केला, आपणावर आलेल्या अनेक आपत्ती, आपण केलेल्या अनेक लढाया, आपण तख्तावर येईपर्यंतच्या सर्व घटनांचा वृत्तांत लिहिण्यास त्यांना सांगितले. बखरकारांनी विचारले "शहाजहान बादशहाची कैद, शाहाशुजाचा वनवास आणि मृत्यु, आणि दारा आणि मुरादबक्ष यांच्याशी केलेला विश्वासघात, यांची कारणे काय बरे लिहावी ?" बादशहा हसला आणि म्हणाला "उघड उघड असलेल्या या घटनांच्या कारणासंबंधाचे तुमचे हे अज्ञान !"

शहाजहानच्या गैरकारभारामुळे साम्राज्यात संपूर्णपणे अराजक पसरले होते. त्यात इस्लाम धर्माचा शत्रु असलेला राजपुत्र दारा याला शहाजहान राज्यकारभार देऊ इच्छित होता. दारा हा मूर्तिपूजक होता. त्याने प्राण गमावले ही शिक्षा योग्यच म्हटली पाहिजे. राज्यकारभारास अपात्र ठरल्यामुळे शहाजहानचे राज्य काढून घेण्यात आले आणि त्याला बंदिवासात ठेवण्यात आले. शाहाशुजा हा महत्त्वाकांक्षी होता. काही आधार नसता राज्यावर हक्क सांगितल्यामुळे त्याला ससेहोलपट भोगावे लागले. त्याने परराज्यात आश्रय घेतला. तेथे तो आश्रयदात्याच्याच जिवावर उठला. त्यात त्याला आपले प्राण गमवावे लागले. त्याने बंड केल्याबद्दल योग्यच अशी शिक्षा मिळाली. आता मुरादबक्ष म्हणाल तर त्याच्यात अनेक सद्गुण होते. तो एक उत्तम शिपाईही होता. पण त्याच्या मृत्युची माझ्यावर काही जबाबदारी नाही. त्याचा मृत्यु हा न्याय्य मागणीमुळे घडून आला. मुरादबक्ष हा राज्य करण्यासही अपात्र होता. कारण तो पाखंडी होता. त्याच्या मृत्युनंतर मी या बाबतीत पूर्ण चौकशी केली आहे. परमेश्वराने मला बादशहा केले त्याचे एकच कारण आणि ते म्हणजे मी नेहमीच

[1] सरमद हा कवी होता. १०७१ हि. (१६६०-६१) मध्ये त्याचा वध करण्यात आला. मा आसीर-उल्उमरा । २२५ मध्ये "इतीमदखा, अब्दुल कवीफी" या नावाखाली त्याच्याविषयी माहिती दिलेली आहे. त्याच्या संबंधी एक मजेशी गोष्ट आनंदराम मुखलीसने आपल्या "बदाखिरा" मध्ये सांगितलेली आहे. (इंडियन मॅगझीन, मे १९०३) त्याची कबर दिल्ली येथे जामी मशीदीजवळ आहे (बील ऑरिएंटल बायोग्राफी-३५३).

एकनिष्ठेने कुराणाचे प्रतिपालन करीत आलो आहे. वास्तविक पाहता एक गरीब फकीर म्हणून काळ कंठावा असा माझा बेत आणि इच्छा होती. त्याशी परमेश्वर हा गर्विष्ठांना खाली पाडतो; आणि दासांना वर चढवतो. त्याची इच्छा होती म्हणून मला हे उच्चपद मिळाले."

आपली कृष्णकृत्ये तडीस नेण्याकरिता औरंगजेब अनेक कल्पत्यांचा अवलंब करत असे. तो सर्व सत्ताधारी झाल्यावर आणि शाहाशुजाचा नाश झाल्यावर, फाहीम नावाच्या आपल्या एका खोजाला त्याने काही आज्ञा केल्या. या माणसाने आपण मुरादबक्षचा खोजा शाहाबाझ आहोत असा बहाणा केला; आणि तो बंगाल प्रांतात राहण्यास गेला. त्याला भरपूर उत्पन्नाच्या जमिनी देण्यात आल्या. त्यावर तो आपली कालक्रमणा सुखाने करी. मौजमजेत आपला वेळ घालवी. इतर परकीयांशी व युरोपियनांशी गप्पा मारण्याची त्याला फार आवड होती. मुरादबक्षाच्या शौर्याची तो नेहमी तारीफ़ करत असे. आपण आपल्या राजपुत्राशी एकनिष्ठ होतो, असा तो दावा करी.

हे औरंगजेबाचे करणे सहेतुक होते. इतक्या शाहाण्या आणि एकनिष्ठ अशा खोजाचा औरंगजेबाने वध केला असे परकीयांनी आपल्याविरुद्ध बोलू नये, यासाठी त्याने ही युक्ति केली होती. खोजा फाहिमला बंगालमध्ये पाठविण्याचेही कारण हेच की तेथे अनेक देशांच्या व्यापाऱ्यांचे जाणे येणे असते. त्याला गुजरात अथवा दक्षिणेला पाठविण्यात आले नाही कारण तेथे तो ओळखला जाण्याची भीती होती. हा फाहिम आहे शाहाबाझ नाही हे जाणून त्याच्या बोलण्याला कोणी कवडीची किंमत दिली नसती. काश्मीर अथवा काबुलकडे त्याला पाठविला आले असते. पण तिकडे बंगालप्रमाणे परदेशी व्यापाऱ्यांची वर्दळ नव्हती. वरील कारणांनी खोजा फाहिमला (शाहाबाझ नाव घेऊन) बंगालकडे पाठविण्यात आले.

मला हे चांगले ठाऊक आहे की, जर एखाद्या जाणकार वाचकाला मी म्हणालो की औरंगजेबाने खोजा शाहाबाझला ठार केले तर हा इतिहास खोटा आहे असा तो आक्षेप घेईल. असा निर्णय देणाऱ्या सूज्ञ वाचकाला मी दोष देत नाही. कारण काही असे इतिहासकार आहेत की ज्यांनी "हा खोजा जिवंत असून तो बंगालकडे गेला" असे विधान केले आहे. तसेच मी त्या लेखकांनाही फारसा दोष देत नाही कारण अनेकांचे असे मत होते की गोष्ट खरी आहे. वर दिलेल्या हकिकतीवरून या विधानाला बळकटी येते.

भावाभावांमधील ज्या संघर्षामुळे क्षोभ निर्माण झाला, तो १६५५ (खरे वर्ष १६५८) मधे सुरू झाला व १६५९ च्या सुरवातीपर्यंत चालू राहिला. तोपर्यंत औरंगजेब निर्विवादपणे मोगल साम्राज्याचा मालक झालेला होता. त्याकरिता अनेक प्रजाजनांचे जीव व भावांचे रक्त खर्ची पडले होते. जगातील एका अतिविशाल साम्राज्याचा सत्ताधीश असताही—मी पुढे दुसऱ्या भागात सांगणार आहे त्याप्रमाणे —औरंगजेबाचे समाधान झाले नाही. "जितके अधिक मद्य घ्यावे, तितका अधिक मद्य घेण्याचा मोह होतो" ही म्हण अगदी सार्थ आहे. ऐहिक गोष्टी मानवांची भूक कधीच शांत करू शकत नाहीत. औरंगजेबाच्या बाबतीत काय घडले तेही पुढे सांगण्यात येईल.

# औरंगजेब

औरंगजेबाचे राज्यारोहण
औरंगजेबाची राजवट
(जून १६५८ ते १७०० पर्यंतचा काळ)

**औरंगजेब याचे राज्यारोहण :** "माझ्यामुळे राजे राज्य करतात, आणि न्यायदान करतात" ही सॉलोमनने दिलेली परमेश्वराची उक्ती निर्विवाद आहे. व प्रजेचे समाधान अगर पीडन करणाऱ्यातील परमेश्वरच काहींना राजे बनवतो. औरंगजेबाचा बाप शहाजहान अद्याप जिवंत आहे. या सबबीवर मक्केच्या धर्माधिकाऱ्यांनी औरंगजेबाने पाठविलेल्या भेटी स्वीकारल्या नाहीत हे जरी खरे असले तरी ह्या वेळेपासून औरंगजेबाचा उल्लेख बादशहा म्हणून करणेच योग्य होईल. कारण त्याला आता प्रतिस्पर्धी उरलेला नव्हता.

आपले सर्व हेतू साध्य केल्यावर औरंगजेबाने जशन[1] नावाचा नऊ दिवसांचा उत्सव साजरा करण्याची लोकांना आज्ञा केली.

**औरंगजेबाचे राज्यात सुव्यवस्था करण्याचे प्रयत्न :** आपण गादी बळकाविली हे जनतेला आवडले नाही, हे त्याला माहित होते. म्हणून उत्सव संपल्यावर औरंगजेबाने साम्राज्यात सुव्यवस्था पुनः स्थापन करण्यास सुरुवात केली. शहाजहानचा निष्काळजीपणा आणि दाराचा अविवेक यामुळे हिंदुस्तानचे अकल्याण होत आले होते. आपल्याला नुसतेच राज्य करायचे नसून आपल्याला हिंदुस्तानचे भले करायचे आहे, असे तो म्हणाला. त्याच्या कार्यात ज्यांनी ज्यांनी त्याला सहाय्य केले होते, त्या सरदारांना त्याने बक्षिसे दिली. राजा जयसिंग याला त्याने सांभरचा प्रांत बहाल केला. औदार्याबरोबरच त्याने कडक न्यायदानासही सुरुवात केली. राज्यारोहणाच्या उत्सवानंतर पाचशे चोरांचा दिल्ली येथे जाहीरपणे शिरच्छेद करण्यात आला. राजधानी असलेल्या दिल्ली शहरातच सुव्यवस्था करून तो थांबला नाही. राज्यातील विविध प्रांतावर त्याने नवीन सुभेदारांच्या नेमणुका केल्या.

---

१. जशन : म्हणजे राज्यारोहणाचा उत्सव. हा दरवर्षी साजरा केला जाई. जरी औरंगजेबाची आमदानी रमजान १, १०६८ हि. (२ जून १६५८) पासून धरली असले, तरी पहिल्या वर्षीच्या उत्सवास, रमजान २४ पासून (१०६९ हि. १५ जून १६५९) सुरुवात झाली.

या नव्या सुभेदारांना चांगल्या सूचना देण्यास तो चुकला नाही. त्याचबरोबर आपली कपटीनीति व कुटिल कृत्ये पार पाडण्यास उपयोगी पडतील अशा इतर सूचनांही दिल्या. त्यात एक सूचना अशी होती की, अधिकाऱ्यांनी खोट्या शपथा घेऊन, खोटी वचने देऊन लोकांना आपलेसे करून घ्यावे. त्यांच्या साह्याने शेजारच्या राज्यांत बंडाळी माजवावी. हा प्रयत्न यशस्वी झाला तर दहा फकीरांना जेऊ घातले की कुराणावरच्या खोट्या शपथांच्या पापाचे परिमार्जन झाले असे समजावे.

**औरंगजेबाची मद्यपानाविरुध्द मोहिम :** त्या काळी हिंदुस्तानात आणि विशेषत: दिल्लीत हिंदु आणि मुसलमान यांच्यात मद्यपानाचे व्यसन बरेच बोकाळले होते. औरंगजेब आपल्याला कुराणाचा कट्टर अनुयायी म्हणून घेई. अर्थातच तो या व्यसनाचा कट्टर विरोधी असणारच. प्रथम हे व्यसन जहांगीरच्या काळापासून सुरू झाले. अकबराने ख्रिस्ती लोकांना दारू गाळण्याची व ती पिण्याची परवानगी दिली होती. त्याच्या काळी मुसलमान दारू पीत नसत. जहांगीरच्या मद्यपानाच्या व्यसनापासून मुसलमानात हा प्रघात सुरू झाला. शहाजहानच्या कारकीर्दीत ते अगदी स्वैरपणे मद्यपान करीत. दारू ते पाण्यासारखी पीत. दाराच्या उदाहरणाने त्यांना याबाबतीत प्रोत्साहनच मिळत गेले. शहाजहान स्वतः दारू पीत नसे. पण हे व्यसन थांबविण्याचा त्याने प्रयत्न केला नाही. त्याने लोकांना हवे तसे राहण्याची मोकळीक दिली. मी (मनुची) पूर्वी सांगितल्याप्रमाणे तो स्त्रियांच्यामध्ये काळ कंठीत असे.

औरंगजेब तख्तावर आला तेव्हा दारू पिणे एक मामुली बाब समजली जात होती. तो तळतळाटाने एकदा म्हणाला होता, "सर्व हिंदुस्तानात दारू न पिणारी दोहोपेक्षा अधिक माणसे सापडणे कठीण आहे. ती दोन माणसे म्हणजे–एक मी स्वतः आणि दुसरा माझा काजी अबदुल वहाब." परंतु या काजीबद्दलची औरंगजेबाची समजूत चुकीची होती. मीच (मनुची) स्वतः या काजीला रोज दारूची एक बाटली पुरवीत असे. बादशहाला कळू नये म्हणून तो ती चोरून पीत असे. औरंगजेब या व्यसनाला आळा घालू इच्छित होता; म्हणून त्याने सर्व ख्रिस्ती लोकांना शहरापासून दोन दोन मैलांच्या अंतरावर असलेल्या तोफखान्याच्या तळावर जाऊन राहण्याची आज्ञा केली. याला अपवाद वैद्य व शल्यवैद्य यांचा असे. तोफखान्याच्या तळावरील ख्रिस्त्यांना दारू गाळण्याची व पिण्याची परवानगी होती. पण त्यांना ती विकता येत नसे. हा हुकूम काढल्यानंतर त्याने दारू विकणाऱ्या हिंदु व मुसलमानांचा शोध करण्याचे काम दिल्लीच्या कोतवालाकडे सोपविले. कोतवाल स्वतः दारू पिणारा होता. पण तो न चुकता दारू विक्रेत्यांची झडती घेई. अशा विक्रेत्यांना एक हात आणि एक पाय तोडून टाकण्याची शिक्षा देण्यात येत असे. एके दिवशी सहा मुसलमान व सहा हिंदू दारू विक्रेत्यांना कडक शिक्षा दिल्याचे मी (मनुची) स्वतः डोळ्यांनी पाहिले. त्या लोकांचे हातपाय तोडल्यावर उकिरड्याकडे फरपटत नेऊन

टाकण्याची आज्ञा देण्यात आली. यामुळे दिल्ली शहरात दारू विकेनें आढळेनासें झालें. एखाद्या घरात दारू गाळली जात आहे असा संशय आला की, कोतवाल तिकडे आपले शिपाई पाठवी. ते, घर पूर्णपणे उध्वस्त करून टाकीत. सुरवातीला हुकुमाची मोठी कडक अम्मलबजावणी होत असे. पण हळूहळू हा कडकपणा कमी होत गेला. या कायद्याच्या कडक अम्मलबजावणीच्या काळातही, या व्यसनाच्या आहारी गेलेले सरदार लोक घरात दारू गाळीत. चोरून दारू पीत नव्हती अशी माणसें फार थोडी होती.

ख्रिस्त्यांना दारू गाळण्याची आणि पिण्याची मुभा होती; पण विकण्याची मनाई असे, हे वर सांगितलेच आहे. त्यांनी दारू विकू नये म्हणून पहारेकरी नेमलेले असत. असें असूनही या धंद्यात बराच पैसा मिळत असल्यामुळे ख्रिस्ती लोक चोरून दारू विकीत. हा गुन्हा उघडकीस आला की उमेदवारांचे घर लुटले जाई. आणि त्याला हातापायात बेड्या घालून गळ्याभोवती दारूची भांडी अडकावून कोतवालाकडे फरफटत नेण्यात येई. तेथे त्याला तुरुंगात टाकण्यात येई. बरेच महिने तुरुंगात काढल्यावर मारझोड आणि दंड अशी शिक्षा करून सोडून देत.

पण हे ख्रिस्ती इतके निर्लज्ज आणि उद्धट होते की चोरून दारू विकण्याचे काम काही बंद करीनात. हे ख्रिस्ती अनेक युरोपियन देशांतून आले होते. त्यांपैकी बहुतेक चोर आणि गुन्हेगार होते. मला कोणाची बदनामी करायची नाही. पण इतके मात्र निश्चितपणे म्हणू शकेन की मोगलांच्या तोफखान्यातील ख्रिस्ती हे नावा-चेच ख्रिस्ती होत. ते हिंदु आणि मुसलमानांच्याहूनही वाईट दर्जाचे होते. यांना परमेश्वराची मुळीच भीति वाटत नव्हती. त्यांच्यापैकी कित्येकांनी दहा दहा बारा बारा बायका ठेवल्या होत्या. ते नेहमी दारू पिऊन तर्र असत. जुगार खेळण्या-शिवाय त्यांना दुसरे काम नव्हते. दिसेल त्याला फसविण्यास ते नेहमी तयार असत.

या कारणामुळे मोगलांच्या राज्यात पूर्वी फिरंग्यांना जो मान होता तो आता राहिला नाही. कित्येक लोक पगाराच्या थोड्या वाढीसाठी मुसलमान झाले आहेत.

**भांगविरुद्ध योजना :** मुसलमान लोक मादक द्रव्यांच्या सेवनाला अतिशय चटाव-लेले होते. दारू ज्यांना महाग पडे, अशा गरीब लोकांनी भांग हे दुसरे पेय शोधून काढले होते. औरंगजेबाला या व्यसनाला आळा घालायचा होता. त्याकरिता त्याने एक अधिकारी नेमला. त्याला मुहतसिब म्हणत. भांग व त्या सारख्याच इतर मादक द्रव्यांचा वापर थांबविणे हे त्याचे काम असे. रोज शहरातून मादक द्रव्यांची भांडी फोडल्याचा एकच आवाज ऐकू येत असे. हा अधिकारी स्वतः भांग पीत असे, इतकेच नव्हे तर पिऊन तर्र होणे त्याला आवडे. यामुळे मादक पदार्थांच्या वापराची बंदी हळूहळू शिथिल झाली.

याच सुमारास, मुसलमानी धर्माचे आपण कट्टे अनुयायी आहोत, हे दाखविण्या-करिता औरंगजेबाने एक हास्यास्पद गोष्ट केली. त्याने असा हुकूम काढला की, कोणाही मुसलमानाने चार बोटांपेक्षा लांब दाढी ठेवता कामा नये. मोगलांना लांब लांब दाढ्या ठेवण्याची मोठी आवड असे. त्याकरिता ते तऱ्हेतऱ्हेची तेले व सुगंधी द्रव्ये वापरीत. औरंगजेबाने लोकांच्या दाढ्यांची लांबी मर्यादित आहे की नाही, हे तपासण्याकरिता एक अधिकारी नेमला. तो आपले मदतनीस व शिपायी घेऊन फिरत असे. वाटेल तेथे रस्त्यात तो एखाद्याला अडवून त्याची दाढी मोजीत असे. प्रमाणाबाहेर असल्यास तिची टोके तो छाटून टाकी. अर्थात गोरगरिबांच्या विरुद्धच हुकूम चालू शकला. सरदार अथवा शिपायी यांना हात लावण्याचा या अधि-काऱ्याला मज्जाव नव्हता, अधिकारी आणि त्याचे मदतनीस इकडे तिकडे धावपळ करीत. वाजवीपेक्षा लांब दाढी कमी करत आणि ओठावरील मिशा काढून टाकीत. हा अधिकारी लांबून दिसला की सैनिक व काही लष्करी अधिकारी आपली तोंडे शालींनी झाकून घेत. हे दृश्य मोठे चमत्कारिक दिसे.

**संगीताचे दफन :** वरील आज्ञांनी औरंगजेबाचे समाधान झाले नाही. दरबारातील गायकांची संख्या बरीच होती. तिला आळा घालण्याचे त्याने आता ठरविले. हिंदु-स्थानात हिंदु व मुसलमान लोकांना गाणे व ततुवाद्याच्या संगीताची अतिशय आवड आहे. आता औरंगजेबाने मुहतसिबला (वर उल्लेखिलेला अधिकारी) संगीत बंद पाडण्याची आज्ञा केली. एखाद्या घरातून गाण्याचा अथवा वाद्य संगीताचा आवाज ऐकू आला, तर त्याने ताबडतोब त्या घरात शिरून तो बंद पाडावा, शक्य तितक्यांची धरपकड करून त्या माणसांना कैद करावे आणि तंतुवाद्ये फोडून टाकावीत असा त्याला हुकूम केला. अशा रीतीने अनेक तंतुवाद्यांचा फार मोठ्या संख्येने नाश झाला. गवय्ये, बजवय्ये यांच्याजवळ उपजिविकेचे दुसरे साधन नसल्यामुळे त्यांची कमाईच बंद पडण्याची पाळी आली. ते सर्व लोक मोठ्याच संकटात सापडले. औरंगजेबाची मनधरणी करण्याचा पुढीलप्रमाणे त्यांनी एक वेगळाच प्रयत्न केला :— एका शुक्रवारी सुमारे एक हजार गायक व वादनकार एकत्र आले. देशी रिवाजा-प्रमाणे त्यांनी वीस तिरड्या शृंगारून तयार केल्या आणि एखाद्या प्रसिद्ध माणसाच्या प्रेतयात्रेच्या वेळी रस्त्याने जातात, त्याप्रमाणे औरंगजेबाच्या मशिदीत जाण्याच्या सुमारास, रडत ओरडत त्या तिरड्या घेऊन ते निघाले. औरंगजेबाने दुरून हा आक्रोश ऐकला व चौकशीकरिता शिपाई पाठविले. शिपाई दिसताच ते दुप्पट मोठ्याने आक्रोश करू लागले. त्यांची कल्पना ही की, आपला आक्रोश ऐकून त्याला आपली दया येईल. त्या गायकांनी हुंदके देत शिपायांना सांगितले की, बाद-शहाच्या हुकूमाच्या परिणामाने संगीत कला मरण पावली. आम्ही तिचे दफन करण्याकरिता तिला स्मशानात नेत आहोत. बादशहाला ही बातमी देताच, त्याने शिपायाकरवी गायकांना तात्काळ निरोप धाडला की "तुम्ही तिच्या आत्म्याच्या

शांतीकरिता प्रार्थना करा आणि ती पक्की खोल पुरली गेली आहे का त्याची खात्री करा." संगीतावर औरंगजेबाचा जरी बंदीहुकूम होता, तरी अमीर-उमराव चोरून गाणे ऐकण्याचे थांबत नव्हते. औरंगजेबाच्या हुकूमाची कडक अम्मलबजावणी मोठ्या शहरातूनच होत असे.

**नर्तकींना लग्न करण्याची सक्ती :** शहाजहानच्या काळी नर्तकींना व वेश्यांना फार मोकळीक होती. शहरांमध्ये त्या फार मोठ्या संख्येने आढळत. औरंगजेबाने आपल्या कारकीर्दीच्या सुरवातीस फारशी हालचाल केली नाही. परंतु नंतर त्याने असा हुकूम काढला की, या स्त्रियांनी लग्न तरी करावे, अथवा राज्याबाहेर निघून जावे. यामुळेच त्या राहात असलेले मोठमोठे वाडे आणि आवारे हळूहळू निर्जन होऊ लागले. कारण काही नर्तकींनी लग्ने केली, काही निघून गेल्या. काही प्रच्छन्न-पणे राहू लागल्या.

**माहुत वर्गासंबंधी :** त्या काळात पुष्कळ वेळा नैसर्गिक कारणामुळे असो, अगर माहुतांच्या निष्काळजीपणामुळे असो, अगर माहुतांच्या हेतुपुरःस्सर कारवायांमुळे असो, पुष्कळ वेळा रस्त्यातून आणि बाजारातून हत्ती मोकाट सुटत, आणि जीवाची आणि मालमत्तेची हानी करीत. औरंगजेबाने माहुतांना कडक शिस्त लावून या प्रकाराला आळा घातला.

शहाजहानचा एक आवडता हत्ती 'खालिक-दाद' हा दरबाराच्या पटांगणात मोकाट सुटला, सर्वत्र धावपळ सुरू झाली. हत्तीने एका दगडी हत्तीला धडक दिली. खालिक-दाद या हत्तीला ताजमहालच्या इमारतीजवळ नेऊन ठेवण्यात आले. तेथे तो नऊ वर्षे होता. ज्या दिवशी शहाजहानचा मृत्यु झाला त्याच दिवशी तोही मरण पावला.

**फकीरासंबंधी :** भोंदु फकीर आणि अवलिया हे मोठ्या प्रमाणावर फसवाफसवी करतात. मोगल साम्राज्यात हे प्रस्थ फार बोकाळलेले आहे. हे लोक आपल्याला सैय्यद म्हणजे मुहम्मद पैगंबराचे वंशज म्हणवतात. दांभिकपणा आणि फसवे चमत्कार व भोंदुपणा या योगे ते लोकांना फसवितात. लोकही निरनिराळ्या कारणांनी त्यांच्या नादी लागतात. कोणाला मूल हवे, तर कोणाला बायको हवी, तर कोणाला नवरा हवा, तर कोणाला रोजगार हवा. कोणाला एखाद्या स्त्री अगर पुरुषाचे वशी-करण हवे, कोणाला शत्रूवर विजय हवा असतो, तर कोणाला व्यवसायात यश हवे असते. अशा वेगवेगळ्या कारणांनी लोक वरील फकीरांना साधुसंत समजून भजू लागतात.

अशांच्यापाशी रिक्त हस्ते जाणे योग्य नाही, म्हणून माणसे भेटी घेऊन जातात. त्यामुळे हे फकीर मोठ्या ऐषारामात राहतात. मंत्र-तंत्र व थातुर-मातुर यांच्या

साह्याने ही माणसे आपला दांभिकपणा लपवून ठेवतात. शेकडो बायका यांच्या भजनी लागतात आणि त्यांचा अशा लोकांना आपल्या भोंदुगिरीत मोठा उपयोग होतो. चालून आलेल्या संधीचा उपयोग कसा करावा हे या लोकांना चांगले माहित असते. एखाद्या सुरेख स्त्रीला मग ती मुसलमान, हिंदु अगर खिस्ती असो, ते सोडीत नाहीत.

अशा फकीरांना स्वतःच्या बऱ्याच बायका आणि दासी असतात. त्यांना वरून भक्तिणी म्हणून व आतून कुंटिणी म्हणून हे उपयोगात आणतात. हे सर्व धर्माच्या आवरणाखाली करण्यात येते. त्या बायका नवसाला येणाऱ्या इतर बायकांची इत्थंभूत बातमी काढून ठेवतात आणि फकीराला ती माहिती पुरवतात. या भोंदु फकीरांची राहणीही मोठ्या थाटाची असते. रस्त्यातून जातात ते पालखीत जातील आणि बरो-बर शिष्यांचा व भक्तांचा घोळका बाळगतील. स्वतःची राहाणी मात्र अत्यंत साधी आहे असे दाखवितील. साहजिकच लोक त्यांच्या नादी लागतात. त्यांच्या मठात येणाऱ्या भक्तिणींसाठी वेगळी दालने असतात. तेथे स्वरूपवान स्त्रियांना घेऊन जाऊन त्यांना फसवून ते त्यांच्याशी व्यभिचार करतात. फकीरीचा धंदा करणाऱ्या काही बायकाही आहेत. त्यांची वागणूकही काही वेगळी असते असे नाही. असे अना-चार चालत असूनही लहान व थोर सर्व प्रकारचे लोक त्यांच्या भजनी लागतात. त्यामुळे या लोकांची मोठी चंगळ असते.

अशा गोष्टीला औरंगजेबाने काही आळा घातला नाही. कारण तो स्वतः अशा लोकांचा उपयोग करून घेत असे. फसवाफसवीत तो त्यांच्या तोडीस तोड होता. असे असूनही त्याने दिल्लीतील बारा सैय्यद फकीरांच्यावर सूड उगविण्याचे ठरविले. दाराला राज्य मिळणार असे त्यांनी भाकित केले होते. तीन दिवसांत काही चमत्कार करून दाखवा, नाहीतर तुमची फजिती करण्यात येईल असे त्यांना बजावले. ते शक्य न झाल्यामुळे त्यांच्यापैकी काहींना कैद करण्यात आले आणि काहींना शहरातून बाहेर हाकलण्यात आले.

अशाच रीतीने औरंगजेबाने आणखी एका फकीराचे ढोंग उघडकीस आणले. हा फकीर मुळचा शिपाई होता. त्याचा घोडा मेल्यामुळे त्याने तो पुरून त्याच्यावर कबर उभी केली आणि "मलिक दीवार" या साधुची ती कबर होय असे जाहीर केले. हा हा म्हणता कबरीवर भाविकांची गर्दी वाढू लागली. औरंगजेबाने ती कबर उघ-डून पाहिली तो तीत घोड्याचा सांगाडा सापडला. औरंगजेबाने ती कबर नष्ट करण्याची आज्ञा केली आणि त्या भोंदु फकीराला कोरडे मारून शहराबाहेर घालवून दिले. यामुळे औरंगजेबाला सर्व गुप्त गोष्टी समजतात, असा चहुकडे बोभाटा होऊ लागला.

**मनसबदार :** मोगलांच्या काळात मनसबदारीची पद्धत प्रचारात होती. अधिकारी, विद्वान, कलावंत, सरदार, मुत्सद्दी इत्यादींना मनसबी देण्यात येत. म्हणजे त्यांना

रोख मासिक पगार देण्याऐवजी उत्पन्न म्हणून जमीन अगर खेडी लावून देण्यात येत. या पद्धतीत बरीचशी लबाडीही होत असे. मनसबदार मेल्यावरही इतर लोक त्याचे उत्पन्न खात. याबद्दल परत चौकशी करून औरंगजेबाने या लबाडीला आळा घातला.

काश्मीरमधील मनसबदारांच्या बाबतीतही त्याने चौकशी केली होती. त्याचप्रमाणे स्थावर मालमत्ता असली तर ती कोणत्या सरकारी हुकुमाच्या आधारे आहे याची तो कसून चौकशी करी.

**हेर :** आपल्या राज्यात शिस्त व शांतता राखण्याचे राजाजवळचे अत्युत्तम साधन म्हणजे त्याचे विश्वासू हेर हे होय. राज्यातील मोठमोठ्यांच्या, विशेषतः अधिकाऱ्यांच्या हालचाली संबंधीच्या बातम्या ते आपल्या राजाला देत असतात. मोगल राजे हेरांच्या बाबतीत, इतर देशांच्या मागे नाहते. औरंगजेबाच्या कारकीर्दीत शेवटपर्यंत त्याच्या पदरी अतिशय उत्तम हेर होते. इतके की, लोकांच्या मनातील विचार सुद्धा हेरण्याची त्यांची क्षमता होती असे म्हटल्यास वावगे होणार नाही. राज्यात विशेषतः दिल्ली शहरात काय चालले आहे, याची त्यांना बित्तंबातमी असे. एका रात्री त्याला (औरंगजेबाला) कळले की, मुख्य रस्त्यावरील एका दुकानाची मुख्य कमान कोसळली असून त्या खाली तीन फकीर पुरले गेले आहेत. दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे औरंगजेब शिकारीसाठी म्हणून जात असता, त्याने ते कोसळलेले दुकान पाहिले. आपला हत्ती त्याने तेथेच थांबविला व शिपायांना, त्या ढिगाऱ्याखाली फकीर सापडले आहेत त्यांना उकरून काढा अशी आज्ञा केली. सरदारांना त्या गोष्टीची मुळीच कल्पना नव्हती. त्यांना फार आश्चर्य वाटले. घराचा ढिगारा बाजूस सारता त्याच्या खाली मेलेले फकीर आढळले. त्यांना काढण्यात आले तोपर्यंत औरंगजेब तेथेच थांबला. बादशहाच्या आज्ञेने फकीरावर दफन करण्यात आले. त्यासाठी त्याने काही पैसे दिले. या घटनेपासून लोकांना औरंगजेब म्हणजे चमत्कार करणारा साधू वाटला आणि "संत औरंगजेब चिरायु होवो" असे ते म्हणू लागले. अद्यापपर्यंत ते त्याला चमत्कार करून दाखवणारा साधू असेच म्हणतात मग ही गोष्ट खुशामतीमुळे असो, अगर जादूटोण्याच्या साह्याने त्याने केलेल्या चमत्कारामुळे असो.

**औरंगजेब व त्याचा पिता यांच्यातील वाद :** मोगल साम्राज्याचा कारभार आपण उत्तम प्रकारे चालवीत आहोत, याचा औरंगजेबाला फार गर्व वाटत असे. शहाजहानने दुर्लक्ष केल्यामुळे निर्माण झालेली गैरव्यवस्था आपण दूर केली व सर्व कारभार सुरळीत केला याचा तो टेंभा मिरवीत असे. परंतु नुसत्या आपल्या कर्तृत्वावर तो समाधानी नव्हता. तर त्याबद्दल अमीर-उमरावांनी आपल्या कीर्तीचा डिंडीम वाजवावा आणि आपल्या बापाची अपकीर्ति सांगावी यांचा तो आटोकाट प्रयत्न करी. शहाजहानचा लौकिक कसा कमी होईल यासाठी तो सर्व बाजूंनी प्रयत्न करत असे.

शहाजनला अतिशय संताप यावा, बंदिवासाबद्दल त्याचा मनःक्षोभ अधिक वाढावा यासाठी औरंगजेब त्याला पत्रे लिही.

त्या पत्रात शहाजहानच्या काळातील प्रत्येक आदेशाची निंदा आणि त्यामुळे झालेला गोंधळ दूर करण्यासाठी आपण अमलात आणलेले उपाय याचा मजकूर असे. तुम्ही अन्याय केला, अधिकाऱ्याच्याकडे दुर्लक्ष केले, दुसऱ्यांच्या स्त्रियांवर हात टाकला, बायकांचा मिना बाजार भरवला, ऐने महाल सजवून तेथे स्त्रियांशी भोगविलास करण्यात पैशाची उधळपट्टी केलीत आणि अंतःपुरात एका सामान्य नर्तकीला घेऊन बसला आहात, अशा प्रकारचे आरोप तो आपल्या बापावर करी. उलट आपण किती चांगले काम करीत आहोत, हे तो चविष्टपणे सांगे. मी न्यायदानासाठी आणि राज्यातील बेशिस्तपणा दूर करण्यासाठी रोज दरबारात किती तास बसतो, असे तो लिही.

शहाजहानही काही कमी नव्हता. तो त्याची गय न करता टोले हाणून उलट उत्तरे पाठवी. "बापाशी बंडखोरी केलीस, भावांना क्रूरपणे वागविलेस, तू इतका रक्तपिपासू की यातून तुझी स्वतःची मुलेही सुटली नाहीत असे असताना तू इतरांचे कल्याण ते काय करणार ? मी दरबारात पुष्कळ वेळ बसतो, याबद्दल तू स्वतःची स्तुति कसली करून घेतोस ? उलट असे की, हे तर राज्य कारभाराच्या गोंधळाचे स्पष्ट द्योतकच नव्हे काय ? माझ्या कारकीर्दीत अधिकारी इतके न्यायाने वागत की तुमच्या वरील अन्यायाची गाऱ्हाणी दरबारात आणा, असे सांगण्याकरिता दररोज दवंडी पिटूनही महिनेमहिने कोणी अर्जदार दरबारात येत नसे " अशा प्रकारची उत्तरे शहाजहान लिही.

दोघातला हा वाद बराच काळपर्यंत चालू राहिला. शेवटी संतापून शहाजहानने त्याला लिहिले की "तू जे काही करीत आहेस, ते सत्तेमुळे आहे आणि ती सत्ता तुला जन्म देणाऱ्या पित्याकडून मिळाली आहे, हे तू लक्षात घ्यावयास पाहिजे." काबूलचा सुभेदार महाबतखान याने औरंगजेबाला पत्र लिहून शहाजहानची तरफदारी केली होती. वरील पत्रांचा औरंगजेबावर थोडासा परिणाम झाला. आपल्या बापाशी तो काहीसा सौम्यपणे वागू लागला. तो पत्रे लिहून त्याचे समाधान करण्याचा प्रयत्न करी; बापाला भेटी पाठवी; त्याची करमणूक व्हावी म्हणून कलावंत, मल्ल इत्यादी त्याच्याकडे पाठवी.

औरंगजेबाने आपल्या बापाकडे शिल्लक असलेल्या जवाहिरांची मागणी केली. शहाजहानने ती नाकारली. उलट जबरदस्ती केली तर ती रत्ने चकाचूर करून टाकीन अशी त्याने धमकी दिली. त्या जवाहिरांची मोजदाद करून त्यांचे मूल्य ठरविण्यास वर्षानुवर्षे लागतील असे औरंगजेबाचा खजिनदार पोलादखान याने सांगितले. मग त्याने या बाबतीतील आपला नाद सोडून दिला.

शहाजहानच्या शिफारशीवरून औरंगजेबाने असदखानाची[1] चांगल्या हुद्यावर नेमणूक केली. जाफरखानच्या[2] मृत्यूनंतर (१६७०) असदखानाची वजीर म्हणून नेमणूक त्या जागेवर झाली. तो आजपर्यंत (१० मार्च १६९९) मोठ्या निष्ठेने काम करीत आहे.

**(हिंदु) राजांची दरबाराला भेट :** आपल्या साम्राज्यात शांतता व सुव्यवस्था राखण्याचे औरंगजेब जेव्हा प्रयत्न करीत होता, त्यावेळी काही हिंदु सरदार त्याच्या दरबारी आले. त्यापैकी काही त्याची मर्जी संपादन करण्याकरिता, तर काही दरबारात आपले बस्तान बसविण्याकरिता, तर काही सैन्यात नोकरी मिळविण्याकरिता आले होते. त्या सर्वांची औरंगजेबाने भेट घेतली. पण त्या सर्वांना काही त्याला संतुष्ट करता आले नाही. कारण आपल्याला जे काही मिळाले त्यापेक्षा अधिक मिळण्यास आपण लायक आहोत, असे मानण्याचा जन्मतः आपल्या स्वभावात एक दोष असतो. त्यामुळे असे तीन सरदार निघाले की ज्यांना औरंगजेबाने देऊ केलेल्या नोकऱ्या व तनखे मान्य झाले नाहीत. याबद्दलची आपली नाराजी औरंगजेबाने उघडपणे दाखविली नाही. पण त्याने संधि साधून वरील तीन सरदारांचा शिरच्छेद करविला आणि त्यांची शिरे किल्ल्याच्या प्रवेशद्वारावर लावली. यामुळे इतरांच्या मनात भिती निर्माण झाली. त्यांनी औरंगजेबाने देऊ केलेल्या नोकऱ्या निमुटपणे स्वीकारल्या.

बिकानेरचा राजा करणसिंग हा एक बलाढ्य हिंदु राजा होता. याने औरंगजेबाच्या राज्यारोहणाच्या वेळेस राजधानीस येण्यास नकार दिला होता. औरंगजेबाने त्याच्याविरुद्ध राद‌नदाझखान[3] याच्या नेतृत्वाखाली, तीस हजार स्वारांचे एक दल व ५० तोफा पाठविण्याची आज्ञा केली. पण राजा जयसिंगाच्या मध्यस्थीने हे प्रकरण मिटले आणि राजा करण याला दक्षिणेत शिवाजीच्या विरुद्ध होऊ घातलेल्या मोहिमेत

१. असदखान :—हा झुल्फिकारखान बहारा याचा मुलगा मुहम्मद इब्राहिम. आईकडून मीरबक्ष सादिकखानाचा नातू होता. याचा जन्म १०३५ हि. (१६२५–२६) च्या सुमारास झाला आणि शहाजहानच्या राजवटीच्या २७ व्या वर्षी त्याला असदखान करण्यात आले. १६६० मध्ये मुअज्जमच्या हाताखाली तो औरंगजेबाचा दुय्यम वजीर झाला आणि १६७६ त त्याला वजीर पद मिळाले. औरंगजेबाच्या राजवटीच्या शेवटपर्यंत तो वजीर होता (१७००). जमादा १५ ला ११२८ हि. (जून १८ १७१६) तो मरण पावला.

२. जाफरखान :—याला १६६२ त वजीर म्हणून नेमण्यात आले आणि तो १६७० मध्ये मरण पावला. हा मीरबक्ष सादिकखानाचा मुलगा होता. शिवाय तो असफखानाच्या (यामिन उद्दौलाच्या) बहिणीचा मुलगा व त्याचा जावई होता.

३. बिकानेरच्या राव करण भुर्तिया याच्या संदर्भात मला राद‌नदाझखानाचा उल्लेख आढळला नाही. औरंगजेबाच्या अमदानीत तिसऱ्या वर्षी (१६६०–६१) अमीरखान ख्वाफी याला त्या राज्यावर चाल करून जाण्याची आज्ञा केली होती. कारण करण येऊन दरबारी आला आणि त्याला दक्षिणेकडे कामगिरीवर पाठविण्यात आले. तो १०७७ हि. (१६६६–६७) मध्ये मरण पावला. (मा. आमीरे-उल उमरा-ii २८७, आणि २८९).

भाग घेण्यासाठी पाठविण्यात आले. आपले राज्य स्थिर करण्यासाठी औरंगजेब हा जमेल तेथे कडक वागे पण कणखर लोकांच्या तो वाटेला जात नसे.

नजाबतखान : नजाबतखानाचेच[1] उदाहरण घ्या. दाराच्या विरुद्ध झालेल्या लढाईत नजाबतखानाने मोठी कामगिरी बजावली होती. तुला मोठा हुद्दा आणि पगार देऊ असे औरंगजेबाने त्याला आश्वासन दिले होते. पण औरंगजेबाने ते आश्वासन पाळले नाही. बारा हजारांच्या मनसबदारी ऐवजी त्याने त्याला चार हजारी मनसब देऊ केली. नजाबतखानकडे औरंगजेबाने एक हजारी मनसबदार[2] पाठविला आणि चार हजारी मनसब कबूल करण्याचा निरोप दिला. नजाबतखान आणि वरील हजारी मनसबदार यांच्यात बोलण्यावरून बोलणे वाढत गेले. तो मनसबदार नजाबतखानाला म्हणाला की, " ही चार हजारी मनसब देखील तुमच्या योग्यतेहून अधिक आहे." हे ऐकून नजाबतखानाला चीड आली. त्याने मनसबदाराचा तलवारीच्या एकाच वाराने शिरच्छेद केला आणि त्याचे प्रेत सडकेवर फेकून देण्याची आज्ञा केली.

ही बातमी मिळाल्यावर औरंगजेबाने नजाबतखानाच्यावर हल्ला करून त्याचे शिर घेऊन येण्याचा हुकूम केला. यासाठी त्याने दहा हजार स्वारांचे सैन्य पाठविले. नजाबतखान हा अतिशय शूर आणि पराक्रमी होता. त्याचे शारिरीक बळ इतके विलक्षण होते की, त्याने बाण मारला की तो एकाला एक लागून उभे असलेल्या दोन बैलांच्या खांद्यांतून भेदून जाई. नजाबतखानाच्या नातेवाईकांत अनेक मोठी माणसे होती. अशा माणसावर हल्ला झाला तर फार मोठी प्राणहानी होईल आणि सर्वत्र मोठा गोंधळ उडेल. हे ओळखून शाईस्ताखानाने बादशहाला या बाबतीत काहीही न करण्याचा सल्ला दिला. पण नजाबतखान हा काही दरबारात आला नाही. वरील प्रकरणानंतर दोन वर्षांनी तो मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर औरंगजेबाने त्याच्या दोन मुलांना मोठे हुद्दे दिले. त्याच्या मोठ्या मुलाला त्याने "खाने-आलम" ही पदवी दिली होती.

---

१. नजाबतखानाचा मागे उल्लेख आलेलाच आहे. औरंगजेबाच्या राजवटीच्या पहिल्या वर्षी औरंगजेबाची त्याच्यावर इतराजी झाली. परंतु १०७० हि. (१६५९–६०) मध्ये तो दरबारात परत आला १०७३ हि. (१६६२–६३) साली औरंगजेब काश्मीरला गेला असताना जयसिंगाबरोबर चिनाब नदीजवळील छावणीत रक्षणाकरिता त्याला ठेवण्यात आले होते. त्याच वर्षी त्याला माळव्याचा सुभेदार म्हणून नेमण्यात आले. तेथेच तो रबी १,१०७५ हि. (ऑक्टोबर १६६४) त मरण पावला. (मा-आसीरे-आलमगिरी ३२,४२,४०,४८ आणि मा-आसीरे-उल-उमरा)

२. मा-आसीर-उल-उमरा मध्ये असे दिले आहे की असा पाठविलेला व मारला गेलेला मनुष्य मीर अबुल कासम ममुरी (मकर खान) हा होता. त्याचे मा-आसीर-उल-उमरा मध्ये वेगळेच चरित्र दिले आहे. त्याच्या मृत्युची घटना वेगळीच दिली आहे. ती घटना १०६८ हि. (१६५८) त दिल्ली जवळील अकराबाद (शालीमार) छावणीत घडलेली होती.

**शिवाजीच्या पारिपत्याकरिता शाइस्ताखानाची रवानगी :** आपले हेतु पार पाडावयाचे असले की, औरंगजेब हा वचने देण्यात मोठा अघळपघळ असे. पण ती वचने पाळावयाची नाहीत असाही ठाम निश्चय झालेला असे. फसविण्यासाठी आणाशपथांचा उपयोग करावा हे त्याचे तत्त्व असे. शिवाजीशी त्याने असाच वचन भंग केला. अर्थात याची त्याला मोठी जबर किंमत द्यावी लागली. मी हे लिहीत आहे. या दिवसापर्यंत (? १६९९) तो या राजाशी (मराठ्यांशी) कष्टाने व कसाबसा झगडत आहे. शिवाजीच्या हालचाली आणि त्यामुळे मोठ्या व बलिष्ट अशा ज्या अडचणींना आणि पेचप्रसंगांना औरंगजेबाला तोंड द्यावे लागले त्यांची हकिकत या ग्रंथाच्या शेवटी आढळून येईल. शिवाजी आणि मोगल यांच्यातील युद्धाची सुरवात अशी झाली.

बादशहा म्हणून आपले आसन स्थिर झाल्यावर औरंगजेबाने १६५९[1] साली, शाईस्ताखानाबरोबर पन्नास हजाराचे एक बलिष्ट सैन्य शिवाजी विरुद्ध पाठविले. शहाजहानच्या विरुद्ध औरंगजेबाने लढा सुरू केला त्यावेळी त्याने शिवाजीला काही इलाख्याचे उत्पन्न वसूल करण्याची सनद दिली होती. ती सनद एका ताम्रपटावर नोंदली होती. पण औरंगजेब या सनदेला कःपदार्थ समजू लागला. सनदेत असलेल्या इलाख्यांचे उत्पन्न शिवाजीला घेऊ देऊ नये; आणि खंडणी देण्यास त्याला भाग पाडावे अशी आज्ञा शाईस्ताखानास देण्यात आली. विजापूर आणि गोवळकोंडा येथील बादशहांना धमक्या द्याव्यात, आणि त्यांच्याकडून येणारी खंडणी वाढवून घ्यावी असाही आदेश शाईस्ताखानाला देण्यात आला होता. त्या दोघा दुबळ्या व भेकड बादशहांनी औरंगजेबाचे म्हणणे कबूल केले. पण शिवाजीची वागणूक निराळी होती. त्याने युद्ध पुकारले आणि तो चौफेर हल्ले करू लागला. मोगल आणि विजापूर यांचे इलाखे लुटू लागला. त्याने अनेक किल्ले आणि प्रदेश ताब्यात आणले.

**शिवाजी :** शिवाजीचा बाप शहाजी याला विजापूरच्या बादशहाने आपल्या चाकरीत घेतले. हा विजापूरच्या बादशहाचा एकनिष्ठ सेवक होता. तो विजापूरला दरबारात असे. त्याचा मुलगा शिवाजी हा बापाच्या जहागिरीत राही. जहागिरीचा वसूल तो बापाला न पाठविता स्वतः खर्चू लागला. या नंतर त्याने आपल्या सैन्यात माणसे भरती करण्यास सुरवात केली. तो विजापूरच्या इलाख्यावर चोहोकडून हल्ले करू लागला. तो आपल्या बापाची (शहाजीची) अगर बादशहाचीही पर्वा करीनासा झाला. शिवाजीच्या धाडसाबद्दल विजापूरच्या बादशहाने शहाजीकडे तक्रार केली. परंतु "माझा मुलगा माझेही ऐकत नाही. तो माझ्या जहागिरीचे उत्पन्नही मला देत नाही. आपण बादशहाविरुद्ध बंड करीत आहोत, असे त्याने पूर्वीच जाहीर केलेले आहे. तेव्हा आपण योग्य ते करा" असे शहाजीने बादशहास सांगितले.

१. १६५९ हे वर्ष बरोबर आहे. मा-आलमगिरी-३७-अमरा ii-६१० प्रमाणे शाइस्ताखान जमादा ? १०७० हि. (जानेवारी १६६०) पूर्वी दक्षिणेत पोहचला होता.

विजापूरच्या बादशहाने शिवाजीस पत्र लिहून कळविले की, "तुमच्या आजोबांचे आम्ही भले केले. तुमच्या वडिलांच्या व तुमच्या बाबतीतही त्याच हितकर गोष्टी चालू ठेवाव्या. याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याची ही पद्धत नव्हे. तुम्ही हा मार्ग सोडून द्या व दरबारला हजर व्हा. तुम्हास योग्य असा अधिकार आम्ही देऊ". शिवाजीने या पत्राची दखल घेतली नाही. आपले हल्ले व लुटीचे प्रकार अधिक जोरात सुरू केले. विजापूरच्या बादशहाला आपल्या राज्याबद्दल आता काळजी वाटू लागली. कारण शिवाजीने त्याचा एक किल्लाही जिंकून घेतला होता. त्याने अफझलखान ह्या आपल्या एका प्रसिद्ध सरदारास त्याच्यावर पाठविले. अफझलखानाने शिवाजीचा इतक्या नेटाने पाठलाग केला की त्याला पळून जाऊन डोंगराळ भागाचा आश्रय घ्यावा लागला. अफझलखानाला अधिक विरोध करणे अशक्य आहे, असे पाहून त्याने एक युक्ती योजिली. अफझलखानास पत्र लिहून त्याने कळविले की, "मी अपराधी आहे. मजकडून आगळीक झाली आहे. बादशहानी मला क्षमा करावी. आपणास विनंती की, मजबद्दल बादशहा जवळ रदबदली करावी."

अफझलखानाने उत्तर पाठवून त्यास कळविले की, तुम्ही कोणताही किन्तु मनात न बाळगता इकडे या. बादशहाकडून मी तुम्हास क्षमा मिळवून देईन आणि तुमचे नेहमी रक्षण करीन. तुमच्या विरुद्ध अधिक जोराने मोहिम करून तुमचा पराभव करून आणि तुम्हाला बंदिस्त करावे याबद्दल बादशहाचे आणखी हुकूम येण्याची शक्यता आहे. तर तो टाळण्यासाठी तुम्ही तावडतोब हजर व्हा. युद्धाची आपत्ति ओढवून घेण्याच्या ऐवजी तुम्ही आणि तुमची माणसे यांनी स्नेहभाव करावा हेच अधिक योग्य होईल. बादशहा बलिष्ठ आहे आणि कोणत्याही परिस्थितीत तुम्ही त्याचा अधिक काळ प्रतिकार करू शकणार नाही, हे लक्षात ठेवावे."

शिवाजीने अफझलखानाची भेट घेण्याचे मान्य केले. तळापासून दूर अंतरावर आपण पाच माणसे बरोबर घेऊन यावे. मी पण पाचच माणसे घेऊन येईन. मी तुम्हाला शरण येऊन, तुमच्या कृपेची याचना करीन. अशा अर्थाचे उत्तर शिवाजीने अफझलखानास पाठविले. शिवाजी शरण येत आहे हे ऐकून अफझलखानाला फार आनंद झाला. त्याने शिवाजीच्या सूचना मान्य केल्या. तळापासून काही अंतरावर त्याने शिवाजीच्या स्वागतासाठी एक सजविलेला शामियाना उभा केला. शिवाजीनेही आपल्याला अभय मिळावे आणि आपल्याला स्नेहाने वागविण्यात यावे अशी पत्रे लिहून विनंती करण्यात कसूर केली नाही.

दरम्यान शिवाजीने आपली मसलत पार पाडण्यासाठी आपल्या सैन्याची योग्य रचना केली. इशारा मिळताच सैन्यातील स्वारांनी अफझलखानाच्या तळावर हल्ला करावा असे ठरविले. शिवाजीने कड्याच्या आकाराचे पण तळहातात लपविता येईल असे एक शस्त्र धारण केले. शिवाजी आणि अफझलखान हे एकमेकांना भेटले

की, शिवाजीच्या पाच सहकाऱ्यांनी अफझलखानाच्या सहकाऱ्यांवर तुटून पडावे, असे ठरले. शिवाजी आणि त्याचे सहकारी यांनी आपल्या कपड्याच्या आत चिलखते धारण केली होती. ही सावधगिरी अफझलखान व त्याचे सहकारी यांनी बाळगली नाही. आपल्याला दगा होणार आहे याची त्यांना शंका आली नाही.

दोन्ही सेनांच्या मधोमध असलेल्या आपल्या तंबूत अफझलखान शिवाजीची मोठ्या आतुरतेने वाट पाहत होता. कदाचित मनोराज्य करण्यात तो गर्क असावा नंतर पाच सैनिकांनिशी शिवाजी आला. ते सर्वजण घोड्यांवर स्वार झाले होते. तंबुपासून काही अंतरावर ते घोड्यावरून खाली उतरले. शिवाजी पुनः पुनः मुजरे करीत पुढे आला. आपले स्वागत नीट होईल की नाही याची काळजी वाटत असल्याचे तो दाखवित होता. काही एक भीति न बाळगता तुम्ही पुढे या असे दर्शविण्याकरिता अफझलखानाने हात हालवून त्याला बोलाविले. शिवाजी जवळ येताच, अफझलखानाने मिठी मारण्याकरिता हात उचलले. अफझलखान उंच व धिप्पाड होता. शिवाजीने त्याला अलिंगन दिले. सहाजिकच शिवाजीचे हात अफझलखानाच्या पोटाभोवती आले. शिवाजीने तत्काळ अफझलखानाचे पोट डावी-कडून उजवीकडे फाडीत आणले. आतडी बाहेर आली. याच सुमारास शिवाजी-बरोबर असलेल्या पाच माणसांनी अफझलखानाच्या सहकाऱ्यांवर तुटून पडून त्यांचे तुकडे तुकडे केले. ठरलेला इशारा देताच शिवाजीचे सैनिक आले व त्यांनी अफझलखानाच्या सैन्यावर हल्ला केला. या जोरदार हल्ल्यासमोर अफझलखानाची सेना टिकू शकली नाही. सर्वत्र गोंधळ उडाला. सैन्य पळू लागले. शिवाजीने डोंगराळ भागा-तील सर्व वाटा रोखून धरल्या होत्या. त्यामुळे अफझलखानाचे सर्व सैन्य गारद झाले. शिवाजीला घोडे, शस्त्रे आणि संपत्तिही मिळाली. तिच्यामुळे त्याचे बळ अधिक वाढले.

यानंतर शिवाजी विजापुरच्या प्रदेशाखेरीज मोगल साम्राज्यातही हल्ले व लुटालुट करू लागला. त्याने अनेक किल्ले ताब्यात आणले. बऱ्याच स्थळांच्या बाबतीत त्याने शस्त्राच्या ऐवजी बुद्धीभेदाचा उपयोग केला. त्याने अनेक शहरे लुटली. विशेषतः सुरतेवर त्याने सात हजार स्वारानिशी हल्ला केला.[1] त्या शहरात तो सात दिवस होता. त्या प्रसिद्ध बंदराची त्याने सर्वस्वी लूट केली. यासाठी औरंगजेबाने दक्षिणच्या सुभेदारीवर असताना मी (मनुची) वर सांगितल्याप्रमाणे शिवाजीला काही प्रांत बहाल केले होते. वेळ प्रसंगी शिवाजीचा उपयोग करता यावा, राज्य मिळविण्यास आपणास अपयश आले, तर शिवाजीसारखा कोणीतरी आपल्या बाजूला असावा, असा औरंगजेबाचा हेतु होता. शिवाजीचा प्रदेश हा डोंगराळ भागात असल्यामुळे तो संरक्षणास किती योग्य आहे, याची जाणीव औरंगजेबाला होती.

१. जानेवारी ५, १६६४ (? मु.प.) ला सुरत जिंकले. शिवाजी तेथे सहा दिवस होता. (ग्रँट डफ 'मराठे' ८९ आणि 'बॉम्बे गॅझिटियर सुरत' ८९).

**औरंगजेबाचा शिक्षक :** औरंगजेबाला गादी मिळाल्यानंतर दरबारात जे अनेक लोक येऊन गेले, त्यांमध्ये त्याचा एक जुना शिक्षक होता. याचे नाव होते मलिक सालेह. शहाजहानने दिलेल्या वर्षासनावर तो काबुल येथे राहत होता. औरंगजेबाला आपल्या शुभेच्छा देण्यासाठी त्याने दिल्लीत काही दिवस मुक्काम केला. त्याने मनात असा विचार केला की, नव्या राजवटीत काही महत्त्वाची कामे तातडीने करावयाची असतात, त्यांना वेळ देणे आवश्यक असते. औरंगजेब त्या कामातून मोकळा होऊन जरा विश्रांती घेऊ लागेल, तेव्हाच त्याला भेटावे. अशा वेळी, तरुण राजपुत्रांना शिकविताना शिक्षकांना किती त्रास पडलेला असतो, याची औरंगजेबाला जाणीव होऊन तो मोठ्या आनंदाने आपले स्वागत करील, व मोठी देणगी देईल. अशा मोठ्या इनामाच्या आशेने मुल्लाजी घरून निघून दिल्लीला येऊन पोहोचले.

दिल्लीत त्याने अमीर-उमरावांच्या गाठी-भेटी घेतल्या व आपल्या मतलबाकरिता साह्य करण्याची त्यांना विनंती केली. म्हणजे या सर्वांच्या मदतीने बादशहावर छाप पडून तो आपले मोठ्या प्रेमाने स्वागत करील व सढळ हाताने देणगी देईल, अशी त्याची कल्पना होती. मुल्लासालेह दिल्लीत आल्याचे औरंगजेबाला कळविण्यात आले. पण त्याने काही हालचाल केली नाही. आपल्या मुलांना जे शिक्षक नेमण्यात येतील त्यांनी काय व कसे शिक्षण द्यावे, हे त्यांना सांगावे आणि अनुषंगाने मुल्लाजीला समज द्यावी असा औरंगजेबाचा विचार होता. बादशहाचे असे मत झालेले होते की, शहाजहानने आपणासाठी चांगल्या शिक्षकाची योजना केलेली नव्हती.

तीन महिन्यांचा अवधि गेला आणि नंतरच मुल्लाजीला आपल्या शिष्याची (औरंगजेबाची) भेट घेता आली. ती सुद्धा रोशनआरा बेगमच्या मध्यस्थीने आणि भेटीतून निष्पन्न काय झाले तर, सरदारांच्या समोर मुल्ला सालेहची झालेली फजिती. बादशहाबरोबर होणाऱ्या मुलाखतीचा दिवस उजाडला. न्यायशास्त्री, प्रमुख उमराव बादशहाच्या मुलांचे शिक्षक या सर्वांना त्यावेळी हजर राहाण्याचा हुकूम झाला. हे ऐकून मुल्ला सालेहला फार आनंद झाला. बादशहा आता सर्वांसमोर आपणास मोठी देणगी देणार असे त्याला वाटले. दरबारात आल्यावर रिवाजाप्रमाणे त्याने मुजरा केला तोच, त्याला बोलण्याकरिता तोंड उघडण्यासही अवसर न देता औरंगजेबाने बोलण्यास सुरुवात केली :–

मुल्लाजी ! ज्याला मुलगे आहेत अशा एखाद्या बादशहाचे अथवा राजाचे आद्य कर्तव्य म्हणजे, उत्तम निरोगी व सुदृढ दाई निवडून तिच्या स्तनपानाने मुलांची दुबळी शरीरे बळकट कशी होतील हे पाहाणे, हे होय. अशा दाईच्या दुधावर पोसलेली मुले तिच्यासारखी निरोगी व सुदृढ बनतील व त्यामुळे त्यांच्या ठिकाणी राजाला अभिप्रेत असलेली योग्य अशी शक्ती येईल. पण इतक्याने राजाची काळजी दूर

होत नाही. उलट दाई निवडताना जी काळजी बाळगली तीहून राजपुत्रांना शिक्षक निवडताना, कितीतरी अधिक काळजी घ्यावी लागते. कारण मुलांची प्रकृती जशी दुधावर अवलंबून असते, त्याचप्रमाणे त्यांचे बौद्धिक जीवन चांगल्या शिक्षणावर अवलंबून आहे. त्याचे महत्त्व शरीराहूनाही अधिक आहे. म्हणून सर्व बुद्धिमान सार्वभौम राजे, राजे व सरदार आपल्या मुलांच्या शिक्षणाकरिता उत्तम शिक्षक मिळविण्याचा आटोकाट प्रयत्न करतात. त्यांना हे चांगले ठाऊक असते की अशा बौद्धिक दुधाभावी मुले पितरांचे गुण टिकवू शकणार नाहीत अथवा त्यांच्या प्रजाजनांच्या अपेक्षेप्रमाणे ते यशस्वी राजेही होऊ शकणार नाहीत. मॅसिडोनियाच्या फिलिप राजाचा मुलगा हा होतकरू होता. त्याला शिक्षण द्यावे म्हणून फिलिपने पंडित श्रेष्ठ ॲरिस्टॉटलला आपल्या दरबारात येऊन राहण्याची विनवणी केली. आपल्या गुरूच्या विद्येचा ॲलेक्झांडरला इतका लाभ झाला की, तो इतिहासातील सर्वश्रेष्ठ योद्धा म्हणून नाव करून गेला. एखादा राजपुत्र मोठा झाला की, लहानपणी मिळालेले चांगले धडे विसरून तो व्यसनाधीन होणे शक्य असते. परंतु अगदी शिक्षण न मिळालेला मुलगा पुढे सद्‌गुणी होईल याची मात्र शक्यता नाही. पितरांकडून शारीरिक तर गुरुजनांकडून बौद्धिक जीवनाचा लाभ त्यांना होत असतो. एकंदरीत पाहता, मुलांवर आईबापापेक्षा शिक्षकांचे ऋण अधिक होय, असे मला वाटते. कारण मनाची वाढ नसेल तर शारीरिक जीवनाला अर्थ राहात नाही. बौद्धिक जीवन विरहित भौतिक जीवन असून काय उपयोग? मनाची प्रगल्भता ही उत्तम शिक्षणानेच येते. ती प्रगल्भता नसेल तर कोणीही राज्य करण्यास पात्र ठरत नाही.

सर्वश्रेष्ठ सालोमन याने आपल्या बापाकडून शिक्षण मिळविले होते. पण त्याने परमेश्वरापाशी काय मागितले. संपत्ति आणि सत्ता मागितली काय? नाही तर त्याने परमेश्वरापाशी योग्य रीतीने राज्यपालन करण्यासाठी आवश्यक असलेले ज्ञान व विवेकबुद्धि यांची मागणी केली. सालोमनला माहिती होते की ज्याला ज्ञान नाही असा राजा काय कामाचा! ज्ञान नसेल तर न्याय देता येणार नाही आणि विवेकबुद्धि नसेल तर प्रजेत शांतता नांदू शकणार नाही. ज्ञान हे बुद्धिचे विश्वसनीय प्रमाण, उच्छृंखलपणावरील उतारा, गांजलेल्यांचा आधार, पीडितांचे आश्रयस्थान, दुर्जनांना दहशत, अशी ही ज्ञानाची रूपे होत. विवेकबुद्धिने राज्यात समतोलपणा राहतो. विवेक म्हणजे राज्याचे आणि समाजाचे मर्मस्थान होय, विवेक म्हणजे अंधारातील प्रकाश, आणि विवेक म्हणजे तारकांच्या समुदायातील सूर्यच होय. राजाला आवश्यक असणाऱ्या सद्‌गुणांची जोपासना आणि तीही त्या राजामध्ये निष्ठेने आणि जिव्हाळ्याने घडवून आणणे हे काम एक ज्ञानी पंडितच करू शकतो. असा पंडित शिक्षक म्हणून ज्याला लाभला त्याचे भाग्य काय वर्णावे!

आमच्या इतिहासात आणि जगातील इतर इतिहास ग्रंथांत अनेक राजे, राजपुत्र व बादशहा इत्यादींना असे थोर विद्वान लाभले असे नमूद आहे; हे वाचून मला आनंदच वाटतो.

पण हाय! माझ्या कोवळ्या वयात, मुद्दाजी शिक्षणासाठी मला तुमच्या स्वाधीन करण्यात आले. ही आठवण झाली की मला अश्रू ढाळावे लागतात. माझ्या कार्यक्षमतेकडे आणि स्वभावाकडे आपण दुर्लक्ष केले. मला क्षुल्लक गोष्टी शिकवण्यात माझा वेळ व्यर्थ दवडलात, परंतु राजपुत्राला आवश्यक अशा गोष्टी शिकविण्याकडे दुर्लक्ष केले. शिकविल्या तर काय? तर ज्यांचा माझ्याशी संबंध नाही अशा किंवा असलाच तर पंडितांशी बोलताना शोभा म्हणून त्यांचा उपयोग व्हावा अशा गोष्टी. जगात प्राचीन काळी अॅसिरियन, आणि पर्शियन इ. लोकांची राज्ये होती. सिथियन जमातीचे लोक पूर्वी कातडी वस्त्रे वापरीत, डोंगराळ भागात राहत. ते संख्येने थोडे असत. तेच लोक म्हणजे आज तुर्क या नावाने प्रख्यात झाले आहेत आणि आशिया व आफ्रिका यावर दृढपणे सत्ता गाजवीत आहेत. या गोष्टी तुम्ही मला शिकविल्यात काय? युरोपियन फिरंगी यांची साधने अल्प आहेत. असे असूनही त्यांनी ऑटोमन तुर्कांच्या प्रबळ सत्तेशी टक्कर घेतली आणि तिला पराभूत केले. या युरोपियन फिरंग्यांच्या कल्पकतेच्या आणि शौर्याच्या गोष्टी तुम्ही मला कधी तरी सांगितल्या काय? निदान तुम्ही मला चीनची संपत्ति आणि वैभव यांच्या गोष्टी तरी सांगितल्यात का? नाही. तुम्ही या गोष्टी माझ्यापासून दडवून ठेवल्यात.

हिंदुस्तान आणि हिंदुस्तानचे बादशहा या पलीकडे तुम्हाला बाहेरील जगाचे ज्ञान नसावे हे शक्य आहे. कारण हिंदुस्तानच्या बाहेर जगात बादशहा असे नाहीतच. जे आहेत ते लहानसहान आणि क्षुल्लक असे राजे आहेत, असे तुम्ही मला सांगितले. त्यांची सैन्यें, त्यांची युद्धे, त्यांच्या चालीरीती, त्यांचे धर्म, त्यांची शासनपद्धति, आणि त्यांचे व्यवहार, यासंबंधी तुम्ही काहीही माहिती दिली नाही. माझे पूर्वज आणि साम्राज्य संस्थापक नामवंत तैमूर आणि पराक्रमी बाबर यांच्याबद्दल तुमच्याकडून क्वचितच माहिती मिळाली. त्यांचे जीवनवृत्तांत, त्यांनी मिळविलेले अपूर्व विजय, त्यांची युद्ध पद्धति, त्यांची सैन्य रचना, त्यांचे नेतृत्व याबद्दल माहिती देण्याचा तुम्ही प्रयत्न केला नाही. तुम्ही मला एक चांगला अरब बनवण्यामध्ये आपली सर्व शक्ति खर्च केली. अरबी भाषेवर थोडेसे प्रभुत्व मिळण्यासाठीही दहा ते बारा वर्षे लागतात. ती भाषा मला शिकविण्यात माझा वेळ व्यर्थ घालविलात. यात माझे तारुण्य आणि इतर उच्च हेतू पार पाडण्याची क्षमताही नाहिशी झाली.

राजपुत्राला अशा पद्धतीने शिक्षण देण्यास तुम्हाला कोणी सांगितले? तुम्ही मला अरबी भाषेत शिकविले ते माझ्या मातृभाषेतून शिकविणे योग्य झाले नसते का? बरे ते राहू द्या. परंतु मोगल राजपुत्रांच्या चालरीती मला शिकविणे हे तुमचे कर्तव्य

नव्हते काय ? एक दिवस मला माझ्या बंधूच्या विरुद्ध राज्य मिळविण्याकरिता नव्हे तर आत्मरक्षणाकरिता तलवार घेऊन लढावे लागणार आहे, हे सांगितले होतेत का ? मित्र कसे जोडावे, किल्ल्यांना वेढे द्यायचे कसे, ते जिंकायचे कसे, निकराच्या लढाया कशा करायच्या याची माहिती तुम्ही मला द्यावयास पाहिजे होती. या सर्व गोष्टींचे मला शिक्षण देणे आवश्यक होते. पण तुम्ही तिकडे दुर्लक्ष केले. याचे कारण काय ते मला समजत नाही. त्याचा ठपका माझ्या पित्याच्या निष्काळजी-पणावर का तुमच्या अज्ञानावर ठेवावा, हे मला समजत नाही.

जर मी कोणाचा ऋणी असेन तर तो शेख मीर याचा. मला त्याचे आभार मानले पाहिजेत. त्यालाच मी माझा शिक्षक मानतो. त्यानेच मला युद्धकला शिकविली. तो असा मनुष्य होता की, अजमीरजवळील दाराशी झालेल्या युद्ध-प्रसंगात त्याने माझ्यासाठी आपले प्राण अर्पण केले. तुम्हाला युद्धकला अवगत नव्हती. पण माझा पिता मला एखाद्या सुभ्यावर अधिकारी म्हणून पाठविण्याची शक्यता होती. या दृष्टीने राज्य कसे चालवावे, त्याच्या पद्धती तरी तुम्ही निदान मला शिकवायला पाहिजे होत्या. तसेच न्यायदान कसे करावे, लोकांचे प्रेम संपादन करण्याचे मार्ग कोणते, सरदारांच्या कडून गैरकारभार व मंत्र्यांकडून गैरकृत्ये होत असतील, तर कोणत्या परिस्थितीत कडकपणा दाखवायचा, त्यांना केव्हा चुचका-रायचे, आणि ही सर्व गैरव्यवस्था नाहिशी करण्याच्या योजना कोणत्या, यासंबंधी तुम्ही मला सांगायला पाहिजे होते. पण या सर्वांबद्दल तुम्ही तोंडातून शब्दही काढला नाही. तुम्ही माझी दिशाभूल केलीत. मी तुमचा काहीही देणे लागत नाही. माझ्या पित्याने जे काही वर्षासन दिले आहे त्यावर आनंदाने गुजराण करा. पुनः माझ्या समोर येऊ नका. तुम्ही मला आयुष्यातील बराच काळ व्यर्थ दवडण्यास लावला. आजचा हा दिवस तुमच्यामुळे वाया गेला असे मी समजतो.

एवढे बोलून औरंगजेब दरबारातून निघून गेला. जमलेले सरदार त्याचे हे ऐकून चकित झाले. तेथे असलेले विद्वान पंडित, विशेषतः हजर असलेले औरंगजेबाच्या मुलांचे शिक्षक बुचकळ्यांत पडले. मुल्लाशालेहचा भ्रमनिरास झाला. खाली मान घालून तो दरबारातून निघून गेला. तो जो नाहीसा झाला त्याचे पुढे नावच ऐकू आले नाही.

**अमीरखानाची काबूलवर नेमणूक** : वरील घटनेनंतर काही दिवस गेले. औरंगजेबाचा दुसरा शिक्षक शेख मीर याचा उल्लेख वर केला आहे. त्याने अजमीरच्या लढाईत औरंगजेबासाठी प्राण अर्पण केले होते. त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी म्हणून औरंगजेबाने शेख मीरचा भाऊ अमीर खान[1] याला, महाबतखानाच्या

१. 'अमीरखान' पदवी असलेला सैय्यदमीर (मीर मुहम्मद खान ख्वाफीचा मुलगा) हा २७ रबी ॥ १०८१ हि. (सप्टें. १२, १६७०) त मरण पावला. हा शेख मीर (१०६९ हि. १६५९ त मरण पावला) चा भाऊ होता (तारीख-इ-मुहम्मदी १०८१ . . . मा-उल-उमरा ॥ ४७६) महाबत खान हा १०८५ हि. (१६७४–७५) त मरण पावला.

जागी काबुलचा सुभेदार म्हणून नेमले. या बदलीचे विशेष कारण अमीरखानाला खुष करावे असे म्हणण्यापेक्षा महाबतखानाबद्दलची औरंगजेबाला वाटणारी काळजी, हे होय, असे म्हणावे लागेल. स्वतंत्र वृत्तीच्या पठाण जमातीशी महाबतखानाचे स्नेहाचे संबंध होते. त्यामुळे, न जाणो तो शहाजहानच्या बाजूने उभा रहायचा, असे औरंगजेबाला वाटे. यासाठी आतापर्यंत औरंगजेब हा महाबतखानाला स्नेहाची अनेक पत्रे लिहून चुचकारीत होता. एकदा महाबतखानाने शहाजहानची बाजू मांडणारे पत्र औरंगजेबाला लिहिले होते. त्याचा उल्लेख वर आला आहे.

काबूलला पोहोचल्यावर अमीरखानाने[1] औरंगजेबाचे पत्र महाबतखानाला सादर केले. पत्रात, महाबतखानाने दरबारात हजर व्हावे, आणि नंतर गुजरातेचा सुभेदार म्हणून निरोप घ्यावा असे कळविण्यात आले होते. त्याप्रमाणे महाबतखान काबूलहून दरबारात आला, आणि नंतर गुजरातेकडे निघून गेला. दरबारात असताना महाबतखानाने जुन्या सरदारांना आणि नोकरांना बडतर्फ करण्याची घाई करू नये असे सुचविण्याची एक युक्ति केली. त्याने आपली दाढी काढून टाकली. औरंगजेबाने ह्याचे कारण विचारले तर महाबतखानाने पुढीलप्रमाणे उत्तर दिले "आपल्या आज्ञेने जुन्या सरदारांना, शिपायांना बडतर्फ करण्यात येत आहे. ही आपत्ति माझ्यावर ओढवू नये म्हणून मी दाढी काढून टाकली आहे." (त्या काळात दाढी ठेवणे हे एक प्रतिष्ठेचे लक्षण मानले जाई) औरंगजेबाने महाबतखानाचा हेतू ओळखला. जुन्या सरदार शिपायांना कामावर चालू ठेवावे; आणि बडतर्फ केलेल्यांना परत घेण्यात यावे अशी त्याने आज्ञा केली.

**रोशनआरा ही बेगमसाहेबाच्या राजवाड्याची मागणी करते :** शहाजहान हा दिल्ली येथे बादशहा म्हणून राहत असताना, त्याची मुलगी जहानाराबेगम (बेगमसाहेबा) हिचा किल्ल्याच्या बाहेर स्वतःचा असा एक वाडा होता. तो वाडा आपणास मिळावा म्हणून औरंगजेबाची लाडकी बहीण रोशनआरा हीने त्याला विनंती केली. तिचा हेतु (स्वच्छंदपणे वागण्यास मिळावे हा) ओळखून औरंगजेबाने खुबीने टाळले.

राजवाड्यात थॉमेझिया मार्टिन्स नावाची एक पोर्तुगीज बाई होती. मोगलांनी हुगळी घेतली तेव्हा इतरांच्या बरोबर या पोर्तुगीज बाईलाही कैद केले होते. तिला नंतर राजवाड्यातील मुदपाकखान्यावर नेमण्यात आले होते. रोशनआराबेगम हिची या बाईवर बरीच मर्जी होती. थॉमेझियाचा आणि माझा (मनुचीचा)

१. अमीरखानाची नेमणूक रब्बी ४।। ला १०७१ हि. (नोव्हेंबर २७, १६६१) ला करण्यात आली. (मा-आसीर-इ-आलमगिरी. १८) महाबतखानाला राजा जसवंतसिंगाच्या ठिकाणी गुजरातमध्ये पाठविण्यात आले. १६ झि । हिज्जा. (ऑगस्ट २, १६६२) (वरील ग्रंथ पा. ४१).

चांगलाच परिचय असल्यामुळे मला तिच्याकडून राजवाड्यातील हकीगती कळत असत. रोशनआराच्या खाजगी जीवनातील भानगडी आणि त्या बाहेर फुटू नयेत म्हणून औरंगजेबाने घेतलेली काळजी याची हकीकत मला थॉमेझिया मार्टिन्स-कडूनच कळली.

**बल्ख देशाचे राजदूत :** या सुमारास बल्ख देशाच्या बादशहाकडून औरंगजेबाकडे राजदूतांचे मंडळ आले होते.[1] (एप्रिल २१, १६६१ ते एप्रिल १२, १६६२) शहाजहानच्या काळात मोगलांनी बल्खवर स्वारी केली होती. औरंगजेब बादशहा झाल्यावर ती मोहिम तो पुनः हाती घेईल की काय अशी बल्खच्या बादशहा सुभान कुलीखान याला काळजी वाटू लागली. शांतता राहावी आणि स्नेहाचे संबंध जुळवावे यासाठी त्याने औरंगजेबाकडे हे शिष्टमंडळ पाठविले होते. औरंगजेबाला मोहिमेतील अडचणींचा चांगलाच अनुभव आला होता. तो भाग जिंकून घ्यावा ही त्याला आतून इच्छा असली तरी न जाणो बल्खचा बादशहा हा इतरांबरोबर मिळून आपल्याला अडचणीत टाकायचा, अशी त्याला शंका वाटत होती. औरंगजेबाने बल्खच्या राजदूतांचे चांगले स्वागत करण्याचे ठरविले. पण त्याने अट ही घातली की, हिंदुस्तानी पद्धतीप्रमाणे त्यांनी तीन वेळा जमिनीपर्यंत लवून मुजरा करावा. राजदूतांनी ही अट स्वीकारली. भेटीच्या वेळी ते आपल्या बादशहाचे पत्र औरंगजेबाला देऊ पहात होते. परंतु (बल्खचा बादशहा हा जवळ जवळ मांडलिक आहे, किंवा फार तर अर्ध स्वतंत्र आहे, हे त्यांच्या मनावर बिंबविण्यासाठी) औरंगजेबाचा दुय्यम अधिकारी मुल्तफतखान[2] याने ते पत्र त्यांच्या हातातून घेऊन बादशहाकडे दिले. हे पत्र नंतर वजीर जाफरखान याला देण्यात येऊन योग्य वेळी त्याचे उत्तर देण्यात यावे असे ठरले. दूतांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली आणि त्यांनी आणलेल्या भेटी स्वीकारण्यात आल्या. कस्तुरी भरलेल्या पेट्या, ऐंशी उंट, ऐंशी घोडे आणि कलिंगडे, सफरचंद, नाशपती, डाळिंबे, बिन बियांची द्राक्षे, खिशमीश, बोरे, अक्रोड, बदाम, पिस्ते इत्यादी वस्तू दोनशे उंटावर लादून आणलेल्या अशा या भेटी होत्या. भेटीतील एक घोडा इतका चपळ होता की, सूर्योदयाला तो दिल्लीहून निघाला की, सुमारे १४० मैलावर असलेल्या आग्र्याला तो सूर्यास्तापूर्वी पोहचत असे. औरंगजेबाला बारीक चणीचा हा घोडा फार

१. बल्ख देशाचे राजदूत औरंगजेबाच्या राजवटीच्या ४थ्या वर्षात आले होते. बल्खच्या बादशहाचा वकील तुरानहून एक पत्र व नजराणा घेऊन आला होता. तो तेथे आल्यावर आजारी पडला व थोड्याच दिवसात मरण पावला. (मा-आसीरे-आलमगिरी) पा. ३४.

२. मुल्तफतखान (मीर इब्राहीम हुसेन) हा असालतखान मीर बक्षीचा दुसरा मुलगा होता. अहदीजचा हा बक्षी होता आणि नंतर वर्षांनी अख्ताहबेगी (अश्वशाळा प्रमुख) बनला. त्याला ही जागा त्याचा भाऊ इफ्तिखारखान यांच्या नंतर मिळाली होती. १९ जुमादा ii (११०२ ii जुलै ९, १६९१) ला जखमी होऊन तो मरण पावला. (मा-मासीरे-उल-उमारा ii ६११)

आवडत असे. त्याने त्याला 'बादरपत्तार' म्हणजे 'वायुगती' असे नाव दिले होते. राजदुत बादशहाला जेव्हा भेटण्यास येत, तेव्हा अकबराने घालून दिलेल्या परंपरेप्रमाणे, त्यांना भेटीच्या वेळी उभेच करण्यात येत असे.

बल्खचे राजदूत हे दिल्लीत चार महिने होते. बादशहाने राहण्यासाठी त्यांना लुत्फुल्लाखानाचा वाडा दिला होता. अगदी ओबडधोबड आणि घाणेरड्या सवयी असलेले हे लोक होते. हिरवट काळसर कांतीचे, तुरळक केस असलेल्या दाढीचे, उंच व बारीक डोळ्यांचे असे लोक होते. ते तरबेज घोडेस्वार व धनुष्यबाण चालविण्यात अत्यंत निष्णात होते. आपल्या धनुष्य बाणांनी ते शत्रूशी निकराने लढत. परंतु शत्रूकडून विरोध झाल्यास पळून जात. पळताना बाणांचा वर्षाव करीत, हा प्रकार मी अनेक युद्धातून पाहिला आहे. दिल्लीत असताना राजदूता-बरोबरच्या मंडळींनी घोडे, उंट, कस्तुरी, एरंडीच्या बिया, कातडी वगैरे बरोबर आणलेला माल विकला. मी स्वतः त्यांच्याकडून बऱ्याच वस्तू विकत घेऊन ठेवल्या.

त्या राजदूतांनी आपल्या बरोबर अनेक तर्तार आणि उझबेक स्त्रिया विकण्या-करिता आणल्या होत्या. बादशहाच्या अंतःपुरात पालख्या वगैरे वाहण्याकरिता अथवा रात्रीच्या वेळी, बादशहा अथवा राजपुत्र आपल्या बायकांच्या बरोबर एकांतात असताना, द्वाररक्षक म्हणून ठेवण्याकरिता त्यांची निवड केली जाई. कारण त्या लढाऊ वृत्तीच्या आणि भाला, धनुष्य आणि तलवार वापरण्यात अतिशय तरबेज अशा असत. त्यांच्यातील एकीला 'जॅक्शी' म्हणत. तुर्कीभाषेत या शब्दाचा अर्थ सुरेख असा होतो. धनुष्य, भाला वगैरे ती अत्यंत कुशलतेने वापरी. ती उंच, धिप्पाड, रुंद तोंडाची आणि बारीक डोळ्याची होती. इफ्तिकारखानाने[1] तिला विकत घेऊन बादशहाला नजर केली. अंतःपुरात पाहरा देणाऱ्या काशगर, कलमाक, पठाणी आणि हबशी या स्त्रियांच्या यादीत तिचा समावेश करण्याचा बादशहाने हुकूम केला.

काही महिन्यानंतर पहारेकरणींच्या प्रमुख स्त्री अधिकाऱ्याने औरंगजेबाला कळविले की, सदर जॅक्शी ही गर्भवती आहे. औरंगजेबाने उत्तर दिले की "जर तिला मुलगा झाला तर मी त्याला आपल्या मुलासारखा आणि मुलगी झाल्यास आपल्या मुली-प्रमाणे वागवीन. त्या तर्तार स्त्रिला मुलगा झाला. बादशहाने त्याचा आपल्या मुला-प्रमाणे प्रतिपाल केला. बादशहाने त्याला "अलमतोश बहादूर"[2] (जगातील पराक्रमी

---

१. सुलतान हुसेन–असालत खानचा थोरला मुलगा. याला इफ्तिकारखान ही पदवी औरंगजेबाच्या राजवटीच्या पहिल्याच वर्षी मिळाली. तो १०९२ हि. (१६८१) त मरण पावला. (बील ओर. बायाग्रॅफी १७५. आणि मी-आशीर-उल-उमारा I २५२).

२. या प्रकारचा पुरुष १०८१ हि. (१६७०) ते १०९७ इ. (१६८६) पर्यंत दरबारात होता. त्याचे मूळ काही कोठे वर्णन केलेले नाही. त्याला यलंतोश बहादूर हा किताब होता. (मा- आशीर-इ-आलम-गिरी १०८) यलंग म्हणजे चित्ता. तोश म्हणजे शक्ति. १०९१ (१६८०) त त्याला शस्त्रागाराचा

पुरुष) ही पदवी दिली. तो मोठा झाल्यावर त्याची एखाद्या राजपुत्राप्रमाणे व्यवस्था करण्यात आली. पण त्या तरुणाच्या बेशिस्त वागणुकीमुळे बादशहाने ही व्यवस्था काढून घेऊन त्याला लहान पगारावर ठेवण्याचा हुकूम केला. येथे हे सांगितले पाहिजे की, अशा मुलांचा आपल्या स्वतःच्या मुलाप्रमाणे प्रतिपाळ करण्याची हिंदुस्तानात परंपरा आहे. पण अनुभव हा की, अशी मुले चांगली निघत नाहीत. उलट त्यांच्यामुळे घरात कलह पेटण्यास मदत होते.

राजदूताचा एक नातेवाईक या सुमारास आजारी पडला. युरोपियन म्हटला की तो वैद्य असला पाहिजे, अशी या लोकांची समजूत असल्यामुळे त्यांनी मला त्या रोग्यावर उपचार करण्यासाठी म्हणून बोलावले. त्या निमित्ताने मला त्या उझबेक लोकांच्या बरोबर जेवणखाण करण्याचा अनुभव आला. उंट आणि घोडे यांचे मांस ते मीठ टाकलेल्या पाण्यात शिजवतात. बकरीच्या मांसाचा पुलावा हे त्यांचे खाद्य. खाद्यपदार्थ ते चादरीवर ठेवतात व त्याच्या भोवती बसतात. खाद्यपदार्थांच्यात हात बुडवून ते खाण्याची या लोकांत पद्धत आहे. जेवणानंतर हाताचा ओशटपणा घालविण्यासाठी ते बेसनाच्या पिठाचाही उपयोग करीत नाहीत. माझ्या रोग्याच्या खाण्यापिण्याची मी चौकशी केली तो मला कळले की, उंटाचे दूध, दही आणि पनीर हे त्याचे त्याच्या देशातील मुख्य खाद्यपदार्थ होत. वर सांगितलेले जेवण न करता आपल्या नेहमीच्याच पद्धतीचे जेवण करीत जा असे मी त्यास सांगितले. मी थोडी बहुत औषधेही दिली. काही दिवसांनी रोगी बरा झाला. राजदूताला माझ्या उपचारामुळे फार आनंद झाला. "तू बल्खला ये म्हणजे बादशहाकडून मी तुला जमिनी आणि घोडे, उंट व मेंढरे यांचे कळप द्यायला लावीन. बादशहापाशी आणि दरबारात तुझा मानमरातब राहील" असेही त्याने मला सांगितले. या निमित्ताने मला जग पाहण्याची संधि मिळेल म्हणून त्यांच्या बरोबर जाण्याची मला इच्छा झाली. पण त्यांच्या सवयी मला आवडल्या नाहीत. तुमच्या राहणीशी मी समरस होऊ शकणार नाही. असे सांगून मी त्यांच्याबरोबर जाण्याचे टाळले.

त्यांच्या एका उझबेक शिपायाने एका घोड्याला मानेपाशी कापून मोठ्या कौशल्याने रक्त काढलेले मी स्वतः पाहिले. त्याने घोड्यातून ४० औंस रक्त काढले. जखमेची जागा त्याने आपल्या बोटाने गच्च दाबून धरली आणि तो आणि त्याचे सहकारी ते रक्त प्याले. जखमेच्या जागी फडके बांधण्यात आले, व तो घोडा बरा

प्रमुख करण्यात आले. १०९६ हि. (१६८५) गणेशपागे हुजऱ्यांचा व्यवस्थापक होता. १०९७ त तो बादशहाच्या मर्जीतून उतरला. त्याचा मुलगा सुभानविर्दी हा ११०४ हि. (१६९२) त जिवंत होता.

यलंग तोश बहादूर हा एक तुर्क बच्चा (गुलाम) होता. त्याला आजमगिराने वाढविले. औरंगजेबाच्या आमदानीच्या १४ व्या वर्षी त्याला तलवार बाळगा देण्यात आले. याच्या मृत्यूचे वर्ष अज्ञात आहे. (कामराज तजकीरत उल-उमरा ब्रि. म्यु. हस्तलिखित १६,७०३ फोलिओ १०८ब)

आला. "तू घोड्याचे रक्त काढण्याचे कारण काय" म्हणून मी त्या शिपायास विचारले. त्याने मला पुढीलप्रमाणे उत्तर दिले :—

"आमच्या देशात शत्रू मुलुखात हालचाली करताना आम्हाला रसदेचा तुटवडा पडला तर आम्ही घोड्याचे रक्त पिऊन आमची गरज भागवतो. यामुळे घोड्याची शक्ती कमी होत नाही. शत्रू मुलखात आम्हाला उंट, घोडे अगर मेंढरी ही सापडली आणि आम्ही त्यांना बरोबर घेऊन जाऊ शकलो नाही तर आम्ही त्यांना कापून त्यांचे तुकडे करतो ते तुकडे घोड्याबरोबर ठेवतो. स्वारीत भूक भागविण्याकरिता आम्हाला त्यांचा उपयोग होतो."

चार महिन्यानंतर बख्खचे शिष्टमंडळ परत जाऊ लागले तेव्हा मंडळातील प्रत्येक माणसाला दोन उंची वस्त्रे आणि आठ हजार रुपये रोख देण्यात यावेत अशी औरंगजेबाने आज्ञा केली. बख्खच्या बादशहाला आठवण म्हणून काही वस्तू पाठविल्या. त्यात बुरख्याकरिता बेटिला कापड[1] (तलम पांढरे कापड), किनखाबी कापड जरीचे पट्टे असलेल्या कापडाचे तागे, उंची गालिचाच्या पाच जोड्या, रत्नजडित कट्यारी, गुलाबी अत्तराचे पाच बुधले आणि शिरपावाचे आणि सुंदर उंची पोशाख, यांचा समावेश होता. या सर्व देणग्या पाहून राजदूतांना फार आनंद वाटला.

राजदूत संतुष्ट होते याचे कारण त्यांचे अज्ञान हे होय. त्यांना माहित नव्हते की मोगल बादशहा ही शिरपावाची वस्त्रे (पोशाख) आपल्या प्रजाजनांना देत असतात. एखाद्यास शिरपाव पाठविणे व तो स्वीकारणे म्हणजे बादशहाचे स्वामित्व मान्य केले आहे असे जाहिर केल्यासारखे होते. वाचकाने पुढील गोष्टी विचारात घ्याव्या. मोगल बादशहाने विजापूर, गोवळकोंडा येथील बादशहा आणि उदेपूरचा राणा यांच्याकडे शिरपावाचे पोशाख पाठविले. हा पोशाख स्वीकारण्याचा विधी पुढीलप्रमाणे असे :—

बादशहाकडून शिरपाव (पोशाख) आणि पत्रे आली तर राजांनी, आणि मांडलिकांनी आपल्या राजधानीच्या बाहेर दोन मैल यावे. वस्त्रे स्वीकारण्याचा विधी विशिष्ट स्थळी करण्यात यावा. त्याच्या आधी दिल्लीच्या दिशेने तीन वेळेला लवून बादशहाची पत्रे मस्तकावर धारण केली पाहिजेत. विजापूर व गोवळकोंड्याच्या बादशहानी तसे करून मोगल बादशहाचे मांडलिकत्व पत्करले. उदेपूरच्या राण्याने मात्र शिरपाव धारण करण्यास आणि पर्यायाने आपण मोगलांचे प्रजाजन आहोत असे मान्य करण्यास नकार दिला. अर्थात राण्याच्या खर्चाने त्याचे सात हजार घोडेस्वार मोगल दरबाराच्या तैनातीस असतात हे खरे.

१. बेटिला :—हे तलम मलमलिच्या कापडाचे जुने व्यापारी नाव होय (युल ९० आणि म.सं. आं. अॅड. ।।।. २३३) बेटिगा — (पोर्तुगीज) बुरखा. बेटा—म्हणजे जांगीण (नन्).

बादशहाचा निरोप घेतल्यानंतर इतर काही मोठ्या सरदारांचा निरोप घेण्याकरिता राजदूत थांबले. प्रथम ते वजीर जाफरखानाकडे गेले. रिवाजाप्रमाणे निरोप घेऊन निघण्यापूर्वी त्यांना विडे दिले. विड्याचे पानदान सोन्याचे होते व तबक हिरेजडित होते. सर्वांची किंमत एक लाखापेक्षा अधिक होती. विड्याबरोबर पानदान व तबक सर्वच आपणास भेट म्हणून दिले आहे, अशा भोळेपणाचा आव आणून व समजूत करून घेऊन प्रमुखाने ते सर्व आपल्या कोच व पघळ अंगरख्यात कोंबले. मग वजिराचा निरोप घेऊन ते बाहेर पडले. वजीराने इतर सर्व सरदारांना इशारा दिला म्हणून राजदूताला निरोप देताना सरदारांनी चांदीच्या हलक्या पानदानातून त्यास विडे दिले. मुहम्मद अमीन खान आणि मुस्ताफतखानही असेच वागले. वजीर जाफरखानासारखे आता कोणी फसणार नाही, हे पाहून राजदूताने इतरांचा निरोप घेतला, दिल्ली सोडली आणि आपल्या देशाची वाट धरली.

आरमारी दल : देशातील राज्यकारभाराची घडी आता नीट बसली होती खुष्कीवर औरंगजेबाला विजय मिळालेच होते. समुद्रावरही आपली सत्ता स्थापन करावी असे त्याला वाटू लागले. त्याने एक आरमार स्थापन करण्याचे ठरविले त्याला कारणही असेच घडले. कवड्या लादलेले एक मुसलमानी जहाज चाच्यांनी[1] बुडविले होते. बंगालमध्ये कवड्या हे चलन म्हणून वापरण्यात येत असे. चाच्यांनी या जहाजाचा कब्जा घेतला. जहाजाच्या कप्तानाने त्यांना सांगितले की, कवड्यांचा तुम्हाला उपयोग नाही. आमच्या बरोबर मक्केपर्यंत याल तर तुम्हाला चाळीस हजार पटाका (८० हजार रुपये) देऊ. त्या देशाच्या बंदरापासून काही अंतरावर चाचे थांबले. बंदरात मोगलांची दोन जहाजे होती. त्यात मोगलांचे काही सरदार, त्यांच्या स्त्रिया आणि इतर यात्रेकरू मंडळी होती. त्या जहाजांची मदत घेऊन त्यांनी (मोगलांनी) चाच्यांचा पाडाव करण्याचा प्रयत्न केला. चाच्यांनी पाहिले की दहाबारा जहाजे आपल्यावर चाल करून येत आहेत. त्यांनी आपले जहाज समुद्रात वेगाने हाकारून पळून जाण्याचे सोंग केले. मोगल जहाजांनी त्यांना पकडण्याचा प्रयत्न केला. पण चाच्यांनी त्यांच्यावर हल्ला करून त्यांना उधळून लावले, इतकेच नव्हे तर त्यांनी एका जहाजाला आग लावून ते नष्ट करून टाकले. जहाजातील माणसे जळून मेली. इतका सूड उगवूनही त्यांचे समाधान झाले नाही. ते सुरते जवळील दीव बंदराजवळ दबा धरून बसले आणि सरदार, सरदार-स्त्रिया आणि इतर यात्रेकरू यांनी भरलेले जहाज, मक्केहून परतण्याची वाट पाहू लागले. या जहाजावर बरेच सोने, नाणे होते. ती दोन जहाजे परतताच चाच्यांनी त्यांच्यावर हल्ला चढवला. एक जहाज तर त्यांनी ताब्यात घेतले; आणि त्यावरील संपत्ति तर लुटलीच पण त्याबरोबर जहाजांवरील स्त्रियांची अब्रूही घेतली. नासधूस झालेले, मोगल यात्रेकरूंचे दुसरे जहाज सुरतबंदरात

१. हे चाचे पोर्तुगीज होते. पुढे त्यांना फिरंगी असे म्हणू लागले. 'फिरंगी' हा शब्द बंगालमध्ये व इतरत्र पोर्तुगीजांच्या मिश्र जातींना लावीत.

आले. सुरतेच्या सुभेदाराने घडलेली हकीकत औरंगजेबाला कळविली. वरील कारणामुळे औरंगजेबाने आरमार निर्माण करण्याचा निश्चय केला. आपली ही कल्पना त्याने आपला वजीर जाफरखान याच्या कानावर घातली. हा चांगला जाणकार असल्यामुळे आपले मत देण्यासाठी त्याने थोडा अवधि मागून घेतला. काही दिवसांनी त्याने औरंगजेबाला कळविले की, "आपणाजवळ आरमार बांधण्यासाठी लागणाऱ्या संपत्ति, लाकूड, इतर सामान यापैकी कशाचीच उणीव नाही. कमतरता आहे, ती एकाच गोष्टीची, आणि ती म्हणजे आरमाराचे योग्य संचलन करणाऱ्या माणसांची. औरंगजेबाने उत्तर दिले की "या कामाकरिता आपल्या पदरी असलेल्या युरोपियन लोकांना नेमावे". यावर, जाफरखानाने असे सांगितले की "असले जबाबदारीचे काम आपला देश सोडून आश्रयार्थ आलेल्या परक्यांच्या हाती सोपविणे योग्य नव्हे ते केव्हाही पळून जातील. शिवाय जे मोगल नाविक कामावर ठेवले जातील त्यांना हे लोक कमी लेखतील आणि या नाविकांना पूर्णपणे या अधिकाऱ्यांच्या कह्यांत रहावे लागेल."

परंतु आपले आरमार झालेच पाहिजे या उत्कट इच्छेमुळे औरंगजेबाने जाफरखानाचे हे बोलणे काही ऐकून घेतले नाही. एक लहान जहाज बांधून घेण्याची त्याने आज्ञा केली. जाफरखानाने सांगितलेल्या अडचणी कोणत्या हे त्याला प्रत्यक्ष पाहायचे होते. हे जहाज बांधण्याचे काम, जडावाचे काम करणाऱ्या माझ्या एका देश बांधवाला मिळाले. त्याचे नाव होते ऑर्टेन्शिओ ब्रॉन्झोनी.[1] त्याने तोफा, निशाण, डोलकाठ्या वगैरेंनी सुसज्ज असे एक शिडाचे लहान जहाज तयार केले. मोठ्या तलावावर ते चालवून दाखविले. त्याने तोफा डागल्या व ते जहाज सर्व दिशांना फिरविले. बोट तयार करणे, ती चालविणे यांतील हे सर्व कौशल्य पाहून औरंगजेबाला कळून आले की, सागर पर्यटन व सागरी युद्ध या गोष्टी हिंदुस्थानातील लोकांना जमण्यासारख्या नाहीत. युरोपियनांच्या दक्षतेला व धिटाईलाच त्या साजेशा आहेत. आणि म्हणून मोठ्या आशेने मनी बाळगलेली ही आरमाराची योजना त्याने रद्द केली.

**इराणचा वकील :** औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी इराणचा बादशहा शाहा आब्बास (दुसरा) याचा वकील दिल्लीस आला.[2] तो हिंदुस्थानच्या सरहद्दीजवळ आला आहे असे समजताच, औरंगजेबाने अब्दुल्ला बेग नावाचा एक अधिकारी त्याच्या स्वागताकरिता पाठविला. अब्दुल्ला बेग हा शहाजहानच्या काळी

१. ऑर्टेन्शिओ ब्रॉन्झोनी, व्हेनिशियन,—पहिल्या भागात (खंड १ ला) पा. १६२ वर याचा निर्देश केला आहे. शहाजहानला मीर जुमल्याने जो हिरा दिला होता, त्याला पैलू पाडण्याचे काम याजकडे दिल्याचे तेथे सांगितले आहे. टॅव्हर्नियरने याचा निर्देश केला आहे. (बॉल खंड १, ३९६. खंड २, ४४४).

२. बुदाक बेग, इराणचा शाहा आब्बास (दुसरा) याचा वकील मुलतान मध्ये आला. शव्वाल शेवटचा दिवस १०७१ हि. औरंगजेबाच्या कारकीर्दीचे दुसरे वर्ष. (बर्नियर, कॉन्स्टेबल १४६, १४७ पाहा).

पोलीस दलातील एक चांगला धोरणी अधिकारी होता. सरहद्दीवर वकीलाचे स्वागत करावे, आणि त्याचे इकडे येण्याचे हेतू काय होते तेही जाणून घ्यावे हे काम अब्दुल्ला बेगाकडे सोपविले होते. त्याकरता लागेल तो खर्च करावा असे अब्दुल्ला बेग याला सांगण्यात आले. वकीलांनी बादशहाला विशिष्ट पद्धतीने मुजरे केलेच पाहिजेत. बादशहा आपल्यासमोर कोणालाही बसू देत नाही. वकीलाने आणलेले पत्र बादशहा आपल्या हाताने घेत नाही. ते वजीराकडे द्यावे लागते. आणि मग वजीर ते पत्र बादशहाला वाचून दाखवितो. वरील शिष्टाचाराची माहिती इराणच्या वकीलाला देण्यात यावी आणि या गोष्टी वकीलाला मान्य आहेत की नाही याची चौकशी करून कळवावे असे अब्दुल्ला बेगला बजावण्यात आले होते. इराणचा वकील दरबारात हिंदुस्थानातील शिष्टाचाराचे प्रघात पाळण्यास तयार नसेल तर त्याला परत पाठवावे असे अब्दुल्ला बेगला गुप्तपणे सांगण्यात आले होते असे काहीजण म्हणतात. वकीलाचे सन्मानपूर्वक आदरातिथ्य करण्यात यावे, त्याला आपलेसे करून घ्यावे; म्हणजे त्याचे हेतू समजणे सोपे होईल. या विचाराने औरंगजेबाने वकीलाचा उत्तम पाहुणचार करण्यासाठी आपल्या सुभेदारास योग्य ते हुकूम दिले.

अब्दुल्ला बेग दिल्लीहून निघाला आणि कंदाहारजवळील सरहद्दीवर इराणी वकीलास भेटला. तेथून त्याने इराणी वकीलाला काबूल येथे आपल्याबरोबर आणले. काबूलहून अब्दुल्ला बेगने औरंगजेबाला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले : "मोगल दरबारातील शिष्टाचाराची मी इराणी वकीलाला माहिती दिली आहे. इतर देशाचे राजदूत दरबारात कसे वागतात तेही त्याला सांगितले आहे. असेच वागण्यात आपल्याला काही अडचण नाही, असे इराणी वकीलानी आपल्याला पुनः पुनः सांगितले आहे."

इराणी लोकांचा धूर्त आणि मतलबी स्वभाव औरंगजेबाला माहित होता. शहाजहानच्या काळात इराणच्या एका वकीलाने दरबारात अशिष्ट वर्तन केले होते याची औरंगजेबाला आठवण होती. त्याने लाहोरच्या सुभेदार खलीलुल्लाखान याला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले : "इराणी वकील हा हिंदुस्तानी पद्धतीने मुजरा वगैरे करण्याचे शिष्टाचार पाळील किंवा नाही याची माहिती तुम्ही मेजवानीच्या वेळी वकीलाकडून मोठ्या खुबीने काढून घ्यावी." खलीलुल्लाखानाने औरंगजेबाला कळविले की, आपण इतर वकील वागतात तसेच वागू अशी इराणी वकीलाने आपणास खात्री दिली आहे.

इराणी वकील दिल्लीजवळ येऊन पोहोचल्यावर त्याचे स्वागत करून त्याला दिल्लीस आणण्यासाठी औरंगजेबाने मीर जुमल्याचा मुलगा महम्मद अमीनखान यास एक हजार निवडक घोडेस्वार देऊन पाठविले. हा वकील कोणत्या कामगिरीवर येत आहे, हे शोधून काढण्याचे काम याजकडेही सोपविण्यात आले होते. याकरिता इराणी वकील व त्याच्या बरोबरच्या पाचशे इराणी घोडेस्वार यांना देणग्या, भेटी

वगैरे देण्यात मुळीसुद्धा हात आखडता घेऊ नये असे त्यास सांगण्यात आले होते. वरील माहिती काढण्यास वेळ मिळावा म्हणून वकीलाने सावकाश दिल्लीत प्रवेश करावा असे ठरविण्यात आले. दिल्लीचे रस्तेही शृंगारण्यात येणार होते. महम्मद अमीनखानाने वकीलाला शहरापासून सहा मैलावर असलेल्या शालीमार[1] बागेत आणून उतरविले. (राजधानीतील) महम्मद अमीरखानच्या पाठोपाठ औरंगजेबाने इतर सरदारही वकीलाकडे पाठविले. पण आपल्या वकीलाचा हेतू आणि येथील पद्धतीप्रमाणे दरबारातील शिष्टाचार पाळू किंवा नाही याबद्दल वकील काही बोलेना. औरंगजेबाचा तर या दोन्ही गोष्टींवर भर होता. औरंगजेबाला काळजी होती ती ही; मोगल दरबारात मीर जुमला, खलीलुल्लाखान, जाफरखान आणि इतर अनेक इराणी वंशाचे अधिकारी होते. न जाणो त्यांच्या सहाय्याने इराणचा बादशहा शहा अब्बास हा आपल्या (औरंगजेबाच्या) कारकीर्दीच्या सुरवातीसच काही प्रक्षोभक घटना घडवून आणील. शहाजहानचे आवडते पण आपल्याला विरोध असलेले अनेक अधिकारी अद्याप हयात आहेत. शक्य तितकी सावधगिरी बाळगली पाहिजे असे औरंगजेबाला वाटत होते. इराणी लोक विश्वासघात करण्याकडे किती सहज-पणे वळतात हे औरंगजेबाला अनुभवावरून ठाऊक होते.

इराणी वकील वर उल्लेखलेल्या बागेत येऊन उतरला होता. महम्मद अमीनखान-कडे औरंगजेबाने एक अधिकारी पाठविला, आणि वकीलाला पुढीलप्रमाणे कळ-विण्याची अमीनखानाला सूचना केली, "वकीलांनी आणलेली पत्रे ही सामान्यपणे वजीराने घ्यावयाची असतात. असा जरी शिरस्ता असला तरी इराणच्या बादशहा-कडून वकील म्हणून तुम्ही आला असल्यामुळे, तुम्ही आणलेले पत्र हे माझा मुलगा घेईल." या सूचनेमुळे वकीलाचे समाधान झालेले दिसले. वकीलाच्या शहर प्रवे-शाच्या वेळी दोन मैल लांबीच्या रस्त्याच्या दोन्ही बाजूनी सैनिक उभे असावेत. रस्ते, दुकाने आणि घरेही शृंगारलेली असावी आणि मोगल सरदार आणि सैनिक यांनी शिंगे, कर्णे, नगारे इत्यादींच्या घोषात वकीलाला समारंभपूर्वक आणावे; अशी आज्ञा करण्यात आली. वकीलाने किल्ल्यात प्रवेश केल्यावर त्याला तोफांची सलामी देण्यात आली.

दरबारात औरंगजेब मयूरासनावर बसला होता. ही उत्कृष्ट कलाकृती शहाजहानने बनवून घेतली होती. परंतु त्यावर बसण्याचे भाग्य त्याला कधीच लाभले नाही. रिवाजाप्रमाणे अभिवादन करण्याचे वकील नाकारील की काय असा औरंगजेबाला संशय आला होता. म्हणून त्याने आपल्या जवळ चार उंच व धिप्पाड माणसे उभी

१. दिल्लीची शालीमार बाग आता बरीच वर्षे अस्तित्वात नाही. ती बादली सराई जवळ होती. मा. आसीर-ई-आलमगिरीत, मुक्काम करण्याचे ठिकाण म्हणून बागेचा निर्देश आहे.

केली. वकीलाने शिष्टाचाराप्रमाणे मुजरा (सलाम) केला नाही, तर त्याला जबरदस्तीने मान वाकविण्यास लावावयाची असे औरंगजेबाने ठरविले होते. या समारंभाकरिता दरबारचा दिवाणखाना शेकडो सुंदर वस्तूंनी सुशोभित केला होता.

वकील औरंगजेबासमोर आला. त्याच्याबरोबर इतर मोगल सरदार होते. मुजरा (सलाम) करण्याच्या स्थळी आल्यावर सरदारांनी वकीलाला शिष्टाचाराप्रमाणे मुजरा (सलाम) करण्यास सांगितले. पण पूर्वी कबूल केल्याप्रमाणे न वागता वकीलाने आपल्या छातीवर दोन्ही हात ठेवून मुजरा (सलाम) केला. यावर वर उल्लेखलेले चार माणसे पुढे झाली. त्यापैकी दोघांनी त्याचे हात धरले आणि दोघांनी त्याच्या मानेला स्पर्श केला. जबरदस्ती करत आहोत असे अभिनय न दाखवता, त्यांनी त्याचे हात आणि डोकेही खाली आणायला लावली. मोगल राज्यात मुजरा करण्याची हीच पद्धत आहे, असे त्यांनी त्याला सांगितले, नंतर वकीलाने समयसूचकता दाखवून मोगल पद्धतीप्रमाणे मुजरे केले.

यावेळी औरंगजेब आपले तोंड वळवून आपला मुलगा सुलतान मुअज्जम (शाहआलम) याच्याशी बोलण्याचा आविर्भाव करीत होता. मुअज्जम उठून वकिलापाशी आला. वकीलाने तक्रारीचे काहीच चिन्ह न दाखविता प्रसन्न वदनाने आपल्या जवळचे पत्र काढले, आणि ते मस्तकापर्यंत नेऊन राजपुत्र मुअज्जम याच्या हवाली केले. राजपुत्राने ते पत्र बादशहाकडे आणले. आणि मग बादशहाने आपल्या खाजगीचा अधिकारी खोजा दानीश याला ते देण्यात यावे असा इशारा केला.

वकीलाने खिलतीची वस्त्रे धारण केली. त्यानंतर इराणहून भेटीदाखल आणलेल्या वस्तू बादशहासमोर हजर करण्यात आल्या. या नजराण्यात अत्यंत देखणे आणि पुष्ट असे सत्तावीस घोडे होते. यापैकी नऊ घोड्यांवर रत्नजडीत व मोत्यांच्या झालरीची जिने होती. इतरांच्यावर किनखापी झुली होत्या; अठरा केसाळ उंट होते. उत्कृष्ट गुलाबपाण्याच्या साठ पेट्या होत्या. इराणमध्येच फक्त आढळणाऱ्या बेद-इ-मश्क[1] या फुलाच्या अर्काच्या वीस पेट्या होत्या. अप्रतिम कलाकुसरीचे बारा गालीचे होते. मौल्यवान अशा जरीच्या कापडाच्या चार पेट्या होत्या. चार छोट्या तलवारी व चार रत्नजडीत कट्यारी होत्या. बंद केलेल्या सोन्याच्या पेटीत शिराझ पर्वतावरील वनस्पतींचा औषधी अर्क होता. औरंगजेबाने मोठ्या कुतूहलाने भेटी नजरेखालून घातल्या. बादशहाने महम्मद अमीनखान याला इराणी वकीलास काही आपुलकीचे प्रश्न विचारण्यास सांगितले. त्यानंतर त्याने दरबार बरखास्त केला. इराणी वकीलाला दरबारात पुनः केव्हाही येण्याची मोकळीक असून त्याचे स्वागतच होईल असे त्याला कळविण्यात आले.

१. बेद-इ-मश्क : इजिप्शियन वाळूंजीचे झाड (स्टाइन गॅसचा पर्शियन कोश पा. २१७)

इराणी वकील दरबारातून बाहेर आला. त्याच्या राहण्यासाठी अलीमर्दानखानाचा वाडा सज्ज करण्यात आला होता. तेथे तो राहू लागला. त्याचा सरकारी खर्चाने सरदारांनी पाळीपाळीने पाहुणचार करावा अशी औरंगजेबाने आज्ञा केली. दरबारात प्रवेश करताना इराणी वकीलाने शिष्टाचाराप्रमाणे आवश्यक त्या पद्धतीने मुजरे केले नव्हते. याची जबाबदारी अब्दुला बेगवर टाकण्यात आली. त्या बिचाऱ्याला दरबारातून घालवून देण्यात आले. त्या दुःखाने तो लवकरच मरण पावला. जरी मुजरा करण्याचे काम फारसे धसमुसळेपणाने केले गेले नव्हते तरी ज्या बळजबरीने इराणी वकीलाला हिंदुस्थानी पद्धतीने मुजरा करावयाला लावले होते त्याबद्दल दरबारात व शहरात यावेळी बरीच कुजबुज चालू होती. इराणी लोक या बळजबरीबद्दल आपली नापसंती व्यक्त करीत होते. औरंगजेबाचे वागणे अविचाराचे असून याबद्दल इराणचा बादशहा सूड उगवील असे ते बोलत होते. अशा प्रकारे अनेक अफवा पसरल्या होत्या.

काही जण म्हणत की औरंगजेबासमोर अशा प्रकारे मुजरे केल्याबद्दल इराणचा बादशहा शाहा आब्बास हा आपल्या वकीलाला क्षमा करणार नाही. वकील इराणला परतल्यावर तो त्याचा शिरच्छेदच करील. शाहा अब्बासने औरंगजेब याला लिहिलेल्या पत्रात काय मजकूर असावा याबद्दल इतर काही लोक पुढीलप्रमाणे तर्क करीत. "तुम्ही आपला मोठा भाऊ दारा यांचा शिरच्छेद करण्याचे कठोर कृत्य केले आहे. त्यामुळे सर्व जगाला धक्का बसला आहे. आपला भाऊ मुदारबक्ष याला गादीवर बसवू अशी कुराणावर शपथ घेतली होती. असे असूनही तुम्ही कायद्याचा तात्रिक आधार घेऊन मुरादबक्षाचा वध करविला. बरे, या गोष्टी जाऊ द्या. तुम्ही पितृकर्तव्य विसरून आपल्या बापाला कैद केले. तुम्हाला अमानुष म्हणू नये तर काय म्हणावे ? तुमच्या दुर्गुणाकडे तुमच्या बापाने कित्येक वर्षे डोळेझाक केली. वाढत्या वयाप्रमाणे तुम्ही सुधाराल अशी त्याला आशा होती. पण आता तुमच्या वडिलांना कळून आले की तुमचे हृदय हे वाघाच्या हृदयापेक्षा भयंकर आणि कोणत्याही जनावराच्या हृदयापेक्षा अधिक जंगली आहे. काही जनावरांत तरी आपल्या वृद्ध आईबापापाशी नीट वागण्याचा स्वभाव आढळून येतो. हे प्राणी-सृष्टीज्ञानाच्या पुस्तकातून दिसून येईल."

वरील प्रकारे आणि इतर असाच मजकूर शाहा अब्बासच्या पत्रात होता, अशा अफवा पसरल्या होत्या. काही म्हणत, की औरंगजेबाने आपल्या नाण्यावर आलमगीर जगजेत्ता हे नाव धारण केले, याचा शाहा अब्बासला अतिशय राग आला होता. खरे म्हणजे पत्रात काय होते हे कोणासच माहीत नव्हते. औरंगजेबाने ते पत्र आपला वजीर, तो इराणी वंशाचा असल्यामुळे, त्यालाही दाखविले नाही. पण एकंदरीत पाहता वर दिलेला मजकूर जवळ जवळ खरा असावा. अशा पत्राबरोबर शाहा

अब्बास इतक्या भेटी कशा पाठवील, असे कोणालाही वाटेल. पण अशी परंपरा त्याकाळी रूढ होती.

एका आठवड्यानंतर मोगल वजीर जाफरखान याने इराणी वकीलाला मोठी थाटाची मेजवानी दिली. इराणी वकील हा चार महिने हिंदुस्थानात होता. पण या काळात त्याने कोणाही सरदाराचे आमंत्रण स्वीकारले नाही. याला अपवाद फक्त महम्मद अमीनखान होता. त्याने इराणी वकील परतण्यापूर्वी आठ दिवस त्याला मोठी थाटाची मेजवानी दिली.

इराणी वकील मुक्कामावर जात असताना, हिंदुस्थानी व इराणी लोकांतील फरक ठळकपणे निदर्शनास येत होता. हा भिन्नपणा मला ठळकपणे आढळून आला. बोलणे चालणे, चेहरेपट्टी, आवाज इत्यादीमध्ये इराणचे लोक हिंदुस्थानच्या रहिवाशांपेक्षा सरस दिसत. वकीलाबरोबर ५०० घोडेस्वार असत. ते एका उंचीचे, शिपाइ, देखणे, मोठ्या मिशा असलेले असत. त्यांचे घोडेही चांगले सजलेले आणि उमदे असत. त्यांच्यापैकी एकजण मास्कोचा राहणारा असून इराणच्या बादशहाचा गुलाम होता. मी इराणमध्ये असताना माझी आणि त्याची ओळख झाली होती. तो पुष्कळ वेळा माझ्या घरी आला. या वकीलाचा हेतु काय हे सांग, म्हणून मी त्याला सुचविले. पण त्याने खांदे उडवीत आणि डोळे मिटून, मी काही बोलू शकत नाही असा इशारा केला.

साडेचार महिन्यानंतर वकीलाला मोठ्या सन्मानाने परत पाठविण्यात आले. भेटी म्हणून औरंगजेबाने त्याला दोन सजवलेले घोडे, रत्नजडित मूठ असलेली कट्यार, पागोट्यात खोवण्यास एक सुंदर पाचू आणि पोषाखाच्या दोन उंची जोड्या इतक्या वस्तु दिल्या. बादशहा शाहा अब्बास करिता त्याने एक पत्र व लेखनाची सोन्याची रत्नजडित अशी एक लहानशी पेटी दिली. ही पेटी बंद व मोहोर केलेली होती. ती शाहलाच द्यावयाची होती. त्यात काय आहे हे कोणालाच माहित नव्हते.[१]

वकील परतीच्या प्रवासावर निघाला. औरंगजेबाने आपला लाहोर येथील सुभेदार खलीलुल्लाखान यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली : "नद्यांच्या प्रत्येक उतारावर तुम्ही माणसे पाठवून वकीलाबरोबर असलेल्या सगळ्या सामानाची कडक तपासणी करा. वकीलाने एकाही माणसाला (हिंदुस्तानातील) आपल्या बरोबर घेऊन जाता कामा नये." इराणचे लोक हिंदुस्तानच्या रहिवाशांना गुलाम म्हणत. ते एक कारण होते असे म्हणतात. पण खरे काय ते कळले नाही. औरंगजेबाची आज्ञा इतक्या कडकपणे अंमलात आली की, वकीलाने हिंदुस्तानात घेतलेले सगळे गुलाम त्याच्याकडून काढून घेण्यात आले. वकीलाच्या लोकांनी काही गुलामांना पेट्यांतून लपविले

१. इराणी वकीलाची दरबारातील भेट बादशहा औरंगजेबाच्या कारकिर्दीच्या ४ थ्या वर्षी झाली (१० झी. हिज्जा. १०७) ही-ऑगस्ट ७, १६६१.

होते. अशा गुलामांनाही बाहेर काढण्यात आले. अशा रीतीने अवमानीत होऊन इराणी वकील आपल्या देशाकडे परत गेला. क्षमा करणे हे बादशहाला माहित नसते. काही वर्षांनंतर औरंगजेबाने आपला वकील इराणकडे पाठविला. तेव्हा शाहा अब्बासने वरील कृत्याबद्दल सूड घेतला ती हकीकत पुढे येईल.

**औरंगजेबाचा आजार :** इराणचा वकील परत गेल्यावर काही दिवसांनी औरंगजेब तापाने आजारी पडला.[1] ताप इतका वाढला की त्यात त्याला वात झाला. हकिमांना ताप काही हटविता येईना. मग ताप कमी करण्याकरिता त्याच्या शरीरातून थोडे रक्त काढून टाकण्याचे ठरवून त्याप्रमाणे करण्यात आले. रक्त काढले त्याजागी पट्टी बांधण्यात आली. तापामुळे औरंगजेब बिछान्यावर सारखी हालचाल करत होता. त्यामुळे पट्टी सुटली. शरिरातून पुनः रक्त वाहू लागले. राजवैद्य हकीम-उल मुल्क[2] याला बोलावण्यात आले. तो येऊन पोहोचेपर्यंत बराच रक्त-स्राव झाला होता. राजवैद्य बराच घाबरला होता. त्याने नव्याने पट्टी बांधली. उष्णतेमुळे औरंगजेबाची तगमग होत होती. त्याने कलिंगडे खाण्यास मागितली आणि राजवैद्याने अविचाराने ती खाण्यास परवानगी दिली. त्याचा परिणाम असा झाला की, औरंगजेबाची वाचा जवळ जवळ बंद झाली. ती पुनः परत येईल किंवा नाही याबद्दल वैद्यांना शंकाच वाटू लागली.

आपला भाऊ आता वाचत नाही असे रोशनआरा बेगमला वाटले. औरंगजेबाचा धाकटा मुलगा सुलतान आझम[3] हा त्यावेळी नऊ वर्षांचा असून अंतःपुरातच रहात होता. रोशनआरा बेगमने बादशाही शिक्का मिळविला आणि सुलतान आझमच्या वतीने तिने अनेक राजे आणि सरदारांना सुलतान आझम गादीवर बसण्यासाठी पाठिंबा द्यावा म्हणून पत्रे लिहिली. औरंगजेबाचा मोठा मुलगा सुलतान मुअज्जम[4] (शाहा आलम) याच्या आईला रोशनआराची ही मसलत समजली. तिने रोशनआराला म्हटले "तू जे काही करीत आहेस ते योग्य नव्हे. बादशहा अद्याप जिवंत

१. बादशहाचा आजार त्याच्या राजवटीच्या ५ व्या वर्षाच्या प्रारंभी सुरु झाला.—१ शव्वाल १०७२ (मे २२, १६६२). औरंगजेब १० झी. हिज्जा १०७२ (जुलै २७, १६६२) पर्यंत आजारी होता. १५ झी. काद. (ऑगस्ट २, १६६२) ला त्याने आजारातून उठल्यानंतर प्रथम स्नान केले. (मा-आशीर-इ-आलमगिरी ४१) · एल्फिन्स्टन ३३८, बर्नियर १२३-२६.

२. मीर मुहम्मद महदि अर्दिस्तानी, दक्षिणेकडून औरंगजेबाबरोबर आला. १०६८ हि. (१६५८) त्याला हजारी करण्यात आले. आणि थोड्याच दिवसात त्याने हकीम-उल-मुल्क ही पदवी मिळवली. (मा-आशीर-उल-उमरा. ।।। ५९९).

३. सुलतान आझमचा जन्म १२ शब्बान १०६३ हि. (जुलै ९, १६५३) ला झाला. मे १६६२ मध्ये त्याचे ९ वे वर्ष पूर्ण झाले होते. हा बादशहाचा तिसरा मुलगा होता.

४. सुलतान मुअज्जमचा जन्म ३० रजब १०५३ हि. (ऑक्टोबर १४, १६४३) ला झाला. म्हणजे मे १६६२ मध्ये तो जवळ जवळ १९ वर्षांचा होता.

आहे. तो बरा होण्याची आशा आहे. तुझ्या वागण्याने राज्यात बंडे होतील आणि सर्वत्र गोंधळ माजेल." असे म्हणून सुलतान मुअज्जमची आई नवाबबाई ही बादशहाकडे गेली, पण औरंगजेबाची बहिण रोशनआरा बेगम हिने नवाबबाईला केसाने धरून बादशहाच्या खोलीतून बाहेर काढले. आपला नवरा आधीच आजारी, त्यात त्याला अधिक त्रास होऊ नये, म्हणून नवाबबाईने हे सहन केले.

या काळात दिल्लीत जो गोंधळ माजला तो विलक्षणच होता. बादशहा मरण पावला अशा अफवा पसरल्या. प्रत्येकजण आपल्याला योग्य वाटेल ते करण्याच्या तयारीस लागला. कोणी म्हणू लागले की, राजा जसवंतसिंग हा शहाजहानला कैदेतून सोडविण्यासाठी गुजरातेतून येत आहे. महाबतखान हाही त्याच उद्देशाने येत आहे असेही लोक म्हणू लागले. आपल्या सगळ्या प्रतिस्पर्ध्यांच्यावर मात करून गादीवर आलेला औरंगजेब, त्याच्या अशा स्थितीमुळे राजधानींत काय गोंधळ उडाला असेल याची कल्पना मी वाचकांवर सोपवितो.

हा सर्व गोंधळ रोशनआरा बेगममुळे झाला. सुलतान मुअज्जम हा त्यावेळी १९ वर्षांचा असून किल्ल्याबाहेरील दाराच्या वाड्यात रहात होता. त्याला असे वाटू लागले की "आपला बाप मरण पावला आहे आणि रोशनआरा बेगम ही गोष्ट लपवित आहे." राजपुत्र आझम याला पाठिंबा देण्यासाठी हिंदु राजाची मने वळवीपर्यंत औरंगजेबाच्या मृत्यूची बातमी फुटू नये अशी रोशनआराची इच्छा असावी. राजपुत्र आझम रोशनआरा बेगमचा लाडका होता. ती सुलतान मुअज्जम (शाह आलम) च्या विरुद्ध होती. यामुळे सुलतान मुअज्जमने या प्रकरणात राजा जयसिंग याचा उपयोग करून घेण्याचे ठरविले. तो एके रात्री वेषांतर करून राजा जयसिंगाकडे गेला. त्याने त्याला काही मौल्यवान रत्ने भेट म्हणून दिली. आणि माझे वडील मृत्यू पावले असून तुम्ही माझा पक्ष घेतला पाहिजे अशी त्याने जयसिंगाला कळकळीची विनंती केली. राजपुत्र मुअज्जम हा जयसिंगाच्या पाया पडू पाहत होता. पण जयसिंगाने त्याला तसे करू दिले नाही. त्याने सुलतान मुअज्जमला आलिंगन दिले. जयसिंगाने सुलतान मुअज्जमला म्हटले "मला तुमच्याबद्दल फार आदर वाटतो. या प्रसंगी तुमची सेवा करावी अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे. पण बादशहा वारले या गोष्टीची तुम्हाला खात्री आहे काय?"

सुलतान मुअज्जम म्हणाला "ते वारले असावेत. रोशनआरा बेगम कोणालाही बादशहाच्या शय्यागृहात जाऊ देत नाही. खरे काय ते समजून घेण्याचा मी पुष्कळ प्रयत्न केला. पण बादशहा जिवंत आहे की मेला हे निश्चितपणे कोणी सांगू शकत नाही." राजा जयसिंगाने सुलतान मुअज्जमला म्हटले की "तुम्ही थोडा दम धरा. मी काही तासातच बादशहाची हालहवाल काय आहे त्याची बातमी काढतो." राजा जयसिंग याने रोशनआरा बेगमच्या एका खोजाला पत्र लिहिले. बादशहा जिवंत

आहे की मेला आहे हे नक्की कळवशिल तर मी तुला दोन लाख रुपये देईन, असे त्याने खोजाला कळविले. ते पत्र जयसिंगाच्या एका विश्वासू खोजाच्या हस्ते पाठविण्यात आले. रोशन आरा बेगमच्या खोजाने ताबडतोब उत्तर पाठविले की "बादशहा अद्याप जिवंत आहे." खोजाचे हे उत्तर पाहून जयसिंगाने सुलतान मुअज्जमला सांगितले की बादशहा अद्याप मरण पावला नाही. तुम्ही आता जाऊन विश्रांती घ्या. असेच करणे योग्य आहे. सुलतान मुअज्जमने राजा जयसिंगाला विचारले "बादशहा मरण पावला तर मी आग्र्याला जाऊन माझे आजोबा शहाजहान यांच्या पाया पडून त्यांना माझ्या बाजूने वळवून घेण्यासंबंधी तुमचा काय सल्ला आहे." राजा जयसिंगाने पाहिले की, शहाजहान कैदेतून सुटला तर अनेकांना आपले प्राण गमवावे लागतील. त्याने सुलतान मुअज्जमला म्हटले "असे काही करू नका. औरंगजेब बादशहाचा मृत्यु होईपर्यंत आपण गप्प बसावे. काहीही झाले तरी मला बातमी तावडतोब कळेलच. बादशहा मरण पावला तर मी माझ्या तीस हजार राजपुतांना घेऊन तुमचा पक्ष उचलून धरीन. परमेश्वराची शपथ घेऊन हे मी तुम्हाला सांगत आहे." वरील आश्वासनाने सुलतान मुअज्जमचे समाधान झाले आणि राजा जयसिंगाच्या शपथेवर विश्वास ठेऊन तो आपल्या वाड्यात परत गेला.

आपण आता जगत नाही असे वाटून औरंगजेबाने आपला विश्वासू खोजा दानीश याला बोलावू पाठविले. तो दानिशला म्हणाला "सुलतान आझमची तू काळजी घे. मला मृत्यू आला तर तू सुलतान आझमला शाइस्ताखानाच्या हवाली कर. तो इराणी वंशाचा असल्यामुळे तो सुलतान आझमची काळजी घेईल आणि संकटातून त्याचे रक्षण करील. सुलतान मुअज्जम हा मोठा झाला आहे. त्याची आई आणि प्रबळ सरदार हे त्याच्या पक्षात आहेत." औरंगजेबाने सुलतान आझमचा धाकटा भाऊ अकबर[1] याचा उल्लेख केला नाही. त्यावेळी अकबराचे वय तीन वर्षांहून अधिक नव्हते.

**औरंगजेबाची अपत्ये :** यावेळी औरंगजेबास चार मुली आणि चार मुलगे इतकी अपत्ये होती. मुलांपैकी सुलतान महम्मद हा त्यावेळी बंदिवासात होता; त्याचा उल्लेख वर आलाच आहे. दुसरा मुलगा मुअज्जम. या दोघा भावांची आई ही (नवाबबाई)[2] मूळ रजपूत वंशाची. मोठा मुलगा बंदिवासात आहे. धाकटा मुलगा सुलतान मुअज्जम याला गादी मिळावी म्हणून नवाबबाईने हिंदू पद्धतीप्रमाणे

१. सुलतान अकबरचा जन्म १२ मुह. १ हिज्रा. १०६७ हि. (सप्टेंबर २३, १६५७) मध्ये झाला. आणि म्हणून मे १६६२ मध्ये त्याचे ५ वे वर्ष चालू होते. येथे मनूची पेक्षा बर्नियरची चूक अधिक असलेली दिसते.

२. सुलतान महम्मद, सुलतान मुअज्जम (शाहा आलम) आणि झेबुन्निसा यांच्या आईचे नाव होते नवाबबाई. ही काश्मीरमधील राजौरीच्या राजाची मुलगी होती. ती १६९० मध्ये दिल्ली येथे मरण पावली. (मा. आसीर-आलमगिरी ३४३, ५३३).

देवादिकांना नवस केले. नबाबबाईला झेबुन्निसा नावाची एक मुलगी होती. ती १६८१ त १ सप्टेंबर रोजी मरण पावली. (हे चूक आहे. झेबुन्निसा ही[1] १७०२ मध्ये मरण पावली. १६८१ त मेली ती औरंगजेबाची बहिण जहानारा बेगम उर्फ बेगम साहेब ही होय.) औरंगजेबाला आणखी दोन मुलगे होते. सुलतान आझम आणि सुलतान अकबर. यांची आई दिलरस-बानु-बेगम[2] ही इराणी वंशाची होती. ती शहानवाझ खानाची मुलगी होती. या राणीला दोन मुली होत्या. एक झीनत-उन-निसाबेगम आणि दुसरी बद्र-उन-निसा बेगम. मोगल बादशहा आपल्या मुलींची लग्ने होऊ देत नसत. ही परंपरा अकबरच्या वेळेपासून चालत आली होती. पण वरील राजकन्यांनी आपल्या बापाला—औरंगजेबाला आपली लग्ने लावून देण्यास भाग पाडले.[3]

परंपरा मोडण्याची औरंगजेबाची इच्छा नव्हती. त्याच्या मुली त्याला म्हणत, "महम्मद पैगंबराने आपल्या कन्येचा विवाह अलीशी लावून दिला ना ? मग मोगल बादशहा हे पैगंबरापेक्षाही श्रेष्ठ की काय ?" आठवड्याच्या प्रार्थनेसाठी औरंगजेब हा मशिदीत जाई. तेव्हा मिया जानी नावाचा एक फकिर त्याला नेहमी म्हणे, "तुमच्या मुलींची लग्ने लावून द्या आणि त्याना महम्मद पैगंबराच्या मुलीचे अनुकरण करू द्या." वरील आग्रहामुळे त्याने शेवटी आपल्या मुलींची लग्ने लावून दिली. एका मुलीचे लग्न दाराच्या मुलाशी आणि दुसरीचे लग्न मुरादबक्षच्या मुलाशी लावून देण्यात आले. त्या दोन मुली अद्याप आपल्या नवऱ्यांच्या बरोबर सलीमगडच्या किल्ल्यात राहत आहेत. चौथ्या मुलीचे नाव फक्रुन्निसा[4] बेगम असे होते. ती औरंगजेबाच्या आणखी एका बायकोपासून झाली होती. तिला लग्न करण्याची इच्छा नव्हती. तिचा उल्लेख पुढे येईल.

१. मा-आसीर-आलमगिरी प्रमाणे झेब-उन-निस्सा बेगम १११३ हि. (१७०१-०२) मध्ये मरण पावली. ही तारीख मनुचीच्या तारखेशी जुळत नाही. औरंगजेबाच्या कोणत्याच मुलीचा १६८१ (१०९२ हि.) त मृत्यू झाला नाही. औरंगजेबाची बहीण बेगम साहेबा मात्र त्यावर्षी मरण पावली. (१०९२). मनुची दोन घटनांचा घोंधळ करीत आहे.

२. दिल-रस-बानु बेगम :—ही शहानवाझ खानाची मुलगी होती. ती १०६७ हि. (१६५६-५७) मध्ये औरंगाबादेस मरण पावली. आझम शहा जन्म—जुलै ९, १६५३. आणि झबदत-उन-निसा—जन्म सप्टेंबर ५, १६५१ झेब-उन-निसा, झिनत-उन-निसा आणि अकबर यांच्या आईला फक्त बेगम म्हणत. तीच दिल-रस-बानु बेगम असावी.

३. मा-आसीर-ई-आलमगिरी पा. १२०, १२५ आणि १४० प्रमाणे हे विवाह पुढीलप्रमाणे झाले : बादशहाच्या आमदानीच्या १५ व्या वर्षी, १६ शब्बान, १०८२ हि. (डिसेंबर १८, १६७१) मिहर-उन-निसा—औरंगजेबाची पाचवी मुलगी (मृत्यू एप्रिल १७०६) हिचा मुरादबक्षचा मुलगा इझदबक्ष याजबरोबर. बादशहाच्या आमदानीच्या १६ व्या वर्षी २१ शव्वाल १०८३ हि. (फेब्रुवारी १०, १६७३) ला दाराचा मुलगा सिपीर शुको याच्या बरोबर झुबदत-उन-निसा (मृत्यू १७०७) झाला. सलीमगड येथे त्यांच्याकरिता वाडे बांधून देण्यात आले.

४. फक्र-उन-निसा या नावाची कोठे नोंद नाही.

औरंगजेबाच्या गंभीर स्वरूपाच्या आजाराची बातमी आम्हाला पोहोचली, त्यामुळे इतिबारखान अतिशय गांगरून गेला. राजा जसवंतसिंग आणि महाबतखान हे शहाजहानला सोडविण्यासाठी चाल करून येत आहेत, असे त्याच्या कानावर आले होते. शहाजहान बादशहाला आपण अतिशय कडकपणे वागविले होते हे त्याला आता जाणवू लागले. शहाजहानची सुटका झाली तर आपला अत्यंत वाईट रीतीने शेवट होणार हे त्याला कळून आले. शहाजहानची सुटका झाली तर आत्महत्या करावी म्हणून त्याने विषाची सिद्धताही करून ठेवली. वरील कारणामुळे औरंगजेबाची खरी हालहवाल काय आहे हे पाहण्यासाठी तो दिल्लीला एका दिवसातून अनेक हरकारे पाठवित असे. औरंगजेब जरी अद्यापि आजारीच होता, तरी आपण जिवंत असून चांगले दक्ष आहोत, हे सिद्ध करण्याचे महत्त्व जाणत होता. सर्व राज्यात पाळले जातील असे हुकूम काढण्यात व आज्ञा करण्याचे त्याने कधीच सोडले नाही. विशेष म्हणजे, शहाजहानवर बारीक लक्ष ठेवण्यासाठी औरंगजेबाने इतिबारखानाला अनेक हुकूम पाठविले होते. त्या काळात राजपत्रावर मोठे शिक्के उठवित. हा शिक्का नेहमी एका पिशवीत ठेवलेला असे. पिशवी बंद करून पिशवीच्या तोंडावर एक लहान शिक्का उठवीत. या लहान शिक्क्याची अंगठी बादशहाच्या बोटात असे. औरंगजेबाने आपला मोठा शिक्का मागविला. पिशवीवरील लहान शिक्क्याची अंगठी त्याला आपल्या बोटावर आढळेना. शोधाशोध केल्यानंतर त्याने, "माझी शिक्क्याची अंगठी कोठे आहे?" असे आपली बहिण रोशनआरा बेगम हिला विचारले. ती म्हणाली, "एक दिवस तुम्ही बेशुद्ध पडला, त्यावेळी अंगठी तुमच्या बोटातून गळून पडली. ती मी घेतली आणि माझ्या उशीखाली ठेऊन दिली आहे." औरंगजेबाने पत्रावर शिक्का उठविला. आणि अंगठी तिला परत दिली. त्याने आपला संशय लपवून ठेवला. बरा झाल्यावर त्याने आपल्या बोटातून अंगठी कशी काढून घेण्यात आली याची कसून चौकशी केली. नुसते हुकूम सोडून औरंगजेब थांबला नाही, तर आपण जिवंत आहोत हे लोकांना कळावे म्हणून, सरदार व इतर मोठे लोक भरलेल्या मोठ्या दिवानखान्यात त्याला नेण्यात आले. परंतु दरबारातून परतताना त्याची प्रकृति पुनः बिघडली. त्यामुळे तो पुनः अधिक आजारी पडला. आता प्रत्येकाची समजूत झाली की यातून तो वाचत नाही.

काही दिवस विश्रांती घेतल्यावर त्याला थोडासा आराम वाटला मग त्याने जाफरखान, महतफतखान, महम्मद अमीनखान, आणि राजा जयसिंग यांना बोलावणे पाठविले. हेतु हा की बादशहा मृत पावला अशी सामान्यांमध्ये पसरलेली शंका दूर व्हावी. औरंगजेब खडखडीत बरा झाला खरा, तरीपण त्याच्या बोलण्यात थोडा दोष राहिलाच. आजपर्यंत त्याला बोलताना थोडे कष्ट पडतात. प्रकृति बरी झाल्यावर, आपल्या आजारात रोशनआरा बेगमने काय काय भानगडी केल्या त्याची सर्व माहिती औरंगजेबाने आपल्या खोजाकडून मिळविली. सुलतान आझमच्या पक्षात

घेऊन मिळण्याविषयी बेगमने सरदार सुभेदारांना पत्रे लिहिली होती. आणि त्यावर बादशाही मोहरेचा शिक्का केला होता. या गोष्टीने औरंगजेब फार नाखुष झाला. रोशनआरा बेगमने सुल्तान मुअज्जमच्या आईला वाईट वागविले होते आणि तरीही तिने ते सगळे सहन केले या गोष्टीचाही औरंगजेबाच्या मनावर फार परिणाम झाला. त्याने आपल्या राणीचा मान वाढविला आणि तिला नबाबबाई ही पदवी दिली. सुल्तान मुअज्जमशी तो अधिक प्रेमाने वागू लागला. रोशनआरा बेगमच्या वागणुकीचा औरंगजेबाला राग आला होता. तिच्यावर औरंगजेबाचे पूर्वीसारखे प्रेम राहिले नाही.

**औरंगजेब कर माफ करतो :** मोगल बादशहाच्या बाबतीत अनुभव असा की, कोणी बादशहा आजारी पडला की सुभेदार, सरदारांनी गोंधळ घातलाच. पण औरंगजेबाच्या आजाराच्या वेळी असे काही घडले नाही. बादशहाच्या मृत्यूविषयी अफवा पसरल्या होत्या, तरी सरदारांनी त्यावर काहीच विश्वास ठेवला नाही. कारण असे की, एक धोरण म्हणून, आणि दुसरे त्यांच्यापैकी प्रत्येकाला कल कोठे आहे, हे शोधून काढण्यासाठीच त्या अफवा पसरल्या जात आहेत, अशी प्रत्येकाला शंका वाटत होती. औरंगजेब हा अनेक खटपटी लटपटी करण्यात निष्णात आहे, हे त्यांना प्रथमपासूनच ठाऊक होते. आपल्याबद्दल असा समज आहे हे जाणून त्या गोष्टीचा औरंगजेब पुरेपूर उपयोग करून घेई. आताही तसेच घडले होते. नाहीतर राज्यावर फार मोठी आपत्ति आली असती. अथवा बंडाळी माजली असती. शहाजहानाची मुक्तता औरंगजेबाच्या मृत्युवर व दुसऱ्या एखाद्या बादशहाच्या गादीवर येण्याच्या घटनेवर अवलंबून होती. लबाडीच्या बाबतीत असेच आहे. अनेक वेळा लबाडखोरांना दुःख भोगावे लागते. पण काही वेळा ही सवय त्यांना फलदायी ठरते.

औरंगजेबाची प्रकृती आता पूर्णपणे सुधारली होती. जिभेचेच तेवढे व्यंग राहिलेले होते. प्रजा ही परमेश्वराची लेकरे होत. त्यांच्याशी दयाळूपणे वागले पाहिजे असेच जणु परमेश्वराने या जिभेवरील व्यंगाच्या द्वारे औरंगजेबाला इशारा दिला होता. जणु काय हा इशारा देण्यासाठी स्वर्गातून एखादा देवदूतच त्याच्याकडे आला असावा. तो बरा झाल्यावर त्याचे अभिनंदन करण्यास लोक येत. त्यांना तो म्हणे, "परमेश्वराने मला एवढा मोठा आजार दिला. पुनः त्यातून मला बरे केले. यात परमेश्वराला हेच दाखवायचे होते की मी तुला जसे सत्तेवर चढवले, तसेच मला वाटेल तेव्हा मी तुझे प्राण घेऊ शकतो. किंवा तुला वाटेल तेव्हा आजारातून बरा करू शकतो. या आजारातूनच मला एक जाणीव झाली, की मुसलमान हे परमेश्वराचे आवडते लोक आहेत. माझ्या पूर्वीच्या बादशहांनी मुसलमानांच्यावर बरेच कर लादले होते. त्यांच्यावर हा भार घालण्यात येऊ नये म्हणूनच परमेश्वराने माझ्या कारकीर्दीच्या सुरुवातीस मला हा आजार पाठविला. यामुळे मी मुसलमानांच्यावरील करांचा भार हलका करणार आहे. यामुळे हिंदुना मुसलमान धर्म स्वीकारण्यास उत्तेजन

मिळेल." मुसलमानांवरील सर्व कर काढून टाकण्यात आले. तंबाखूवरील कर मात्र याला अपवाद होता. तोही कर पुढे काढून टाकण्यात आला. त्याची हकीकत पुढे येईल.

हिंदूंच्या देवळावर कर असे आणि त्याचे उत्पन्न बादशहाला बरेच येई. हा कर घेतल्याने आपण मूर्तिपूजेला अनुकूल आहोत असा ग्रह होतो. हे सर्वस्वी अयोग्य आहे. हा करही आपल्या आजाराचे एक कारण असले पाहिजे असे औरंगजेब म्हणे. देवळांवरील हा कर वसूल करू नये अशी त्याने आज्ञा केली. प्रत्येक हिंदूने शेकडा पाच टके कर भरला की त्यात सर्व काही आले, असे आदेश देण्यात आले. हा उदारपणा दाखविला असे वाटून त्याला पुढे पश्चात्ताप झाला. देवळावर पुनः कर बसवावा अशी त्याची इच्छा होती. पण आपल्या लौकिकाला बाधक होईल, या कल्पनेने आणि स्वतःच्या ढोंगी स्वभावास अनुसरून त्याला या बाबतीत काही करणे जमले नाही. राज्याच्या उत्पन्नात भर टाकण्याची औरंगजेबाने आणखी एक मसलत योजली. त्याने एकीकडे आपल्या अधिकाऱ्यांचे पगार कमी केले; आणि दुसरीकडे रुपयाची किंमत दुप्पट केली. या हुकूमाची फार कडकपणे अम्मलबजावणी केली. शहाजहानच्या काळात एका रुपयाला जितक्या वस्तू मिळत त्याच्या दुपटीने आज एका रुपयाला मिळतात. लोकांच्या अडचणी यामुळे बऱ्याच कमी झाल्या.

**डच वकील :** औरंगजेब आजारातून बरा झाला त्या सुमारास डचांच्याकडून ॲड्रियन[1] नावाचा एक वकील दरबारी आला. औरंगजेब गादीवर आल्याबद्दल त्याचे अभिनंदन करण्याकरिता डच कंपनीने या वकीलाला पाठविले होते. हा मोठा हुशार व धोरणी होता. सुरतच्या डच वखारींना बरेच दिवस प्रमुख असल्यामुळे, मोगल रीतीरिवाजांची त्याला चांगली माहिती होती. जे सर्वात मोठा नजराणा आणि भरपूर पैसा देणगी म्हणून देतात, त्यांचे स्वागत होते, त्यांच्याकडे अधिक लक्ष पुरविले जाते. हे त्यास माहित होते. म्हणून बादशहाला देण्याकरिता तो एक सुरेख नजराणा घेऊन आला होता. त्यात अनेक वस्तू होत्या. त्यातील जपानी कलाकुसरीचे आणि डोलीच्या आकाराचे एक अतिशय सुंदर सिंहासन होते. औरंगजेबास ते फार आवडले. त्याने त्याची फार तारीफ केली. परत जाण्याची तुम्हास लवकरच परवानगी मिळेल असे त्याला सांगण्यात आले. परंतु मोगलांना बडेजाव वकीलाला चांगला परिचित होता. वकीलांना तिष्ठत ठेवणे हे त्यांना मानाचे वाटे. परकी वकील प्रत्येक दरबारच्या वेळी हजर असलेला पाहणे, ही एक त्यांच्या आवडीची गोष्ट होती.

१. बटाव्हियाच्या गव्हर्नराने १६६२ त मि. डर्कवॅन ॲड्रियेनह् या सुरतच्या संचालकाला (डायरेक्टरला) औरंगजेबाच्या दरबारी वकील म्हणून पाठविले. बंगाल, ओरिसा आणि पाटणा या भागात व्यापार करण्याचे त्याने फर्मान मिळविले. ( बर्नियर पाहा १२७ आणि टी ) फर्मान दिल्याची तारीख ऑक्टोबर १९, १६६२ (औरंगजेबाने आजारानंतर प्रथम स्नान केले. ऑगस्ट ३, १६६२).

म्हणून लवकर सुटका होण्यासाठी त्याने मंत्र्यांना आणखी भेटी पाठविल्या. चार महिन्यांनंतर परत जाण्याची परवानगी मिळविण्यात त्याला यश आले.

डच वकिलाने औरंगजेबासाठी जे पत्र आणले होते त्या पत्रात पुढीलप्रमाणे मजकूर होता : "डच कंपनीने मोगल राज्यात बरेचसे सोनेनाणे गुंतविले आहे. याशिवाय मसाले, तांबे, शिसे इत्यादींची आयात ही कंपनी करते. आपल्यासारख्या न्यायी राजांच्या राज्यात कंपनीला भांडवलाची गुंतवणूक करण्यास आनंदच वाटतो. आपल्या न्यायी धोरणाबद्दल कंपनीस कृतज्ञता वाटते." कंपनीची व्यापारी जहाजे, आरमार, किल्ले, प्रदेश, बेटे ही सर्व आपल्या सेवेत हजर आहेत[1]. डच वकिलाने निरोप घेतला तेव्हा त्याच्या बरोबर बटाव्हियाच्या गव्हर्नर जनरलसाठी भेटी आणि स्नेहयुक्त पत्रेही देण्यात आली.

**शहाजहानचा छळ :** औरंगजेबाच्या आजाराचा जोर असा थोडेच दिवस होता. पण हिंडते-फिरते होण्यास व ताकद येण्यास त्याला पुष्कळ दिवस लागले. हवा-फेर करण्याकरिता हकिमांनी त्याला काश्मीर प्रांतात जाण्याची शिफारस केली. त्यालाही ती कल्पना पसंत होती. परंतु शहाजहानचे अस्तित्व म्हणजे त्याच्या हृदयात सल-णारा काटा होय. यामुळे विश्रांती, करमणूक यात त्याला सुख वाटत नव्हते. म्हणून शहाजहानच्या बाबतीतील सौम्यपणा सोडून देऊन त्याला अधिकाधिक सतावण्याचे औरंगजेबाने ठरविले. आपला आजार म्हणजे परमेश्वराने शिकविलेला धडाच होय. असे समजून वास्तविक पाहता औरंगजेबाने शहाजहानला नीट वागवावयास हवे होते. पण हा धडा तो काय शिकणार ? मुळचा कुटील वृत्तीचा तो. आपला बाप लवकर मरावा म्हणून त्याची कैद अधिक कडक करण्याचे त्याने हुकूम सोडले. महा-लात एके ठिकाणी खिडकीतून शहाजहान हा करमणूक म्हणून नदीकडे पहात बसे. ती खिडकी विटांनी बुजून टाकण्याची त्याने आज्ञा केली. आग्र्याच्या किल्ल्याच्या खाली बंदुकच्यांचे एक पथक ठेवण्यात आले. ते लोक वेळीअवेळी बंदूक उडवून शहाजहानला संत्रस्त करीत. शहाजहानला आपल्या जीवनाचा वीट यावा म्हणून त्याची बरीच संपत्ती किल्ल्यातून काढून नेण्यात[2] आली आणि मोठा गाजावाजा करून. पण शहाजहानही काही कमी नव्हता. वरील गोंधळ आणि त्रास हे जणू अस्तित्वातच नाहीत असे भासवून ते आपल्या अंतःपुरात नृत्य, गाणे आणि

---

१. याच संदर्भात डच् बॉम म्हणतो "पुढे एक वर्षाने (१६६३ साली) औरंगजेबाने आराकानवर स्वारी करण्याकरिता डचांकडून दोन जहाजांची मागणी केली. परंतु त्याने आराकानच्या पोर्तुगीज चाच्यांना आपल्या बाजूला वळवून घेतले आणि त्यांचाच उपयोग करून घेतला. शेवटी डच व पोर्तुगीज या दोघांची फसगत झाली.

२. औरंगजेबाच्या कारकिर्दीच्या ४ थ्या वर्षात १ रजबला, अकबराबादेहून फाझलखान आला. आणि त्याने औरंगजेबाला बादशहा शहाजहानकडून आणलेली जवाहिर व रत्नजडित पात्रे यांचा काही भाग दाखविला. (मा-इ-आलमगिरी पा. ३८) याचा मेळ तारीख २० फेब्रुवारी १६६२ शी बसतो.

नजाकणे यात आपला काळ कंठी. इतिबारखान याजकडे किल्ल्याची व्यवस्था होती. तो ही सर्व हकिकत औरंगजेबाला लिहून कळवी. शहाजहानवर विषप्रयोग करून त्याचा जीव घ्यावा, असे औरंगजेबाने ठरविले.

**औरंगजेब शहाजहानला विष देण्याचा हुकूम करतो :** हा निर्णय घेतल्यावर औरंगजेबाने शहाजहानचा हकिम मुकर्रमखान[1], याजकडे एक पत्र व विषाची कुपी पाठविली. औरंगजेब जेव्हा आग्र्याला शहाजहानला कैद करण्याकरिता गेला होता, तेव्हा या हकिमाने औरंगजेबाची बाजू घेण्याचे नाकारले होते. मुकर्रमखानाला औरंगजेबाने हे धमकिवजा पत्र लिहिले. त्यात म्हटले होते की, "आणखी काही दिवस जगायचे असेल व शांतपणे राहायचे असेल, तर खोजा फाहीम याच्याबरोबर पाठविलेले विष तू शहाजहानला दे. या आज्ञेचा जर भंग केलास तर तुला प्राणास मुकावे लागेल." शहाजहानबद्दल हकिमाच्या मनात फार आदर आणि भक्तिभाव होता. त्याचा खून करण्याचा विचारही हकिमाला सहन झाला नाही. मुकर्रमखानाने खोजा फाहिमच्या द्वारे उत्तरात औरंगजेबाला असे कळविले की, "आपल्या अपेक्षेहून अधिक मी या विषाचा उपयोग करीन." औरंगजेबाच्या आज्ञेप्रमाणे जरी शहाजहानचा त्याने खून केला असता, तरी औरंगजेबाने त्यालाही जिवंत ठेवले नसते; ही गोष्ट त्याला पक्की ठाऊक होती. म्हणून आपणच हे विष घेऊन आत्महत्या करावी असे त्याने ठरविले आणि ते विष पिऊन त्याने जीव दिला. औरंगजेब आपल्या बापाच्या मृत्यूच्या बातमीची वाट पहात होता. पण झाले भलतेच. शहाजहानने आपल्याला जन्म दिला होता. हकिमाला फार तर शहाजहानने काही मर्जी दाखविली असेल. असे असूनही आपल्याला कल्पनाही येणार नाही इतका जिव्हाळा हकिमाने शहाजहानबद्दल दाखविला, हे औरंगजेबाला जाणवले. पण या घटनेमुळे औरंगजेबाच्या मनावर काही परिणाम झाला काय ? मुळीच नाही. काश्मीरला जाण्यापूर्वी तो आपल्या बापाचा मृत्यु घडवून आणण्यासाठी निरनिराळे कुटील मसलती योजू लागला.

**औरंगजेब काश्मीरला जातो :** उन्हाळा अगदी जवळ आला होता. उष्णता वाढू लागण्यापूर्वीच काश्मीरला निघणे अवश्य होते. तसा हकिमांचा सल्लाही होता. शिवाय औरंगजेबाची बहिण रोशनआरा बेगमचाही तोच सल्ला होता. कारण एक तर तिच्या स्वैर वर्तनास अंतःपुरात वाव मिळत नव्हता आणि दुसरे असे की, शहाजहानची मोठी मुलगी जहानारा बेगम हिचा जो थाटमाट होता, त्यापेक्षा अधिक थाटमाटात राहावे अशी तिची इच्छा होती. आपल्या काश्मीरच्या दौऱ्यासाठी औरंगजेबाने आपल्याबरोबर निवडक अशी विश्वासू माणसे घेतली. प्रवासातील

१. मुकर्रमखान (मकर्रबखान ?) हा एक इराणी हकीम (पहिला भा. पा. १०९) याचा निर्देश मागे आलेलाच आहे. पूर्वीच सांगितल्याप्रमाणे १६६२ च्या उत्तरार्धात हा मरण पावला.

छावणीची व्यवस्था मुर्तझाखानाकडे देण्यात आली. आग्रा शहराच्या व्यवस्थेचे काम होशदारखान[1] याजकडे सोपविण्यात आले. इतबारखान याला पुनः ताकीद देण्यात आली. औरंगजेबाचा माऊ शाहाशुजा हा आराकानमध्ये मरण पावला होता. औरंगजेबाने मीर जुमलाला आसाम जिंकून घेण्याची आज्ञा केली.

औरंगजेब सहा डिसेंबर सोळाशे साठ (खरे वर्ष १६६२) ला दुपारी ३ वाजता काश्मीरला जाण्यासाठी दिल्लीहून निघाला. ज्योतिष्यांनीही हाच मुहूर्त काढून दिला होता. बर्नियरने ही तारीख (साल) १६६४ दिली आहे. मला (मनुची) याबद्दल आश्चर्य वाटते[2] असे यासंबंधी मनुची आपल्या व्हेनिस कॉडेक्स या हस्तलिखितात म्हणतो.

सर्वांनी आपापली तयारी करून छावणीत दाखल होता यावे म्हणून त्याने दिल्ली पासून सहा मैलांवर असलेल्या शालीमार बागेत मुक्काम केला. दुसऱ्या दिवशी कूच करणे नसल्यास तशा प्रकारचा इशारा म्हणून आधल्या रात्री ९ वाजता शिंगे वाजविण्याची मोगल छावणीत पद्धत आहे. सहाव्या रात्री असा इशारा देण्यात आला नाही. पुढील छावणीसाठी अगाऊ पाठविण्याचे तंबू रवाना करण्यात आले. प्रवासात, तंबू आणि इतर असेच सामानाचे दोन दोन संच बाळगण्याचा बादशहाचा व सरदारांचा प्रघात असतो. बादशहाचा तंबू पुढे पाठविण्यासाठी २०० उंट आणि ५० हत्ती उपयोगात आणतात.

---

१. मीर हाशदारखान-होशदारखान ही पदवी होती. होशदारखान हा मुल्तफतखानाचा (आझम-खान, आलमगिरी) मुलगा होता. बादशहाच्या आमदानीच्या ५ व्या वर्षी त्याला १०००-४०० हजारी घोडदळाचा प्रमुख करून दिल्लीचा सुभेदार करण्यात आले. इस्लामखानाच्या मृत्यूनंतर त्याची आग्र्याला बदली करण्यात आली. कारकिर्दीच्या ७ व्या वर्षी फौजदारीचे ज्यादा काम देण्यात आले. राजवटीच्या १४ व्या वर्षी तो खानदेशचा सुभेदार झाला. आमदानीच्या १५ व्या वर्षी–म्हणजे १०८२ हि.–१६७१ त तो मरण पावला.

२. मनुची म्हणतो –"मला त्याच्याबद्दल सहानुभूति वाटे कारण तो आपला इराणी इतिहास दानिशमंदखानाच्या घरी वाचीत असे आणि अनेक वेळा सत्यापेक्षा अप्रामाणिकपणाच जाणवला सामान्य लोक काय म्हणतात ते न ऐकण्याबद्दल मी त्याला वेळोवेळी बजावीत असे. आणि मला विशेष माहिती मिळत असल्यामुळे मी त्याला सत्य घटना सांगत असे (व्हेनिस हस्तलिखित ग्रंथ). व्हेनिस हस्तलिखितात साल १६६१ लिहिले आहे. मनुचीला मिळालेली ही माहिती (साल) चुकीची होती. हे लक्षात घेतल्यावर त्याने बर्नियरची जी कानउघाडणी केली ती काहीशी धार्ष्ट्याची वाटते. बर्निअर पा. ३५० वर म्हणतो, "(बादशहाने) डिसेंबर ३ ला दुपारी ३ वाजता प्रयाण केले. तो वर्ष देत नाही. पण पत्रावरील तारीख डिसेंबर १४, १६६४ ही आहे. म्हणजे सहजच निष्कर्ष काढता येतो की १६६४ मध्येच प्रयाण झाले. एल्फिन्स्टन ५१८ डिसेंबर ६, १६६२ साल देतो. आलमगीर नामा (पा. ७६३ वर) आणि त्याला अनुसरून मा-आसीर-इ-आलमगिरी पा. ४३. हे दोन ग्रंथ प्रत्यक्ष प्रयाणाचा दिवस जमादा १,१०७३ हि. (डिसेंबर १८, १६६२ न.प.) अथवा (डिसेंबर ८, १६६२ जु.प.) देतात. बर्लिन हस्तलिखित व व्हेनिस ताडून पाहिले आहेत.

सातव्या दिवशी पहाटे ३ वाजता बादशहाने पुढील प्रवास सुरू केला. आघाडीला जड तोफखाना होता. हा पुढे जाऊन पुढील तळाच्यासमोर दोन्ही बाजूस उभा करण्यात येतो. तोफखान्यामागोमाग, एका मोठ्या गाडीवर एक सुंदर नाव ठेवण्यात आली होती. बादशहाला कोठे नदी ओलांडावयाची असल्यास या नावेचा उपयोग करण्यात येई. त्यानंतर लवाजमा आणि छावणीचे सामानही पाठविण्यात आले. सकाळपर्यंत तळ रिकामा झाला. फक्त घोडदळ आणि पायदळ ही ठरलेल्या ठिकाणी उभी होती. बाकीच्या सामानाबरोबर इतर बाहनांची जोडी व २०० उंट असत. या उंटांवर चांदीचे रुपये लादण्यात आले होते. प्रत्येक उंटावर चांदीच्या नाण्यांचे ओझे २४० शेरांचे असे. १०० उंट इतक्याच वजनांची सोन्याची नाणी वाहण्यासाठी असत. १५० उंटांवर शिकारीसाठी लागणारी जाळी लादण्यात आली होती.

बादशहाच्या प्रवासात, सामानाबरोबर दफ्तरखानाही नेण्यात येई. साम्राज्याचे हे सर्व दफ्तर नेण्यासाठी ८० उंट, ३० हत्ती आणि २० गाड्या यांचा उपयोग करण्यात येई. बादशहाच्या वापरासाठी पाणी लागे. ते वाहण्यासाठी ५० उंट असत. प्रत्येक उंटावर पाण्याचे दोन मोठ मोठे हंडे असत. राजपुत्राच्या प्रवासाची हीच पद्धत असे. फक्त ती त्यांच्या दर्जाप्रमाणे करण्यात येई. बादशहाच्या पाठोपाठ लहान तंबू वाहणारी आठ खेचरे असत. प्रवासात थोडी विश्रांती घ्यावी, किंवा थोडे काही खावे, किंवा बहिर्दिशा वगैरे शारिरिक गरजा भागवाव्या यासाठी या तंबूचा उपयोग करण्यात येई, याशिवाय दोन खेचरांवर वस्त्रे लादलेली असत आणि एका खेचरावर अत्तराच्या कुप्या असत.

बादशहा पुढील प्रवासास निघण्यापूर्वी आधल्या रात्री दहा वाजता बादशाही मुदपाकखाना पुढे पाठविण्याची पद्धत आहे. अन्नसामानाची सामुग्री ५० उंटांवर लादण्यात येई. उत्तम दूध देणाऱ्या पन्नास गाई मुदपाकखान्याबरोबर असत. प्रत्येक पक्वान्नासाठी वेगळा स्वयंपाकी असे. या खात्यावर एका प्रतिष्ठित अधिकाऱ्याची नेमणूक होत असे. पक्वान्नांची तबके मखमली आवरणाखाली ठेवून पाठविण्यात येत असत. चिनी मातीची व इतर प्रकारची भांडी वाहून नेण्यासाठी दोनशे मजूर असत. वेळोवेळी देण्यासाठी म्हणून उंची वस्त्रे बादशहा बरोबर बाळगी. ती वाहून नेण्यासाठी ५० उंट असत. अशाच प्रकारे शस्त्रे, अस्त्रे आणि रत्नेही सरदारांना देण्यात येत. त्यासाठी ३० हत्ती वापरण्यात येत. शस्त्रांमध्ये तलवारी, ढाली, निरनिराळ्या प्रकारची रत्ने आदींचे काम केलेले खंजीर, सुरे, स्त्रियांच्यासाठी लागणारे सोन्यामोत्यांचे व रत्नांचे अलंकार इत्यादींच्या, वर उल्लेखलेल्या ३० हत्तींच्या ओझ्यात समावेश होईल. छावणीत कुऱ्हाडी, फावडी वेगवेगळ्या आकाराच्या कुदळी इत्यादी अवजारे असलेले एक हजार मजूर असत. त्यांच्या अधिकाऱ्यांना कुऱ्हाडी आणि अशीच चिन्हे वापरण्यासाठी दिलेली असत.

छावणीचा तळ निवडल्यावर प्रथम तंबू उभारण्यात येतात आणि मग जड तोफखान्यासाठी जागा निवडण्यात येते. हलका तोफखाना बादशाही तंबूच्या भोवती उभा करण्यात येतो. औरंगजेब हा सकाळी सहा वाजता प्रवासाला निघे. डच लोकांनी दिलेले सिंहासन तो वापरी. याचा उल्लेख पूर्वी आलेला आहे. ते वाहून नेण्यास १२ माणसे लागत. (हे सिंहासन म्हणजे वाहून नेण्यायोग्य खुर्चीच होती. (व्हेनिस हस्तलिखित) याशिवाय निरनिराळ्या आकाराच्या तीन पालख्या बरोबर असत. वाटल्यास औरंगजेब पालख्यांतूनही जाई. याशिवाय वेगवेगळ्या बांधाच्या असलेले पाच हत्ती बरोबर असत. त्यांचाही तो मनात येई तेव्हा उपयोग करी.

औरंगजेब आपल्या तंबूतून बाहेर निघाला की हलका तोफखाना त्याच्या समोर चालू लागे. त्यात १०० तोफा असत. प्रत्येक तोफ ओढण्यासाठी दोन घोडे वापरले जात. बादशहाची कूच पुढीलप्रमाणे होते. तो आपल्या आसनावर बसून तंबूच्या बाहेर आला तेव्हा नगारे, कर्णे, शिंगे इत्यादींचा घोष करण्यात आला. स्वारीच्या आघाडीवर मरहूम शेख मीरचा मुलगा होता. त्याच्याबरोबर आठ हजार घोडेस्वार होते. उजव्या फळीला अलावर्दीखानचा मुलगा हसन अलीखान[1] हा होता. खाजव्याच्या लढाईत राजपुत्र शाहाशुजा याचे मन वळवून लढाईवरून उतरावयास लावणारा अलीवर्दीखान हा होय. याचा उल्लेख पूर्वी आला होता. हसन अलीखान हा याचा मुलगा होय. हसन अलीखानाबरोबर आठ हजार घोडेस्वार होते. डावी फळी महम्मद अमीनखान याच्या नेतृत्वाखाली होती. या पथकाच्या पिछाडीला शिकारी स्वार असून त्यांच्या लहान तुकड्या होत्या. प्रत्येक स्वाराच्या मनगटावर एक बहिरी ससाणा असे. बादशहाच्या समोर शोभेचे ध्वज घेऊन ९ हत्ती चालत. त्यांच्या पाठोपाठ ४ हत्ती असून त्यांच्यावर सूर्यचिन्हांकित हिरवे ध्वज फडकत असत. या हत्तींच्या मागे सुसज्ज असे ९ घोडे असत. त्यांच्यामागे दोन घोडेस्वार असत. एका घोडेस्वाराच्या हातात एक ध्वज असून त्यावर अरबी अक्षरे लिहिलेली असत. दुसऱ्या घोडेस्वाराबरोबर एक नगारा असे. बादशहा येत आहे, असा इशारा देण्यासाठी हा स्वार मधून मधून हलक्याने नगारा वाजवी. बादशहाबरोबर अनेक पायदळ शिपाई असत. बादशहाच्या दोन्ही बाजूस ते शिस्तबद्ध रांगेतून चालत. काहींच्या हातात हिरवे तर काहींच्या हातात तांबडे ध्वज असत. काहींच्या हातात काठ्या असत. गर्दीतील माणसे बादशहाच्या जवळ येत आहेत असे दिसले की ते त्यांना काठ्यांनी मागे ढकलीत. या शिवाय चांदीच्या काठ्या असलेले अनेक घोडेस्वार गर्दी हटविण्याचे काम करीत. पायदळ शिपायांपैकी

१. सेजल्जुकांचा एक वंशज, अलावर्दीखान हा १०६९ हि. (१६५८–१६५९) त मरण पावला. (मा-उल-उमरा पान २०७) हसन अल्ली खान बहादूर आलमगीर शाही हा त्याचा दुसरा मुलगा (वरील ग्रंथ ५९३) विजापूर सर केल्यानंतरच्या दुसऱ्या दिवशी त्या शहराच्या बाहेर तो मरण पावला. (१५ जुलकादा १०९७ हि. ऑक्टोबर १६८६).

अनेक लोक समोरील रस्त्यावर पाणी शिंपडण्याचे काम करीत. काहींच्यापाशी या पाण्यात मिसळण्याकरिता सुगंधी द्रव्येही असत.

त्यांच्याबरोबर एक अधिकारी असे. त्याच्यापाशी प्रवासाच्या मार्गातील सुभे, खेडी, जमिनी व त्यांचे वसूल इत्यादींचे सगळे तपशील असत. बादशहानी आपण कोणत्या भागातून आणि कोणत्या खेड्यातून चाललो आहोत, याची चौकशी केली तर ती माहिती तपशीलासहित पुरविण्यात यावी म्हणून ही व्यवस्था असे. बादशहाच्या प्रवासाच्या मार्गाची तपशीलवार मोजणी करण्यात येत असे. बादशहा तंबूतून बाहेर पडला की माणसे मोजणीचे दोर घेऊन प्रवासाचा मार्ग मोजीत जात. त्याची नोंद ठेवण्यात येई. आपण किती लांब पल्ल्यातून आलो हे बादशहाने विचारले तर त्याला ताबडतोब माहिती देण्यात येई. आणखी एका माणसाच्या हातात वेळ मोजण्याचे यंत्र (वालुका यंत्र) असे आणि किती वाजले हे कळावे म्हणून घंटा वाजवून वेळ जाहीर करण्यात येई.

मोगल बादशहाच्या प्रवासातील रुबाब आणि चोखंदळपणा ही असाधारणच म्हटली पाहिजेत. स्वारीच्या आघाडीला पांढरे शुभ्र कपड्यांचा भार असलेला एक उंट चालत असलो. रस्त्यात एखादे मेलेले जनावर अगर माणसाचे प्रेत आढळले तर ते बादशहाच्या नजरेस पडू नये म्हणून त्याच्यावर पांढरे वस्त्र टाकून ते झाकीत आणि वस्त्र उडून जाऊ नये म्हणून कोपऱ्यावर दगड रचून ठेवीत. असे काही आढळले की, बादशहा मध्ये मध्ये थांबून चौकशी करी. बादशहाच्या मागे दहा घोडेस्वार असत. चार घोडेस्वारांच्यापाशी बादशहाच्या वापरातील बंदुका असत. या जरीच्या लांब पिशव्यात ठेवलेल्या असत. एका घोडेस्वारापाशी बादशहाचा भाला, दुसऱ्यापाशी तलवार, तिसऱ्यापाशी ढाल, चौथ्यापाशी खंजीर, पाचव्यापाशी धनुष्य आणि सहाव्यापाशी भाता आणि बाण अशी शस्त्रे असत. ही सर्व जरीच्या पिशवीत ठेवलेली असत. या घोडेस्वारांच्या मागे शरीर संरक्षकांचे पथक असे. त्यांच्यामागे राजपुत्र सुलतान मुअज्जम आणि सुलतान आझम हे घोड्यावर स्वार होऊन चालत. त्यांच्यामागे बादशहासाठी तीन पालख्या आणि राजपुत्रांच्यासाठी इतर पालख्या असत. पालख्यांच्या मागे २४ घोडेस्वार असत. त्यापैकी आठ स्वारांपाशी शिंगे, कर्णे, आठांपाशी सनया, आठांपाशी लहान डफ आणि आठांपाशी नौबती, नगारे असत. त्यांच्या मागे पाच बादशाही हत्ती असत व त्यांवर अंबाऱ्या असत. आणखी तीन हत्ती असत. त्यांपैकी एका हत्तीवर एका काठीला लावलेले चांदीचे तीन हात असत. त्यांना मखमलीने झाकण्यात आलेले असे. इतर दोन हत्तींवर अशीच इस्लाम धर्मांची चिन्हे होती. आणखी एका हत्तीवर एका काठीवर एक तांब्याची फळी असे. त्यावर परमेश्वर एक आहे. महम्मद न्यायी आहे अशी अक्षरे कोरलेली असत. आणखी एका हत्तीवरील ध्वजावर न्यायाचे

प्रतीक म्हणून तराजूचे चिन्ह असे. आणखी एका हत्तीवर मगरीचे तोंड ठेवलेले असे. मगरीचे शरीर पांढरे शुभ्र कापडाचे बनविलेले असे. वारा वाहू लागला की, ती मगर जिवंत आहे असे वाटू लागे. बादशहा नद्यांचाही अधिपती आहे हे दाखविण्यासाठी मगरीचे हे चिन्ह असे. आणखी एका हत्तीवर बादशहा हा विजेता आहे हे दाखविण्यासाठी हत्तीवर भाला धरलेला असे. आणखी एका हत्तीवर मोठ्या माशाचे तोंड आणि कापडांनी तयार केलेले त्याचे शरीर हे असे. बादशहा हा समुद्राधिपती आहे हे दाखविण्यासाठी हे चिन्ह असे. वरील सर्व हत्ती झूल इत्यादींनी चांगले सजविलेले असत. या हत्तींच्या मागे १२ हत्ती असत. त्यांवर नौबती, नगारे, झांजा इत्यादी वाद्ये असत. ती वाजविली की फार मोठा आवाज होई. या हत्तींच्या मागे स्वारीच्या पिछाडीला राजा जयसिंग आणि त्याचे साठ हजार घोडेस्वार चालत. वर उल्लेखिलेल्या सर्व सरदारांच्या पथकात प्रत्येकी सहा मुसज्ज हत्ती, आपापल्या पथकांच्या सेनापतींचे ध्वज घेऊन चालत. हे लक्षात ठेवले पाहिजे.

वरील उल्लेखिलेल्या एकंदरीत लवाजम्याच्या मागे काही अंतरावर रोशन-आरा बेगम हिची स्वारी होती. तिच्या स्वारीचा हत्ती हा प्रचंड होता. तिच्या अंबारीला पितांबर म्हणत. घुमट असलेले हे सिंहासनच होय. हे सिंहासन मिना काम केलेले आणि सोनेरी पत्र्यांचे, उत्कृष्टपणे सजविलेले असे. रोशनआरा बेगमच्या हत्तीच्या मागे दीडशे बुरखाधारी आणि वेत्रधारी बायका घोड्यावर स्वार होऊन चालत. रोशनआरा बेगमच्या हत्तीच्या समोर ध्वज घेऊन चार हत्ती चालत. याशिवाय अनेक पायदळ शिपायी पुढे चालत. आपल्या काठ्यांनी बघ्या लोकांची गर्दी हटविण्याचे काम ते करीत. रोशनआरा बेगमच्या स्वारीच्या मागे तिचा लवा-जमा असे. त्या लवाजम्यात घोड्यावर स्वार असलेले अनेक तिरसट तोंडाचे खोजे असत. अंबारीच्या भोवती अनेक पायदळ शिपायी चालत. रोशनआरा बेगमच्या हत्तीच्यामागे विविध प्रकारच्या आणि उत्तम वस्त्रांनी सजविलेल्या अंबाऱ्यांचे तीन हत्ती असत. त्यांच्या पिछाडीला बऱ्याच पालख्या असत. पालख्यातून रोशनआरा बेगमच्या निवडक सख्या असत. त्यांच्या मागे साठ हत्ती. हत्तींवर रोशनआरा बेगमच्या नोकरांतील इतर बायका असत. रोशनआरा बेगमच्या लवाजम्याच्या नंतर औरंगजेबाच्या तीन बायकांचा आणि अंतःपुरातील इतर स्त्रियांचा लवाजमा असे. प्रत्येकीचा वेगवेगळा लवाजमा असे.

बादशहाच्या स्वारीच्या पुढच्या मुक्कामाच्या तयारीसाठी बादशहाचा खाजगीचा अधिकारी आणि इतर तंत्रज्ञ हे एक दिवस आधी पुढे जातात. बादशाही तंबूसाठी चांगली आणि रम्य जागा निवडण्यात येते. प्रथम खुद्द बादशहाच्या निवासस्थानाचे आवार हे निवडण्यात येते. मी (मनुची) अनेक वेळा असे आवार मोजून पाहिले. त्याचा परीघ हा पाचशे पावलांचा असे. बादशहाच्या निवासस्थानाच्या मागच्या

बाजूस एक प्रवेशद्वार असे. त्याच्या पलिकडे बादशहाचे अंतःपूर असे. बादशहाचे निवासस्थान निवडल्यावर राजपुत्र, सेनापती आणि अमीर-उमराव यांच्या तंबूच्या जागा निवडण्यात येत. बादशहाच्या निवासस्थानाच्या आणि वरील लोकांच्या तंबूच्या-मध्ये बरीच उघडी जागा असे. या उघड्या जागेच्या भोवती लाल कनाती असत. या कनातींची उंची तीन हातांची असे. म्हणजे बादशहाच्या निवासस्थानाभोवतीच्या या भिंतीच जणू. या कनातीच्या भोवती ठिकठिकाणी तोफा मांडून ठेवलेल्या असत. त्यांच्यासमोर एक खंदक असे. तोफांच्या मागे लाकडी फळ्यांचे भिंतीवजा कुंपण उभे केलेले असे. बादशहाच्या निवासस्थानापासून १३० पावलांवर प्रवेशद्वारापाशी दोन तंबू असत. तेथे ९ सुसज्ज घोडे उभे असत. प्रवेशद्वाराच्यासमोर एक उंच तंबू असे. तेथे नौबती, नगारे वाजविणारे असत.

बादशहाच्या निवासस्थानावरील खास तंबूत बादशहा दरबार भरवी. हा तंबू नक्षीकाम केलेल्या आणि पितळी मूठ असलेल्या खांबावर उभारलेला असे. एका अतिशय उंच खांबावर एक दिवा लावलेला असे. उशीरा येणाऱ्यांना वाट काढण्यासाठी त्या दिव्याचा उपयोग होई. इतर राजे आणि अमीर-उमराव यांचे तंबू, बादशहाच्या तंबूपेक्षा अधिक उंच असता कामा नयेत असा दंडक असे. हा नियम कोणी मोडला तर असे तंबू पाडण्यात येत.

प्रवासासाठी निघण्यास बादशहा आपल्या तंबूतून बाहेर आला की, राजपुत्र, सेनाधिकारी आणि अमीर, उमराव हे त्याच्या समोर हजर होतात. कोणाची काही विनंती असल्यास बादशहा त्यांना थोडक्यात उत्तर देतो. तळ संपेपर्यंत ते लोक बादशहाबरोबर असतात आणि नंतर आपापल्या पथकात जातात. यानंतर बादशहा आपल्या शिकारी मंडळींकडे जातो. आज आपण शिकारीला जाऊ की नाही हे त्यांना सांगतो. तो शिकारीसाठी गेला तर त्याच्याबरोबर फक्त पायदळ शिपायी आणि शरीर संरक्षकांचे पथक असते. मुख्य लवाजमा पुढच्या तळाकडे चालत जातो. शिकार करण्याची बादशहाची इच्छा नसेल तर शिकारी लोक आपापल्या पथकात जाऊन उभे राहतात. पुढील मुक्कामाचे तंबू दृष्टीपथात आले की, नौबती, नगारे, कर्णे इत्यादी वाद्ये वाजविण्यात येतात. निवासस्थानाच्या प्रवेशद्वारातून जाईपर्यंत हा प्रकार चालू असतो. नंतर हलक्या तोफांची सरबत्ती होते. पूर्वीच येऊन पोहोचलेल्या बादशहाच्या अंतःपुरातील स्त्रिया "बादशहाचे मंझिल मुबारक" (प्रवास सुखाचा होवो) असे म्हणून अभिवादन करतात. अंतःपुरा-तील स्त्रिया या प्रवासाच्या मागील टप्प्यावरून लवाजम्याच्या अगदी शेवटी जरी निघत असल्या तरी, त्या मधल्या वाटेने प्रवास करून बादशहाची स्वारी येण्यापूर्वीच तळाला पोहोचलेल्या असत; हे लक्षात ठेवले पाहिजे. या प्रवासात रोशनआरा बेगमने आपल्या बरोबर अंबारीत एखादी दासी न घेता, दासीचा वेष

घेतलेला तरुण बाळगला होता, हे मला माहित आहे. मदिरापानाव्यतिरिक्त या दोषांना आपणी काय करायचे होते ते परमेश्वर जाणे. ही गोष्ट मला एका खोजाने सांगितली. त्याला मदिरापानाचा शौक असून तो माझा मित्र होता. रोशनआरा बेगम वारल्यानंतर तिच्या तैनातीतल्या अनेक गायकांनी वरील हकीगत खरे असल्याचे सांगितले.

बादशहाचा प्रवास म्हणजे, एक मोठे प्रवासी शहर, ठिकठिकाणी मजल दर मजल करीत चालले आहे, असा भास होई. त्यात बाजार, दुकाने, करमणुकीची साधने, शिकारीचे साहित्य, सोने, नाणे, इत्यादी कोणत्याही गोष्टींची कमतरता नसे.[1]

मी कुतूहल म्हणून बादशहाच्या काश्मीरच्या प्रवासात बादशहाच्या छावणीत तो दिल्लीहून निघाला तेव्हापासून फक्त तीनच दिवस होतो. नंतर मी परत फिरण्याचे ठरविले. मी बेरोजगार असताना काश्मीरला जावे हे मला परवडण्यासारखे नव्हते. माझा हेतू बंगालकडे जाण्याचा होता. तो प्रांत समृद्ध असून तेथे राहणी स्वस्ताईची आहे. बंगालमध्ये युरोपियन लोकही बरेच आहेत.

**मी दिल्लीस व पुढे आग्र्यास जातो :** मी दिल्लीस परत आलो व आपल्या मित्रांना भेटण्याकरिता काही दिवस तेथे राहिलो. नंतर मी (मनुची) आग्र्याकडे रवाना झालो. आग्रा येथे जेसुइट पाद्र्यांची गाठ पडली. भक्करच्या किल्ल्यामधील माझे जुने मित्र यावेळी आग्र्यात होते. त्यांच्याशी गप्पागोष्टी करण्यात मी काही वेळ घालविला. हे माझे मित्र औरंगजेबाच्या चाकरीत असत. आग्र्याच्या किल्ल्यातील लोक तोफखान्यात नोकरी करीत होते. मला औरंगजेबाची नोकरी करावयाची नव्हती. माझ्या मित्रांनी मला नोकरी पत्करण्याचा आग्रह केला पण मी कबूल झालो नाही. यावर माझे मित्र आग्र्याचा किल्लेदार इतिबारखानाकडे गेले. इतिबारखानाच्या सांगण्यावरून तरी मी नोकरी पत्करीन असे त्यांना वाटले. इतिबारखानाने मला बोलावणे पाठविले. मी त्याच्याकडे गेलो आणि स्फटिकाचा एक पेला त्याला भेट म्हणून दिला. इतिबारखानाला ही भेट आवडली. त्याने मला बहुमानाची वस्त्रे देण्यात यावी अशी आज्ञा केली. माझे मन वळावे, मी किल्ल्यात

१. मोगलांच्या सैन्यात केवळ घोडेस्वार आणि पायदळ शिपाई असतात असे नाही. बहुसंख्य लोक तर राजे, अमीर-उमराव इत्यादींच्या परिवाराचे किंवा नोकरांचे लोक असतात. त्याबरोबरच, अशा सैन्याबरोबर विविध प्रकारचे कामगार, व्यापारी इत्यादी असतात. उदा.–सोनार, लोहार, घोड्यांचे नाल बसविणारे, विणकर, कलाकुसरीचे काम करणारे आणि सराफ वगैरे. प्रत्यक्ष शिपायांच्यापेक्षा अशा लोकांची संख्या चौपटीने अधिक असते. आठ हजार घोडेस्वारांचे दळ असा आपण उल्लेख केला की निश्चितपणे समजावे की, या दळात तीस हजार माणसे असतात. म्हणजे आठ हजार शिपाई आणि बावीस हजार वर उल्लेखिलेल्या प्रकारचे लोक. मोगलांच्या छावणीत कितीही लहान दर्जाचा शिपाई असला तरी त्याला तीन चार तरी नोकर असतात.

रहावे आणि नोकरी पत्करावी असा त्याने प्रयत्न केला. आपल्या चाकरीत असलेल्या ख्रिश्चन (फिरंगी) लोकांवर मी तुला अधिकारी करीन व दाराच्या वेळी मिळत होता तोच पगार देईन असे त्याने मला सांगितले. काही तरी निमित्त काढून मी (मनुची) त्याची विनंती टाळली. जगातील वेगवेगळे भाग पाहण्याची मला इच्छा आहे असे मी त्याला सांगितले. मला औरंगजेबाचा तिटकारा होता. मला इतिबारखानाचे तोंड देखील पाहणे आवडत नसे. स्पष्टच सांगायचे तर तो माकडासारखा दिसायचा. अशा चेहऱ्याच्या माणसाकडून एखादे सत्कृत्य होऊ शकेल असे मला वाटत नव्हते. असे असूनही मी इतिबारखानाच्या सांगण्यावरून त्याच्याकडे अनेक वेळा गेलो. नोकरी पत्करण्यास माझे मन घेत आहे अशी त्याला आशा वाटे. पण प्रत्येक भेटीच्या शेवटी आग्रा सोडून जाण्याचा माझा निर्धार वाढतच गेला.

**कैदेत असलेल्या शहाजहान बादशहाचा छळ** : आग्र्यात असताना मी बऱ्याच वेळा किल्ल्यात जात असे. माझ्या या भेटींवरून कैदेत शहाजहानची अतिशय जखडबंदी केली गेली होती असे मला दिसले. शहाजहान, त्याच्या स्त्रिया व नोकर यांची टिंगल म्हणून खोजा इतिबारखान हा अश्लिल शब्दांत, हजर असलेल्या मंडळींना गोष्टी सांगे. आपण शहाजहानला गुलामासारखे कसे वागवित आहोत हे दाखविण्याची त्याला (इतिबारखानाला) अधून मधून हुक्की येई.

एकदा शहाजहानला चपला पाहिजे होत्या; म्हणून काही मखमली, काही कातड्याच्या चपला आणवल्या होत्या. मखमलीच्या चपलांची किंमत आठ रुपये होती. वास्तविक पहाता शहाजहानच्या दर्जाप्रमाणे ही किंमत काहीच नव्हे. असे असूनही त्या कंजूष इतिबारखानाने शहाजहानकडे साध्या कातड्याच्या चपला पाठविल्या. आपण फार मोठी कामगिरी केली या कल्पनेवर तो खूष होता. खोजा इतिबारखानाची वृत्ति औरंगजेबाप्रमाणेच होती. खोजाचा घाणेरडा चेहरा-मोहरा हा तितक्याच हलक्या मनोवृत्तीचा आहे हे औरंगजेबाला पटले होते. शहाजहान हा औरंगजेबाला आपला सर्वांत मोठा शत्रु वाटत होता. त्याची शक्य तितकी दुर्दशा झाली की तो लवकर मरणार हे ठरल्यासारखे होते. म्हणून आपल्या बापावर देखरेख करण्यासाठी, औरंगजेबाने या घाणेरड्या चेहऱ्याच्या आणि घाणेरड्या मनोवृत्तीच्या इतिबारखानाची नेमणूक केली असल्यास त्यात नवल कसले? चपलांच्या बद्दलची वर दिलेली घटना झाली त्यावेळी मी (मनुची) इतिबारखानाजवळ होतो. इतरांना या गोष्टीचे काय वाटले ते मला माहित नाही. पण मला मात्र अतिशय वाईट वाटले. शहाजहान गादीवर होता तेव्हा त्याचे काय वैभव होते हे मला माहित होते. इतिबारखान हा पूर्वी शहाजहानच्या पदरी होता. शहाजहानने त्याला औरंगजेबाच्या तैनातीत दिले होते; हे लक्षात ठेवले पाहिजे. आपण शहाजहानला लहान सहान

गोष्टीत कसा त्रास देतो, याची हा खोजा नेहमी प्रौढी मिरवित असे. एकदा मी इतिबारखानाजवळ बसलो होतो. इतरही काही मंडळी होती. शहाजहानने दोन वाद्ये पाठवून दुरुस्ती करून ती शक्य तितक्या लवकर मागवून घ्यावी असे इतिबारखानास कळविले. इतिबारखानाने ती दुरुस्त करण्याकडे लक्ष दिले नाही. तीन दिवसानंतर वाद्ये दुरुस्त झाली का, असे शहाजहानने विचारण्यास पाठविले. यावर इतिबारखान अतिशय रागावला आणि त्या भरात ती वाद्ये दुरुस्तीसाठी पाठविली. दुरुस्त होऊन ती शहाजहानकडे परत पाठविण्यास आठ दिवस लागले.

खोजा इतिबारखान याचा स्वभाव, त्याने आपल्या आईबापांना कसे वागविले, यावरून समजून येईल. ते बंगालचे राहणारे होते. आपला मुलगा आग्र्याचा किल्लेदार झाला असे समजल्यावरून ते आग्र्याला आले. त्याच्याकडून आपल्याला काही मिळेल आणि आपली गरीबी दूर होऊन म्हातारपणात काही आधार लाभेल अशी त्यांची अपेक्षा होती. किल्ल्याच्या प्रवेशद्वारावर ते बरेच दिवस पडून होते. पहारेकरी त्यांना आत सोडीना. आपण किल्लेदाराचे आई-वडील आहोत असे ते शपथपूर्वक सांगू लागले. एक दिवस मी ( मनुची ) इतिबारखानापाशी बसलो असताना, पहारेकरी येऊन त्याला सांगू लागला की, दारावर दोन म्हातारी माणसे आली असून ती तुमचे आई-वडील आहेत, असे शपथपूर्वक सांगत आहेत. हे ऐकून इतिबारखान थोडा वेळ गप्प बसला. त्याला ही बातमी आवडली नाही, असे दिसले. थोड्या वेळाने तो हळूच म्हणाला, "ती क्षुद्र माणसे" अजून जिवंत आहेत काय ? त्यांना आपल्यासमोर घेऊन येण्याची आज्ञा केली. ते आल्यावर त्यांना रागाने विचारले, "कोण तुम्ही ? तुमची नावे काय ? कोठून आले ? तुमच्या खेड्याचे नाव काय ?" त्यांनी दिलेल्या उत्तरावरून ते आपले आई-वडील आहेत अशी इतिबारखानाची खात्री पटली. तो त्यांना मोठ्याने म्हणाला "तुम्ही माझे शरीर विकले. त्या पैशावर तुम्ही आपले पोट भरले. मला लबी होऊन खोजा बनण्यास लावले. जगातील सर्वांत मोठे असे जे रतिसुख त्यापासून तुम्ही मला वंचित केले. आता माझ्यासमोर येण्याचे तुम्हाला धाडस तरी कसे करवले ? मला मिळवून काय उपयोग आहे ? ती देण्यासाठी मला मुले बाळे नाहीत. तुम्ही निर्दयपणाने तुमच्या हाडामासाचा असलेला जो मी, त्याला विकलेत. तुमचा राग मला आला तर कोणाला चमत्कारिक वाटू नये."

इतिबारखानाने त्यांना ५०–५० फटके मारावे अशी आज्ञा केली. मी (मनुची) त्यावेळी तेथे हजर होतो. मी त्याला बायबल मधील जोसेफची गोष्ट सांगितली. मी त्याला म्हटले, "जोसेफच्या भावांनी त्याचा अतिशय छळ केला. पण या छळामधूनच जोसेफला इजिप्तमध्ये सर्वश्रेष्ठ स्थान प्राप्त झाले." परमेश्वराने जोसेफच्या भावांच्या निर्दयतेचा उपयोग जोसेफच्या कल्याणासाठी केला. असेच आपल्या बाबतीत घडले

आहे. आपले आई-वडील आपल्याशी निर्दयतेने वागले पण त्याचाच उपयोग परमेश्वराने करून आज आपल्याला आग्र्याच्या किल्लेदारीची फार मोठी जागा दिली आहे. माझे बोलणे ऐकून इतिबारखान शांत झाला. त्याने आपल्या आई-बापांना क्षमा केली. त्यांना शंभर रुपये द्यावे अशी आज्ञा केली आणि पुनः माझ्यासमोर येऊ नका, आला तर मी तुम्हाला ठार मारीन अशी त्यांना ताकीद दिली.

मानवी स्वभावच असा आहे की, क्षुल्लक स्थितीतून मोठ्या पदावर आलेल्या माणसाला आपल्या पूर्वीच्या दिवसांची हकीगत सांगणे, अगर आपले बापवडील हे हलक्या परिस्थितीत होते असे सांगणे आवडत नाही. त्यामुळे खोजा इतिबारखानाने आपल्या गरीब आणि शोचनीय स्थितीतील माता-पित्याशी जी वागणूक केली, तिचे आश्चर्य वाटावयास नको. खोजे कितीही उच्च पदाला चढले तरी त्यांना लहानपणी त्यांच्या आई-बापानी पोट भरण्यासाठी विकले असणार ही गोष्ट सर्वश्रुतच आहे, ही गोष्ट हे खोजेही नाकारीत नाहीत. उलट आम्ही आमच्या गुणांनीच वर चढलो असे ते टेंभा मिरवितात. खोजा इतिबारखानाने आपल्या आई-वडीलांशी जी वागणूक केली तिची मला अतिशय चीड आली. मी आग्रा शहर सोडण्याचे ठरविले. इतिबारखान हा अतिशय चिक्कू माणूस होता. हत्ती आणि घोड्यांची लीद विकून त्याने दहा हजार रुपये कमावले. त्या पैशांतून त्याने एक हत्ती विकत घेतला. हा हत्ती एक दिवस सुटून पळाला. या धावपळीत त्याचा एक पाय मोडला. हिन्दुस्थानचे लोक बोलण्यात मोठे फटकळ आहेत. ते म्हणू लागले की बोलून चालून हा हत्ती लिदीचाच होता. त्याचा पाय मोडणारच. इतका चिक्कू असूनही इतिबारखानाने आपल्या खर्चाने आग्रा किल्ल्याच्या भोवती बाहेरचा असा आणखी एक तट बांधून काढला. त्यात त्याला बराच खर्च आला असला पाहिजे. कारण हा तट मजबूत आणि शोभिवंत होता.

खोजे : येथे खजी झालेल्या खोजांच्या बद्दल काही माहिती सांगणे योग्य होईल. हे खोजे श्रीमंत असले की गप्पा गोष्टीसाठी म्हणून का होईना आपल्या घरात निवडक बायका बाळगतात. इतकी श्रीमंती नसली तर ते निरनिराळ्या घरांतून बायकांशी संपर्क ठेवीत असतात. ते खोजे असल्यामुळे त्यांना अंतःपुरात जाण्याची आडकाठी नसते. हे खोजे लोक पराकाष्ठेचे लोभी असतात. सोने, नाणे, रत्ने इत्यादी जमविण्याचा त्यांना अतिशय हव्यास असतो. तसेच ते कमालीचे चिक्कूही असतात. उत्तम पोषाख करून चांगल्या घोड्यावर स्वार होऊन फिरण्याची त्यांना मोठी हौस असते. आपण फार मोठे आहोत असे त्यांना वाटू लागते. राजकन्या आणि अमीर उमरावांच्या बायका-मुली यांना नेहमी जवळ करतात. त्यांना बक्षिसे देऊन आपले हेतू साध्य करून घेण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. हे हेतू काय असतात हे न सांगितलेले बरे. अंतःपुरात पर पुरुषाचा प्रवेश होणे आणि

एखाद्या बाईवर तिच्या सवतींना डावलून तिच्या नवऱ्याची मर्जी बसविणे या गोष्टी यांच्यामुळे साध्य होतात. मोठमोठ्या अमीर-उमरावांच्या आणि प्रतिष्ठितांच्या वाड्यातील अंतःपुरात या खोजांचीच देखरेख असते.

स्त्रियांचा संपर्क यांना जितका हवा, तितकाच या खोजांना पुरुषांचा तिटकारा असतो. हे कदाचित मत्सरामुळे होत असेल. हे तोंडाने हलकट, अश्लील, आणि हातांनी तितकेच स्वैर असतात. अंतःपुरात येणारा माल आणि स्त्रिया यांच्या बाबतीत हाच अनुभव येतो. त्यांना अश्लील गोष्टी आवडतात. इस्लाम धर्मांचे हे कसोशीने पालन करतात. अर्थात माझ्या माहितीप्रमाणे काही खोजे मदिरापान करीत असत. हेरगिरी करण्यात हे खोजे पटाईत असतात. बादशहा, राजपुत्र, अमीर-उमराव, राण्या आणि सरदार स्त्रिया इत्यादींचे काय बोलणे चालते, ते ते नेहमी ऐकत असतात. फिदाईखान या सरदाराचा मी (मनुची) पूर्वी उल्लेख केला आहे. त्याला या खोजांच्या स्वभावाची चांगली जाणीव होती म्हणून त्याने त्यांना आपल्या वाड्यात बाळगिले नाही. फक्त दोन खोजे त्याच्या स्वतःच्या दिमतीस असत.

**अलाहाबाद शहराविषयी :** जेसुइट पाद्र्यांनी पाहिले की, आग्र्यात न राहण्याचा माझा निर्धार आहे, तेव्हा त्यांच्यापैकी हेनरिच रोट याने आपल्या मठात राहत असलेले आणि चीनहून पळून आलेल्या दोन पोर्तुगीज पाद्र्यांना आपल्याबरोबर घेऊन चलण्यास मला सांगितले. ते मी कबूल केले. बारा दिवसांनी आम्ही अलाहाबादला पोहचलो.

बंगालच्या वाटेवर मी (मनुची) या शहरी राहिलो होतो. या शहराच्या पूर्व बाजूस लाल दगडांचा एक किल्ला आहे. हा अकबर बादशहाने बांधला होता. किल्ला फार सुरेख व बळकट आहे. याच्या पायथ्याजवळून गंगा यमुना या नद्यांचा संगम आहे. या नद्यांच्या प्रवाहाखेरीज एक वेगळा जीभेसारखा प्रवाह मधून वाहतो. त्याला तीर्थ म्हणतात. याचा रंग मिसळत नाही. बऱ्याच अंतरापर्यंत हे दोन प्रवाह व हा मधला प्रवाह वाहत जातात, हा सुंदर देखावा मी पाहिला आहे. अलाहाबादेचा सुभेदार बहादुरखान याचा वैद्य हकीम मोमीन याने मला या किल्ल्यात मेजवानी दिली. अलाहाबादेस दर पाच वर्षांनी लोक या तीर्थावर यात्रेकरिता येतात. प्रत्येक मनुष्य सव्वा सहा रुपये कर देतो. मोगल बादशहाना त्याचे फार मोठे उत्पन्न मिळते. इतकी अतोनात गर्दी होते की, लोटालोटीत काही लोक गुदमरून मरतात. परंतु त्याबद्दल मृतांच्या नातेवाईकांना दुःख होत नाही. तीर्थाच्या ठिकाणी चांगले मरण आले असे ते मानतात.

या नद्या बनारस, पटणा, मोंघेर आणि राजमहालपर्यंत वाहत जातात. नद्यांच्या प्रवाहाचे अंतर अलाहाबादहून बनारस सुमारे ९० लीग (सुमारे १८० मैल) बनारसहून

पाटण्याचे अंतर ४० लीग (सुमारे ८० मैल) पटणा ते मोंघेर ८० लीग (सुमारे १६० मैल) आणि मोंघेर ते राजमहाल ४० लीग (सुमारे ८० मैल) असे पडते. राजमहालापाशी नदीच्या दोन शाखा पडतात. एका शाखेचे नाव गंगा असून ती हुगळीवरून समुद्रास मिळते. दुसऱ्या शाखेचे नाव यमुना असून ती ढाक्यावरून इतर मोठ्या नद्यांना जाऊन मिळते.

**बनारस :** मी (मनुची) काही दिवस अलाहाबादमध्ये होतो. अलाहाबादचा सुभेदार बहादूरखान हा त्यावेळी काही जमीनदारांच्या विरुद्ध मोहिमेवर गेला होता. अलाहाबाद सोडून आम्ही खुष्कीच्या मार्गाने आठ दिवसांनी बनारसला आलो. माझ्या बरोबर प्रवासाचा परवाना होता. हा सर्व प्रवाश्यांना बाळगावा लागतो. बनारसला मी बरेच दिवस होतो. हे शहर लहान परंतु अत्यंत प्राचीन आहे. येथे प्राचीन देऊळे आहेत. हे हिंदुंचे मोठे क्षेत्र आहे. मी बनारसला भेट दिल्यानंतर काही वर्षांनी औरंगजेबाने बनारसमधील प्राचीन देऊळे नष्ट करण्याचा हुकूम केला. सगळीच देऊळे पाडून टाकण्याची त्याची जी योजना होती तीस अनुसरूनच वरील हुकूम होता. याचा योग्य ठिकाणी उल्लेख येईलच.

**पाटणा :** बनारस येथे जरीचे कापड पुष्कळ होते. ते सर्व मोगल साम्राज्यात आणि जगात अनेक ठिकाणी पाठविण्यात येते. बनारसमधील राहणीसंबंधी हिंदु लोकांची म्हण अशी " थोडा खाना बनारसमे रहना, " या गावाची हवा चांगली. ठिकाण सुंदर व अन्नाची स्वस्ताई आहे. बनारसपाशी मी गंगा ओलांडली आणि चार दिवसांनी मी पाटण्याला आलो. पाटणा हे मोठे शहर असून त्यात अनेक बाजार आहेत. बऱ्याच घरांना आणि दुकानांना गवती छपरे आहेत. येथे तलम कापड आणि पुष्कळ रेशमी कापड तयार होते. या भागात बंदुकीच्या दारूस लागणारा सोरा ( सॉल्ट पिटर ) मोठ्या प्रमाणावर तयार होतो. तेथून तो जहाजाद्वारे युरोपच्या अनेक भागात पाठविण्यात येतो. पाटण्यात बाटल्या आणि मातीची अतिशय सुबक भांडी तयार होतात व त्या सर्व देशांना जातात. पाटणा शहरात इंग्रजांची एक आणि डचांची एक अशा दोन वखारी आहेत.

यावेळी पाटण्याला दाउदखान हा सुभेदार होता. हा पूर्वी दारा शुकोच्या पदरी होता. दाराने मुलतानहून निघताना विनाकारण आणि लोकांचा सल्ला न मानता त्याला नोकरीतून काढून टाकले होते. दाराने त्याचा विनाकारण संशय घेतला होता. ही हकीकत मी (मनुची) मागे सांगितलीच आहे. मी त्याला भेटण्यास गेलो. माझ्या भेटीने त्याला आनंद झाला. दारा मला चाहत होता, हे त्याला माहित होते. दाउदखानाने मला शिरपावची वस्त्रे दिली. दाराची तो जिव्हाळ्याने आठवण काढी. दाराच्या दुर्दैवाबद्दल त्याने हळहळ व्यक्त केली. दारा जिवंत असता तर आपण औरंगजेबाची नोकरी पत्करली नसती, असे तो म्हणाला. मी ( मनुची ) त्याच्या चाकरीत यावे अशी

त्याची ईच्छा होती पण बंगालमध्ये कामे आहेत मला गेले पाहिजे. क्षमा करा, असे मी (मनुची) त्याला सांगितले. त्याने मला प्रवासासाठी नाव देऊ केली. मी नावेतून निघालो. माझ्याजवळ दोन घोडे होते. त्यापैकी मी एक घोडा विकला. माझ्या बरोबर दोन पोर्तुगीज पाद्री होते. मी किनाऱ्यावर उतरलो असताना मला सोडून पुढे जावे असा त्यांचा बेत होता. त्यांची लबाडी पाहून मी त्यांची कडक हजेरी घेतली व त्यांना फजित केले. पटण्याहून निघून मी राजमहालला पोहोचलो. तेथे मी (मनुची) काही दिवस राहिलो. राजमहलाला पूर्वी राजपुत्र शाहाशुजा यांचे मुख्य ठाणे असे. आता शहराची पडझड झाली आहे. राजवाडे निर्जन आहेत. मोठमोठे वाडे पडले आहेत. बागांची आणि उद्यानाची दुर्दशा झाली आहे. मी (मनुची) गेलो त्या वेळी राजमहालाचा अधिकारी बुर्गोजानी हा होता. हा पूर्वी शाहाशुजाच्या सैन्यातील तोफखान्याचा अधिकारी होता. राजमहालहून निघून मी (मनुची) जलप्रवासाने पंधरा दिवसांनी ढाक्याला पोहचलो. ढाका ही बंगाल सुभ्याची राजधानी होय. मी ढाक्यात होतो त्यावेळी बंगालचा सुभेदार मीर जुमला हा आसामच्या मोहिमेवर गेला होता. ढाक्यातील बहुतेक घरे गवताची बनलेली आहेत. ढाक्यात एक इंग्रज आणि एक डच अशा दोन वखारी होत्या. ढाक्यात बरेच खिश्चन होते. ढाक्यात माझी थॉमस प्रॅट नावाच्या एका इंग्रजाची ओळख झाली. मीर जुमलाने त्याला महिन्याला ५०० रुपये अशा पगारावर नेमले होते. नावा बांधणे आणि नद्यातील लढायांसाठी सामुग्री पुरविणे ही कामे त्याच्याकडे होती. ढाक्याला काही दिवस घालवून मी (मनुची) नदीच्या मार्गे हुगळीला जाण्यास निघालो. ढाका सोडल्यावर मी (मनुची) सुंदरबनातून प्रवास केला. सुंदरबन हा एक अत्यंत दलदलीचा प्रदेश आहे. त्यात वाघ, गेंडे व रानरेडे विपुल आहेत. रात्री नावांच्या रक्षणाकरिता ठिकठिकाणी रखवालदार ठेवण्याची आवश्यकता असे. सुंदरबनातील वाघ पाण्यातून पोहत येऊन, नावेत घुसून, प्रवाशांना घेऊन जात. जंगलभागात रात्री ठिकठिकाणी ज्वाला पेटलेल्या दिसतात. जंगलातील चेटकीणीचे हे कृत्य आहे, असे सामान्यपणे समजले जात असे. बंगालमध्ये या चेटकीणींना शंखिणी असे म्हणतात. एकट्या दुकट्या प्रवाशावर त्या वशीकरण मंत्र चालवितात असा प्रवाद आहे. अशा काही गोष्टी मला ऐकण्यास मिळाल्या. या प्रदेशातून चाळीस दिवस प्रवास करून मी (मनुची) हुगळीस पोहोचलो. माझ्याबरोबरचे पोर्तुगीज पाद्री हे पुढे बालासोरला गेले.

येथील सर्व प्रमुख व सधन नागरिक पोर्तुगीज होते. सर्व बंगाल प्रांतातील मीठाचा व्यापार त्यांच्या ताब्यात होता. पोर्तुगीज लोकांचे गवताचे बांधलेले येथे एक लहानसे चर्च होते. पोर्तुगीजांना चर्चची मोठी दगडी इमारत बांधायची होती. हुगळी येथे मीर्झागुल (मुघल) नावाचा इराणी वंशाचा सुभेदार होता. तो पूर्वी शाहाशुजाच्या पदरी होता. जेस्युइट पाद्र्यांनी हुगळीला चर्चची दगडी इमारत बांधू नये अशी त्याची इच्छा होती. पाद्र्यांनी त्याला पाच हजार रुपये देऊ केले पण त्याने

परवानगी दिली नाही. मी तेथे गेल्यावर पोर्तुगीजांनी मला आपले वजन खर्च करण्याची विनंती केली. मी सुभेदाराची गाठ घेतली. त्याच्याशी गोडगोड बोललो. औरंगजेब व शाहाशुजा इत्यादींच्या नुकत्याच होऊन गेलेल्या युद्धाच्या गोष्टी केल्या. त्यामुळे तो खुष झाला. त्यानंतर वेळ पाहून पोर्तुगीजांची विनंती मी त्याच्यासमोर ठेवली आणि त्याचे मन वळवून चर्च बांधण्याची परवानगी मिळविली. माझ्यामुळे ही परवानगी मिळाली हे पाहून पोर्तुगीज थक्क झाले. मी हुगळीतच राहावे असा त्यांनी प्रयत्न केला. एका तरुणीबरोबर माझे लग्न जमविण्याचेही प्रयत्न केले. त्याबरोबरच तीस हजार रुपये, मीठानी भरलेल्या दोन नावा आणि एक सजविलेले घर इत्यादी गोष्टी त्यांनी मला देऊ केल्या. परंतु आग्र्याला जाऊन वैद्यकी करण्याचा माझा बेत आहे, असे मी त्यांना सांगितले. अर्थात हे लग्न घडून येऊन वरील गोष्टी मला मिळाव्यात अशी आतून इच्छा होती. पण मी मुद्दाम उतावीळपणा दाखविला नाही. माझ्याबरोबर आग्र्याहून आलेल्या दोन पाद्र्यांनी माझ्याबद्दल खोटे नाटे सांगून माझ्या लग्नाचा बेत मोडून काढला. अर्थात मी त्या पोर्तुगीजांची लबाडी उघडकीस आणली. हुगळीतील खिस्ती पाद्र्यांची वागणूक दुराचाराने भरलेली होती. धर्मप्रसाराचे काम चांगले हे खरे. पण धर्म प्रचारक सच्चरित आणि सुशील असले पाहिजेत हेच कोणी म्हणेल. दोन महिन्यांनी मी आग्र्याकडे जाण्यास निघालो. पोर्तुगीज पाद्र्यांनी माझ्याविरुद्ध केलेली चुगली उघडकीस आली होती. माझे लग्न घडवून आणावे अशी मुलीच्या बापाची इच्छा होती. पण मी काही न ऐकता हुगळी सोडून निघालो.

**मी आग्र्याला परत जातो** : कासीमबाजार हे गाव तीन दिवसांच्या अंतरावर आहे. तेथे उत्तम व तलम पांढरे कापड तयार होते. या गावात फ्रेंच, इंग्रज व डच यांच्या वखारी आहेत. कासीम बाजारहून मी राजमहालला गेलो. तेथे मी एका स्त्रीला सती जाताना पाहिले.

राजमहालहून, मी पटण्याला आलो. तेथे इंग्रज व डच मित्रांच्या सहवासात मी आनंदाने बराच काळ घालविला. तेथून अलाहाबादच्या मार्गे मी आग्र्यास आलो. औरंगजेब ह्यावेळी काश्मीरमध्ये होता. आग्र्याला मी आल्यावर काही दिवसांनी जॅकोब नावाचा एक डॉक्टर मला भेटण्यास आला. डचांनी गोव्याची नाकेबंदी केली होती.[1] त्यावेळी जॅकोबच्या हातून एक मनुष्य मारला गेला होता. ह्यामुळे जॅकोब आग्र्याला पळून आला होता. त्याची माझी अगदी वेळेवर गाठ पडली असे म्हणावे

१ गोव्याला डचांनी घातलेले वेढे पढीलप्रमाणे होते :— एप्रिल १६३७, ऑक्टोबर १६३७ ते जानेवारी १६३८. आणि पुन: जानेवारी ते फेब्रुवारी १६३९. (डॅन्वर्स ii २६२, २६४) मला वाटते यांपैकी एकाचा येथे उल्लेख असावा. अथवा तो वेढा १६६०–६१ मधला (भाग ५ च्यात फो. २०२ मध्ये उल्लेख केलेला) असावा.

लागेल. आग्र्याचा सुभेदार हा भगंदराने आजारी होता. इलाज करण्यासाठी त्याने मला बोलावणे पाठविले. किल्ल्यात इलाज करील असा कोणी युरोपियन नव्हता. आणि मुसलमान हकीम या रोगाचा इलाज करण्यास धजेना. जँकोबला मुसलमानी भाषा येत नव्हती. तो गरीब आणि खालावलेल्या स्थितीत होता. हा रोग तू बरा करू शकशील काय? असे मी त्याला विचारले. त्याने होकार दिला. त्याच्याबरोबर मी सुभेदाराकडे गेलो. थोड्याच दिवसांत आम्ही त्याला बरे केले. त्याने आम्हाला यासाठी बरीच रक्कम दिली आणि त्याच्याकडे जात होतो तेव्हाही वेळोवेळी त्याने भेटी दिल्या त्या वेगळ्याच. हळूहळू मी वैद्यकीचा धंदा करू लागलो. पण आपण वैद्य आहोत असे मी जाहीर केले नाही.

एक दिवस एका अर्मिनियन मित्राबरोबर घोड्यावरून बाहेर फेरफटका करण्यासाठी मी गेलो होतो. वाटेत एक हिंदु स्त्री सती जात होती. ती पेटलेल्या चितेभोवती प्रदक्षिणा घालू लागली. तिने आमच्याकडे मदतीच्या अपेक्षेने पाहिले. "या स्त्रीला मृत्यूपासून मी सोडविणार आहे. तू मला मदत करशील काय?" असे माझ्या अर्मिनियन मित्राने मला विचारले. मी ते मान्य केले. आम्ही आणि आमच्या नोकरांनी तलवारी परजीत आणि मारो मारो म्हणत गर्दीवर हल्ला केला. यावर तेथे असलेले ब्राह्मण आणि इतर लोक पांगले. माझ्या अर्मिनियन मित्राने या स्त्रीला घेऊन घोड्यावर मागे बसविले. काही काळाने तिला बाप्तिस्मा देऊन त्याने तिच्याशी लग्न केले. पुढे कित्येक वर्षांनी मी सुरतेवरून जात असताना ती मला भेटली. तिच्याबरोबर तिचा मुलगा होता. आम्ही तिच्यावर उपकार केले याबद्दल तिने माझे आभार मानले.

औरंगजेब काश्मीरहून परत आल्यावर आमच्या परंपरेप्रमाणे स्त्रियांना सती जाऊ देण्यास सरकारी शिपायी प्रतिबंध करतात अशी सर्व ब्राह्मणांनी बादशहापाशी तक्रार केली. बादशहाने हुकूम दिला की, मोगल राज्यात कोणत्याही स्त्रीला सती जाऊ देऊ नये. हा हुकूम आजतागायत चालू आहे.

**आसामातील युध्द :** औरंगजेब काश्मीरला जाण्यास निघण्यापूर्वी बंगालचा सुभेदार मीर जुमला यांस आसाम जिंकून घेण्यासाठी त्याने आज्ञा केली होती. मीर जुमलाने आसाममध्ये[1] बरीच मजल मारली. त्याने हाजोचा[2] किल्ला जिंकून घेतला. यानंतर त्याने आसामची राजधानी गुरगाव[3] (खरगाव) ही जिंकून घेतली. पण आसाममधील

१. आसाम मोहिमेचा सर्वांत चांगला वृत्तान्त शहाबुद्दिन तालीशच्या फतियाह-इ-इब्रिया मध्ये आढळतो. मीर बहादूर अलीच्या उर्दू ग्रंथाचे सिडोअर पानी याने फ्रेंचमध्ये भाषांतर केले आहे.

२. हाजो हा किल्ला आसामच्या कामरूप जिल्ह्यात आहे.

३. गुरगाव हे खाफीखानाने दिलेले गरगाव आहे. ते नेऊपूर आणि शिवसागर या गावांच्या मधे आहे.

भयंकर पावसामुळे आणि आसामी लोकांच्या प्रतिकारामुळे त्याला परत फिरावे लागले. हाजो किल्ल्याचा बंदोबस्त करून तो ढाक्याला परत आला. तेथे काही दिवसांनी तो आजारी पडला. त्यातच त्याचा मृत्यु झाला[1]. (१२ एप्रिल १६६३).

औरंगजेबाने बंगालच्या सुभेदारीवर बिहारचा सुभेदार दाऊदखान याची तात्पुरती नेमणूक केली. मीर जुमलाचा मुलगा मुहम्मद अमीनखान हा दरबारात होता. औरंगजेबाने त्याचे समाधान केले. त्याच्या बापाची सगळी संपत्ती त्याला दिली. त्याचा पगार (वार्षिक) एक लाख रुपयांनी वाढविला आणि त्याला मीरबक्षीचा हुद्दा दिला. (मीरबक्षी म्हणजे साम्राज्यातील सर्व घोडदळाचा सरनौबत असला पाहिजे) थोड्याच काळात महम्मद अमीनखानाची लाहोरचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. त्याचा मुलगा मिर्झा अब्दुल्ला याला दोन लाख रुपये प्रतिवर्षी मिळावे म्हणून तितक्या उत्पन्नाचा सरंजाम देण्यात आला.

**थॉमस प्रॅट :** मीर जुमल्याच्या पदरी असलेला इंग्रज थॉमस प्रॅट[2] याचा उल्लेख मी (मनुची) पूर्वी केला आहे. ढाका येथे शिपायांच्या बरोबर त्याच्या काही तक्रारी झाल्या. मोगल शिपायांनी दंडेली करून त्याच्या शेजाऱ्याला त्रास दिला. त्यात थॉमस प्रॅट मध्ये पडला. या मारामारीत बरेच लोक मारले गेले. थॉमस प्रॅट हा ढाक्याहून पळून आरकानच्या राज्याच्या आश्रयाला गेला. आपला सल्ला ऐकला तर ढाका आणि बंगालचा इलाखा तुमच्या हाती येऊ शकतील, असे त्याने आरकानच्या राजाला सांगितले. प्रॅटचा बंदोबस्त करण्यासाठी बंगालचा सुभेदार दाऊदखान याने एक युक्ती योजिली. त्याने थॉमस प्रॅटला एक पत्र लिहिले. त्यातील मजकूर पुढील प्रमाणे होता : "ठरल्याप्रमाणे तुम्ही आता ढाक्याला परत यावे. परत येण्यापूर्वी तुम्ही वचन दिल्याप्रमाणे आरकानच्या राजाचे डोके बरोबर आणण्यास विसरू नका." हे पत्र आरकानच्या राजाच्या हाती पडावे अशी दाऊदखानने व्यवस्था केली. पत्र हाती पडताच आरकानच्या राजाने प्रॅट आणि त्याचे साथीदार यांना नावेत कैद केले आणि ती नाव बुडवून त्यांना ठार मारले.

**शिवाजी शाइस्ताखानाला जखमी करतो :** औरंगजेबाने आपला मामा शाइस्ताखान याला शिवाजीचे पारिपत्य करण्यासाठी दक्षिणेत पाठविले होते, हे मागेच सांगितले

१. मीर मुहम्मद सैद अरदस्तानी, याला प्रथम मीरजुमला, नंतर खान खाना सिपहसालार या पदव्या मिळाल्या. हा एक मोठा शाहाजहानी आणि आलमगिरी सरदार होता. हा आसाम वरील स्वारी करून परत येताना, ४ रमजान १०७३ हि.–१२ एप्रिल १६६३ ला बंगालमध्ये मरण पावला. याला ७०००–५००० घोडदळ, ५००० दुहास्पा होते. (तारीख-इ-मुहम्मदी १०७३).

२. थॉमस प्रॅट याने १६६३ च्या नोव्हेंबर महिन्यात हुगळी कौन्सिलकडून दरबार, नोकर, अश्वांवर खर्चाकरिता १९२ रुपयांची मागणी केली होती. (इंडिया ऑफिस रेकॉर्डस्).

आहे. शिवाजीच्या मुलखात पोहचल्यावर शाइस्ताखानाने पुणे हा लहानसा किल्ला घेतला. तेथे तो गावाबाहेरील एका तळ्याजवळ घर बांधून राहिला. पावसाळा तेथे काढावा असे त्याने ठरविले.[1]

शिवाजी हा शाइस्ताखानाला जमेल त्या मार्गाने ठार करू पाहत होता. यात त्याला राजा जसवंतसिंगाचा सल्ला होता, आणि त्यामुळे शाइस्ताखानाची सगळी संपत्ति राजा जसवंतसिंग गिळंकृत करू पाहत होता, असे म्हणतात. आपली कणखर आणि चिकाटीची माणसे मोगलांच्या सैनिकात मिसळून द्यावी, आणि शाइस्ताखानाच्या वाड्यात प्रवेश मिळवावा असे शिवाजीने ठरविले. वरील माणसांनी आपण शाइस्ताखानाचे नोकर आहोत असे भासवावे. वाड्याच्या भिंतीला भोक पाडून आत असलेल्या स्त्री-पुरुषांची कत्तल करावी आणि आपले एकंदरीत कारस्थान बिनधोकपणे पार पाडावे असे ठरले.

हा बेत अमलात आणण्यासाठी शिवाजीने एका संधीचा उपयोग केला. बादशहाच्या राज्यारोहणाच्या[2] वाढदिवशी दिवसातून आणि रात्रीतून आठ वेळा नौबती नगारे वाजविण्याची मोगलांची पद्धत आहे. सेनापतीच्या मुख्य तंबुपाशी ही वाद्ये वाजविली जातात. त्यांच्या वेळा सकाळी ६ वाजता, ९ वाजता, मध्यान्ही, दुपारी तीन वाजता, संध्याकाळी ६ वाजता, रात्री ९ वाजता, मध्यरात्री, आणि पहाटे ३ वाजता अशा ठरलेल्या असत. शिवाजीने आपल्या हल्ल्यासाठी मध्यरात्रीची वेळ निवडली. शिवाजीच्या काही सैनिकांनी आपण घरचे नोकर आहोत असे भासवून या आनंदोत्सव प्रसंगी, वाद्य वाजविणाऱ्यांना असे सांगितले की, सर्व वाद्ये जोराजोरात वाजविण्यात यावीत अशी शाइस्ताखानाची इच्छा आहे. घराच्या भिंती खणण्याचा आवाज वरील वाद्यामुळे कोणाच्या कानी जाऊ नये, असा शिवाजीचा हेतु होता. शिवाजीच्या सैनिकांनी शाइस्ताखानाच्या वाड्याच्या भिंतीना खणून भोक पाडण्यास सुरवात केली. वाड्यातील स्त्रियांना कुदळीचे आवाज ऐकू आले. त्यांनी ही बातमी शाइस्ताखानाला सांगितली. परंतु मद्याच्या नशेत असल्यामुळे त्याने त्यांच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. आपले सैनिक घोड्यांच्या पाय-दोऱ्या बांधण्याच्या खुंट्या ठोकीत असतील असे तो म्हणाला. शिवाजीचे काही सैनिक भिंतीला पाडलेल्या भगदाडातून आत शिरले होते. आपल्या खोल्यात पुरुष अशा रीतीने घुसल्याचे पाहाण्याची अंतःपुरातील बायकांना सवय नव्हती. त्या ओरडू लागल्या. यात काही तरी दगाफटका आहे असे त्यांना वाटले. ही गडबड ऐकून शाइस्ताखानाचा थोरला मुलगा बुझर्ग उमेदखान (हा मुलगा बुझर्ग उमेदखानाचा धाकटा भाऊ अबुल फतहखान हा होता) हातात तलवार घेऊन त्यांच्या दिशेने

१. या स्वारी विषयींच्या माहितीकरिता पाहा—ग्रँट डफचे 'हिस्टरी ऑफ द मराठाज', पा. ८७ खाफीखान. ii १७२, १७५; मा-मासीरे-आलमगिरी ४५.

२. राज्यारोहणाचा (औरंगजेबाच्या) ६ वा वाढदिवस रमजान १, १०७३ हि. एप्रिल ५, १६६३ ला होता.

धावला. परंतु शिवाजीच्या माणसांनी दिसतील त्यांची कत्तल सुरू केल्यामुळे तो त्यांच्या तलवारीला बळी पडला.[१] हा प्रकार पाहून शत्रू नवाब शाइस्ताखानाला ठार मारू इच्छितात, हे अंतःपुरातील स्त्रियांनी ओळखिले. त्यांनी शाइस्ताखान मारला गेला असा खोटा आक्रोश सुरू केला आणि अंतःपुरातील दिवे मालवून टाकले. हेतु हा की शाइस्ताखान हा शत्रूच्या नजरेस पडता कामा नये.

शत्रु सैनिकांना काही दिसेना. ते इकडून तिकडे धावाधाव करू लागले. या धावपळीत त्यांची आठ माणसे एका हौदात पडली. शाइस्ताखान हा कोणी आपल्यावर हल्ला करण्यास आला तर त्याचा प्रतिकार करण्यासाठी हातात भाला घेऊन उभा राहिला. तो शत्रुसैनिकांच्या दृष्टीस पडला. झटापटीत त्याने एका सैनिकाला ठार मारले. पण दुसऱ्या सैनिकाने त्याच्यावर तलवारीचा वार केला. त्यामुळे शाइस्ताखानाची तर्जनी छाटली गेली आणि त्याचा भाला मोडला गेला. अंतःपुरातील बायका शाइस्ताखान मेला, असे ओरडून म्हणू लागल्या. ते ऐकून शत्रुसैनिकांना आपला बेत पुरा झाला असे वाटले; आणि ते आपल्या तळाकडे परत गेले. शाइस्ताखानाच्या छावणीत त्या रात्री जो गोंधळ उडाला त्याची कल्पना करण्याचे काम मी वाचकांवरच सोपवितो. छावणीत प्रत्येकाला असे वाटू लागले की शिवाजी छावणीत असून सतत सर्वांची कत्तल करीत सुटला आहे. शाइस्ताखानाला जखमा झाल्या होत्या. त्याच्यावर उपचार करण्यासाठी एखाद्या हकीमाला बोलावण्याचीही सोय नव्हती न जाणो हकीमाच्या ऐवजी भलताच मनुष्य येऊन पोहचायचा. यामुळे त्या रात्री शाइस्ताखानाच्या जखमांवर काही इलाज होऊ शकला नाही. त्यामुळे शाइस्ताखानाचे आणखी हाल झाले.

या विश्वासघाताची बातमी औरंगजेबाकडे पोहचली. त्यावेळी तो काश्मीरमध्ये होता. त्याने शाइस्ताखानाची बंगालचा सुभेदार म्हणून नेमणूक करून त्याला बंगालकडे जाण्याचा हुकूम केला. ही जागा मीर जुमलाच्या मृत्युमुळे रिकामी झालेली

१ मनूचीची ही माहिती चुकीची आहे. शाइस्ताखानाच्या मृत्यु पावलेल्या मुलाचे नाव अबुलफतहखान असे होते. त्याचा थोरला मुलगा बुझुर्ग उमेदखान ८ रजब ११० हि (फेब्रु. २२, १६९५) ला अलाहाबादेचा गव्हर्नर असताना मरण पावला. मा-आसीरे-उल-उमरा iii ६९०-७०२ मध्ये शाइस्ताखानाच्या कार्याची माहिती दिलेली आहे. तो १०६९ हि. (सन १६५९) मध्ये मीरजुमलाच्या जागी आला. पावसाळ्यात त्याने पुण्यास मुक्काम केला. परंतु तेथून बाहेर पडून चाकणला वेढा देण्यास गेला. यासाठी त्याला ५६ दिवस लागले. त्याने ऑक्टोबर १३, १६६१ ला जिंकून घेतले. नंतर शाइस्ताखान पुण्यास परतला. शिवाजीचा हल्ला एप्रिल ९, १६६३ ला झाला. अबुलफातहखान मारला गेला. याचा वृत्तांत औरंगजेबाला काश्मीरमध्ये मे ८, १६६३ ला मिळाला. बादशहा फार दुःखी झाला. शाइस्ताखान हा निष्काळजी राहिला असे त्यास वाटले. मे १३, १६६३ ला राजपुत्र मुअज्जम हा दक्षिणेकडे शाइस्ताखानाच्या जागी घेण्याकरिता काश्मीरहून निघाला. (आलमगीर नामा. ८१९ शाइस्ताखानाची तर्जनी तुटली (मा.-आसीर-आलमः गिरीपें ४५).

होती. शाइस्ताखानाने औरंगजेबाला पुढीलप्रमाणे अर्ज केला, "आपण मला दक्षिणेतच राहू द्यावे. शिवाजीने माझ्यावर दग्याने हल्ला करून माझ्या मुलाला ठार मारले आणि माझे बोट कापले. मी शिवाजीचे सैन्य नष्ट करून त्याला ठार मारीन, अगर या कामात मी स्वतः आपले प्राण गमावीन." औरंगजेबाने शाइस्ताखानाला तावडतोब बंगालकडे रवाना होण्याची पुनः आज्ञा केली. शाइस्ताखानाला शिवाजीचा सूड उगवायचा होता. आणि आपण शूर व हिमतीचे म्हणून लौकिक मिळवायचा होता. त्याने बादशहाला पुनः विनंती केली की आपण मला दक्षिणेत राहू द्या. शिवाजी नष्ट होईपर्यंतच्या मोहिमेचा खर्च मी स्वतः करण्यास तयार आहे. शाइस्ताखानाने दरबारात असलेल्या आपल्या मित्रांना पत्रे लिहून आपली बदली थांबवावी असेही प्रयत्न केले.

शाईस्ताखानाच्या मित्रांनी त्याच्या वतीने औरंगजेबापाशी शक्य तितकी खटपट केली. पण औरंगजेबाने आपला निर्धार बदलला नाही. शाइस्ताखानाबद्दल तो कडकपणे पुढीलप्रमाणे म्हणाला, "शाइस्ताखान हा क्षुब्ध झाला आहे. क्षोभात असलेला माणूस विवेकाने वागेल हे संभवत नाही[1]. शिवाजीविरुद्ध मोहिम चालविण्यासाठी शाइस्ताखान हा दक्षिणेतच यापुढे राहिला तर त्याच्या (मोगल) सैन्याची वाताहात झाल्याशिवाय राहणार नाही." औरंगजेबाने शाइस्ताखानाला लिहिले की, "आता काही वाद न घालता तुम्ही तावडतोब बंगालकडे रवाना व्हा." शाइस्ताखानाला स्वतःच्या मर्जीविरुद्ध बंगालच्या सुभ्याला जावे लागले, त्याची हकीकत अशी आहे. शाइस्ताखानाने दक्षिण सोडल्यावर औरंगजेबाने जसवंतसिंगाला दरबारात बोलाविले. पण तो दरबारात न जाता जोधपूरकडे निघून गेला. औरंगजेबाने शाइस्ताखानाच्या जागी महाबतखानाला नेमले आणि शिवाजीविरुद्ध मोहिम चालू करण्यासाठी शक्य तितक्या तातडीने जाण्याची आज्ञा केली. औरंगजेबाने आपला मुलगा शाहा आलम यालाही दक्षिणेकडे पाठविले.

**एक हास्यास्पद घटना :** बादशहा काश्मीरात विश्रांती घेत होता. त्या दिवसांत एक हास्यास्पद घटना घडली. उदेपुरी ही एक जॉर्जियन वंशाची स्त्री होती. तिचा प्रथम विवाह दाराशी झाला होता. ही पुढे औरंगजेबाची अतिशय लाडकी राणी झाली. ती मद्यपान करी. पण त्यात अतिरेक होई. अनेक वेळा ती मद्य घेऊन

१. बादशहाच्या आमदानीच्या ५ व्या वर्षी (१६६२-६३ ला) त्याने महाबतखानाची काबूलहून गुजरातला बदली केली होती. आमदानीच्या ११ व्या वर्षी (१६६८-६९ला) त्याच्या (महाबतखानाच्या) दक्षिणेकडील नेमणुकीची सरकारी नोंद नाही. पण शिवाजीच्या सुरतवरील स्वारीनंतर, सुरतजवळ महाबतखानाची शिवाजीशी लढाई झाली. सुरत हे गुजरात प्रांतात आहे. (शाह. मा-आसीर-उल-उमरा iii. ५९०, ५९२ आणि मा-आसीर-आलमगिरी ७१). राजपुत्र मुअज्जम (शाहा आलम) हा यावेळी २१ वर्षांचा होता.

बेहोष होऊन जाई. औरंगजेबाच्या तिच्यावरील प्रेमाबद्दल त्याच्या इतर राण्या व रखेल्या तिचा मत्सर करीत. एकदा ती मद्य घेऊन बेहोष झाली असता, सर्व राण्या व रखेल्या मिळून हसत खेळत बादशहाकडे गेल्या. त्यांच्या अशा एकत्र येण्याने औरंगजेबाला आनंद झाला. तेथील वातावरणात आणखी मौज आणण्याकरिता बादशहाने उदेपुरी बेगमला बोलाऊ पाठविले. उदेपुरी बेगमच्या दासीने, बेगमची प्रकृती बरी नाही असे सांगितले.

हे ऐकून काहीतरी बिघडले आहे असा त्याला संशय यावा म्हणून, त्या सर्वजणी मोठ्याने हसल्या. त्याने पुनः बोलावणे पाठविले पण ती आली नाही. शेवटी बादशहा स्वतः तिच्याकडे महालात गेला. त्यावेळच्या उदेपुरी बेगमचा अवतार काय वर्णावा ! ती दारूच्या नशेत अस्ताव्यस्त पडली होती. तिचे केस मोकळे सुटले होते. औरंगजेबाने तिच्याजवळ बसून तिला, स्पर्श केला. ती आपली दासी असेल असे समजून उदेपुरी बेगमने, "आणखी मद्य आण" असे म्हटले. उदेपुरी बेगमच्या तोंडाला मद्याचा वास आणि यावर तिची आणखी मद्याची मागणी. औरंगजेबाला मनःस्ताप झाला. खिन्नपणे खाली मान घालून तो तिच्या दालनातून बाहेर पडला. या घटनेमुळे उदेपुरी बेगमवरील बादशहाचे प्रेम कमी झाले असे नाही. पण कुणावर तरी राग काढावा म्हणून अंतःपुराच्या दरवाज्यावर नीट देखरेख का ठेवीत नाही, असे म्हणून बादशहाने पहारेकऱ्यांना फटके खाण्यास लावले.

काश्मीरमध्ये असताना शिकारीस जाणे हे औरंगजेबाचे करमणुकीचे साधन होते. याची त्याला फार आवड होती. एकदा असे घडले की तो शिकारीला गेला असताना थकून झाडाखाली बसला. त्यावेळी त्याच्याबरोबर एकच शिकारी-सेवक होता. हा त्याचा मोठा आवडता शिकारी होता. तो पूर्वी दाराच्या पदरी होता. औरंगजेबाने या आपल्या शिकारी-सेवकाबरोबर झाडाखाली बसला असताना अनेक गोष्टींवर गप्पा केल्या. यामुळे या सेवकाला धीटपणा आला. त्याने बोलण्याच्या ओघात विचारले, "दाराचे डोके कापावे, अशी आपण का बरे आज्ञा केलीत?" सेवकाच्या या प्रश्नाने औरंगजेब मनातून थोडासा बावरला. तो म्हणाला "ते दाराचे दुर्दैव म्हटले पाहिजे." असे बोलून औरंगजेब लागलीच उठला आणि आपल्या वाड्याकडे निघाला. वाड्यात पोहचल्यावर त्याने त्या शिकारी-सेवकाला यापुढे माझ्यासमोर मुळीच येऊ देऊ नका, अशी आज्ञा केली. औरंगजेबाने जे अन्यायाचे कृत्य (दाराच्या शिरच्छेदाचे) केले, यावर हा शिकारी मनुष्य दिसला की हा आपली निंदा करील असे त्याला वाटत होते.

**औरंगजेब काश्मीरहून परत येतो :** आपण हिंदुस्तानबाहेर राहणे फारसे उपयुक्त नाही, शिवाय आपली प्रकृतिही आता चांगली सुधारली आहे, असे पाहून औरंगजेबाने दिल्लीस परतण्याचे ठरविले. सावकाशीने कूच करीत १०३ दिवसांत तो

दिल्लीस परत आला. परत आल्यावर त्याला कळले की शहाजहान एका युरोपियन डॉक्टराच्या शोधात होता. आपल्या बापाला विषप्रयोग करून मारण्याची आता वेळ आली आहे असे औरंगजेबाला वाटले. शहाजहानच्या पदरी एक युरोपियन डॉक्टर होता. जो आता औरंगजेबाच्या नोकरीत आला होता. त्यालाच शहाजहानकडे पाठवून त्या डॉक्टरच्या मार्फतीने आपला कार्यभाग साधावा असे औरंगजेबाने ठरविले. हा युरोपियन डॉक्टर आपल्या पदरी होता हे आठवून शहाजहान त्याचा संशय घेणार नाही, असे औरंगजेबाला वाटले. पण शहाजहानला संशय आलाच. त्याने औरंगजेबाने पाठविलेल्या युरोपियन डॉक्टराकडून स्वतःवर उपचार करून घेण्याचे नाकारले. मी मोगल राज्यात असताना या युरोपियन डॉक्टरने माझा अनेक वेळा अपमान केला होता. मी त्याचे नाव देऊ शकेन पण मुद्दाम देत नाही. मेलेल्या-बद्दल निर्णय परमेश्वरच करील. कुणाला वाटेल की हा युरोपियन डॉक्टर म्हणजे बर्नियर होय असे मी सुचवित आहे. पण तो बर्नियर नव्हता हे मी स्पष्टपणे सांगू इच्छितो. बर्नियर हा माझा मोठा मित्र होता. मोगल राज्यात असताना बर्नियरने डॉक्टरी व्यवसाय केला नाही. मोगल दरबारात दानिशमंदखान नावाचा एक अतिशय विद्वान असा इराणी वंशाचा सरदार होता. त्याच्या तैनातीत बर्नियर हा गणितज्ञ म्हणून नाव पावला होता. मी वर उल्लेखिलेल्या युरोपियन डॉक्टरचे नाव दिले नाही. शहाजहानवर विषप्रयोग करण्यात या डॉक्टरचा औरंगजेबाला उपयोग झाला नाही. पण खलीलुल्लाखानाचा मृत्यू घडवून आणण्यात औरंगजेबाने त्याचा उपयोग करून घेतला होता. दारा आणि औरंगजेब यांची पहिली लढाई झाली, तेंव्हा खलीलुल्लाखानाने दाराचा विश्वासघात केला होता. त्याने अनेक प्रसंगी औरंगजेबाला साह्य केले होते. या खलीलुल्लाखानाला त्याच्या बायकोने जोड्याने बडविले होते. मी भक्करच्या किल्ल्यात असताना किल्लेदार ख्वाजा बसंत याच्या आज्ञेने तोफेत जुने जोडे आणि इतर रद्दी भरून खलीलुल्लाखानाच्या तंबूच्या दिशेने तोफ उडविली होती हे मागे आलेलेच आहे. या विश्वासघातकी माणसाचा आता औरंगजेबाला कंटाळा आला होता. त्याने त्याला लाहोरहून बदलून दरबारात बोलाविले. त्याच्या जागी लाहोरच्या सुभेदारीवर अलीमर्दानखान याचा मुलगा इब्राहीमखान[1] याची नेमणूक करण्यात आली. खलीलुल्लाखान हा दरबारात आल्यावर बादशहाने त्याचा परकरणी बराच मानसन्मान केला. पण आतून त्याने वर उल्लेखिलेल्या युरोपियन डॉक्टरला खलीलुल्लाखानावर विषप्रयोग करून ठार मारण्याची आज्ञा केली. त्या डॉक्टरवर खलीलुल्लाखानाचाही विश्वास होता. डॉक्टरने खलीलुल्लाखानाला विष दिले. विषाचा प्रभाव हळू हळू पडू लागला. खलीलुल्लाखानाला बरेच दिवस खूप वेदना होत होत्या. तो मेला तेव्हा त्याचे ओठ, हात आणि पाय हे कोळशाप्रमाणे काळे ठिक्कर पडले होते.

१. अलिमर्दानखान (मृत्यु १०६७ हि. १६५६–५७) याचा मुलगा इब्राहिमखान हा ११२२ हि. (१७१०–११) त मरण पावला.

या कामगिरीबद्दल औरंगजेबाने त्या युरोपियन डॉक्टरला मनसब दिली आणि त्याचा पगार दुपटीने वाढविला.

**इथिओपियाचा वकील :** काश्मीरहून औरंगजेब दिल्लीला परतण्यापूर्वी त्याच्या दरबारात इथिओपिया, मक्का आणि बसरा येथील वकील राज्यारोहणाबद्दल त्याचे अभिनंदन करण्यासाठी आले. इथिओपियाचे वकील हे खरे वकील नव्हतेच. मुराद नावाचा एक आर्मिनियन आणि एक अरब व्यापारी यांनी हे कारस्थान केले होते. त्यांनी काही भेटी आपल्याबरोबर आणल्या होत्या. ते सुरतेस असताना शिवाजीने सुरत[1] लुटले. (जानेवारी १६६४) त्याच वेळेस हे तथाकथित वकील नागवले गेले, या दुर्दशेचा त्यांना लाभ मिळून सुरतच्या अधिकाऱ्याने त्यांना खरे वकील समजून दिल्लीस पाठविले. मोगल दरबारातील विद्वान तत्त्वज्ञ दानिशमंदखान याच्यामार्फत ते औरंगजेबासमोर रुजू झाले. दानिशमंदखानाच्या पदरी असलेल्या बर्नियरने त्यांना आश्रय दिला होता. हे वकील खरे होते असे बर्नियरने लिहिले आहे, ते बरोबर नाही. खरी हकीकत मला भोंदू वकील अर्मिनियन मुराद याजकडून कळली. औरंगजेबाने त्यांना इथिओपियाच्या बादशहाकरिता देण्यासाठी बऱ्याच वस्तू दिल्या. त्याशिवाय या भोंदूनाही बक्षीसे मिळाली.[2] मिळालेल्या पैशातून या भोंदू वकीलांनी व्यापार करून बराच फायदा कमावला.

**मक्केच्या ग्रँड शरीफकडील वकील :** औरंगजेबाने आपल्या राज्यारोहणाच्यावेळी पाठविलेला पैसा मक्केच्या ग्रँड शरीफने स्वीकारला नव्हता हे मागेच सांगितले आहे. पण मग ग्रँड शरीफला या गोष्टीचा पश्चात्ताप झाला. आपल्याला ती रक्कम मिळावी म्हणून त्याने आपला एक वकील पाठविला. औरंगजेबाचे अभिनंदन करून, मुहम्मद पैगंबराची कबर झाडण्याकरिता वापरली जाणारी एक केरसुणी व तेथील थोडी धूळ, ही त्यास देण्याचे वकीलास सांगितले होते. औरंगजेबाने ही देणगी मोठ्या भक्तीभावाने स्वीकारली. त्याने पैगंबराची आणि केरसुणीची अतिशय स्तुती केली. आणि अशा पवित्र स्थळाचा झाडूवाला म्हणून आपल्याला मान मिळू शकला नाही, याबद्दल आपल्याला अतिशय खंत वाटते असे भासविले. राज्यावर आल्यानंतर औरंगजेबाने पाठविलेली रक्कम मक्केच्या ग्रँड शरीफने नाकारली होती, तिच्याबद्दल औरंगजेब काही बोलला नाही. शरीफनी रक्कम नाकारली त्यामुळे तिचा उपयोग चांगल्या कामास

१. ग्रँट डफच्या 'हिस्टरी ऑफ दी मराठाज' मध्ये पान ८१ वर शिवाजीची सुरतवर स्वारी जानेवारी ५, १६६४ ला झाली असे नमूद केले आहे.

२. अधिकृत वृत्तांत असा आहे की, औरंगजेबाच्या अमदानीच्या ८ व्या वर्षी १०७५ हि. (मार्च १९, १६६५ इ.स.) मिर्झा कार्मील हा हबशाच्या राजाचा दूत आणि सैयद अबदुल्ला राजाचा दूत, असे दोघे पत्रे व नजराणे घेऊन बादशहासमोर आले. त्यांना खिलती व पैशाच्या देणग्या मिळाल्या. येमनच्या इमाम इस्माइल या राजाने पाठविलेले नऊ अरब घोडे बादशहाला नजर केले. निरोपाचा समारंभ १७ शव्वाल १०७५ हि. (मे ४, १६६५) ला झाला (मा-असीरे-आलमगिरी पा. ४९-५०).

करण्यात आला. ही गोष्ट पैगंबरांना इष्ट वाटली असली पाहिजे असे शरीफच्या वकीलाला कळविण्याचे त्याने (औरंगजेबाने) दानिशमंदखानास कळविले. त्यानंतर मात्र काही दिवसांनी शरीफच्या वकीलाला निरोप देण्यात आला. भेटी कमी[1] मान जास्त अशा परिस्थितीत त्याला (वकीलाला) परत जावे लागले.

**बसऱ्याचा वकील :** इराक प्रांतातील बसरा येथील अधिकाऱ्याने औरंगजेबाचे अभिनंदन करण्यासाठी आपले वकील पाठविले. वकीलाच्या बरोबर बरेच उत्तम असे अरबी घोडे पाठविण्यात आले होते. बसऱ्याच्या अधिकाऱ्याचा आणखी एक उद्देश होता. वकीलांना स्वतःजवळच्या मालाच्या आयात-निर्यातीवर कर द्यावा लागत नसे. तो कर चुकवावा आणि अरबी घोडे, उत्तम कापड आणि इतर माल यांची खरेदी-विक्री जकातीशिवाय करण्यास निमित्त मिळावे म्हणून हे वकील पाठविण्यात आले होते. वकीलांना निरोप देतेवेळी बादशहाने त्यांचा खर्च दिला. या वकीलांनी व्यापारासाठी बरोबर आणलेले अरबी घोडे चांगल्या किंमतीवर बादशहाने विकत घेतले. बसऱ्याच्या या वकीलातीचा दिल्लीत काही विशेष गौरव झाला नाही.

**औरंगजेब शहाजहानशी गोडीगुलाबीने वागतो :** एका युरोपियन वैद्याकडून शहाजहानला विष देण्याचा औरंगजेबाने प्रयत्न केला ही गोष्ट गुप्त राहिली नाही. लोक त्याची चर्चा करत. त्यांना उलट असे वाटे की, आता औरंगजेबाला कोणताच प्रतिस्पर्धी राहिलेला नव्हता. तेव्हा त्याने शहाजहानची क्षमा मागावी, त्याचा लोभ संपादन करावा, कारण शहाजहान कसाही झाला तरी त्याचा जन्मदाता पिता होता. त्याचा इतका तिरस्कार करण्याचे औरंगजेबास कारण नव्हते. म्हणून लोक उघडपणे त्याच्याविरुद्ध बोलू लागले होते. ते असेही म्हणू लागले की औरंगजेबाच्या या निष्ठुरपणाबद्दल परमेश्वर त्याला शिक्षा करीत आहे. आणि शिवाजीने ती शिक्षा द्यावी म्हणूनच परमेश्वर शिवाजीला बळ देत आहे.

जुना असंतोष पुनः दिसून येऊ लागला; तशी बंड होते की काय अशी औरंगजेबाला भीति वाटू लागली. शहाजहानने आपल्याला क्षमा करावी असा त्याने प्रयत्न केला. तो आपल्या बापाला मोठी आर्जवाची पत्रे लिहून क्षमेची याचना करू लागला. औरंगजेबाचा दुष्ट स्वभाव पुरेसा माहित असल्यामुळे शहाजहानने त्या

१. यंद शरीफच्या वकील—या बाबतीत बर्नियर काय म्हणतो, या करिता "ट्रॅव्हल्स" पान ११३ पाहा. अधिकृत माहिती अशी आहे, ती मा-आसीर-ए आलमगिरी ४९ मध्ये दिली आहे. औरंगजेबाच्या आमदानीच्या ४थ्या वर्षी (१६६२-६३) हाजी अहमदसैद याला ६,६०,००० रुपये देऊन मक्केला पाठविले होते. तो मार्च १९, १६६५ ला १४ घोडे घेऊन परत आला. आणि आमदानीच्या ८ व्या वर्षी मक्केचा दूत (वकील) याह्या हा दरबारात बादशहाला फक्त भेटून आला. (काही देणगी मिळाली नाही).

पत्राकडे लक्ष दिले नाही. पण औरंगजेबाने आपले प्रयत्न थांबविले नाहीत. पत्रांच्या बरोबर तो शिकारी मृग, बहिरी ससाणे, घोडे इत्यादी भेटी पाठवू लागला. राज्यातील निरनिराळ्या प्रकरणाबद्दल तो बापाचा सल्ला मागू लागला. जे झाले त्याला इलाज नाही; मी आज्ञाधारक मुलगा म्हणून वागण्यास तयार आहे. पण आपण प्रथम मला क्षमा केली पाहिजे. असे तो आपल्या बापास लिहू लागला. शहाजहानने वरकरणी थोडेसे समाधान झाल्याचे दाखविले तरी त्याच्या पत्रांतून नापसंती व्यक्त होत होती. त्याच्या पत्रातील मजकूर पुढीलप्रमाणे असे, "तुम्ही ( औरंगजेब ) इतर काही गोष्टी केल्या असतील त्या मी लक्षात घेत नाही. पण माझा लाडका मुलगा दारा याचे डोके कापून माझ्याकडे पाठविले. माझ्या आयुष्याचा जो काही काळ शिल्लक राहिला असेल, तो जगण्यास असह्य करून टाकलात. या क्रौर्याबद्दल मी तुम्हाला क्षमा करू शकणार नाही. इतकेही करून तुम्ही थांबला नाही. मला ठार करण्याचे तुम्ही अनेक वेळा बेत केलेत. माझी लाडकी राणी मुमताज महालाच्या कबरीकडे (ताजमहालाकडे ) पाहणे हा माझा विरंगुळा होता. त्यात मला दुःख व्हावे म्हणून तुम्ही दाराचे डोके ताजमहालमध्ये पुरण्यास पाठविले. अशा दुष्कृत्याबद्दल मी तुम्हाला कधीच क्षमा करू शकणार नाही याची तुम्ही खात्री बाळगा." असे असूनही शहाजहानने आपला राग थोडा कमी झाला आहे, हे दाखविण्यासाठी औरंगजेबाकडे काही रत्ने पाठविली. औरंगजेबाने तेवढ्यावरच समाधान मानून घेतले. त्याला वाटले की, अशामुळे आपल्या बापाने आपल्याला क्षमा केली, असे लोकांना वाटेल.

**चितगाव घेतले :** इथिओपियन, मक्का आणि बासरा इत्यादी ठिकाणचे वकील निघून गेल्यावर बंगालचा सुभेदार शाइस्ताखान याने तीनशे गाड्या भरून चांदीची नाणी व पन्नास गाड्या भरून सोन्याची नाणी दिल्लीस पाठविली. हा पैसा मीर जुमलाने गोळा केलेला बंगालचा महसूल होता. मग औरंगजेबाने चितगाव बंदरात राहणाऱ्या चाच्यांचा उपद्रव नाहीसा करण्याची शाइस्ताखानास आज्ञा केली. ब्रह्मदेशात असलेले आरकानचे राज्य जिंकून घ्यावे अशी मोगलांची इच्छा असे. त्यांचा प्रतिकार करण्यासाठी आरकानच्या राजाने चितगाव येथे पोर्तुगीज आणि इतर चाचे यांना ठेवले होते. यांचा मोठा उपद्रव बंगाल प्रांताला होत असे. शाइस्ताखानाने या चाच्यांचा मोड करून चितगाव बंदर जिंकून घेतले आणि ते मोगल साम्राज्याला जोडले.[१]

१. १०७७ हि. वर्षाच्या शाबान महिन्याच्या २८ तारखेनंतर, औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या ९ व्या वर्षी ( २६ फेब्रुवारी १६६७) बातमी आली. अमीर उमराव शाइस्ताखान यांच्या प्रयत्नाने चाटगावचा किल्ला तीन दिवसात जिंकून घेण्यात आला. चाटगावचे नाव इस्लामाबाद ठेवण्यात आले. शाइस्ताखान त्याचा मुलगा बुजुर्ग उमेदखान आणि इतर सरदार यांना बक्षिसे देण्यात आली (मा-आसीर-आलमगिरी).

**बादशहा दिल्लीच्या वेशी रुंद करतो :** औरंगजेब बऱ्याच आपत्तीतून आता मुक्त झाला होता. फक्त शिवाजीवरची मोहिम चालू होती. या मोहिमेला औरंगजेब विशेष महत्त्व देत नव्हता. लोकोपयोगी काही कामे करावी असे औरंगजेबाला वाटू लागले. लाहोरकडे जाणारा दिल्ली शहराचा दरवाजा हा फार अरुंद होता. लाहोरच्या दिशेने येणारे धान्य आणि इतर सामुग्री ही मुबलक असायची. या अरुंद प्रवेश-द्वारातून मालाची आयात करणे मोठे अडचणीचे होई. पुष्कळवेळा घोडेस्वारांना प्रवेशद्वारापाशी बराच वेळ अडकून रहावे लागे. कित्येकवेळा बादशहाला शिकारी-साठी जाताना प्रवेशद्वारातील गर्दीमुळे परतावे लागत होते. औरंगजेबाने त्या ठिकाणी तीन प्रवेशद्वारे बनविण्याची आज्ञा केली. यासाठी अनेक वाडे पाडावे लागले. पण औरंगजेबाने काही अनमान न करता वाड्यांची किंमत पुरेपूर दिली.

नदीच्या आक्रमणापासून लाहोर शहराचे रक्षण करण्यासाठी, याच सुमारास बादशहाने नदीच्या काठी बुरुज असलेली भिंत बांधून घेतली. ही भिंत एक-दीड लीग (२-३ मैल) लांब होती. यावेळी शिवाजी दक्षिण सुभ्यात चहुकडे लुटालूट करून धुमाकूळ माजवीत होता. त्याने या सुमारास औरंगाबाद आणि बऱ्हाणपूर ही शहरे लुटली होती.[1] औरंगजेबाने वरील शहरांभोवती तटबंदी बांधण्याची आज्ञा केली. असे करताना लोकांचे नुकसान होणार नाही याची काळजी घेण्यास बजावले.

औरंगजेबाच्या धार्मिक समजुतीबद्दल ऐकलेली एक कथा येथे देतो. एकदा उज्जयनी शहराजवळ हंड्याएवढी एक उल्का आकाशातून पडली. तेथील सुभेदाराने ती उकरून काढली आणि औरंगजेबाला खुष करण्याकरिता दिल्लीला त्याच्याकडे पाठवून दिली. पण देवाच्या करणीत मानवाने हात घालू नये असा भाव व्यक्त करून त्याने हा चमत्कार पाहण्याचेही नाकारले आणि ती उल्का मूळच्या जागी नेऊन ठेवण्याचा औरंगजेबाने त्यास हुकूम केला.

या वेळेपर्यंत राजपुत्र दारा याचा लोकांना इतका विसर पडला होता की त्याच्याबद्दल आता फारसे बोलतही नसत. औरंगजेबाने लाहोर[2] येथील दाराचा राजवाडा पाडून त्या जागी एक मशीद बांधण्याची आज्ञा केली. ही मशीद बांधण्यास दहा वर्षे लागली. राज्यारोहणानंतर औरंगजेबाने मक्केच्या शरीफाकडे बरीच रक्कम देणगीदाखल पाठविली होती पण शहाजहान हयात असताना तुम्ही गादीवर बसलात कसे ? असा आक्षेप घेऊन शरीफाने ती रक्कम नाकारली होती, हे

१. औरंगाबाद आणि बऱ्हाणपूर ही शहरे शिवाजीने लुटली नाहीत. या शहरांना उपसर्ग झाला तो संभाजीच्या काळात.

२. मा-आसीरे-उल-उमरा-i १५८ मध्ये असे दिले आहे की, यामिन उद्दौला असफखान याने लाहोर येथे एक सुंदर वाडा बांधला. आपल्या मृत्युपत्राने त्याने तो शहाजहानला दिला. शहाजहानने तो पुढे दाराला दिला होता.

पूर्वी सांगितलेच आहे. या रकमेचा विनियोग औरंगजेबाने लाहोरची मशीद बांधण्यास केला.

**राजा जयसिंग शिवाजीवर चाल करून जातो :** शिवाजी विरुद्ध चाललेल्या लढाईकडे सुरवातीला औरंगजेबाने विशेष लक्ष दिले नाही. तरी शिवाजीचे बळ सारखे वाढत आहे. हे त्याच्या नजरेतून सुटले नाही. शिवाजीने मोगलांचे काही किल्ले काबीज केले, तर विजापूरच्या राज्यातील काही गावे घेतली. महाबतखानापाशी बरेच मोठे सैन्य होते. तरी पण तो शिवाजीच्या पराक्रमाला आळा घालू शकला नाही. महाबतखान हा एका किल्ल्याला वेढा घालून बसला असताना शिवाजीने पुनः एकदा हल्ला करून सुरत लुटले.[1]

औरंगजेबाने राजा जयसिंग याला बोलावू पाठविले. जयसिंगाच्या शौर्याची आणि मुत्सद्देगिरीची औरंगजेबाला खात्री होती. तो मोकळेपणाने जयसिंगाला म्हणाला "शिवाजी करीत असलेला माझा अपमान यापुढे सहन करणे मला अशक्य आहे. मी स्वतः त्याच्या विरुद्ध मोहिमेवर जाण्याचे ठरविले आहे. एक मी तरी त्या मोहिमेवर जावे अगर तुम्ही तरी शिवाजीचा मोड करण्याचे अंगावर घ्यावे. या दोन्ही पैकी काहीतरी एक करणे आवश्यक आहे." राजा जयसिंगाने औरंगजेबाला अदबीने म्हटले "आपण विश्रांती घ्यावी. या मोहिमेवर माझी नेमणूक करावी आणि माझा मान वाढवावा. मी शिवाजीचा पराजय करीन, त्याची आक्रमणे बंद पाडीन, आणि आपल्याला हवे असेल तर मी त्याला जिवंत हस्तगत करून आपल्याकडे आणीन. हे सगळे करण्याची माझी तयारी आहे."

हे ऐकून औरंगजेबाने आपल्या अंगातला कबा त्यास घालण्यास दिला. आपल्या गळ्यातील एक मोत्यांचा कंठा काढून तो राजाच्या गळ्यात घातला. नंतर त्याने जयसिंगाला म्हटले "या मोहिमेत तुमच्या हाताखाली काम करणारे सेनाधिकारी यांची तुम्हीच निवड करा. पण हे काम त्वरित झाले पाहिजे. कारण तडफ दाखविल्यानेच कामे उत्तम पार पडतात." जयसिंग हा दरबारातून आला. त्याने आपल्या राज्यातून घोडदळ आणि साठ लाख रुपये मागविले. औरंगजेबाने[2] या मोहिमेसाठी त्याला जी रकम दिली, तिला जोडून हे वरील ६० लाख रुपये होते. दुय्यम सेनापती म्हणून जयसिंगाने दिलेरखानाची निवड केली. दिलेरखानाने, औरंगजेबाने केलेल्या सर्व मोठ्या युद्धात भाग घेतला होता. या मोहिमेत जयसिंगाच्या बरोबर

१. सुरतेची ही दुसरी लूट १६७० मधली होय आणि जयसिंगाची मोहीम ही १६६५ मधली होती, हे लक्षात ठेवले पाहिजे. मनूची आठवणीवरून लिहित असल्यामुळे त्याने दिलेला कालानुक्रम अनेक ठिकाणी पुढे मागे झाला आहे.

२. जयसिंगाची दक्षिणेतील नेमणूक बादशहाच्या अमदानीच्या ७ व्या वर्षात केली होती. (१०७४ हि. २१ कादाहनंतर. जून १६, १६६४) (मासीरे-आलमगिरी पा. ४८. ओ. १६)

दाऊदखान हाही होता. तो पूर्वी पटण्याचा सुभेदार असून यावेळी बंगालचा हंगामी सुभेदार होता. राजा जयसिंगाच्या सैन्यात अनेक राजे व सरदारही होते.

बादशहा काश्मीरहून दिल्लीला आला होता. मी अनेक वेळा राजा जयसिंगाला भेटण्यास गेलो. त्याची माझ्यावर मर्जी बसली. त्याचा मुलगा कीरतसिंग याची माझी ओळख होती. त्याला मी हॉम्ब्र हा खेळ शिकविला. तो खेळ मला शिकवा असे राजा जयसिंगाने मला सांगितले. पुष्कळ वेळा मी, कीरतसिंग[1] आणि जयसिंग हे तिघे मिळून हा खेळ खेळत होतो. त्यात मी जयसिंगाकडून काही पैसेही जिंकून घेतले. या सुमारास राजा जयसिंगाने मला म्हटले "मला तुमची आवश्यकता आहे. मी फार मोठी मोहिम हातात घेतली आहे. त्यात तुम्ही सामिल व्हावे अशी माझी इच्छा आहे. मी तुम्हाला माझ्या तोफखान्याचा मुख्य करीन. तुम्ही उत्तम शिपाई असलेले युरोपियन कोणी असतील त्यांना शोध घ्या. मी तुमच्याकडे इतर कामेही सोपविन. सध्या मी रोज दहा रुपये असा तुमचा पगार ठरवितो". मला (मनुचीला) नाही म्हणता येईना. जयसिंगाच्या शब्दावर माझा फार विश्वास होता. त्यावेळी त्याचे मन मोडावे अशीही माझी इच्छा नव्हती. मी वैद्यकीचा अभ्यास करीत असलो तरी मी वैद्य आहे, असे जगजाहिर करण्याची अद्याप हिम्मत होत नव्हती. जयसिंगाने मला शिरोप्याची उंची वस्त्रे, एक उत्तम घोडा, आणि माझ्या इतर लवाजम्यासाठी मुबलक रक्कम दिली.

औरंगजेबाने महाबतखानाला गुजरातेत परत जाण्याची आज्ञा केली आणि आपला दूधभाऊ बहादूरखान[2] याला दरबारात बोलावू पाठविले. या सुमारास एक मनोरंजक घटना घडली. बहादूरखान हा औरंगजेबाचा दूधभाऊ होता. वास्तविक पाहता दूधभाऊ हे नाते अगदी क्षुल्लक आहे. राजपुत्रांना दूध पाजण्यासाठी ठेवलेल्या अगदी साधारण घराण्यातील बायकांची ही मुले. बहादूरखान हा औरंगजेबाच्या दाईचा मुलगा. औरंगजेबामुळे तो क्षुल्लक स्थितीतून सेनाधिकाऱ्याच्या पदाला पोहचला होता. यामुळे तो अत्यंत गर्विष्ठ व फुशारकी मारणारा बनला होता. दिल्लीहून त्याच्याकडे कोणी गेले की तो त्याच्याकडे औरंगजेब बादशहाच्या

१. कीरतसिंग हा राजा जयसिंगाचा दुसरा मुलगा असावा. तो ही २-१०-८४ हि. (जुलै १६७३) त बापाच्या मृत्यूनंतर सहा वर्षांनी मरण पावला. कीरतसिंगाच्या मुलीचे लग्न आलमगीर औरंगजेबाचा वारस, शाहा आलम याच्या दुसऱ्या मुलाबरोबर अजीम-उस-शान याजबरोबर झाले. तिच्या मुलाचे नाव मुहम्मद करीम होते. तो ११२४ हि. (१७१२) त मरण पावला. (मा-आसीरे-उल-उमरा-१५६ आणि तारीख-इ-मुहम्मदी, वर्ष १०८४ हि.)

२. त्यावेळी, त्या भागातील बहादुरखानाच्या (खान जहान, कोकल ताष) सेवेबद्दल पत्ता लागतो. मा-आसीर-उल-उमरा मध्ये ( ८०१) तेथे असे सांगितले आहे की, अमदानीच्या १० व्या वर्षी (१६६७-६८) महाबतखानाच्या जागी त्याला गुजरातचा सुभेदार म्हणून नेमण्यात आले. गुजरातचा प्रांत त्यावेळी सुरतपर्यंत पोहोचला होता.

प्रकृतीनी नोकरी करी. अशा वेळी बादशहाचा उल्लेख योग्य प्रकारे अदबीने न करता तो सलगीने विचारी "माझा भाऊ कसा आहे". या त्याच्या वागणुकीबद्दल महाबतखानाने त्याला धडा शिकविण्याचे ठरविले. महाबतखान गुजरातेत पोहचला. महाबतखानाचा पण एक दुधभाऊ होता. बहादूरखानाची फजिती करण्यासाठी महाबतखानाने पुढील युक्ती केली. त्याने आपल्या दुधभावाला सांगितले की, बहादूरखान माझ्याबरोबर तंबूत बसला असताना, तू उंची वस्त्र घालून आणि डोक्याला शिरपेच लावून, उत्तम असा घोडा डौलवित मोठ्या रूबाबाने आमच्या तंबू समोरून जा. महाबतखानाच्या दुधभावाने तसेच केले. बहादूरखानाने तो रूबाबदार घोडेस्वार (महाबतखानाचा दूधभाऊ) पाहून महाबतखानाला विचारले, "हा कसलेला योद्धा कोण आहे हो?" महाबतखानाने त्या माणसाचे नाव सांगितले नाही. त्याने भोळेपणाचे सोंग आणून थोडक्यात म्हटले "हे दुधभाऊ निर्लज्जच म्हटले पाहिजेत. त्यांना कोणत्याही गोष्टीतील पाचपोच रहात नाही. यांच्या आईचे आम्ही दूध प्यालो म्हणून हे आमचे दुधभाऊ. तेवढ्यावरून आपण ह्यांच्या कुटुंबाचेच आहोत असे हे मूर्ख समजतात." बहादूरखानाने महाबतखानाचा टोमणा ओळखला, पण तसे त्याने दाखविले नाही. वरील घटनेने बहादूरखानाची वागणूक बदलली म्हणता काय? मुळीच नाही.

जयसिंगबरोबरच्या प्रवासात मी (मनूची) इकडील लोकांच्यासारखा पोषाख करीत असे. मुसलमान लोक आपल्या झग्याचे बंद उजवीकडे बांधतात. हिंदु डावीकडे बांधतात. मुसलमान दाढी ठेवतात. रजपूत ठेवीत नसत. मी रजपूतांच्या पद्धतीने फक्त मिशा ठेवी. रजपूत कानात मोती घालतात. तसे मी करीत नसे. माझा धड रजपूत ना धड मुसलमान असा हा वेष पाहून रजपूत अधिकाऱ्यांना आश्चर्य वाटे. माझा धर्म कोणता असे ते मला विचारीत. मी ख्रिस्ती आहे, म्हटल्यावर मी मुसलमान ख्रिस्ती कि हिंदु ख्रिस्ती असे ते विचारीत. हिंदु आणि मुसलमान या दोन धर्मांशिवाय इतर धर्म मानीत नाहीत. मी त्यांना या संधीचा फायदा घेऊन आपल्या धर्माविषयी थोडी माहिती दिली.

राजा जयसिंग याने मला एकदा विचारले की, युरोपमध्ये सैन्य वगैरे आहेत का? आणि लढाया होतात का? मी त्याला सांगितले की आम्ही फिरंगी येथे किती शौर्याने लढतो हे तुम्हाला माहितच आहे. युरोपमध्ये युद्ध म्हणजे काय आणि, ते कसे लढले जाते, याची सर्वांना माहिती आहे आणि खुष्कीवर आणि समुद्रावर अशी दोन्ही प्रकारची युद्धे करतो. हे सांगून मी त्याला युरोपातील युद्ध पद्धतीची माहिती दिली. खुष्कीवरील युद्धासंबंधी बोलतांना मी त्याला सांगितले की, पायदळ शिपायांची पथके आमच्याकडे असतात. त्यांची हत्यारे म्हणजे बंदुकी व तलवारी

ही होत. घोडेस्वारांच्या पथकांत करावीन, पिस्तुलें आणि तलवारी ही हत्यारे असतात. शत्रूचे घोडदळ आपल्या सैन्यात घुसू नये म्हणून पायदळ शिपायांच्या रांगा आघाडीला उभ्या असतात. लढाया होतात त्या मुख्यतः पायदळ पथकांत. जेथे आवश्यक असेल तेथे घोडदळ हल्ला करून शत्रूला मागे रेटते. राजा जयसिंगाची समजूत अशी की, आमच्या देशात घोडेच नाहीत. त्यामुळे घोड्यावर बसून युद्ध करणे आम्हास ठाऊक नसावे. यामुळे मी, लर्ड मिकाय, विल्यम व डॉ. मिगार्डीसा अशा चौघांनी आमच्याकडील घोडेस्वार कसे लढतात याचे प्रात्यक्षिक करून दाखविले. या प्रात्यक्षिकामुळे राजा जयसिंगाला युरोपियनाचे महत्व थोडेबहुत पटू लागले.

**शहाजहान बादशहाचा मृत्यु :** राजा जयसिंग बऱ्हाणपूरला आपला तळ ठोकून होता. मागून येणाऱ्या आपल्या सैन्याची तो वाट पाहत होता. याच वेळी त्याला शहाजहानच्या मृत्युची बातमी पोहोचली. ती[१] हकीकत अशी :— शहाजहानची बायको औरंगाबादी बेगम हिच्या पदरी दोन देखण्या दासी होत्या. एकीचे नाव होते आफताब (सूर्य) आणि दुसरीचे नाव माहताब (चंद्र). या दासी शहाजहानला आवडल्या असे पाहून औरंगाबादी बेगमने त्यांना शहाजहानच्या दिमतीस दिले.

एक दिवस शहाजहान आरशासमोर उभा राहून मिशांना पीळ भरत होता. या दोन दासी त्याच्या मागे उभ्या होत्या. त्यांनी एकमेकीकडे पाहून नेत्र संकेत केले. त्यांना जणू काय असे म्हणायचे होते की, हा पाहा म्हातारा आपण तरुण आहोत असे भासविण्याची खटपट करीत आहे. हे संकेत शहाजहानच्या नजरेतून सुटले नाहीत. आपली विलास करण्याची शक्ति कायम रहावी म्हणून त्याने औषधे घेण्यास सुरुवात केली. यातून त्याचा आजार उद्भवला. त्याचे मूत्राशय बिघडले. लघवी बंद पडू लागली. शहाजहान आता वृद्ध झाला होता. तो अशक्त झाला. आपला शेवट जवळ आला असे त्याला वाटू लागले. त्याला जगण्यात रस वाटेना. तो अल्प काळातच मृत्यु पावला (१ फेब्रुवारी १६६६).

शहाजहानचे प्रेत गुपचुपणे ताजमहालात नेऊन पुरण्यात आले. शहाजहानची मुलगी जहानारा बेगम साहेब हिने गरिबगुरीबास वाटण्यासाठी म्हणून दोन हजार आश्रफा पाठविल्या. अधिकाऱ्यांनी असे करण्यास बंदी केली. शहाजहानच्या मृत्युनंतर औरंगजेब आग्र्यास आला[२].

१. शहाजहान २८ रजब १०७६ हि. (१ फेब्रु. १६६६) ला रविवार-सोमवारच्या रात्री मृत्यु पावला. (तारीख मुहम्मदी १०७६)

२. औरंगजेब शाबेगुन सवन ९ (फेब्रु. १४, १६६६) ला आग्र्याला आला. (मा-आसीरे आलमगिरी, ५३,५४).

औरंगजेब किल्ल्यात गेला. तेथे बेगम साहेब त्यास भेटण्यास आली. तिने, औरंगजेबाला क्षमा केल्याबद्दल आपल्या पित्याकडून मिळविलेले नेत्र, शहाजहान-जवळ राहिलेली मौल्यवान रत्ने, ही त्यास दिली. आपल्या भावाची ती एवढीच सेवा करू शकली. शहाजहानच्या दासी आणि त्याच्या पत्न्या नसलेल्या इतर आश्रित स्त्रिया यांना औरंगजेबाने बाहेर लग्न करण्यास मोकळीक दिली. जाहानारा-बेगम (बेगमसाहेब) हिला त्याने आपल्याबरोबर दिल्लीस नेले. त्याने तिला बादशहाबेगम ही पदवी दिली आणि तिला राजवाड्याच्या बाहेर स्वतःच्या वाड्यात राहण्याची परवानगी दिली. आपली दुसरी बहिण रोशनआरा बेगम हिला त्याने अशी परवानगी दिली नव्हती. जाहानाराबेगमचा दर्जा पूर्वीप्रमाणेच थाटाचा ठेवण्यात आला. दारा शुकोची मुलगी जानी बेगम ही जाहानाराची भावजी होती. तिला जाहानारापाशीच ठेवण्यात आले. शहाजहानच्या खालीक दाद हा हत्ती आपल्या मालकाच्या दफनाच्या वेळची गडबड ऐकून अस्वस्थ झाला. त्याचा माहूत त्याजकडे येऊन म्हणाला "तुझा मालक मेला, आता तुझी कोण काळजी घेणार?" हे ऐकून तो आपल्या डोक्यावर माती उडवून घेऊ लागला. ओरडत खाली पडला व मरून गेला.

**औरंगजेब इराणला राजदूत पाठवितो :** शहाजहानच्या मृत्युनंतर काही दिव-सांनी औरंगजेबाने इराणचा बादशहा शाहा अब्बास याच्याकडे आपला राजदूत पाठविण्याचे ठरविले.[1] या वकीलातीचे कारण जाहीर करण्यात आले नाही. पण लोकात बोलवा अशी की, इराणच्या बादशहाबरोबर मैत्री साधून शांतता राखावी असा औरंगजेबाचा हेतु होता. इराणच्या बादशहांनी पूर्वी शहाजहानवर स्वारी केली होती. तसे पुनः घडेल की काय असे औरंगजेबाला वाटत होते. औरंगजेबाच्या मसलती पुढीलप्रमाणे होत्या. विजापूर आणि गोवळकोंडा जिंकून घेणे, चीनवर हल्ला करण्याची योजना आखणे, उदेपूरच्या राण्याचे राज्य हिसकावून घेणे; आणि आरकान आणि पेगू ही राज्ये जिंकून घेणे.

इराणकडे राजदूत म्हणून पाठविण्यासाठी औरंगजेबाने तर्बीयतखान या उझबेक जातीच्या माणसाची निवड केली. तर्बीयतखान हा ऊंच, धिप्पाड, प्रचंड दाढी

1. औरंगजेबाच्या आमदानीच्या ६ व्या वर्षी रबी ११, १०७४ हि. (१२ नोव्हें. १६६३) ला शाहा अब्बासच्या पत्राला उत्तर व ७ लक्ष रुपये किमतीचा मौल्यवान नजराणा देऊन तरबियत खानाला पाठविण्यात आले. शाहाने हे पत्र बुदाक बेग (इराणचा राजदूत) बरोबर पाठविलेले होते. आमदानीच्या ९ व्या वर्षी १०७० हि. रबीच्या मुमाराम (सप्टेंबर १४, १६६६) इराणला राजदूत म्हणून गेलेल्या तरबियत खानाकडून एक अहवाल बादशहाला (औरंगजेब) मिळाला. शाहा अब्बासचे शत्रुत्व, मुर्खपणा, अज्ञान, संतापी, स्वभाव ह्या गोष्टी त्यात दिल्या होत्या. शाहा अब्बासचा खुरासानवर स्वारी करण्याचा इरादा होता, याचा तपशील तरबियत खानाने दरबारला आल्यावर दिला. अकारण झगडा निर्माण करणाऱ्या शहा अब्बासला एक चांगला धडा शिकविण्याचे औरंगजेबाने ठरविले.

असलेला मनुष्य होता. तो सारासार विचार करणारा आणि अतिशय विद्वान मनुष्य होता. इराणच्या बादशहाला देण्यासाठी औरंगजेबाने उंची वस्त्रे, कापडचोपड आणि अनेक हत्ती पाठविले. राजदूताबरोबर लवाजमा देण्यात आला. त्यात तिकडील बातम्या कळविण्यासाठी वाकनवीस आणि खुफीयानवीस (गुप्तपणे बातमी कळविणारा) पाठविले होते. तर्बीयतखानाने आधीच करून ठेवलेल्या व्यवस्थेप्रमाणे तो इस्पाहानला पोहचल्यावर त्याला हिंदुस्तानातून पाठविलेले ताजे आंबे मिळाले. आंबा हे फळ इराणमध्ये होत नाही. हिंदुस्तानातून त्याला विड्याची पानेही पाठविली होती. ही पानेही इराणमध्ये होत नाहीत.

इस्पाहानमध्ये प्रवेश केल्यावर तर्बीयतखानाचे चांगले स्वागत झाले. पण बादशाह आब्बासच्या शाही हुजूरात त्याचा तितकासा मान करण्यात आला नाही. औरंगजेबाने आपल्या राजदूताला कसे वागविले हे शाहा आब्बासला आठवले. त्याने या गोष्टींचा सूड पुढीलप्रमाणे घेतला. दरबारातून शाहा आब्बास हा फेरफटक्यासाठी घोड्यावर बसून बाहेर पडला. त्यावेळी त्याने तर्बीयतखानाला आपल्यापाशी बोलाविले. बादशहा घोड्यावर आणि तर्बीयतखान त्याच्या मागे मागे पायी चालत आहे असे घडले. बादशहाने त्याला, आता विश्रांती घ्या; मी तुम्हाला पुनः बोलावीन असे सांगितले. तर्बीयखानाला हा अपमान गिळावा लागला. इराण सोडून परत जाण्यासाठी निरोप मिळण्यास त्याला एक वर्ष वाट पहावी लागली.

या अवधीत तर्बीयतखान हा अनेकवेळा बादशहाच्या दरबारात गेला. सामान्य इराणी प्रजेला ज्या मानाने वागविले जाई तितकाही मान तर्बीयतखानाला मिळत नसे. त्याचे दरबारात जाणे म्हणजे शाहा आब्बासच्या तिरस्काराला बळी पडणे असेच जणू ठरून गेले. दरबारातील लोक आणि बादशहा हे त्याची आणि औरंगजेबाची टिंगल उडवीत. इराणी लोक हिंदुस्तान्यांचा उल्लेख गुलाम या नावाने करीत. एक दिवस औरंगजेबाच्या दांभिकपणाबद्दल बोलताना शाहा आब्बासाने औरंगजेबाचा उल्लेख गुलाम म्हणून केला. आणखी एकदा त्याने हिंदुस्तानी लोकांचा वर्ण आणि त्याचे आचार विचार यांच्याविषयी आपला तिरस्कार व्यक्त केला.

असा बराच काळ लोटला. एक दिवस, औरंगजेबाने आपल्या वकीलाला कसे वागविले, याबद्दल शाहा आब्बास बोलत होता. आपल्या वकीलाच्या भेटीच्या विचित्र घटनेबद्दल त्याने तक्रार केली. शाहा आब्बास तर्बीयतखानाला म्हणाला, "त्या काळयाने (औरंगजेबाने) एक गोष्ट कधी विसरू नये. इराणच्या बादशहांनीच त्याच्या मोगल घराण्याची स्थापना हिंदुस्तानात केली आहे. इराणच्या बादशहांनी मदत केली नसती तर औरंगजेबाचा पूर्वज हुमायूं याला हिंदुस्थानला बादशहा म्हणून परत जाता आले नसते." तर्बीयतखानाने म्हटले "ही गोष्ट खरी आहे. पण आपल्या पूर्वजांना इराणचे राज्य हे तैमुरलंगाकडून मिळाले याची आठवणही आपण

ठेवावी." हे उत्तर ऐकून शाहा आब्बासची करमणूक झाली. धर्मनिष्ठ मुसलमान मद्य पीत नाहीत हे स्पष्ट आहे. वरीलप्रमाणे उत्तर दिल्याबद्दल शाहा आब्बासने तर्बीयतखानाला जबरदस्तीने मद्य पिण्यास लावले. तर्बीयतखानाचा हा काही थोडा थोडका अपमान नव्हता.

तर्बीयतखानाच्या बरोबर अखबारनवीस, खुफियानवीस हे होते, हे वर सांगितलेच आहे. त्यांच्याबद्दल शाहा आब्बासने तर्बीयतखानाला म्हटले "तुम्ही मूर्ख आणि क्षुल्लक (नगण्य) असला पाहिजे आणि औरंगजेबाचा तुमच्यावर विश्वास नसला पाहिजे; नाहीतर त्याने ही माणसे तुमच्याबरोबर लावून दिली नसती."

"सिक्का जद् दर जहां चु बद्र मुनीर
शाहा औरंगजेब-आलमगीर".

(जगज्जेता औरंगजेब याने सूर्यचंद्राप्रमाणे या विश्वात आपला शिक्का बसविला).

हा शिक्का तर्बीयतखानाने शाहा आब्बासला दिला. या बरोबर औरंगजेबाचे एक चित्रही त्यास दिले. चित्रात औरंगजेब हा घोड्यावर बसला असून एक देवदूत त्याला तलवार भेट देत आहे, असे दृश्य होते. शिक्क्यावर काय लिहिले आहे ते वाचून दाखव, असे बादशहाने तर्बीयतखानाला सांगितले. ती वेळ रात्रीची होती. तर्बीयतखानाजवळ एक मनुष्य मशाल घेऊन उभा होता. तर्बीयतखान हा नाणे हातात घेऊन त्यावरील अक्षरे वाचीत असताना, पूर्वी ठरल्याप्रमाणे मशाल धरणाऱ्याने ठेच लागल्याचे निमित्त केले आणि पडत असल्याचा देखावा करून त्या प्रसंगी त्याने चपळतेने तर्बीयतखानाच्या दाढीला आग लावली. दाढी पेटली; तसे शाही आब्बास म्हणू लागला "विशेष काही नाही, विशेष काही नाही. तुमची दाढी नीट करायला पुष्कळ न्हावी आहेत."[1] त्यानंतर शाहा आब्बासने औरंगजेबाचे चित्र पाहिले. तो औरंगजेबाला शिव्या देऊ लागला आणि त्याच्या दुष्कृत्याचा पाढा वाचू लागला. यानंतर तो औरंगजेबाच्या चित्रावर थुंकला. त्याने ते चित्र जमिनीवर फेकून दिले. चित्राला ओझ्याने बडवण्याची आपल्या नोकरांना आज्ञा केली. "हीच औरंगजेबाची योग्यता होय" असे तो म्हणाला. चित्राला बडवण्याचे काम चालू होते तेव्हा, दरबारी लोक स्तब्ध होते. यानंतर शाहा आब्बास म्हणाला "औरंगजेबाच्या नाण्यावर अशी अक्षरे पाहिजेत,

"सिक्का जद् ब कुर्से-पनीर."
औरंगजेब-बरादर-कुश-ए-फिदरगीर."

१. शफीउल्ला याला तर्बीयतखान ही पदवी होती. याचा जन्म मध्य आशियात झाला. हा जौनपूरचा फौजदार होऊन २७ शबान १०९६, १०९७ हि. (जुलै ३०, १६८४) त मरण पावला. काहींच्या म्हणण्याप्रमाणे १०९८, १०९६ (तारीख इ-मुहम्मदी).

(आपल्या भावाला मारणारा आणि बापाला कैद करणारा औरंगजेब याने पनॉर (नीज) च्या गोळ्यावर शिक्का मारला आहे).

शेवटी बादशहा आब्बासने ४० सुरेख इराणी घोडे, औरंगजेबाला भेट म्हणून देऊन तर्बीयतखानाला परत जाण्याचा निरोप दिला. त्यावेळी शाहा आब्बास तर्बीयतखानाला म्हणाला "औरंगजेब हा माझ्याविरुद्ध चालून येऊ दे. त्यासाठी आपल्याजवळ पुरेसे घोडदळ नाही अशी सबब त्याने (औरंगजेबाने) सांगू नये म्हणून मी हे घोडे देत आहे. तो माझ्यावर चाल करून येऊ दे, म्हणजे राजा हा जगज्जेता कसा होऊ शकतो याचे मी त्याला पाठ देईन."[1]

**जयसिंगाची दक्षिणेकडील मोहिम :** औरंगजेबाचा राजदूत इराणमध्ये होता, त्या सुमारास आम्ही (जयसिंग व त्याचे सैन्य) औरंगाबादच्या दिशेने प्रवास करीत होतो. तेथे औरंगजेबाचा मुलगा शाहाआलम (मुअज्जम) हा सुभेदार होता. आम्ही औरंगाबादेला पोहोचल्यावर (१० फेब्रुवारी १६६५) जयसिंगाने तेथे त्याची (शाहाआलमची) गाठ घेतली.

औरंगाबाद मुक्कामी जयसिंगाने मला बोलावू पाठविले आणि पुढील कामगिरी सांगितली. रामनगर, पेठ[2] आणि चौथिया येथे तीन लहान हिंदू राजे होते. पोर्तुगीज त्यांना कोळ्यांचे राजे म्हणत. सुरतेवर[3] हल्ला करताना शिवाजी यांच्या राज्यातूनच गेला होता. राजा जयसिंग याने मला खिलतीची वस्त्रे, एक घोडा, तीस घोडेस्वार, काही पायदळ आणि खर्चासाठी बरीच रक्कमही दिली. त्याने मला पुढीलप्रमाणे हुकूम दिला. "तुम्ही या राजांना भेटावे. आपण शिवाजीची बाजू घेणार नाही आणि त्याला वाट देणार नाही, अशा प्रकारचे वचन तुम्ही त्यांच्याकडून मिळवावे. औरंगजेबाचा पक्ष स्वीकारून शिवाजीच्या विरुद्ध ते (राजे) लढले नाहीत तर जयसिंग त्यांच्यावर युद्ध पुकारील. वचनाची खातरजमा म्हणून राजांनी स्वतः अगर त्यांच्या मुलांनी जयसिंगाकडे यावे. तेथे त्यांना योग्य त्या मनसबी देण्यात येतील." मी (मनुची) औरंगाबादेहून निघून प्रथम रामनगरच्या राजाकडे गेलो. माझे

१. तर्बीयतखानाने दरबारात परत गेल्यावर, आपल्या वकीलातीचा व शाहा आब्बासच्या खुरासानवरील स्वारी करण्याच्या इराद्याचा तपशीलवार वृत्तांत बादशहाला सादर केला. औरंगजेबाने महाला चांगला धडा शिकविण्याचे ठरविले. मुकाबलीसाठ त्याने राजपुत्र मुअज्जम आणि जसवंतसिंग यांची निवड केली. आपण स्वतः पंजाबला जाऊ असे बादशहाने जाहीर केले. तर्बीयतखानाने चुका केलेल्या असल्यामुळे त्याला दरबारात प्रवेश मिळाला नाही. (मा-आसीर-ऐ-आलमगिरी ४८,५६) इराणमध्ये तर्बीयतखानाला मिळालेल्या वागणुकी संबंधीचा वृत्तांत 'डो' च्या "हिस्टरी ऑफ हिंदुस्थान" १८०३ iii ४००–४०२ वर दिला आहे. तो मनुचीच्या वृत्तांताहून तपशीलात वेगळा असल्याचे आढळते.

२. नाशिक जिल्ह्यात एक लहानसे राज्य होते.

३. हे विधान बॉम्बे गॅझिटिअर ii , ८९ प्रमाणे बरोबर असल्याचे आढळेल. सुरतवरील स्वारी १६६४ मध्ये झाली होती.

सांगणे ऐकून राजाने औरंगजेबाचा पक्ष स्वीकारला. त्याचा मुलगा जयसिंगाच्या सैन्यात दाखल होण्यासाठी माझ्याबरोबर आला. दुसऱ्या राजानेही (पेठच्या) माझे चांगले स्वागत केले. त्यानेही आपला मुलगा माझ्याबरोबर दिला. पण हा तरुण मुलगा, उष्णतेमुळे प्रवासातच मरण पावला. तिसऱ्या राजाने आपला भाऊ माझ्याबरोबर दिला. या राजाचे त्यावेळी दमणच्या पोर्तुगीजांबरोबर भांडण चालू होते. मी मध्यस्थी करून त्यांच्यात तह घडवून आणला. या राजांचा प्रदेश फार डोंगराळ असल्यामुळे फारसा सुपीक नाही व रम्यही नाही. येथील लोक फार मागासलेले व कुरूप होते. कटीवस्त्राखेरीज त्यांच्या अंगावर कपडाही नसे. या भागात वाघ आणि इतर हिंस्र पशू बरेच दिसले. तसेच या भागात जादूटोण्याचेही बरेच प्रकार मला आढळले.

त्या डोंगराळ भागातील वकीलीत माझा जवळजवळ सहा-सात महिने काळ गेला. या काळात राजा जयसिंगाने आपल्या शौर्याने व धडाडीने थोडीसुद्धा विश्रांती न देता, शिवाजीस अगदी जेरीस आणले. शेवटी जयसिंगाने शिवाजीच्या वनगर[1] या किल्ल्याला वेढा दिला. जयसिंग दूरदृष्टीचा होता. त्याने शिवाजीला पुढीलप्रमाणे लिहीले "तुम्ही माझे ऐकणार असाल तर मी औरंगजेबापाशी अशी मसलत करीन की त्या योगाने तुमचे समाधान होईल आणि बादशहाकडून तुमची दक्षिणचा सुभेदार म्हणून नेमणूक होईल" त्याच वेळी जयसिंगाने शिवाजीच्या मंत्र्यांना भरपूर लाच चारली आणि त्यांना पुढीलप्रमाणे कळविले. "शिवाजी तुमचा सल्ला मागेल तर तुम्ही त्याला असे कळवा की, औरंगजेबाबरोबर सख्य करणे हेच योग्य होईल. कारण त्याने तुम्हाला दक्षिणची सुभेदारी देऊ केली आहे. औरंगजेबाच्या वचनाची जर राजा जयसिंग हा खात्री देत असेल तर आपण औरंगजेबाची सूचना मान्य करावी. औरंगजेबाला राजा जयसिंगाबद्दल अतिशय आदर आहे. त्यामुळे औरंगजेब आपली वचनपूर्ति केल्याशिवाय राहणार नाही."

जयसिंगाने गोड शब्दांची पेरणी केली. त्याने शिवाजीला अघळपघळ वचने पण दिली. यामुळे शिवाजीचे मन जयसिंगाच्या म्हणण्याकडे वळू लागले. शिवाजीवर यापूर्वी अनेक मोगल सरदार चालून गेले होते. पण शौर्य आणि अनुभव या दोन्ही बाबतीत जयसिंग हा शिवाजीला अगदी वेगळा वाटला. म्हणून जयसिंगाचे म्हणणे ऐकावे आणि स्वतःला त्याच्या हवाली करावे, असे शिवाजीने ठरविले. शिवाजी जयसिंगाला भेटण्यास आला त्यावेळी छावणीत काळजीचे वातावरण निर्माण झाले. प्रत्येकाची समजूत अशी की, तो आमच्या सैन्यावर हल्ला करण्यास येत आहे. पण त्याच्या बरोबर फारच थोडे लोक आहेत, हे दिसताच, दिलेरखान व कीरतसिंग हे त्याच्या स्वागताकरिता, आणि लवाजम्यानिशी त्याला राजा जयसिंगाकडे नेण्याकरिता

१. हा पुरंदर किल्ला असावा.

गेले. पण तो तेवढ्याकरिता न थांबता चटकन तंबूपाशी आला. त्याचबरोबर तंबू-बाहेर येऊन राजा जयसिंगाने मोठ्या प्रेमाने आणि अदबीने शिवाजीचे स्वागत केले. दरम्यान किल्लेदार हा शर्थीने वेढा लढवीत होता. तो आमच्या छावणीवर तोफांचा मारा करीत राहिला. शिवाजीने त्याला पत्र लिहून किल्ला स्वाधीन करण्यास सांगे-पर्यंत त्याने मारा चालू ठेवला. अशा रीतीने शिवाजीशी सुरू असलेले युद्ध तात्पुरते विराम पावले. औरंगजेबाने त्यास लिहिलेल्या अनेक पत्रांत दिलेल्या वचनांवर आणि घेतलेल्या शपथांवर, तसेच जयसिंगाच्या शब्दांवर आणि वचनांच्यावर शिवाजीने विश्वास ठेवला. राजा जयसिंगाच्या जवळच त्याचा तंबू ठोकण्यात आला. आपल्या तंबूत त्याला केव्हाही येण्याजाण्याची मोकळीक होती. शिवाजीला नेहमी आदराने व सन्मानाने वागविले जाई. दरम्यान, जयसिंग हा आपण पाठविलेल्या पत्रांना औरंगजेबाकडून उत्तर येण्याची वाट पहात राहिला.

मागे सांगितल्याप्रमाणे माझ्याकडे सोपविलेल्या कामगिरीवरून मी परत आलो. नंतर थोड्याच दिवसांनी शिवाजी शरण येऊन आमच्या छावणीत दाखल झाला.[1] जयसिंगाच्या इच्छेप्रमाणे, मी रात्री त्याच्याशी गप्पा मारण्याकरिता व त्याच्याबरोबर गंजिफा खेळण्याकरिता त्याच्या तंबूत जात असे. एका रात्री, मी, राजा जयसिंग व त्याचा ब्राह्मण कारभारी खेळत असताना, शिवाजी तंबूत आला. त्याबरोबर आम्ही सर्वजण उठून उभे राहिलो. एक अपरिचित, आणि पूर्वी कधी न पाहिलेला असा सुदृढ बांध्याचा तरुण, अशा दृष्टीने मजकडे पाहिल्याबर, मी (मनुची) कोणत्या देशाचा राजा आहे, अशी त्याने जयसिंगाकडे पृच्छा केली. मी एक फिरंगी राजा आहे, असे जयसिंगाने उत्तर दिले. हे उत्तर ऐकून त्याला फार नवल वाटले. शिवाजी म्हणाला "अनेक फिरंगी माझ्या नोकरीत आहेत. परंतु त्यांचा हा रूबाब नसतो." राजा जयसिंगाला माझे कौतुक करायचे होते. तो म्हणाला, "लहान मोठा हा भेद निसर्गातच असतो. हा (मनुची) राजा असल्यामुळे निसर्गाने त्याला पदास अनसरून शरीर व बुद्धिमत्ता यांची देणगी दिलेली आहे." माझे कौतुक झाले म्हणून मी उभा राहिलो आणि शिष्टाचारास अनुसरून मुजरे केले. पुढे अनेक वेळा शिवाजीशी संभाषण करण्याचे मला प्रसंग आले. छावणीतील इतर लोकां-प्रमाणे मला पर्शियन व हिंदुस्तानी या भाषा चांगल्या येत होत्या. मी शिवाजीला युरोपियन राजे लोकांच्या महत्त्वाबद्दल माहिती करून दिली. शिवाजीची समजूत अशी की युरोपमध्ये पोर्तुगालच्या राजाच्या बरोबरचा मोठा राजा कोणी नसावा.

**शिवाजी दरबारला जातो व काही महिन्यांनी तेथून पळून येतो :** जयसिंगाचा दुय्यम सेनापती दिलेरखान याला विश्वासघात आणि दगाफटका करण्याची सवय

1. ग्रँट डफ, शिवाजीची शरणागती ही घटना, जून १६६५ त घडली असे मानतो. मासीरे-आलम-गिरी प्रमाणे तो जयसिंगाच्या छावणीत ८ झील, हिज्जा १०७५ हि. (जून २३, १६६५ इ.स.) ला आला. हे बादशहाच्या आमदानीचे ८ वे वर्ष होते.

होती. शिवाजीला ठार मारावे असे अनेक वेळा त्याच्या मनात आले. शिवाजीला ठार मारावे, असे राजा जयसिंगाला त्याने अनेक परीने सुचविले. तो जयसिंगाला म्हणाला "आपण शिवाजीचा प्राण घ्यावा. निदान मला तसे करण्याची परवानगी द्यावी. सगळी जबाबदारी मी स्वीकारतो. तुमच्यावर कोणत्याही प्रकारचा दोष येणार नाही अशी मी काळजी घेईन. असे घडले (शिवाजीचा मृत्यु) तर बादशहाला आनंदच होईल. कारण शूर आणि धाडसी शिवाजी मोगलांना कधीकाळी स्वस्थ बसू देईल याची सुतराम शक्यता नाही." शिवाजीला कोणत्याही प्रकारे धक्का लावणार नाही, अशा प्रकारच्या आणाशपथा जयसिंगाने घेतल्या होत्या. बादशहाने शिवाजीला सन्मानपूर्वक वागविले पाहिजे, असे त्याचे मत होते. त्याने दिलेरखानाच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. उलट त्याने शिवाजीला भक्कम संरक्षण देऊन बादशहाच्या दरबारात पाठविण्याची व्यवस्था केली. त्याने आपला मुलगा रामसिंग याला पत्र लिहिले "न जाणो, बादशहा शिवाजीचा वध करावयाचा. तुम्ही अत्यंत सावधगिरी बाळगावी. तुझे कोणत्याही परिस्थितीत संरक्षण करीन असे मी शिवाजीला वचन दिले आहे. माझ्या वचनाचा आडोसा घेऊन औरंगजेब शिवाजीचा विश्वासघात करील, असे तू होऊ देऊ नकोस. त्यापेक्षा आपले कुटुंब नष्ट होऊन गेले तरी चालेल."

शिवाजी दिल्लीत[1] आल्यावर बादशहाने त्याला दरबारात बोलावले. खास दिवाणखान्यात जो सर्वोच्च दर्जा देण्याचे त्याला आश्वासन दिले होते ते पाळले नाही आणि उलट त्याला सुवर्ण कठड्याच्या आतील पहिल्या दर्जाच्या सरदारांतील अगदी कनिष्ठ स्थान देण्यात आले. औरंगजेबाच्या ह्या कृत्यामुळे शिवाजी फार दुखावला गेला. त्याला जी वचने देण्यात आली होती, त्यास अनुसरून ही वागणूक नव्हती. बादशहाने वचनभंग केला होता. शिवाजी रागावून, निर्धाराने बादशहास म्हणाला, "राजा जयसिंगाशी झालेला करार आणि याबाबतीत घेतलेल्या आणाशपथाही पाहता, मला दिलेली जागा ही त्यास अनुसरून नाही. सुरुवातीलाच माझे हे असे स्वागत झाले आहे. त्यावरून पुढे काय वाढून येईल याची मी चांगली कल्पना करू शकतो. आपल्या अधिकाऱ्यांमध्ये उत्तम शिपायीगडी असलेला एक नामदारखान[2]

१. ही भेट आग्ऱ्याला झाली. मा-असीरे-आलमगिरी ५५. ओळ ६ प्रमाणे त्यांची भेट (मुलाखत) १८ झुलकादा १०७६ हि. मे २२, १६६६ मध्ये झाली. शिवाजी-औरंगजेब भेटीचा अधिकृत वृत्तांत, तत्कालीन अशा राजस्थानी पत्रातून आला आहे. ही पत्रे प्रकाशित झाली आहेत.

२. नामदारखान हा वजीर जाफरखानाचा व मुमताज महालची बहिण फरजाना बेगम यांचा मुलगा होता. बादशहाच्या राजवटीच्या सुरुवातीस त्याने जसवंतसिंगाच्या हाताखाली दख्खनमध्ये नोकरी केली होती. पण आमदानीच्या ७ व्या वर्षी त्याला दरबारात परत बोलावण्यात आले. (१६६४–६५) (मा-आसीरे-आलमगिरी iii ३०) मनुचीने, तिसऱ्या भागात, हा आपला मोठा मित्र होता असे जाहीर केले आहे.

सोडला तर बाकीचे सगळे म्हणजे म्हाताऱ्या बायका म्हणाव्या लागतील. मी सहज-पणे त्यांचा रणांगणात पराजय केलेला आहे. त्यांना येथे जो दर्जा देण्यात आला आहे, त्यास त्यांपैकी एकही लायक नाही." इतके बोलून शिवाजी रागाने बाहेर पडला.

औरंगजेब आता शिवाजीला ठार मारावे, अशी आज्ञा देईल असे प्रत्येकाला वाटू लागले. आपल्या भावना व्यक्त करणे हा औरंगजेबाचा स्वभाव नव्हता. तो आपला चेहरा निर्विकार ठेवी. आपल्या मसलती गुप्तपणे पार पाडी. काही सरदारांनी बाहेर जाऊन शिवाजीशी बोलावे अशी त्याने खूण केली. दरबारात शिवाजीला काय म्हणायचे होते, ते कोणास माहित नव्हते. औरंगजेबाचे काही अधिकारी शिवाजीकडे आले, आणि त्याचे समाधान करू लागले. ते म्हणाले "दरबारात नव्याने येणाऱ्यांना सुरुवातीसच पहिली जागा देण्याचा हिंदुस्थानच्या बादशहांचा शिरस्ता नाही. पण यापुढे बादशहा तुम्हाला खात्रीने मानाची जागा देईल. तुम्ही शूर सरदार म्हणून तुमच्याबद्दल बादशहाला अतिशय आदर आहे. पण तुम्ही काही दिवस संयम पाळणे आवश्यक आहे."

दरम्यान औरंगजेबाने पुढीलप्रमाणे हुकूम दिला. शिवाजीला त्याच्या तंबूकडे पोहोचवावे. त्याच्या तळाभोवती पाहरेकरी शिपायांच्या तीन तुकड्या ठेवाव्या. शिवाजीकरिता फिदाईखानाचा वाडा मोकळा होईपर्यंत शिवाजीने तंबूत राहावे. त्याचप्रमाणे शिवाजी काही महिने तंबूत होता. या अवधीत, औरंगजेबाने जी आश्वासने दिलेली होती ती तो अंमलात आणण्याचे चिन्ह दिसेना. बरे, औरंगजेबाच्या तावडीतून निसटून जावे तर तशी काही संधिही सापडेना. हे पाहून त्याने औरंग-जेबाला विनंती केली की, माझे अधिकारी व सैनिक यांना आपल्या देशाकडे परत जाण्याची परवानगी द्यावी. औरंगजेबाने ती मान्य केली. शिवाजी, संभाजी आणि शिवाजीचा प्रसिद्ध सेनापती नेताजी[1] यांनी जाऊ नये, अशी व्यवस्था करण्यात आली.

जयसिंगाचा मुलगा रामसिंग याला शिवाजीवरील रक्षक दलाचा एक अधिकारी म्हणून ठेवण्यात आले होते. त्याच्या सल्ल्याने शिवाजीने आठवड्यातून अनेक वेळा अधिकाऱ्यांना व इतरांना वाटण्याकरिता मेवा मिठाईचे बंद करंडे पाठविण्यास

१. नेताजी पालकर—(याला काफीखान नवुजी म्हणतो. १९१). हा शिवाजीचा १६५७-६८ त घोडदळाचा सरनौबत होता आणि त्यावेळेपासून १६६४ पर्यंत मराठ्यांच्या सर्व स्वाऱ्यांमध्ये त्याने पराक्रम केला. (ग्रँट डफ ५४, ७१, ८१, ८६) मा-आसीरे-आलमगिरीमध्ये त्याला शिवाजीचा सावई (भाऊ) असे म्हटले आहे. ग्रँट डफ त्याच्या धर्मांतराबद्दल शंका प्रदर्शित करतो. परंतु मा-आसीरे-आलमगिरी ६०, मध्ये त्याच्या मुसलमान होण्याची तारीख जमादल १, १०७७ हि. (मार्च २८, १६६७) ही तारीख दिलेली आहे. त्याचे नवे नाव मुहम्मद कुलीखान असे होते.

सुरुवात केली. औरंगजेब धूर्त खरा, पण त्याने त्या मिठाईच्या प्रकरणात सावधगिरीचे उपाय योजिले नाहीत. शिवाजीला आग्र्यात जी मोकळीक होती, त्याबद्दल परमेश्वराचे आभार मानून तो मिठाई वाटीत असावा अशी औरंगजेबाची समजूत झाली. काही दिवसांनी फिदाईखानाचा वाडा मोकळा झाला. तो राहण्यास योग्य असा तयार करण्यात आला. शिवाजीने दुसऱ्या दिवसापासून फिदाईखानाच्या वाड्यात राहण्यास जावे, अशी औरंगजेबाने आज्ञा केली. यात शिवाजीचा आपण सन्मानच करीत आहोत, असे औरंगजेबाने वरकरणी भासविले. पण औरंगजेबाचा अंतस्थ हेतू वेगळा होता. फिदाईखानाच्या वाड्यात शिवाजी राहण्यास गेला की तेथे त्याचा गळा दाबून खून करण्यात यावा आणि तेथेच त्याला पुरण्यात यावे असे बादशहाने ठरविले होते.

रामसिंगाला औरंजेबाच्या स्वभावाची पूर्ण माहिती होती. त्याने आपला बाप जयसिंग याने केलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन केले. शिवाजीला अनुकूल अगर प्रतिकूल असे काय हुकूम बादशहा देत होता, याची माहिती काढण्यासाठी रामसिंगाने पाण्यासारखा पैसा खर्च केला. यामुळे रामसिंगाला औरंगजेबाच्या वरील हेतुंची आणि हुकुमांची माहिती मिळाली. क्षणाचाही विलंब न लावता त्याने शिवाजीला वरील हुकुमांची माहिती दिली. शिवाजीने, वर झाकणे असलेले मिठाईचे पेटारे विकत मागविले त्यानंतर एका पेटाऱ्यात तो लपून बसला. तो आणि त्याचा मुलगा यांना तळाच्या बाहेर सुरक्षित ठिकाणी नेण्यात आले. तळावर उत्तम घोडे ठेवले होते. तेथून त्याला आपल्या देशाकडे परत जाता येत होते. ठरल्याप्रमाणे बेत अमलात आणण्यात आला. संध्याकाळी सात वाजता कोणालाही संशय येणार नाही अशा बेताने शिवाजी आपल्या तळावरून निघून गेला. तळाच्या बाहेर खेड्यापाड्यातून आणि जंगलातून रामसिंगाने योग्य ती व्यवस्था पूर्वीच करून ठेवली होती. तिच्यायोगे कोणताही अडथळा न येता शिवाजी आपल्या देशात परत[1] आला.

शिवाजी निघून गेल्यावर दुसऱ्या दिवशी सकाळी त्याचे मृत्युस्थळ होऊ घातलेल्या फिदाईखानाच्या वाड्यात शिवाजीस घेऊन जाण्यासाठी औरंगजेबाचे अधिकारी त्याच्या तळावर गेले. ते तंबूत शिरले तेव्हा त्यांना उशीजवळ एक पागोटे ठेवलेले दिसले. जणू काय शिवाजी अजून झोपलेला आहे असे वाटावे. थोडावेळ ते थांबले. तो जागा झाला आहे की नाही हे पाहण्याकरिता ते परत तंबूत गेले.

१. आलमगिरी नामा. ९७१ ओळ. १६ प्रमाणे शिवाजी सफर २६, १०७७ हि. (ऑगस्ट २९, १६६७) (आमदानीचे ९ वे वर्ष) ला पळून गेला. दरबार त्यावेळी आग्र्यास भरत असे (आलमगीर नामा १०२१ ओ. १०) तो नऊ महिन्यांच्या अवधीनंतर दख्खनमध्ये डिसेंबर १६६६ त पोहचला. (ग्रँट-डफ ९६).

परंतु अनेकवेळा आतबाहेर करूनही येथे कशाचीच हालचाल दिसेना, अथवा त्याच्या घोरण्याचा आवाज येईना, तेव्हा हा जिवंत आहे की नाही, हे पाहण्यासाठी त्यांनी हळूच पांघरूण काढले. तोंच आपली फसवणूक झाल्याचे त्यांना दिसून आले. हे त्यांना दिसण्याचे कारण, पलंगावर पांघरुणाखाली कोणीच नव्हते. ही गोष्ट त्यांनी ताबडतोब रामसिंगाच्या कानावर घातली. इतर कोणी याबाबतीत बादशहाला काही सांगण्यापूर्वीच रामसिंग बादशहाकडे जाऊन हजर झाला. बादशहाला मुजरा करून, तो खाली मान घालून गुपचूप समोर उभा राहिला. नेहमीची आनंदी मुद्रा असणाऱ्या रामसिंगात हा बदल पाहून बादशहाला कोडे पडले. "तू असा खिन्न का? आणि अद्याप तू आपल्या जागेवर परत का गेला नाहीस?" असे त्याने रामसिंगाला विचारले. रामसिंगाने त्याला खालच्या आवाजात सांगितले की, आपल्या कानावर एक दुर्घटना घालण्याकरिता मी आलो आहे. शिवाजी नाहीसा झाला आहे.

या घटनेमुळे औरंगजेब चिडला. त्याने कपाळाला हात लावला. तो विचारमग्न झाला. शिवाजीचा शोध लावण्यात यावा म्हणून त्याने साम्राज्यात सर्वत्र हुकूम पाठविले. पण शिवाजी तोपर्यंत पुष्कळ वाटचाल करून गेला होता. तो अतिशय जलद-गतीने प्रवास करीत होता. एरव्ही इतरांना तीन दिवस आणि तीन रात्र लागतील, इतके अंतर तो एका रात्रीत पार करी. त्याचा प्रवास, अत्यंत अडचणीच्या डोंगर, दऱ्यातून आणि जंगलातून चालू होता. त्यामुळे त्याला धरणे अशक्य होते. नेताजी पण असाच नाहीसा होईल की काय अशी औरंगजेबाला भीति वाटली. त्यामुळे त्याने जबरदस्ती करून नेताजीला आपल्या नोकरीत घेतले आणि त्याला महाबत-खानाच्या हाताखाली नेमून औरंगजेबाने सिंधुनदीच्या पलिकडे त्याला पाठविले.

विजापूरशी युद्ध : शिवाजी लवकरच आग्र्याहून परत आला. त्याचे वर्णन करण्यात काळाने मी (मनुची) थोडा पुढे गेलो. आता दरम्यानच्या घटना सांगण्यासाठी मागे परत येणे भाग आहे. या घटना पुढीलप्रमाणे आहेत. शिवाजी हा औरंगजेबाला शरण आला[1] होता. याची खात्री करून घेतल्यावर औरंगजेबाने जयसिंगाला हुकूम पाठविला की शिवाजीवर चालू असलेली मोहीम तुम्ही आता थांबवा आणि सैन्य घेऊन विजापूर जिंकून घेण्यासाठी रवाना व्हा.[2]

पन्नास हजारांचे घोडदळ घेऊन राजा जयसिंग विजापूरकडे निघाला. विजापूरचे अनेक सेनाधिकारी आतून औरंगजेबाच्या पक्षाचे आहेत हे त्याला ठाऊक होते. आम्ही (मनुची) विजापूरच्या मोहिमेवर कूच करून निघालो. वाटेत विजापूरचा

१. जून १६६५.

२. काफी खानाने ii १९१ (इलियट आणि डौसन. ii २९८) जयसिंगाच्या या विजापूर स्वारीचा दीर्घ व विशेष चांगला वृत्तांत दिलेला आहे.

सेनापती आणि पठाण जातीचा सरदार शरजाखान[1] याने आमच्या सैन्यातील दुय्यम सेनापती दिलेरखान याला पुढीलप्रमाणे पत्र पाठविले. "शूर आणि एकनिष्ठ सरदार दिलेरखान यास, —हे पत्र मी राजा जयसिंग यास लिहीत नाही. तुम्हास लिहीत आहे. कारण आपण एका जातीचे व धर्माचे आहोत. म्हणून मी काय सांगतो ते तुम्ही ऐकाल अशी मला आशा आहे. जेणेकरून औरंगजेब, राजा जयसिंग याला हुकूम देऊन या मोहिमेपासून परावृत्त करील अशी आपण मसलत करावी. विजापूरचा बादशहा हा आपल्याच धर्माचा आहे. ठरलेली खंडणी त्याने आजपर्यंत कधीच चुकविलेली नाही. आपण ही मोहीम थांबवून त्याची व्यवस्था करणार नाही, तर विजापूरच्या राज्याच्या रक्षणासाठी जे काही करणे शक्य आहे, ते मला करावे लागेल. या युद्धात मी तुमचीच तुकडी उधळून लावली किंवा तुम्हाला मिळणाऱ्या विजयाचे श्रेय हिरावून घेतले तर तुम्ही वाईट वाटून घेऊ नये." त्याने आपल्या सैन्याचे दोन भाग केले. मोगल सैन्य विजापूरच्या दिशेने चालले होते. विजापूरपाशी आमचे सैन्य येऊन पोहचेपर्यंत शरजाखानाच्या सैन्याच्या दोन्ही तुकड्यांनी काही हालचाल केली नाही. त्यांनी पंधरा दिवस आम्हाला विजापूरकडे जाऊ दिले. आम्ही विजापूरजवळ पोहोचल्यानंतर मात्र शरजाखानाच्या सैन्याने मोगलांचा प्रदेश निर्दयपणे लुटण्यास सुरुवात केली.

राजा जयसिंगाने, शरजाखानाच्या कारवायाकडे लक्ष दिले नाही. विजापूर जिंकणे सोपे आहे असे त्याला वाटले. कारण त्या राज्यातील काही अधिकाऱ्यांशी त्याचा पत्रव्यवहार चालू होता. पण ती पत्रे उघडकीस आल्यामुळे विजापूरच्या बादशहाने संबंधित अधिकाऱ्यांना बडतर्फ करून त्यांच्या जागी दुसऱ्यांच्या नेमणूका केल्या. राजा जयसिंग ज्याच्यावर अवलंबून होता त्यांचे साह्य न मिळाल्यामुळे त्याला माघार घ्यावी लागली. या सुमारास विजापूरचे तीन सरदार आम्हाला येऊन मिळू पाहत होते. शरजाखानाने त्यांना पकडले आणि त्यांचा शिरच्छेद करून त्यांची डोकी त्याने विजापूरच्या बादशहाकडे पाठविली. त्याने विजापूरच्या बादशहाला हे दाखवून दिले की, आपण विजापूरचे एकनिष्ठ सरदार असून राज्याच्या रक्षणासाठी कोणाचीही गय

१. शरजाखानासंबंधी खाफीखानाने उल्लेख केला आहे. १९५ भा. ४ डॉ. जॉन फ्रेअरही उल्लेख करतो १६७५. त्याची तसबीर ही आमच्या ग्रंथात दिलेली आहे. बादशहाच्या आमदानीच्या ३० व्या वर्षी (१६८७–८८) त्याला औरंगजेबाकडून रुस्तुमखान ही पदवी मिळाली आणि आमदानीच्या ३३ व्या वर्षी त्याला सन्ताजी घोरपडे याने कैद केले. आमदानीच्या ४९ व्या वर्षापर्यंत (१७०४–०५) याची सुटका झालेली नव्हती. ग्रँट डफ म्हणतो—त्याला (शरजाखानाला) वाई येथे पकडण्यात आले आणि पकडणारा हंबीरराव होता. रुस्तमखानाला वऱ्हाडचा दुय्यम सुभेदार करण्यात आले होते. आणि बहादुर शहाच्या आमदानीच्या पहिल्या वर्षी (१७०७–०८) खाजीउद्दीनखानाऐवजी त्याला सुभेदाराचे पद देण्यात आले. (मा-आसिर-इ-आलमगिरी. ४८० आणि केवलराम ताजकरित-इ-उमरा ब्रि. म्यु. जादा हस्तलिखिते नं. १६७०३ फा. ४५ ब)

करणार नाही. हे त्याने वरील कृत्याने सिद्ध केले. आम्ही माघार घेत असताना शरजाखानाने आम्हास अतिशय त्रास दिला. त्याने, विजापूरच्या बादशहाचा मुलूख आम्ही सोडीपर्यंत आम्हास क्षणाचीही उसंत मिळू दिली नाही.

जेस्युइट पाद्रयांनी काढून टाकलेला फादर इग्नेशिओ सर्मेन्टो नावाचा एक पोर्तुगीज पाद्री[1] आमच्या छावणीत राहत होता. तो आमच्या छावणीत येण्याचे कारण पुढीलप्रमाणे होते. राजा जयसिंग याने मागल्या वर्षी पुरंदर गडाला वेढा घातला होता. त्यावेळी चौल बंदरातील काही हिंदू पुरंदरला जयसिंगाच्या छावणीत आले. त्यांनी जयसिंगापाशी पोर्तुगीजांच्या विरुद्ध पुढीलप्रमाणे तक्रार केली. हिंदुंच्या मुलांना पोर्तुगीज जबरीने पकडून नेतात आणि त्यांना ख्रिस्ती करतात, अशी ही तक्रार होती. ती ऐकून राजा जयसिंग रागावला. तो पक्का हिंदू होता. चौलच्या विरुद्ध सैन्य पाठविण्याची त्याने तयारी केली.

हे मला समजताच मी तेथल्या तेथेच वसईच्या पोर्तुगीज व्हाइसरॉयला याची माहिती कळविली. त्याचे नाव होते इग्नेशिओ सर्मेन्टो. हा पोर्तुगीजांच्या उत्तरेकडील दमण पर्यंतच्या प्रदेशाचा प्रमुख होता. "तुम्ही एक वकील पाठवा. त्याच्या बरोबर भेट म्हणून काही वस्तू पाठवा. मी येथे योग्य ती कारवाई करीन" असे मी इग्नेशिओ सर्मेन्टोला कळविले. सर्मेन्टोने माझ्या पत्राप्रमाणे मी जर सांगितले त्याप्रमाणे फादर डामाय इएरा हा पोर्तुगीज पाद्री छावणीत पाठविला. या पाद्र्याने आपल्याबरोबर त्या भागातील एक मुसलमान तरुणही आणला होता. त्याला चौलच्या इलाख्याची चांगली माहिती होती. पोर्तुगीज पाद्र्याने या मुसलमान तरुणाला जयसिंगाच्या नोकरीत लावून दिले. त्याला मिळणारा पगार तो पाद्री आणि मुसलमान तरुण हे आपसात वाटून घेत.

**चौलचे प्रकरण :** चौलच्या हिंदुंच्या तक्रारीसंबंधी मी (मनुची) राजा जयसिंगाशी बोलला. मी त्याला म्हटले, "चौलच्या हिंदुनी तक्रार करण्याचे कारण नाही. गेल्या शंभर वर्षापासून पोर्तुगीज हे लोकांना ख्रिस्ती करीत आले आहेत. जी मुले अनाथ आहेत आणि ज्यांचे कोणी नातेवाईक पुढे येत नाहीत अशांनाच ख्रिस्ती करतात, इतरांना नाही."

ज्या कामासाठी पोर्तुगीज पाद्री फादर डामाय इएरा जयसिंगाच्या छावणीत आला होता, ते काम व्यवस्थितपणे पार पडले. एवढ्याने पोर्तुगीज पाद्र्याचे समाधान व्हावयास हवे होते पण त्याने इतक्यावरच न थांबता जयसिंगापाशी भलक योजना मांडण्यास सुरुवात केली. त्याने जयसिंगाला म्हटले, "गोव्याचा व्हाइसरॉय मोगलांना

१. या ग्रंथाच्या तिसऱ्या भागात मनुची म्हणतो की ह्या माणसाने १६६७ मध्ये वसई येथे माझी बदनामी करून माझी सरकारी चौकशी करण्यास सांगितले.

मदत करून विजापूर जिंकून घेण्याच्या कामात साह्य करील, अशी मसलत मी सिद्धिस नेतो".

मी (मनुची) पुनः पुनः त्या पाद्र्याला म्हटले, "अशा भानगडीत तू पडणे योग्य नाही. तू गोव्याला परत जा कसा. विजापूरचा बादशहा हा पोर्तुगीजांना चांगला शेजारी आहे. मोगल असे शेजारी होणे शक्य नाही. मोगलांनी एकदा विजापूर जिंकून घेतले की, ते गोवा घेण्याचा प्रयत्न करतील" पाद्र्याला माझी मते आवडली नाहीत. त्याने जयसिंगापाशी माझ्याविरुद्ध तक्रार केली. राजाने एक दिवस मला म्हटले की, तू पाद्र्याशी भेटण्याचे टाळीत जा. त्याने काही कारण सांगितले नाही.

चौलचे प्रकरण निकालात निघाल्यावर मला पोर्तुगीजांनी एक सर्टिफिकेट पाठविले. त्याच्यावर इग्नेशिओ सर्मेन्टो याची सही होती.[१] मी (मनुची) पोर्तुगालच्या राजाची उत्तम सेवा बजावली असे त्यामध्ये नमूद होते. आम्ही विजापूरला पोहचलो. विजापूर सहजपणे आपल्या हाती पडेल असे पाद्री म्हणत होता. पण प्रत्यक्षात घडले ते वेगळेच. सरजाखानाने आमचा ठवळ जवळ निकालच लावला. आम्हाला विजापूरहून माघार घ्यावी लागली. मोगल इलाख्यात आम्ही छावणी करणार होतो. मला आता ख्रिस्ती (युरोपियन) लोकांच्यामध्ये जाऊन पडावे असे वाटू लागले. त्या पाद्र्याचा मला अतिशय संताप आला होता. आमच्या छावणीत तो रेंगाळत राहिला होता. मी राजीनामा देण्यास राजाची परवानगी मागितली. मला आपल्या देशाला परत जावयाचे आहे, असे मी सांगितले. मला लग्न करावयाचे आहे, हे निमित्तही मी पुढे केले. लग्नाचे निमित्त पुढे केले की, हे लोक रजा कधीच नामंजूर करीत नाहीत. राजा जयसिंगापाशी पुरोहित आणि ज्योतिषी होते. आपली आणि मनुचीची पुनः गाठ पडेल का, असे राजा जयसिंगाने ज्योतिष्यांना विचारले. गाठ कधीच पडणार नाही, असे ते म्हणाले. मी (मनुची) मरून जाईन असे जयसिंगाला वाटले. पण त्याचा अंदाज चुकला. कारण मी नंतर मोगल राज्यात परत आलो पण तोपर्यंत तो मात्र राजपुतान्यातील आपल्या राज्यापासून दूर दक्षिणेत मरण पावला होता.

**मनुची मोगल छावणी सोडतो** : निरोपाच्या वेळी राजाने मला पोषाख व काही भेटी दिल्या. मोगलांची छावणी सोडून मी निघालो तो कल्याण-भिवंडी लागून असलेल्या काम्बे[२] या गावी आलो. काम्बे या गावी उत्तम खुर्च्या, पलंग, फळ्या,

१. बेनर्स हा इग्नेशियो सर्मेन्टो गव्हर्नर ऑफ कोचीन संबंधी. ३२७।।,१६६६ त विशेष उल्लेख करतो. १६६६ साली दमणचा गव्हर्नर असलेला हाच मनुष्य असावा. मनुची याचा फोलिओ ११० वर आणि तिसऱ्या भागात २१३ फोलिओवर उल्लेख करतो तो सांगतो की, पाम सन्डेला याचा खून झाला पाम सन्डे म्हणजे ईस्टर पूर्वीचा रविवार.

२. काम्बे हे गाव त्यावेळी पोर्तुगीज हद्दीत होते. ते भिवंडीच्या पश्चिमेस दोन मैलांवर आहे.

विविध खेळणी इत्यादी लाकडी माल होई. या जेब्याचा मालक हा माझा मित्र होता. मी (मनुची) त्याच्याकडे बरेच दिवस राहिलो. एक दिवस त्याने माझ्याजवळ असलेल्या सोन्याच्या मोहरा चोरल्या. मग तेथून वसई[१]ला गेलो. ईस्टर (ईस्टर) चा सण वसईला साजरा करावा असा माझा हेतु होता. वसईत मी गावाच्या बाहेर रहात होतो. तेथे एकदा माझा प्राण जाण्याची वेळ आली होती. तो प्रकार असा :— वसईच्या एका गृहस्थाने मला मोगलांच्या प्रदेशात राहणाऱ्या मेलो कुटुंबातील काही लोकांसंबंधी चौकशी केली. मजकडे चौकशी करणाऱ्या गृहस्थाच्या दोन मेहुण्यांना ठार मारल्याबद्दल त्या लोकांना हद्दपार करण्यात आले होते. त्या हद्दपार केलेल्यांचा हा शत्रु होता, याची कल्पना नसल्यामुळे ते (मेलो) लोक चांगले आहेत, असे मी म्हणालो. त्यामुळे तो माझा द्वेष करू लागला. त्याने माझा खून करण्याचा कट केला. त्यासाठी त्याने माणसे पाठविण्याचे ठरविले. ईश्वराची कृपा. मी एक दिवस घोड्यावर बसून गावाबाहेर येत होतो. मला काही माणसे भेटली. त्यांनी मला घोडा दौडावयाला सांगितले. त्याप्रमाणे हसत हसत मी त्यांचा निरोप घेतला आणि घोडा पिटाळला. माझा घोडा थकला होता. मी माझी तलवार म्यानाच्या बाहेर काढली होती. माझा घोडा वेगाने पळत होता. त्यामुळे तलवार मी कशीबशी हातात धरली होती इतकेच. ईश्वरानेच मला वाचवायचे ठरविले असावे. तलवार हातात घेऊन मी घोडा भरधाव फेकीत चाललो होतो, त्यावेळी एका कोपऱ्यात मला चार माणसे दिसली. हातात लांब तलवारी घेऊन मला ठार मारण्यासाठी ते लोक तेथे उभे होते. माझा वेग आणि माझ्या हातातील तलवार पाहून मला आधीच इशारा मिळाला असावा असे त्यांना वाटले. घाबरून त्यांनी मला काही अडथळा न करता जाऊ दिले. या कटाच्या मागे मी वर उल्लेखलेला गृहस्थ होता, असे मला नंतर कळले. हा आपला दुष्ट हेतु पुरा करण्याची संधी दवडणार नाही, असे मला वाटू लागले. म्हणून मी वसई सोडून गोव्याकडे निघालो. गोव्याला मी १६६६[२] मध्ये पोहचलो.

**मनुचीचे गोव्यात स्वागत :** गोव्यात मला जे पाहिजे होते ते मिळाले नाही. येथे सर्व वातावरण अविश्वासाचे व धोक्याचे होते. लोकांमध्ये परमेश्वराबद्दल यत्किंचितही धाक नव्हता. परक्यांची काहीच दखल घेतली जात नव्हती. माझा छळ झाला अशी तक्रार मी करीत नाही. कारण येथील व्हाइसरॉयने एका

१. आलमगिर नामा (१०२१ जेवटी आले) या ग्रंथाप्रमाणे जवळजवळ एक वर्षाच्या गैरहजेरीनंतर राजा जयसिंग हा विजापूरहून परत येत असताना औरंगाबादेस आला. (८ जमादी II १०७७ हि. (डिसेंबर १६, १६६६). मनुचीच पुढे म्हणतो की, मी (मनुची) वसईला १६६६ त पोहचलो अधिक शक्यता तो १६६७ च्या ईस्टर (ईस्टर सणात) काळात तेथे गेला असावा. वसई हे १७३९ पर्यंत पोर्तुगीजांच्या ताब्यात होते.

२. हे वर्ष १६६७ असावे. वरील टीप पाहा.

युद्धनौकेचा मुख्याधिकारी होण्याची मला विनंती केली होती. परंतु नाविकांना व सैनिकांना पगार देण्यास व इतर खर्च करण्यास मजजवळ पैसा नव्हता. त्यामुळे ही विनंती मी नाकारली. विजापूरचे राज्य मोगलांना मिळू न देण्याची काळजी घ्यावी, असा तेथील व्हाइसरॉयला मी सल्ला दिला. कारण मोगल बादशहा आपल्या सवयीप्रमाणे, संधी मिळताच आपली सर्व शक्ति गोवा जिंकण्यास खर्च केल्याशिवाय राहणार नाहीत असे मला वाटले.

मला पैशाची गरज होती. मोगलांच्या राज्यात असताना मी (मनुची) गोव्याचा अधिकारी इग्नेशिओ सर्मेन्टो याला वेळोवेळी वस्तू पाठविल्या होत्या. त्यांची किंमत म्हणून मला तीनशे रुपये मिळावे असे मी त्याला सांगितले. पण माझ्या मागणीला यश मिळाले नाही. शेवटी सर्मेन्टो मोझँबिकच्या सुभेदारीवर जाण्यास निघाला. त्यावेळी दान म्हणून तरी पैसे द्या असे मी त्याला सांगितले. हे लोक आपल्या सावकारांना जेरीला आणूनच पैसे परत करतात. सर्मेन्टोने मला पैसे दिले. माझे नशिब थोर म्हटले पाहिजे. कारण कर्ज दिलेले पैसे गोळा करण्यात इतरांनी आपले अवयव किंवा प्राणही गमावले आहेत. याविषयी मी बोलू इच्छित नाही. ज्यांना हवे असेल त्यांनी पोर्तुगीजांनाच विचारावे. त्यांच्यातही काही चांगली माणसे आहेत. हिंदुस्तानातील पोर्तुगीजांसंबंधी ते अधिक माहिती देऊ शकतील. मला जास्त माहिती देण्याची हिम्मत होत नाही.

**इराणचा शाहा आब्बास औरंगजेबाला धुडकावतो :** या वर्षाच्या अवधीत घडलेल्या अनेक घटनांकडे वळू या. पहिली गोष्ट म्हणजे औरंगजेबाची लाडकी राणी उदेपुरी हिने मुलास जन्म दिला. त्याचे नाव कामबक्ष असे ठेवण्यात आले.[1] हा त्याचा पाचवा व शेवटचा मुलगा. याच सुमारास इराणला पाठविलेला औरंगजेबाचा वकील परत आला. इराणच्या बादशहाने त्याच्याबरोबर औरंगजेबाकडे चाळीस घोडे पाठविले होते. हे घोडे पाठविणे म्हणजे इराणच्या बादशहाने औरंगजेबाला जणू लढण्याचे आव्हान दिले होते. याचा उल्लेख पूर्वी आलेला आहे. या घटनेने मोगल साम्राज्यात सामान्यतः आणि दिल्लीत विशेषतः काळजीचे वातावरण पसरले होते. आपण शाहा आब्बास यास भीत नाही, हे औरंगजेब दाखवू पाहत होता.[2]

तर्बीयतखान ह्याला औरंगजेबाकडून फार बोलणी खावी लागली व त्याची मानहानीही पुष्कळ झाली. बादशहा अगदी तोडून त्याला असे म्हणाला "जर तुला

१. कामबक्षाच. जन्म १० रमजान, १०७७ हि. (मार्च ६, १६६७) न प. ल. झाला (मा-आसीरे-आलमगिरी. ५३८)

२. 'गन फाउंडर' ब्रिटीश म्यु. हस्तलिखित नं. ८११ फो. ६ ब. यात जॉन कॅम्बेल म्हणतो "मी स्वत: यावेळी दरबारात हजर होतो. शाहाने पाठविलेल्या सोन्याच्या तलवारीचे औरंगजेबाने तुकडे करून टाकलेले मी पाहिले. बादशहाने ते तुकडे पायाखाली तुडवून टाकण्यास व जाळून टाकण्यास सांगितले व त्याची राख नदीत फेकून देण्यास सांगितले. घोडे देऊन टाकण्यात आले.

काही कळत असते आणि शरम वाटत असती तर तू त्या नास्तिकाला, शाहा आब्बासचा प्राणच घेऊन टाकावयास पाहिजे होता आणि त्याच्या राजवाड्यातच आत्महत्या करून घ्यावयास पाहिजे होती. आपल्या बादशहाचा मान राखण्याकरिता जर वापरायची नाही तर ती कट्यार कमरेला बाळगता तरी कशाला स्वतःस तेथेच जीवंत पुरून का घेतले नाहीस " हे त्याला ऐकवल्यावर बादशहाने त्यास दरबारातून हाकून लावले आणि थोड्याच दिवसांनी तो दुर्दैवी तर्बीयतखान मरण पावला[1].

अब्दुल करीमचा मृत्यू : आपणास इराण्यांचे भय वाटत नाही, असे औरंगजेब दाखवीत होता, तरीपण त्याला मनात थोडी भीति होतीच. त्याने शाहा आलमला (राजपुत्र मुअज्जमला) दक्षिणेतून घाईघाईने परत येण्यास आज्ञा केली. राजा जयसिंगाला विजापूरच्या बादशहाबरोबर तह करण्यास सांगितले. या बाबतीत आणखीही इतर प्रयत्न त्याने चालू ठेवले. अब्दुल[2] करीम हा एक प्रमुख धर्मशास्त्री होता. शाहा आब्बासच्या काय हालचाली आहेत, याचा बारीक शोध काढून आपल्याला कळविण्यासाठी औरंगजेबाने अब्दुल करीमला सांगितले. करीमने काही इराणी व्यापाऱ्यांना पकडून माहितीसाठी त्यांचा छळ केला. त्यामुळे चिडून जाऊन एकाने त्याचा खून केला.

शाहा आब्बासचा मृत्यु : या पूर्वीच्या अवधीत इराणचा शाहा आब्बास हा औरंगजेबाशी लढण्यासाठी म्हणून मोठ्या निर्धाराने चाल करून येत होता. त्याच्यापाशी तीन लाखांचे घोडदळ होते. औरंगजेबाचे आणि त्याचे युद्ध झाले असते तर मोठ्या कष्टांनी आपले कमावलेले राज्य हातचे गमावण्याचा बराच मोठा धोका औरंगजेबाला पत्करावा लागला असता, असे म्हणावे लागते. पण औरंगजेबाचे नशीब थोर. चाल करून येत असता शाहा आब्बास हा वाटेत घटसर्पासारख्या आजाराने मरण पावला[3] आणि त्यामुळे औरंगजेबाला हायसे वाटले. अर्थात तोपर्यंत राजा जयसिंगाने विजापूरच्या बादशहाशी तह केला होता आणि औरंगजेबाने इराणच्या शाहाचा प्रतिकार करण्याची पूर्ण तयारी केली होती. त्याने युद्धाचा बेत सोडून दिला पण शाहा आब्बासचा सूड म्हणून त्याने हिंदुस्तानातून इराणकडे जाणाऱ्या व्यापारी तांड्यांना बंदी केली. अर्थात तिकडून इकडे येणाऱ्या तांड्यांना बंदी नव्हती.

१. तर्बीयत खान १०९६ हि. (१६८५) पर्यंत हयात होता. तो त्यावेळी जौनपूरचा फौजदार होता.

२. अब्दुल करीम हे नाव चुकीचे वाटते. ते असावे अब्दुल रझाक. इतिमादखान आ-आसीरे-आलमगिरी पा. ५७ प्रमाणे १०७७ हि. त या वर्षी त्याचा खून झाला. त्याचे वर्णन वर दिल्याप्रमाणेच आहे. (१६६६–६७).

३. शाहा आब्बास दुसरा शाहा सफीचा मुलगा, शाहा आब्बास (पहिला) चा नातू. घटसर्पाच्या रोगाने मरण पावला—१ रबी १०७७ हि. (सप्टेंबर १, १६६६) ला वयाच्या छत्तिस-सदतीसाव्या वर्षी (चाळ वर्षे) मृत्यु पावला. टॅव्हर्निअर म्हणतो की शाहा आब्बास हा टेहरानला या गावी घशाला सूज आल्यामुळे मरण पावला. ही सूज अतिरेकी मद्यपानामुळे आलेली होती.

**बेगम साहेब मुल्ला मौलवींच्या बायकांना मद्य देते :** बादशहा आता सर्व कटकटींतून मुक्त झाला होता. याच सुमारास मुल्ला-मौलवींनी त्याला गळ घालून त्याच्याकडून स्त्रियांच्यावर काही निर्बंध घालण्याचे हुकूम मिळविले. बायकांनी पुरुषां-सारखे तंग पायजमे घालू नयेत. त्यांचे पायजमे ढिले असले पाहिजेत असा बाद-शहाने हुकूम काढला. मुल्ला-मौलवींची इच्छा अशी की, बायकांनी मद्यपान करू नये. अगर भांग, अफू आणि इतर नशा आणणाऱ्या वस्तूंचे सेवन करू नये. बादशहाने आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीस नशाप्रतिबंधक हुकूम काढले होते. पण स्त्रिया हा हुकूम पाळीत नसत. त्यांचे म्हणणे असे, हे हुकूम फक्त पुरुषांना लागू आहेत.

पादशहा बेगम ऊर्फ बेगमसाहेब (औरंगजेबाची बहिण) जाहनारा बेगम हिला औरंगजेबाने स्त्रियांनी सैल पायजमेच वापरले पाहिजेत अशा प्रकारचा हुकूम काढ-ल्याची माहिती मिळाली. तिने काजी, मुसलमान हकीम, मुल्लामौलवी यांच्या बायकांना आपल्या घरी मेजवानीसाठी म्हणून बोलाविले. तेथे तिने त्यांना मद्य दिले. मद्यपानाने त्या बायका धुंद झाल्या. याच वेळी औरंगजेब तिच्या वाड्यावर आला. तो जाहनाराला म्हणाला "बायकांनी सैल पायजमे वापरले पाहिजेत असा मी हुकूम दिला आहे. धर्मशास्त्राचे पालन झाले पाहिजे." जाहनारा म्हणाली "अशा गोष्टी धर्मशास्त्रात नमूद असल्याचे मी कधीच ऐकले नाही". औरंगजेब म्हणाला "सर्व धर्मशास्त्रज्ञांचे हेच मत आहे, त्याचे काय ? यावर जाहनारा ऊर्फ बादशहा बेगम हीने औरंगजेबाला आपल्या अंतःपुरात बोलाविले. तेथे औरंगजेब पहातो तो काय ? मोठमोठ्या धर्मशास्त्रज्ञांच्या बायका दारू पिऊन अस्ताव्यस्त पडल्या होत्या आणि त्या सर्वांनी तंग पायजमे घातले होते. हे दाखवून बादशहा बेगम औरंगजेबाला म्हणाली "तुम्ही म्हणता त्या गोष्टी आपल्या धर्माचा अविभाज्य भाग असतील तर या विद्वान धर्मशास्त्रज्ञांनी आपल्या बायका-मुलींना अशा प्रकारचे कपडे घालू देऊ नयेत आणि मादक द्रव्यांचे सेवन करू देऊ नये. दुसऱ्यासाठी नियम करण्याच्या ऐवजी त्यांनी प्रथम आपल्या घराची व्यवस्था करावी" अशा रितीने बायकांच्या विरुद्ध उठलेले हे वादळ शमले.

**फरान्सचे वकील :** या वर्षी (१६६६) फ्रान्सच्या बादशहाकडून मोगल बादशहा-कडे वकील[१] आले. एकाचे नाव मुशिये द. बुलाये ला. गो. आणि दुसऱ्याचे मुशिये

१. बेलोमॉंटच्याप्रमाणे येथेही चरित्र कोशांच्या पेक्षा मनूचीची माहिती अचूक आहे. त्या माहिती-प्रमाणे मुशिये द.ल. बुलाये याने हिंदुस्थान एकदा प्रवास करून त्यासंबंधी ग्रंथही प्रसिद्ध केला होता. त्यावरून फ्रान्सच्या १४ व्या लुई बादशहाचे त्याच्याकडे लक्ष गेले. कोल्बेने दुसरी फ्रेंच कंपनी काढल्यावर इराणमधून पुढे जाऊन नव्या कंपनीचा व्यापार वाढविण्यासाठी हिंदुस्थानात जाणाऱ्यामध्ये त्याची निवड करण्यात आली. बुलाये आणि बेबो, हे एप्रिल १, १६६६ ला सुरतेस पोहचले. पुढे ते आग्र्यास गेले. बेबो सुरतेस परतला आणि बुलाये बंगालमार्गे चीनला जाण्यास निघाला. डाक्याहून पुढे काही मैल गेल्यावर त्याच्या बरोबर असलेल्या पुस्तकांच्या पेट्या खजिना वाटल्यामुळे दोन सैनिकांनी त्याला ठार मारले ही घटना १६६६ सालच्या अखेरची अथवा १६६७ च्या आरंभीची असावी.

बोबो असे होते. सुरतेला वखार घालण्याची मोगलांच्याकडून परवानगी मिळवावी असा त्यांचा उद्देश होता. फ्रान्सच्या राजाकडून आणलेली पत्रे, औरंगजेबाच्या हाती द्यावीत असे त्यांना आदेश होते. पण वकीलांची पत्रे रास्त आपल्या हातात घेण्याचा शिरस्ता मोगलात नसल्यामुळे औरंगजेबाने आपला मुलगा शाहा आलम (राजपुत्र मुअज्जम) याला ती पत्रे घेण्यास सांगितले. वकीलांच्या पाशी भेट म्हणून काही वस्तु होत्या. त्यात नव्या पद्धतीच्या तोफा होत्या. पण त्या भेटी मोगलांना दिल्या नाहीत. असे असूनही औरंगजेबाने फ्रान्सच्या बादशहाबद्दल असलेला आपला आदर व्यक्त करण्यासाठी वकीलांच्या मागण्या मंजूर केल्या. मुशिये बुलाये हा बंगालला जाण्यासाठी पटणा येथे नावेत चढला. त्याची नाव बुडाली असावी. कारण त्याचा अथवा त्याच्या नावेचा पत्ता लागला नाही. दुसरा वकील गोवा येथे आजारी पडला आणि चुकून भलते औषध घेतल्यामुळे मरण पावला.[1]

राजा जयसिंगाचा मृत्यु : पुढील वर्षी म्हणजे सोळाशे सदुसष्ट साली (खरे वर्ष १६६६) शिवाजीने, मी मागे वर्णन केल्याप्रमाणे आपली सुटका करून घेतली. इराणचा शाहा मरण पावल्यामुळे औरंगजेबाला यापुढे (इराणच्या मोहिमेकरिता) राजा जयसिंगाच्या साह्याची आवश्यकता वाटत नव्हती. त्याला असा संशय आला होता की, शिवाजीच्या पळून जाण्यात राजा जयसिंगाचा हात असावा. त्याने जयसिंगाला दरबारला परत येण्याचा हुकूम केला. जयसिंग हा आग्र्याच्या वाटेवर असताना औरंगजेबाने त्याच्यावर विषप्रयोग करविला. त्यामुळे जयसिंग हा बऱ्हाणपूर येथे मरण पावला.[2] जयसिंगाच्या एकनिष्ठ सेवेचे हे फळ त्याला मिळाले.

टॅव्हरनियरने आपल्या 'ट्रॅव्हल्स' मध्ये मुशिये बुलायेच्या संबंधी उल्लेख केला आहे. टॅव्हरनियर हा त्यावेळी आग्र्याला होता आणि बोबो बरोबर तो सुरतेस गेला. मनूची त्यावेळी दक्षिणेत होता. त्यामुळे त्याने टॅव्हरनियरच्या माहितीचा उपयोग केला की, स्वतंत्रपणे माहिती मिळविली हे सांगता येत नाही. दोघांचा वृत्तांत बऱ्याच अंशांनी सारखा आहे; एवढी गोष्ट मात्र खरी आहे.

ईस्ट इंडिया कंपनीच्या दप्तरात या नव्या फ्रेंच कंपनीसंबंधी माहिती आहे. पहिली बातमी इराणकडे पाठविलेल्या पत्रात आहे. (फेब्रुवारी १७, १६६६. फॅक्टरी रेकॉर्डस् सुरत खंड ८६) हीच माहिती परत देऊन दोन फ्रेंच माणसांचे सुरतेस आगमन झाल्याचे कळविण्यात आले आहे. तर कोर्ट ऑफ डिरेक्टर्सना पाठविलेल्या पत्रातील ताज्या कलमात फ्रेंच राजाने व कंपनीने पाठविलेल्या याच दोन फ्रेंचाचा उल्लेख केला आहे. पुढे सप्टेंबर १०, १६६६ च्या ईस्ट इंडिया कंपनीच्या सामान्य पत्रात फ्रेंचांना मोगल दरबारात आलेल्या अडचणींचा निर्देश आहे. त्यांची दरबारात (बादशहाची) भेट झाली. नंतर एक आग्र्याला गेला व तेथून बंगालला गेला. दुसरा दरबारकडून मिळालेले फर्मान घेऊन सुरतेस परतला.

१. नैट्रेट अतिशय विरघळणारे. (पांढऱ्या पुडीत) तर करोसीव सब्लीमेट कमी विरघळणारे. मात्र दोन्ही रंगाने सारखीच पांढरी आहेत. असे असेल तर एका ऐवजी दुसरी चुकीने घेण्याची शक्यता नाही. कदाचित बोबोने त्याच्या दुर्गुणामुळे मद्याच्या धुंदीत ते (करोसीव सब्लीमेट) घेतले असावे.

२. जयसिंग हा १०६६ हि. (जुलै १२, १६६७) ला बऱ्हाणपूर येथे मरण पावला. त्याने ५० वर्षे राज्य केले. मृत्यूसमयी तो सुमारे ६० वर्षांचा होता (तारीख-इ-मुहम्मदी) टॉडच्या 'राजस्थान' खंड १.३४२ वर तो म्हणतो की, कीरतसिंगाने औरंगजेबाच्या चिथावणीने आपल्या बापाला विष देऊन मारले.

मागे औरंगजेब आणि शाहशुजा यांचे युद्ध चालू होते. त्या काळात एकदा पंजाबातील लाखी या जंगलात राजा जयसिंग आणि औरंगजेब यांची अगदी अचानक गाठ पडली होती. त्यावेळी जयसिंग निर्धास्तपणे औरंगजेबाचा वध करू शकला असता. असे त्याने करावे असा सल्लाही जयसिंगाच्या सहकाऱ्यांनी त्याला दिला होता. ही गोष्ट मी मागे सांगितली आहे. औरंगजेबाच्या एका पत्रावर जयसिंगाने दाराचा मुलगा सुलेमान शुको याचा पक्ष सोडला. औरंगजेब शाहशुजाचा पाठलाग करीत असताना त्याच्या गैरहजेरीत जयसिंगाने दिल्लीची व्यवस्था उत्तम ठेवली. गढवालमधील श्रीनगरच्या डोंगराळ प्रदेशातून सुलेमान शुकोला हस्तगत करण्याची कामगिरी यानेच बजावली. शौर्याने आणि निर्धाराने तो शिवाजीवर चालून गेला आणि स्वतःचा अमाप पैसा खर्च करून त्याने शिवाजीची शरणागती घडवून आणली. मोगलाना अनुकूल अटीवर त्याने विजापूरवरील मोहीम संपवून तह केला. अशा महान सेवेचे हे फळ जयसिंगाच्या पदरी आले.

शिवाजी पळून गेल्याबद्दल आणखी सूड घेण्यासाठी औरंगजेबाने राजा जयसिंगाचा वडील मुलगा रामसिंग याला आसामच्या मोहिमेवर जाण्याची आज्ञा केली[1] ही आज्ञा करण्यात त्याचा हेतु असा होता की, मीरजुमला या थोर नेत्याचा जो शेवट झाला होता, तसाच याचाही व्हावा. परंतु अनेक राजांनी मध्यस्थी केल्यावरून औरंगजेबाने आपल्या हुकुमात फरक केला. आणि रामसिंगाला सिंधूच्या प्रदेशात पाठविले आणि त्याला तेथील सुभेदाराच्या हाताखाली काम करण्यास सांगितले. त्या प्रदेशात राहणेही हिंदुना एक प्रकारची कठोर शिक्षाच वाटत असते, हे मी पूर्वीच सांगितले आहे.

जयसिंगाच्या मृत्यूची बातमी मोगल दरबारात पोहोचली. आपण किती दुःखदायक बातमी औरंगजेबाला देत आहोत असे बातमी आणणारास वाटले. जयसिंगाने औरंगजेबाची काय काय सेवा केली होती हे जगजाहीर होते. बादशहाला जयसिंगाच्या मृत्यूचे फार दुःख होईल अशी लोकांची समजूत होती. आता ही गोष्ट खरी की, बादशहा जरूर असेल तेव्हा आपल्या सेवकांना महत्त्व देतात. एकदा काम संपले की, सेवकाकडे दुर्लक्ष करण्यात येते. ही सर्व बादशहांची रीतच होय. पण औरंगजेब त्या सर्वांवर ताण करणारा होता. आपली अधिकाधिक कामगिरी ज्यांनी बजावली असेल, त्याना नाहीसे करावे हे तर त्याचे तत्त्वच होते. जयसिंगाच्या मृत्युबाबत त्याने कसे वागावे ? औरंगजेबाने उघडपणे जाहीर केले की त्या मोठ्या सरदाराच्या मृत्यूने आपल्याला आनंद झाला आहे. बातमी घेऊन येणाऱ्याला तो म्हणाला "त्या जयसिंगाचा मृत्यु ही माझ्या अतिशय आनंदाची बाब होय."

१ आसामच्या मोहीमेवर रामसिंगाची नेमणूक ६ जानेवारी १६६८ला झाली. सन १६७५-७६ च्या सुमारास तो बंगालमधून परत आला आणि बादशहाच्या चाकरीत असताना काबूलमध्ये १६८७-८८ मध्ये मरण पावला.

अर्थात एक औरंगजेब सोडला तर जयसिंगाच्या मृत्यूचे प्रत्येकाला दुःख झाले. जयसिंगाच्या महत्त्वामुळे आपल्या राज्याला धोका आहे, अशी औरंगजेबची समजूत होती. जयसिंगाच्या मृत्युने ते महत्त्व नाहिसे झाले. त्या घटकेपासून औरंगजेबाने हिंदुधर्माविरुद्ध उघड उघड युद्ध पुकारले.

दिल्लीजवळ लत्ता नावाचे एक स्थळ आहे. तेथे एक उत्कृष्ट देऊळ होते. ते पाडून टाकावे असा औरंगजेबाने ताबडतोब हुकूम केला. प्रत्येक सुभेदाराने आपापल्या सुभ्यातील देवळे पाडून टाकावी असेही त्याने हुकूम सोडले. अशा पाडलेल्या देवळात मथुरेचे भव्य देवालय होते. या देवळांची उंची इतकी होती की, त्याची सोनेरी शिखरे, १८ किम (सुमारे ३६ मैल) अंतरावर असलेल्या आग्र्याहून दिसत असत. या देवळाच्या जागेवर एक मशिद बांधावयाची होती. या मशिदीला त्याने इस्लामाबाद हे नाव दिले. इतके करून औरंगजेब थांबला नाही. त्याने हिंदु जोगी, संन्यासी यांना हाकून लावण्याचा हुकूम दिला. दरबारात मोठ्या जागांवर काही हिंदु होते. त्यांना काढून टाकून त्यांच्या जागी मुसलमानांच्या नेमणुका कराव्या अशी त्याने आज्ञा केली. हिंदु होळीचा सण साजरा करीत. त्यात त्याने अडथळे आणले.

**फादर बुझिओचा मृत्यु :** या काळात फादर बुझिओ नावाचा एक फ्लँडर्सचा पाद्री मोगल दरबारात बराच लोकप्रिय होता. वजीर जाफरखान व इतर अधिकारी त्याचे मित्र होते. फादर बुझिओ हा उंच, धिप्पाड आणि रुबाबदार होता. तो उत्तम गणिती असून संभाषणात मोठा चतुर आणि विवेकी असे. तो या वर्षी (सुमारे २० जून १६६८) मरण पावला. त्याच्या मृत्युनंतर वजीर जाफरखानाच्या शिफारशीने त्याच्या मठातील त्याची संपत्ति इतर पाद्र्यांना वाटून देण्यात आली.

**औरंगजेब बादशहाचा वजीर जाफरखान याच्या विषयी :** वजीर जाफरखान याच्या स्वभावाबद्दल काही सांगितले पाहिजे. तो मोगल बादशहाचा वजीर होता. मोगलांच्या मधील तो एक अतिशय विद्वान मनुष्य होता. त्याची वागणूक नेहमी सौजन्यपूर्ण असे. कोणालाही तो आहो जाहो शिवाय संबोधित नसे. तो एक अत्यंत सुसंस्कृत आणि चोखंदळ वृत्तीचा मनुष्य होता.

जाफरखानाला मदिरापानाची सवय होती. औरंगजेब हा मोठा कर्मठ होता. जाफरखानाने मदिरा सोडून द्यावी असे त्याने इतरांच्याकडून जाफरखानाला अनेक वेळा कळविले. शेवटी तो जाफरखानास म्हणाला "मोगल साम्राज्याचे तुम्ही वजीर आहात. हे राज्य मुसलमानांचे आहे. तुम्ही दारू पिणे हे चांगले नाही. इतरांना चांगला धडा घालून देणे हे तुमचे कर्तव्य आहे." जाफरखानाने उत्तर दिले. "मी म्हातारा झालो आहे, माझ्या हातापायात शक्ती राहिली नाही. मला डोळ्यांनी नीट दिसत नाही आणि संपत्तीने मी गरीब आहे. मदिरापानाने मला पाहण्यास दृष्टी येते,

आपली सेवा करण्यास माझ्या लेखणीला बळ लाभते, आपण बोलावले की, आपल्याकडे येण्यास पायात शक्ती येते आणि मी श्रीमंत आहे अशी मला कल्पना येऊ लागते. या कारणामुळे मी ती पीत असतो. मदिरेने गरीब श्रीमंत होतात, आंधळे डोळ्याने पाहू शकतात, दुबळे धडधाकट होतात, अपंगांना अवयव लाभतात." जाफरखानाच्या भाषणाने औरंगजेबाला हसू आले.

**शाहा आलम ( राजपुत्र मुअज्जम ) शिवाजीवर चाल करून जातो :** शाहा आलम (मुअज्जम) हा दक्षिणच्या सुभेदारीवर जाण्यास निघण्यापूर्वी औरंगजेबाने त्याला पुढीलप्रमाणे सूचना केल्या : "राजा जसवंतसिंग याला दक्षिणेकडे जाण्याची आज्ञा देण्यात आली आहे. त्याला तुम्ही आपल्याबरोबर घेऊन जावे. तो तुमच्या हाताखाली काम करील. दिलेरखान आणि इतर सरदार तुम्हाला येऊन मिळतील. तुम्ही दक्षिणेत पोहचल्यावर तुम्ही शिवाजीविरुद्ध मोहिम सुरू करावी. शिवाजीबरोबर युद्ध प्रसंग ओढवत आहे, असे वाटले तर तुम्ही आपण बापाविरुद्ध बंड करीत आहोत, मला तुमची मदत हवी आहे अशा प्रकारची पत्रे तुम्ही शिवाजीला पाठवित तुमच्या या बंडाच्या देखाव्यात तुम्ही आपल्या अधिकाऱ्यांना सामील करून घ्यावे. म्हणजे मला अनुकूल कोण, प्रतिकूल कोण, हे जाणून घेण्यास सोयीचे होईल."[1]

शाहाआलम औरंगाबादेस असताना एक महत्त्वाची घटना घडली. एक पोर्तुगीज पाद्री काही दिवसांपूर्वी मुसलमान झाला होता. त्याने लग्नही केले होते. पण आपण केलेल्या धर्मांतराचा त्यास पश्चाताप झाला आणि त्याने आपण परत खिस्ती धर्म स्वीकारला असे जाहीर केले. औरंगाबादच्या काजीकडे जाऊन त्याने ही गोष्ट त्याला सांगितली. काजी चिडला आणि त्याने त्या पाद्र्याचा छळ करण्यास सुरवात केली. पण या छळाचा काही उपयोग झाला नाही. शाहा आलमने औरंगजेबाला ही गोष्ट कळविली. त्याने पुढीलप्रमाणे हुकूम दिला. "त्या पाद्र्याला त्याने स्वीकारलेला धर्म टाकून देऊ नये म्हणून त्याचे मन वळवा. स्त्रिया, घोडे आणि भक्कम पगार ही त्याला देऊन पहा. इतकेही करून आपण परत खिस्ती होतो असा त्याने हट्ट चालू ठेवला तर त्याला जाहीर

---

१. शाहा आलमची (मुअज्जमची) दक्षिणच्या सुभेदारीवर, औरंगजेबच्या आमदानीच्या १० व्या वर्षी रमजानच्या वेळी १०७७ हि. (मार्च ३,१६६७) ला नेमणूक करण्यात आली. जसवंतसिंगाला त्याच्या हाताखाली काम करण्यासाठी पाठविण्यात आले (मा-आशीरे-आलमगिरी पा. ५६-शेवटची ओळ ६१ पा. १ ली ओळ) ग्रँट डफ ९९ आणि एल्फिन्स्टन ५५४, शहाआलमच्या खऱ्या अथवा खोट्या बंडासंबंधी शंका प्रदर्शित करतात. परंतु मासीरे-आलमगिरी १०१ मध्ये हे खरेखुरे बंड म्हणून दिले आहे त्याअर्थी त्यात तथ्य असावे. जयसिंगाने त्यात भाग घेतला असावा या गोष्टीला एल्फिन्स्टन विरोध दर्शवितो. आणि जयसिंगाने दक्षिण सोडले होते, आणि त्याचा मृत्यूही झाला होता असे मानतो (जयसिंग १७१५ आ. ३ रा भाग. ७८) यात त्याचा घोटाळा झाला असावा. तो जयसिंग आणि जसवंतसिंग यांच्यासंबंधी गोंधळात पडलेला दिसतो. जसवंतसिंग त्यावेळी हयात असून दक्षिणमध्ये होता. ओर्मेला (फॅग्मेंटस्‌मध्ये) बंड झाल्याबद्दल विश्वास वाटतो. भीमसेनही पाहा. जोनॅथन स्कॉट हिस्टरी ऑफ डेक्कन त्यास आधार देतो. कॅट्रोच्या ग्रंथाने या बाबतीत डफ-एल्फिन्स्टन यांना झुकविलेले दिसते.

रीतीने शिरच्छेद करा." शेवटी औरंगजेबाच्या हुकुमाप्रमाणे त्या पाद्याचा शिरच्छेद करण्यात आला. त्याचे प्रेत उकीरड्यावर फेकून देण्यात आले. पुढे संधी साधून एक वर्षाने पोर्तुगीजांनी त्याची हाडे गोव्याला नेऊन जतन केली.

**शाहाआलम शिवाजीबरोबर वाटाघाटी करतो :** औरंगजेबाचा मुलगा शाहाआलम (मुअज्जम) हा औरंगाबादेस होता. त्याने शिवाजीबरोबर पत्रव्यवहार करण्यास सुरुवात केली. या योगाने तो आपल्या जाळ्यात अडकेल अशी शाहाआलमला आशा होती.[1] त्याने शिवाजीला गुप्तपणे पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, "मला तुमचा सल्ला हवा आहे. माझ्या हाताखाली सैन्य आहे. अधिकारीही माझ्या बाजूने आहेत. माझ्या बापाने शहाजहानच्या विरुद्ध जसे बंड केले, तसे मी करणे योग्य होईल की नाही?" शिवाजीने त्याला पुढीलप्रमाणे पत्र पाठविले, "संधी उत्तम आहे. तिचा उपयोग तुम्ही करून घेतला नाही तर अशी उत्तम संधी यापुढे मिळेल असे मला वाटत नाही." शिवाजी आपल्या जाळ्यात अडकत आहे असे शाहाआलमला वाटले. तो अशाच प्रकारची स्नेहाची पत्रे त्याला पाठवू लागला. त्यात पुढीलप्रकारचा मजकूर असे, "मी बंड करण्याचे ठरविले आहे. त्यात कृपा करून तुम्ही मला येऊन मिळावे. माझी मसलत सिद्धीस गेली तर सर्व दक्षिण सुभ्याचा अधिकार देईन, हे वचन मी देतो. माझ्या बापाप्रमाणे मी कधीच वचनभंग करणार नाही."

हा सगळा बनाव औरंगजेबाने घडवून आणला आहे याची शिवाजीला खात्री होती. पण त्याचा थांगपत्ताही आपल्याला लागलेला नाही असे त्याने भासविले. त्याने शाहाआलमला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, "मी मनःपूर्वक तुम्हाला येऊन मिळेन आणि औरंगजेबावर सूड उगवीन. औरंगजेबाच्या मृत्यूने दक्षिणेतील युद्धे थांबतील पण एवढ्या मोठ्या मोहिमेसाठी पैसा हा लागणारच. आपण पैसा पाठवावा. मी आग्र्याला निर्बंधात असताना माझी माणसे पांगली होती. त्यांना गोळा करून सैन्य उभे करावे लागेल. समृद्ध शहरे आणि खेडीही मला लुटावी लागतील. त्याची पण मला परवानगी हवी. हे घडून आले की मी तुम्हाला येऊन मिळेन याचे वचन मी तुम्हाला देतो."

शाहाआलमने शिवाजीच्या मागण्या मान्य केल्या. त्याच्याकडे बरीच मोठी रक्कम पाठविली. शिवाजीला चहुकडे लुटालूट करण्याची मोकळीक मिळाली. या योगाने शिवाजी संपन्न झाला. त्याने अनेक सैनिक भरती केले आणि आपले किल्ले मजबूत केले.

**शिवाजीला पकडण्याच्या आशेने शाहाआलम बंडाचा देखावा करतो :** या मध्यंतराच्या काळात शाहाआलमने आपल्या सेनाधिकाऱ्यांना क्षुल्लक गोष्टीत गुंतवून ठेवले.

१. ग्रँट डफ. १८, ११ पान पाहा. १ वर्ष १६६७ होते. आणि पाहा कॅस्ट्रो भा. २३ रा ७७-८० पान, "हिस्ट्री ऑफ मराठाज".

शिवाजीच्या प्रदेशात शिरण्याची त्यांना सक्त मनाई करण्यात आली. यामुळे गुप्त कराराची माहिती नसलेल्या अधिकाऱ्यांनी, औरंगजेबाला पत्रांवर पत्रे लिहिली आणि त्यास कळविले की, राजपुत्र शाहाआलम याचे बेत काही आम्हास कळत नाहीत. आमचा वेळ फुकट दवडला जात आहे आणि इकडे शिवाजी चोहिकडे लुटालूट करून दख्खनचे अतोनात नुकसान करीत आहे. दिलेरखानाने पण अशाच प्रकारचे पण अधिक कडवट असे पत्र लिहिले.[1]

शाहाआलम हा झाला तरी आपल्या बापाच्या सूचनांचे तंतोतंत पालन करीत होता. त्यामुळे औरंगजेबाने वर उल्लेखिलेल्या सरदारांना कळविले की, "तुम्ही शाहाआलमच्या कार्याकडे लक्ष देऊ नका. त्याच्या हातून कामगिरी नीट पार पडली नाही तर मी त्याला दक्षिणेच्या सुभेदारीवरून परत बोलावून घेईन." इकडे औरंगजेबाने शाहाआलमला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले. "तू मसलत उत्तम प्रकारे पार पाडीत आहेस. शिवाजीला आपल्या जाळ्यात ओढण्यासाठी तुला सोन्याच्या राशी ओताव्या लागल्या तरी हरकत नाही."

गोष्टी इतपत आल्यावर शाहाआलमची अशी समजूत झाली की, शिवाजीचे आता समाधान झाले असावे. त्याने शिवाजीस पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, "आपण मला येऊन मिळण्यास विलंब करू नये. आपल्या कराराचा बापाला सुगावा लागेल की काय अशी भीति निर्माण झाली आहे." शिवाजीने शाहाआलमला पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले. "आपण येण्यास तयार आहोत पण राजा जसवंतसिंग आणि इतर सेनाधिकारी आपल्या बाजूचे आहेत अशी आपण हमी द्यावी. यासंबंधीत खात्री पटल्याबरोबर मी माझ्या सैन्यानिशी आपल्या छावणीत हजर होईन." या जबाबाने शाहाआलमचे समाधान झाले. त्याने राजा जसवंतसिंगाशी बोलणे केले. राजा जसवंतसिंगाचे औरंगजेबाशी बरे नव्हते. त्याने शाहाआलमची सूचना मान्य केली. शाहाआलमने तयार केलेल्या मसुद्याला सर्व अधिकाऱ्यांनी मान्यता दिली. प्रत्येक अधिकाऱ्याला शाहाआलमने वेगवेगळे आश्वासन दिले.

शाहाआलमने करू घातलेल्या बंडाला बहुसंख्य अधिकाऱ्यांची सम्मती मिळविली होती. याला अपवाद एकच होता आणि तो म्हणजे दिलेरखान होय. शाहाआलमने दिलेरखानाला बोलावू पाठविले. इतरांनी माझ्या बंडाच्या योजनेला मान्यता दिलीच आहे. बंडात तुम्हीही सामील व्हा, असे त्याला दिलेरखानाला सांगावयाचे होते. दिलेरखानाला बंडाच्या योजनेची माहिती झालेली होती. त्याचा शाहाआलमवर मुळीच विश्वास नव्हता. औरंगजेब किती धूर्त आहे याची त्याला कल्पना होती. ही

१. बंडाच्या अधिकृत माहितीकरिता मासीरे-आलमगिरीत १०० पाहा. याचा वृत्तांत २८ जुल्हेज्जा १०८० हि. (मे १०, १६८०), म्हणजे आमदानीच्या १३ व्या वर्षी मिळाला.

बंडाची मसलत म्हणजे निव्वळ देखावा तर नाही ना? असे त्याला वाटू लागले. दिलेरखानाने शाहाआलमला पुढीलप्रमाणे कळविले, "मी बादशहाच्या नोकरीत आहे. तरीसुद्धा आपण ज्या दिशेला लढण्यास जाणार असाल तिकडे जाऊन लढण्यास मी तयार आहे. तशी आपण आज्ञा करावी. परंतु आपल्याला भेटण्यास येण्याची माझी तयारी नाही."

दिलेरखानाला आपल्या पक्षात ठेवण्याचा शाहाआलमने हरप्रकारे प्रयत्न केला पण काही उपयोग झाला नाही. औरंगजेबाला अंतस्थ हेतू म्हणाल तर दिलेरखानही त्याला नकोसा झाला होता. पण दिलेरखान हा काही कमी धूर्त नव्हता. हर प्रकारच्या अनुभवाने तोही शहाणा झाला होता. शाहाआलमच्या समोर येण्यास तो कबूल होईना. एक गोष्ट दिलेरखानाला स्पष्ट दिसत होती, ती म्हणजे समजा शाहाआलमने बंड केले आणि ते यशस्वी झाले, आणि त्याला राज्य मिळाले तरी त्या बंडात सामील न झाल्यामुळे दिलेरखानाचा लौकिक काही कमी होणार नव्हता. कारण त्याच्या निष्ठेबद्दल लोकांना आदरच वाटत राहिला असता.

दिलेरखानाचे आपण मन वळवू शकत नाही हे पाहून शाहाआलमने त्याला वग-ळले आणि बाकी सेनाधिकाऱ्यांच्या सह्यांचे सम्मतीपत्र त्याने शिवाजीकडे पाठवून दिले. त्याबरोबर शिवाजीला लिहिलेल्या पत्रात शाहाआलमने त्याला पुढीलप्रमाणे कळविले, "माझ्या बापाला कैद करून राज्य ताब्यात घेण्याचा माझा हेतू आहे. यात मला तुमचे प्रबळ सैन्य आणि तुमचे शौर्य यांनी जोड हवी. मी आता कूच करून पुढे चाल करून जाण्याचे ठरविले आहे. तुम्ही कृपा करून दिरंगाई करू नका. त्यामुळे औरंगजेबाला आपले सैन्य जमविण्यास अवधी मिळेल. माझ्यापाशी फक्त १० हजार स्वार आहेत. बादशहाच्या सैन्याचा ते प्रतिकार करू शकणार नाहीत. मी जगाला जाहीर करून सांगेन की, माझ्या बंडात प्रसिद्ध शिवाजी हा माझा सहकारी आहे. औरंगजेबाने त्याच्याशी जो विश्वासघात केला त्याबद्दल त्याच्यावर सूड उगवण्यासाठी शिवाजी मला येऊन मिळाला आहे."

शाहाआलमने आता आपली मोहीम सुरू केली. आपण आता दिल्लीकडे कूच करीत आहोत. तेथे बापाला कैद करून राज्य घेणार आहोत, असे त्याने जाहीर केले. राजदंड जणू आपल्या हाती आलाच हे दाखविण्यासाठी त्याने सेनाधिकाऱ्यांना पगार वाढविले, अनेक अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या, त्यांना सुभे बहाल केले. संस्थानिकांच्या खंडण्या कमी केल्या आणि मग अशा वेळी जे घडते तेच झाले. यामुळे मोगल राज्यभर अफवांचे एक पीकच आले. बंडाच्या कल्पनेने काहींना आनंद झाला तर काहींना दुःख झाले. हा सारा पोरखेळ होता. याच्या पाठीमागे मोगलांना मोठी मसलत (शिवाजीला पकडण्याची) सिद्धीस न्यावयाची होती.

या बंडामुळे आपण फार घाबरून गेलो असल्याचा औरंगजेबाने देखावा केला. याला पुष्टी देण्याकरिता त्याने आपला खजिना मोकळा करून लढाईची तयारी करण्याची आज्ञा केली. सैन्यात लोकांची भरती सुरू केली. दरम्यान त्याने फिदाईखानाला आपल्या जवळील दहा हजार घोडेस्वार देऊन चंबळा नदीवर सर्व उतार रोखून धरण्यासाठी पाठविले. येथेच औरंगजेबाबरोबर झालेल्या पहिल्या लढाईत दाराने आपली सेना खडी केली होती. मग औरंगजेबाने उंट व खेचरे सोन्यानाण्यांनी भरून घेतली आता आपण पळून जाणार आहोत अशी अफवाही पसरून दिली.

फिदाईखानाने चंबळ नदीवर तळ ठोकला. आपण किती शूर आहोत हे औरंगजेबाला दाखविण्याकरिता त्याने (त्यास) बादशहास कळविले की, आपण निश्चित रहा. माझ्या छावणीतील एक शिपाई जिवंत राहीपर्यंत मी शाहाआलमला पुढे सरकू देणार नाही. इतक्या उपरही दुर्घटना झालीच तर बादशहाने हवे तिकडे जाण्यासाठी मुबलक वेळ मिळू शकेल असेही त्याने सांगितले. फिदाईखान हा शूर होता. पण बादशहाची कृपा संपादन करावी म्हणून त्याने वरीलप्रकारे लंब्या चौड्या गप्पा मारल्या. बादशहाच्या मसलतीचा त्याला थोडातरी सुगावा लागलेला होता.

शिवाजी शाहाआलमच्या छावणीत येऊन दाखल होईल, या आशेने औरंगजेबाने आपण शाहाआलमच्या बंडाने अतिशय भयभीत झालो आहोत, असा पुरता देखावा केला. या सर्व बनावटीतून शिवाजीला पकडणे हा जो हेतु, तो अचूकपणे साध्य करण्यासाठी औरंगजेबाला आपले सर्व कौशल्य पणाला लावणे भाग होते. शिवाजीला सारासार विचार करण्याची फार मोठी अशी देणगी निसर्गाकडून मिळाली होती. त्याला अनुभवही दांडगा आला होता. त्याने आतापर्यंत आपली संपत्ती आणि बळ वाढवून आपले हेतू पूर्ण करून घेतले होते. त्याने आपल्या कृतीने औरंगजेबाचा जणूकाय उपहासच केला. शिवाजी शाहाआलमला काही जाऊन मिळाला नाही. त्याने शाहाआलमला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले. औरंगजेबापाशी फक्त दहा हजार घोडेस्वारांचे सैन्य आहे. तुमच्याजवळ एक लाख वीस हजार स्वार आहेत. तुम्ही औरंगजेबावर चाल करून जाऊ शकता. ही मोहीम तुम्हाला सहज साध्य व्हावी. तुमच्या गैरहजेरीत दक्षिणेच्या सुभ्यात कोणी आक्रमण करणार नाही याची मी काळजी घेतो. औरंगजेब हा पूर्वी दक्षिणेचा सुभेदार असताना त्याने मला सुभ्याच्या उत्पन्नाच्या ज्या बाबी बहाल केल्या होत्या, त्याहून अधिक उत्पन्न मी तुमच्या गैरहजेरीत वसूल करणार नाही, असे मी तुम्हाला वचन देतो.

शिवाजीच्या या उत्तराने शाहाआलमवर जणु वज्राघातच झाला. त्याने ते पत्र ताबडतोब औरंगजेबाकडे पाठविले. या अवधीत आपले बंड खरे आहे, हे दाखविण्यासाठी तो कूच करून उत्तरेकडे चालत होता. अशा कठीण प्रसंगी तुम्ही मला

सोडून जाऊ नका अशी तो शिवाजीला पुनः पुनः विनंती करीत होता. तुमच्या सल्ल्यामुळेच मी हे बंड करण्याचे ठरविले. तुम्ही आता मदत करणार नाही, तर माझी मसलत यशस्वी होणे अशक्य आहे असे तो शिवाजीला कळवित होता.

खरे पाहिले तर शिवाजीच्या ऐवजी दुसरा कोणी असता तर तो निश्चितपणे मोगलांच्या जाळ्यात अडकला असता. पण शिवाजी आपल्या निश्चयाला चिकटून राहिला. प्रत्यक्ष लढाईत भाग घेऊन शत्रुसंहार करण्याची जर संधी असेल तरच मी तुम्हाला येऊन मिळेन एरव्ही नाही, ही शिवाजीची भूमिका होती. "तुम्ही पुढे चला आणि लढाई करा. तुमच्यावर काही दुर्दैव ओढवले तर मी तुमचा मित्र आहे. माझ्यावर तुम्ही विसंबून राहू शकता" असे शिवाजीने शाहाआलमला कळविले.

ज्या मोगल अधिकाऱ्यांनी शाहाआलमपाशी सल्ला दिल्या होत्या, ते त्याला म्हणू लागले, "तुम्ही आम्हाला सोडू नका आणि औरंगजेबाला सैन्य गोळा करण्याची संधि देऊ नका." त्यामुळे शाहाआलमच्या फौजेने कूच चालूच ठेवले आणि शाहाआलमबरोबर असलेल्या मोगल अधिकाऱ्यांना आपल्याला जय मिळणार व शाहाआलमची बादशाही राजवट येणार याची खात्री वाटू लागली.

**फसवणूक उघडकीस आली :** आपले कारस्थान निष्फळ झाले आणि शिवाजीला फसविणे शक्य नाही, हे औरंगजेबाला कळून चुकले. आपण घडवून आणलेला बनावट मामला हा राजा जसवंतसिंग आणि इतर मोगल अधिकारी यांच्या कारवायांमुळे खरोखरच बंड म्हणून फलद्रूप होईल काय, अशी औरंगजेबाला भीति वाटू लागली. औरंगजेबाने अब्दुल जाफर[1] नावाचा एक अधिकारी शाहाआलमकडे पाठविला. त्याला औरंगजेबाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली. तुम्ही एका हाताने शाहाआलमच्या घोड्याचा लगाम धरा. दुसऱ्या हाताने माझे पत्र त्याच्या हातात द्या. आणि शाहाआलमला मोठ्याने सांगावे "औरंगजेब बादशहाने तुम्हाला ताबडतोब परत फिरा, एक पाऊलही पुढे टाकू नका, असा हुकूम केला आहे."

हे शब्द ऐकताच शाहाआलम बहादूर भयभीत झाला. त्याचा चेहरा पांढरा फटफटित पडला आणि शौर्य दाखविणे तर राहोच, पण त्याची पाचावर धारण बसली. त्याने सैन्याला बऱ्हाणपूर आणि औरंगाबादेकडे माघारी जाण्याचा हुकूम दिला. सर्व सेनाधिकाऱ्यांना काय भय वाटले असेल, ते किती गोंधळात सापडले असतील याची वाचकांनी आपल्याशीच कल्पना केलेली बरी. ते सर्व लोक आता राजद्रोही ठरले होते, तर दिलेरखान शाहाआलमची सूचना मान्य न केल्याची प्रौढी मिरवत

१. मा-आसोरे-आलमगिरी १०१ मध्ये असे म्हटले आहे की, या कामासाठी पाठविलेला मनुष्य अब्दुल जाफर नसून इफ्तिखारखान (हुसेन) हा होता. याच्या माहितीकरिता पाहा. मा-उल्-उमरा-i-२५२. तो १०९२ हि. (१६८१-८२) त मरण पावला.

राहिला. अधिकाऱ्यांमध्ये उडालेली खळबळ विशेष होती कारण ज्यांचा औरंगजेबाला फार उपयोग होत असे, अशा विश्वासघातक्यांना जर तो क्षमा करत नसे, तर गादीवरून त्याला पदच्युत करण्याचे ज्यांनी ठरविले होते, त्यांना तो क्षमा करणे शक्यच नव्हते.

शिवाजीशी पुनः युद्ध सुरू झाले. परंतु आता औरंगजेबाचा दक्षिणेतील सेनाधिकाऱ्यांवरील विश्वास उडाला होता. त्याने त्यांना बदलून त्यांच्या जागी दुसरे अधिकारी पाठविले. त्यांपैकी बहादूरखान हा एक होता. अधिकाऱ्यांना त्याने इतरत्र व्हाइसराय व सुभेदार म्हणून पाठविले आणि तो हयात होता तोपर्यंत त्यांच्या सारख्या तो बदल्या करत राहिला. राजा जसवंतसिंगाला[1] त्याने सिंधु पारच्या प्रदेशात पाठविले. अत्यंत नाखुशीने त्याने बादशहाचा हुकूम मानला. कारण औरंगजेब आपल्यावर हल्ला करून आपल्या सर्व कुटुंबाचाच नाश करील अशी त्याला भीति वाटली. शाहाआलम औरंगाबादेकडे परतला. बहादुरखानाकडे शिवाजीवर मोहीम करण्याचे काम सोपविण्यात आले. तसेच त्याला (बहादूरखानाला) विजापूरवर हल्ला करण्यास सांगण्यात आले. जोपर्यंत आपण विजापूरचे राज्य काबीज करत नाही, तोपर्यंत शिवाजीचा नायनाट करणे आपणास शक्य होणार नाही, असे औरंगजेबाला दिसून आले. या मोहिमेची माहिती पुढे येईल.

**मुंड्यांचे बंड**[2] : हिंदूंच्या साधुलोकांत स्वतःचे पूर्णपणे मुंडन करणाऱ्या लोकांचा एक पंथ आहे; म्हणून त्यांना मुंड्या अगर मुंडा असे म्हणण्यात येते. पुष्करला त्यांची मोठी यात्रा भरली. यात्रेत एका मांत्रिक बाईने या मुंड्यांना सांगितले की, "तुम्ही माझ्या म्हणण्याप्रमाणे वागाल तर दिल्ली तुमच्या ताब्यात येईल. बादशहाचे बरेच सैन्य दक्षिणेकडे शिवाजी विरुद्ध गुंतलेले आहे. त्याच्यापाशी आता फक्त दहा हजार सैन्य आहे."

मुंड्यांनी (सत्नामी) तिचे म्हणणे कबूल केले. त्यांनी मोठ्या त्वेषाने आक्रमण केले. औरंगजेबाने आपले सैन्य पाठविले. पण त्यांनी त्याची दाणादाण उडविली. त्यावेळी औरंगजेबाची परिस्थिती मोठी चमत्कारिक झाली होती. मोठ्या शर्तीने हे बंड २६ मार्च १६७२ ला मोडून काढण्यात आले. हे लोक दिल्लीपासून ३० मैलांवर येऊन पोहचले होते. मी (मनुची) दिल्लीस पोहचलो त्यावेळी दिल्लीच्या बाहेर

---

१. जसवंतसिंगाला, औरंगजेबाच्या आमदानीच्या १४ व्या वर्षी १०८२ हि. (१६७१) मध्ये जमरूद (खैबर खिंडीतील) चा ठाणेदार करण्यात आले. आमदानीच्या १६ व्या वर्षी १०८३ हि. (जानेवारी फेब्रुवारी १६७३) मध्ये बहादूरखानाची दक्खनमध्ये नेमणूक करण्यात आली. (मा-आसीरे-आलमगिरी १६९, १० वी ओळ).

२. बादशहाच्या आमदानीच्या १५ व्या वर्षी १०८२ हि. (मार्च २६, १६७२) रदन दाझखानाला सतनाम्यांचा दंगा मोडण्याकरिता पाठविण्यात आले. (मा-आसीरे-आलमगिरी. ११४-१५).

मैदानात त्यांना (मुघलांचा) प्रतिकार करण्यासाठी मांडून ठेवलेल्या तोफा आपापल्या जागेवर होत्या.[1]

**गोव्यात मला (मनुचीला) काय अनुभव आला व मी ते कसे सोडले :** मी (मनुची) गोव्यात एक वर्ष तीन महिने होतो. येथील हवा वऱ्यांना मानवत नाही. गोव्याला आल्यावर काही महिन्यांनी मी आजारी पडलो. माझी प्रकृति खडखडीत अशी बरी झालीच नाही. मी सहा महिनेपर्यंत इटालीयन कार्मेलाइट पाद्र्यांच्या मठात जाऊन राहिलो. तेथे माझी चांगली शुश्रुषा करण्यात आली.

या देशात पटकीचे प्रमाण अधिक आहे. एक भयंकर रोग आहे. अनेक लोक याला बळी पडतात. तसेच पाणथरी व काळडी यांचे रोग, अनेक प्रकारचे ज्वर, हे गोव्यात आढळून येतात. त्यामुळे गोव्यातील लोकांचा वर्ण रसरशीत वाटत नाही. आंबे, केळी, फणस इत्यादि फळे गोव्यामध्ये आढळतात. त्यातल्या त्यात, ऑफांसो वगैरे आम्र्यांच्या काही उत्तम जाती प्रसिद्ध आहेत.

मी गोव्यास गेलो तेव्हा अँन्टोनिओ डिमेलो डाकॅस्ट्रो हा व्हाइसरॉय होता.[2] त्याच्यानंतर आलेला व्हाईसरॉय जॉन्युनेस दा कुन्हा (१७ ऑक्टोबर १६६६) हा होता. या व्हाइसरॉयने (हा हिंदुस्तानात ६ नोव्हेंबर १६६८ रोजी मरण पावला) मस्कतचा किल्ला घेण्याची मसलत आखली होती. या सुमारास मी गोवा सोडण्याचे ठरविले. पण गोवा सोडणे मला तितके सोपे नव्हते. त्यामुळे मी (मनुची) कार्मेलाइट पाद्र्याचा वेष चढविला; आणि गोव्याच्या हद्दीच्या बाहेर पडलो.[3] विजापूरचे राज्य गोव्याला लागून आहे. मी विजापूर राज्याच्या हद्दीत पोहोचलो. तो भाग (गोव्याला लागून असलेला भाग) शिवाजीने आपल्या ताब्यात घेतला होता. तेथे मी आपला पाद्र्याचा वेष काढून टाकून नेहमीचे कपडे केले. परमेश्वराने प्रवासातील संकटातून माझी सुटका करावी अशी मी प्रार्थना करीत होतो. मी एका ठिकाणी पोहचण्याच्यापूर्वी चोरांनी पंधरा माणसांचे खून केले होते. वाटेत पुष्कळ ठिकाणी लोक चुगम

---

१. या विधानाप्रमाणे मनूची १६७२ च्या मध्यात विजापुरास पुन: एकदा पोहचला असला पाहिजे. मनूची १६६७ च्या वसंतऋतूत गोव्याला पोहोचला. तेथे १५ महिने राहिला. तर तो गोव्यात १६६८ च्या सप्टेंबरपर्यंत असावा. नंतर १६७२ पर्यंतचे बाकीचे दिवस औरंगाबादेस, आग्र्यास वगैरेच्या प्रवासात गेले असे जरी धरले तरी हा काळ जरा अधिकच वाटतो.

२. २१ वा पोर्तुगीज व्हाइसरॉय, अँटोनिओ डिमेलो डाकॅस्ट्रो याची मार्च ११, १६६२ ला नेमणूक झाली. १६६२ त त्याला व्हाइसरॉय करण्यात आले. तो सप्टेंबर २०, १६६६ त मुंबईस आला. त्याच्या नंतरचा व्हाइसरॉय जॉन्युनेस डी कुन्हा याची मार्च ११, १६६२ मध्ये नेमणूक झाली. हा ऑक्टोबर ११, १६६२ ला गोव्यास आला आणि ऑक्टोबर १७, १६६६ मध्येच त्याने जागेची अधिकारसूत्रे घेतली. ६ नोव्हेंबर १६६८ मध्ये हिंदुस्तानमध्ये मृत्यु पावला.

३. कारण सामान्य नागरिकांना, व्हाइसरॉयने गोव्याबाहेर जाण्यास बंदी केली होती.

(जकात) वसूल करीत आणि त्याबद्दल प्रवाशांचा छळ करीत. एखादे वेळी, प्रवाशांच्यापाशी पैसे नसले तर हे अधिकारी त्यांच्या अंगावरचे कपडे काढून घेण्यास मागे पुढे पाहत नसत.

पंढरपुरात मनुची : प्रवास करीत करीत मी (मनुची) विजापूर राज्याच्या सरहद्दीवर भीमा नदीच्या काठी आलो. रात्रीच्या मुक्कामासाठी मी पंढरपूर येथे थांबलो. पंढरपुरात मी इतर प्रवाशांप्रमाणे बाजारात जाऊन एका उघड्या दुकानात उतरलो. जाणारी येणारी माणसे विचारीत, तुमच्या कमरेच्या पट्ट्यात मोती भरले आहेत काय? मी म्हणे "मी एक गरीब प्रवासी आहे." परमेश्वराने त्या रात्री माझ्यावर खैर केली. मध्यरात्रीच्या सुमारास चोर गावात घुसले. मी उतरलो होतो त्या दुकानावर ते आले. ते दगडांचा वर्षाव करू लागले. मी दुकानाच्या आत आश्रय घेतला. माझ्या बरोबर एक नोकर होता. त्यासही मी आत घेऊन गेलो. चोर आत आले नाहीत, पण ते बाहेरून ओरडत होते, "तुझ्याजवळ काय आहे ते बाहेर फेकून दे" भाल्यांनी आणि तलवारींनी ते दुकानाच्या दरवाज्यावर मारा करीत होते. मी ओरडून म्हणालो "मी गरीब मनुष्य आहे. माझ्याजवळ काही नाही". मी इतका घाबरलो होतो की माझ्या तोंडातून शब्द निघेना माझ्या कमरेच्या पट्ट्यात मोती भरले आहेत असे लोकांनी काढलेले उद्‌गार मला आठवले. चोर माझा जीव घेण्यासाठीच आले आहेत असे मला वाटू लागले. माझ्या पाशी पन्नास रुपये किंमतीच्या दोन साखळ्या होत्या. त्या मी बाहेर फेकून दिल्या. चोर तेथून निघून गेले. त्यांनी बाजार लुटला आणि काही माणसे मारली. गावात एकच हलकल्लोळ उडाला होता. मी दुकानात सुरक्षित राहीन असे मला वाटेना. मी बाहेर पडलो. आणि रस्ते ओलांडून एका घरापाशी जाऊन पोहोचलो. घराचे दार उघडे होते. मी जिना चढून वर गच्चीवर गेलो. मी तेथे सुरक्षित आहे असे मला वाटले. गावातील गोंधळामुळे घर मालक जागा झाला होता. तो आपल्या खोलीचा दरवाजा उघडून तलवार घेऊन बाहेर आला. मी दिसताच मला त्याने ताबडतोब निघून जाण्यास सांगितले. मी गरीब परदेशी मनुष्य आहे; मला बाजारात लोकांनी लुटले असे मी त्याला सांगितले. मला तेथे राहू देण्याबाबत मी त्याला काकुळती केली. पण त्याने ऐकले नाही. त्याने मला घराबाहेर हाकलून लावले. नशीब माझे त्याने चोर समजून माझा बळी घेतला नाही.

तेथून मी एका देवळापाशी आलो. तेथेही लोक जमले होते व गोंधळ सुरू होता. मी देवळाच्या पायरीवर बसणार तोच तेथील पुजारी येऊन त्याने मला हाकलून लावले, पण या निष्ठुरपणाने त्याला लगेच प्रायश्चित मिळाले. कारण एक बाण सूंसूं करत आला व त्याच्या पोटरीत घुसला. त्यामुळे तेथून मी निघालो व परत बाजारपेठेत आलो. एका दुकानाचा मी आश्रय घेतला. पहाटे मी एक लवंग खाऊन गरम

पाणी प्यालो. त्यावर मला उलटी झाली. उलटीत रक्ताच्या गुठळ्या पडून गेल्या व मला आराम वाटला.

मग मी नदीकाठी आलो. एका बाजेवर बसून मी नदी ओलांडली. बाजेच्या खुरांना चार भांडी बांधलेली होती. माझा प्रवास चालू करून मी मोगल मुलखातील परेंदा[1] या गावी आलो. तेथे मला भक्कर किल्ल्यातील माझे मित्र भेटले. माझ्या या अवस्थेबद्दल त्यांना वाईट वाटले. त्यांनी मला कपडे, पैसा व एक घोडा देऊन मदत केली. मग, औरंगाबादेपर्यंतचा माझा प्रवास मी पुरा केला.

प्रवास हा एक चांगला शिक्षक आहे. तो अनेक गोष्टी शिकवतो. जो मनुष्य काही एक न शिकता नुसता भटकतो, त्याचे डोके गाढवाचेच आहे असे मानले पाहिजे. परेंदा[1] येथे मॅन्युअल दिबेरो याने मला एक घोडा दिला होता. हा घोडा काही दिवसांपूर्वी दिल्लीहून मजल मारून परेंदाला आला होता. घोडा अगदी थकून गेला होता. एके दिवशी माझ्या नोकराने घोड्याच्या चंदीत जायफळ ठेवले ते चुकून घोड्याच्या खाण्यात आले. दुसऱ्या तिसऱ्या दिवशी घोडा तरतरीतपणे वागू लागला. त्यानंतर परेंड्यापासून औरंगाबादेच्या प्रवासात घोड्याला रोज एक जायफळ देऊ लागलो.

औरंगाबादेला पोहचल्यावर मी एकान्तवासात दिवस काढू लागलो. याच सुमारास शाहाआलम शिवाजीस पकडण्याच्या प्रयत्नात होता, हे मी वर सांगितले आहे. मागे एका पाद्र्याचा जाहीर शिरच्छेदाचा मी उल्लेख केला आहे. त्या घटनेची माहिती मला औरंगाबादेस मिळाली.

औरंगाबादेहून निघून मी बऱ्हाणपुरास गेलो. बऱ्हाणपूर येथे मिर्झा राजा जयसिंगाच्या नोकरीत असलेल्यापैकी माझे अनेक जुने मित्र मला भेटले. त्या प्रसिद्ध सरदाराच्या (जयसिंगाच्या) मृत्युने माझ्या मित्रांना अतिशय दुःख झाले होते. मलाही त्याच्या मृत्युचे फार वाईट वाटले. मला डॉक्टर म्हणून धंदा सुरू करावयाचा असल्यामुळे मला त्याच्या नोकरीत पुनः शिरावयाचे नव्हते ही गोष्ट वेगळी.

बऱ्हाणपूराहून मी आग्र्याला गेलो. आग्रा येथे मी जेस्युइट पाद्र्यांची गाठ घेतली आणि गोव्यात काय चालले याची माहिती त्यांना दिली. मी आग्र्याला फार दिवस थांबलो नाही. मी तेथून दिल्लीला गेलो.

दिल्लीत पोहचल्यावर माझ्याशी लग्न करण्याची अनेक बायकांनी इच्छा व्यक्त केली. त्यांनी मला कपडे, पैसे आणि खाद्यपदार्थ पुरविले. एकीने तर पन्नास मोहरा एक घोडा आणि उंची कापड माझ्याकडे पाठविले.

---

१. परेन्दा–उस्मानाबाद जिल्हा (जुने निजामी राज्यात होता.) येथे एक जुना किल्ला होता.

राजा जयसिंगाचा धाकटा मुलगा कीरतसिंग यास मी भेटलो. राजा जयसिंग हा माझ्यावर फार प्रेम करीत असे, याची कीरतसिंगाला आठवण होती. कीरत-सिंगाचेही माझ्यावर प्रेम होते. त्याने मला उत्तम पोषाख, दोन घोडे दिले. त्याने माझा पाच रुपये रोजांना नेमला आणि एक उत्तम घर राहण्यास दिले. माझ्या भाग्याचा मत्सर करणारे लोक होतेच. मी बेरोजगार आहे आणि रोजच्या खर्चा-साठी त्यांच्याकडे येईन असे त्यांना वाटत होते. पण माझे कपडेलत्ते, घोडे, नोकर चाकर इत्यादी पाहून त्या मत्सरी लोकांना अतिशय आश्चर्य वाटले.

**बादशहा तंबाखूवरील कर रद्द करतो :** मी दिल्लीस पोहचल्यावर मला असे कळले की काही दिवसांपूर्वीच बादशहाने तंबाखूवरील कर काढून टाकला होता. असे करण्याचे कारण एक मोठी दुर्घटना झाली हे होय. तिची हकीकत अशी :—

इजाऱ्याने कर वसुलीचे काम करणारे लोक उद्धट आणि निर्लज्ज असतात हे सर्व जगाला माहित आहे, मनुष्य कितीही प्रतिष्ठित असला तरी कर वसुलीसाठी ते त्याचा मुलाहिजा ठेवीत नाहीत. अर्थात् अतिशय उच्च पदस्थांच्या वाटेला ते जात नाहीत. तेही मुसलमान असले तर ते लवकर क्षुब्ध होतात हे इजारेदारांना माहित असते. एकदा असे घडले की, एक कर्मठ मुसलमान शिपाई आपल्या बायकापोरांसह शहरात येऊ इच्छित होता. त्याची बायकापोरे एका बंद गाडीत होती. कर वसुलीच्या अधिकाऱ्याने त्या शिपायाला हटकले आणि तुझ्यापाशी काही तंबाखू आहे का, असे विचारले. मुसलमानांच्यामध्ये तंबाखू ओढण्याचे (चिलीम, हुक्का इत्यादींतून) प्रमाण बरेच आहे. दिल्ली शहराचे तंबाखू कराचे रोजी उत्पन्न मुळी पाच हजार असे. त्यावरून सबंध मोगल राज्यात तंबाखूचा वसूल किती असावा याची कल्पना येईल.

शिपायाने कर वसुलीच्या अधिकाऱ्याला सांगितले की मी निर्व्यसनी मनुष्य आहे. तंबाखू ओढीत नाही. माझ्या बायका पोरांनाही व्यसन नाही. तुम्ही माझ्या शब्दावर विश्वास ठेवा. अधिकारी म्हणाला, "माझा तुझ्यावर विश्वास नाही. मी बंद गाडीची झडती घेतो." शिपायाने सांगितले "यात माझ्या बायका मुली बेपडदा होतात. असे काही कराल तर तुम्हाला पश्चात्ताप करावा लागेल." पण त्याचे काही न ऐकता अधिकाऱ्याने गाडीचे पडदे सोडले. हे पाहून शिपायाने तलवार उपसली आणि अधिकाऱ्याला ठार मारले. अधिकाऱ्याचे इतर अनेक नोकरही जखमी झाले. इतकेच करून तो शिपायी थांबला नाही. त्याने आपली बायको व मुलगी यांनाही ठार मारले. शिपायाला पकडून कैदेत टाकण्यात आले. बादशहाकडे जेव्हा तक्रार गेली तेव्हा बादशहाने शिपायावर कृपा करून त्यास सोडून दिले आणि तंबाखूवरील कर माफ केला. मुसलमानांच्या स्त्रीने बेपडदा होणे ही अत्यंत बेअब्रूची गोष्ट समजतात. करमाफीमुळे तंबाखू

स्वस्त झाली आणि लोकांचा फायदा झाला. अर्थात बऱ्याच सावकारांचे नुकसान झाले ही गोष्ट वेगळी.

**मी (मनुची) लाहोरला जातो व वैद्यकी करू लागतो :** एक वर्षभर मी मोठ्या ऐषारामात दिल्लीत राहिलो. मग बादशहाच्या हुकुमाने कीरतसिंग[1] हा काबूलला गेला आणि मी लाहोरला जाऊन वैद्य म्हणून व्यवसाय करण्याचे ठरविले. दिल्लीत तो मला करता येईना. कारण दिल्लीत पूर्वीच काही युरोपियन लोक हा धंदा करीत होते. पण लाहोरला एकही युरोपियन डॉक्टर नव्हता.

मी लाहोरला पोहचलो. तेथे महम्मद अमीनखान[2] हा सुभेदार होता. औरंगजेबाने दिलेल्या वचनाप्रमाणे त्याला ही सुभेदारी मिळाली होती. लाहोरला पोहचल्यावर मी एका सराईत उतरलो. थोड्याच दिवसांनी दाराच्या काळचा माझा अधिकारी बर्कनदाझखान याच्या मालकीचे एक घर मी भाड्याने घेतले. मला डॉक्टरीचा व्यवसाय सुरू करायचा होता. माझ्यासंबंधी कोणी विचारले तर मी एक फिरंगी डॉक्टर आहे असे सांगण्यास मी माझ्या नोकरांना बजावून ठेवले होते. हळू हळू ही बातमी लाहोरभर पसरली. शिष्टाचार, अनुभव आणि योग्य संभाषण इत्यादींमुळे माझे नाव लोकांना माहित होऊ लागले. सुदैवाने मला सुरवातीसच लाहोरच्या काजीच्या बायकोला औषधोपचार करण्याची संधि मिळाली. माझ्या औषधयोजनेने ती स्त्री बरी झाली. या गोष्टीमुळे माझ्या वैद्यकीय कौशल्याचा अतिशय गवगवा (प्रसिद्धी) झाला.

लाहोरचा सुभेदार महम्मद अमीनखान याने मला बोलावू पाठविले. त्याने मला लहानसा पगार देऊन नोकरीत घेण्याची इच्छा दाखविली. पण त्याचा गर्विष्ठपणा माहित असल्यामुळे मी त्याची सूचना नाकारली. पण तुम्हाला व तुमच्या कुटुंबियांना माझी गरज लागेल तेव्हा मी हजर आहे, असे मी त्याला सांगितले. माझा नकार महम्मद अमीनखानाला आवडला नाही. पण परमेश्वर कृपेने लाहोरला माझा धंदा यशस्वीपणे चालला होता.

**लाहोर विषयी :** ज्या लाहोर शहरात माझा भाग्योदय झाला, त्या लाहोर शहराविषयी थोडी माहिती वाचकास मी (मनुची) देत आहे. लाहोर शहराला बारा

१. येथे काहीतरी चूक झालेली आहे. कीरतसिंग हा दक्षिणेत मरण पावला. तो दिवस होता २८ रज्जब ॥ १०८३ हि. (ऑगस्ट १९, १६७३). कीरतसिंग हा शाहआलमच्या दुसऱ्या मुलाचा-महम्मद अमीनचा सासरा होता.

२. बादशहाच्या अमदानीच्या १० व्या वर्षी १०७८ हि. (जून १६६७ ते फेब्रुवारी १६६८) च्या दरम्यान (मासीरे-आलमगिरी ६११ वी ओळ) १३ व्या वर्षी १०८० हि. (जानेवारी १६७० ते जानेवारी १६८१) मध्ये त्याला काबूलला पाठविण्यात आले. ही नेमणूक महाबतखानाच्या जागी झाली होती. या तारखा मनुचीच्या कथेशी जुळत नाहीत. कारण तो १६७२ पर्यंत दिल्लीस आला नव्हता. (वरील ग्रंथ).

दरवाजे आहेत. यक्की,[१] दिल्ली, अकबरी, मोची, शाहाआलमी, भट्टी, मुलतानी, मोरी, घक्करी, काश्मीरी अशी ही दरवाज्यांची नावे आहेत.

मोची दरवाजा हे नाव कसे पडले याची हकीकत पुढीलप्रमाणे आहे. या दरवाज्यापाशी एक चांभार राहात होता. त्याला एक सुंदर मुलगी होती. त्या मुलीवर एका पठाण तरुणाचे प्रेम जडले. तिला वश करण्यासाठी त्याने गिहो नावाच्या एका कुटिणीचे सहाय्य घेतले. त्या बाईने आपण वैद्य आहोत असा बहाणा केला. त्या मुलीचे प्रेम त्या पठाणावर होते. गिहोच्या सांगण्यावरून मुलीने आपण आजारी असल्याचे सोंग केले. गिहोने औषधाची पेटी मुलीच्या खोलीत आणली पण त्या पेटीत तो पठाण तरुण लपला होता. तीन दिवस तो त्या पोरीबरोबर होता. नंतर मुलीने आपली प्रकृति बरी झाल्याचे बापाला सांगितले. बापाने त्या भोंदु वैदिणीला बक्षिस दिले. ती वैदिण पेटी घेऊन जाऊ लागली. पेटी उचलण्यास बापाने तिला मदत केली. रस्त्यातून पेटी नेत असताना समोरून काही उंट मोकाट सुटलेले आले. मुलीच्या बापाच्या हातून पेटी खाली पडली. पेटीचे झाकण उघडले आणि तीतून तो पठाण तरुण बाहेर येऊन पळू लागला. चांभाराला तेव्हा कुठे सगळी लबाडी समजून आली. लाहोरभर या गोष्टीचा गवगवा झाला. त्यावेळेपासून त्या दरवाजाला चांभार दरवाजा म्हणजे मोची दरवाजा असे म्हणू लागले.

शहराभोवती पक्क्या विटांच्या भिंती व बुरुज आहेत. या शहरातील घरे उंच आहेत. काही घरे तर आठ मजली आहेत. लाहोर शहराची लोकसंख्या किती असेल हे सांगणे सोपे नाही. लाहोरच्या कोतवालाने मला पुढीलप्रमाणे माहिती दिली "आम्ही सहा हजार वेश्यांतून आठवड्यांचा कर वसूल करतो" या विधानावरून उघडपणे वेश्याव्यवसाय करणाऱ्यांच्या संख्येचा अंदाज करता येईल. गुप्तपणे व्यवसाय करणाऱ्या वेगळ्याच. शहरात श्रीमंत आणि सधन व्यापारी पुष्कळ असून त्यांचे सगळ्या हिंदुस्तानशी संबंध आहेत. काबूल बल्ख, तार्तरी, काश्मीर, इराण, बलोच, मुलतान, भक्कर आणि टहा इत्यादी राज्ये आणि प्रांत यांच्याशी व्यापाराची ही किल्लीच होय. लाहोर येथे परदेशी लोक खच्चून भरले आहेत. शहरात सुंदर बागा आहेत त्यांत, अंजिरे, तुती, द्राक्षे, आंबे, कलिंगडे, खरबुजे इत्यादी फळे मुबलक मिळतात. विशेषतः नाशपती फळे वजनाने मोठी व संख्येने विपुल आढळतात. एकदा सहज कुतूहल म्हणून मी एक नाशपतीचे वजन केले. ते फळ १३ औंस भरले. लाहोरचे हवा पाणी उत्तम आहे. येथील लोकांचा एकंदरीत वर्ण लालसर असून गौरवर्णाकडे झुकता आहे. हे लोक, विशेषतः खेड्यातील लोक साधे

---

१. यक्की हे नाव यक्की नावाच्या साधूवरून पडले. आज विद्यमान असलेल्या तेरा दरवाज्यांच्या नावांपैकी आठ नावे मनुचीच्याच वेळची चालू आहेत. कादिर, मुलतानी, ही नावे बदलली आहेत. पाच नवीन नावे पुढे आली आहेत, ती म्हणजे; रोशनाई, मस्ती, खिजरी, लोहारी, टकसाली ही होत.

आणि मनमिळाऊ आहेत. येथे विहिरी पुष्कळ आहेत. मोटांच्या द्वारे विहिरीतून पाणी काढले जाते.

**इस्लामखान बसऱ्याहून येतो :** इ. स. १६७३ (सोळाशे त्र्याहत्तर) मध्ये इराकमधील बसरा येथील अधिकारी इस्लामखान[1] हा आपल्या सहाशे अनुयायांसहित, हिंदुस्तानात पळून आला. तुर्कस्तानाच्या सम्राट याने आपल्या या अधिकाऱ्याचा शिरच्छेद करावा अशी आज्ञा केली होती. यास कारण काय घडले हे मला माहित नाही. इस्लामखानापाशी मोत्यांच्या रूपाने बरीच संपत्ति होती. औरंगजेबाने त्याचे स्वागत केले. आपल्या राज्याला या प्रमुख सरदाराचा लाभ व्हावा म्हणून औरंगजेबाने इस्लामखानाच्या मुलाला मुरादबक्षाची मुलगी देण्याची इच्छा व्यक्त केली. इस्लामखानाला हा संबंध पटला नाही. औरंगजेबाने इस्लामखान आणि त्याचा मुलगा यांना मोठ्या हुद्यावर चढविले. पण आतून त्याचा विश्वासघात करण्याचाही बेत आखला. त्याने इस्लामखानाला विजापूरच्या मोहिमेवर पाठविले. या मोहिमेची सूत्रे बहादूरखानाकडे होती. लढाईच्या गर्दीत इस्लामखानाला एकाकी पडू द्या, असे औरंगजेबाने बहादूरखानाला बजावून ठेवले. या लढाईत विजापूरचा सरदार सरजाखान याच्याशी लढत असताना इस्लामखान आणि त्याचे पथक हे मारले गेले. आपल्या इच्छेप्रमाणे न वागणाऱ्यांना औरंगजेब कधीच क्षमा करत नसे.

**राजकन्यांचे विवाह :** (राज घराण्यातील विवाह)[2] इ. स. १६७२ (?) या वर्षी बल्ख येथील नक्षबंदी या पंथाच्या गुरू घराण्यातील (पीर) एका मुलाशी (पीरजाद्याशी) मुरादबक्षच्या मुलीचे लग्न झाले. याच वर्षी औरंगजेबाच्या दोन मुली झिनतुन्निसा आणि बद्रुन्निसा (खरी नावे जुबतुन्निसा आणि मेहरून्निसा ही होत)

१. बसऱ्याचा हुसेनपाशा याचा हा भाऊ होता, इराणला पळून गेला आणि तेथून हिंदुस्थानात आला. बादशहाच्या आमदानीच्या १२ व्या वर्षी १०८० हि. (जुलै ११, १६६९) तो दिल्ली जवळील आग्राबादला पोहचला, त्याला दरबारात बोलावण्यात आले आणि इस्लामखान ही पदवी देऊन माळव्याचा सुभेदार करण्यात आले. पण १०८२ हि. (१६७२-७३) ला त्याच्यावर बादशहाची इतराजी झाली. त्याला दक्खन मध्ये बहादूर खानाच्या हाताखाली देण्यात आले आणि तिकडे तो लढाईत मारला गेला. (रवी १०८७ हि. (जून १७, १६७६) पाहा मासीरे-आलमगिरी ८५, १२१ मासीरे-उल-उमरा २४१-२४७ आणि (तारीख इ-मुहाम्मदी).

२. राजघराण्यातील विवाहासंबंधी, बर्नियर म्हणतो की राजपुत्र अकबराच्या लग्नाचे घाटत होते. लग्न झाले असे तो म्हणत नाही. दाराची मुलगी जानी बेगम हिचे लग्न औरंगजेबाचा तिसरा मुलगा महम्मद आज्जमशी झाले. १०७९ हि. (जुलै २८, १६६८) ती अहमदाबाद येथे १०९९ हि. (जानेवारी १, १६८९) रोजी मरण पावली. महम्मद आज्जमला प्रथम २ वर्ष (१६७५-७७) मुलतानला पाठविण्यात आले होते आणि नंतर बिहार-बंगालचा सुभेदार म्हणून पाठविण्यात आले. खाफी खानाने जानी बेगमच्या शौर्याचे वर्णन केले आहे. महम्मद सलीम ख्वाजा ताहीर नक्षबंदीचे मुरादबक्षाची मुलगी अगाइशबानी बेगम हिच्याशी लग्न झाले. १०८३ हि. (सप्टेंबर १६७२) दाराचा मुलगा सिपीहर शुकोचे, मुरादबक्षाच्या दुसऱ्या एका मुली बरोबर (जुबदतउन्निसा) लग्न झाले. (फेब्रु. १६७३). इतिहासाप्रमाणे बद्रीउन्निसा हिचे कधीच लग्न केले नाही. ती २८ जिलकाद आमदानीचे १६ वे वर्ष १०८३ हि. (मार्च १८, १६७३) ला मरण पावली.

यांची लग्ने अनुक्रमे दारा आणि मुरादबक्ष यांच्या मुलांशी झाली. औरंगजेबाचा मुलगा सुलतान आज्जम याचे लग्न दाराची मुलगी जानी बेगम हिच्याशी झाले. या सुमारास औरंगजेबाने आज्जम याला आजम तारा ही पदवी दिली. लग्नानंतर औरंगजेबाने आज्जमला बंगालच्या सुभेदार म्हणून रवाना केले.

याच सुमारास एक मौजेची घटना घडली. काजी अब्दुल वहाब[1] हा मोगल साम्राज्याचा मुख्य न्यायाधीश होता, हे पूर्वीच सांगितले आहे. या काजीच्या मुलीची इच्छा अशी होती की आपलेही लग्न वर निर्देश केलेल्या लग्नाच्या वेळीच व्हावे. पण बापाचा त्याला विरोध होता कारण घरचा सर्व कारभार तीच पाही. मग तिने शेजाऱ्या एका तरुणाशी मैत्री केली. बापाला याची काहीच वार्ता नव्हती. मग ती दोघे एका बंद पालखीत (मेणा) काजीच्या कचेरीत गेली. तेथे त्या तरुणाने आपले व पालखीत असलेल्या तरुणीचे लग्न लावण्याची काजीला विनंती केली. काजीने पालखीतल्या तरुणीला, "त्या तरुणाशी लग्न करण्यास तू तयार आहेस काय ?" असे विचारले. काजीच्या मुलीने—त्या तरुणीने—आवाज बदलून 'होय.' म्हणून उत्तर दिले. मग काजीने त्याचे लग्न लावून दिले.

सर्व गोष्ट उघडकीस आल्यावर काजी लग्न लावल्याचे नाकारील, म्हणून तो तरुण एका मध्यस्थामार्फत बादशहाकडे गेला. त्याला लग्नाची सर्व हकीकत त्याने (तरुणाने) बादशहास सांगितली. बादशहाला या गोष्टीची मोठी मौज वाटली. त्याने काजीला कचेरीतून घरी जाण्यापूर्वी राजवाड्यात येऊन जाण्यास सांगितले. बादशहा त्याला एवढेच म्हणाला "जे काही तू आज केलेस ते योग्यच होते." काजी बुचकळ्यात पडला. घरी गेल्यावर, मुलगी घरी नाही असे त्यास आढळले. शोधाशोध करता त्यास कळले की, आपण आज ज्या मुलीचे लग्न लावले ती आपलीच मुलगी होती. घरातून निघून जाताना तिने सर्व पैसा अडकाही नेला होता. या धक्क्यामुळे त्याला हृदयविकार जडला आणि थोड्याच दिवसांनी तो मरण पावला.[2]

**रोशनआरा बेगमचा मृत्यु** : या वर्षी औरंगजेबाची बहिण रोशनआरा बेगम हिचा मृत्यु झाला. अंतःपुरातील भानगडीमुळे औरंगजेबाने तिच्यावर विषप्रयोग करविला असे मनुची म्हणतो.[3]

---

१. काजी अब्दुल वहाब—औरंगजेबाचे राज्यारोहण समर्थनीय आहे, असा पुकार देऊन न्यायाधीशाची जागा मिळविणारा, लाचखाऊ आणि मदिराभक्त अब्दुल वहाब तो हाच. याचा उल्लेख मनुचीने पूर्वी केला आहे.

२. गुजरातमधील बोहरा जातीतील मनुष्य.—काजी अब्दुल वहाब, १८ रमजान १०८६ हि. (८ डिसेंबर १६७५) ला दिल्ली येथे मरण पावला. (मासीरे-आलमगिरी), १४८ आणि (तारीख-इ-मुहम्मदी).

३. रोशनआरा बेगम, ही १७ जमादा १०८२ हि. (२१ सप्टेंबर १६७१) ला अकबराबाद येथे ५६ व्या वर्षी मरण पावली. (तारीख-मुहम्मदी).

**काशगरचा बादशहा :** या वर्षी काशगरचा बादशहा हा पळून औरंगजेबाकडे आश्रयास आला. त्याच्या मुलाने बंड करून गादी बळकावली होती. औरंगजेबाने बादशहाचे स्वागत करण्यासाठी, वजीर जाफरखान आणि इतर सरदार पाठविले. पदच्युत बादशहाला रूस्तुमखान दख्खनी यांच्या वाड्यात उतरविण्यात आले. आपण मक्केच्या यात्रेला जातो अशी इच्छा या बादशहाने—अब्दुल्ल खानाने व्यक्त केली. औरंगजेबाने त्याला सुरतेपर्यंत संरक्षण दिले.[1]

**पठाणांचे बंड :** याच वर्षी एक पठाण, तोतया शाहाशुजा म्हणून उपस्थित झाला. त्याने हा हा म्हणता तीस-चाळीस हजार माणसे जमविली. हे बंडखोर सिंधुनदी पार करून आले. औरंगजेबाने त्यांच्याविरुद्ध तातडतोब उपाययोजना केली. बंड मोडले. पण शहाशुजाचे सोंग करणारा पठाण बंडखोर जिवंत राहिला. त्याने पुनः माणसे गोळा केली. औरंगजेबाने हसन अब्दालच्या सुभेदारास सांगून काही पठाणांच्या करवी या भोंदू शाहाशुजाला विषप्रयोग करविला आणि हे बंड मोडून काढण्यात आले. औरंगजेबाविरुद्ध बराच असंतोष होता, यात शंका नाही. विशेषतः हा असंतोष पठाण जमातीत होता. या पठाणांची संख्या तीन लाख असली पाहिजे.[2]

**सुलतान महम्मदचा मृत्यु :** या सुमारास औरंगजेबाचा मोठा मुलगा सुलतान महम्मद हा मरण पावला[3]. सुलतान महम्मदावर विषप्रयोग झाला असे मनुचीचे म्हणणे आहे. हे वर्ष १६७१ हे होय.

**महम्मद अमीनखानाशी झालेला माझा झगडा :** महम्मद अमीनखानाने याचवर्षी मला अतिशय त्रास दिला. बादशहाने त्याची लाहोरहून काबूलला महाबतखानाच्या जागी सुभेदार म्हणून बदली[4] केली. त्याच्या मनात मला बळजबरीने आपल्या बरोबर न्यावयाचे होते. त्याने मला अनेक आश्वासने दिली. पण मी त्या माणसाला पक्का ओळखत होतो. उपदंशासारख्या घाणेरड्या रोगाने तो पछाडला असताना तो बरा करण्यासाठी मला दररोज दहा रुपये देण्याचे त्याने आश्वासन दिले होते. नंतर आपला शब्द विसरून ठरलेली रकम मला देण्याचे त्याने नाकारले. मग मी लाहोर न सोडण्यासाठी काही तरी सबबी सांगितल्या.

१. काशगरचा बादशहा अब्दुल्लाखान बेगखी हा पदच्युत झालेला होता. मक्केच्या यात्रेहून तो १६७१ मध्ये हिंदुस्थानात परतला. ३० ऑगस्ट १६७५ रोजी तो दिल्ली येथे मरण पावला.

२. पठाणांचे हे बंड १६७३-७४च्या सुमारास घडले. या बंडात मोगल अधिकारी शुजातखान हा मारला गेला. शुजातखानाचे पहिले नाव रादअंदाजखान असे होते. अबदुल्लाहिम उर्फ अकमलखान तिराईस्तानी कंधारी याचा मुलगा असून पठाणांशी लढताना हा (रादअंदाजखान उर्फ शुजातखान) २४ फेब्रुवारी १६७४ रोजी मारला गेला.

३. इ. स. १६७६ हेच बरोबर वर्ष होय. सुलतान महम्मदाचा मृत्यु १६७१ त नव्हे. (तारीख-इ-मुहम्मदी).

४. अमदानीच्या १३ व्या वर्षी महम्मद अमीनखानाची (१६७०-७१) काबूलला नेमणूक झाली. (मासीरे-उल-उमरा iii ७१६, मासीरे आलमगिरी १०४).

आपल्या लवाजम्यासह त्याने लाहोर सोडले. मला बळजबरीने नेण्याचा आपल्या लोकांना त्याने हुकूम केला. अशा प्रकारे मी त्याच्या बरोबर तीन दिवस गेलो. लाहोराजवळ रावी आणि पुढे चिनाब ओलांडून आम्ही गुजरात गावापर्यंत गेलो. मी त्याच्याबरोबर असावे अशी महम्मद अमीनखानाच्या बायकोची पण इच्छा होती. तिच्या मुलीला मी बरी केली होती. निदान मुलीसाठी तरी आमच्या बरोबर चल असे ती म्हणाली. मुसलमानांच्यात स्त्रियांना बेपडदा करीत नाहीत. पण असे तिने आपल्या मुलीला माझ्याबरोबर आणून ही विनती केली. मी गुजरात गावापर्यंत आलो खरा, पण परत जाण्याचा माझा बेत मी काही सोडला नाही. जबरदस्तीच्या नोकरीमुळे कोण स्वस्थ राहू शकेल ? महम्मद अमीनखान आणि त्याचा लवाजमा यांचा प्रवास उन्हाळ्यामध्ये रात्री होत असे. माझ्या बरोबर एक इंग्रज होता. गुजरात गावातून[1] काही औषधे विकत घ्यावयाची आहेत, असे सांगून, आणि हेच उत्तर महम्मद अमीनखानाला दे असे सांगून, मी छावणी सोडून निघालो.

महम्मद अमीनखानाने आपल्या शिपायांना सक्त ताकीद दिली होती की, कोणासही नदी ओलांडू द्यायची नाही. जासुदासाठी ठेवलेल्या नावेखेरीज काहीही नदीकाठी राहू द्यावयाचे नाही. परंतु माझ्या नोकरांना सांगून माझी नाव मी परत येईपर्यंत राखून ठेवण्याची मी काळजी घेतली होती. मी नावाड्याला सांगितले होते की मी महाबतखानाचा जासूद आहे. मला नदीपार नेण्यास मी त्याला सांगितले. नदी ओलांडू लागलो तेव्हा उजाडू लागले होते. पहाटे मला महम्मद अमीनखानाचे लोक भेटले. त्यांना मी सांगितले की त्याचा मुलगा मिर्झा अब्दुल्ला[2] आजारी आहे. त्याला औषध देण्यासाठी महम्मद अमीनखानाने मला पाठविले आहे आणि मग झपाट्याने मी लाहोरकडे निघालो आणि त्याचे लोक मला गाठण्यापूर्वीच मी लाहोरला पोहोचलो.

परंतु महम्मद अमीनखानाने कपट करून माझा नाश करण्याचे ठरविले. त्याने लाहोरचा किल्लेदार आणि हंगामी सुभेदार गिताार, स्वतःचा वकील, लाहोरचा कोतवाल आणि लाहोरचा काजी या सर्वांना मला पकडून छावणीत परत पाठविण्यासंबंधी लिहिले. मी नकार दिला तर, पाच लाख रुपये मी चोरल्याचा आरोप माझ्यावर लादावा असेही त्यांना कळविले होते. हा आरोप खोटा आहे हे त्यांना माहित होते. पण महम्मद अमीनखान हा मोठा मनुष्य असल्यामुळे त्याच्या म्हणण्याप्रमाणे ते प्रयत्न करू लागले. मी काही स्वस्थ नव्हतो. लाहोरमध्ये मी माझ्या घरात राहातच नव्हतो; बागांमधून लपून छपून राहत असे आणि वेषांतर करून सारख्या जागा बदलीत असे.

१. पंजाबातील एक गाव. चिनाब नदीच्या तीरापासून ८ मैलांवर आहे.

२. महम्मद अमीनखानाचा मुलगा मिर्झा अब्दुल्ला हा मोहरम ३, १०८३ हि. (एप्रिल ३०, १६७२) ला पेशावरच्या सरहद्दीवर मारला गेला.

असा प्रकार चाळीस दिवस चालला होता. अमीनखानाने एक जाहीरनामा पण काढला. मला जो पकडून देईल त्याला बक्षीस देण्यात येईल, उलट मला आश्रय देणाऱ्याकडून पाच लाख रुपये वसूल करण्यात येतील असे जाहीरनाम्यात नमूद होते.

याच सुमारास महम्मद अमीनखानाच्या जागी नेमलेला लाहोरचा सुभेदार फिदाई-खान[1] लवकरच येऊन पोहोचणार होता. त्याचे व महम्मद अमीनखानाचे संबंध सलोख्याचे नव्हते. आपण लाहोरला लौकर येऊन पोहचत आहोत. तोपर्यंत माझ्या नावाने सुभ्याचा कारभार पाहावा अशा प्रकारची पत्रे, फिदाईखानाने हंगामी सुभेदार, कोतवाल आणि काजी यांना पाठविली. याबरोबरच दोनशे स्वारांचे पथकही रवाना केले. लाहोरमधील प्रत्येक न्यायालयासमोर फिदाईखानाची माणसे न्यायदानाचे काम नीट चालले आहे की नाही हे पाहण्यासाठी तैनात असत. मला हे कळले. मी लाहोरला आलो, कोतवालाच्या कचेरीत आणि नायब सुभेदाराच्या कचेरीत तैनात असलेल्या फिदाईखानाच्या स्वारांशी मी बोललो. त्याने मला मदत करण्याचे कबूल केले. कोतवाल व इतर अधिकारी यांनी महम्मद अमीनखानाच्या भीतीमुळे मला पकडले. तुझ्याकडे महम्मद अमीनखानाचा काही हिशेब द्यावयाचा आहे यासाठी तुला अमीनखानाकडे जावे लागेल असे कोतवालाने मला सांगितले. मला पकडून नेत होते, तेव्हा फिदाईखानाचे स्वार मध्ये पडले, आणि मी (मनुची) फिदाई-खानाचा खाजगी वैद्य आहे, असे म्हणू लागले. एका माणसाच्या जामीन देऊन माझी सुटका झाली.

या सुमारास फिदाईखानाचा[2] मुलगा मिर्झा सालेह हा लाहोरास येऊन पोहचला. मी त्याला जाऊन भेटलो. पुढे फिदाईखान आल्यानंतर मिर्झा सालेहने माझी आणि त्याची गाठ घालून दिली. फिदाईखानाने कोतवालाला बोलावून पाठवून मला कोणी त्रास देऊ नये अशी त्याला ताकीद केली. फिदाईखानानेही मला नीट वागविले.

महम्मद अमीनखानाचा पठाण लोक पाडाव करतात : पठाण हे लढाऊ लोक. इतर सुभेदार त्यांच्याशी गोडीगुलाबीने वागत. पण महम्मद अमीनखान हा गर्विष्ठ मनुष्य होता. त्याने पठाणांच्याकडून खंडणीची मागणी केली. गोडीगुलाबीने खंडणी देणार नसाल तर जबरदस्तीने ती वसूल करीन अशीही त्याने धमकी दिली.

पठाणांनी महम्मद अमीनखानाचा पुरता पाडाव करण्याचे ठरविले. महम्मद अमीनखानाबरोबर चाळीस हजार स्वार, दोन लाख पायदळ आणि बराच सरंजाम

१. आमदानीच्या १३ व्या वर्षी १०८०-८१ हि. (जानेवारी २३, १६७० ते जानेवारी ११, १६७१ च्या सुमारास) ला फिदाईखानाची लाहोरला नेमणूक झाली. (मा-आसीर-उल-उमरा ii २४०)

२. फिदाईखान हा औरंगजेबाचा दूधभाऊ बहादुरखान याचा मोठा भाऊ होय. फिदाईखान उर्फ मुजफ्फरखान कोका, याचा मृत्यु ११ मे १६७८ रोजी झाला. त्याचा मुलगा मिर्झासालेह खान याला फिदाईखान ही पदवी होती.

होता. पेशावर पुढे असलेल्या डोंगराळ भागात ते सैन्य पोहोचल्यावर पठाणांनी महम्मद अमीनखानावर हल्ला चढविला.

महम्मद अमीनखान हा पठाणांचा वेश घेऊन मोठ्या कष्टाने पेशावरला आला. त्या हल्ल्यात मोगल सैन्य गारद झाले. महम्मद अमीनखानाचा मुलगा मिर्झा अब्दुल्ला[1] आणि मेहुणा मिर्झा सुलतान हे मारले गेले. महम्मद अमीनखानची आई, बहीण, मुलगी इत्यादींना पठाणांनी कैद केले.

नेताजी : बादशहाने महाबतखानाची पुनः एकदा काबुलकडे रवानगी केली. (डिसेंबर १६७२ ते डिसेंबर १६७३ च्या दरम्यान) त्याच्या सैन्यात शिवाजीचा एकेकाळचा अधिकारी नेताजी हा होता, तो ही संधि साधून काबूल प्रांतातून पळाला. त्याचा प्रयत्न यशस्वी झाला नाही. नेताजीला पकडून लाहोरला आणण्यात आले. तेथे त्याला एका पिंजऱ्यात ठेवण्यात आले. बादशहाने हुकूम पाठविला की, नेताजी मुसलमान होत नसेल तर त्याचा शिरच्छेद करण्यात यावा. नेताजीने धर्म बदलण्याचे सोंग केले. त्याला त्याचा जुना हुद्दा देण्यात आला आणि सिंधू नदीच्या पलीकडे जाण्याची त्याला आज्ञा करण्यात आली. काही महिन्यानंतर नेताजी पुनः नाहीसा झाला आणि शिवाजीच्या मुलखात निघून गेला. तेथून तो मोगलांच्या विरुद्ध आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे लढू लागला.

पेशावरला आल्यानंतर महम्मद अमीनखानाने खंडणी भरून आपली आई, बहीण आणि मुलगी यांना सोडविले. महम्मद अमीनखानाची संपत्ति अफाट होती. असे म्हणतात की, बादशहाकडून पगार न मिळता १२ हजार घोडदळाचे सैन्य ८० वर्षे पर्यंत आपल्यापाशी बाळगण्याइतकी त्याच्यापाशी संपत्ती होती.

महम्मद अमीनखानाची बदली गुजरातच्या सुभ्यावर करण्यात आली. पेशावरहून गुजरातकडे जाताना महम्मद अमीनखान हा लाहोरच्या वाटेने गेला. त्याने मला भेटण्यास बोलाविले आणि माझे चुकले, असे त्याने कबूल केले. खोटा आरोप करून त्याने माझी जी बेअब्रू केली होती, तिचे परिमार्जन अशा प्रकारे झाले.

महम्मद अमीनखान याने गुजरातच्या सुभ्याचा अधिकार घेतला. तेथेही गर्विष्ठ-पणाचा लोकांना अनुभव आला आणि त्याला औरंगजेबाची बोलणी खावी लागली. गुजरातच्या सुभ्यावर असताना थोड्या दिवसांतच तो मरण पावला. (४ जून १६८३)[2]

---

१. सैयद सुलतान करबलाई आणि मिर्झा अब्दुल्ला हे खैबर खिंडीत अफगाणांच्या (पठाणांच्या) बरोबर झालेल्या युद्धात मारले गेले. ता. ६ मे १६७२ (तारीख-इ-मुहम्मदी १०८३. मासीर-उल-उमरा iii ६१७).

२. महम्मद अमीनखान हा अहमदाबादेस ८ जमादी ॥ १०९३ हि. (४ जून १६८३) ला मरण पावला (मा-उल-उमरा. iii ६१९).

**औरंगजेब शिवाजीबरोबर तह करतो :** पठाणांना शासन करावे याची तळमळ औरंगजेबाला होती. पण नेमके याच सुमारास त्याची शिवाजी व विजापूरकर यांच्याशी युद्धे चालू होती. यामुळे पठाणांच्यावर त्याला मोठी मोहीम करता येईना. म्हणून पठाणांचे प्रकरण गोडीगुलाबीने मिटविण्यासाठी त्याने फिदाईखानाला पेशावरला पाठविले. पण ही गोष्ट गोडीगुलाबीने मिटण्यासारखी नाही, असे फिदाईखानाचे मत होते. पठाणांच्या मध्ये दहशत निर्माण करण्यासाठी औरंगजेबाने आपल्या तोफखान्याचा अधिकारी रादअंदाजखान याच्या बरोबर मोठे सैन्य देऊन त्याला पठाणांच्या विरुद्ध पाठविले. त्यांच्याशी लढत असताना रादअंदाजखान मारला गेला. (२४ फेब्रुवारी १६७४)[1] पठाणांनी त्याच्या सैन्याचा नाश केला. पठाण आपल्या प्रदेशात अतिशय बलवान होते. त्यांच्या शक्तीला पुरेसा आळा घालू शकेल अशी सेनाच त्यावेळी नव्हती. हिंदुस्थानचे तख्त व दिल्लीची मालकी एकदा आपणाकडे होती. याची पठाणांना जाणीव होती. शेरशहाच्या मृत्यूनंतर त्यांनी पागोटे घालण्याचे सोडून देऊन कपड्याचा एक तुकडाच फक्त डोक्यावर घालण्याचे सुरू केले होते. पठाण बादशहा दिल्लीवर येईपर्यंत ही पद्धत चालू ठेवण्याचे त्यांनी ठरविले होते. पठाणांच्या युद्धाला तोंड लागल्यामुळे औरंगजेबाला शिवाजीशी तह करणे भाग पडले. पठाणांच्यावर चढाई करून त्यांचा नायनाट करण्याचे औरंगजेबाने ठरविले. पूर्वी हाती घेतलेल्या लढायात जसे यश मिळत असे तसेच येथेही पडेल असा त्याला विश्वास वाटत होता. म्हणून पठाणांवरील या मोहिमेसाठी औरंगजेबाने दक्षिणेकडून बरेच सैन्य उत्तरेकडे हलविले. दक्षिणेत बहादूर खान हा विजापूरकरांविरुद्ध मोहीम चालवित राहिला.

**शिवाजीची कर्नाटकातील मोहीम :** आपले सैनिक निष्क्रिय रहावेत आणि त्यांच्या तलवारी गंजून जाव्यात असे शिवाजीला कधीच वाटत नसे. कर्नाटकात काही सरदार आणि मांडलिक राजे हे, विजापूर आणि गोवळकोंडा यांच्या विरुद्ध बंड पुकारून उठले होते. त्यांचा पाडाव करण्यासाठी आपण कर्नाटकात जात आहोत. त्यासाठी तुमच्या राज्यातून जाण्याची परवानगी द्या असे शिवाजीने गोवळकोंड्याच्या बादशहाला सांगितले. गोवळकोंड्याच्या बादशहाने शिवाजीची सूचना मान्य केली. शिवाजी हा गोवळकोंडा मार्गाने कर्नाटकात उतरला. कर्नाटकात त्याने जिंजीचा[3] मोठा किल्ला घेतला. जिंजीच्या किल्ल्याच्या परिसरात संचित केलेल्या

१. रादअंदाजखान (शुजातखान) याला (आमदानीचे १६ वे वर्ष) शबान, ७, १०८४ हि. (नोव्हेंबर १७, १६७३) मध्ये पाठविण्यात आले. तो १८ जुल्कादाह १०८४ हि. (फेब्रुवारी १४, १६७४ ला मारला गेला (मासीरे-आलमगिरी)

२. शिवाजी हा १६७७ त गोवळकोंड्याला गेला होता. त्याच वर्षाच्या मे महिन्यात त्याने जिंजीचा किल्ला जिंकला. नंतर वेलूरला वेढा देऊन तो किल्लाही जिंकून घेतला. तीन इतर किल्लेही ताब्यात आले (ग्रँट डफ १२३).

३. जिंजी :— मद्रासच्या नैर्ऋत्येस ८० मैलावर आहे.

सात टेकड्या आहेत. कर्नाटकात अनेक राजे आणि पाळेगार होते. परंतु एक होऊन शिवाजीचा प्रतिकार करणे त्यांना जमले नाही. शिवाजीने एका तडफेच्या वहिरी ससाण्याप्रमाणे त्यांच्यावर झडप घातली. त्याने अनेक महत्त्वाचे किल्ले जिंकून घेतले. आणि विजापूरचा बराच मुलूख आपल्या ताब्यात आणला. या विजयामुळे शिवाजीचे बळ वाढले आणि यामुळे तो पुढे औरंगजेबाच्या सैन्याचा प्रतिकार करू शकला.

इकडे हे विजय चालू असताना शिवाजीला काळजीचे एक कारण निर्माण झाले. शिवाजीचा मुलगा संभाजी हा अनावर वृत्तीचा होता. तो पर स्त्रियांच्यावर हात टाकी. त्यामुळे शिवाजीकडे त्याचे अधिकारी आणि इतर माणसे यांच्याकडून तक्रारी येऊ लागल्या. त्यांच्या असंतोषातून एखादे बंड उद्‌भवले तर शिवाजीची फार हानी होणार होती. आपल्या उपदेशाकडे संभाजी लक्ष देत नाही हे पाहून शिवाजीने त्याला पकडून एका किल्ल्यावर कैदी म्हणून पाठविले. आपला धाकटा मुलगा रामराजा याला आपल्या मागे राज्य मिळावे अशी शिवाजीची इच्छा होती. रामराजा याला सध्या शिवाजी ( राजा ) म्हणून संबोधतात. संभाजीला आपल्या बापाच्या हेतूची जाणीव झाली. आपण मोगलांच्या इलाख्यात गेलो तर औरंगजेबाला आनंदच होईल, हे जाणून संभाजीने औरंगजेबाला विनंती केली. संभाजी मोगलांकडे गेला[1]. तेथे त्याचे अत्यंत स्नेहाने स्वागत करण्यात आले.[2]

**औरंगजेब पठाणांवर स्वारी करतो :** औरंगजेब हा पठाणांवर स्वारी करण्यासाठी स्वतः निघाला. आपला निर्धार दाखविण्यासाठी उन्हातान्हातून तो भाला हातात घेऊन घोड्यावरून जाई. आपण पठाणांचा नाश करणार आहोत हा निर्धार व्यक्त करण्याची त्याची ही पद्धत होती. त्याचे अधिकारी त्याला थोडे सौम्याने घेण्याची विनंती करीत ती तो नाकारी. त्याच्या अधिकाऱ्यांना पठाणांचे शौर्य, त्यांची चिकाटी, आणि त्यांचे बळ यांची माहिती होती. त्यांच्याशी वागताना वेगळी मसलत करावी असा त्यांचा सल्ला होता. पण औरंगजेबाला वाटे की आपण स्वतः मोहिमेत असलो तर सर्व काही सुरळीत होईल. अशाच एका पठाण मोहिमेत अकबराला ८० हजार स्वार गमवावे लागले हे औरंगजेब विसरला होता. औरंगजेब कोणाचे ऐकेना. तो स्वारीवर निघाला. लाहोरमध्ये येऊन त्याने आपला जनानखाना तेथे ठेवला. फार थोड्या स्त्रिया बरोबर घेऊन तो पुढे निघाला आणि सिंधु नदीजवळ हसन अब्दाल[3] येथे त्याने आपला तळ दिला ( ६ जून १६७४ ).

---

१. ही घटना १६७९ त घडली असे ग्रँट डफने म्हटले आहे. प्रत्यक्षात संभाजी हा आपल्या बापाच्या कैदेत पन्हाळगडावर होता आणि नंतर मोगलांचा अधिकारी दिलेरखान याजकडे तो पळून गेला (ग्रँट डफ १२९).

२. संभाजी मोगलांच्याकडे डिसेंबर १६७८ मध्ये गेला तो परळीच्या किल्ल्यावरून, पन्हाळ्यावरून नव्हे.

३. हसन अब्दाल :- हे रावळपिंडी जिल्ह्यातील गाव आहे. १०८५ हि. त औरंगजेब (एप्रिल १६, १६७४) तिकडे निघाला आणि तेथे त्याने आपला तळ दिला. जून ६, १६७४ (मासीरे-आलमगिरी, १३२, १३३)

ही स्वारी सव्वीस महिने चालू होती. बादशहाला पठाणांच्यावर आपले वर्चस्व यत्किंचितही दाखविता आले नाही. उलट त्याचे काही धुरंधर सेनाधिकारी त्याने गमावले. शेख मीरचा[1] मुलगा पठाणांच्या कैदेत सापडला. खंडणी भरून त्याची सुटका करावी लागली. शेवटी पठाणांना जिंकणे कठीण आहे असे त्याला दिसून आले आणि आपल्या इभ्रतीला व कीर्तीला धक्का पोहोचेल या जाणीवेने इतर उपाय योजण्याचे त्याने ठरविले. पठाणांचा हा जो जोराचा प्रतिकार होतो आहे, त्याला महाबतखानाचे प्रोत्साहन असावे असा औरंगजेबाला संशय आल्यामुळे त्याने त्याला काबूलहून दूर केले.

या अपमानाने संतापल्यामुळे महाबतखानाने पठाणांच्या मदतीने बंड करण्याचे व स्वतःला काबूलचा बादशहा म्हणून जाहीर करण्याचे ठरविले. परंतु त्याच्या मित्रांनी या गोष्टीला विरोध केला. ते त्याला म्हणाले "तुमचे वडील महाबतखान यांची राज-निष्ठा तुम्हाला आठवत नाही काय ? जहांगीर बादशहा महाबतखानाच्या तावडीत सापडले असताना तो जहांगीर बादशहाला ठार मारू शकला असता पण तसे त्याने केले नाही." महाबतखान काहीशा संतापलेल्या मनःस्थितीत औरंगजेबापाशी आला. औरंगजेबाने त्याला पंजाबातून पुढे हिंदुस्थानात परतण्याची आज्ञा केली. महाबतखान हा हिंदुस्थानच्या वाटेवर असताना औरंगजेबाने त्याच्यावर विषप्रयोग करविला. याची दोन कारणे होती. महाबतखानाच्या शत्रूंनी औरंगजेबाला सांगितले की, महाबतखानाचे राजपुतांशी स्नेहाचे संबंध आहेत. त्यांना हाताशी धरून तो बंड करण्याचा संभव आहे. दुसरे कारण असे की, छावणीतून निघताना महाबतखानाने आपले नगारे बादशहाच्या छावणीत मोठ्याने वाजविण्याची आज्ञा केली. यात बादशहाचा अपमानच होता. आपण औरंगजेबाची पर्वा करीत नाही असेच जणू त्याला सुचवावयाचे होते.

महाबतखानाला गुप्तपणे विष देण्यात यावे अशी औरंगजेबाने आज्ञा केली होती, हे वर सांगितले आहेच. महाबतखान हा लाहोरच्या वाटेवर होता. लाहोर-मध्ये एक युरोपियन वैद्य असून महाबतखानाच्या विषप्रयोगावर तो इलाज करण्याची शक्यता आहे असे बादशहाला सांगण्यात आले. यामुळे माझ्याकडे कोणतेही नाव नसलेले एक पत्र देण्यात आले. पत्रातील मजकूर पुढीलप्रमाणे होता. "तुम्ही कोणत्याही परिस्थितीत महाबतखानाचा उपचार करता कामा नये." ज्या माणसाने हे पत्र मला आणून दिले तो अनोळखी होता. त्याने माझा हात आपल्या हातात घेतला आणि तो दाबून मला म्हटले "पत्रातील मजकुराप्रमाणे वागा. त्याच्याविरुद्ध असे काही वागू नका." असे म्हणून तो निघून गेला.

१. हा महम्मद यानखचा तिसरा मुलगा होता असे इतर जण म्हणतात. याच वेळी त्याचा अंत झाला (मे-जून १६७५) (मासीरि-उल-उमरा).

**महाबतखानाचे मला ( मनुचीला ) आमंत्रण :** महाबतखान हा लाहोरला येत आहे असे पाहून त्याचे व माझे संबंध फार सलोख्याचे असल्यामुळे मी (मनुची) स्वतः तयार केलेले चांगले मद्य त्याच्याकडे पाठवून दिले. महाबतखानाला विष देण्याचे काम त्याच्या हकीमाकडेच सोपविण्यात आले होते. माझा नाश करण्यास व आपला बचाव करण्यास ही नामी संधि आहे, असे त्यास वाटले. मी पाठविलेले मद्य ज्या दिवशी महाबतखानाने घेतले त्याच दिवशी एका कामोत्तेजक औषधाबरोबर त्या हकीमाने ते विष महाबतखानाला दिले. त्याबरोबर त्याच्या सर्व अंगात कळा करू लागल्या. मी दिलेल्या मद्यात विष असावे आणि ते मी त्याचा शत्रु फिदाईखान याच्या सांगण्यावरून त्याला दिले असावे असा त्याला संशय आला. त्याने मला तावडतोब बोलावणे पाठविले. मी घोड्यावर स्वार होऊन निघालो. मी त्याच्याकडे पोहोचताच मला पाहून लोक चकित झाले. मी गुन्हेगार असल्यामुळे येणार नाही, अशी त्यांची समजूत होती. मी गेल्यावर महाबतखानाने माझ्या राहण्याकरिता सजविलेला एक तंबू दिला. त्याने माझ्याकडे उत्तम भोजन पाठविले. माझी सोबत करण्यासाठी त्याचे धुवणेही मजकडे आले. ते माझे चांगले मित्र होते. त्यांच्याबरोबर महाबतखानाने मिरकतउल्लाखान नावाचा एक अधिकारीही पाठविला होता. माझ्या बोलण्यात भीति किंवा गोंधळ दिसतो की काय हे पाहाण्याचे काम त्याला दिले होते.

पण मी अगदी निर्दोष असल्यामुळे माझा बोलण्याचालण्यात काही गैर असण्याचे कारण नव्हते. दुसऱ्या दिवशी सकाळी मी महाबतखानाकडे गेलो. मी दिलेले मद्य तुम्ही प्राशन केले काय, असे मी त्याला विचारले. तो हो म्हणाला. यावर मलाही तेच थोडेसे द्या, असे मी त्याला सांगितले. ज्या बाटलीतून महाबतखान मी पाठ-विलेले मद्य प्याला होता, ती बाटली आणण्यात आली. मी मद्य घेतले आणि काही मद्य त्याच्या पुतण्यांना दिले. त्यांनी त्याची तारीफ केली. हे करण्यात माझा हेतू असा होता की, त्याची प्रकृती जी बिघडली, ती माझ्या मद्यामुळे नव्हे, तर इतर कोणत्या तरी वस्तुमुळे होय, हे त्याला दाखवावयाचे होते. मी त्याच्याशी बराच वेळ बोलत बसलो होतो. आम्ही घेतलेल्या मद्याचा माझ्यावर किंवा त्याच्या पुतण्यांच्यावर काहीही परिणाम झाला नाही हे त्याला आढळून आले. माझी प्रकृती बरी नाही, काही औषधोपचार करा, असे महाबतखानाने मला सांगितले. त्यांचे म्हणणे मी टाळले, मी म्हटले "आपला स्वतःचा हकीम आहे. तो विद्वान आणि अनुभवी आहे. मला तुमच्या आजाराची काहीच माहिती नाही." मी महाबतखानाबरोबर १९ दिवस होतो. मी दिलेल्या मद्याचा काही परिणाम माझ्यावर किंवा त्याच्या पुतण्यांच्यावर होतो किंवा कसे हे पाहण्यासाठी त्याने मला ठेऊन घेतले होते. शेवटी मला जाऊ देणे त्याला भाग पडले.

आपल्यावर विषप्रयोग झाला किंवा नाही ही माहिती त्याला माझ्याकडून काढता आली नाही. निरोपाच्या वेळी त्याने मला वस्त्रे दिली. माझ्या संरक्षणासाठी त्याने एक अधिकारी आणि वीस घोडेस्वार दिले. न जाणो त्याच्या आजाराला मी कारण आहे असे समजून त्याची माणसे मला त्रास द्यावयाची. काही दिवसांनी महाबतखान मरण पावला.[1] त्याच्या आतड्यात व्रण झाले असावेत.

**मुरादबक्षाच्या मुलीवर मी उपचार करतो :** औरंगजेबाने मुरादबक्षाच्या मुलीचे लग्न, बल्खच्या पीर घराण्यातील एका मुलाशी (महम्मद ताहेर नक्षबंदी याचा महम्मद सालेह) लावून दिले होते हे मागे सांगितले आहे. त्या तरुणाला वेडाचे झटके येऊ लागले. मी त्याचा इलाज करीत होतो. त्यावेळी लाहोरचा सुभेदार फिदाईखान[2] पेशावरला गेला होता (२८ मे १६७२). त्याच्या जागी अमानतखान[3] हा काम करीत होता. अमानतखानला मांत्रिकांनी असे भासविले की, मुरादबक्षाच्या जावयाला भुताने झपाटले आहे. तो काही वेडाचा झटका नाही. राजघराण्यातील एका माणसावर इलाज मला विचारल्याशिवाय का केला अशी तक्रार अमानतखानने माझ्यापाशी केली. मी म्हटले "वैद्यकी हा माझा धंदा असल्यामुळे जो मला बोलावील त्याच्याकडे जाणे भाग आहे. पण तुम्ही म्हणता तर मी यापुढे इलाज करणार नाही."

काही दिवसांनी मांत्रिकांनी अमानतखानाला सांगितले की, महम्मद सालेह (मुराद बक्षाचा जावई) हा बरा झाला आहे. त्याला बागेत फिरण्याची परवानगी देण्यात आली. वास्तविक पाहता त्याचे वेड बरे झाले नव्हते. त्याने खंजीराने आपल्या पत्नीवर आघात केला आणि एका दासीला मारून टाकले व दुसरीस जखमी केले. मला तातडीने बोलावण्यात आले. अमानतखान या सुभेदाराच्या परवानगीशिवाय मी येऊ शकत नाही, असे मी सांगितले. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. मुसलमान लोक वैद्यकांना हात ही लावू देत नाहीत. ही तर राजकन्या होती. जखमांची माहिती करून घेऊन मी तिच्यावर इलाज केला. परमेश्वर कृपेने अकरा दिवसांनी ती बरी झाली.

१. लहरास्पखान :–महाबतखान हा जमानाबेग, महाबतखान, खान खाना, सिपहसालार याचा मुलगा होता. ४ रज्जब १०८५ हि. (जानेवारी १, १६७५) ला हा पंजाबातील शहाबाद गावी मरण पावला. मृत्युसमयी त्याचे वय ६४ होते.

२. फिदाईखान :–आमदानीच्या १५ व्या वर्षी मोहरमच्या शेवटच्या दिवशी १०८३ हि. (२८ मे १६७२) ला लाहोरहून पेशावरला जाण्यास निघाला.

३. अमानतखान :–अमानतखान उर्फ सैयद अहमदखान हा आमदानीच्या १३ व्या वर्षी बंगालचा सुभेदार होता. १८ व्या वर्षी काश्मीरचा सुभेदार होता. (१०८६ हि.) त्याने राजीनामा दिला. मग त्याला लाहोरचा सुभेदार नेमले (१०८६ हि). १६७५ हसन अब्दालहून औरंगजेब परततांना हा याचे स्वागतास हजर होता. (मासीरि आलमगिरी).

सुभेदाराला मी ही हकीकत सुरवातीसन कळविली होती. त्याने बादशहाकडे वृत्तांत पाठवून मी केलेल्या इलाजाचा उल्लेख केला. त्यामुळे माझ्या कामाची प्रसिद्धी बादशहाच्या छावणीतील मोठमोठ्या लोकांत पसरली. राजकन्येनेही मला चांगली बक्षिशी दिली.

**एका स्थूल मुसलमानाच्या शरीरातून मी चरबी काढून घेतो** : फिदाईखानाच्या सुभेदारीच्या काळात लाहोरच्या काजीच्या मेहुण्याने बंड केले. फिदाईखानाने बंड मोडून काढले आणि बंडखोराचा शिरच्छेद केला. हा बंडखोर देहाने अतिशय स्थूल होता. त्याच्या शरीरातून चरबी काढून घेण्याची मी फिदाईखानाकडे परवानगी मागितली. अंगाला चोळण्यासाठी त्याचा उपयोग करता येण्यासारखा होता. ती परवानगी मला देण्यात आली आणि त्यामुळे काजी आणि इतर माणसे माझ्या-विरुद्ध झाली. माझ्यावर मारेकरी घालण्याचाही प्रयत्न झाला. पण फिदाईखानाच्या पाठिंब्यामुळे आणि परमेश्वर कृपेने माझे कोणी काही करू शकले नाही.

**युरोपियन लोक माझा छळ करतात** : माझ्या व्यवसायात मला मुसलमान विरोधकांचाच छळ सहन करावा लागला इतकेच नव्हे तर युरोपियन लोक माझा मत्सर करू लागले. त्यांनी माझ्यावर मारेकरी घातले. माझ्या शत्रूंनी माझ्यावर विषप्रयोगही केला पण त्यातूनही मी वाचलो. पण विषाची बाधा मला बरेच दिवस जाणवत होती.

**दिदारखानाच्या मुलीशी लग्न करण्याचा माझा बेत फसतो** : वैद्य म्हणून माझी इतकी कीर्ती झाली की, दुरवरून माझा सल्ला घेण्याकरिता रोगी येऊ लागले. हे माझ्या हिताचेच ठरले. काही स्त्रियांनी मला लग्नाची गळ घातली. मी मोकळा असतो तर प्रतिष्ठित घरांतील मुसलमान स्त्रियांच्याकडून लग्नाच्या मागण्यांचा सुमा-रच राहिला नसता. पण परमेश्वर कृपेने माझ्या आईवडिलांची शिकवण माझ्यावर लहानपणापासून बिंबली होती.

परंतु एका घडलेल्या कथेचा वृत्तांत सांगितल्याखेरीज मला राहवत नाही. ही गोष्ट दिदारखान नावाच्या एका मोठ्या घराण्यातील पठाणाच्या विधवा कन्येच्या बाबतीत घडली. एकदा मी तिच्या बहिणीला लाहोरपासून ३० मैलांवर असलेल्या कसूर येथे उपचार केले. त्यावेळी ही विधवा स्त्री हजर होती. माझ्यावर ती अति-शय अनुरक्त झाली. माझ्याशी लग्न करण्याची आपली इच्छा तिने मला बोलून दाखविली. माझ्याबरोबर पळून जाण्याची व्यवस्था करण्याचा तिचा विचार होता. प्रथम मी तिकडे लक्ष दिले नाही पण तिचा निश्चय झालेला दिसला. तसेच तिचे सौंदर्य, तिची बुद्धिमत्ता आणि तिची सांपत्तिक स्थिती या गोष्टींचा माझ्यावर परि-णाम झाला होताच. तेव्हा तिला तिच्या इच्छेप्रमाणे युरोपला घेऊन जाण्याचा

विचार माझ्या मनात येऊ लागला. मग आमचा एक करार झाला. त्याप्रमाणे तिने मला एक जहाज खरेदी करण्याइतका पैसा द्यावा असे ठरले. मग तिने मक्केला जाण्याचा नवस केल्याचे ढोंग करून घरातून बाहेर पडावे. सफरीला निघून सुरत बंदर सोडल्यावर मी माझे जहाज घेऊन मक्केला जाणाऱ्या त्या जहाजावर हल्ला करावा आणि तिला युरोपला पळवून न्यावे या योजनेत ठरलेल्या गोष्टींची पूर्तता होत होती पण त्या स्त्रीने पुरेशी तारतम्य बुद्धि दाखविली नाही. आपल्या एका म्हाताऱ्या दासीबरोबर ती मला निरोपावर निरोप पाठवीत सुटली. त्यामुळे संशय निर्माण झाले. पण या योजनेच्या पूर्ततेत मुख्य अडथळा आला तो रॉडरिग्ज अंथ-रिओ या पोर्तुगीजाचा. मी (मनुची) त्याच्यावर अनेक उपकार केले होते. त्याच्यावर विश्वासही बराच टाकला होता. मी माझा बेत त्याला सांगितला. त्याने विश्वासघात करून ही सर्व हकीकत मिर्झाखान नावाच्या माणसाच्या कानावर घातली. त्या स्त्रीशी लग्न करण्याची या मिर्झाखानाची इच्छा होती.

माझे व सुभेदार फिदाईखानाचे व इतर सरदारांचे संबंध घनिष्ट आहेत याची कल्पना असल्यामुळे मिळून त्याने (मिर्झाखानाने) मला काही इजा करण्याचा प्रयत्न केला नाही. मात्र एक पत्र लिहून त्याने मला कळविले "या पठाण स्त्रीची दासी तुमच्याकडे वारंवार का येते हे मला पुरते ठाऊक झाले आहे. पण तुमचे हे वागणे शेवटी तुमच्या नाशास कारणीभूत होईल. ही धोक्याची सूचना मी तुम्हास देत आहे." या पत्राचा मला अर्थच कळला नाही असे मी ढोंग केले. मनाशी मात्र मी अशी निश्चित खूणगाठ बांधली की, आपला बेत पार पाडणे शक्य नाही. मी त्या पठाण स्त्रीला कळविले की, आपला बेत पार पाडणे शक्य होणार नाही. माझ्या जीवालाच धोका निर्माण झाला आहे. या निराशेमुळे तिने मिर्झाखानाशी लग्न केले आणि पुढे आठच दिवसांनी ती स्त्री मरण पावली. इतर युरोपियनांच्या सारखा जर मी असतो तर त्या स्त्रीकडून जहाजाकरिता पैसा घेऊन तिला दिलेल्या लग्नाच्या वचनाचा विचार न करता युरोपला पळून जाऊ शकलो असतो. पण आपला बेत उघडकीस आला या भीतीने नव्हे तर मी अत्यंत प्रामाणिकपणे वागत असल्यामुळे मी या मोहात पडलो नाही. खिश्चन होण्याची इच्छा करणारी ती स्त्री त्या पोर्तुगीज माणसाच्या विश्वासघातामुळे मुसलमानच राहिली याचेच मला दुःख झाले.

**खोजा दौलत :** माझ्या वैद्यकीय व्यवसायाचा आणि शल्य क्रियेचा इतका गव-गवा झाला होता की, अशक्य गोष्टही मी शक्य करीन असे लोकांना वाटू लागले. लाहोरचा पूर्वीचा सुभेदार अलीमर्दानखान[1] याचा खोजा दौलत याच्यावर मागे

१. अलीमर्दानखान लाहोरच्या वाटेवर मिहारा जवळ मरण पावला. १२ रजब १०६७ हि. (७ मे, १६५७ न.प.).

घोर शिक्षेचा प्रसंग ओढावला होता. इराणच्या शहाने त्याचे नाक कान कापून त्याला इराणमधून हाकलून लावले होते. ते पुनः बसवावे अशी दौलतची इच्छा होती. त्या प्रमाणे त्याने मला विचारले. मोठ्या मुष्किलीने मी त्याची समजूत घातली की असे शक्य होणार नाही. दौलत निराश झाला. तो म्हणे मी काय पापे केली असतील कोण जाणे. एक तर मला खोजा करण्यात आले. नंतर माझे नाक, कान हे अवयव कापण्यात आले. आता कापून टाकण्यासारखे अवयव माझ्यापाशी शिल्लकच राहिले नाहीत. आता भीति आहे फक्त डोके गमाविण्याची. माझ्या वैद्यकीचा तर गवगवा झालाच होता. पण मला भुते वश आहेत असाही समज लोकांत पसरला. अर्थात माझ्या वैद्यकीय व्यवसायात अनेकदा हा लौकिक माझ्या पथ्यावर पडत असे.

**इख्लासखानाची फजिती** : या काळात सिंध प्रांताचा सुभेदार इख्लासखान[1] हा होता. माझी आणि त्याची चांगली ओळख होती. इख्लासखान विषयासक्त वृत्तीचा होता. संपत्ति आणि सत्ता यांच्या योगाने त्याला हव्या त्या बायका मिळत पण तेवढ्याने त्याचे समाधान होत नसे. प्रतिष्ठित घराण्यांतील मुलींवर त्याचा डोळा असे. टट शहरात एका नागरिकाची एक सुंदर मुलगी होती. तिच्याकडे इख्लासखानाचे लक्ष गेले. कुंटणीच्या मार्फतीने तो त्या पोरीला निरोप पाठवू लागला. मुलीने बापाला ही हकीकत कळविली. इख्लासखान हा नागरिकांना फार त्रास देत असे. त्याचा सूड घेण्याची चांगली संधि आली आहे असे पाहून मुलीच्या बापाने एक युक्ति योजिली.

असे ठरले की इख्लासखानाने रात्री नऊच्या नंतर मुलीच्या घरी जावे. तोपर्यंत मुलीचा बाप विश्रांतिसाठी बापाच्या खोलीत गेला असेल. पण येताना इख्लासखानाने स्त्रीवेश धारण करावा. न जाणो मुलीचा बाप ऐन वेळी बाहेर आला तर हा पुरुष नसून कोणी बाई आहे असे वाटावे. इख्लासखान आल्यावर मुलीने आपल्या खोलीत घेऊन जावे. तुम्ही खोलीत बसून राहा. माझे वडील गेल्यावर मी येईन, असे सांगून मुलीने खोलीला बाहेरून कडी लावावी, असे ठरले. त्याप्रमाणे करण्यात आले.

1. इख्लासखान :–मुहम्मद इख्लासखानाने दाराकडे आपल्या नोकरीचा प्रारंभ केला. शहाजहानच्या कारकीर्दीच्या २८ व्या वर्षी त्याला 'इख्लासखान' पदवी देण्यात आली आणि सुभेदार म्हणून मुलतानला पाठविण्यात आले आणि ३१ व्या वर्षी (१६५८) बहादुरखानाऐवजी त्याला लाहोरचा सुभेदार नेमण्यात आला. दाराबरोबर निघाला (१६५९). पण भक्करला गेला नाही. तर तो औरंगजेबाला जाऊन मिळाला. तेथेच त्याला ३ हजारी जोतदळाचे मुख्य करण्यात आले. शाहशुजाविरुद्ध झालेल्या लढाईत त्याने भाग घेतला होता. औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या ४ थ्या वर्षी (१६६२) त्याला मंजरखानाऐवजी भक्करचा फौजदार नेमण्यात आले. १० व्या वर्षी टट्टाचा सुभेदार म्हणून नेमण्यात आले. २२ व्या वर्षी (१०९० हि. १६७८-७९) मुलतानला राजपुत्र अकबरकडे मुलतानचा डेप्युटी म्हणून पाठविले. (मा-आसीरे-आलमगिरी, १७३).

इख्लासखान स्त्री वेषामध्ये त्या मुलीच्या खोलीत एकटा अडकून पडला. दुसऱ्या दिवशी लोक सुभेदाराला भेटायला येतात तो त्यांना पत्ता नाही. तो कोठे गेला आहे हे त्याच्या नोकरांना सांगता येईना. सुभेदार आजारी आहे असे सांगावे तर वाकेनवीस म्हणू लागला की, आम्हाला खात्री करून घेतली पाहिजे आणि सरकारी हकीमांनी सुभेदाराची तपासणी केली पाहिजे. गावात एकच गोंधळ उडाला. सुभेदाराच्या वाड्याभोवती खूपच गर्दी जमली. हे पाहून मुलीच्या बापाने सांगितले की तुम्ही माझ्याबरोबर चला. सुभेदार कोठे आहे ते मी तुम्हाला दाखवितो. माणसे त्याच्या मागोमाग गेली. मुलीच्या बापाने खोलीचे दार उघडले तो आत मोठी दाढी असलेला नबाब इख्लासखान हा स्त्री वेष धारण करून बसलेला. त्याने लाजेने आपले तोंड झाकून घेतले. तो पालखीतून आपल्या वाड्याकडे निघून गेला. वाड्याच्या बाहेर तो येईना. आपण आजारी असल्याचे तो निमित्त करी. सुभ्याच्या अधिकाऱ्यांनी औरंगजेबाकडे झालेला वृत्तांत लिहून कळविला. औरंगजेबाने इख्लासखानाला बडतर्फ केले. इख्लासखान लाहोरला आला आणि तेथेच आयुष्य कंठित काही वर्षांनी मरण पावला.

**पठाणांच्या मोहिमेवरून औरंगजेब दिल्लीस परततो :** पठाणांवरील मोहिमेत यश मिळविण्यास महाबतखानाच्या मृत्युपासून औरंगजेबास काही लाभ झाला नाही. औरंगजेबाने मुत्सद्दिगिरीने या मोहिमेतून माघार घेण्याचे ठरविले. औरंगजेबाच्या सैन्याची फार मोठी हानी झाली होती. पण वरील प्रकारे बनाव करून तो आपल्या सैन्याला शांत करू शकला. अशा रीतीने दोन वर्षे दोन महिन्यांचा हा काळ लोटल्यावर औरंगजेब दिल्लीला परतला.

लाहोरला जहांगीर बादशहाची कबर आहे. पण लाहोर येथे असताना औरंगजेबाने आपल्या आजाच्या कबरीवर जाऊन प्रार्थना करण्याचे नाकारले. येथे एक काफर पुरला आहे असे तो म्हणे. इतकेच नव्हे तर जहांगीरच्या त्या भव्य दर्ग्यामधून मूल्यवान रत्ने काढून टाकण्याची त्याने आज्ञा केली.

औरंगजेब दिल्लीच्या वाटेवर असताना फिदाईखान उर्फ आझमखान (कासीमखान[1]) याने पठाणांना शांत करण्याचे काम आपल्या अंगावर घेतले. आपले सैन्य मागे ठेऊन तो पठाण सरदारांच्याकडे गेला. त्याने त्यांना म्हटले "परत आण्यासाठी आणि शांतता स्थापन करण्यासाठी मी बादशहाचे मन वळविले आहे."[2] पूर्वीप्रमाणे

1. कासीमखान :—ह्या घटनांशी संबंधित असा कासीमखान म्हणून मला आढळलेला नाही. औरंगजेबाने मागे ठेवलेला सुभेदार फिदाईखान हा होता. कासीमखान हे नाव बरोबर नसून ते आझमखान असे असले पाहिजे.

2. आमदानीच्या १९ व्या वर्षी १०८६ हि. (डिसेंबर २९, १६७५) ला औरंगजेब हसन अब्दालहून निघाला आणि कालाबाग येथे मुक्काम केला. जानेवारी ११, १६७६ ला तो लाहोरच्या फैजबक्षच्या बागेत उतरला (मासीरे-आलमगिरी).

मी तुमच्याशी स्नेहाने राहू इच्छितो. ही पद्धत महमंद अमीनखानाने मोडली होती. पण मी तुम्हाला वचन देतो की, तुमचे पूर्वीचे हक्क आणि अधिकार हे अबाधित राहतील. आझमखान हा धूर्त होता. त्याने पठाणासारखी राहणी पत्करली. तो ढाल तलवार न घेता निःशंकपणे त्यांच्यामधून वावरत असे. तुमच्यावर माझा संपूर्ण विश्वास आहे हे त्याला पठाणांना दाखवावयाचे होते. अशा रीतीने त्याने पठाणांशी स्नेहाचे संबंध जोडले. पण आतल्या आत पठाण नेत्यांचा नाश करण्याची तो संधी शोधीत होता.

काही दिवसांनी आझमखानाच्या मुलाची सुंता होण्याचा समारंभ होता. या समारंभाला त्याने अनेक पठाण सरदारांना बोलावले. आम्ही येऊ पण सशस्त्र येऊ असे ते सरदार म्हणाले. आझमखानाने ते कबूल केले. पठाण सरदार आले, धनुष्यबाण, तलवारी, ढाली इत्यादी आपल्याबरोबर घेऊन आले. सगळी मंडळी एकत्र जमली असताना आझमखानाने आतून एक कलिंगड मागविले. कलिंगडामध्ये चाकू घालताना त्याच्या बोटाला चाकूची धार लागली. अर्थात हे मुद्दाम करण्यात आले होते. हाताला मी पट्टी बांधून येतो असे सांगून तो आत गेला. पूर्वी ठरल्याप्रमाणे आझमखानाचे सैनिक बंदुकी आणि धनुष्यबाण घेऊन समारंभाच्या स्थळाला वेढा घालून उभे होते. त्यांनी एकाएकी हल्ला करून सर्व पठाण पुढाऱ्यांची कत्तल केली. या मारामारीत बावन्न पठाण सरदार मारले गेले. या हत्याकांडानंतर पठाणांच्यात पुन्हा बंड करण्याचे बळ राहिले नाही. ही बातमी ऐकून औरंगजेबाला अत्यंत समाधान वाटले. औरंगजेबाने आझमखानाची तिकडून बदली केली आणि त्याच्या जागी राजपुत्र अकबर[1] पाठवले. राजपुत्र अकबराच्या बरोबर औरंगजेबाचा वजीर असदखान हाही होता. त्याने असे भासवले की, आझमखानाने घडवून आणलेली पठाणांची कत्तल ही बादशहाला आवडली नाही. म्हणून त्याला बदलण्यात आले आहे. पठाणांना शांत करण्यासाठी त्याने पठाण सरदारांना उंची उंची वस्त्रांच्या खिलती दिल्या. यामुळे पठाणांचे थोडे बहुत समाधान झाले.

अकबराच्या मनात आपल्या बापाविरुद्ध बंड करावे आणि त्यात पठाणांचा उपयोग करून घ्यावा असे मात्र होते. पण असदखानाने हे विचार त्याच्या डोक्यातून काढून टाकले.[2]

१. आमदानीच्या २२ व्या वर्षी १०९० हि. (एप्रिल २३,१६७९) ला राजपुत्र अकबरला लाहोरच्या बाजूला पाठविण्यात आले. १०९० हि. (सप्टेंबर २, १६७९) ला अकबर लाहोरहून आला पुढे त्याला अजमेरला पाठविण्यात आले (मा-आसीरे-आलमगिरी १७५, १८०).

२. आमदानीच्या २० व्या वर्षी शाहा आलमच्या (मुअज्जमच्या) शिफारशीवरून आझमखान कोका (फिदाईखान) याच्या ऐवजी काबूल येथे अमीरखानाची नेमणूक करण्यात आली. त्याला बंगालमध्ये शाइस्ताखानाच्या बदली पाठविण्यात आले (१०८९ हि. १६७८) त्याचा "बंगालला आतंकवन दूर केलेला सुभेदार" असा पुढे निर्देश करण्यात आला होता. यावेळी तो बिहारकडे निघाला होता. १०८९ हि. (जून १६७८) ला तो ढाक्याला मरण पावला. (मासीरे-आलमगिरी).

**शिवाजीबरोबर केलेला तह मोडण्यात आला :** पठाणांवरील मोहिम संपवून औरंगजेब दिल्लीला[1] परतला (५ एप्रिल १६७६). दक्षिणेत बहादूरखानाने शिवाजीशी तह केला होता, तो मोडावा आणि त्याच्याशी सतत युद्ध चालू ठेवावे अशी औरंगजेबाने आज्ञा केली. गोवळकोंड्याच्या बादशहाने शिवाजीला कर्नाटकच्या मोहिमेवर जाण्यासाठी आपल्या राज्यातून वाट दिली होती. या मोहिमेत शिवाजीने किल्ले जिंकून आपले बळ वाढविले होते याचा उल्लेख पूर्वी आलेला आहे. शिवाजीला आपल्या राज्यातून वाट दिल्याबद्दल बहादूरखानाने गोवळकोंड्याच्या बादशहाला धमकी द्यावी अशी औरंगजेबाने आज्ञा केली. बहादूरखानाने गोवळकोंड्याच्या बादशहावर मोठा दंड लादला. मुबलक पैसे, शस्त्रास्त्रे, रत्ने इत्यादींची मागणी करण्यात आली. हे सगळे गोवळकोंड्याच्या बादशहाने कबूल केले. त्याशिवाय गोवळकोंड्याच्या बादशहाचा एक मोठा हत्ती औरंगजेबाकडे पाठविण्यात आला.

विजापूर व गोवळकोंडा यांच्या बादशहांबरोबर कोणत्या पद्धतीने वागावयाचे यासंबंधी औरंगजेबाने आपले एक धोरण ठरविले होते. ते असे की, त्यांचे बळ हळू हळू कमी करत जावयाचे. गोवळकोंड्याच्या बादशहाकडून आज एका गोष्टीची, तर उद्या दुसऱ्या गोष्टीची मागणी करत राहायचे. एका वर्षी पैसा, तर दुसऱ्या वर्षी दारूगोळा वगैरे. विजापूरकरांशी तो वेगळी पद्धत वापरी. दरवर्षी पावसाळा सुरू झाला की तो त्यांच्याशी मैत्रीचा करार करून एखादा किल्ला किंवा काही जमीन अथवा एखादा प्रांत मिळवी. शेवटी त्याने आपल्या मुलाच्या आझमताराच्याकरिता विजापूरच्या बादशहाच्या मुलीची मागणी घातली आणि त्यांनी विजापूरच्या बादशहाला वचन दिले की, ही मैत्री झाल्यावर आता सर्व युद्ध बंद. पण पावसाळा संपल्यावर त्याने पुनः पूर्वीप्रमाणे युद्ध सुरू केले. असे करत करत शेवटी त्याने विजापूरचे सर्व राज्य मिळविले व बादशहाला कैद केले. हे योग्य ठिकाणी येईलच.

**मुल्तफतखानाची आग्रा भागात मोहिम :** आग्रा भागातील शेतकऱ्यांचा आणि जमिनदारांचा यापूर्वी उल्लेख आलेला आहे. औरंगजेब दिल्लीला परतल्यानंतरची घटना. आग्रा भागातील शेतकऱ्यांतील जनतेने शेतसारा देण्याचे नाकारले आणि बंड केले. औरंगजेबाने ते बंड मोडून काढण्यासाठी मुल्तफतखानाला[2] पाठविले. गोडी-गुलाबीने हे बंड शांत करावे असा मुल्तफतखानाने प्रयत्न केला पण काही उपयोग झाला नाही. या बंडात मुल्तफतखानाचा मोड झाला. तो बंडखोरांच्या कैदेत

---

१. औरंगजेब, मोहरम २२ (१९ वे वर्ष, १०८७ हि. ५ एप्रिल १६७६ ला) दिल्लीला पोहोचला. बहादूरखान हा शब्द दुसऱ्या पद्धतीने उल्लेखलेला 'खान जहान बहादूर' होय.

२. मुल्तफतखानाला गाझीपूर-जमानिया येथील फौजदारच्या जागेवरून काढून अकबराबाद (आग्रा) च्या आसपासच्या भागाचा फौजदार केला. एका बंडखोराविरुद्ध लढण्यात तो जखमी झाला आणि १९ जमादा २४ वे वर्ष, १०९२ हि. ६ जुलै १६८१ ला मरण पावला.

सापडून कजित पावला. औरंगजेबाची निर्भत्सना सहन न होऊन त्याने विष घेऊन आत्महत्या केली.

**काबूलची दारू :** औरंगजेबाला एका गोष्टीची नेहमी भीती वाटत असे. पठाण ही लढाऊ जमात होती. तिचा उपयोग करून घेऊन एखादा शूर आणि साहसी माणूस काबूल भागात बंडाळी निर्माण करायचा. राजपुत्र अकबर हा काही काळ काबूल प्रांतात राहिला होता. औरंगजेबाने त्याला बदलले आणि त्याच्या जागी त्याने आपला मोठा मुलगा शाहाआलम (मुअज्जम) याला पाठविले. या योगाने पठाणांच्या शेजारी जमातीवर नियंत्रण राहावे असा त्याचा विचार होता.

शाहाआलम[1] काबूलला पोहोचला (२७ जून १६७७) पण तेथे तो मद्यपान इत्यादी ऐषारामात वेळ घालवू लागला. काबूल येथे चांगली दारू तयार होते. शाहाआलमच्या अतिरिक्त मद्यपानाची तक्रार त्याच्या कारभाऱ्याने बादशहापाशी केली. बादशहाने त्याची कानउघाडणी करून त्याला (शाहाआलमला) दरबारात परत बोलावले (३० जानेवारी १६७८). कारभाऱ्याने आपल्यावर अशी बारीक नजर ठेवली याचा शाहाआलमला राग आला. शाहाआलम काबूलला असतानाच त्याच्या गुप्त आज्ञेने कारभाऱ्याला ठार मारण्यात आले.

औरंगजेबाने आपला मुलगा अकबर याची नेमणूक माळव्याच्या सुभेदारीवर केली होती (१६७७). माळव्यात एका राजाने बंड केले होते. औरंगजेबाने मुलाला कळविले की, गोड गोड बोलून त्या राजाला बोलवावे आणि त्याचा निकाल लावावा.[2] अकबरने त्याप्रमाणे केले. याच अकबराने पुढे आपल्या बापाविरुद्ध बंड केले आणि त्याच्यावर फार मोठी आपत्ति आणली, हे पुढे सांगण्यात येईलच.

**औरंगजेब आग्र्यातील पाद्र्यांच्या घरांच्या झडत्या घेण्याचा हुकूम करतो :** या सुमारास पाद्री फादर बुझी हा मरण पावला होता. काही जेस्युइट पाद्र्यांची वागणूक अविचाराची झाली. यामुळे पुष्कळ पाद्र्यांना त्रास सहन करावा लागला. त्यातूनच काही पाद्र्यांना राज्यातून बाहेर घालवून देण्यात आले. औरंगजेब नुकताच लाहोरला जहांगीरची कबर पाहून परत आला होता. आपला आजा जहांगीर हा पाद्री लोकांना मोठ्या स्नेहाने वागवीत असे; हे त्याच्या आठवणीत होते. ऐन याच सुमारास औरंगजेबाच्या भोवतालच्या मुल्लामौलवींनी त्याला पुढीलप्रमाणे सांगितले : "या पाद्र्यांच्या घरांमध्ये मूर्ती आहेत. आता आपल्या राज्यात काफरांची देवळे तर

१. शाहाआलम, २५ रबी आखरानीला २० वर्षे १०८८ हि. (जून २७, १६७७) ला काबूलला पोहचला आणि ६ झुल. हिज्जा, २१ वे वर्ष १०८८ हि. (जानेवारी ३०, १६७८) ला दिल्लीला पोहचला. (मासीरे-आलमगिरी १६१, १६५).

२. उज्जयनी येथे किसनसिंग हाडा राजा १०८८ हि. (जून १६७७) हा मारला गेला. त्याचे हे कदाचित विकृत स्वरूपाचे वर्णन असावे.

शिल्लक राहिली नाहीत. असे असूनही हे पाद्री आपल्या घरात मूर्ती बाळगतात. हे बादशाही हुकुमाच्या विरुद्ध आहे." औरंगजेबानं ताबडतोब पाद्र्यांच्या घरांची झडती घेण्याचा हुकूम दिला. सुदैवाने पाद्र्यांना वेळीच ही बातमी कळली होती. त्यांनी प्रतिमा लपवून ठेवल्या. फक्त क्रूस मात्र त्यांनी उघडपणावर ठेवले. शेवटीस मोगल अधिकाऱ्यांना मूर्ती सापडल्या नाहीत.

मनुची लाहोर सोडतो : मोगल राज्यातून निघून जावे आणि ख्रिस्ती (युरोपियन) लोकांत पुन: जाऊन राहावे असं मला वाटू लागले.[1] गोव्यातील लोकांची राहाणी मला पसंत नव्हती. म्हणून मी तिकडे जाणार नव्हतो. मी बांद्र्याला[2] स्थायिक होण्याचे ठरविले. हे गाव जेस्युइट पाद्र्यांना जहागीर गावासारखे होते. आपल्या पंथीयांना सोडून हे जेस्युइट पाद्री इतर पोर्तुगीजांना गावात राहू देत नसत. मी निष्कपटी आहे हे त्यांना माहित होते म्हणून त्यांनी मला बांद्र्यात राहण्याची परवानगी दिली. बांद्रा हे व्यापारी गाव आहे. अनेक जातीचे व्यापारी तेथे राहतात. गावात सुरक्षितता असे. त्या काळात चाच्यांपासून फार उपद्रव होत असे. पण हे जेस्युइट पाद्री गावाचे रक्षण करण्यात सारखे प्रयत्नशील असत.

मी लाहोर सोडणार हे कळताच अनेकांनी मला जाऊ न देण्याचे ठरविले. कारण व्यवसाय निमित्तानी मला प्रसिद्धी आणि प्रतिष्ठा दोन्हींचा लाभ झाला होता. लोकांना उपसर्ग टाळण्यासाठी मी रात्री लाहोर सोडले. सिरहिंद आणि दिल्ली या मार्गाने मी आग्र्याला आलो. तेथे मी काही काळ विश्रांती घेतली. नंतर मी तेथून सुरतेस गेलो. सुरतेहून मी दमणला आलो आणि तेथून पोर्तुगीजांच्या इलाख्यातून प्रवास करीत बांद्र्याला येऊन पोहचलो.

बांद्रा येथे मी एक जहाज विकत घेतले. जहाजात मी व्यापारी सामान भरले आणि ते बाहेर नेऊन विकण्यासाठी मी चार लोकांच्या सांगण्यावरून एका पोर्तुगीजाची नेमणूक केली. या व्यवहारात मला चौदा हजार रुपये खर्च आला. त्या पोर्तुगीजानं मला फसविले. चाच्यांनी जहाज बुडविले असे सांगून तो मोकळा झाला. अशा परिस्थितीत पैसे परत करण्याची जबाबदारीही त्याच्यावर राहात नसे. माझे सर्वस्व नाहिसे झाले. मी आजारी पडलो. एकंदर परिस्थिती पाहून थोडे बरे वाटू लागल्यावर मोगल राज्यात परत फिरावे. फिरून एकदा आपले नशीब अजमावावे असे मी ठरविले.

माझ्या बरोबर एक पाद्री आणि ॲन्टोनिओ मेर्कॅडो नावाचा इसम, यांना मी घेतले. मेर्कॅडो हा मूर्ख, बडबड्या अविवेकी होता. पुढे त्याचा गोवा येथे खून झाला.

१. तिसऱ्या भागात (फो. १९८) मनुची म्हणतो की "मी मोगल प्रदेश १६७६ त सोडला आणि त्याच भागात (फो. २६५ मध्ये) तो म्हणतो मी बान्द्र्याला १६७७ त होतो.

२. बांद्रे :— आता मुंबईचे एक उपनगर.

प्रवासात आणि दिल्ली आणि आग्रा येथे त्याने आपल्या अविचारी वागणुकीने गोंधळ उडवून दिला. मोठ्या कष्टाने आम्ही सर्वांनी पैसे गोळा करून त्याला सुरते-पर्यंत पाठवून दिले.

**मी (मनुची) शाहाआलमची नोकरी पत्करतो :** मी (मनुची) दिल्लीस परत आल्याचे कळल्यावरून अनेक सरदारांनी मला बोलावणे पाठविले. यातला प्रमुख होता शाहाआलमचा खाजगी कारभारी. त्याची बायको फार आजारी होती. इतर हकिमांनी या आजारातून ती बरी होण्याची आशा सोडून दिली होती. मी तिला उपचार करू लागलो. तिला बरं केल्यावर माझी पुनः प्रसिद्धी होऊ लागली. परंतु शाहाआलमच्या दरबारी माझे वास्तव्य चालू राहणे इतर हकीमांना पसत नव्हते. मी लाहोरला परत जाण्याचे ठरविले. गुपचुपपणे शाहाआलमचा दरबार सोडला. शाहाआलमच्या खाजगी कारभाऱ्याच्या बायकोला मी बरी केली होती, हे शाहा-आलमच्या पत्नीच्या कानावर गेले होते. मी लाहोर मध्ये असताना तिचे आईवडील लाहोरला होते. तेथे मला मिळालेली प्रसिद्धीही तिच्या आठवणीत होती. शाहा-आलमच्या पत्नीला कानात एक गळू झाला होता. त्याच्यावरही मी गुपचुपपणे उप-चार केला होता. मला नोकरीत घ्यावे अशी शाहाआलमपाशी तिने गळ घातली.

ती शाहाआलमची आवडती पत्नी होती. तिला नाखूष करू नये म्हणून शाहा-आलमने मला आपल्या पदरी घेऊन मनसबदार (मोगल अधिकारी) बनविले. माझा पगार महिन्याला ३०० रुपये ठरविण्यात आला. मुसलमान लोक युरोपियनांना सहसा असे हुद्दे देत नसत. म्हणून माझ्या बाबतीत एक विशेष गोष्ट घडली असे म्हटले पाहिजे. इतर हकीम, प्रमुख हकीमाच्या अधिकाराखाली असत. पण मला स्वतंत्र अधिकार होते. मला मोकळेपणे वागता यावे आणि इतर कोणाही हुकूम करता कामा नये, या अटीवर मी ही नोकरी पत्करली होती. माझ्या युरोपियन हित-शत्रूंनी माझी नोकरी थांबविण्याची लटपट केली पण काही उपयोग झाला नाही. औरंगजेबाची नोकरी करावयाची नाही असे मी ठरविले होते. पण योगायोग पहा. मी (मनुची) १६७८ मध्ये त्याच्या मुलाचा नोकर बनलो.[1]

**शाहाआलम औरंगाबादेस जातो. शिवाजीचा मृत्यु :** दक्षिणेत बहादुरखानाने शिवाजी आणि विजापूर यांच्या विरुद्ध मोहिम चालविली होती. ती यशस्वी होत नव्हती. औरंगजेब हा बहादुरखानावर नाराज झाला. त्याने बहादुरखानाला[2] दरबारात

1. हे वर्ष बरोबर वाटते. शाहाआलम १०८८ हि. (१० जानेवारी १६७८) ला काबूलहून दिल्लीस पोहचला. त्याची दक्षिणच्या सुभेदारीवर १०८९ हि. (२८ सप्टेंबर १६७८) ला नेमणूक झाली. (मासीरे-आलमगिरी).

२. बहादुरखानाला (खान जहानला) परत बोलावणे आणि त्याच्या जागी दिलेरखानाची नेमणूक करणे या घटनांसाठी मेंट रफ पाहा. आमच्यामते ११ व्या वर्षी मोहरम पूर्वी दिलेरखानाला दक्षिणेकडे पाठविण्यात आले (मार्च १६७७). २१ व्या वर्षी (१६७७ च्या अखेर अथवा १६७८ च्या प्रारंभी) खान जहानला परत बोलावण्यात आले आणि अब्दुल रहमानखान बक्षीला दिलेरखान येईपर्यंत सेनापती म्हणून नेमले होते. (मासीरे-आलमगिरी १५०, १६१).

बोलाविले आणि मोहिमेची सूत्रे दिलेरखानाकडे दिली ही घटना याचवर्षी (१६७८) घडली. बहादुरखान हा औरंगजेबाकडे आला. पण त्याचा दोरा असा की, औरंगजेबाने त्याची मनसबच काढून घेतली आणि त्याच्याकडे दुर्लक्ष केले. बहादुरखान काही दिवस बेकार राहिला.

शेवटी शाहा आलमने मध्यस्थी केल्यावर त्याचा पगार आणि हुद्दा पुनः चालू करण्यात आला. यामुळे बहादुरखानाच्या स्वभावात व वागणुकीत फरक पडला असे नाही. त्याला सारखे वाटत असे की आपले बादशहावर फार उपकार आहेत. आपला हुद्दा मिळणे हा आपला हक्कच आहे. इतकेच नव्हे तर त्याहूनही अधिक मिळावयास हवे.

शिवाजी चहूकडे धामधूम उडवीत होता. दिलेरखान हा त्याचा शक्य तितका प्रतिकार करीत होता. दिलेरखानाला शिवाजीच्या स्वतःच्या प्रदेशावर हल्ला करणे शक्य नव्हते. कारण तो प्रदेश डोंगराळ आणि दुर्गम असा होता. जणु काही त्याच्या राज्याभोवती दगडाची एक मजबूत तटबंदीच होती. इतकेही करून शिवाजीच्या राज्यात परकी सैन्ये घुसली की, घाट आणि खिंडी रोखून धरून शत्रुसैन्याला निष्क्रिय करून टाकणे शक्य होते. अशा परिस्थितीत विजापूर आणि गोवळकोंडा यांच्याशी युद्ध चालू ठेवणे दिलेरखानाला शक्य होते. याच युद्धाचा विचार करून औरंगजेबाने पुनः एकदा शाहा आलमची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक केली. शिवाजी हा शाहा आलमला खिजगणतीही आणीत नसे. त्याने सरळ औरंगाबादेच्या प्रवेशद्वारापर्यंत हल्ला चढवला. शाहा आलमला त्याचा प्रतिकार करता येईना. इतकेच नव्हे तर शिवाजी हा औरंगाबादेच्या उपनगरावर[1] हल्ला करून सगळा परिसर उध्वस्त करून टाकील अशी शाहा आलमला भीति वाटली. शिवाजीचे हेर उत्कृष्ट असत. लोकांनी आपापली संपत्ति कोठे कोठे पुरून ठेवली आहे, याची हेरांच्या द्वारे शिवाजीला बित्तबातमी लागत असे. अर्थातच औरंगाबादेजवळ शिवाजी फार थांबू शकत नव्हता. तो सारखा मोहिमेवर चहूकडे फिरे. या दगदगीने तो थकून गेला आणि रक्ताच्या उलट्या होऊन १६७९ मध्ये मरण पावला.[2]

---

१. ग्रँट डफ असे म्हणतो की, ही घटना १६७९ त घडली आणि लुटलेले गाव जालना हे होते. शिवाजी तेथे तीन दिवस राहिला. परंतु त्यावेळी ४० मैलावर असलेल्या औरंगाबादेहून शाहा आलमने काही हालचाल केली नाही. (खाफीखान ॥ २७०-२७१).

२. शिवाजी, बादशाहीचे २३ वे वर्ष १०९१ हि. मे २३, १६८० ला मरण पावला असे, मासीरे-आलमगिरी १५४ यात आणि तारीख-इ-महम्मदी, देतात. तारीख-इ-महम्मदीमध्ये, शिवाजी भोसला-शाहूजीचा (शहाजीचा) मुलगा दख्खनमधील एक प्रसिद्ध पुरुष, विजयी वीर, असे वर्णन केले आहे. मासीरे-आलमगिरीत असे म्हटले आहे की,–"घोड्यावरून रपेट करून आल्यावर त्याला (शिवाजीला) उष्णतेमुळे दोनदा रक्ताची उलटी झाली."

ग्रँट डफने दिलेली मृत्यूची तारीख ५ एप्रिल १६८० ही आहे.

एवढा प्रबळ शत्रू मेला म्हणून औरंगजेबाला अत्यंत समाधान झाले. आपला मृत्यू जवळ आला हे पाहून, शिवाजीने आपल्या अधिकाऱ्यांना आज्ञा केली की, "तुम्ही माझा दुसरा मुलगा रामराजा[1] यालाच राजा म्हणून मानावे. पूर्वीपासूनच पुत्र म्हणून मी संभाजीचा त्याग केला आहे."

**शिवाजीचे मूल्यमापन :** अशा प्रकारे शिवाजी मरण पावला. शिवाजीने आपला स्वामी म्हणजे विजापूरच्या बादशहा याच्या विरुद्ध बंड केले. त्याने अनेक लढाया मारल्या आणि चहूकडे मुलूख उध्वस्त केला. केवळ तलवारीच्या बळावर त्याने आपला मार्ग आक्रमिला आणि सत्ता आणि शक्तिही संपादन केली. त्याने हिंदुस्तानात एक नवीन राज्य निर्माण केले. मोगल बादशहा म्हणजे केवढा बलिष्ठ पण त्यालाही त्याने क्षणाचीही विश्रांती लाभू दिली नाही. औरंगजेबाने कित्येक राज्ये जिंकली आणि राजे धरले. पण हे मराठ्यांचे राज्य औरंगजेबाला जबरदस्त ठरले. या मराठी राज्याच्या पायी औरंगजेबाला आपली राजधानी सोडावी लागली आणि गेली एकोणीस वर्षे त्याला छावणीत आपले दिवस काढावे लागत आहेत.

या ओळी मी (मनुची) लिहीत आहे, हे वर्ष इ. स. १६९९ चे आहे. आज मे महिन्याची २१ तारीख आहे. माझ्या हेरांनी आज संध्याकाळी चार वाजता बादशाही छावणीतून पत्रे आणली आहेत. माझे हेर मला सांगतात की, बादशाही छावणीत अतिशय गोंधळ उडाला असून परिस्थिती फार कठीण आहे. त्याचे कारण असे की, चंदा नावाचा एक हिंदु सरदार हा मराठ्यांना मिळाला आहे. मराठ्यांनी छावणीला वेढा घातला आहे. बादशाही सैन्यासाठी उत्तरेतून येणारा खजिना ते लुटून नेत आहेत. त्यांनी रस्ते रोखले असून त्यांच्या विरुद्ध पाठविलेल्या सैन्याचा त्यांनी पराजय केला आहे.

**संभाजी :** संभाजीला आपल्या बापाच्या मृत्यूची बातमी कळताच त्याने विजापूर सोडले व बापाच्या मुलुखात प्रवेश केला.[2] शिवाजीचे काही अधिकारी संभाजीच्या पक्षाचे होते. ते संभाजीला मिळाले. रामराजा हा वयाने लहान होता. संभाजीने मोगलांविरुद्ध लढा चालू ठेवण्याची जबाबदारी आपणावर घेतली. या कामावर त्याने आपले शूर अधिकारी पाठविले. आपल्या सरदारांमध्ये अंतस्थ दुफळी माजू नये म्हणून संभाजीने आपल्या भावाला (रामराजाला) एका किल्ल्यात निर्बंधात ठेवले. सत्ताग्रहण करण्याच्या वेळी, त्याने आपल्याला मनःपूर्वक पाठिंबा न देणाऱ्या

१. रामराजा—शिवाजीच्या दुसऱ्या बायकोपासून झालेला दुसरा मुलगा. जन्म–१६७० आणि मृत्यु १७०० (ग्रँट डफ–१३३, १३४, १६५).

२. संभाजी हा शिवाजीच्या पहिल्या बायकोचा थोरला मुलगा. याचा जन्म १६५७ मध्ये झाला. त्याला, २४ जमादा ११०० हि. (मार्च १४, १६८९) फाशी देण्यात आले (ग्रँट डफ). या वेळी संभाजी पन्हाळगडावर होता. पन्हाळगड हा शिवाजीच्या राज्यात होता.

अधिकाऱ्यांची कत्तल केली. संभाजीने एकदा मला (मनुचीला) स्वतःची तलवार दाखविली आणि मला म्हटले "या तलवारीने मी तीस अधिकाऱ्यांची डोकी कापली आहेत आणि इतरांच्याबद्दल म्हणाल तर त्यांचे डोळे काढले आहेत." हे संभाषण केव्हा झाले ते मी योग्य वेळी सांगेन.

**राजा जसवंतसिंगाचा मृत्यु** : त्याच वर्षी म्हणजे इ. स. १६७८ त राजा जसवंतसिंग सिंधूच्या पलीकडे मरण[1] पावला ही बातमी औरंगजेबाला समजली. जसवंतसिंगाची दोन मुले दिल्लीला पाठविण्यात यावीत अशी त्याने सुभेदाराला आज्ञा केली. त्या मुलांनाही लिहिले की, तुमच्या बापाच्या कामगिरीबद्दल मला तुम्हाला बक्षिशी द्यावयाची आहे. त्याप्रमाणे ती मुले ५०० स्वारांसहित दिल्लीला आली. जसवंतसिंगाचे उरलेले सैन्य जोधपुरकडे परत गेले.[2] ही मुले दिल्लीला आल्यावर त्यांना कळले की बक्षिशी देणे दूरच राहिले, आपला शिरच्छेद करण्याचा बादशहाचा बेत आहे. हे कळल्यावर ती मुले आणि त्यांच्या बरोबरचे स्वार हे पहाटेच्या सुमारास दिल्ली सोडून पळाले. हुमायूनच्या कबरीच्या समोर बारा कमानींचा पूल[3] आहे. तेथे त्यांनी २५० रजपूत स्वार ठेवले. जसवंतसिंगाच्या मुलांना पकडण्यासाठी मोगलांचे सैन्य आले, त्या पुलावर या स्वारांनी प्रतिकार करावा असे ठरले.

औरंगजेबाला ही बातमी कळताच त्याने राजपुत्रांच्या पाठलागासाठी सैन्य पाठविले. पण पुलावर असलेल्या २५० रजपुतांनी अत्यंत निर्धाराने मोगलांना प्रतिकार केला. उभय पक्षाकडील अनेक माणसे ठार झाली. पण मोगल पूल काही ओलांडू शकले नाहीत. रात्री पुलावरील रजपूत राजपुत्रांना जाऊन मिळाले. कामी आलेल्या रजपुतांत मर्दानी वेश केलेल्या दोन स्त्रियाही होत्या.

राजा जसवंतसिंगाचा मृत्यु ह्या घटनेचा उपयोग औरंगजेबाने हिंदूंच्यावर अधिक जुलूम करण्यासाठी केला. हिंदूंचे रक्षण करील असा कोणी प्रबल राजा आता राहिला नव्हता. औरंगजेबाने हिंदूंच्यावर जिजिया[4] कर बसविला. प्रत्येकाला हा कर द्यावा लागे. काहींना अधिक तर काहींना कमी. या जिजिया कराचे वार्षिक प्रमाण, मोठ्या व्यापाऱ्यांच्या बाबतीत प्रत्येकी साडेतेरा रुपये असे, तर मध्यम वर्गीयांच्या बाबतीत प्रत्येकी सव्वा सहा रुपये, आणि गरीबांच्या बाबतीत ते साडेतीन रुपये असे. हा

१. जसवंतसिंग हा १०८९ हि. डिसेंबर १८, १६७८ त मरण पावला. तो त्यावेळी खैबरखिंडी-जवळील जामरूदचा फौजदार होता.

२. येथे मनुचीला खरी कथा समजलेली नाही. ती अधिक अद्भुत अशी आहे. (टॉडचा राजस्थान).

३. हा प्रसिद्ध 'बारापूल' तो अजून सांगितलेल्या ठिकाणी आहे. II ५६, ५७ हि.

४. जिजिया-एल्फिन्स्टन म्हणतो की हा कर १६७७ त (१०८८ हि.) लादला गेला. म्हणजे दोन वर्षे अलिकडे होय. मासीरे-आलमगिरी प्रमाणे ते वर्ष १०९० हि. (१६७९-८०) होते आणि हे वर्ष मनुचीच्या म्हणण्याशी जुळते.

कर पुरुषांना भरावा लागे. मुलांना चौदा वर्षे वयानंतर हा लागू होई. औरंगजेबाची जिजिया कर बसविण्यामागे दोन कारणे होती :— (१) मोहिमांवरील खर्चांमुळे औरंगजेबाचा खजिना रिकामा होऊ लागला होता. (२) दुसरे कारण असे की हिंदूंना जबरीने त्याला मुसलमान करावयाचे होते. जिजिया कर वसूल करणारे अधिकारी हिंदूंचा अपमान करीत आणि त्यांच्यावर सक्ती करीत. कर देता न आल्यामुळे आणि अपमानातून सुटण्यासाठी अनेक हिंदूंनी मुसलमानी धर्माचा स्वीकार केला.

जसवंतसिंगाची मुले हातातून निसटली याचा औरंगजेबाला फार राग आला. त्याने जसवंतसिंगाच्या राणीविरुद्ध मोहिम पुकारली. जसवंतसिंगाच्या राणीने औरंगजेबाला पत्रे लिहिली आणि आपण आमच्यावर इतके का रागावला आहात असे विचारले. पूर्वीच्या मोगल बादशहांनी जोधपूरच्या राजांना किती तरी सवलती दिल्या होत्या. याचीही आठवण राणीने औरंगजेबाला करून दिली. पण प्रबळ माणसाशी वाद घालणे निष्फळच ठरणार. शेवटी राणीला जोधपूर राज्याचा एक प्रांत आणि मेडता हे गाव औरंगजेबाकडे लावून देणे भाग पडले. यानंतर औरंगजेबाने मोहिम थांबविली. जसवंतसिंगाने दाराची बाजू घेतली असती तर औरंगजेबाला सत्ता हस्तगत करणे फार जड गेले असते. राजा जसवंतसिंगाने औरंगजेबाची ही जी सेवा केली, तिचा मोबदला त्याने अशा प्रकारे दिला[1].

राणीबरोबर तह केल्यानंतर औरंगजेब आग्र्याला गेला. तेथे तो फार काळ राहिला नाही. दुसऱ्यांना उपद्रव करणे आणि त्यांच्याकडून उपद्रव करून घेणे, यासाठीच जणू काय त्याचा जन्म झाला होता. शिवाजी, विजापूर आणि गोवळकोंडा यांच्याशी चाललेली युद्धे पुरेशी आहेत असे त्याला वाटेना. तो आणखी युद्धाच्या शोधात राहिला. त्याने उदेपूरच्या राण्याशी युद्ध पुकारले. त्यातून जी मोठी बंडाळी उद्‌भवली, तीत त्याचा जवळ जवळ सर्वनाश होण्याची वेळ आली होती.

या सुमारास काश्मीरचा सुभेदार इब्राहिम खान[2] याने काश्मीरला लागून असलेल्या तिबेटी प्रांतामधील (लडाखमधील) मोहिम यशस्वीपणे केली होती. आपला

१. मनूची येथे लिहितो की, जसवंतसिंगाने दाराची बाजू घेतली होती. हे मनूचीनेच मागे सांगितले होते.

टीप.—औरंगजेबाच्या जोधपूरच्या रजपुतांशी झालेल्या लढ्या बुत्तांताविषयी पाहा :—जदुनाथ सरकारकृत "औरंगजेब".

२. इब्राहिमखान—हा अलिमर्दानखान अमीर-उल-उमराचा मुलगा होता. आमदानीच्या २१ व्या वर्षी (१६७७-७८) याची कुत्बुद्दीनखानाच्या ऐवजी काश्मीरच्या सुभेदारीवर नेमणूक झाली. नंतर त्याची बदली बंगालला करण्यात आली. आमदानीच्या ४१ व्या वर्षी (१६९७-९८) याच्या ऐवजी बंगालमध्ये राजपूत महम्मद अझीमची सुभेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. ४४ व्या वर्षी (१७००-०१) तो काश्मीरला परतला. ४६ व्या वर्षी त्याला अहमदाबादेस बदलण्यात आले. बहादूरशहाच्या आमदानीच्या पहिल्या वर्षी (१७०७-०८) त्याला काबूलला पाठविण्यात आले होते. ११२२ हि. (एप्रिल १७१०) ला वयाच्या ८० व्या वर्षी काश्मीरला सुभेदार असताना तो मरण पावला.

सुभेदार तिथेही काफराविरुद्ध मोहिम करतो आणि आपण कट्टर मुसलमान असूनही हिंदूंचा प्रमुख जो उदेपूरचा राणा त्याच्या विरुद्ध काही करू शकत नाही याचे औरंगजेबाला वैषम्य वाटले, यामुळे आपणही उदेपूरच्या राण्याविरुद्ध मोहिम करावी असे त्याने ठरविले[1].

**उदेपूरच्या राण्याविरुद्ध मोहिम** : उदेपूरच्या मोहिमेचे हे कारण होते. निदान अनेक कारणांपैकी हे एक होतेच. आपण विनाकारण युद्ध करीत आहोत असे दिसू नये म्हणून औरंगजेबाने उदेपूरच्या राण्याकडे दूत पाठवून काही मागण्या केल्या. त्या मागण्या म्हणजे निर्वाणीचा खलिताच होता. उदेपूरच्या राण्याने मुसलमान व्हावे, नाहीतर सर्वनाशास तयार व्हावे. मागण्या एका गुर्जबरदारा (दंडधारी) बरोबर कळविण्यात आल्या होत्या. त्या दूताने राण्याला सांगितले "बादशहाची पहिली मागणी ही आहे की तुम्ही आपली मुलगी बादशहाच्या एका मुलाला द्यावी." ही मागणी राण्याने मान्य करणे शक्य नव्हते. अर्थात, काही राजे लोकांनी आपल्या मुली मोगल बादशहांना दिल्या होत्या हे खरे. पण राण्याच्या मानाने हे राजे क्षुल्लक होते. उदेपूरच्या राण्याने जर औरंगजेबाची ही मागणी मान्य केली असती तर राण्याची प्रतिष्ठा धुळीला मिळाली असती. औरंगजेबाची दुसरी मागणी म्हणजे राण्याने आपल्या राज्यात स्वतःच्या नावाची नाणी पाडू नयेत. औरंगजेबाचीच नाणी चालली पाहिजेत. याचा अर्थ असा की, राणा हा स्वतंत्र राजा न राहता, औरंगजेबाचा सुभेदार बनला असता. औरंगजेबाची तिसरी मागणी ही होती की उदेपूर राज्यात गोवधबंदी उठली पाहिजे. औरंगजेबाची चौथी मागणी ही होती की उदेपूर राज्यातील सर्व देवळे पाडण्यात आली पाहिजेत व त्यांच्या जागी मशिदी उभ्या केल्या पाहिजेत; औरंगजेबाची शेवटची मागणी ही होती की, उदेपूर राज्यात शरियत कायद्याचा अंमल झाला पाहिजे आणि काजीचा अधिकार मान्य झाला पाहिजे. औरंगजेबाने वरील मागण्या पाठवून राण्याला बजावले की, माझ्या मागण्या मान्य केल्या नाहीत तर तुम्हाला राज्य सोडावे लागेल. राण्यावर युद्ध पुकारण्यासाठी औरंगजेब निमित्त शोधीत होता. त्याने कळविलेल्या मागण्यापेक्षा कडक मागण्या आणखी काही असू शकतील काय ?

उदेपूरच्या राण्याने औरंगजेबाच्या मागण्या मान्य केल्या नाहीत. त्याने औरंगजेबाला पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले, "आपल्या मुली मोगल बादशहांना देण्याची राण्याच्या घरात परंपरा नाही. मी आपली पूर्वजांची परंपरा मोडू शकत नाही. आपल्या कुळाला बट्टा लावण्याची जबाबदारी मला माझ्या अंगावर घ्यावयाची नाही."

१. उदेपूरच्या या मोहिमेचा चांगला वृत्तांत टॉडच्या राजस्थानमध्ये दिला आहे.

"तुमच्या दुसऱ्या मागणीसंबंधी (नाणी पाडणे) म्हणाल तर मोगल बादशहांनी जो वहिवाट आतापर्यंत संमत केली तिला सर्वस्वी विरुद्ध अशी मागणी आहे. आपल्या पूर्वजांचा इतिहास तुम्ही वाचाल तर माझ्या म्हणण्यातील सत्य तुमच्या लक्षात येईल."

"आता तिसरी आणि चौथी मागणी (गोवधाची परवानगी, देवळांचा नाश आणि मशिदींची उभारणी) याबद्दल मी म्हणेन की हिंदुस्थानात हिंदु धर्म कित्येक शतकापासून चालत आलेला आहे. आपल्या या मागण्या कोणीही राजा कबूल करू शकेल काय? याचा विचार करण्याचे काम मी आपल्यावरच सोपवितो. अशी मागणी करण्यापेक्षा राण्याचे शीर आणि उदेपूर राज्याचा नाश यांची मागणी करणे अधिक योग्य होईल.", "आता आपली शेवटची मागणी (शरियत कायद्याची अमलबजा-वणी आणि काझींचा अधिकार) आपल्या तिसऱ्या व चौथ्या मागण्या मी अमान्य केल्याच आहेत. आपल्या या मागणीला मी काहीच महत्त्व देत नाही. प्रत्येक धर्मातील न्यायालये ही त्याच्या धर्मशास्त्राच्या तत्त्वांच्या अनुसारच चालतात."

"आपण शेवटी म्हणता की या मागण्या मान्य केल्या नाही तर मला राज्य सोडावे लागेल. यावर माझे उत्तर असे की माझ्या पूर्वजांनी हे राज्य रास्त रीतीने कमावले आहे. त्यांनी इतर राज्यात ढवळाढवळ केली नाही. परमेश्वराने त्यांना जे दिले त्यावर ते संतुष्ट राहिले. हे आपल्याला सर्व सहज समजण्यासारखे आहे. आपल्याला हे पण माहित आहे की रणांगणात मी अनेक सैनिक आणू शकेन. आमच्या सैन्याच्या शौर्या-बद्दल मी इतकेच म्हणेन की तैमूर हिंदुस्थानात येण्यापूर्वी माझ्या सैन्याने अनेक राजांचा पाडाव केला होता."

मी जे सांगत आहे त्यातील शब्दन शब्द सत्य होय. मी आपल्याला मनःपूर्वक विनंती करतो की आपण माझे राज्यातील शांतता भंगवू नये. आपल्या विरोधी असलेली अनेक राज्ये आहेत. त्यांच्याविरुद्ध आपण शौर्य गाजवावे. माझ्या सैन्या-पैकी सात हजार स्वार आपल्या तैनातीत आहेत. इतर शत्रुराज्यांचा पाडाव करण्या-साठी आपण त्या सैन्याचा उपयोग करावा. या शिवाय आपल्याला अधिक सैन्य हवे असल्यास ते आपल्याकडे पाठविण्याची माझी तयारी आहे."

राण्याचे या स्वरूपाचे उत्तर येईल, या विषयीची औरंगजेबाला पक्की जाणीव होती. तरी पण, प्रत्यक्ष उत्तर येईपर्यंत तो थांबला. ते मिळताच[1] त्याने राजपुत्र शाहा आलम याजकडे जासुद पाठवून त्याला दक्षिणेतून परत बोलावून घेतले. शिवाजीशी लढण्याकरिता मागे थोडी फौज ठेवून त्याने विजापूर व गोवळकोंडा यांच्या बाद-शहांशी तह करण्याची त्याला सूचना दिली होती. शाहा आलम आणि दिलेरखान

1. आमदानीच्या २२ व्या वर्षी राणा राजसिंग (उदेपूर) कडून पत्र आले.

यांना कूच करून उत्तरेस ठरलेल्या स्थळी छावणी देण्यास सांगण्यात आले. (या सैन्यात मनुची होता) बादशहाच्या आज्ञेप्रमाणे औरंगाबादेहून मजल दर मजल करीत आम्ही उदेपूर जवळ राणासागर येथे आमची छावणी केली.[1] २२ जानेवारी १६८१).

औरंगजेबाने बंगालहून आपला दुसरा मुलगा आझम याला तातडीने बोलावून घेतले. उदेपूरच्या राण्याच्या राज्यावर कोणत्या दिशेने त्याने हल्ला करायचा हे ठरविण्यात आले. त्याला सहाय्यक दिलेरखान आपल्या सैन्यासहित मिळणार होता. औरंगजेबाने आपला तिसरा मुलगा अकबर याला ही मुलतानच्या सुभ्यावरून बोलावून घेतले. त्याच्या मदतीला तहव्वरखान[2] हा देण्यात आला. त्याने उदेपूरवर कोणीकडून हल्ला करावा हेही ठरविण्यात आले. गुजरातच्या सुभेदारालाही तातडीने सैन्य घेऊन राण्याच्या राज्यावर चाल करण्यास सांगण्यात आले. सारांश औरंगजेबाने या मोहिमेत आपले अवघे साम्राज्यच इरेस घातले. उदेपूरचा राणा हा लढू इच्छित नव्हता. वाडवडिलांकडून चालत आलेल्या अधिकारांवर आणि हक्कांवर तो भर देत होता. मोगल बादशहाला पराजित करण्याचा त्याचा हेतू नव्हता. तो फक्त मोगल बादशहाकडून आपले आणि आपल्या राज्याचे रक्षण करू इच्छित होता. उदेपूरच्या राण्यावर मोहिम करण्यासाठी औरंगजेबाने साम्राज्य पणास लावावे? यामुळे लोकांना अत्यंत विस्मय वाटला. या मोहिमेची हकीगत पुढे येईल. आपल्या पराक्रमी पूर्वजांनी घालून दिलेल्या परंपरांचे रक्षण करण्यात हिंदु किती दृढ आहेत हे या हकीगतीवरून वाचकांना समजून येईल.

उदेपूरच्या राज्याविरुद्ध मोहिम कशी आखावी हे वर दिल्याप्रमाणे ठरले. उदेपूरच्या राज्याला चोहोकडून वेढण्यात आले. इ. स. १६७९ मध्ये औरंगजेब आग्र्याहून निघाला.[3] त्याच्याबरोबर मोठे सैन्य होते. राण्याचे राज्य पूर्णपणे जिंकून

१. आलमगीराच्या २४ व्या वर्षी मोहरम २, १०९२ हि. (२२ जानेवारी १६८१) ला शाहा आलम उदेपूर येथे येऊन पोहचला अशी बातमी औरंगजेबाला मिळाली.

२. आलमगीराच्या २१ व्या वर्षी १०८९ हि.(१५ जुलै १६७८) ला राजपुत्र अकबराची मुलतानचे सुभेदार म्हणून नेमणूक झाली होती. २२ व्या वर्षी १०९० हि. (८ मार्च १६७९) ला तो औरंगजेबाच्या बोलावण्यावरून दरबारला परतला. तहव्वर खानाची अजमीरचा फौजदार म्हणून नेमणूक करण्यात आली. १०९० हि. (१६७९) (मासीरे-आलमगिरी १६६, १७३).

३. औरंगजेब दिल्लीहून निघाला आग्र्याहून नव्हे. औरंगजेबाच्या हालचालींच्या तारखा पुढील प्रमाणे आहेत :—शव्वाल ७ (२३ वे वर्ष) १०८९ हि. सप्टेंबर १३, १६७९ त्याचे तंबू आलमगडे गेले. शव्वाल २९ ला (ऑक्टोबर ४, १६७९) अजमीरच्या बाहेर आना सागर जवळ छावणी पडली. झुल ७ कादह. (डिसेंबर १०, १६७९ ला) त्याने उदेपूरला जाण्याकरिता अजमीर सोडले. वाटेत, देबारीला त्याला राजपुत्र अकबर येऊन मिळाला. हा मेरताहून आला होता. १५ झुल्हिज्जा जानेवारी १७, १६८० ला मांडलाहून निघून दरबारीला मुक्काम केला. राणा उदेपूरहून पळून गेला होता. औरंगजेब मोहरम २, १०९१ हि. (फेब्रुवारी ३, १६८०) ला राणासागरला गेला आणि १ जाफरला १०९१ हि.(मार्च ४, १६८०) ला चितोडला गेला. १४ जाफर १०९१ हि. मार्च १४ १६८०) ला तो अजमीरला परत जाण्यासाठी निघाला. (मासीरे-आलमगिरी १८०–१९०).

घेण्याचा त्याने दृढ निश्चय केला होता. तळ दिला तेथून त्याने ( औरंगजेबाने ) उदेपूर राज्यावर जोरदार हल्ला चढविण्यासाठी आपल्या सेनाधिकाऱ्यांना हुकूम पाठविले. त्याने स्वतःही एका दिशेने उदेपूर राज्यावर चाल केली. राण्याला हे कळले, तेव्हा त्याने डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या आपल्या जनतेला घरे-दारे सोडून डोंगरात आश्रय घेण्याची आज्ञा केली. राण्याने स्वतःचे वाडे मात्र सुसज्ज स्थितीत राहू दिले. औरंगजेबाशी लढण्याची त्याची इच्छा नव्हती. त्याने औरंगजेबाला निरोप पाठविला की आपण कृपा करा आणि पुढे येऊ नका पण राण्याच्या या सौजन्य वृत्तीचा अर्थ औरंगजेबाने हा आपल्याला भीतो असा केला. त्याने उदेपूर राज्याची शक्य तितकी हानी केली. प्रत्येक देऊळ फोडण्यात यावे आणि त्यात गायी मारण्यात याव्या असा त्यांनी हुकूम दिला.[1] एका राजवाड्यात माजी राण्यांचे, आणि राणा राजसिंह आणि त्याच्या कुटुंबियाचे पुतळे होते. त्यांचे तुकडे तुकडे करण्याची त्याने आज्ञा केली. परंतु औरंगजेबाचा आपण किती सहजपणे नाश करू शकलो असतो, आणि तरीही मैत्रीची कशी इच्छा करू शकतो, हे राण्याने त्यास एक दिवस दाखवून दिले.

हा वेत केल्यानंतर राण्याने मोगल फौजांच्या डोंगराळ भागातील वाटा अशा बंद केल्या की त्यांना परतणे अशक्य झाले. आपण कोठे आहोत याचीही त्यांना पुरती कल्पना नव्हती. कारण डोंगरातील वाटा अतिशय आडवळणाच्या असल्यामुळे त्या फक्त तेथील रहिवाश्यांनाच चांगल्या ठाऊक असतात. आपण पुरते वेढलो गेलो आहोत याची जाणीव औरंगजेबाला झाली व त्याला धक्का बसला. मनात आणील तर राणा आपल्यावर हल्ला करू शकेल. पण तसे करण्याची त्याची इच्छा दिसत नाही हेही औरंगजेबाला जाणवले. त्याची आवडती बेगम, उदेपुरी बेगम हिचाही त्याला ठावठिकाणा लागेना. औरंगजेब आता पुरतेपणी घाबरला होता. बादशहाच्या छावणीत रसदही येईनाशी झाली. उदेपूरच्या राण्याने एक दिवस बादशहाच्या छावणीत रसद पूर्णपणे बंद केली. लोकांची अक्षरशः उपासमार झाली. खुद्द औरंगजेबाला आणि त्याच्या सैन्याला थोडीशी खिचडी खाऊन दिवस साजरा करावा लागला. दुसऱ्या दिवशी राण्याने बादशाही छावणीत रसद पाठविली. या योगे मला तुमच्याशी लढावयाचे नाही असेच राण्याला दाखवायचे होते.

संध्याकाळच्या सुमारास राण्याने उदेपुरी बेगमला एका संरक्षक पथकाबरोबर बादशहाच्या छावणीत पाठविले. माझ्या सैनिकांनी माझ्या आज्ञेवाचून रस्ते रोखून धरले होते. असे निमित्त सांगून राण्याने बादशहाला राज्य सोडून जाण्यास आणि उदेपूर राज्यात शांतता नांदू देण्याची विनंती केली. एखादा रानटी आणि क्रूर

१. राणासागराच्या तीरावर असलेली तीन देवळे उध्वस्त करण्यात आली. उदेपूर आणि त्याच्या आसपासच्या भागातील १७३ देवळांचा नाश केल्याबद्दलचा वृत्तांत हुसेन अलीखान याने पाठविला होता. बादशहाच्या हुकुमाने चितोडमधील ६३ देवालये पाडून टाकण्यात आली. (मासीरे-आलमगिरी, १८८, १८९).

राजाही अशा विनंतीने शांत झाला असता. उदेपूरच्या राण्यावर औरंगजेबाने अन्यायाने हल्ला केला होता. या प्रसंगी राणा औरंगजेबाचा नाश करू शकला असता. असे असूनही राण्याने औरंगजेबाला जीवदान दिले. पण अशा सौजन्याने औरंगजेब आपले ठरलेले बेत सोडून देणार नव्हता. त्याने आपली मुले आणि सेनाधिकारी यांना उदेपूर राज्यात खोलवर जाण्याचे हुकुमावर हुकूम केले. आपल्यावर पुनः आपत्ति ओढवू नये म्हणून औरंगजेब स्वतः अजमीरला परत गेला. औरंगजेबाचे सगळे सैन्य उदेपूरच्या मोहिमेत गुंतले होते. अजमीरला त्याच्यापाशी फक्त दोन हजार माणसे होती. पण औरंगजेबाची मुले आणि सेनाधिकारी हे काहीना काही कारणे सांगून मोहिमेत लढण्याची टाळाटाळ करीत. उदेपूरच्या राज्यात घुसणे सोपे पण तेथून परतणे किती कठीण आहे हे त्यांना माहीत होते. स्वतः बादशहावर काय आपत्ती ओढवली होती, याचीही त्यांना माहिती होती. असे असूनही औरंगजेब मोहिम थांबविण्याचे नाव घेत नव्हता.

अशाच डोंगराळ भागात पठाणांची औरंगजेबाशी गाठ पडली असती तर त्यांनी औरंगजेबाचा शिरच्छेद करण्याची संधि गमावली नसती. पण उदेपूरचा राणा आपल्या पूर्वजांची परंपरा सांभाळण्याकडे लक्ष देत होता. तो औरंगजेबाला भीत होता असे नव्हे. पण औरंगजेबावर सूड घेण्याची त्याची जिद्द नव्हती. त्याने आणखी एक मसलत उपयोगात आणली. काहीच्या हे झाले तरी उदेपूरचे राज्य जिंकून घेईनच घेईन असा औरंगजेबाचा निश्चय झाला आहे, याची जाणीव उदेपूरच्या राण्याला झाली होती. या बरोबरच औरंगजेबावर हल्ला करायचा नाही याचाही राण्याने ठाम बेत केला होता. म्हणून राण्याने मसलत अशी योजिली की औरंगजेबाच्या मुलांनी आपल्या बापाविरुद्ध बंड करून उठावे.

**राजपुत्र अकबर बंड करतो :** राण्याला असे कळले होते की, राजपुत्र अकबर[1] हा सर्वांत जरी धाकटा मुलगा असला, तरी लहानपणापासून धीटपणा व दांडगाई सर्वांपेक्षा तोच अधिक दाखवित असे. राण्याने अकबराकडे काही निवडक लोक पाठविले. त्यांनी अकबराला सांगितले "तख्त मिळविण्याची ही संधि गमावू नका. उचल करण्याची हीच वेळ आहे. बादशहाजवळ लोक थोडे आहेत. इतर राजपुत्र राण्याच्या प्रदेशात गेलेले आहेत. बादशहापासून ते फार दूर आहेत. तख्त मिळविण्याचा असा मोका पुनः येणार नाही." अकबराने हा सल्ला स्वीकारला. तो त्याच्या (अकबराच्या) सैनिकांना व अधिकाऱ्यांनाही पसंत पडला. सत्ता बळकावण्याच्या व बादशहाचा शिरच्छेद करण्याच्या हेतुने अकबराने कूच केले.

१. राजपुत्र अकबराच्या बंडाच्या सविस्तर माहितीकरिता खाफीखान ii २३१–२७०; इलियट आणि डौसन vii २९८–३०४ पाहा.

अकबर पळून गेल्याचे औरंगजेबाला १०९१ हि. जानेवारी १८, १६८१ ला कळले (मासीरे-आलमगिरी, १३७).

शाहा आलमकडे हेरांनी येऊन या बंडाची माहिती दिली. पण शाहा आलमने त्यावर विश्वास ठेवला नाही. अथवा ती महत्वाची असल्याचेही त्याने दाखविले नाही. कारण ही महत्त्वाची बाब असे म्हटले तर ती औरंगजेबाच्या कानावर घालणे आवश्यक होते. पण अकबर हा औरंगजेबाचा फार लाडका असल्यामुळे तो शाहा आलमच्या या बातमीवर विश्वास ठेवणे शक्य नव्हते. उलट आपलाच (शाहा आलमचा) काही कट पार पाडण्यासाठी ह्या बातमीचा बनाव त्याने घडवून आणला असावा असेच औरंगजेबाला वाटण्याची शक्यता होती. तरी सुद्धा, शाहा आलमने, आपल्या सेनाधिकाऱ्यांच्या समोर त्या हेरांनी सांगितलेली हकीकत लिहून घेण्यास सांगितले. त्याचा सारांश असा : आता सगळीकडे खळबळ माजणार आहे. राजपुत्र अकबराने आपण बादशहा झाल्याचे जाहीर केले आहे आणि बापाला कैद करण्याच्या हेतुने त्याने कूचही केले आहे. या लेखी निवेदनाच्या शेवटी सेनाधिकाऱ्यांनी व इतर अधिकाऱ्यांनी सह्या केल्या. मग ते निवेदन शाहा आलमने तातडीने औरंगजेबाकडे पाठविले. राजपुत्र अकबरावर औरंगजेबाचे विशेष प्रेम होते. त्याने शाहा आलमच्या या पत्रावर विश्वास ठेवला नाही. "ह्या सर्व खोट्या गोष्टी असून अकबराचे बंड झालेच नाही" असे तो म्हणाला.

पण त्याच दिवशी औरंगजेबाच्या छावणीत अकबराचे छावणीतून बातमी येऊन थडकली की अकबराने खरोखर बंड केले असून जोधपूरच्या तीस हजार रजपूत सैनिक त्याच्या बरोबर आहेत. या रजपुतांचे नेतृत्व दुर्गादास व सोनिंग[1] या दोघांकडे आहे. या शिवाय राजपुत्र अकबराबरोबर आणखीही सैन्य आहे. हे सगळे सैन्य घेऊन अकबर तडफेने औरंगजेबावर चाल करून येत आहे. औरंगजेबाचा मुक्काम त्यावेळी अजमीर येथील 'आना' सागर या प्रसिद्ध तलावाजवळील बाड्यात होता. त्याने आपल्या संरक्षणाची शक्य तितकी तयारी केली.

शाहा आलम, अझमतारा, व इतर सेनाधिकारी, यांना, तातडीची पत्रे पाठवून ताबडतोब आपल्या साहाय्यास येण्याबद्दल औरंगजेबाने कळविले. वरील कारणामुळे आम्ही (शाहा आलम बरोबर मनुची आहे) उदेपूरहून कूच करून औरंगजेबाला येऊन मिळालो. तोपर्यंत त्याने अजमीर बाहेर आपला तळ दिला होता (२५ जानेवारी १६८१). मागे दाराशी लढताना त्याने येथेच म्हणजे दोबारा या खेड्यात तळ दिला होता.[2]

१. 'सोनएजी' ऐवजी टॉडने ('राजस्थान', खंड २ पा. ६०) सोनिग असे दिले आहे. तो, ते दुर्गादासचे विशेषण आहे असे देतो. परंतु सोनिंग हा वेगळा मनुष्य होता. कारण त्याच्या मृत्यबद्दल (मृत्यु– १६ ऑगस्ट १६८१) दुःख व्यक्त करण्यात आले होते. (वरील ग्रंथ) आणि दुर्गादास यानंतर बरेच दिवस हयात होता. माशीरे उल-उमरा मध्ये हे नाव सोनिग असेच दिले आहे. वर ज्या तळ्याचा उल्लेख केला आहे त्याचे नाव आना-सागर असे असून अजमीर जवळ तो अजून अस्तित्वात आहे.

२. मासीरे-आलमगिरीत (पा. २००) म्हटले आहे. मोहरम ५, (जानेवारी २५, १६८१) ला औरंगजेब ३५ करोब अंतरावर (अजमीरपासून) असलेल्या दोबारा खेड्यावर गेला.

बंडखोर अकबर हा हल्ल्यासाठी म्हणून त्याठिकाणी पोहचण्याच्या अवघे तीनच तास आधी आगरी पोहचलो होतो. औरंगजेबाने तळावर पोहचण्याच्यापूर्वी आपल्या बंडखोर मुलाला पुढील अर्थाचे पत्र लिहिले होते. "तुझ्याबद्दल लोकांनी खोटे वृत्तांत मला दिले आहेत. तू मला प्राणाहूनही प्रिय आहेस. दुष्ट माणसांनी तू माझ्याविरुद्ध बंड केले आहेस, असे मला कळविले आहे. हे खरे असेल तर या बंडाचे कारण काय? तू माझा लाडका मुलगा. तू माझ्याविरुद्ध बंड करावे हे योग्य नाही. विशेषतः तुम्हा मुलांच्या वैभवासाठी मी मोठी मोहिम (राण्याविरुद्ध) हातात घेतली आहे. यावेळी तू बंड करून साम्राज्यात गोंधळ माजवावा हे अनुचित होय. तू यावेळी शांत रहा. राण्याबरची आपली मोहिम पार पडू दे. माझे तुझ्यावर किती प्रेम आहे, याचे तुला योग्य वेळी प्रत्यंतर येईल."

हे पत्र मिळाल्यावर राजपुत्र अकबरने आपला बेत काय आहे हे बाजबीपेक्षा अधिक स्पष्ट केले. त्याने मोठ्या धीटाईने आपल्या बापाला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले. "मी बंड पुकारले आहे, ही गोष्ट खरी आहे. आपणाशी लढण्याकरिताच मी त्या दुर्गम व डोंगराळ भागातून बाहेर पडून तिकडे येत आहे. माझ्या बंडाचे कारण, आपण विचारता तर त्याला उत्तर हे की, आपल्या शिकवणुकीचेच फळ आहे. आपण आपल्या बापाविरुद्ध बंड केले नव्हते काय? तुमच्या जुल्मी कृत्यांनी साम्राज्यात सर्वांना तुमच्याबद्दल चीड आली आहे. विशेषतः आपल्या पूर्वजांनी हिंदुस्तानातील विविध जमातींना जे हक्क आणि अधिकार दिले होते, ते आपण काढून टाकीत आहात याचा सर्वांना उबग आला आहे. म्हणून आपण युद्धास सज्ज व्हा मी आपल्यांशी लढण्यास येत आहे."

आमच्या फौजेतील लोकांना ही बातमी समजल्यावर एकच गोंधळ उडाला. राजपुत्र अकबराची तडफ आणि औरंगजेबाजवळ असलेले मर्यादित सैन्य हे पाहून काही लोक अकबराकडे जावे किंवा कसे याचा विचार करू लागले. या गोंधळामुळे शाहा आलम कालवीत पडला. हे मला (मनुचीला) स्वतःला ठाऊक आहे. अकबराने आपली मोहिम तडफेने पुरी केली नाही ही त्याची चूक झाली औरंगजेबाने आपल्या बापाविरुद्ध बंड केले, हा धडा अकबर शिकला होता. पण औरंगजेबाची तडफ आणि तडकाफडकी काम उरकण्याची वृत्ति ही त्याच्यापाशी नव्हती. ती असती तर अकबर निश्चितपणे बादशहा बनला असता. कारण त्यावेळी औरंगजेबापाशी पुरेसे सैन्य नव्हते. अकबराच्या सैन्यांत औरंगजेबाच्या लोभाची काही माणसे होती. त्यांच्याद्वारे त्याने काही ज्योतिषी फितविले. ज्योतिष्यांनी अकबराचे हल्ला करण्यापूर्वी काही दिवस दम धरण्यासाठी मन वळविले. हा काळ अकबराने राज्यारोहणासाठी सिंहासन तयार करणे, आणि इतर वस्तू करणे यात घालविला. ज्योतिष्यांच्या या कृत्यामुळे औरंगजेबाला आपले सैन्य गोळा करण्यासाठी अवधि मिळाला.

२४ डिसेंबर १६८० रोजी आम्ही राणासागर येथे असताना आम्हाला धूमकेतु दृष्टीस पडला.[1] याचे दुष्परिणाम काय होतील या कल्पनेने आमच्या छावणीत अस्वस्थता निर्माण झाली होती. जानेवारी महिन्यात या भागात काही काळपर्यंत पाऊस आणि वादळी वारे यांचा मोसम असतो. उदेपूरहून निघून अजमीरला पोहोचेपर्यंत आम्हाला पाऊसपाण्याचा आणि चिखलाचा त्रास झाला. असे असूनही आम्ही अकबर अजमीरला येऊन ठेपण्यापूर्वी तीन तास आधी औरंगजेबाला येऊन मिळालो होतो. अकबराने दोन दिवसांत आटोपायचा प्रवास पूर्ण करण्याकरिता चार दिवस घेतले. तो आधी येऊन पोहोचला असता तर औरंगजेबापाशी फारच थोडे सैन्य होते.

औरंगजेब बंडखोर मुलाला भीत होत होता असे नव्हे. त्याला भीति त्याच्या (अकबराच्या) बरोबर असलेल्या तीस हजार रजपुतांची. आपण जसवंतसिंगाची राणी आणि मुले यांना अतिशय दुखावले आहे, याचा सूड घेण्यास रजपूत उत्सुक आहेत, याची औरंगजेबाला जाणीव होती. पण आपण भ्यालो नाहीत असे दाखविण्यासाठी त्याने अकबराला पुढे चाल करून येण्याचे आव्हान दिले. आता लढाईला तोंड लागणार हे कळताच त्याच्या नेहमीच्या युक्त्यांचा अवलंब करण्याचे त्याने ठरविले आणि त्याप्रमाणे अकबराला पुढीलप्रमाणे एक पत्र लिहिले. "तुझा आज्ञाधारकपणा मी नेहमीच वाखाणीत आलो आहे. बंडाचे हे ढोंग करण्यात तो स्पष्टच दिसला. परंतु आता त्याच आज्ञाधारकपणे हे कार्य पुरे करणे आवश्यक आहे. यासाठी तुझे रजपूत सैनिक तू आघाडीवर ठेवण्यास विसरू नकोस आणि लढाईच्या वाटेत, त्यांच्यापैकी जितक्या जास्तीतजास्त लोकांना ठार मारता येईल तितके ठार करण्याचा प्रयत्न कर. मी आणि माझी फौज मिळून इतरांस गारद करू. अशा रीतीने रजपुतांवर सूड उगवून त्यांचा पुरता बीमोड करू. असे झाल्याने तुझी इच्छा पूर्ण होईल." औरंगजेबाने हे पत्र लिहिले, त्यात त्याचा हेतू काय होता? त्याला माहित होते की, रजपूत आपण होऊन लढाई आघाडीवर रहातील. आपले पत्र त्यांच्या हाती पडेल आणि त्यांना अकबराचा संशय येऊन ते त्याला सोडून जातील. असेच घडले. पत्र रजपुतांच्या हाती पडले. अकबर आपला विश्वासघात करीत आहे, असे वाटून ते त्याला सोडून निघून गेले.

अकबराला याची मुळीच कल्पना नव्हती. दुसऱ्या दिवसाच्या युद्धाची तयारी करावी म्हणून तो मध्यरात्री उठला. पहातो तो काय! छावणीतून सगळे रजपूत निघून गेलेले. अकबरापाशी फारच थोडे सैन्य होते. आपण एकाकी पडलो या विचाराने अकबर अत्यंत कष्टी झाला. काय करावे हे त्याला सुचेना. अशा वेळी तहव्वरखान[2] पुढे झाला. अकबराला गादी मिळवून देण्यासाठी त्याने आपल्या

१. ही तारीख हिंदी इतिहासाशी जुळते व ती बरोबर असावी.

२. आनबेग हरवी, प्रथम तहव्वरखान व नंतर बादशाहा कुलीखान पदवी असलेला औरंगजेबाचा मोगल सरदार. राजपुत्र अकबराला त्याच्या बंडाच्या वेळी जाऊन मिळाला. मोहरम ६, १०९२ हि. (जानेवारी २४, १६८१) ला दुष्ट हेतूने रात्रीच्या वेळी बादशहा औरंगजेबाकडे गेला आणि मारला गेला (मासीरे-आलमगिरी ४४७ आणि तारीख-इ-महम्मदी १०९२).

प्राणाची बाजी लावण्याचे ठरविले. तो अकबराला म्हणाला, "आपल्या जवळ पुरेशी माणसे नाहीत. आपण हे यश पार पाडू शकत नाही. आपण येथेच थांबावे. मी जाऊन औरंगजेबाचा वध करतो."

त्याच्या संकल्पाप्रमाणे तहव्वरखान बादशहाच्या छावणीत शिरला. त्याने अंगात चिलखत घातले होते. त्याला ओळखत असल्यामुळे पहारेकऱ्यांपैकी कोणीच हटकले नाही. त्यावेळी पाऊस पडत होता आणि वारे वहात होते. अशा स्थितीत तहव्वरखान बादशहाच्या तंबूपर्यंत जाऊन पोहोचला. त्याला तंबूत प्रवेश मिळाला असता तर तहव्वरखानाने औरंगजेब, शाहआलम व त्याची मुले यांना ठार मारले असते. त्यावेळी ते सगळे अरक्षित होते. पाऊसपाण्यामुळे तंबूवरील शिपाई आपापल्या राहुट्यात गेले होते.

त्यावेळी औरंगजेबाच्या तंबूच्या प्रवेशद्वारावर फक्त एक-दोन पहारेकरी होते. त्यांचा मुख्य लुत्फुल्लाखान[1], शहाजहानच्या काळी वजीर असलेल्या सादुल्लाखानाचा हा मुलगा होता. तो तंबूच्या प्रवेशद्वाराच्या आत होता. त्याने तहव्वरखानाला विचारले, "तू कोण आहेस?" तहव्वरखान म्हणाला, "मी तहव्वरखान आहे." आपण बादशाही सरदार असल्यामुळे आपल्याला हा ताबडतोब आत जाऊ देईल अशी तहव्वरखानाला खात्री होती. पण, तुझा निरोप बादशहाकडे कळवितो, तोपर्यंत थांब, असे म्हणून लुत्फुल्लाखान आत गेला. आपली शस्त्रास्त्रे काढून ठेवावी, आणि मग आत यावे, या अटीवर बादशहाने त्याला आत येण्यास परवानगी दिली. बादशहाचा हा निरोप ऐकून तहव्वरखान म्हणाला, "मी तलवार काढून ठेवणार नाही. ही तलवार बादशहानेच माझ्या कमरेला बांधली आहे." लुत्फुल्लाखान म्हणाला, "तुम्ही तलवार काढून ठेवल्याशिवाय बादशहासमोर जाता येणार नाही." दोघे बरळीला आले. हा हा म्हणता माणसे त्या ठिकाणी गोळा झाली. तहव्वरखानाचे रक्त तापले. त्याने तलवारीला हात घातला. लुत्फुल्लाखान आणि त्याच्या बरोबरचे इसम यांनीही शस्त्रे घेतली आणि मारामारी सुरू झाली. तहव्वरखानाच्या अंगात चिलखत होते, तो कोणाला आटपेना. हा गोंधळ ऐकून बादशहाने त्याला ठार मारण्याची मोठ्याने आज्ञा केली. तहव्वरखान तेथून पळून जाऊ पहात होता, पण दोऱ्यांच्या आणि तंबूच्या दोरांमध्ये त्याचा पाय अडकला आणि तो जमिनीवर कोसळला. लोक त्याच्यावर तुटून पडले आणि त्यांनी त्याचे डोके कापले. औरंगजेबाने त्याला तेथेच पुरण्याची आज्ञा केली. अशा रीतीने अकबराला बादशहा करण्याच्या प्रयत्नात तहव्वरखान मरण पावला.

१. लुत्फुल्लाखानाच्या माहितीकरिता मआसिरे-उल-उमरा iii १७१ पान पाहा. लुत्फुल्लाखान १८ शव्वाल १११४ हि. (७ जानेवारी १७०२) ला मरण पावला.

तहव्वरखानाच्या मृत्युची बातमी समजल्यावर राजपुत्र अकबर आपल्या तंबूत गेला. त्याने सोने, नाणी, जवाहिर ठेवलेल्या पेट्या फोडल्या. आपल्या बरोबर असलेल्या स्त्रियांना पुरुषी वेश देऊन त्यांच्यासह तो रजपुतांच्या प्रदेशात पळून गेला. दिवस उजाडताच त्याला रजपूत सेनाधिकारी भेटले. तो पावेतो त्यांना अकबराच्या पळून येण्याचे कारण समजलेले होते. तसेच औरंगजेबाने केलेली फसवणूकही त्यांच्या लक्षात आली. पण आता वेळ निघून गेली होती.

सूर्योदय झाला. अकबराच्या छावणीतून माणसे आपले कपडे, गुरे ढोरे घेऊन येजा करीत होते. काही औरंगजेबाच्या छावणीकडे येऊ लागली. औरंगजेबाने आपल्याला क्षमा करावी अशी त्यांची इच्छा होती. त्यांचे म्हणणे असे की, "आम्ही अकबराची आज्ञा पाळण्याचे नाकारले असते, तर त्याने आम्हाला मारून टाकले असते. आम्ही रात्रीच्या अंधाराची संधी साधून छावणी सोडून पळून आलो आहोत." औरंगजेबाने त्यांचे काही ऐकले नाही. त्याने त्यांना कैद करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यात पाठविले.

**शाहा आलम अकबरावर चाल करून जातो :** महत्त्वाच्या गोष्टीत औरंगजेब कधीही विलंब होऊ देत नसे. अकबर पळून गेला आहे हे कळताच त्याने शाहा आलमला त्याच दिवशी त्याचा पाठलाग करून त्याला पकडून आणण्याची आज्ञा केली[1]. (२६ जानेवारी १६८१). शाहा आलमने औरंगजेबाला पुढीलप्रमाणे कळविले, "अकबराला जिवंत पकडण्याचा मी शक्य तितका प्रयत्न करीन पण अकबर हा दृढनिश्चयी आहे. तो लढाई करण्याची शक्यता आहे आणि लढाई झालीच तर तो मारला जाण्याची शक्यता आहे. असे काही घडले तर आपण मला दोष देऊ देऊ नये अशी विनंती आहे." औरंगजेबाने उत्तर लिहिले, "अकबर मारला जरी गेला तरी काही हरकत नाही. बंडखोर मुलाची जिवंत राहाण्याची पात्रता नाही."

मग आम्ही बादशहाच्या छावणीतून बरेच सैन्य घेऊन निघालो. नुकत्याच झालेल्या पावसामुळे आम्हास बराच त्रास झाला. औरंगजेबाच्या मदतीला येण्यासाठी राण्याच्या प्रदेशातून तातडीने आल्यामुळे आम्ही सर्व थकून गेलो होतो आणि आता आम्ही अकबराच्या पाठलागावर निघालो होतो. अकबर हा रजपूतांच्या प्रदेशात धावपळ करीत होता. त्याच्या मागोमाग कधी एका दिशेने तर कधी दुसऱ्या दिशेने पाठलाग करीत फिरावे लागले. ही स्थिती अखेरपर्यंत होती.

शाहा आलम हा आपल्या बापाच्या तालमीत तयार झाला होता. अकबराने शरण यावे म्हणून त्याने अकबराला या काळात पुनः पुनः पत्रे लिहिली. तुम्ही

१. अकबर मोहरमच्या ५ अथवा ६ व्या दिवशी १०९२ हि. (जानेवारी २४–२५, १६८१) पळून गेला. शाहा आलमला त्याचा पाठलाग करण्याकरिता जानेवारी २६, १६८१ ला पाठविण्यात आले. (मासीरे-आलमगिरी २०२–२०३).

शरण आला तर मी वडिलांकडून तुम्हाला क्षमा करविण्याचा काही मार्ग शोधून काढीन असेही त्याने सांगितले. अकबराला औरंगजेबाची चांगली माहिती होती. त्याचा औरंगजेबावर विश्वास नव्हता. तरी पण शाहा आलमचे म्हणणे आपल्याला पटले असल्याचे त्याने सोंग केले. त्याने शाहा आलमला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, "तुमच्या पत्राप्रमाणे मी राजीखुशीने तुमच्याकडे येईन. पण मला कर्ज झाले आहे. मला चार हजार मोहरांची जरूर आहे. माझे कर्ज फिटले की मी न चुकता तुमच्या स्वाधीन होईन."

आपला भाऊ खरे बोलत असावा या समजुतीने शाहा आलमने त्याच्याकडे चार हजार मोहरा पाठवून दिल्या. अकबराने आपले कर्ज फेडले आणि मराठ्यांचा आश्रय घेण्यासाठी त्याने दक्षिणची वाट धरली. राजपुतान्याच्या दुर्गम आणि डोंगराळ भागातून आम्हाला त्याचा पाठलाग करता येईना. या सुमारास नजाबत खानाचा मुलगा खाने आलम हा अकबरला सोडून शाहा आलमकडे आला. शाहा आलमची शिफारस न ऐकता औरंगजेबाने खाने आलमला कैदेत टाकले. खाने आलमला अन्नातून विष देण्यात आले त्यामुळे तो मरण पावला.

औरंगजेबाने या सुमाराला शाहा आलमला पुढीलप्रमाणे कळविले, "अकबर पळून गेला, हे तुम्ही मला कळविले. ही बातमी मला त्यापूर्वी माझ्या हेरांकडून कळली होती. तुमच्याने ही मोहिम चांगली पार पडत नाही. तुम्ही दरबारात परत यावे." औरंगजेबाच्या आज्ञेने आम्ही लांब मजलांनी त्याच्या छावणीत जाऊन मिळालो.

अकबराच्या बंडाळीमुळे सर्व साम्राज्यात गोंधळ उडाला. हे औरंगजेबाने पाहिल्यावर प्रांतातील सुभेदारांना त्याने आज्ञा पाठविल्या की, उत्सव व समारंभ करून बंड मोडल्याचे जाहीर करावे. या काळात अकबर दक्षिणेकडे पळून चालला होता. त्याला पकडण्याचे आणि मारण्याचे पुष्कळ प्रयत्न झाले. परंतु काही उपयोग झाला नाही. अकबराने संभाजीच्या राज्यात आश्रय घेतला. आपल्या कट्टर शत्रूचा मुलगा आपल्या राज्यात आश्रयासाठी आला आहे याचा संभाजीला अभिमान वाटे.[1]

**औरंगजेब उदेपूरच्या राण्याबरोबर तह करतो :** उदेपूरच्या राण्याचा मुलूख डोंगराळ आणि दुर्गम. तो जिंकता येईल असे औरंगजेबाला वाटेना. त्यात अकबराने संभाजीच्या राज्यात आश्रय घेतला या घटनेची भर पडली. औरंगजेबाला आता राण्याशी तह करावा असे वाटू लागले. राण्याने यापूर्वीच अशा प्रकारची विनंती पुष्कळ वेळा केली होती. दक्षिणेत आपले लष्करी बळ वाढवावे याची

१. खाने जहान (बहादूरखान) याने दरबारला बातमी दिली की ७ जमादा I १०९२ हि. (२५ मे, १६८१) ला बऱ्हाणपुर जवळून जाताना अकबराने संभाजीच्या प्रदेशात प्रवेश केला. (मासीरे-आलमगिरी २०५ पा. शेवटची ओळ).

औरंगजेबाला तळमळ लागली होती. संभाजीच्या सहाय्याने अकबर आपले बळ वाढविण्यात वेळ अगर संधी वाया दवडणार नाही अशी त्याला भीति वाटत होती. शहाजहानच्या विरुद्ध लढताना औरंगजेबानेही दक्षिणेतच बळ, सैनिक आणि संपत्तिही संपादन केली होती. अकबरही असेच करील असे त्याला वाटू लागले.

उदेपूरच्या राण्याशी तह करण्यास औरंगजेब उत्सुक होता. पण ही मागणी आपल्याकडून जर गेली तर आपली अप्रतिष्ठा होईल असे त्याला वाटू लागले. उदेपूरचा राणा, त्याचे सरदार आणि उदेपूरची मैत्री असलेले आपले काही अधिकारी याबद्दल आपली टिंगल उडवितील असेही त्याला वाटू लागले. यामुळे त्याने दिलेरखानाला मध्यस्थ म्हणून तह घडवून आणण्यासाठी सांगितले.[1] दिलेरखानाने उदेपूरच्या राण्याला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले "उदेपूरचे राज्य आणि मोगल साम्राज्य यांच्यामध्ये दीर्घ काळापासून मैत्री चालत आली आहे. युद्ध काळात शत्रूंना आपण सौजन्याने आणि दिलदारपणे वागविता. हे युद्ध चालू राहावे अशी आपली इच्छा नसल्याची चिन्हे दिसत आहेत. म्हणून आपली इच्छा असेल तर मी, आपण आणि औरंगजेब बादशहा यांच्यामध्ये शांतता स्थापन करण्यासाठी मध्यस्थी करण्यास तयार आहे."

तहाची निकड आपल्याला नाही, हे औरंगजेबाला पटवून देण्यासाठी राण्याने दिलेरखानाला मोघम आणि टाळाटाळीची उत्तरे दिली. पण औरंगजेबाच्या आज्ञेने दिलेरखानाने कधी नरम तर कधी गरम अशी पत्रावर पत्रे राण्याला पाठविण्यास सुरवात केली. एकदा तो म्हणे मोगलांचे बळ प्रचंड आहे, ते सगळे राज्य उध्वस्त करू शकतील आणि एकदा तो म्हणे की उदेपूरच्या राण्याने मोगल बादशहाशी युद्ध करण्याची कधीच इच्छा धरली नव्हती. अकबराच्या बंडामुळे बादशहा अडचणीत आहे. यावेळी तहाला कबूली दिली तर बादशहावर मोठे उपकार होतील.

उदेपूरच्या राण्याने औरंगजेबाला पाच महिनेपर्यंत झुलवित ठेवले. त्याली दक्षिणेत अकबर आणि संभाजी हे काही स्वस्थ बसून नव्हते. औरंगजेबाला हा काळ फार जड गेला. अशा रीतीने पाच महिने गेल्यानंतर राण्याने आपल्या भावाला[2] औरंगजेबाकडे पाठविले. औरंगजेबाने त्याचा सत्कार केला. शेवटी औरंगजेब आणि उदेपूरचा राणा यांच्यात तह झाला. उदेपूरच्या राण्याचा एक प्रांत पूर्वी मोगलांनी

१. आर. ओर्मेकृत 'ऐतिहासिक त्रुटित' पा. १०६ आणि टॉड 'राजस्थान' पाहा. (३६०-३६१) 'टॉड देतो की, दिलेरखानाने एका रजपूत अधिकाऱ्याचा (बिकानेरच्या श्यामसिंग) उपयोग करून घेतला होता. टॉड त्यांच्या मधील करार-तहाच्या अटी पण देतो.'

२. हा राणा जयसिंगाचा भाऊ भीमसिंग असावा. भीमसिंगाची औरंगजेबाने दरबारात भेट घेतली. (१२ शबान १०९२ हि. २८ ऑक्टोबर १६८१) (मासीरे-आलमगिरी २१२). वाटाघाटी करण्याकरिता राण्याचा चुलता सुरसिंग हा आला होता असे टॉड म्हणतो. (३६० टॉड).

घेतला होता तो त्याला परत करण्यात आला. राण्याचे पुर्वापार चालत आलेले हक्क मान्य करण्यात आले. पूर्वीच्या तहाप्रमाणे राण्याचे सात हजारांचे सैन्य राण्याच्या खर्चाने बादशाही चाकरी करतील असे ठरले होते. त्या ऐवजी राण्याने तितकी रक्कम बादशहाला दर वर्षी देत जावे असे ठरले. तह झाल्यावर राण्याच्या भावाने बादशहाचा निरोप घेतला.

या घटना घडत असताना, इराण देशातील एक अधिकारी मिर्झाकुचक[1] काही आपत्ति ओढवल्यामुळे औरंगजेबाकडे आश्रयास आला. त्याचा त्या देशातील दर्जा पाहून औरंगजेबाने त्याला निरनिराळ्या जबाबदारीच्या कामावर नेमले. शेवटी त्याची नेमणूक लाहोरच्या सुभेदारीवर करण्यात आली. काही दिवसांनी लाहोरच्या काजीविरुद्ध एक तक्रार त्याच्याकडे आली. काजीने दोन हिंदु स्त्रियांचा खून करून त्यांना आपल्या वाड्याच्या टाकीजवळ पुरून टाकले, असे या तक्रारीचे स्वरूप होते. सुभेदाराने (मिर्झाकुचकने) लाहोरच्या कोतवालाला या संबंधी चौकशी करण्याचा हुकूम दिला. पण अधिकाराच्या गुर्मीत असलेल्या काजीने कोतवालाला आपल्या वाड्यात येण्याची मनाई केली. इतकेच नव्हे, तर तसा प्रयत्न झाल्यास शस्त्राचा वापर केला जाईल अशी धमकीही दिली. हे सुभेदाराला समजताच त्याने कोतवालाला आपले शिपाई घेऊन जबरदस्तीने आत शिरण्यास सांगितले आणि काही गैरप्रकार झाल्यास त्याची जबाबदारी स्वतःवर घेण्याचे ठरविले.

कोतवालाने व त्याच्या शिपायांनी काजीच्या घरात घुसण्याचा प्रयत्न केला. यात जी झटापट झाली, त्यात इतरांबरोबर काजी हा मारला गेला. यामुळे मुल्ला मौलवींनी बादशहाकडे सुभेदाराविरुद्ध तक्रार गुदरली. हिंदुस्तानात आतापावेतो, काजीवर हात टाकल्याचे उदाहरण घडले नव्हते. तेथे तर काजी मारला गेला होता. ते म्हणू लागले "असले कृत्य इराणी मनुष्यच करू जाणे. कारण तो शिया आहे; सुनींच्या धर्माची त्याला काय चाड? सुभेदाराला योग्य शासन झाले पाहिजे." बादशहाने हे गाऱ्हाणे ऐकताच मिर्झाकुचकला सुभेदारीवरून दूर करून त्याला

1. बादशहाच्या अमदानीच्या १७ व्या वर्षी १०८४ हि. (१६७३-७४) च्या सुमारास वजीर कुवाम‑उद्दीनखान इस्पहानी—इराणचा वजीर आणि खलिफा-इ-सुलतानचा भाऊ. हा हिंदुस्थानात आला आणि त्याला ३०००-१५०० मनसब आणि चौकडलाचा एक अधिकारी करण्यात आले. (१०८५ हि. १६७४-७५) या वर्षी त्याला बढती देण्यात आली. १९ व्या वर्षी १०८६ हि. (१६७५-७६) त्याला काश्मीरचा सुभेदार करण्यात आले. दरबारात परत आल्यावर १०८९ हि. (१६७८ चा शेवट) ला त्याला लाहोरचा सुभेदार करण्यात आले. १०९१ हि. (१६७९-८०) साली लाहोरचा काजी अली अकबर याच्या खुनाबद्दल सुभेदार व कोतवाल यांना काढून टाकण्यात आले. कुवामुद्दिनला दरबारात येथे औरंगजेबासमोर आणण्यात आले. त्याचा इतका छळ केला गेला की, सुभेदाराचे (आरोपीचे) वय झाले आहे, या सबबीवर काजीच्या मुलाने सूड उगविण्याचा विचार सोडून दिला. तो झालेल्या जखमांमुळे १०९१ हि. (डि.११, १६८०) ला मरण पावला. (मासीरे आलमगिरी १२९, १६३, १६६, १८८, १९५) तारीख-इ-मुहम्मदी १०९१.

दरबारला येण्याची आज्ञा केली. तो दिल्लीस गेला. काश्मीरच्या प्रकरणात आपणास हे बोलावणे आहे, हे समजताच, आता आपली नाचक्की होणार असे त्यास वाटले म्हणून विष घेऊन त्याने आत्महत्या केली.

या ना त्या कारणाने अकबरचा पाठलाग करण्याचे औरंगजेबाने ठरविलेच होते. आपल्या गैरहजेरीत राज्याच्या वायव्य सीमेवर काय घडण्याची शक्यता आहे याचा त्याने दूरदृष्टीने अंदाज बांधला होता. दक्षिणेतील आपल्या गैरहजेरीचा फायदा घेऊन इराणचा शाहा मोगल साम्राज्यावर हल्ला करील असे औरंगजेबाला वाटले. शहाजहानच्या[1] काळात सैय्यदखान बहादूर जाफरजंग हा प्रसिद्ध सरदार होता. त्याचा नातु मिर्झा वफा याला औरंगजेबाने बल्खच्या बादशहाकडे वकील म्हणून पाठविले. इराणी लोकांनी मोगल राज्याविरुद्ध हालचाल केली तर बल्खच्या बादशहाने त्यांच्यावर चाल करून जावे. मोहिमेचा सगळा खर्च आणि बक्षिस औरंगजेबाने बल्खच्या बादशहाला द्यावे. बल्खच्या बादशहाला औरंगजेबाची मैत्री टिकवायची होती. शिवाय आपल्याला औरंगजेबाकडून मुबलक पैसा मिळेल याची त्याला जाणीव होती. त्याने औरंगजेबाची मागणी मान्य केली.

उदेपूरच्या राण्याबरोबर औरंगजेबाचा तह पक्का झाला. १६८१ च्या सप्टेंबर महिन्यात सुरवातीला औरंगजेबाने अजमीर सोडले.[2] त्याचा हेतू संभाजीविरुद्ध युद्ध पुकारण्याचा होता. भवितव्यात काय वाढून ठेवले आहे, याची त्याला अजिबात कल्पना नव्हती. अजमीर सोडून औरंगजेबाचे दक्षिणेकडे जाणे हे कायमचेच झाले. आग्रा अथवा दिल्ली येथे पुनः परत येणे घडले नाही. हे वर्ष इ. स. १७०० आहे. गेली १९ वर्षे औरंगजेब हा मराठ्यांच्या विरुद्ध लढाई करण्यात गुंतला आहे. पण या युद्धात त्याला काही यश मिळाले नाही. या युद्धाचा शेवट कसा होईल ते एक परमेश्वरच जाणे. माझ्याकडे (मनुची) सतत बातम्या येत आहेत. यावरून असे दिसते की, औरंगजेब अतिशय अडचणीत आहे आणि मराठ्यांनी त्याला कोंडीत पकडले आहे. औरंगजेब म्हणत असे की आपण ही मोहिम दोन वर्षात संपवू पण गेल्या १९ वर्षात त्याला ही मोहिम शेवटास नेता आली नाही.

दक्षिणेकडे कूच करताना औरंगजेबाबरोबर शाहा आलम, आजमतारा आणि कामबक्ष ही त्याची तीन मुले होती. याबरोबर त्याचे नातूही होते. औरंगजेबाबरोबर

१. आमदानीच्या २८ व्या वर्षी, २८ रबी १०९६ हि. (१ एप्रिल १६८५) ला रफाअतखान सैय्यदखान बहादूरचा मुलगा–यास अवरवलखान पदवी दिली आणि त्याला बल्खच्या बादशहीचे रक्षण करण्यास पाठविले. त्याने बल्खचा बादशाह सुभान कुलीखान याच्यासाठी मोठा नजराणा नेला होता. (मासीरे-आलमगिरी) सैय्यद खान बहादूर जाफरजंगच्या माहितीसाठी मासीरे-उल-उमरा ४२०–४३६ पाहा.

२. रमजान २ १०९२ हि. (१३ सप्टेंबर १६८१ ला) ला औरंगजेब अजमीरहून निघाला. (मासीरे-आलमगिरी २१२).

बराच मोठा खजिना होता. या मोहिमेत तो पार रिकामा झाला. शेवटी त्याला अकबर, नूरजहान, जहांगीर, आणि शहाजहान यांनी साठवून ठेवलेले खजिने उघडावे लागले. मोहिमेवर खर्च अफाट होत होता. राज्याचा महसूलही वेळेवर येईना. औरंगजेबापाशी नगद अशी थोडी राहिली. त्यामुळे औरंगजेबाला औरंगाबादेतील आपल्या घरातील चांदीचे सामान वितळवावे लागले. मृत आणि बिनवारशी लोकांची मालमत्ता जप्त करून सरकारात दाखल करण्याचा मोगल साम्राज्यात शिरस्ता आहे. याशिवाय मोगलांचे मनसबदार वारले तर त्यांचा वारसा ठरण्यापूर्वीही त्यांची मालमत्ता सरकारात अनामत ठेवण्याचा शिरस्ता असे. वारसाची चौकशी होऊन सरकारकडे मृत माणसाचे देणे असल्यास ते सगळे वाटून उरलेली मालमत्ता परत देत असत. मोगल साम्राज्यात वरील प्रकारच्या मालमत्तेनी भरलेली कोठारेच्या कोठारे होती तीही उघडून रिकामी करावीत अशी औरंगजेबाची इच्छा होती. पण आपल्या गैरहजेरीत त्यातील निम्याहून अधिक मालमत्तेचे अपहरण अधिकारी करतील, अशी रास्त भीति त्याला वाटल्यामुळे त्याने हा हुकूम काढला नाही.

**बेगम साहेब हिचा मृत्यु :** अजमीरहून बादशहा दक्षिणेकडे निघाला. आम्हीही त्या स्वारीत होतो. बादशहाच्या अंतःपुरातील स्त्रिया या स्वारीत बरोबर होत्या. औरंगजेबाची बहिण बेगम साहेब उर्फ पादशहा बेगम ही फार वृद्ध झाली होती. तिने मात्र आपण आग्र्यालाच राहू अशी इच्छा प्रदर्शित केली. आम्ही दक्षिणेच्या वाटेवर असताना ती मरण पावली (१६ सप्टेंबर १६८१) असे आम्ही ऐकले.[1] उदेपूरच्या राण्याच्या मोहिमेस औरंगजेब निघाला. त्यावेळी तिने त्याला त्या मोहिमेपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. ही मोहिम अतिशय अवघड पडेल आणि कदाचित पुनः आपली गाठ पडणार नाही असे तिने त्याला सांगितले. तसेच घडले. या सुयोग्य राजकन्येच्या मृत्युने आपल्याला वाईट वाटले असे औरंगजेबाने दाखविले. बेगम साहेब हिच्यामध्ये काही दोष नव्हते असे नाही. पण एकंदरीत पाहता एक शाहणी बाई म्हणून ती आपल्या मागे आपली कीर्ती ठेऊन गेली.

औरंगजेब दक्षिणेकडे येण्यास निघाला आहे ही बातमी मिळूनसुद्धा, संभाजीने चारी दिशांना लुटालूट करण्याचे आपले प्रकार सोडले नाहीत. त्या बलाढ्य मोगल सेनेला आपण किती क्षुद्र लेखतो हे दाखविण्याचा त्याचा हेतू होता. आम्ही बऱ्हाणपूरला पोहचण्यापूर्वीच बादशहाच्या तळापासून ५-७ मैलावर असलेले एक संपन्न गाव त्याने (संभाजीने) उध्वस्त केले होते.

---

1. बेगम साहेब, रमजान २. १०९२ हि. (१३ सप्टेंबर १६८१ न. म.) ला मरण पावली. (तारीख-इ-महम्मद).

या घटनेने शाहा आलमला आतून आनंदाच्या गुदगुल्या झाल्या. त्याचे कारण असे शाहा आलम हा औरंगाबादेस सुभेदार असताना औरंगजेब त्याला नेहमी दोष देऊन म्हणे की, "तू औरंगाबादेस असताना शिवाजीला इतक्या जवळ येऊ कसा देतोस?" या कारणाने औरंगजेबाने शाहा आलमला दक्षिणेच्या सुभेदारीवरून बदलले होते. आता संभाजी औरंगजेबाला काही भीक घालिना. उलट औरंगजेबाच्या तळाच्या अगदी जवळ येऊन लुटालूट करू लागला. आपल्याला येता जाता दोष देणाऱ्या बापावर तळापर्यंत संभाजी आलेला पाहण्याची आपत्ती ओढावली हे पाहून शाहा आलमला आतून मोठा आनंद झाला होता.

संभाजीचे हे धाडस पाहून औरंगजेब अतिशय चिडला. तो घाईघाईने औरंगाबादेस येऊन पोहचला. संभाजी म्हणजे त्याला सलणारा काटा होता. त्याला पकडण्याचा प्रयत्न करावा या हेतूने औरंगजेबाने आपल्या सैन्याच्या तुकड्या वेगवेगळ्या ठिकाणी पाठविल्या व त्याने औरंगाबादेस आपला तळ दिला. त्याची मुले आणि नातूही त्याच्या बरोबर होती. मराठ्यांच्या मुलुखावर वेगवेगळ्या दिशेने हल्ला करण्यासाठी त्याने आपले सेनाधिकारी पाठविले. या काळात संभाजी सगळ्या दक्षिण प्रांतात धामधूम उडवीत होता. मोगलांच्या काही तुकड्यांना त्याने आपल्या राज्यात येऊ दिले. पण नंतर त्याचे रस्ते रोखून धरले. आणि पाण्याच्या साठ्यात विष कालवून त्याने मोगलांच्या तुकड्यांचा नाश केला. यामुळे औरंगजेबाच्या सैन्याची फार मोठी हानी झाली, संभाजीचे हल्ले कसे परतवावे आणि त्याचे राज्य कसे जिंकून घ्यावे याचा औरंगजेबाला उपाय सुचेना. विजापूरचे राज्य जिंकून घेणे हीच सर्वांत चांगली योजना होय असे त्याला वाटू लागले. त्याने विजापूर विरुद्ध पुनः युद्ध पुकारले. विजापूरचा बादशहा मूल आहे असे समजून औरंगजेब एकीकडे त्याच्या विरुद्ध युद्ध करी तर दुसरीकडून त्याला स्नेहाची पत्रे लिही.

औरंगजेबाने विजापूरविरुद्ध दिलेरखानाला पाठविले. दिलेरखान हा उत्तम शिपाईगडी होता. त्याने आपले कर्तव्य बजावले. शाहा आलम हा दिलेरखानाच्या विरुद्ध होता. मागे शाहा आलमने औरंगजेबाविरुद्ध बंड केल्याचे सोंग केले होते. त्यावेळी कागदावर सही करण्यास दिलेरखानाने नकार दिला होता. दिलेरखान हा शाहा आलमविषयी योग्य तो आदर दाखवीत नसे. या प्रसिद्ध सेनापतीला मारण्याची सुंदर संधी शाहा आलमकडे आयती चालून आली. दिलेरखान हा विजापूरच्या मोहिमेत गुंतला असताना शाहा आलमने त्याच्यावर विषप्रयोग करविला[1] दिलेरखान हा पठाण होता असे असूनही औरंगजेबाला दिलेरखानाबद्दल बराच जिव्हाळा

१. दिलेरखान ही पदवी असलेला जलाल, हा दर्याखान रोहिल्याचा मुलगा होता. हा १०९४ हि. (डिसेंबर १६८५) ला औरंगाबादेस मरण पावला. (तारीख-इ-महम्मदी) याच्या अधिकाराकरिता पाहा (मासीरे-उल-उमरा ४२, ५६).

होता. आपला मोठा आणि एकनिष्ठ सेनापति मेल्याचे औरंगजेबाला दुःख झाले. मोंगल राज्यात पठाणांच्यावर कधींच विश्वास ठेऊ नये, असे धोरण आहे, हे लक्षांत ठेवले पाहिजे.

विजापूरच्या बादशहाची मोठी शोचनीय स्थिती झाली. त्याच्यावर इकडे औरंगजेबाच्या फौजेने स्वारी केली; तर तिकडे संभाजीने हल्ले करून त्याचे काही किल्ले घेतले. अशा रीतीने तो (संभाजी) मोंगलांच्या विरुद्ध चालू असलेल्या लढ्यात आपले बळ वाढवीत होता.

संभाजी हा इतर माणसांच्या बायकांबरोबर बदकर्म करीत असे. हा त्याचा प्रकार सतत चालू होता. त्यामुळे संभाजीचे अधिकारी त्याच्यावर क्षुब्ध झाले होते. या सुमारास या अधिकाऱ्यांनी संभाजीच्या विरुद्ध राजपुत्र अकबर यांच्याकडे पत्र पाठवून आम्ही तुम्हास येऊन मिळतो, अशी त्याला वचने दिली. अशा सुंदर संधीचा उपयोग करून घेण्यास राजपुत्र अकबर हा उत्सुक होता. पण आपला सल्लागार दुर्गादास राठोड याच्या संमतिशिवाय त्याला काही करायचे नव्हते. अकबराने दुर्गादासाला संभाजीच्या अधिकाऱ्यांकडून आलेले गुप्त पत्र दाखविले. दुर्गादासाने म्हटले "आपण या पत्राचा विश्वास धरू नका. कोणी सांगावे, संभाजीच या पत्राच्या मागे असेल. आपल्या (संभाजीच्या) अधिकाऱ्यांनी बंड केले तर आपण त्याला पाठिंबा देऊ काय? का संभाजीने आपल्यावर केलेल्या उपकाराबद्दल आपण कृतज्ञ राहाल? हे त्याला तपासून पाहायचे असेल. उत्तम मार्ग असा की आपण हे पत्र संभाजीला द्यावे. आणि अशा रीतीने त्याच्या बद्दलचा स्नेह आणि कृतज्ञता ही प्रगट करावी."

संभाजीला ते पत्र मिळाले. हे राजद्रोहाचे पत्र आपल्या अधिकाऱ्यांनीच लिहिले आहे, याची त्याने खात्री करून घेतली. त्याने तावडतोब आपल्या या अधिकाऱ्यांचा शिरच्छेद करण्याचा हुकूम सोडला. अकबराच्या चांगुलपणाबद्दल संभाजीने त्याचे आभार मानले. आणि मी तुमच्याच बाजूला राहीन असे त्याला आश्वासन दिले. आपण ही संधी गमावली याचा राजपुत्र अकबरला आता पश्चात्ताप झाला होता. पण वेळ निघून गेली होती. येथे एक गोष्ट सांगणे मला भाग आहे. संभाजीला जे जय मिळाले ते त्याच्या शौर्यामुळे नव्हते, तर ते त्याच्या सेनाधिकाऱ्यांच्यामुळे मिळत गेले. स्वतः रणांगणात उतरावे आणि आपल्या बापाने (शिवाजीने) घालून दिलेला शौर्य आणि अविश्रांत परिश्रम याचा धडा गिरवावा, या प्रवृत्तिपेक्षा संभाजीचा अधिकतर कल स्त्रिया, मदिरा आणि त्यातील खुशाली यात काळ घालविण्याकडे होता.

संभाजीच्या अधिकाऱ्यांनी कट करण्याचे ठरविले होते ही बातमी औरंगजेबाला लागली. तसेच अकबराने अशी सुवर्ण संधी गमवल्याचेही त्याच्या कानावर गेले.

त्याला अशी शक्यता वाटली की संभाजीच्या बेताल वर्तनामुळे त्याचे अधिकारी पुनः कधीतरी अकबराला आपला नेता म्हणून मान्यता देतील, तो त्याची विनंती मान्य करील, आणि प्रबळ सैन्य घेऊन आपल्यावर (औरंगजेबावर) चाल करून येईल. यासाठी त्याने अकबराला पुढील अर्थाची स्नेहाची पत्रे लिहिली. "तुम्ही परत यावे. राण्याच्या मोहिमेच्या वेळी तुम्ही जे बंड केले, ते तुमच्या इच्छेने नव्हते. हा तुमच्या अधिकाऱ्यांचा प्रताप होय. निःशंक मनाने परत या. मी तुम्हाला क्षमा करतो. कुराणाची शपथ घेऊन मी वचन देतो की, तुम्हाला माझ्याकडून कोणतीही इजा पोहचणार नाही." अशी अनेक पत्रे आली गेली. पण अकबर बापाला ओळखून होता. औरंगजेबाने आपल्या एका मुलाचा मृत्यू घडवून आणलाच होता. अशाच्या ताबडीत स्वतःला देण्यास अकबर काही मूर्ख नव्हता. पण त्याने अशी नम्र भावाने पत्रे लिहिली की औरंगजेबाने अकबरचा शिक्षक त्याच्याकडे पाठविला व बरेच सोने नाणे अकबराकडे रवाना झाले. औरंगजेबाने पत्र लिहून "मी तुमच्या येण्याची आतुरतेने वाट पाहत आहे" असे कळविले. अकबर अद्यापही आपल्याकडे येण्यास मागे पुढे करीत आहे असे पाहून औरंगजेबाने पुनः पुढीलप्रमाणे पत्र लिहिले "तुम्ही माझ्याकडे निघून येण्यास दिरंगाई करीत आहात याचे मला मोठे आश्चर्य वाटते. तुम्ही आता परत या पाहू."

अकबराने आतापर्यंत नम्र पत्रे लिहून आपल्या बापाकडून बराच पैसा ओढला होता. तो त्याला बरेच दिवस पुरणार होता. त्याने बापाला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले "मी निश्चितपणे तुमच्याकडे येईन. पण हातात तलवार घेऊन. तुम्हाला ठार मारून हिंदुस्थानची बादशाही संपादन करण्यासाठी प्राणाची बाजी लावून." मागे शाहा आलम अकबरचा पाठलाग करीत होता, त्यावेळी त्याने अकबराकडे सोन्याच्या मोहरा पाठविल्या होत्या ही चूक झाली, असे त्यावेळी औरंगजेबाला वाटले होते. आता तशीच चूक औरंगजेबाच्या हातून घडली होती त्यामुळे शाहा आलमचे फार चुकले असे औरंगजेबाला म्हणण्याची सोय राहिली नाही.

या सुमारास सुरत बंदराचा कारभारी कार-तलबखान याच्याविरुद्ध तेथील लोकांच्या अनेक तक्रारी आल्या. कार-तलबखान हा श्रीमंत होता. वजीरांना तो लाच देई. त्यामुळे या तक्रारी बादशहापर्यंत पोहचत नसत. आणि पोहचल्याच तर त्या अगदी क्षुद्र आहेत असे भासविण्यात येत होते. पण शेवटी औरंगजेबाला सत्य परिस्थिती कळून आली. त्याने कार-तलबखानाला औरंगाबादेस बोलाविले. तो दरबारात दाखल होण्यापूर्वी औरंगजेबाने आपल्या खोज्याच्या हाती त्याच्याकडे विष पाठविले. आपण विष प्राशन केले नाही तर औरंगजेब आपल्या कुटुंबियांचाही नाश करील अशी कार-तलबखानाला भीती वाटली. त्याने विष प्राशन केले. अशा रीतीने तो मरण पावला[१].

१. आमदानीच्या २८ व्या वर्षी, १०९५ हि. (१५ सप्टेंबर १६८४) ला मलावतखानाची कार-तलबखान (महम्मद बेग) याच्या ऐवजी सुरत बंदराचा मुतासद्दी (कारभारी) म्हणून बदली झाली. (मासीरे-आलमगिरी २४७)

संभाजीविरुद्ध आपले काही चालत नाही असे पाहून औरंगजेबाला विजापूर राज्य जिंकून घेण्याची इच्छा झाली. यासाठी त्याने विजापूरच्या सरदारांच्याबरोबर पत्रव्यवहार सुरू केला. त्यांनी आपल्या बादशहाविरुद्ध बंड करावे आणि मोगल सैन्याला येऊन मिळावे, यासाठी औरंगजेबाने त्यांना पत्रे, भेटी आणि मुबलक रकमा पाठविल्या. औरंगजेबाच्या आमिषाला बळी पडणाऱ्यात अबदुल हकीम (सलाम) हा विजापूरचा सरदार होता. त्याला गोव्याच्या पोर्तुगीजांच्या कर्तृत्वाची माहिती होती. त्याने औरंगजेबाला पुढीलप्रमाणे सल्ला दिला. "आपण पोर्तुगीजांची मैत्री करावी. पोर्तुगीजांनी संभाजीवर युद्ध पुकारले तर त्याला (संभाजीला) आपल्या सैन्याचे दोन भाग करावे लागतील. एक भाग पोर्तुगीजांच्या तोंडावर आणि दुसरा मोगलांशी लढण्यासाठी ठेवावा लागेल. त्यामुळे संभाजी चालवत असलेली धामधूम बंद पाडणे सोपे होईल."

औरंगजेबाने गोव्याचा व्हाइसरॉय फ्रान्सिस्को डालगीद अल्मोर[1] याला पुढील-प्रमाणे पत्र लिहिले. "आपण संभाजीविरुद्ध युद्ध पुकारावे. आपण त्याच्याकडून जो मुलूख घ्याल तो सगळा मी आपल्याला देऊन टाकीन. माझा बंडखोर मुलगा अकबर हा संभाजीच्या बरोबर आहे. त्याला आपण आपल्या राज्यातून वाट देऊ नये. त्याला कोणत्याही प्रकारची मदत देऊ नये. उलट तुम्ही त्याला पकडून टाकाल अगर मारून टाकाल तर माझ्यावर मोठे उपकार होतील. योग्य वेळी मी अशी मागणी आपल्या-कडे करणारच आहे." ही मसलत पार पाडण्यासाठी औरंगजेबाने शेख महम्मद याला आपला वकील म्हणून पोर्तुगीजांच्याकडे पाठविले. या अबचित अब्दुल हकीमच्या सल्ल्याने औरंगजेबाने संभाजीच्या राज्यावर हल्ला करण्यासाठी शाहा आलमला गोव्याच्या दिशेने पाठविण्याची तयारी केली.

**मी (मनुची) गोव्याला परतलो. तेथे घडलेल्या अनेक घटना :** माझ्यापाशी आता पुरेसा पैसा जमला होता. मुसलमानांच्यामध्ये राहण्याचा मला आता कंटाळा आला होता. शाहा आलम बादशहा माझा पगार कधीच वेळेवर देत नसे. मी गोव्याला परत जाण्याचे ठरविले. गोव्याला थोएटीन पाद्रीच्यापाशी माझे काही पैसे ठेवले होते. गोव्याहून पुढे युरोपला जाण्याचा माझा बेत होता. या कारणामुळे मला आपल्या नोकरीतून मुक्त करण्यात यावे अशी शाहा आलमला विनंती केली. परंतु तो माझी विनंती मान्य करीना. शेवटी मी त्याला म्हटले, "माझी काही खाजगी कामे आहेत. मला सुरतेला जाणे भाग आहे. आपण मला दोन महिन्यांची तरी रजा द्यावी. या गोष्टीला तो कबूल झाला. शाहा आलमला सोडून मी सुरतेस गेलो.

1. हा व्हाइसरॉय गोव्यात १६८१ च्या ११ सप्टेंबर रोजी आला. १५ डिसेंबर १६८६ मध्ये तो हिंदुस्तान सोडून परत गेला.

तेथील फ्रेंच वखारीमध्ये फ्रान्सिस मार्टिन[1] हा अधिकारी होता. तो या घटकेला फ्रेंच कंपनीचा प्रमुख आहे. मला पोर्तुगीज हद्दीतील दमण येथे नेण्यासाठी त्याने एक लहानसे गलबत दिले. मी दमणला गेलो आणि तेथून गोव्याला पोहोचलो.

तोपर्यंत औरंगजेबाने लिहिलेले पत्र गोव्याच्या व्हाइसरॉयला मिळाले होते. त्याचे पोर्तुगीजमध्ये भाषांतर करून देण्यासाठी त्याने ते पत्र माझ्याकडे पाठविले. पत्रातील मजकूर पाहून मी त्याला पुढीलप्रमाणे सल्ला दिला, "या युद्धाने पोर्तुगीजांचे काहीही भले होणार नाही. औरंगजेबाने एकदा संभाजीचा नाश केला की तो पोर्तुगीजांना स्वस्थ बसू देणार नाही." मी असा सल्ला दिला असतानाही व्हाइसरॉयने संभाजी-विरुद्ध युद्ध पुकारले. त्यामुळे पोर्तुगीजांना गोवा गमवण्याची जवळजवळ वेळ आली.

**संभाजीला गोवा मिळवून देण्याचा अकबर बेत करतो :** औरंगजेबाच्या हाल-चालींची बातमी संभाजीला कळली. राजपुत्र अकबर संभाजीच्या राज्यात राहत होता. ते स्थळ गोव्यापासून जवळ होते. संभाजीने आपले आदरातिथ्य केले त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी अशी अकबराची इच्छा होती. अकबराच्या मनात इराणला पळून जाण्याचे होते. त्यासाठीही त्याला तयारी करायची होती. व्हाइस-रॉयने आपल्याला एखादे जहाज त्या कामासाठी मिळवून द्यावे अशी त्याची इच्छा होती. अकबराने व्हाइसरॉयकडे एक वकील पाठविला. त्याच्याबरोबर विकण्यासाठी म्हणून त्याने काही माणिक आणि काही हिरे पाठविले. अकबराने व्हॉईसरॉयला पुढीलप्रमाणे विनंती केली, "गोव्याच्या नदीत एक जहाज बांधण्याची मला परवानगी देण्यात यावी. माझा बाप औरंगजेब याने माझा छळ केला आहे आणि म्हणून मी इराणला निघून जाऊ इच्छितो."

अकबराच्या मनात खरोखरी जहाज बांधण्याचे होते. या बरोबरच त्याचा बेत असा होता की, वेळोवेळी थोडी थोडी माणसे घुसवून पुरेशी माणसे जमल्यानंतर गोवे तावडतोब ताब्यात घ्यावे. मला मुसलमानांच्या क्लृप्त्या माहित होत्या. मी व्हाइसरॉयला पुढीलप्रमाणे सल्ला दिला, "अकबराची किती माणसे किनाऱ्यावर उतरतात याची आपण अत्यंत काळजीपूर्वक चौकशी करावी. कारण आपण काही प्रतिकार करण्यापूर्वी या माणसांकडून गोव्याला धोका पोहोचण्याचा संभव आहे."

गोव्याच्या बेटात बरीच माणसे घुसविण्याचा संभाजीचा हेतू होता. बेटात माणसे जमली आणि त्यातील महत्त्वाच्या जागा त्यांनी ताब्यात घेतल्या की हल्ला करण्या-साठी तो (संभाजी) स्वतः येणार होता. अशा रीतीने आपली मसलत तो पूर्ण करू पहात होता. व्हॉईसरॉयने माझे बोलणे ऐकले. दुसऱ्या दिवशी त्याने पाहिले की

1. फरान्सिस मार्टिन—फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनीचा पांडिचेरी येथील डायरेक्टर जनरल. फ्रान्सिस मार्टिन, हा १६८० ते १६८६ पर्यंत सुरतेस होता. प्रथम तो दुय्यम अधिकारी होता आणि १६८१ साली तो तेथील डायरेक्टर झाला. मार्टिन १६८६ साली पांडिचेरीला परत गेला.

जहाज बांधण्याच्या कामासाठी संभाजींच्या राज्यातून बरीच माणसे आली, पण संध्याकाळी त्यापैकी थोडीच माणसे परत गेली. व्हाइसरॉयने हुकूम केला की, सर्वांनी परत गेलेच पाहिजे. दुसऱ्या दिवशी जितके कामगार येतील तितक्यांनी संध्याकाळी परतले पाहिजे.

अकबराला जहाज बांधण्याची परवानगी देऊनच व्हाइसरॉय थांबला नाही. अकबराला पाठविण्यासाठी म्हणून त्याने काही भेटी तयार केल्या. मी (मनुची) व्हाइसरॉयकडे जाऊन त्याला म्हटले, "आपण पुरेशी सावधगिरी बाळगीत नाही. एकीकडे आपण औरंगजेबाच्या सूचनेवरून संभाजीशी आपण लढणार आहोत असे त्याला (औरंगजेबाला) लिहित आहात, आणि दुसरीकडे आपण अकबराला भेटी पाठवित आहात. यावरून आपण औरंगजेबाला काहीच महत्त्व देत नाही असे वाटेल. आपण अकबराला जहाज बांधण्याची परवानगी तर दिलीत. आता आपण त्याला भेटी पण पाठवीत आहात. आपल्या वागणुकीने औरंगजेबाला राग येईल. आपल्या बंडखोर मुलावर आपण आपली मर्जी दाखवित आहात हे पाहून तो (औरंगजेब) गोव्यावर हल्ला करण्याची संधी शोधेल. व्हाइसरॉयने माझे बोलणे ऐकले. त्याने अकबराकडे भेटी पाठविल्या नाहीत. तोपर्यंत जहाज बांधणीचे काम पुरे झाले होते. अकबराने जहाज गोव्याहून हालवून वेंगुर्ल्याला नेले.

**संभाजींचे गोव्याच्या व्हाइसरॉयशी युद्ध. काही पोर्तुगीज मला (मनुचीला) देशद्रोही ठरवितात :** गोव्याच्या नदीत अकबराच्या जहाज बांधणीच्या निमित्ताने आपली माणसे गोव्यात उतरविण्याचा संभाजींचा बेत फसला. संभाजीने आता दुसरी युक्ती केली. त्याने पढवून पाठविलेले हेर गोव्याच्या व्हाइसरॉयकडे आले. मराठी राज्यातील फोंड्याचा किल्ला हा गोव्याहून अगदी जवळ आहे. त्या किल्ल्यात खजिना भक्कम आहे. तो किल्ला तुम्ही घेतला तर मुबलक खजिना तुमच्या हाती पडण्याची शक्यता आहे. अशी बातमी संभाजीने पढवून ठेवलेल्या हेरांकडून व्हाइसरॉयला मिळाली. संभाजींचा हेतू असा होता की, खजिना घेण्याच्या मोहाला बळी पडून व्हाइसरॉयने गोवे सोडून आपल्या सैन्यासहित फोंड्याच्या दिशेने चाल करावी तोपर्यंत मराठ्यांनी पोर्तुगीजांचा फोंड्याच्या परतीचा मार्ग अडवून धरावा आणि त्या अवधीत गोवे घ्यावे. राजापूर[1] येथे एक फ्रेंच व्यापारी होता. त्याने या मसलतीची हकीकत मला (मनुचीला) लिहून कळविली. आणि व्हाइसरॉयला सावधगिरीची सूचना देण्यास सांगितले. संभाजी हा सैन्य घेऊन गोव्याच्या दिशेने येत होता.

मी व्हाइसरॉयच्या कानावर ही गोष्ट घातली. पण त्याने तिकडे लक्ष दिले नाही. तो (व्हाइसरॉय) आठशे गोरे सैनिक व आठ हजार कानडी सैनिक घेऊन गोव्याच्या

१. हे पंजिमाजवळील बंद राजापूर असावे.(पैट हक १२६) संभाजींची फौज त्यावेळी पंजिमाला वेढा देऊन होती.

बाहेर पडला.[1] त्याने नदी ओलांडली आणि आपली मोहिम सुरू केली. त्याच्या बरोबर पाच तोफा होत्या. पोंडा[2] किल्ल्यातील मराठी शिबंदीने संभाजी येऊन पोहोचेपर्यंत किल्ला लढविला. संभाजी पोंड्याला येऊन पोहोचला. त्याने पोर्तुगीज व्हाइसरॉयवर निकराने हल्ला चढविला. व्हाइसरॉयची परिस्थिती आणिबाणीची झाली. व्हाइसरॉयचे अनेक उत्तम सैनिक मारले गेले. व्हाइसरॉयने आपल्या सैन्याच्या आघाडीला लाकडी खाब व फळ्या रचून ठेवल्या होत्या. त्यामुळे चालून येणाऱ्या संभाजीच्या घोडदळाला अडचणी आल्या. नाहीतर व्हाइसरॉय काय गोव्याला परत येऊ शकला नसता आणि स्वतःच्या रक्षणाची तयारी करू शकला नसता. पावसाळा असल्यामुळे पोर्तुगीज सैन्याला आपल्या बंदुकी चालविता येईनात. संभाजीचे सैन्य जवळ येऊन ठेपले. त्याच्या (संभाजीच्या) सैन्यातील एका रजपुताने व्हाइसरॉयच्या बरगड्यावर तलवारीने वार केला. हळूहळू माघार घेत तो अत्यंत कष्टाने नदीच्या काठावर आला आणि तो आणि त्याचे सैन्य गोव्याला परत आले. आपली फसवणुक झाली याची व्हाइसरॉयला जाणीव झाली. पण आता फार उशीर झाला होता. पोर्तुगीज सैन्याची ही जी विनाकारण हानी झाली, तिच्यामुळे गोवे शहरात सर्वत्र शोक पसरला.

या मध्यंतरात गोव्याचा कारभार आर्च बिशप डॉम डिसूझा[3] डी मेनेझेस पाहात होता. याच सुमारास औरंगजेबाचे आरमारी गलबत गोव्याला आले. राजपुत्र अकबर आपल्या स्वतःच्याकरिता बांधलेल्या जहाजातून वेंगुर्ल्याबाहेर पडू नये यासाठी ही काळजी घेण्यात आली होती. गलबतावरील अधिकाऱ्याबरोबर औरंगजेबाने व्हाइसरॉयला एक पत्र पाठविले. त्यात कळविले की "तुम्ही संभाजीशी निर्धाराने लढत राहा. मी लवकरच स्वतः तुमच्या मदतीसाठी येईन." मोगलांचे हे पत्र हंगामी कारभार करीत असलेल्या आर्च बिशपला देण्यात आले. आर्च बिशपने मोगलांच्या दूताला सांगितले की तुम्ही व्हाइसरॉयला जाऊन भेटा आणि त्याच्याशीच रास्त बोलणी करा.

मला (मनुचीला) ही गोष्ट मला माहीत होती. कारण मोगलांच्या पत्राचे मी भाषांतर करून दिले. अशा आणिबाणीच्या प्रसंगी व्हाईसरॉयला सोडून जाणे माझ्या मनात नव्हते. नाहीतर ही गोष्ट त्याच्या मनात डाचत राहिली असती. मी आर्च

१. ऑर्मे ('ऐतिहासिक तुटिते' कर्ता) म्हणतो की गोव्याचा व्हाइसरॉय सप्टेंबर १६८३ मध्ये लढाईस निघाला. संभाजीच्या फौजेने त्याच्या छावणीला वेढल्यामुळे त्याला हळूहळू मागे गोव्यास जावे लागले.

२. पोंडा—गोव्याच्या अग्नेयेस ९ मैलांवर आहे. हे ठिकाण शिवाजीने पोर्तुगीजांपासून १६७५ त घेतले होते. (ग्रँट डफ ११९)

३. डीसूझा मेनेझेस २० सप्टेंबर १६८१ ला आर्चबिशप झाला आणि १० जानेवारी १६८४ ला मरण पावला.

बिशपची मोठ्या कष्टाने परवानगी मिळविली. प्रवासासाठी त्याने नावेची व्यवस्था करून दिली. गोव्यात असलेल्या आम्हा लोकांना त्यावेळी पोर्तुगीज व्हाइसरॉयची संभाजीच्यामुळे काय दुर्दशा झाली होती याची कल्पना नव्हती. मी गोवे सोडले. पण आर्च बिशपच्या मनात काय आले कोण जाणे त्याने नदीवर असलेल्या पहारेकऱ्यांना मला पकडण्याचा हुकूम दिला. एकीकडे औरंगजेबाच्या विरुद्ध मी (मनुची) युरोपियनांना सहाय्य करण्यासाठी मी आपली संपत्ती खर्च करीत होतो. तर दुसरीकडे हे लोक मला देशद्रोही आणि विश्वासघातकी समजत होते. या लोकांनी आर्च बिशपला समजाविले की, मी पाचशे मराठे बरोबर घेऊन जात आहे. पोर्तुगीज व्हाइसरॉयचा परतीचा रस्ता रोखून धरावा आणि त्याला गोव्याला येऊ देऊ नये हा माझा हेतू आहे. त्याची अशी समजूत करून दिल्यामुळे आर्च बिशपने मला पकडावे अशा सूचना दिल्या होत्या. नदीवरील पहारेकऱ्यांच्या अधिकाऱ्यांना मी निर्दोष आहे हे चांगलेच माहीत होते. मी नदीवर पोहोचलो. तेव्हा माझ्याबरोबर फक्त एक नोकर होता. आर्च बिशपचा हुकूमच असल्यामुळे पहारेकऱ्यांच्या अधिकाऱ्यांनी मला अटकाव केला. पण हुकूम कळविला नाही. याचा आपल्याला संशय आला आहे असे मी भासू दिलेही नाही. त्यावेळी नदीत मृत आणि जखमी यांनी भरलेल्या अनेक नावा मी पाहिल्या. संभाजीने व्हाइसरॉयचा पराजय केला होता याचा तो पुरावा होता.

आर्च बिशपने मला जी वागणूक दिली ती मी थट्टेवर नेली पण ती थट्टा नव्हती. मोगलांच्या वकिलाशी पहारेकऱ्याचे अधिकारी ज्या पद्धतीने वागले ती वकिलाला थट्टेवर नेण्यासारखी नव्हती. इतके नव्हे वकिलाला तो होता त्यापेक्षा कोणी आणखी मोठा मनुष्य म्हणजे प्रत्यक्ष संभाजीच असावा अशा संशयाने त्यांनी वकिलाचा शिरच्छेद करण्याची वेळ आणली होती. हा वकील नव्हे हा संभाजीच आहे, अशा अफवा पसरविण्यास सुरवात केली. लोकांचा या अफवांवर विश्वास बसला आणि संभाजीला पकडून मारावे या हेतूने ते शोधाशोध करू लागले. वास्तविक ही माणसे चांगली होती. परंतु भीतीमुळे माणसे कशी विचित्र वागतात याचे हे प्रत्यंतर होते. या लोकांचा हेतू दुताला मारायचा आहे असे मला दिसून आले. मी प्रयत्नांची शिकस्त केली. मी म्हटले, "याला मारू नका. फार तर अटकेत ठेवा. मी तुम्हाला खात्री देतो की हा इसम संभाजी नाही. हा मोगल आहे." लोकांनी त्याला त्यावेळी मारले असते तर माझाही जीव जाण्याची भीती होती आणि हे सर्व कशासाठी म्हणाल तर हा वकील येण्याच्या सुमारास मी व्हाइसरॉयला मदत करण्याची पराकाष्ठा करीत होतो.

परमेश्वरानेच खैर केली. ऐन यावेळी व्हाइसरॉय तेथे येऊन पोहोचला. प्रथम हा वकील म्हणजेच संभाजी अशी त्याचीही समजूत झाली. मी व्हाइसरॉयशी बोललो. शेवटी मी त्याला हेही सांगितले की समजा हा इसम संभाजी आहे. तो तुम्हाला

हजा पोहोचविणे शक्य नाही. तो तुम्हाला पत्रे देईल. त्यावेळी मी अगदी त्याच्याजवळ उभा राहीन. नंतर मी वकीलाला व्हाइसरॉयकडे नेले. त्यावेळी व्हाइसरॉय अतिशय घाबरला होता. मी वकीलांकडून पत्रे घेऊन ती व्हाइसरॉयला दिली, तेव्हा कुठे या वकीलाला संभाजी समजण्यात केवढी घोडचूक झाली होती, आणि सगळ्या गोव्यात केवढा गोंधळ माजला होता याची व्हाइसरॉयला कल्पना आली. मोगल वकिलापाशी अवघे दोन नोकर होते.

**संभाजी दूत पाठविण्याचे निमित्त करून व्हाईसरॉयला मारण्याचा प्रयत्न करतो :** संभाजीने फोंड्यापाशी पोर्तुगीज व्हाइसरॉयशी युद्ध केले. पण ते न करता त्याने नदीचा काठ ताब्यात घेतला असता तर सर्वांची कत्तल करून गोवे ताब्यात घेणे त्याला सहज सोपे झाले असते. असे असूनही गोवे जिंकण्याच्या आपल्या उद्देशाविषयी तो निराश झाला नाही. कारण पोर्तुगीज व्हाइसरॉयचा पराजय केल्यानंतर संभाजीने साष्टी आणि बारदेश हे प्रांत आपल्या ताब्यात घेतले. गोव्याचे बेट या दोन्ही प्रांताच्या मध्ये आहे. निकराची लढाई करून संभाजीने आपली माणसे गोव्याच्या बेटावर उतरविण्याचा प्रयत्न केला. पोर्तुगीजांनी निकराचा प्रयत्न केला. विशेषतः ऑगस्टीनियन पाद्र्यांचा प्रतिकार अधिकच निकराचा होता. ते पाद्री ज्या ठिकाणी तळ देऊन होते तिथेच संभाजीचा मुख्य मारा येऊन पडला.

संभाजीचा गोवे जिंकण्याचा उद्देश सफल झाला नाही. शस्त्रबळाने जिंकून घेणे जमणार नाही, असे त्याला दिसून आले मग त्याने मसलतीने आपला उद्देश पार पाडण्याचे ठरविले. हिंदुस्तानात असे करण्याची परंपराच आहे. त्याने राजपुत्र अकबर याला आपला मध्यस्त केले. अकबराने पोर्तुगीज व्हाइसरॉयला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले. "मी आता इराणकडे निघून जाण्याच्या बेतात आहे. पोर्तुगीज आणि संभाजी हे दोघेही माझे मित्र आहेत. त्यांच्यात शांतता आणि सलोखा स्थापन व्हावा अशी माझी इच्छा आहे. यासाठी आपण वाटाघाटी करण्यासाठी एखादा योग्य आणि विश्वासू मनुष्य पाठवाल काय? उभय पक्षांना समाधानकारक होईल असा तह मी घडवून आणीन."

व्हाइसरॉयने हे काम मजवर सोपविले. परंतु मी तर बोलून चालून परकीयच (इटालियन) होतो. म्हणून वाटाघाटीचे साक्षीदार म्हणून मी एक पोर्तुगीज पाद्री आणि एक पाद्र्यांशी संबंध असलेला (तोही पोर्तुगीजच) असे दोन इसम बरोबर घेतले. गैरसमज आणि संशय यांना जागा राहू नये म्हणून मी ही सावधगिरी घेतली. "मी अकबराकडे जाईन, संभाजीकडे जाणार नाही." असे व्हाइसरॉयला सांगितले. व्हाइसरॉयने ही गोष्ट मान्य केली. यानंतर मी गोवे सोडले.

संभाजीच्या राज्यात मी (मनुची) येऊन पोहचतो न पोहचतो, तोच मराठे मला अकबराकडे न नेता संभाजीकडे घेऊन जाण्याचा बेत करू लागले. मी म्हटले "मी

संभाजीकडे जाणार नाही. मला मिळालेल्या हुकुमाविरुद्ध मी वागणार नाही. मग माझा प्राण गेला तर बेहत्तर." अकबराला ही बातमी समजली. त्याने संभाजीशी वाटाघाटी करण्याच्या प्रसंगी आपला प्रतिनिधी म्हणून दुर्गादास[1] यास रवाना केले. या अटीवर मीही संभाजीकडे गेलो. मी असे केले नसते तर मला जबरदस्तीने नेण्यात आले असते.

आम्ही संभाजीसमोर जाऊन पोहोचलो. त्याने अतिशय सौजन्याने आमचे स्वागत केले. आमचे संभाषण चालू झाले. संभाजीने पोर्तुगीज व्हाइसरॉयच्या विरुद्ध कडक तक्रार केली. त्याने म्हटले, "पोर्तुगीजांच्या बादशहाने शेजाऱ्यांबरोबर शांतता पाळा, असे हुकूम दिले असूनही तुमच्या व्हाईसरॉयने माझ्याविरुद्ध युद्ध पुकारले." भाषण प्रसंगी संभाजीने व्हाइसरॉयविरुद्ध इतर अनेक तक्रारी सांगितल्या. याच भेटीच्या वेळी संभाजीने मला सांगितले की, "माझे प्रमुख सेनाधिकारी यांनी बंड केली. त्यांचा मी माझ्या स्वतःच्या तलवारीने शिरच्छेद केला आहे." संभाजीने मला ती तलवार दाखविली.

शेवटी त्याने मला परत जाण्यास परवानगी दिली. तो मला म्हणाला, "व्हाइसरॉय तर माझ्याकडे वकील पाठवणार नाही, मी त्याच्याकडे पाठवीन. पोर्तुगीजांशी शांतता राखण्याची आमची किती इच्छा आहे हे व्हाइसरॉयला याबरून दिसून येईल." तेथे असलेल्या एका अधिकाऱ्याचा हात धरून तो मला म्हणाला "ज्याला मी वकील म्हणून पाठविण्याचे म्हणालो तोच हा अधिकारी." मग माझा हात धरून संभाजीने त्या माणसाला माझ्याजवळ आणले आणि तो म्हणाला "हा मनुष्य माझ्या विशेष लोभातला आहे. याला पाठविण्यात व्हाइसरॉयचा आम्ही मोठा सन्मान करत आहोत." मग संभाजीने मला निरोप दिला. मी निरोप घेताना त्याने मला जरीचे दोन हातरूमाल दिले.

संभाजीचा तो वकील संध्याकाळी मला भेटण्यास आला. तो मला म्हणाला "आम्हाला एक हजार माणसे किमान पाचशे तरी, माझे रक्षक म्हणून बरोबर घेऊन बेटात उतरण्याची परवानगी पाहिजे. माझा दर्जा दाखविण्यास माझ्याबरोबर सात घोडेही राहतील. या विषयावर आम्ही बराच वेळ बोलत राहिलो. अशा प्रकारे, व्हाइसरॉयने आपला मान राखावा अशी त्याने मला कळकळीची विनंती केली. पण मी त्याच्या म्हणण्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले, आणि सांगितले "ही गोष्ट व्हाइसरॉयच्या मर्जीतील आहे. तुम्हाला जे पाहिजे ते द्यायचे की नाही हे व्हाइसरॉय ठरविणार. तुमची विनंती मी व्हाइसरॉयसमोर मांडीन. मी त्याला असेही सांगितले की, घोड्यांची काही आवश्यकता नाही कारण किल्ला जवळ आहे आणि घोड्यांना तो चढताही येणार नाही.

१. राजा जसवंतसिंगाचा मुलगा अजितसिंग हा बाल्यावस्थेत होता. दुर्गादास राठोड हा त्याचा (अजितसिंगाचा) पालनकर्ता होता.

मराठा वकिलाचा खरा हेतू काय होता ते येथे सांगितले पाहिजे. त्याचा पहिला हेतू हा की इतक्या मोठ्या संख्येने आपल्या लोकांना गोव्यात आणावे. गोव्याचे रक्षण करू शकेल इतकी मोठी शिबंदी तेथे नव्हती. इतकी माणसे बरोबर आणल्यावर मराठा वकिलाला आपला हेतू पार पाडणे सोपे झाले असते. हा हेतू म्हणजे व्हाइसरॉयचा वध करणे हा होय. त्यासाठी ही माणसे आतून चिलखते घालून येणार होती. व्हाइसरॉयचा वध झाला की घोड्यावर स्वार होऊन शहरात गोंधळ उडवून देणे आणि लोकांत दहशत पसरविणे हा त्यांचा हेतू होता आणि या गोंधळाचा फायदा घेऊन संभाजी हा सहजपणे आपले सैन्य उतरवून अरक्षित असलेले गोवे ताब्यात घेणार होता.

मी गोव्याला परतलो. एकंदरीत काय घडले याची माहिती मी व्हाइसरॉयला दिली. संभाजीचे अंतःस्थ हेतू काय असू शकतील याचीही कल्पना त्याला दिली. मी त्याला म्हटले "तूर्त तरी तुम्ही राजवाड्याच्या दरबारात मराठा वकिलाला मुलाखत देऊ नका. समुद्राला लागून असलेला दंजिम[1] किल्ला आहे; तेथे ही मुलाखत होऊ द्या. मराठा वकिलाला आपले बेत पार पाडता येऊ नयेत म्हणून पहारेकऱ्यांचा कडेकोट बंदोबस्त ठेवण्यात यावा. मला हिंदुस्थानच्या लोकांच्या लबाड्यांची माहिती आहे, हे जाणून व्हाइसरॉयने मी म्हटल्याप्रमाणे बंदोबस्त केला. मी परत जाऊन मराठा वकिलाला निरोप कळविला आणि तुम्ही आता व्हाइसरॉयकडे येऊ शकता असे त्याला कळविले. आम्ही आपल्या फक्त तीन नावा घेतल्या. हेतू असा की अधिक माणसे येण्याची आपत्ती टळावी. पण नावांतून इतकी गर्दी झाली की त्या बुडतात की काय असे वाटू लागले. इतकी माणसे का घेतली म्हणून मी मराठा वकिलाला विचारले. यावर तो रागावला इतक्या थोड्या माणसांनिशी आपले बेत पार पाडणे शक्य नाही हे त्याला कळून चुकले. गोव्यात येण्याचा बेत टाकून द्यावा असे त्याला वाटले. पण मी त्याचे मन वळविले आणि त्याला दंजिमच्या किल्ल्यात घेऊन गेलो. वकिलाबरोबर सात माणसांहून अधिक माणसे राहू नयेत, याची मी खबरदारी घेतली. मराठा वकील व त्याच्या बरोबरीची माणसे यांचे व्हाइसरॉयने मोठ्या थाटाने स्वागत केले.

मुलाखतीच्या वेळी वकिलाचा हेतू उघड झाला कारण त्याने शांततेच्या अटीसंबंधी काहीच बोलणे केले नाही. तो म्हणाला "पोर्तुगीजांना खरोखरच शांतता हवी किंवा नाही आणि ते आमच्या महाराजांना खंडणी देतील किंवा नाही हे समजून घेणे एवढाच माझा येथे येण्याचा हेतू आहे, या पलीकडे नाही." व्हाइसरॉयने उत्तर केले की "आम्हाला शांतता हवी आहे, पण आम्ही खंडणी देण्यास तयार नाही." "हे उत्तर मी महाराजांना कळवीन" असे मराठा वकिलाने म्हटले आणि त्याने

१. नकाशात दंजिम हे गोवा हद्दीत दाखविले आहे. गोवा शहरापासून ते एक मैल अंतरावर आहे (हे पणजी असावे).

व्हाइसरॉयचा निरोप घेतला. आपली योजना आपण पार पाडू शकलो नाही, या गोष्टीचें त्याला असमाधान वाटले असावें.

शांततेच्या वाटाघाटी चालू होत्या तरी युद्धाला खंड पडला नव्हता. संभाजी हा गोव्यावर सतत निकराचे हल्ले करीत होता. मराठे व पोर्तुगीज यांच्यात सतत चकमकी चालू होत्या. बेटावर पोर्तुगीजांचे विशेष मनुष्यबळ नसल्यामुळे संभाजी हा आपले सैन्य बेटावर उतरवील की काय अशी साधार भीती निर्माण झाली होती. त्यावेळी मोगलांचे आरमार वेंगुर्ल्याजवळ होते. मोगलांनी आपले आरमार गोव्याच्या टप्प्यात आणावे म्हणजे साष्टी आणि बारदेश या प्रांतात पसरलेल्या संभाजीच्या सैन्याला धाक निर्माण होईल अशी व्हाइसरॉयची इच्छा होती. पण कोणी तरी जाऊन मोगल आरमाराच्या अधिकाऱ्याला हे सांगणे भाग होते. पण जाणार कोण? या धोक्यात आपली मान गुंतविण्यास कोणीही तयार होईना. या सर्व काळात मी किती मनःपूर्वक काम केले होते हे पाहून या कठीण प्रसंगीही त्यांना सहाय्य करावे म्हणून व्हाइसरॉयने मला विनंती केली.

मी होकार दिला. या कामासाठी मी गोवे सोडले. गोव्याच्या आरमाराचा प्रमुख डॉम डी कॉस्टा[1] याने तर मी सर्वनाशाची वाट चालत आहे असे आपले मत व्यक्त केले. परंतु परमेश्वराला माझी काळजी होती. एके सकाळी पाहतो तो काय! माझ्या जहाजाभोवती सदतीस गलबते वावरत असलेली दिसली. आम्हाला प्रथम वाटले की, ही मोगलांची जहाजे आहेत. पण आम्हाला आढळून आले की आम्ही संभाजीच्या आरमारात मिसळलो होतो. ही गोष्ट उघडकीस येताच आम्हाला फार काळजी वाटू लागली. आमच्या जहाजाचा अधिकारी आणि अनेक नावाडी समुद्रात उड्या टाकण्याची तयारी करू लागले. मी माझ्या बंदुकीवर हात ठेवला आणि त्यांना म्हणालो, "तुमच्यापैकी जो मनुष्य प्रथम जागेवरून हालेल तो मेलाच असे समजा. तुम्ही नेटाने जहाज वल्हविलेत तर आपण गोव्याला परतल्यानंतर मी तुम्हाला पाचशे अश्रफ्या (सोन्याच्या मोहरा) देईन." त्याच वेळी मी त्यांच्यामध्ये अनेक सोन्याची नाणी वाटली. आमच्या जहाजाचा कर्णधार फार कुशल होता. आम्ही संभाजीच्या आरमारी दलांपैकीच असे आम्ही भासविले. आणि संधी साधून आम्ही त्याच्या गलबतांच्या पुढे झालो. नंतर वेगाने पुढे जात आम्ही संभाजीच्या दलापासून लांब गेलो आम्हाला पकडण्याच्या आशेने त्यांनी आमचा पाठलाग सुरू केला.

आम्ही आपल्या मार्गाने गेलो व शेवटी मोगल आरमाराला येऊन मिळालो. मला दिलेल्या सूचना मी आरमाराच्या मुख्याधिकाऱ्याला सादर केल्या. मोगलांच्या आरमाराचा अधिकारी म्हणाला, "मी वेंगुर्ले सोडून येऊ शकत नाही. औरंगजेबाचा

---

१. डॉम रॉड्रिग्ज डा कॉस्टा, कॅप्टन-जनरल, गोवे आरमाराचा प्रमुख, ह्याची डिसेंबर १६८६ मध्ये काँडे डा अल्व्होरच्या ऐवजी गव्हर्नर म्हणून नेमणूक झाली. तो जून १६९० त मरण पावला.

मुल्गा राजपुत्र अकबर हा या भागात आहे. माझ्या गैरहजेरीत तो वेंगुर्ल्याहून समुद्रमार्गे निसटून जाण्याचा संभव आहे." सारांश, मी आपला जीव धोक्यात घालूनही काही फळ पदरी पडले नाही. तरीपण मी दुसऱ्या मार्गाने गोव्याला परत गेलो आणि तेथे बातमी दिली की संभाजीच्या विरुद्ध आपल्याला सहाय्य करण्या-साठी मोगलांचे आरमार वाट चालू लागले आहे. अशी खोटी बातमी देण्यात माझा हेतू हा की सर्वांची हिंमत वाढावी आणि संभाजीशी लढा चालू ठेवण्यात अधिक चेव यावा.

**संभाजी पोर्तुगीजांकडून सँटो एस्टेव्हो बेट काबीज करून घेतो :** मी गोव्याला परत आलो. काही दिवसांनी एक घटना घडली. त्यामुळे पोर्तुगीजांना अतिशय धोका निर्माण झाला. सँटो एस्टेव्हो नावाचे (गोव्याच्या ईशान्येस दोन मैलावर) एक लहान बेट आहे. बेटावर एक किल्ला आहे. किल्ल्यामध्ये हातगोळे वगैरे युद्धसामग्री होती. पोर्तुगीज व्हाइसरॉयपाशी मनुष्यबळ फार कमी होते. यामुळे व इतर कारणा-मुळेही व्हाइसरॉयने त्या बेटावर सैनिकांची पथके ठेवण्याकडे दुर्लक्ष केले. संभाजीचे हेर सर्वत्र पसरले होते.

ती तारीख २५ नोव्हेंबरची होती. अनेक वर्षांपूर्वी गोवे पोर्तुगीजांच्या ताब्यात आले होते ते याच तारखेस होय. या विजयाच्या स्मरणार्थ त्यांनी तेथे सेंट कॅथेरिन नावाचे एक लहानसे चर्च बांधले होते. हे चर्च (गोव्याच्या वायव्य कोपऱ्यावर) उभे असून ते हॉस्पिटलला लागून आहे. १६८३ च्या पंचवीस नोव्हेंबरच्या रात्री दहा वाजता संभाजीने ओहोटीच्या वेळी आपले चार हजार सैन्य पाठवून सँटो एस्टोव्होचा किल्ला ताब्यात घेतला. संभाजीचे सैन्य किल्ल्यात घुसले आणि त्यांनी किल्ल्यातील सर्व शिबंदीची कत्तल केली. संभाजीच्या सैन्याची मुळीच हानी झाली नाही. किल्ला ताब्यात आला याचा इशारा म्हणून संभाजीच्या सैनिकांनी अनेक गोळे सोडले. त्यावेळी गोव्यात विलक्षण गोंधळ उडाला.

दुसऱ्या दिवशी व्हाइसरॉयने किल्ला परत घेण्याचा प्रयत्न केला. पण डॉम रॉड्रिग्ज डिकोस्टा याच्या मर्जीत ही गोष्ट आली नाही त्याचा सल्ला असा की, पुलाच्या टोका-पाशी दोन तोफा उभ्या कराव्या आणि सँटो एस्टेव्होच्या किल्ल्यातून मराठे बाहेर येऊ पाहत असतील त्यांना रोखून धरावे, याशिवाय गोव्याच्या भोवती लहान लहान नावांची सारखी गस्त चालू ठेवावी आणि मराठ्यांनी गोवे घेण्याचा प्रयत्न केल्यास तो हाणून पाडावा. डॉम रॉड्रिग्जचा सल्ला अमलात आणणे सहज शक्य होते. अशा नाकेबंदीने एस्टेव्होच्या किल्ल्यात असलेल्या मराठा सैनिकांना शरण येणे भाग पडले असते. पण व्हाइसरॉयचा स्वतःच्या निर्णयावर विश्वास होता. त्याने किल्ल्याकडे सैनिक पाठविण्याचे ठरविले. त्याने १५० सैनिकांची निवड केली. ज्याला यायचे असेल त्याने माझ्या मागे यावे असे तो मोठमोठ्याने ओरडू लागला. तो किल्ल्याच्या

भिंतीपर्यंत गेला आणि तटाला चढण्याचा त्याने प्रयत्न केला. या प्रयत्नात संभाजीच्या सैन्याने व्हाइसरॉयची अनेक माणसे मारली. इतक्यात व्हाइसरॉयला आपलेच काही सैनिक येऊन मिळाले. केवळ नशिब थोर म्हणून व्हाइसरॉय आणि डॉम रॉड्रिग्ज हे आपल्या नावांपर्यंत पोहचले आणि पळून आले. नाहीतर इतराप्रमाणे त्यांचीही कत्तल झाली असती त्यांना परतण्यास हा वेळ मिळाला तरी कसा ? तर त्याचे उत्तर असे की, माझा एक मित्र ऑगस्टियन पाद्री पेड्रोडी सिएरा याने व्हाइसरॉयवरील गंभीर संकट ओळखून पुलाला लागूनच काही माणसे गोळा केली होती. त्यांनी जवळच असलेला उसाला मळा लुटला. प्रत्येकाने एक एक ऊस हातात धरला. त्यांच्यापैकी अगदी थोड्यांच्या जवळ बंदुकी होत्या. त्याचे त्यांनी बारबार काढले. या लोकांना पाहून मराठ्यांना वाटले की व्हाइसरॉयला मदत करण्यास आलेले पथक ते हेच. त्यांनी पाठलाग थांबविला त्यामुळे व्हाइसरॉयला नावेत चढण्यास वेळ मिळाला. पण त्याची अनेक माणसे चिखलात फसून राहिली; आणि मराठ्यांच्या बाणास व बंदुकीस बळी पडली. इतर माणसे पाण्यात बुडून मेली. नावेत चढण्यापूर्वी व्हाइसरॉय आणि डॉम रॉड्रिग्ज यांनी बंदुकीनी आपले घोडे ठार मारले. ते मराठ्यांच्या हाती पडू नयेत हा त्यांचा उद्देश होता.

सँटो एस्टेव्होचे बेट संभाजीच्या ताब्यात राहिले. मराठे आता गोव्याला भिडल्या-सारखे झाले. गोवे शहराला मराठ्यांच्यामुळे अतिशय उपसर्ग होऊ लागला. शेवटी संभाजीकडे वकील पाठवून तह होऊ शकतो का हे पाहण्याचा प्रयत्न केला. मला दुसऱ्यांदा संभाजीकडे जावे लागले. मी संभाजीच्या छावणीजवळ पोहोचलो. तेथे मला एक हेर भेटला. तो त्यावेळी संभाजीच्या नोकरीत होता. त्याने मला ताजी आणि खरीखुरी बातमी दिली. तो म्हणाला की औरंगजेबाचा मोठा मुलगा शाहा आलम याचे सैन्य अगदी जवळ येऊन ठेपले आहे. ही बातमी ऐकून तहाच्या वाटाघाटी करण्याचा बेत मी टाकून दिला.

मी परत आलो आणि व्हाइसरॉयला सांगितले की शाहा आलमच्या सहाय्यामुळे गोव्याच्या मुक्ततेचा क्षण जवळ आला आहे. मी गोव्यातच राहिलो. शाहा आलम जवळ आला की त्याला भेटावे आणि त्याच्याशी वाटाघाटी कराव्या हा माझा हेतु होता. व्हाइसरॉयने माझ्याऐवजी संभाजीकडे मॅन्युअल सरेव्हा आणि एक ऑगस्टियन पाद्री यांना पाठविले. तरीही मराठे आणि पोर्तुगीज यांचा लढा निकराने चालून राहिला. गोव्याच्या बेटावर किती थोडी माणसे आहेत, हे संभाजीला शेवटपर्यंत कळले नाही. हे पोर्तुगीजांच्या दृष्टीने चांगले झाले. संभाजीला खरी परिस्थिती कळली असती तर तो आपला उद्देश (गोवे जिंकण्याचा) पूर्णपणे अंमलात आणू शकला असता.

आमच्याकडून गोव्याभोवती गस्त घालणाऱ्या प्रत्येक जहाजावर सात किंवा आठहून अधिक माणसे नव्हती. याला कारण हलगर्जीपणा की मनुष्यबळच कमी होते हे

नकळे. हे मला माहीत असण्याचे कारण पुढीलप्रमाणे आहे. एके रात्री व्हाइसरॉयने तपासणीसाठी म्हणून आपल्या नावेत मला घेतले. अधिकारी आपली कर्तव्ये बजावीत आहेत की नाही हे पाहण्याचा त्यांचा हेतु होता. आम्हाला आढळून आले की, गस्ती जहाजावर असलेले अधिकारी जवळ जवळ सगळेच झोपलेले होते. त्यांनी आम्हाला हटकले तर नाहीच, उलट गस्ती जहाजात कोणी आहे की नाही हे पाहण्यासाठी आम्हालाच त्यांना ओरडून विचारावे लागले. ही व्हाईसरॉयची नाव आहे हे त्यांना माहीत नव्हते. गस्ती जहाजातील माणसांनी आम्हाला उर्मट उत्तरे दिली. आम्हाला दिसून आले की, त्या जहाजात एकही अधिकारी नव्हता. याहून आश्चर्याची गोष्ट पुढेच आहे. नदीच्या प्रवेशापाशी असलेल्या अडगळीच्या (दांडाच्या) समोरच्या किल्ल्यापाशी आम्ही पोहचलो. आम्ही किल्ल्याचे दार बराच वेळ ठोठावीत होतो. आणि मोठमोठ्याने ओरडत होतो. पण आतून काही उत्तर आले नाही. शेवटी एक शिपाई आला. त्याने आम्हाला सांगितले की, किल्ल्यात फक्त अकरा माणसे आहेत. लक्षात ठेवण्याजोगी गोष्ट अशी की, हा किल्ला अतिशय महत्त्वाचा होता. संभाजीने तो ताब्यात घेतला असता तर गोवा जिंकून घेण्यात त्याला मुळीच अडचण पडली नसती.

या उत्तराने व्हाइसरॉय चिडला. त्याने विचारले "शिबंदीच्या लोकांनी का उत्तर दिले नाही ?" शिपाई म्हणाला "उत्तर देण्यास कोणीच नाही. किल्ल्यात फक्त एक मुलगा असून तो मेंढरे राखतो." गस्ती जहाजातील आणि त्या किल्ल्यातील बंदोबस्ताची ही तऱ्हा. आणि हे कशा प्रसंगी म्हणाल तर पोर्तुगीजांचे वैभवाचे स्थान असलेले गोवे शहर काबीज करण्यासाठी संभाजी आकाशपाताळ एक करीत होता त्यावेळी. माझ्या वरील वर्णनावरून पोर्तुगीजांची मनःस्थिती काय असावी याचा वाचकानीच निर्णय करावा. एकतर या पोर्तुगीजांना संभाजीच्या कसलेल्या सैनिकांच्या शौर्याबद्दल काहीच कल्पना नसावी, किंवा फाजील आत्मविश्वासाने त्यांना वाटत असावे की, आपल्या नावांच्या दबाव्याने शत्रू घाबरून जाईल किंवा खरोखरीच पोर्तुगीजांच्या पाशी मनुष्यबळच नसावे. ते काही असले तरी पोर्तुगीजांच्या पदरी असलेल्या लोकांना आपण पोर्तुगालच्या राजाच्या सत्तेखाली राहिलो किंवा संभाजीच्या सत्तेखाली राहिलो काय याची विशेष पर्वा नसावी.

**शाहा आलम गोव्यानजिक येतो आणि व्हाइसरॉयकडे वकील पाठवितो :** औरंगजेबाला गोव्याच्या व्हाइसरॉयचे पत्र मिळाले. राजपुत्र शाहा आलमकरिता सुरतहून सामुग्री घेऊन येणाऱ्या नौकांच्या ताफ्याला नदीतून पुढे जाण्यास वाट करून देण्याचे त्याला व्हाइसरॉयने वचन दिले होते. औरंगजेबाने शाहा आलमला पंचेचाळीस हजार स्वार बरोबर घेऊन विजापूरच्या राज्यातून वाट काढीत

गोव्याच्या दिशेने चाल करून जाण्याचा हुकूम केला होता. शाहा आलमने विश्वासघाताने गोव्याचा ताबा घ्यावा अशा सूचना त्याला देण्यात आल्या होत्या. यामुळे संभाजींच्या राज्यावर आक्रमण करणे शाहा आलमला सुलभ होणार होते.

या स्वारीत शाहा आलमने संभाजीचे बरेच किल्ले काबीज केले, आणि तो गोव्याजवळ अगदी वेळेवर येऊन पोहचला. त्यामुळे गोवे संभाजीच्या मगरमिठीतून सुटले. गोव्याला संभाजीकडून खरोखरच मोठा धोका निर्माण झाला होता. शाहा आलम येऊन पोहचण्यापूर्वी गोवे घेण्याचा संभाजीने आटोकाट प्रयत्न केला पण तो साध्य झाला नाही. मोगलांचे आरमार जवळ येताच संभाजीला माघार घ्यावी लागली. गोवे सोडण्यापूर्वी सँटो एस्टेव्हांमध्ये असलेल्या लहान तोफा (मॉर्टर्स) मध्ये दारू ठासून भरून तोफा नष्ट कराव्या असा हुकूम त्याने केला. पण त्याला यश आले नाही. स्फोटामुळे एकच तोफ फुटली. उरलेल्या तोफात खिळे ठोकण्यात आले. यानंतर संभाजी त्या भागातून निघून गेला.

शाहा आलम गोव्याजवळ येऊन पोहचला. व्हाइसरॉयकडे त्याने आपला वकील पाठविला. वकील नदीच्या पलीकडच्या काठावर येऊन थांबला. व्हाइसरॉयला हे समजताच त्याने मला (मनुचीला) वकिलाला जाऊन भेटण्यासाठी पाठविले. हा वकील म्हणजे शेख महम्मदाचा (माझ्या परिचिताचा) भाऊ होता. मी त्या बाजी गेलो. अजून काही अंतर असताना मी त्याला युरोपियन पद्धतीने अभिवादन केले. पण वकील पालखीतच बसून राहिला. त्याने माझ्याकडे दुर्लक्ष केले. हिंदुस्थानात आदब आणि शिष्टाचार ही लोकांच्या सरावातील आहे कोणी अभिवादन केल्यास त्याचे उत्तर मस्तकापर्यंत हात नेऊन देण्याची पद्धत आहे. पण तसे न करता इराणी लोकांच्या पद्धतीप्रमाणे वकिलाने फक्त आपल्या छातीवर हात ठेवला. याबद्दल मला अतिशय संताप आला. मी पुढे झालो नाही. ही ह्या वकिलाची वागणूक! शाहा आलमचे लोक असे वागले नाहीत. मला आपल्या नोकरीत परत घेण्यास शाहा आलम किती उत्सुक आहे याची त्यांना माहिती होती. त्यांनी मोठ्या आदराने मान वाकवून मला अभिवादन केले.

अशा वकिलाचा निषेध करण्यासाठी मला जे बोलणे आवश्यक होते ते मोठ्याने बोलण्यात मी कसूर केली नाही. मी वकिलाकडे पाठ फिरवून माझ्या मित्रांशी खेळीमेळीने बोलू लागलो. तरी पण वकिलाचा एक एक शब्द मी मनात साठवून ठेवला. त्याच्या म्हणण्याचा इत्यर्थ असा :— "शाहा आलमने पोर्तुगीजांवर मोठे उपकार केले आहेत. संभाजीपासून त्यांची सोडवणूक झालेली आहे. यासाठी मोगलांना भक्कम रक्कम देण्यास त्यांनी सुरुवात करावी." मोगलांचे हेर शाहा आलमकडे गेले आणि त्याला म्हणाले "पोर्तुगीज व्हाईसरॉयने मनुचीला वकील म्हणून पाठविले होते, पण मोगल वकिलाने त्याचा योग्य तो मान राखला नाही."

राजपुत्र शाहा आलम यामुळे फार चिडला. त्याने सदर वकिलाच्या जागी माझा मित्र मीर आझम ( मीरहाशी? ) याला पाठविले. माझे सर्व प्रकारे समाधान करावे अशी त्याला सूचना देण्यात आली. नदीच्या काठावर तो आला तसे मी त्याला भेटण्यास पुढे झालो. मला पाहून तो माझ्याकडे आला आणि त्याने मला आलिंगन दिले. मीरआझमने मला म्हटले "मला व्हाइसरॉयची माहिती नाही. म्हणून तुम्ही सुचवाल तसे मी करावे असे राजपुत्राने मला सांगितले आहे." शाहा आलमने माझ्या (मनुचीच्या) नावे एक पत्र दिले होते. ते वकिलाने मला दिले. पत्रात शाहा आलमने पुढीलप्रमाणे लिहिले होते. "तुम्ही माझ्याकडे यावे. मला तुमच्याशी बोलण्याची फार इच्छा आहे. तुम्ही आमच्या घराण्याचे अन्न खाल्लेले आहे, माझी सूचना तुम्ही अमान्य करणार नाही. याचा मला विश्वास आहे."

नव्या वकिलाला–मीर आझमला–गोव्याला नेण्याचा माझा विचार नव्हता. त्याला मी मॅनोल द मॉट या लहानशा बेटावर घेऊन गेलो. तेथे मी त्याला रात्री मेजवानी दिली आणि त्याची करमणूक केली. दुसऱ्या दिवशी मी त्याला व्हाइस-रॉयकडे सँटि ॲगो किल्ल्यावर घेऊन गेलो, तेथे वकिलाने व्हाइसरॉयला शाहा आलमचे पत्र दिले. त्याचा आशय असा "आमचा जुना सेवक हकीम निकोलाय (मनुची) यास आमच्याकडे पाठवून देण्यात यावे. तो आल्यावर उभय पक्षांना समाधान होईल, अशी व्यवस्था करण्यात येईल. तुम्ही (व्हाइसरॉय) औरंगजेब बादशहाला पत्र पाठविले होते, त्यात संभाजीविरुद्ध चालून येणाऱ्या सैन्याला रस-देचा पुरवठा करणाऱ्या जहाजांना नदीमधून येण्याची परवानगी तुम्ही दिली होती. रसद घेऊन येणारी आमची जहाजे अद्याप आली नाहीत. ती आली म्हणजे तुम्ही वचन दिल्याप्रमाणे त्यांना नदीतून पुढे येण्यास परवानगी द्यावी आणि आपली वचनपूर्ती करावी".

व्हाइसरॉयने वरील पत्राला पुढीलप्रमाणे उत्तर दिले "मी वचन दिल्याप्रमाणे वागेन पण ही जहाजे गोव्याच्या नदीतून येता कामा नये. ती बारदेशच्या नदीतून गेली पाहिजेत." पण वकील म्हणाला "बादशहाला वचन दिल्याप्रमाणे ती जहाजे गोव्याच्या नदीतूनच आली पाहिजेत." शेवटी व्हाइसरॉयने उत्तर दिले "मनुची हा राजपुत्र शाहा आलमकडे जाईल आणि तेथेच या प्रश्नाचा निकाल लावण्यात येईल."

मोगल वकिलाशी वाटाघाटी चालू असतानाच मोगलांची जहाजे बंदराच्या तोंडाशी होती ती पुढे येऊ लागली. ही बातमी व्हाइसरॉयला लागली. मी डॉम रॉड्रिग्ज यास म्हणालो "आता यावेळी धैर्याने आणि धिटाईने वागले पाहिजे. उशीर न करता मोगली जहाजांवर तोफा चालविल्या पाहिजेत. डा कॉस्टा घाईघाईने

त्या स्थळी पोहोचला. तेथे त्याला असे आढळून आले की, अंग्वाडा[1] किल्ल्याच्या सेनापतीच्या निष्काळजीपणामुळे सुमारे पंचवीस गलबते बंदरातून आत नदीत घुसली होती. आणि ती फोर्ट ऑफ द किंग्ज (सेंट मॅगोस) किल्ल्याच्या जवळ आली होती. डा कॉस्टा येऊन पोहोचल्यावर त्याने तीन तोफांमधून मारा करण्याचा हुकूम दिला. मागील जहाजांना दहशत बसावी व त्यांनी माघार घ्यावी म्हणून ही आज्ञा देण्यात आली होती. मोगल आरमारांच्या अधिकाऱ्याने कळविले "आम्ही मित्र आहोत. व्हाइसरॉयच्या परवानगीनेच आम्ही आलो आहोत. तुम्ही तोफांना मारा थांबवा. मित्रांचे स्वागत करण्याची ही पद्धत नव्हे."

अंग्वाडाच्या किल्लेदाराला जेव्हा दिसले की फोर्ट ऑफ द किंग्ज या किल्ल्यावरचे लोक मोगल आरमाराला वाट देत नाहीत, तेव्हा त्यानेही राहिलेल्या मोगल जहाजांवर तोफांचा मारा सुरू केला. हेतू असा की, अशा रितीने गोव्याचा बचाव व्हावा. जर का मोगलांची सगळी जहाजे आत आली असती, तर गोवे हातचे गेले असते यात काहीही संशय नाही. जी पंचवीसएक जहाजे पुढे गेली होती, त्यांनी फोर्ट ऑफ द किंग्जच्या मागे नेरूर[2] या लहान नदीवर आश्रय घेतला. तेथे ती शाहा आलमकडून पुनः हुकूम मिळेपर्यंत राहिली. त्यांनी किनाऱ्यावर लुटालूट केली. तेथे सापडलेली मालमत्ता आणि स्त्रिया आणि मुली यांना पळविले.

**शाहा आलमची व माझी (मनूचीची) भेट :** रात्र झाल्यावर मी गोव्यातून निघालो आणि शाहा आलमच्या छावणीकडे जाऊ लागलो. मी मोगल वकिलाला आपल्याबरोबर घेतले होते. नदीच्या पलीकडे आम्ही उतरलो. हेरांनी आम्हाला कळविले की, शत्रू (मराठे) जवळपास आहे. ते मला (मनुचीला) धोक्यात पाडतील असे मीर आझमला भय वाटले. म्हणून त्याने वीस स्वारांना माझ्याबरोबर छावणीपर्यंत पाठविले. तो स्वतः तीस स्वारांनिशी मागे थांबला. तेथे पोहोचताच मी परिचित असल्यामुळे पुष्कळांनी माझे मोठ्याने स्वागत केले. माझी त्या सर्वांशी वागणूक प्रेमाची होती. ज्या प्रेमाने त्यांनी मला आलिंगने दिली ते मी वर्णन करू शकत नाही. मोगल अधिकारी आणि कारभारी यांच्याशी माझी वागणूक ज्यांना माहीत आहे, त्यांना त्या लोकांनी मी जणू काही त्यांचा आप्तच अशा भावनेने माझे प्रेमाने स्वागत केले त्याचे आश्चर्य वाटणार नाही.

मी राजपुत्राच्या तंबूकडे गेलो. शाहा आलम आणि त्याची पत्नी, माझी किती आतुरतेने वाट पहात होते, हे माहीत असल्यामुळे खोजा माझ्या स्वागताकरिता

१. अंग्वाडा—गोवा नदीच्या मुखाजवळ किनाऱ्यावरील किल्ल्याचे ठिकाण. मनूचीने उल्लेख केलेला फोर्ट ऑफ द किंग्ज हा राइस मॅगास या ठिकाणचा असावा. (फरान्सोका पा. ४४) हा अंग्वाडाच्या ईशान्येस २ मैलांवर आहे.

२. नेरूर—अंग्वाडाच्या ईशान्येस अर्ध्या मैलावर एका लहान नदीवरील गाव.

चटकन पुढे आला. तो मला म्हणाला "कोणत्याही वेळी मी आलो तरी त्याला वर्दी द्यावी अशी राजपुत्राने आम्हाला ताकीद दिली आहे. मी जर आलो नाही, तर नदी पार करून सैनिक पाठवावे असा त्याने बेत केला होता." यासाठी त्याने आपल्या सैन्याला तयार राहण्याची सूचना केली होती. मी पोहोचलो तेव्हा मध्यरात्र झाली होती. मी खोजांना म्हटले "राजपुत्राला उठवू नका. थकल्या भागलेल्या राजपुत्राला माझ्यासाठी जागे करणे योग्य होणार नाही. मी वाट पाहीन."

राजपुत्र सकाळी उठल्यावर त्याला मी आल्याची वर्दी देण्यात आली. गोवा जिंकण्यापेक्षाही अधिक मला भेटण्याची त्याला तळमळ लागली होती. माझी भेट झाल्यामुळे त्याचे समाधान झाले. गोवा ताब्यात घेण्याचा बेत त्याने मनातून काढून टाकला आणि म्हणून त्याने आपल्या सैन्याला छावणीत माघारी पाठविले. मनुची आपल्याकडे आला आहे, असे त्याने आपल्याबरोबर असलेल्या राजपुत्र व राजकन्या यांना कळविले आणि त्यांना आपल्याजवळ बोलावून घेतले. यानंतर त्याने आपली आई नवाबबाई[1] हिला, आपण मनुचीला पुनः कसे गाठले याची हकिकत सांगणारे पत्र लिहिण्यात यावे अशी आपल्या कारभाऱ्यांना सूचना केली. शाहा आलमने मला मागे रजा दिली होती, याबद्दल नवाबबाईने आपली नाराजी व्यक्त केली होती. तिने मला भेटीस बोलाविले. मी तिला प्रथम युरोपियन पद्धतीने आणि नंतर दरबारी पद्धतीने मुजरे केले.

मी दाढी काढली होती. माझ्या डोक्यावर टोप (Wig) होता. माझा पोषाख युरोपीयन पद्धतीचा होता. मला अशा पोषाखात पाहून नवाबबाईची करमणूक झाली. तारुण्य परत मिळविण्याची मी कोणती औषधे घेतली असे तिने मला विचारले. मी हसत हसत माझी कारणे सांगितली. "राजपुत्र शाहा आलम वचने देतात ती त्यांचे अधिकारी अंमलात आणीत नाहीत. यामुळे त्यांची नोकरी करण्याची माझी इच्छा नाही" असे मी तिला कळविले. यावर शाहा आलमने म्हटले "तुम्ही त्याची काळजी करू नका. तुम्हाला काही अडचण आली तर आम्हाला कळवा. तिचा मी तुमच्या मनाप्रमाणे निकाल लावीन." मी काहीसे धाडस करून हसत हसत म्हटले "आपण ही आपली वचने कितीतरी वेळा पाळली नाहीत." शाहा आलमने आपला मुलगा सुलतान मोईजुद्दीन[2] यास पुढे आणले आणि म्हटले "हा पाहा माझा जामीन." त्याने माझे वेतन शंभर रुपयांनी वाढविले आणि

---

१. नवाबबाई—(रहमत-उन-निसा) ही काश्मीरच्या राजुरीच्या राजा राजूची मुलगी होती. ती ११०१ हि. (१६९०–९१) मध्ये दिल्लीत निधन पावली. तिच्यामुळेच शाहा आलम पैगंबराशी नाते जोडत होता. (मा. इ. आ. डानिशमंदचा बहादुरशाहानामा पाहा)

२. मुइजोद्दिन—हा पुढे जहांदारशाहा या नावाने बादशहा झाला. याचा मे १०, १६६१ ला जन्म झाला. १७१३ मध्ये याचा शिरच्छेद करण्यात आला. मनुचीचा हा विरोध अगदी योग्य होता. कारण शाहा आलम वचने देण्यात फार सढळ होता. पण ती कधीही तो पाळत नसे. (पैसे देत नसे)

गैरहजेरीतला माझा सर्व पगार मला देण्याचा हुकूम केला. त्याशिवाय त्याने माझे सामानसुमानासाठी चार घोडे, पालखी वाहणारी आठ माणसे, आणि आपल्या मुदपाकखान्यातून मला रोजचे भोजन, अशी सर्व व्यवस्था केली.

यानंतर व्हाइसरॉयशी झालेल्या मतभेदासंबंधी आमची बोलणी झाली. व्हाइस-रॉयचा वकील म्हणून पोर्तुगीजांचाच दृष्टिकोन काय होता तो मांडणे मला भाग होते. मी शाहा आलमला म्हटले "मोगलांच्या जहाजांना गोव्याच्या नदीतून येऊ देणे हे व्हाइसरॉयच्या हातून कधीच होणार नाही. कारण पोर्तुगालच्या बादशहांनीच तशी आज्ञा आहे. व्हाइसरॉयने आपल्या बादशहाच्या आज्ञेचा भंग केला तर त्याच्या जीवितालाच मोठा धोका आहे. यावर शाहा आलमने ठासून ठासून म्हटले "फोर्ट ऑफ द किंग किल्ल्यामागे, जी आमची गलबते आली आहेत, त्यांना तरी पुढे येऊ द्या. नाही तरी सगळ्या मोगल जहाजांना तुम्ही परवानगी दिलीच होती. त्यापैकी काही गलबते आत आली आहेत त्यांनी तसेच पुढे जाण्यास काय हरकत आहे." मी म्हटले "ज्या जहाजांना परवानगी देण्यात आली होती ती जहाजे तीन लढाऊ होती. पण आपले आरमार आहे. या जहाजांना पुढे जाऊ न देण्याचे कडक हुकूम आहेत. व्हाइसरॉयने औरंगजेबाला पत्र लिहून वाट करून देण्याचे जे वचन दिले, ती वाट म्हणजे गोव्याची नदी होय, असे नव्हे तर तीत पोर्तुगीज इलाख्याचा कोणताही भाग येतो. व्हाइसरॉय वचन मोडीत नाही. पण दुसऱ्या नदीतून जहाजे जावीत असे त्यांचे म्हणणे आहे. व्हाइसरॉय हा तुमचा आणि बादशहाचा मित्र आहे. तुमची जहाजे कोणत्याही बंदराला जावोत, त्यांचे मार्गदर्शन करण्यास तो माणसे पुरविण्यास तयार आहे."

माझी सूचना शाहा आलमला अतिशय आवडली. त्याची जी गलबते आत आली होती त्यांनाही बाहेर पाठविण्याची त्याने तयारी दाखविली. प्रमुख कमानाला आपली वरील आज्ञा कळविण्यासाठी त्याने माझ्याबरोबर माणसे पाठविली. बारदेशच्या नदीच्या मुखाकडे सुरक्षितच्या मार्गे नेण्यासाठी मी काही माणसे त्याच्याजवळ ठेवली.

मी गोव्यात जाऊन पोहोचलो. व्हाइसरॉयची गाठ घेतली. आणि घडलेल्या घटना त्याच्या कानावर घातल्या. मी केलेल्या योजनेबद्दल त्याला पुष्कळ समाधान वाटले. गोवे हातचे जाण्याची वेळ आली होती; त्या संकटातून त्यांची मुक्तता झाली यामुळे त्याला फार हायसे वाटले. शाहा आलमसाठी भेटी देऊन त्याच्या वकिलाला निरोप द्यावा असे मी व्हाइसरॉयला सुचविले. तसेच शाहा आलमला वचन दिल्याप्रमाणे वेळेवर पोहोचण्याकरिता मी मोठ्या पहाटे उठून तयारी करू लागलो परंतु व्हाइसरॉयची इच्छा होती की, मी राजपुत्राला त्याने लिहिलेले पत्र नेऊन द्यावे, ते तयार करण्यास वेळ लागला. म्हणून मी वेळेवर न पोहोचल्यामुळे शाहा आलमच्या लोकांनी बारदेश लुटला. व्हाइसरॉयने मला तातडतोब पाठवावे म्हणून

शाहा आलमनं आपल्या लोकांना बारदेशात लुटालुट करण्याची आज्ञा केली. पण मी दिसताच लुटालुट थांबवावी असेही त्यानं बजावले होते. मोगल पहारेकऱ्यांनी मला ओळखताच लुटालुट थांबविण्याची व्यवस्था केली. पण तोपर्यंत काही जण नागवले गेले होतेच! या प्रकाराबद्दल मी राजपुत्राचा सौम्य निषेध केला. त्याने उत्तर दिले "तुम्ही आला नसतात, तर याहूनही अधिक वाईट झाले असते." या काळात राजपुत्राचे कुटुंबीय आणि त्याचे अधिकारी यांनी मला अनेक वस्तू भेटी दाखल दिल्या; त्याचा तपशील सांगणे अशक्य आहे. मी नाखुषीनेच शाहा आलमची नोकरी बजावीत होतो. ही गोष्ट त्याला माहीत होती. म्हणून मला संतुष्ट ठेवण्याचे त्याचे हे प्रयत्न होते.

**राजपुत्र अकबरचे इराणला पलायन :** या सुमारास राजपुत्र अकबर वेंगुर्ल्याहून राजापुराला पळून गेला. त्याने वेंगुर्ली येथे तयार करून घेतलेले जहाज, बादशहाच्या आरमाराने जाळून टाकले होते. राजापूरहून काही फ्रेंच व्यापाऱ्यांच्या सहाय्याने तो इराणकडे निघून गेला. तेथे तो १६८७ मध्ये पोहोचला. इराणचा शाहा, शाह अब्बास यांचा मुलगा शाहा सुलेमान (हा १६६७ मध्ये गादीवर आला होता) याने त्याचे चांगले स्वागत केले. इराणच्या शाहाने त्याला अनेक वस्तू भेटीदाखल दिल्या. पण त्याला दरबार सोडून जाण्याची परवानगी नव्हती. शाहा सुलेमानच्या मृत्यूपर्यंत तो इराणमध्येच राहिला. पुढे एकदा तो शाहा हुसेनच्या काळात (१६९०–१७२२) मोगल राज्यात शिरला होता. त्यामुळे काळजीचे वातावरण निर्माण झाले होते त्याची हकिकत मी पुढे देणार आहे.

इराणचा शाहा सुलेमान हा राजपुत्र अकबराला रोज तीनशे पटाका (रुपये ६००) खर्चासाठी म्हणून देत असे. आपला मुलगा इराणला पोहोचला असून शाहा सुलेमान त्याला अनुकूल आहे, असे कळल्यावर औरंगजेबाने शाहाला पुढील अर्थाचे पत्र लिहिले "माझा बंडखोर मुलगा तेथे आपल्याकडे आलेला असल्याचे मला खात्रीलायक कळले आहे. हे पत्र पाहताच त्याला पायात बेड्या घालून माझ्याकडे पाठवून द्या. जर तुम्ही याप्रमाणे वागला नाहीत, तर मी राजपुत्र दाराला केली तशी तुम्हाला कडक शिक्षा करीन हे लक्षात असू द्या." असदखान[1] वजीर याने पत्र खलोल्यात ठेवून त्याच्यावर मोहोर केली. नंतर त्याने ते पत्र औरंगजेबासमोर ठेवीत म्हटले "हे पत्र पाठविण्यासाठी आपण मनुष्य निवडू शकाल, पण त्याचे उत्तर कोण घेऊन येईल हे मात्र मला सांगता येणार नाही." त्याच्या म्हणण्याचा इत्यर्थ असा की, हे पत्र घेऊन जाणाराचा शिरच्छेद होईल. आणि शाहा सुलेमान स्वतः

१. असफखान—महम्मद इब्राहिम—याचा मान्य धाला असफदोला जमदतउलमुल्क, असफखान ही पदवी होती. हा १०८६ हि. त वजीर झाला. (१६७५–७६) याचे ११२१ हि. (१७१६–१७) ला निधन झाले.

हिंदुस्तानावर चाल करून येईल. हे ऐकून औरंगजेबाने काही उडवाउडवीचे उत्तर दिले. ते पत्र मात्र कधीच इराणला पाठविण्यात आले नाही.

आम्ही नंतर वेंगुर्ल्यास गेलो. राजपुत्र शाहा आलमच्या छावणीत मी दाखल झाल्यावर शाहा आलमने वेंगुर्ल्यावर स्वारी केली. ह्या स्वारीत मी (मनुची) त्याच्या बरोबर होतो. शाहा आलमने वेंगुर्ले सहज काबीज केले. वेंगुर्ल्यातून लोक पळून गेले होते. त्यामुळे ते ताब्यात घेणे त्याला मुळीच अवघड गेले नाही. मोगलांचे आरमार किनाऱ्याकिनाऱ्याने आमच्याबरोबरच चालत होते. थोड्या दिवसांनी पोर्तुगीज वकील, जोआव आन्तूने पोर्तुगीज आणि मॅन्युअल सान्तो पिन्टो हे मोगल छावणीत येऊन दाखल झाले. वकिलांचे चांगले स्वागत झाले. त्यांना वस्त्रे आणि प्रत्येकी दोन हजार रुपये देण्यात आले. मोगलांनी व्हाइसरॉयसाठी एक सजविलेला घोडा, रत्नजडित खंजीर, अत्तराची कुपी आणि एक स्नेहाचे पत्र दिले.

पोर्तुगीज वकिलांचा मुलाखत समारंभ झाला. तेव्हा दुभाष्याचे काम मी न करता दुसऱ्या एका युरोपियन माणसाने केले. व्हाइसरॉयने पोर्तुगीज भाषेत लिहिलेल्या पत्राचे भाषांतर करून सांगताना या दुभाष्याने एक चूक केली. आपल्या पत्रातील एका परिच्छेदात व्हाइसरॉयने पुढीलप्रमाणे लिहिले होते. "आपण (शाहा आलम) मला आठशे घोडे द्यावेत किंवा आपल्या छावणीतून ते विकत घेण्याची परवानगी द्यावी." त्या युरोपियन दुभाष्याने या मजकुराचे काय भाषांतर करावे! त्याने पुढील भाषांतर सांगितले "आपण (मोगल) मला ८०० घोडे द्याल तर मी स्वतःला तुमचा प्रजाजन समजेन." याचा अर्थ असा की व्हाइसरॉय हा गोवे, शाहा आलमच्या ताब्यात देण्यास तयार होता. हे चुकीचे भाषांतर ऐकताच मी शाहा आलमच्या लेखनिकाला लिहिणे थांबविण्यास सांगितले आणि म्हटले "दुभाष्याला व्हाइसरॉयच्या सूचनेचा अर्थच कळला नाही. व्हाइसरॉयचे म्हणणे इतकेच की संभाजीच्या विरुद्ध लढा चालू ठेवण्यास मोगलांनी पोर्तुगीजांना ८०० घोडे द्यावेत. हे मान्य नसल्यास मोगल छावणीतून घोडे विकत घेण्याची परवानगी देण्यात यावी." माझ्या म्हणण्याचा दुभाष्याला राग आला. पण अशा वेळी खरे बोलणे, वस्तुस्थिती सांगणे आणि कोणत्या ना कोणत्या निमित्ताने गोवे ताब्यात घेण्याच्या औरंगजेबाच्या कारस्थानातून गोव्याचे रक्षण करणे हे मला आवश्यक होते. नाहीतर औरंगजेबाने तात्काळ त्याचा ताबा घेतला असता.

संध्याकाळी राजपुत्राच्या तंबूजवळ मला शेख महम्मद भेटला. ह्याच शेख महम्मद व्हाइसरॉयकडे मोगलांचा वकील म्हणून प्रथम गेला होता. गोवे आपण शाहा आलमला मिळवून देऊ असे या शेख महम्मदने औरंगजेबाला सांगितले होते. शेख महम्मद माझ्याजवळ येऊन तक्रार करू लागला आणि म्हणाला "बादशहाच्या राजकारणात ढवळाढवळ करणे हे तुमचे काम नाही. आणि पोर्तुगीजांचा दलाल म्हणून काम करणे याचेही तुम्हाला प्रयोजन नाही." आम्ही मोठमोठ्याने बोलू लागलो.

आमचे भांडण तंबूत असलेल्या राजपुत्राच्या कानावर गेले. त्याने विचारले "कसले भांडण चालले आहे आणि कोण भांडत आहेत?" नोकरांनी शाहा आलमला सांगितले, "हकीम निकोलो मनुची आणि शेख महम्मद हे पोर्तुगीजांच्या होऊ घातलेल्या तहाच्या वाटाघाटीबद्दल जोराजोराने भांडत आहेत." राजपुत्राने शेख महम्मदला सांगून पाठविले की, तुम्ही येथून जा. अशा प्रकरणाबद्दल तोंड उघडू नका. यानंतर त्याने मला आत बोलावले; माझे समाधान केले. तो म्हणाला "मी पोर्तुगीजांना हात लावणार नाही. हे माझे वचन समजा." खरे पाहता शेख महम्मदचा सल्ला शाहा आलमने ऐकला असता तर त्याने गोवे निश्चित घेतले असते. कारण शेख महम्मद याच प्रांताचा रहिवाशी असून या प्रांताची खडानखडा माहिती त्याला होती.

त्यानंतर मॅन्युअल सान्तो पिन्टो व्हाइसरॉयकडे परत गेला. आणि त्याने त्याला वर घडलेल्या दोन्ही घटना सांगितल्या. या गोष्टीमुळे पिन्टोच्या द्वारे व्हाइसरॉयने मला दोन सूचना कळविल्या. एक म्हणजे सान्त आयागो ही सरदारी (नाइटहूड) पदवी मी स्वीकारावी किंवा एक हजार अशरफीन[1] नाण्याचे उत्पन्न येईल असे खेडे जहागीर म्हणून मी घ्यावे. मला यांपैकी कोणतीच गोष्ट स्वीकारण्याची इच्छा नव्हती. पण ते नाकारणे व्हाइसरॉयला अपमान झाल्यासारखे वाटेल, म्हणून मी शेवटी सान्त आयोगाची नाइटहूड (सरदारी) ही पदवी स्वीकारली. व्हाइसरॉयने मला योग्य ती सनद देऊन ती पदवी बहाल केली. (२९ जानेवारी १६८४).

**माझा (मनुचीचा) पळून जाण्याचा प्रयत्न :** मुसलमानांत राहण्यात मला सुख वाटत नव्हते. म्हणून शाहा आलमच्या नोकरीत राहण्याची माझी इच्छा नव्हती. मोगलांच्या या मोहिमा लवकर संपतील असे मला वाटेना. या मोहिमांसाठी राजपुत्राच्या सैन्याबरोबर, इकडे तिकडे भटकावे लागले असते. म्हणून येथून पळून जाण्याकरिता काही योजना करण्याचे मी ठरविले. पहिली गोष्ट केली ती ही की, पोर्तुगीज वकिलाला आपले सशस्त्र गलबत घेऊन माझी वाट पाहण्यास सांगितले. कारण राजपुत्र सैन्य घेऊन निघाल्यावर माझा बेत त्याच्याबरोबर न जाता पोर्तुगीज वकिलाबरोबर गोव्याला जाण्याचा होता. "मी तुमची वाट पाहीन" असे पोर्तुगीज वकिलाने मला आश्वासन दिले. प्रवास खर्चासाठी राजपुत्र शाहा आलमने मला दोनशे रुपये दिले होते. ते घेऊन हकीम मनुची हा पळून गेला असा आपल्याला बोल येऊ नये म्हणून मी ते रुपये शाहा आलमचा मुलगा सुलतान मोईजुद्दीन याच्याकडे ठेव म्हणून दिले. ते त्याने आपल्या खोजाकडे दिले.

१. अशरफीन–मूळ म्हणजे की अशरफीन हे गोव्याचे चालू नाणे होते. आणि त्याची किंमत १ शि. ६ पे. च्या आसपासची होती. परंतु येथे मनुची या नाण्याचा निर्देश उत्तर हिंदुस्तानातील सोन्याच्या अश्रफी ऐवजीच करत आहे. आणि त्याची किंमत १०–११ शि. होती. वार्षिक ७५ पौंड (अशरफीनच्या १ शि. ६ पे. प्रमाणे) हे काही अभिमान करण्यासारखे बक्षीस ठरत नाही. परंतु ५०० पौंड वार्षिक (अश्रफीप्रमाणे) उत्पन्न हे मात्र तसे होईल.

राजपुत्र शाहा आलम छावणीतून निघेपर्यंत मी वाट पाहिली. तो निघून गेल्यानंतर पोर्तुगीज वकिलाच्या जहाजाकडे जाण्यास निघालो. परंतु तो वकील डच वखारीत मेजवानीसाठी गेला असल्यामुळे माझा हा प्रयत्न फसला. राजपुत्र शाहा आलमला माझा या प्रयत्नासंबंधी समजले तेव्हा तो अतिशय संतापला. त्याने आपला दुभाक मीर महम्मद याची माझी व्यवस्था पाहण्यासाठी नेमणूक केली होती. "मनुचीला तू शोधून आण. तोपर्यंत तू माझ्यासमोर येऊ नकोस" असे शाहा आलमने मीर महम्मदला खडसावून बजावले. इतकेच नव्हे तर शाहा आलमने आपल्या आरमाराच्या अधिकाऱ्याला माझा तपास काढून माझी समजूत घालून अगर जबरदस्तीने परत आणण्याचा हुकूम केला. काही झाले तरी मी मनुचीला आपल्या नोकरीत ठेवणार असे त्याने उघडपणे सांगितले.

जबरदस्ती मला आवडत नाही हे शाहा आलमला ठाऊक होते. म्हणून त्याने मला घेऊन येण्यासाठी सजविलेला घोडा, एक हत्ती आणि संरक्षणासाठी पाचशे स्वार समुद्रकिनाऱ्यावर पाठविले. वरकरणी हा माझा मान होता पण पकडून आणावे अशा सूचना स्वारांना देण्यात आल्या होत्या.

मी वकिलाच्या नावेत जाऊन बसलो. पण पोर्तुगीज वकील मला तेथे दिसला नाही. मी त्याची वाट पाहत होतो. मोगल छावणीतून आपण निघून आलो याचा मला आनंद वाटत होता. थोड्या वेळाने मी बसलेल्या जहाजातील पहारेकऱ्यांनी मला सांगितले की, मुसलमानांचे एक गलबत जवळ येत आहे. मी नावेच्या खिडकीतून तोंड बाहेर काढून पाहिले, तो मला मुसलमानांच्या जहाजात मीर महम्मद दिसला. त्याला पाहून माझे अवसान गळाले.

मीर महम्मद हा पोर्तुगीज वकिलाच्या जहाजावर आला. त्याने मला अत्यंत कळकळीने म्हटले "माझे प्राण वाचव. शाहा आलम तुझी वाट पाहत आहे. तू छावणीत जाऊन शाहा आलमला भेटल्याशिवाय तो माझे तोंड पाहण्यास तयार नाही". आम्ही बोलत असता पहारेकऱ्यांनी येऊन सांगितले की, मोगल फौज वेंगुर्ल्याहून निघून आली आहे. पळून जाण्याच्या बाबतीत पूर्ण निराश झाल्यामुळे मी मीर महम्मदाच्या गलबतात जाऊन बसलो. मराठ्यांनी खुष्कीचे सगळे रस्ते रोखून धरले होते. ते चारी दिशांनी धामधूम करीत होते. आमच्या बरोबर असलेला हत्ती मराठ्यांच्या तावडीत सापडण्याचा धोका होता. ती मोठी नामुष्कीची गोष्ट झाली असती. आरमाराच्या अधिकाऱ्याने घोडे जहाजावर चढवावे आणि स्वारांना माझ्या रक्षणासाठी जहाजावर घ्यावे अशी आज्ञा केली. हत्तीलाही दुसऱ्या एका जहाजावर चढविण्यात आले. अशा रीतीने आम्ही जहाजाच्या मार्गे एका बंदराला लागलो. हे बंदर वेंगुर्ल्याहून दोन दिवसांच्या वाटेवर आहे. शाहा आलम हा त्या बंदराला

गेला होता. तेथे त्याला एक देऊळ नष्ट करावयाचे होते. त्याला व्हाइट पॅगोडा[1] (व्हर्जिन्स) असे म्हणत. शाहा आलमने दारू भरून ते देऊळ उडवून लावले.

मी परत आलेलो आहे हे पाहून राजपुत्राला फार आनंद वाटला "तुमचे यापुढे कसे होईल हे मला समजत नाही" असे म्हणून त्याने प्रेमळपणाने माझी कानउघडणी केली. आपल्या व आपल्या कुटुंबीयांबद्दल मला आस्था नाही, हे त्याला दिसत होते. शाहा आलमने माझ्याबद्दल जो जिव्हाळा दाखविला त्याच्या एक-शतांश सुद्धा दाखविणारा राजपुत्र आपल्याला मिळावा यासाठी इतर युरोपियनांनी धडपड केली असती. मी म्हटले "आपले माझ्यावर प्रेम आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. परंतु माझा खर्च मोठा आहे. इतर हकीमांना जो पगार देण्यात येतो, त्यापेक्षा मला कमी पगार का? मी अयोग्य आहे म्हणून का? त्यामुळे मी आपली नोकरी बजावू शकत नाही. जे काही थोडे बहुत आपण देता तेही माझ्या हाती लवकर पडत नाही. आपले कारभारी आणि अधिकारी बराच काळपर्यंत मला ताटकळत ठेवतात. म्हणजे आपल्या नोकरीत मला पदरचे पैसे खर्च करावे लागतात. आणि यातून त्रासाशिवाय दुसरे काही माझ्या पदरी पडत नाही."

माझा स्वभाव आणि उपचारात माझ्या हाताला येत असलेला गुण यामुळे मी परखडपणे बोललो. मी आपणहून राजपुत्राची नोकरी मागितली नव्हती. तो देत असलेल्या पगाराचीही मला जरुरी नव्हती. राजपुत्राने रागावून मला काढून लावले असते, तरी त्याला माझी हरकत नव्हती. पण तो रागावला नाही. आणि त्याने स्वारांचा आणि पायदळांचा पाहारा बसविण्याची आज्ञा केली. मी पुनः पळून जाऊ नये म्हणून त्याने ही योजना केली. मला ठेऊन घेण्याचा त्याचा निश्चय अटळ आहे असे पाहून मी त्याला म्हटले "माझ्या जवळ आवश्यक सामानसुमान नाही. मी आताच आपल्या बरोबर येऊ शकणार नाही. माझे सगळे सामान गोव्यात आहे. मी गोव्याला जाऊन आपल्या संबंधीयांचा निरोप घेईन आणि माझे सामान घेऊन येईन. सात दिवसांत छावणीत परत येईन असे मी वचन देतो." असे म्हणून मी त्याच्या पायाची शपथ घेतली. तेवढ्यानेही त्याचे समाधान झाले नाही. त्याने मला येशु ख्रिस्ताचीच शपथ घ्यावयाला लावली आणि नंतर मला पुनः वस्त्रे देऊन निरोप दिला.

गोव्यात त्यावेळी रसदेचा विशेष तुटवडा होता. मी राजपुत्राला विनंती करून, गव्हाची बरीच पोती गोव्याच्या सावकाराकडे पाठविण्यासाठी मागवून घेतली.

१. या देवळाचे ठिकाण मला आढळले नाही. मि. फॉस्टरच्या 'मार थॉमस नो', पॉइंट ऑफ म्हणजे नकाशात ते उत्तरेकडील चारेपाटण व दक्षिणेकडील बान्दा यांच्या दरम्यान दाखविलेले आहे डॉ. रॉडरिग्जच्या मते हे देऊळ मालवण जवळ असावे. सिंधुदुर्ग जवळ असल्यामुळे व फार मोठे श्रद्धास्थान असल्यामुळे मुसलमान त्याचा नाश करण्याचा प्रयत्न करणारच. मालवणला हिंदू देवळे आहेत. (बॉम्बे गॅझेटिअर, रत्नागिरी जि., पा. ३४८)

मोगल छावणीत रसदेचा चांगलाच पुरवठा होता. गोव्यात मी गहू आणवल्यामुळे पोर्तुगीजांना फारच आनंद झाला. दोन दिवस गोव्यात राहून मी व्हाइसरॉयचा निरोप घेतला आणि मोगल छावणीकडे परतलो.

मी मोगल छावणीत पोहोचलो. राजपुत्र तेथून कूच करण्याच्या तयारीत होता. त्याने संभाजीच्या राज्यातील व्हाइट पॅगोडा (पांढरे देऊळ) आणि इतर इमारती उध्वस्त केल्या होत्या. आम्ही बारदेशच्या वाटेने परत आलो आणि बारदेशच्या नदीच्या काठावर मुक्काम केला. शाहा आलमने आज्ञा केली होती की, रात्रीच्या वेळी छावणीत कोणी आला, किंवा छावणी सोडून जात असला तर त्याचा शिरच्छेद करण्यात यावा. हेरांना दहशत बसण्यासाठी, त्यांची हेरगिरी थांबविण्यासाठी ही योजना होती. काही कनडी[1] (कानडी?) लोक गोव्याहून फळे, लोणी विकण्यासाठी छावणीत आले होते. त्यांना पकडण्यात आले. त्यांचा शिरच्छेद करण्यासाठी त्यांना नेण्यात येत होते. माझ्या नोकरांनी त्यांची ही शोचनीय स्थिती मला कळविली. मी राजपुत्राकडे घाईघाईने गेलो. मी त्याला म्हटले "या लोकांनी मला गोव्याहून येथे आणले आहे. ही माझी माणसे आहेत. त्यांना तुम्ही सोडून द्या." राजपुत्र हसला आणि त्या लोकांना मुक्त करण्यात यावे, अशी त्याने आज्ञा केली. मुक्त झालेल्या लोकात ख्रिश्चन होते हे मी ओळखले.

यानंतर आम्ही पुढे कूच केले आणि रामघाटचा[2] डोंगर चढलो. ही चढण दीड लीग (सुमारे ३ मैल) आहे. या ठिकाणी संभाजीने आमचे सगळे सैन्य संपूर्णपणे गारद केले असते. कारण घाटाची चढण अवघड होती. वाट अरुंद होती; आणि तीहि अरण्यातून काटेरी झाडाझुडपांतून जात होती. पण संभाजीने तो प्रयत्न करण्याचे मनात आणले नाही. लोकांत बोलवा असा की, त्याचे आणि शाहा आलमचे आतून काहीतरी संगनमत झाले आहे.

संभाजीने हल्ले करून आमचे सैन्य गारद केले नाही, ते परमेश्वराने केले. आमच्या सैन्यात रोगाची एक भयंकर साथ पसरली की सात दिवसांच्या अवधीत सैन्यातील एक-तृतियांश माणसांना त्या रोगाची लागण लागली. आणि ज्याला या रोगाने झपाटले तो मृत्युमुखी पडला. या रोगाने रोज पाचशे माणसे मरत होती. आमच्या सैन्याचा १/३ भाग या रोगाने गारद झाला. या रोगामुळे माणसेच मेली

१. हा शब्द मनूचीने प्रदेशवाचक म्हणून वापरलेला दिसतो. भाषेचा संबंध नाही.

२. रामघाट—या खिंडीला ग्रँट डफ आंबा-घाट म्हणतो. आणि ती चढून आल्यावर शाहा आलम पन्हाळ्यापाशी सातारा जिल्ह्यातील वाळवे या ठिकाणी राहिला.खान १९८ वर तो पावसाळा रोगाचा व त्यामुळे घोडदळ रोडावल्याचा व सैन्याला पायी प्रवास करावा लागल्याचा उल्लेख करतो. (खाफीखान पा. २६१) राम दरा खिंड व त्यातील बिकट वाटेसंबंधी निर्देश करतो. डॉ. कोडिंग्टन मला कळवितात की रामघाट ही पश्चिम घाटातील एक खिंड आहे. तेथून पुढे वर येण्याची वाट आहे.

असे नाही, तर घोडे, हत्ती आणि उंट हीही मरण पावली. वातावरणही या रोगामुळे दूषित झाले होते. रस्ता अतिशय अरुंद असल्यामुळे धान्याची आवक थांबली व धान्याच्या पुरवठ्याची यंत्रणाही कोसळून पडली. मी पूर्वी म्हटलेप्रमाणे मोगल सैन्यात गव्हाचा साठा मुबलक होता. पण वाहून नेण्यास जनावरे नव्हती. सैन्यातील शिपायांचे अतिशय हाल झाले. अनेकांचे स्वारीचे घोडे मरण पावले होते. घोडे विकत घेण्यास त्यांच्यापाशी पैसा नव्हता. आणि त्यामुळे घोडे विकण्यास छावणीत कोणीच तयार नव्हता. त्यांना पायी चालावे लागले. त्यांपैकी कित्येक जण उन्हातान्हाने मरण पावले.

घाटमाथ्यावर पोहचल्यावर आम्ही विजापूरच्या राज्यातून कूच करू लागलो. मराठ्यांनी आमच्यावर सारखी पाळत ठेवली होती. संधी मिळेल तेव्हा ते आमच्या छावणीची लुटालुट करीत. त्यांनी आमचे सामानसुमान आणि बाजारबुणगेही सोडले नाहीत. आम्हालाही त्यांचा फार उपसर्ग झाला. असे करत करत आम्ही अहमदनगरला पोहोचलो (२९ मे १६८४).

पावसाळा संपला. औरंगजेबाने आपले सगळे सैन्य सोलापूरला हलविले.[१] (७ मे १६८५). औरंगजेब सोलापूरला पोहचला. (४ जून १६८५). हे गाव त्याने विजापूरच्या बादशहाकडून घेतले होते. गोवळकोंड्याचा बादशहा विजापूरच्या बादशहाला मिळाला होता. यासाठी त्याला शिक्षा म्हणून औरंगजेबाने गोवळकोंड्यावर स्वारी करण्याचा बेत केला. त्याने शाहा आलमला बहादुरखानाबरोबर गोवळकोंड्यावर चाल करून जाण्याची आज्ञा केली.[२] आम्ही स्वारीवर निघालो आणि प्रथम गोवळकोंड्याच्या सरहद्दीवरील मलखेड[३] या गावी मुक्काम केला. मलखेड येथे गोवळकोंडा सैन्याचा सेनापती महम्मद इब्राहिम[४] हा तळ देऊन होता. हा मुळचा इराणी. तेल्याच्या धंद्याला सुरवात करीत हा शेवटी गोवळकोंड्याच्या मुख्य मंत्री झाला. सुप्रसिद्ध मीर जुमलाच्याप्रमाणे याचेही नशीब थोर होते. मीर जुमल्याप्रमाणेच हाही विश्वासघातकी होता. यानेही पुढे गोवळकोंड्याच्या बादशहाचा विश्वासघात केला हे पुढील हकीकतीवरून समजून येईल. प्रथम प्रथम त्याने उत्कृष्ट शिपायीगिरी गाजविली. आणि आमचे बरेच नुकसान केले. असे असूनही त्याच्या लढण्याच्या

१. औरंगजेबाने सोलापूरला जाण्यासाठी २ जमाद १०९६ हि. (२८ वे वर्ष) (७ मे १६८५) ला अहमदनगर सोडले. तो सोलापूरला ४ जून १६८५ ला पोहचला (मा-इ-आ. २५८–५९).

२. शाहा आलमला, ६ शबान (२८ वे वर्ष) १०९६ हि. (९ जुलै १६८५) ला हैदराबादकडे वेगळे पाठविण्यात आले. (मा-इ-आ. २६०).

३. मलखेड—हैदराबादेच्या पश्चिमेकडे ८६ मैलांवरील भीमेच्या काठचे गाव.

४. महम्मद इब्राहिम—याच्या खलीलुल्लाखान या कुतुबशाही पदवीकरिता—मा-आमीर-उल-उमरा.iii. ६२७वर महाबतखान या आलमगिरी पदवीखाली पाहा. याचा, यानंतर गिफोर्डने आलमगिरीला लिहिलेल्या पत्राच्या संदर्भात, मनुची पुन: निर्देश करतो (भा. ३ रा फो. १५४)

पद्धतीवरून ही गोष्ट उघड झाली की तो मनःपूर्वक लढू इच्छित नव्हता. कारण त्याने मनात आणले असते तर तो आमचे कितीतरी अधिक नुकसान करू शकला असता.

**मी (मनुची) गोवळकोंड्याकडे निघून जातो :** या धावपळीला मी त्रासून गेलो होतो. माझ्या श्रमाने मी जे काही थोडेबहुत पैसे कमावले होते ते घेऊन युरोपला जावे आणि आयुष्य काढावे असे मला वाटे. पण हे कसे घडून यावे याचा मी सतत विचार करत होतो. सुरतेत माझे काही काम आहे, त्यासाठी तिकडे जाण्याची मला परवानगी द्यावी अशी मी शाहा आलमला विनंती केली. पण सुरतेच्याही पलिकडे जाण्याचा माझा निश्चय आहे हे त्याला अनुभवावरून माहीत झाले होते. त्याने मला काही उत्तर दिले नाही. उलट त्याने माझ्यावर कडक नजर ठेवण्यासाठी आपल्या नोकरांना आज्ञा केली.

त्याचा हा निश्चय पाहून मी दुसराच एक पवित्रा घेण्याचे ठरविले. शत्रु सैन्याचा सेनापती महम्मद इब्राहिम याला मी पत्र लिहिले आणि त्यात मला येथून पळून जाण्यासाठी मदत करण्याची त्याला विनंती केली "या कामात मी तुम्हाला मनःपूर्वक मदत करीन", असे त्याने मला कळविले. या कामासाठी तो टेहळणी म्हणून चार हजार स्वारांचे पथक पाठवीत होता. जणूकाय ते आमच्यावर हल्लाच करणार आहेत असा आव ते आणीत. यामुळे शाहा आलमला थोडी काळजी निर्माण झाली. असे बरेच दिवस चालले. शेवटी माझ्या पलायनाचा ठरलेला दिवस उजाडला. माझी पुस्तके हेरांच्या मार्फत मी छावणीच्या बाहेर पाठवून दिली. माझी सोनी नाणी व वैद्यकीय व्यवसायाची पेटी ही मी आपल्या बरोबर घेतली. मी घोड्यावर स्वार होऊन माझा तंबू सोडला. माझ्या पाठोपाठ माझी पालखी यावी अशी मी व्यवस्था केली. मी जणू काय हवा खाण्यासाठी बाहेर जात आहे असे मी भासविले. वाटेत मी माझा एक इंग्रज मित्र थॉमस गुडलॅट[1] याच्या तंबूवर थांबलो. तेथे मी थोडेसे मद्य घेतले. शाहू आलमचे हेर गोंधळात पडावे असा माझा हेतू होता. यानंतर, आज रात्री मला माझ्या काही मित्रांना भोजन द्यावयाचे आहे या सबबीवर मी त्याच हेरांना पक्वाने आणण्यासाठी निरनिराळ्या ठिकाणी पाठविले. पालखी परत घेऊन जा, मी घोड्यावरूनच परत येईन असे माझ्या नोकरांना सांगितले.

अशा रीतीने मी हेरांच्या मधून सुटका करून घेतली. मग मी माझ्या दोन विश्वासू नोकरांना सांगितले की, "तुम्ही नदीच्या पलीकडच्या खेड्यात जा. तेथे तुम्ही माझी वाट पाहा. तेथे शत्रुचा सेनापती महम्मद इब्राहिम याचे चार हजार स्वार तळ देऊन आहेत. तेथे ते आहेत, आणि मी सुरक्षितपणे येऊ शकतो असे

१. हा थॉमस गुडलॅड असावा. हा गोवळकोंड्याला गेला होता. गव्हर्नर जिफर्डने, मनूचीमार्फत पाठविलेल्या पत्रात याचा उल्लेख आहे. इतरत्र त्याचा निर्देश राष्ट्रद्रोही म्हणून केलेला आहे.

तुम्हाला वाटले की, तुम्ही पांढरा बावटा हलवा." माझ्या नोकरांनी त्याप्रमाणे केले. मी घोड्यावरून फेरफटका करण्याचा आव आणला. नदीच्या काठावर मी हळूहळू घोडा चालवीत होतो. घोड्याला पाणी पाजायचे आहे, असे मी भासवीत होतो. एकाएकी मी नदी ओलांडण्यास सुरुवात केली. पाहारेकऱ्यांनी हे पाहताच त्यांनी आरडाओरडा केला. मी पळून चाललो आहे असे त्यांनी मोगल स्वारांना ओरडून सांगितले. पण त्याला उशीर झाला. मी घोड्याला टाच मारून दौडत निघालो. शाहा आलमच्या स्वारांनी माझा पाठलाग केला. त्यांनी मला घेरण्याचा प्रयत्न केला. पण महम्मद इब्राहिमचे स्वार तावडतोब पुढे झाले आणि त्यांनी शाहा आलमच्या स्वारांना पळवून लावले. अशा रीतीने माझी सुटका झाली. मी खेड्यात आणि तेथून पुढे महम्मद इब्राहिमच्या छावणीत पोहोचलो. आणि माझे सहाय्य केल्याबद्दल मी त्याचे आभार मानले.

येथे हेही सांगितले पाहिजे की गोवळकोंड्याच्या सैन्यातील काही खिस्ती लोक हेही मला संरक्षण देऊन घेऊन जाण्यासाठी पुढे झाले होते. मी तेथे पोहोचतो, तोच शाह आलमचा एक हेर तेथे आला. त्याने महम्मद इब्राहिमला काही पत्रे दिली. आणि त्याला खाजगीत असे सांगितले की शाह आलम मनुचीला बरेच मानतात. मनुचीने निघून जाऊ नये म्हणून त्यांनी त्याच्यावर पहारा बसविला होता. त्याच मनुचीला जर तुम्ही सहाय्य केलेत तर शाहा आलमला ते मुळीच आवडणार नाही.

तो हेर आणि इतर माणसे निघून गेली. त्यानंतर महम्मद इब्राहिम आणि मी एकटेच राहिलो. मला मदत केल्याबद्दल आता त्याला पश्चात्ताप होऊ लागला होता. शाह आलमला जाऊन मिळण्याचा तो बेत करीत होता. मला सहाय्य केल्यामुळे शाहा आलम आपल्याला नीट वागवणार नाही असे त्याला आता वाटू लागले. मी पळून आल्याबद्दल त्याने माझे अभिनंदन केले. "तुम्ही काही दिवस माझ्याबरोबर राहा. माझी प्रकृती बरी नाही" असे तो मला म्हणाला. महम्मद इब्राहिमचा हेतु मला शाहा आलमच्या परत ताब्यात देण्याचा आहे, हे मी पक्के ओळखले. माझ्या खंजीरावर हात ठेऊन मी त्याला म्हटले, "गोवळकोंड्यास जाण्यास तुम्ही मला परवानगी दिली नाही, तर मी तुमच्या समोर पोटात खंजीर खुपसून घेईन. शाहा आलमच्या नोकरीत परत जाण्याच्या ऐवजी मी मरण पत्करीन."

माझा हा निर्धार पाहून महम्मद इब्राहिम घाबरला. मला त्याने थोडा वेळ वाट पाहण्यास सांगितले. त्याने मला गोवळकोंड्याला जाण्याचा परवाना (पासपोर्ट) दिला. आणि शक्य तितक्या लवकर निघून जा, असे तो मला खाजगीत म्हणाला. मी तावडतोब घोड्यावर बसलो आणि तीन दिवस प्रवास करीत गोवळकोंड्याला येऊन पोहोचलो. तेथे मी माझा मित्र मस्ये फ्रान्सिस्को म्युए याच्याकडे उतरलो.

त्याने मला गोवळकोंड्याच्या बादशहाचा मेहुणा शरीफेल्मुल्क[1] याच्याकडे नेले. त्याचे व माझे पुष्कळ बोलणे झाले. बादशहाची बहीण हृदयविकाराने आजारी होती. माझ्या उपचारांनी तिला पुष्कळ आराम वाटला. यामुळे गोवळकोंड्यात माझा बराच बोलबाला होऊ लागला.

मी आल्याचे मग बादशहाला समजले. त्याच्या दरबारी हकीम मस्ये देस्रेमा हा फ्रेंच मनुष्य मरण पावला होता. म्हणून बादशहाने मला पाचारण केले. बादशहाशी माझे थोडे संभाषण झाले. त्याच्या अंतःपुरात एक जॉर्जियन वंशाची बाई होती. गोवळकोंड्याच्या बादशहाचे खजिने कुठे कुठे आहेत, ते तिला माहीत असल्यामुळे तिला बादशहा फार मानीत असे. ती आजारी पडली. तिच्या अंगातून रक्त काढणे आवश्यक होते. पण ती अतिशय स्थूल होती. त्यामुळे तिची शीर सहज सापडत नसे. मी मोठ्या कौशल्याने तिची शीर पाहून रक्त काढले. त्यावेळी बादशहा हा माझ्या मागेच उभा होता. माझ्या कौशल्याचे सगळ्यांना कौतुक वाटले.

त्यालाही आपला रक्तस्राव करून घेण्याची इच्छा होती. पण त्याने तो बेत टाळला. कदाचित मला शाहा आलम आणि औरंगजेब यांनी मुद्दामच रक्तस्राव करण्यासाठी पाठविले असावे, अशी त्याला शंका आली असावी. त्याने आपल्या पुतण्याला झालेल्या गळवावर उपचार करण्यासाठी सांगितले. आणि त्यासाठी मला सातशे रुपये दिले.

**शाहा आलम गोवळकोंडा जिंकून घेतो :** मी जेव्हा बादशहाच्या पुतण्यावर उपचार करत होतो, तेव्हा महम्मद इब्राहिम[2] शाहा आलमला जाऊन मिळाला. गोवळकोंड्याच्या फौजेला सेनापतीच राहिला नाही. या परिस्थितीचा फायदा घेऊन शाहा आलमने त्यांच्यावर हल्ला केला. गोवळकोंड्याची फौज गोंधळून पळू लागली. यावेळी त्यांचा दुय्यम सेनापती रुस्तम राव[3] हा जखमी झाला. याने शाहा आलमची बाजू घेण्याचे नाकारले होते. गोवळकोंड्याचे सैन्य अशा रितीने पांगल्यावर शाहा आलम हा तडक गोवळकोंड्याच्या दिशेने निघाला.

१. शरीफेल्मुल्क—याच्या चरित्रासाठी मा-उल-उमरा ii १८८ पाहा. तो व त्याचे दोन मुलगे शाहा आलमला शरण गेले. आणि मग त्याला औरंगजेबाकडे सोलापूर येथे पाठविण्यात आले.

२. महम्मद इब्राहिम—शाहा आलमच्या शिफारशीवरून, औरंगजेबाकडून या ६,००० घोडदळाची मनसब आणि महबतखान ही पदवी मिळाली (११ जमादिउस्सानी २९ वे वर्ष. १०९६ हि. ९ नोव्हेंबर १६८५) (मा-इ-आ. २६९)

३. रुस्तुम राव हा गोवळकोंड्याचा मुख्य दिवाण मादण्णा याच्या चुलत्याचा मुलगा होय (मा-उल-उमरा. iii ६३०).

सरहद्दीवर आपली फौज हरली ही बातमी शहरात (हैदराबादेत) येताच बादशहाने गोवळकोंड्याच्या किल्ल्याचा आश्रय घेतला.[१] त्याच्या बरोबर त्याचे मंत्री मादण्णा व आकण्णा हे होते. हे हिंदु आणि ब्राह्मण असल्यामुळे मुसलमान त्यांचा द्वेष करीत. लोकांनी हैदराबाद शहरात असलेली या दोन मंत्र्यांची घरे जाळून टाकली. यानंतर सर्व जनता हैदराबाद शहर सोडून पळाली. मीही एका क्षणाचाही विलंब न लावता आपल्या घोड्यावर स्वार झालो. आणि मच्छलीपट्टमला पोहोचलो. शाहा आलमने मला पकडण्यासाठी ३०० स्वार पाठविले होते. पण मी त्यांना चुकविले. मच्छलीपट्टमला दोन दिवस काढल्यावर मी नरसापूरला गेलो. तेथे मला सुरक्षितता वाटली. तेथे मी इंग्रज आणि डच यांचा पाहुणचार घेत होतो. तेथे मी काही दिवस राहिलो. पण गोवळकोंड्याच्या बादशहाने मला पुनः बोलावू पाठविले.

शाहा आलम हा पोर्तुगीज किंवा शिवाजी (संभाजी) यांचे नुकसान करू शकला असता. पण केवळ सुस्वभावामुळे त्याने तसे केले नाही. गोवळकोंड्याच्या प्रकरणातही तो लष्करी कडकपणे वागला नाही. हैदराबाद शहराला उपसर्ग लागू नये असे त्याने आपल्या सेनाधिकाऱ्यांना बजावून ठेवले. त्याच्या सैनिकांनीही शहर लुटले नाही.[२] फक्त एकच शिया फकीर उझबेक सैनिकांच्याकडून मारला गेला.[३]

बादशहा अब्दुल हसन याची परिस्थिती मोठी अडचणीची झाली. त्याने शाहा आलमलाच आपल्याबद्दल औरंगजेबाकडे मध्यस्थी करून तह करण्याची विनंती केली. शाहा आलमने औरंगजेबाला पत्र पाठवून पुढीलप्रमाणे कळविले, "गोवळकोंड्याचा किल्ला ताब्यात येण्यास बराच अवधी लागेल. गोवळकोंड्याच्या बादशहाबरोबर तह करणे योग्य होईल असे मला वाटते. बादशहाने जी चूक केली ती वास्तविक त्याची नव्हती. तो अपराध त्याच्या मंत्र्यांचा होता. त्याचे परिमार्जन आपण म्हणाल तसे मी कुतुबशहाकडून करवून घेईन."

औरंगजेबाने आपल्या मुलाला पुढीलप्रमाणे कळविले, "कुतुबशहाच्या ब्राह्मण मंत्र्यांना ठार मारण्यात यावे. सोने, नाणे, रत्ने, हत्ती, युद्धसामुग्री मुबलक प्रमाणात दाखल करण्यात यावी. आणि विजापूरला यापुढे सहाय्य करण्यात येणार नाही अशी हमी घेण्यात यावी." शाहा आलमने या अटीवर कुतुबशहाशी बोलणी सुरू केली.

१. मुलतानाच्या शेवटच्या दिवशी (२९ वे वर्ष) १०९६ हि. (२९ ऑक्टोबर १६८५) शाहा आलमकडून एक बातमी (रिपोर्ट) आली की बादशाहा अब्दुल हुसेन याने गोवळकोंड्याच्या किल्ल्यात आश्रय घेतला आहे. आणि बादशहाचा सेनापती मोगल छावणीत येऊन पोहचला आहे. (मासीरे-आलमगिरी-२६७).

२. इतिहासकार भीमसेन सक्सेना हा त्यावेळी हैदराबादेत हजर होता. मोगल सैनिकांनी पहिल्या तीन दिवसांत हैदराबाद पूर्णपणे लुटले, असे तो आपल्या आत्मचरित्र (तारिखे दिलकुशा) या ग्रंथात म्हणतो.

३. मादण्णाचे शीर अब्दुलहसनने १ जमादा १ (२० मार्च १६८६) ला शाहा आलमकडे पाठवून दिले. (मासीरे-आलमगिरी २७२)

कुतुबशहा हा गोवळकोंड्याच्या किल्ल्यात जवळ जवळ कोंडला गेला होता. तहाच्या अटींपैकी त्याने पहिली गोष्ट जी केली ती ही की त्याने आपल्या ब्राह्मण मंत्र्यांना ठार मारले[1] आणि त्यांची प्रेते किल्ल्याच्या भिंतीवरून खाली फेकून दिली. मोगलांच्या सर्व अटी कुतुबशहाने मान्य केल्या आणि बादशहाला यापुढे तह मोडणार नाही अशी हमी शाहा आलमने दिली. अशा रीतीने गोवळकोंड्याचा बादशहा हा एक क्षुद्र राजा बनला. त्याने यापुढे शौर्याने सामना देण्याचे सोडून दिले. तो आपला काळ गायन, वादन, नर्तन यांमध्ये सतत घालवू लागला. तह झाल्यानंतर शाहा आलम हा गोवळकोंड्यापासून २० कोस (सुमारे ५० मैल) पश्चिमेस असलेल्या कोहीर[2] येथे तळ देऊन राहिला. कुतुबशाहापाशी एक मोगल वकील तैनात करण्यात आला.

**मी गोवळकोंड्याला जातो व तेथून मद्रासकडे धाव घेतो :** कोहीर येथे असताना शाहा आलमने कुतुबशाहाला पत्र लिहून कळविले की, "तुम्ही मनुचीचा शोध घ्या आणि त्याला माझ्याकडे पाठवून द्या. मला त्याची गरज आहे." कुतुबशाहाने मला घेऊन येण्यासाठी स्वार पाठविले. गोडीगुलाबीने मी जाण्याचे नाकारल्यास जबरदस्तीने मला आणण्यात यावे अशी कुतुबशाहाने आपल्या अधिकाऱ्यांना आज्ञा केली होती. कुतुबशाहाचे सैनिक नरसापूरला आले. त्यांनी मला बादशहाचा हुकूम दाखविला. बादशहाच्या पुतण्यावरील उपचार चालू ठेवावयाचे आहेत, म्हणून तुम्ही आले पाहिजे, अशी त्यात मला आज्ञा होती. मला हवे असेल तेव्हा निघून जाण्याची मोकळीक आहे असेही आश्वासन कुतुबशाहाने आपल्या हुकमात मला दिले होते. मी असे पाहिले की, आता यातून सुटका नाही. कारण माझी इच्छा असो अगर नसो, ते लोक मला बळजबरीने नेऊ पाहात होते, म्हणून मी मग असे ढोंग केले की, कुतुबशाहाची सेवा करण्याची मला फार उत्कंठा लागलेली आहे. मी घोड्यावर स्वार झालो व मोठ्या इतमामाने त्यांच्याबरोबर निघालो. गोवळकोंड्याला पोहचल्यावर मी बादशाहाकडे गेलो. बादशाहाची गाठ पडल्यावर त्याने मी आलो याबद्दल आनंद व्यक्त केला. मग मी त्याला विनंती केली "तुमच्या वचनाप्रमाणे मी तुमच्या आश्रयाखाली आलो आहे. कृपा करून मला शाहा आलमकडे पाठवू नका." कुतुबशाह थोडासा गोंधळला. त्याने महिना सातशे रुपये पगारावर माझी नेमणूक केली. मी त्याला म्हटले, "मला पगार नको. मी विनावेतन् आपली सेवा करीन." तरीपण त्याने सातशे रुपये माझ्याकडे पाठविले, आणि मानाची वस्त्रे दिली. मला कोणी त्रास देऊ नये म्हणून मी राहात होतो त्या आळीत त्याने शंभर स्वार तैनात केले.

१. हैद्राबाद जिंकल्याची बातमी, १०९६ हि. (३१ ऑक्टोबर १६८५) ला औरंगजेबाला मिळाली. (मासीरे-आलमगिरी २६७).

२. कोहीर हे गोवळकोंड्याच्या पश्चिमेस ४८–५० मैलांवरील गाव आहे. शाहा आलम २५ रजब (२७ जून १६८६) ला सोलापूरला औरंगजेबाच्या छावणीत परतला.

मी गोवळकोंड्यास दोन महिने होतो. बादशाहाचा पुतण्या बरा झाला. त्यानंतर मला गुपचुपपणे गोवळकोंडा सोडणे भाग पडले. त्याचा प्रकार असा. —शाहा आलमच्या वकीलाने निरोप घेतेवेळी मला मोगलांच्या हवाली करण्यासाठी बादशाहाचे मन वळविण्याचा पुनः एकदा प्रयत्न केला. कुतुबशाहा त्याला म्हणाला, "तुम्ही येथून जाताना त्याला (मनुची) बरोबर घेऊन गेलात तर कोणी आड येणार नाही." कुतुबशाहाने आमच्या आळीत तैनात केलेले शंभर स्वारही काढून घेतले.

कुतुबशाहा आणि मोगल वकील यांचे हे संभाषण वकीलाच्या एका शिपायाने ऐकले. मी मागे त्या शिपायाला बरा केला होता. त्याने मला तातडीने येऊन ही बातमी दिली. त्यावेळी मी पत्ते खेळत होतो. माझ्या मनाची तारांबळ लपून ठेऊन मी थोडा वेळ तसाच खेळत राहिलो. त्यानंतर मी डच वकील, लॅरेन्स पीट[1] याच्याकडे गेलो. आणि या नाजूक परिस्थितीत मला मदत करावी अशी त्याला विनंती केली. यानंतर गोवळकोंड्याचा फादर व्हिकर आणि सेंट ऑगस्टिन पंथाचा फ्रे फ्रॅन्सिस्को याला मी बोलावून पाठविले. मी त्याला म्हटले "तुम्ही रुस्तुम रावला भेटा. त्याला असे सांगा की, माझा भाऊ ऑगस्टिनो हा आजारी पडला असून त्याला मच्छलीपट्टणला हलविणे भाग आहे. त्याची परवानगी देण्यात यावी." अर्थात फ्रॅन्सिस्कोला कोणी भाऊ नव्हता. ऑगस्टिनो हे खोटेच नाव मी त्याला सुचविले. आमची युक्ती सफळ झाली. मच्छलीपट्टणला जाण्याचा परवाना मिळाला. मी पालखीत बसलो. मी (मनुची) आजारी असल्याचे सोंग केले. धन्य परमेश्वराची की, हेरांना हे काही उमगले नाही. शाहा आलमच्या वकीलाला माझ्या जाण्याचा काही पत्ता लागला नाही. मी प्रवास करीत मद्रासेस (फोर्ट सेंट जॉर्ज) येऊन पोहचलो. हे इंग्रजांच्या ताब्यात आहे. तेथे सर्व प्रकारच्या धोक्यातून मी मुक्त झालो. मी गोवळकोंड्यातून पळून गेल्यामुळे कुतुबशाहाची अडचण झाली. मनुचीला पकडण्यात तुम्ही तत्परता दाखविली नाही म्हणून शाहा आलमने कुतुबशाहावर ठपका ठेवला. पण मी गोवळकोंड्यातच नाही हे कुतुबशाहाला समजले होते. त्याने तपास केला. रुस्तुम रावने मला जाण्याचा परवाना दिला या आरोपावरून कुतुबशाहाने त्याला कैद करून किल्ल्यात ठेवले. त्याच्याकडून मुक्ततेसाठी पन्नास हजार रुपये दंड वसूल करण्यात आला. आणि ती रक्कम शाहा आलमची क्षमा याचना म्हणून त्याच्याकडे पाठविण्यात आली.

**माझे मद्रासला आगमन आणि विवाह :** मी मद्रासला पोहचलो. तेथील पोर्तुगीज नागरिक मला भेटण्यास आले. मी गोव्याला त्यांच्या देशाकरिता किती कष्ट केले होते, याची त्यांना जाणीव होती. म्हणून तेथे आल्यावर त्यांनी माझे अभिनंदन

१. लॅरेन्स पीट—हा धाकटा पीट होय. प्रथम हा मद्रासजवळील पालकात येथे डच वखारीचा प्रमुख होता. नंतर तो काही दिवस नेगापट्टणला होता. यानेच फ्रेंचांच्याकडून पॉंडिचेरी जिंकून घेतली होती.

केले; आणि मला मनोभावे सहाय्य करण्याचे व माझी सेवा करण्याचे ठरविले. परंतु मी फ्रान्सच्या रॉयल कंपनीचा डायरेक्टर जनरल फ्रॅन्सिस्को[1] मार्टिन याला भेटण्यास उत्सुक होतो. हा सुरतहून पाँडेचेरीला आला होता. पालखीत बसून लगेच मी त्याच्या भेटीस गेलो. तेथे त्याने माझे चांगले स्वागत केले. मी बरेच दिवस त्याच्याकडे राहिलो. युरोपला न जाता हिंदुस्थानातच लग्न करण्याचा त्याने मला सल्ला दिला. या बाबतीत हिंदुस्थानातच जन्मलेल्या एका स्त्रीचे नाव त्याने सुचविले. ती चांगल्या इंग्लिश कॅथलिक कुटुंबातील स्त्री होती. मद्रासला राहणाऱ्या या स्त्रीचे नाव इलिझाबेथ हार्टले असे होते. तिचे वडील ख्रिस्तोफर हार्टले हे मच्छलीपट्टणचे आणि आई डायना ज्युडो परेरा ही पोर्तुगीज बाई होती. इलिझाबेथ हार्टले हिचा पहिला नवरा थोमस क्लार्क हा मद्रास येथे न्यायाधीश होता. तो वारला होता. इलिझाबेथ हार्टले ही विधवा होती.

मी पाँडिचेरीहून मद्रासला आलो. इलिझाबेथ हार्टलेशी माझा विवाह झाला. (२८ ऑक्टोबर १६८६). या संबंधापासून मला एक मुलगा झाला. पण अल्पवयातच वारला. आम्ही फोर्ट सेंट जॉर्ज (मद्रास) मध्ये आमचे बिऱ्हाड कायम केले. वैद्यकीय उपचारासाठी माझ्याकडे अनेक लोक येत. त्यापैकी एकदा माझ्याकडे राजा चपत[2] (येथे दातियाचा राजा राव दलपत असे पाहिजे) हाही आला होता.

मी मद्रास येथे असताना मोगल सरदारांच्याकडून मला भेटी येत. अनेक मोगल सरदार माझ्याकडे उपचार करून घेण्यासाठी येत. मी मद्रासला स्थायिक झालो; म्हणून पुढील इतिहास लिहिण्यास अपुरेपणा राहिला असे नाही. कारण मोगल छावणीत मी माझे हेर ठेवले होते. त्याशिवाय मोगल सरदार माझ्याकडे मोगल छावणीतील घडामोडींच्या हकिकती वरचेवर लिहून पाठवीत असत.[3]

**विजापूरची फत्ते आणि आदिलशाहाची कैद :** विजापूरचे राजकारण सहजपणे निकालात काढणे औरंगजेबाला शक्य होईना. म्हणून त्याने प्रथम गोवळकोंड्याशी तह केला. यानंतर तो आपल्या सर्व सैन्यासहित विजापूर जिंकून घेण्यासाठी निघाला. मागे त्याने विजापूरचा प्रदेश हळूहळू काबीज करीत आणला होताच. विजापूरचा शेवटचा बादशहा सिकंदर आदिलशाहा याने विजापूरच्या किल्ल्यात आश्रय घेतला. किल्ल्यामध्ये अवघे १२ हजार सैन्य होते. औरंगजेबाने आपल्या

१. फ्रान्सिस्को फ्रँको मार्टिन — (जन्म १६३४ पॅरिस येथे) हा पाँडिचेरीला १७०६ मध्ये मरण पावला. सुरतेहून हा १६८६ त परत आला होता. तो मे २०,ला पाँडिचेरीस गेला होता. (मेमॉयर्स ऑफ फ्रँको मार्टिन १६६४–१६९४).

२. याचे खरे नाव दलपतराय असे होते. हा बुंदेलखंडातील दतियाचा राजा होता.

३. वरील घटना मनुचीने ऐकीव माहितीवरून दिल्या असल्यामुळे त्याच्या सत्यासत्यतेसंबंधी इतर विश्वसनीय पुराव्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

सर्व सैन्यासहित विजापूरला वेढा दिला. किल्ल्यातील रसद संपल्यामुळे विजापूर औरंगजेबाला हस्तगत झाले.

वेढा चालू असताना सिकंदर आदिलशाहाचे दुर्दैव ओढवले. औरंगजेबाच्या सैन्यात त्याचा मुलगा शाहा आलम एका मोर्चावर होता. त्याच्या मोर्चातून विजापूरच्या किल्ल्यामध्ये सोनी नाणी आणि रसद पाठविण्यात येत होती. ती औरंगजेबाचा सरदार शहाबुद्दिनखान[1] (निजाम उल्मुल्कचा बाप) याने पकडली. विजापूरचे राज्य नाहिसे व्हावे अशी शाहा आलमची इच्छा नव्हती. ही हकिकत औरंगजेबाला कळल्यावर त्याने विजापूरचा वेढा अधिक कडक केला. १६८६ मध्ये सिकंदर आदिलशाहा औरंगजेबाला शरण आला. त्याला छावणीत नजर कैदेत ठेवण्यात आले. याबरोबरच विजापूरचे राजघराणे संपुष्टात आले.

**गोवळकोंड्यावर स्वारी आणि शाहा आलमची कैद :** विजापूरवरील मोगलांच्या मोहिमांची सुरुवात १६७० मध्ये झाली. ती यावर्षी संपली. शस्त्रबळ आणि कपट यांचा वापर करून औरंगजेबाने विजापूरचे राज्य जिंकले. याचा त्याला आनंद झाला. विजापूरच्या बादशहापाशी पन्नास हजारांचे सैन्य होते. ही मोहीम पार पडल्यावर संभाजीचा नाश करण्याच्या मार्गातील आपला एक अडथळा दूर झाला असे औरंगजेबाला वाटले. आता एक काम राहिले. ते म्हणजे गोवळकोंडा जिंकून तेथील बादशहाला कैद करणे हे होय. थोड्याच दिवसापूर्वी औरंगजेबाच्या आज्ञेने शाहा आलमने गोवळकोंड्याच्या कुतुबशाहाशी तह केला होता. असे असूनही औरंगजेबाने गोवळकोंडा जिंकून घेण्याचे ठरविले. आपल्या उद्देशाच्या पूर्तीसाठी तो हवे ते करी. स्वतःचा वचनभंग किंवा दुसऱ्याचा विश्वासघात करणे याचे त्याला काहीच वाटत नसे. विजापूर जिंकून घेतल्यावर छावणी करून न राहता, तो गोवळकोंड्याच्या दिशेने स्वारी करून निघाला.

आपल्या बापाने, काही कारण नसता, स्वतःच्याच हुकुमाने, गोवळकोंड्याशी झालेला तह मोडावा, याबद्दल शाहा आलमला फार खेद वाटला. त्याने आपले हे मत औरंगजेबापाशी व्यक्त केले. तो म्हणाला, "मी तुमचा मुलगा आणि युवराज. मी कुतुबशाहाला आश्वासने दिली आहेत. आपल्यासारख्या श्रेष्ठ बादशाहाने वरील आश्वासनांची मुळीच पर्वा करू नये याचे लोकांना आश्चर्य वाटेल. आपण गोवळकोंड्याची मोहीम हाती घेऊ नये. कुतुबशहा हा अगदी असहाय्य आहे. संभाजीच्या विरुद्ध आपण जी मोहीम करणार आहात तीत आपल्याला तो काहीच अडथळा करू शकणार नाही."

---

१. शाहाबुद्दिन—हा मीर शाहाबुद्दिन असावा. याचे पहिले नाव शाहाबुद्दिनखान असे होते. १५ मोहरम १०९१ हि. (जानेवारी २, १६८०) ला त्याला गाझी-उद्दिनखान पदवी मिळाली. हा हैदराबादच्या निजाम उल्मुल्काचा बाप होय (मृत्यु १७४८) शाहा आलमने विजापूरला पाठविलेली रसद हस्तगत करण्यात आली ही घटना ऐतिहासिक आहे. (पाहा शाहनवाज तज्कीरत-उल्मुल्क)

गोवळकोंडा हातात घेण्याची वेळ आली असताना शाहा आलम त्या दिशेने मनःपूर्वक हालला नाही याचा औरंगजेबाला राग आला होता. विजापूरच्या आदिलशाहाकडे शाहा आलमने रसद पाठविली होती यामुळेही तो रागावला होता. औरंगजेबाला अशी शंका आली की, गोवळकोंड्याशी झालेला तह विनाकारण मोडल्याबद्दल न जाणो शाहा आलम हा गुप्तपणे कुतुबशहाला मदत करावयाचा आणि अशा रीतीने आपला सूड घ्यावयाचा. वरील कारणासाठी औरंगजेब बादशाहाने शाहा आलमला कैद करण्याचे ठरविले.

औरंगजेबाचा हा बेत काही जणांच्या तरी लक्षात आला असला पाहिजे. शाहा आलमचा मोठा मुलगा सुल्तान मुइझुद्दिन हा आपल्या आजोबाला (औरंगजेबाला) मारून सगळेच निकालात काढू इच्छित होता. मुइझुद्दिन हा एक दृढनिश्चयी तरुण होता. पण आपल्या बापाला कळल्याशिवाय तो काही करील हे शक्य नव्हते. तो आपल्या बापाला (शाहा आलमला) म्हणाला "माझ्या आजोबाने (औरंगजेबाने) आपले बंधू, आपला बाप किंवा आपला मुलगा (महम्मद) यांना सुद्धा सोडले नाही. तो गोवळकोंड्याच्या कुतुबशहाशी विश्वासघाताने वागत आहे. मग आपण तरी त्याला का सोडावे ? शाहा आलम हा सज्जन आणि कोवळ्या मनाचा होता. त्याने आपल्या मुलाला असा काही प्रयत्न करता कामा नये म्हणून बजावले. तो म्हणाला "भावी काळात आमचा दुर्लौकिक होईल असे काहीही जाहीर करण्याची माझी इच्छा नाही."

तो धूर्त कोल्हा–औरंगजेब–याने आपले बेत गुप्त ठेवले. त्याने सजविलेले हत्ती, भेटीच्या अनेक वस्तू, उंची वस्त्रे, शस्त्रे, घोडे इत्यादींचा मोठा थाटाचा सरंजाम तयार केला. त्याने अशी अफवा पसरविली की, "आपण उत्तर हिंदुस्थानात परत जात आहोत. आपल्या मागे आपण दक्षिणेचा सर्वाधिकार शाहा आलमकडे सोपवून जाऊ. मग त्याने गोवळकोंड्याच्या कुतुबशहाबरोबर आपल्याला हवे तसे धोरण आखावे. आपला मुलगा (शाहा आलम) याने उदासीन वृत्ती धारण केली आहे. त्याचे मन मोडू नये म्हणून आपण हे करीत आहोत. अनेक मोहिमांच्यामुळे आपण आता थकलो आहोत. आता आपणाला विश्रांती घ्यावयाची आहे. आता जे काही करावयाचे राहिले आहे ते आपल्या मुलांनी करावे."

बापाच्या या उद्‌गारांची माहिती शाहा आलमला मिळाली. आणि थोड्याच दिवसात यासंबंधीच्या दाट वदंता छावणीत पसरल्या. शाहा आलम खूष झाला. आपण खोल दरीच्या टोकावर उभे आहोत याची त्याला कल्पना नव्हती. सरंजामाची तयारी म्हणून सैन्याने एके ठिकाणी तळ दिला. एके दिवशी औरंगजेबाचे प्रमुख कारभारी शाहाबुद्दिन (निजाम उल्मुल्कचा बाप) खान आणि असदखान यांना औरंगजेबाने खलबतखान्यात बसून राहण्याची आज्ञा केली. शाहा आलम

खलबतखान्यात येताच त्याला निःशस्त्र करण्यात यावे अशा त्यांना सूचना देण्यात आल्या. यानंतर त्यांनी शाहा आलमला बोलावू पाठविले. शाहा आलमला मानाची वस्त्रे मिळतील, त्याला बढती देण्यात येईल अशी सर्वांची समजूत झाली.

याच समजुतीने राजपुत्र शाहा आलम मोठ्या आनंदात तेथे आला. त्याला आता असे वाटले की, गोवळकोंड्याशी झालेला तह चालू ठेवण्याची व दक्षिणेचा सुभेदार होण्याची आपली इच्छा आता पुरी होणार. तो बादशहाच्या तंबूत दाखल झाला. त्याला पाहून औरंगजेबाने आनंद वाटल्याचे सोंग करून, तत्काळ म्हटले "शाहा आलम बहादूर! तुम्ही खलबतखान्यात जा. तेथे माझे कारभारी आहेत पुढे काय करावयाचे याबद्दल त्यांच्याशी सल्लामसलत करा. ते तुमची वाट पहात आहेत." शाहा आलम खलबतखान्यात दाखल झाला त्या क्षणी शाहाबुद्दिनखान, असदखान आणि इतर मंत्री त्याला म्हणाले "तुम्ही आपली शस्त्रे स्वाधीन करावी, अशी बादशहाची आज्ञा आहे" प्रतिकार करणे निरर्थक आहे, हे शाहा आलमने पुरेपूर ओळखले. त्याने आपल्या कमरेची तलवार काढली. खंजीर काढला आणि ती शस्त्रे जमिनीवर टाकून दिली.

शाहा आलम खलबतखान्यात गेला, तेव्हा औरंगजेबाने शाहा आलमचा थोरला मुलगा सुलतान मुइजुद्दिन यास बोलावू पाठविले. मुइजुद्दिन मोठ्या आनंदाने आला. तो बादशहाच्या तंबूत दाखल होताच औरंगजेबाने त्याला घाईघाईने म्हटले "सुलतान मुइजुद्दिन! जवळच्या खोलीत जा बरे. तेथे तुझे वडील आणि मंत्री तुझी वाट पाहत आहेत. सल्लामसलतीने पुढे काय करावयाचे ते ठरवायचे आहे."

वीस वर्षांचा राजपुत्र, मोठ्या उत्साहाने सल्लामसलतीसाठी आत गेला. मंत्र्यांनी त्यालाही शस्त्रे स्वाधीन करण्यास सांगितली. पण तो तडफदार होता. तो सहजासहजी नमणे शक्य नव्हते. त्याने तलवार हातात घेतली आणि शाहा आलम काय आज्ञा करतो, हे पाहण्यासाठी त्याने त्याच्याकडे पाहिले. पण शाहा आलम हा शहाणा माणूस. तो म्हणाला "परिस्थिती आज्ञा करण्याच्या पलिकडे गेली आहे. तुम्ही कमरेची तलवार सोडा आणि शस्त्रे देऊन टाका. आपल्याला आज्ञेचे पालन करणे आवश्यक आहे." आत्यंतिक क्षोभाने मुइजुद्दिनच्या डोळ्यात पाणी आले. त्याने आपली शस्त्रे टाकून दिली.

औरंगजेबाने शाहा आलमचा दुसरा मुलगा सुलतान अजिमुद्दिन याला बोलावू पाठविले. त्याचीही तीच गत झाली. तोच प्रकार शाहा आलमचा तिसरा मुलगा सुलतान दौलत अफजा याच्या बाबतीत घडला. शाहा आलम आणि त्याची मुले यांना वेगवेगळ्या ठिकाणी कैद करून ठेवण्यात आले आणि त्यांच्यापाशी एक लहानसा चाकू सोडला तर कोणतेही शस्त्र बाळगू देण्यात आले नाही. असा प्रकार सात वर्षेपर्यंत चालू होता.

या बंदिवासात[1] असताना शाहा आलमचा तिसरा मुलगा दौलत अफजा हा मरण पावला.[2] शाहा आलमची आणखी दोन लहान मुले होती. त्यांची नावे फी-उल-कादर आणि खुजिस्ता-अख्तार अशी होती. त्या दोघांना एकेच ठिकाणी कैदेत ठेवण्यात आले. नंतर शाहा आलम व सुलतान मुइजुद्दिन यांच्या बायका व कुटुंबातील इतर स्त्रिया यांना आग्र्याच्या किल्ल्यात पाठविण्यात आले. शाहा आलमपाशी असलेली सगळी संपत्ती ताब्यात घेण्यात आली. या संपत्तीत गोवळकोंडा व विजापूरच्या शिक्क्यांची मुबलक नाणी होती.

शाहा आलमने आपण या बाबतीत अगदी निर्विकार आहोत असे भासविण्याचे ठरविले. कैद झाल्यावर पहारेकऱ्यांना तो म्हणाला "मी आपल्या वडिलांची आज्ञा मानतो. जे काही करण्यात आले त्याचा माझ्या मनावर काहीच परिणाम नाही." आपल्या मुलाचे हे शब्द औरंगजेबाच्या कानावर गेले. औरंगजेब हसला. त्याने शाहा आलमकडे अन्न पाठविले. शाहा आलम समाधानाने जेवला. पण कैदेमुळे होत असलेली विटंबना खिजगणतीत नाही असे त्याला दाखवायचे होते. पुढे पुढे त्या राजपुत्रांना पुरेसे अन्नही पाठविण्यात येईनासे झाले, त्यांच्याशी होत असलेली ही वागणूक अतिशय शोचनीय होती. ते राजपुत्र छावणीबरोबर प्रवास करीत. त्यांच्याबरोबर लवाजमा नसे. अंगावर अलंकार नसत. त्यांना हत्तीवर बंद अंबारीत बसविण्यात येत असे. साध्या कैद्याप्रमाणे त्यांना वागविले जाई. उदासीन आणि सुमुखलेले असे ते राजपुत्र म्हणजे चालत्या बोलत्या सावल्या वाटत.

हा बंदिवास जर कोणाला सर्वांत अधिक जाणवत असेल तर तो सुलतान मुइजुद्दिन याला होय. त्याची बंदिशाळा दरबारच्या स्थळाला लागून असे. औरंगजेब न्यायदानासाठी जेव्हा दरबार भरवी, तेव्हा मुइजुद्दिन आपल्या बंदिशाळेतून मोठ्याने आरडा ओरड करी. आपल्या आजोबाने आपल्यावर मोठा अन्याय केला आहे. त्याने कुराणाची वचनेही पाळली नाहीत किंवा माणुसकीही सांभाळली नाही, हे मुइजुद्दिनला दाखवायचे होते. मुइजुद्दिनचा औरंगजेबाला अशा रीतीने फार त्रास होऊ लागला. शेवटी त्याने त्याच्या कैदेची जागा दरबारच्या दिवाणखान्यापासून लांब नेली.

---

१. खाफी खान. (ii ३३२) राजपुत्रांच्या कैदेची घटना आमदानीच्या २९ व्या वर्षी १७ रबी II १०९७ हि. (१२ मार्च १६८६ ख्र.ग.) ला घडली असे देतो. पण, त्यातील कालगणना अधिक विश्वसनीय आहे त्या मासीरे-आलमगिरी ग्रंथाप्रमाणे, ही घटना आमदानीच्या ३० व्या वर्षी घडली असे धरावे लागेल. त्यातील पान २९३ वर, शाहा आलमच्या एका शिपायाला छावणीतून हाकलून देण्यात आले असे दिले आहे. पान २९९ वर, आमदानीचे ३० वे वर्ष सुरू झाले असे म्हटले आहे. (१ रमजान १०९८ हि.) अर्थात रबी १७ ला कैद झाली असली तर ती आमदानीच्या ३० व्या वर्षी म्हणजे १०९८ हि. (२१ मार्च १६८७) ला झाली असली पाहिजे.

२. दौलत अफजा सफरच्या शेवटच्या दिवशी मरण पावला. ११०० हि. (२४ डिसेंबर १६८८ ख्र.ग.) तो १९ वर्षे ७ महिने व काही दिवसांचा होता. (तारीख-महम्मद)

**गोवळकोंडा ताब्यात :** वरील घटना गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या कानावर गेल्या. आपण धोक्यात सापडलो आहोत हे त्याने ओळखले. आपला वकील पाठवून त्याने औरंगजेबाचे समाधान करण्याचा प्रयत्न केला. कुतुबशहाने औरंगजेबाला विनंती केली की "कृपा करून आपण माझ्याशी युद्ध करू नका. मी आपल्या आज्ञा पाळण्यास तयार आहे. मी स्वतःस बादशहा म्हणून न समजता आपल्या इतर सुभेदारांप्रमाणेच वागण्यास तयार आहे. गोवळकोंड्याचा कारभार मी सुभेदार म्हणूनच करीन." औरंगजेबाने कुतुबशहाला कळविले की "तुम्ही निश्चिंत रहा. तुमच्या राज्याला उपसर्ग होणार नाही. मी फक्त गुलबर्ग्याला जात आहे. तेथे बंदे नवाज आदि साधूंच्या समाध्या आहेत.[1] तेथे प्रार्थना करण्यासाठी म्हणून मी चाललो आहे."

कुतुबशहाला हे सर्व खरे वाटले. फकिरांच्या दर्ग्यांत गरीबांना वाटण्यासाठी त्याने औरंगजेबाकडे पाच लाख रुपये पाठवून दिले. औरंगजेबाने ते पैसे घेतले, पण गुलबर्ग्याकडे जाण्याऐवजी तो सरळ गोवळकोंड्यावर चाल करून आला. कुतुबशहा-पाशी तीस हजार घोडेस्वारांचे सैन्य होते. या सैन्यानिशी कुतुबशहा हा रणांगणावर उतरू शकला असता. तो मोगलांचे रस्ते रोखून धरू शकला असता आणि विजय मिळविण्यासाठी झटू शकला असता. पण कुतुबशहा इतका घाबरून गेला होता की, वरील पैकी काहीही न करता, तो गोवळकोंड्याच्या किल्ल्यात जाऊन बसला.

कुतुबशहाने माघार घेतली हे औरंगजेबाला कळले. शत्रु सापळ्यात सापडला याचा त्याला हर्ष झाला. कुतुबशहाने आपला बेत बदलण्यापूर्वी औरंगजेबाने शाहा-बुद्दिनखान याला तातडतोब गोवळकोंड्याच्या किल्ल्यावर चालून जाण्याचा हुकूम केला. शाहाबुद्दिनखानाच्या पाठोपाठ, औरंगजेबाचा दुसरा मुलगा आझमतारा हाही गोवळकोंड्याला वेढा देण्यास निघाला. औरंगजेबही त्याच्या मागोमाग सावकाशीने कूच करीत होता.

मोगलांनी किल्ल्यावर कडक वेढा घातला. किल्ल्यातील लोकांनी मोठ्या निकराने वेढा लढविला. मोगलांनी तटाखाली सुरुंग लावले व दोन बुरुज उडविले. त्यांनी किल्ल्यात घुसण्याकरिता निकराने चाल केली. पण अब्दुल रझ्झाकने किल्ल्याचे रक्षण इतक्या शर्थीने केले की, मोगलांना किल्ल्यात प्रवेश करता येईना. शेवटी मोगलांनी लाच आणि आश्वासने यांचा वापर करून कुतुबशहाच्या अधिकाऱ्यांना आणि सैनिक यांना फोडले. किल्ल्यात फारच थोडी शिबंदी राहिली होती. मोगलांनी किल्ल्यात प्रवेश मिळविला. अब्दुल रझ्झाक बरोबर असलेले लहानसे सैन्य गारद झाले. स्वतः अब्दुल रझ्झाक याला निकराने लढत असता जखमा झाल्या व तो खाली पडला. त्याचे सैनिक पळून गेले. शाहाबुद्दिनखान हा राजवाड्यावर गेला

१. गुलबर्ग्यातील समाध्या: बंदे नवाझ, कमरुद्दिन आणि सिराजुद्दिन या साधूंच्या आहेत.

आणि त्याने कुतुबशाहाला वाड्यातून बाहेर काढले. कुतुबशाहाला दौलताबादेच्या किल्ल्यात ठेवण्यात यावे अशी औरंगजेबाने आज्ञा केली.[1] गोवळकोंड्याचा किल्ला मोगलांच्या ताब्यात आला. (१ ऑक्टोबर १६८७). अशा रीतीने गोवळकोंड्याचे राजघराणे संपुष्टात आले. औरंगजेबाने कुतुबशाहाच्या दोन मुलींची लग्ने आपल्या अधिकाऱ्यांच्या बरोबर लावून दिली.

विजापूर आणि गोवळकोंडे ही दोन राज्ये जिंकून घेतली, याचा औरंगजेबाला गर्व झाला. त्याने विजापूर आणि गोवळकोंडे येथे सुभेदार नेमले. संभाजीविरुद्ध मोहीम उघडण्याचे त्याने यानंतर हुकूम सोडले. आता संभाजीचे राज्य मोगल इलाख्यांनी वेढले गेले होते. यामुळे संभाजीचा नाश करणे सहज शक्य होईल अशी औरंगजेबाची कल्पना झाली.

औरंगजेब गोवळकोंड्याहून परत फिरला. त्याच्या बरोबर, कैदेत असलेला त्याचा मुलगा आणि नातू आणि विजापूरचा माजी बादशहा, हे होते. वाटेत त्याने गोवळकोंड्याचा माजी सरसेनापती महम्मद इब्राहिम याची लाहोरचा सुभेदार म्हणून नेमणूक केली आणि त्याला लाहोरकडे पाठविले. महम्मद इब्राहिमने कुतुबशाहाशी राजद्रोह केला होता. त्याचा मोबदला औरंगजेबाने लाहोरच्या सुभेदारीवर त्याची नेमणूक करून दिल्याचे दाखविले. सामान्य अनुभव असा की, राजे लोक शत्रुपक्षातील लोकांना फोडून आपल्याकडे आणतात खरे. पण आपले काम झाल्यावर अशा फितुरांना जवळ ठेवण्यात आनंद वाटत नाही. औरंगजेबाला, ज्या ज्या फितुरांनी त्याच्या कामात मदत केली त्यांचा सोक घेण्याचीच सवयच होती. मग महम्मद इब्राहिम त्याला अपवाद कसा ठरू शकेल ? तो लाहोरला आपल्या जागेवर हजर होण्यापूर्वी विषप्रयोगाने मृत्यू पावला[2]. अशाच प्रकारे त्याने विजापूर व गोवळकोंड्याचे काही अधिकारी मारले, तर कांहींना लांब लांब ठिकाणी पाठवून दिले. विजापूर आणि गोवळकोंडा या दोन राज्यांच्या फौजा बरखास्त करण्यात आल्या. औरंगजेबाच्या या कृत्यामुळे त्याचे मुख्य उद्देश परमेश्वराने असफल केले. विजापूर आणि गोवळकोंडा या राज्यांची सैन्ये बरखास्त केल्यामुळे आपल्या पुढील मोहिमा सहजीने यशस्वी होतील असे औरंगजेबाला वाटले. पण औरंगजेबाच्या या धोरणामुळे संभाजीचे बळ अधिकच वाढले. बरखास्त सैनिकांना नोकरीवर घेण्याइतके

१. कुतुबशाहा—१८ फेब्रुवारी १६८८ला औरंगजेब विजापूरला परत आल्यानंतर गोवळकोंड्याचा बादशहा अबुल हसन कुतुबशाहा याला दौलताबादेच्या किल्ल्यात पाठविण्यात आले. (मासीरि-आलमगिरी ३०९)

२. महम्मद इब्राहिम—महाबतखान पदवी असलेला, महम्मद इब्राहिम हा एक श्रेष्ठ आलमगिरी सरदार होता. हा लाहोरचा सुभेदार असताना ११०० हि. (१६८८–८९) ला मरण पावला. पूर्वी तो गोवळकोंड्याच्या कुतुबशाहाकडे (अबुल हसन) सेनापती होता. त्याला खलीलुल्लाखान ही पण पदवी होती. (मासीरि-उल-उमरा iii ६२७)

संभाजीपाशी द्रव्य नव्हते. पण विजापूर आणि गोवळकोंडा राज्यातील जे जे लोक त्याच्याकडे गेले त्यांना त्याने आपल्या पदरी बाळगले. फक्त पगाराच्या ऐवजी तो यांना चहुकडे (मोगल इलाख्यात) लुटालूट करण्याची मुभा देऊ लागला.

अशा रीतीने संभाजीला काही अपाय करू शकण्यापूर्वीच, औरंगजेबाचेच फार नुकसान झाले. संभाजीचे हे सैनिक औरंगजेबाच्या छावणीकरिता जाणारी रसद तोडून टाकीत. प्रतिकार करणारांना ठार मारीत. उंट, घोडे, खेचरे धरून नेत. युद्धात उपयुक्त असलेले घोडे धरून आपल्याजवळ बाळगीत. एखादा मोगल सरदार त्यांच्या हाती सापडला तर ते त्याला ओलीस धरीत आणि जबर खंडणी घेऊनच त्याला सोडीत. लुटीची मालमत्ता इतकी त्यांच्या हाती येई की तिचा ते बाजार भरवीत आणि मालमत्तेचे मालक पैसा भरून ती सोडवून घेत. अशा रीतीने या लोकांना (मराठ्यांना) पैसा मिळे आणि मोहीम चालविणे शक्य होई.

प्रचंड सैन्य पदरी असूनही केवळ शस्त्रबळाने आपली मोहीम सफल होत नाही हे औरंगजेबाला आढळून आले. याला कारण संभाजीची युद्धनीती होय. तो मोगलांशी मैदानात समोरासमोर लढा देण्याचे सतत टाळी. मोगल प्रदेशात तो सर्वत्र लुटालूट करी. एकाच ठिकाणी तो फार दिवस थांबत नसे. त्याचे घोडदळ मोठे चपळ आणि काटक होते. लांबलांब मजला मारण्याची त्याला सवय झाली होती. या सर्वांना खाण्यापिण्यास थोडे लागे. या घोडदळाच्या योगे संभाजीने मोगल सेनापती आणि शिपायी यांची श्रेधा उडविली आणि त्यांना जेरीस आणले. संभाजीविरुद्ध यश मिळविण्यास कारस्थानांचाच उपयोग केला पाहिजे असे औरंगजेबास वाटू लागले. त्याने संभाजीचा मुख्य कारभारी कवि कलश याला पत्र लिहिले. त्याला त्याने मूल्यवान भेटी आणि भक्कम रकमा पाठविल्या. याचा परिणाम असा झाला की, संभाजीला जीवंत पकडून देण्याचे कवि कलशने आपल्या अंगावर घेतले.

**संभाजीची कैद :** असे म्हणतात की, सवयी जडल्या की त्या सुटत नाहीत. तोच स्वभाव बनतो. मनुष्य एकदा व्यसनाला चटावला की सुटू म्हटले तरी ते सुटत नाही संभाजीची अवस्था अशीच झाली. दुसऱ्यांच्या स्त्रियांशी संबंध ठेवण्याची त्याला सवय होती. यामुळे पराक्रम गाजविण्याची संधी प्राप्त झाली असताही, त्याला वरील विकृत प्रवृत्तीतून आपली सुटका करून घेता येईना. आणि त्यामुळे त्याला आपले स्वातंत्र्य व प्राण हे गमवावे लागले. कवि कलशने संभाजीच्या या व्यसनाचा त्याला पकडून औरंगजेबाच्या हातात देण्याकडे उपयोग करून घेतला.

"सुमारे पाच मैलावर एका खेड्यात एक सुंदर विवाहीत स्त्री आहे." असे कवि कलशने संभाजीस सांगितले. झाले संभाजीने आपला अपवित्र हेतू साध्य करून

घेण्यासाठी त्या गावात मुक्काम करण्याचे ठरविले.[१] संभाजीचा हा निश्चय कवि कलुषला कळताच त्याने औरंगजेबाला पुढीलप्रमाणे इशारा दिला. "तुम्ही आपले पाच हजार स्वार तातडीने पाठवा. संभाजी निश्चितपणे तुमच्या तावडीत सापडेल." त्याप्रमाणे औरंगजेबाने केले. संभाजीने आपले सैन्य मागे ठेवले आणि थोडी माणसे बरोबर घेऊन तो वरील गावाकडे निघाला. तेथे पोहचण्यापूर्वीच मोगल सैन्याने त्याला वेढले आणि त्याला घेऊन ते औरंगजेबाच्या छावणीत गेले[२].

**संभाजीचा मृत्यु :** आपल्यासाठी झटणाऱ्यांना औरंगजेब काय बक्षिसी देत असे हे आता वाचकांनी ऐकावे. संभाजीला पकडून दिल्याबद्दल पहिली बक्षिसी कवि कलुषला मिळाली. त्याला अतिशय निर्घृणपद्धतीने ठार मारण्यात आले. मी (मनुची) मागे अनेक उदाहरणे दिली त्यावरून हा रक्तपिपासू औरंगजेब किती रानटी होता याची कल्पना येईल. कवि कलुषची जीभ मुळापासून उपटून काढण्यात यावी अशी औरंगजेबाने आज्ञा केली. हेतु असा की, आपण ही फितुरी औरंगजेबाच्या सांगण्या-वरून केली हे कवी कलुषला सांगता येऊ नये.

कब्जी कलुषा (कवि कलश) विरुद्ध काही औरंगजेबाने युद्ध पुकारले नव्हते. आपल्या या कारभाऱ्याचा असा शोचनीय शेवट झाला हे पाहून संभाजीने कशाची आशा बाळगावी? आपला मृत्यू अटळ आहे, हे त्याने जाणले. पण मृत्युपूर्वी आपली इतकी भयंकर दैना करण्यात येईल याची त्याला कल्पना नव्हती. संभाजीला उंटावर बसविण्यात आले, त्याला दोराने घट्ट बांधण्यात आले, त्याच्या डोक्यावर विदुषकी पद्धतीची उंच टोपी ठेवण्यात आली. टोपीला घुंगुर व खुळखुळे लावलेले होते. हिंदुराजे आणि ब्राह्मण हे सामान्यपणे उंच टोप्या वापरतात. पण त्यांना घुंगुर व खुळखुळे नसतात. संभाजीला अशी विदुषकी टोपी घालण्यात औरंगजेबाचा हेतु हिंदुराजे आणि ब्राह्मण यांची हेटाळणी करणे हा होता. यानंतर औरंगजेबाने छावणी-मधून त्या व्यसनी माणसाची—संभाजीची धिंड काढण्याची आज्ञा केली. उंटाला पळविण्यात येत असे. घुंगुर व खुळखुळे यांचा आवाज होई. त्यामुळे लोक कुतूह-लाने आपल्या तंबूच्या बाहेर येत. धिंड चालू असताना उंटाला मधून मधून एकदम पळविण्यात येई. त्यामुळे संभाजी पडतो की काय असे वाटे. पण दोरांनी बांधल्या-मुळे तो पडला नाही. तरी त्याला शारीरिक कष्ट होत. छावणीतील धिंड संपल्यावर त्या पीडक बादशहाने संभाजीला आपल्यासमोर आणण्याची आज्ञा केली. तेथे संभाजीचे शरीर एका कुऱ्हाडीने फोडून त्याचे हृदय बाहेर काढण्याची आज्ञा केली. ते झाल्यानंतर त्याचे शरीर उकिरड्यावर फेकून देण्यात आले. कोल्ह्या-कुत्र्यांनी

१. ऑर्म (ऐतिहासिक वृत्तांत १८०५ आ.पा. १६२, १६३) हा या वृत्तांताची निश्चिती देतो. पण बहुत करून तो मनुच्या (म्हणजेच मनुचीकडूनच) माहितीची नक्कल करत आहे.

२. या वेळी मनुची महाराष्ट्रात होता. त्याने दिलेली वरील माहिती ऐकीव असल्यामुळे विश्वसनीय वाटत नाही.

त्याचा निकाल लावावा हा हेतू होता. अशा रीतीने परस्त्री समागमाला चटावलेल्या संभाजीचा शेवट झाला.[1]

संभाजीचा मृत्यु झाला. आता हिंदुस्तानात औरंगजेबाचे आसेतुहिमाचल प्रभुत्व स्थापन झाले असेच कोणालाही वाटले असते. पण वस्तुस्थिती तशी नव्हती. दुर्दैवी संभाजीचा प्रतापी बाप शिवाजी याचे अनेक सेनापती होते. मोगलांशी लढण्याचा त्यांना आतापर्यंत चांगलाच सराव झाला होता. औरंगजेबाचा पक्ष सोडून जाणाऱ्या परकी (इराणी आणि मध्य आशियातील लोक) लोकांशी कसे दळणवळण ठेवावे या बाबतीतही ते तरबेज झाले होते. संभाजीचा धाकटा भाऊ रामराजा (राजाराम) याला उचलून धरावयाचे आणि मोगलाविरुद्ध लढा चालू ठेवावयाचा असा मराठे सरदारांनी निश्चय केला. त्यांनी रामराजावरील निर्बंध दूर केले आणि त्याला आपला राजा म्हणून जाहीर केले. मराठे सरदारांच्या या निर्णयाने मराठी राज्यात मोठा बदल घडून आला. संभाजीच्या पत्नीने (येसूबाई) आपली मुले लहान आहेत तर त्यांच्यातर्फे राज्य करण्याचा अधिकार आपणास मिळावा अशी मागणी केली. राज्याचा अधिकार माझ्या मुलांचा आहे, आणि राज्य त्यांना मिळाले पाहिजे असा तिने (येसुबाईने) दावा केला. पण मराठे सरदारांनी तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. त्यांनी रामराजाचा पक्ष उचलला. यामुळे राणीला (येसुबाईला) मोगलांकडे वळणे भाग पडले. ती आणि तिची मुले ही मोगलांच्या आश्रयाला आली. तिने (येसुबाईने) मोगलांना बावीस किल्ल्यांच्या सोडचिठ्ठ्या दिल्या. तिने अशा रीतीने आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा (रामराजा आणि त्याचे पाठीराखे मराठे सरदार) यांचा जोर मोडला[2].

१. संभाजीच्या कैदेची (आमदानीचे ३२ वे वर्ष ११०० हि.) मासीरे-आलमगिरीमध्ये पा. ३२० वर दिलेली हकीकत अशी—"मोगल सेनापती मकर्रबखान याची नेमणूक पन्हाळ्याविरुद्ध करण्यात आली होती. त्याने असे ऐकले की, संभाजी बंड करणाऱ्या बैराग्यांच्यावर हल्ला करण्यासाठी, रायरीहून खेळणा किल्ल्यावर जात आहे. संभाजी संगमनेर (संगमेश्वरला) होता. ४५ कोसांवर असलेल्या कोलापूरहून (कोल्हापूरहून) खान तडक निघाला. संभाजीला याची जाणीव करून देण्यात आली होती. पण त्याने ती गोष्ट झिडकारून टाकली. नंतर लढाई झाली. तीत बाणाने कब्जी कलषा जखमी झाला आणि पकडला गेला. संभाजी कब्जीच्या घरी लपून बसला. तेथे त्याला पकडण्यात आले. संभाजीच्या कैदेची बातमी औरंगजेबाला अकलूज (या गावाचे नाव असदनगर असे ठेवण्यात आले.) येथे देण्यात आली.

ओर्मे, आपल्या "ऐतिहासिक त्रुटित" (१८०५ ची आवृत्ति) यात संभाजीला उंटावर बांधण्यात आल्यासंबंधी व त्याची (संभाजीची) सबंध छावणीभर, ढोलके व घंटा वाजवून धिंड काढल्याचे सांगतो परंतु हा उल्लेख, त्याने काफ्राद्वारे, म्हणजे मनूचीकडून मिळालेल्या माहितीवरून केला असावा.

मासीरे-आलमगिरी (पा ३२०–२६) प्रमाणे संभाजीला आमदानीचे ३२ वे वर्ष ११०० हि. (डिसेंबर २८, १६८८ न.प.) ला कैद करण्यात आले. त्याला बादशहाच्या छावणीत ३ मार्च १६८९ला आणण्यात आले आणि मार्च १४ अथवा २१ रोजी त्याचा शिरच्छेद करण्यात आला.

२. येसुबाईच्या मुत्सद्देगिरीची मनूचीला कल्पना आलेली दिसत नाही.

१६८९ मध्ये हे युद्ध (मोगल आणि मराठे यांचे) पुनः सुरू झाले आणि तेही अधिक निकराने. विजापूर आणि गोवळकोंडा ही दोन राज्ये औरंगजेबाने जिंकून घेतली होती तितक्याने औरंगजेबाचे समाधान झाले नाही. राजारामासारख्या एका लहान राजाविरुद्ध त्याने आक्रमण केले. पण राजारामाने औरंगजेबाशी दृढपणे सामना दिला. त्यामुळे औरंगजेबाला आपले राज्य वाचविण्यासाठी म्हणून आपल्या राजधानीपासून लांब सतत छावणी करीत राहावे लागले.

येसुबाईच्या बाजूला बरेच मराठे सरदार होते त्यामुळे औरंगजेबाच्या मनाप्रमाणे हा प्रश्न सुटेल असे कोणालाही वाटले असते. औरंगजेबाने येसुबाईला आपल्या छावणीत ठेवली आणि तिने सोडचिठ्ठी दिलेले किल्ले ताब्यात घेण्यासाठी सैन्य पाठविले. पन्हाळगड जिंकून घेण्यासाठी त्याने बरेच मोठे सैन्य पाठविले. पन्हाळगड किल्ला हा अतिशय मजबूत असून उंच डोंगरावर आहे, मागे[1] एकदा सुलतान मुइजुद्दिन[2] याने पन्हाळगडावर हल्ला केला होता. पण किल्ल्यातील शिबंदीच्या शौर्यापुढे त्याला नामुष्कीने माघार घ्यावी लागली. शत्रू त्याच्या पाठीशी सतत लागल्यामुळे, त्या भीतीमुळे तो विश्रांती न घेता सतत २४ तास पळत होता.

मोगल सैन्य पन्हाळ्यावर चाल करून गेले. पण राजाराम आणि त्याचे सेनापती चहुकडे सतत संचार करीत होते आणि आपल्या मोहिमांमध्ये यशस्वी होत होते. शेवटी मोगल सैन्य इतस्ततः पसरलेले आहे हे पाहून राजाराम हा कर्नाटकात जिंजी येथे आला आणि तेथे त्याने आपली राजधानी कायम केली. त्याचे सरदार, सेनापती हे निकराने लढाया करीत होते.

संभाजी मृत्यु पावला होता. त्याची बायका-मुले औरंगजेबाच्या ताब्यात आली होती. हे पाहून त्याला वाटले की, आता मोठ्या सेनापतीची आपणास आवश्यकता नाही. म्हणून त्याने शहाबुद्दिनला बोलावणे पाठविले. त्यावेळी शहाबुद्दिन हा मराठ्यांच्यावरील मोहिमेत गुंतला होता. शहाबुद्दिन हा मोठ्या दर्जावर पोहचला होता. तो आपल्या सैनिकांना व अधिकाऱ्यांना प्रिय असलेला सेनापती होता. त्याने औरंगजेबाला असे लिहून कळविले की "अधोनीचा[3] किल्ला जिंकून घेण्यासाठी मला किल्ल्यासमोर हजर राहणे आवश्यक आहे." शहाबुद्दिन आपल्याविरुद्ध काही कारस्थान करण्याच्या उद्योगात आहे, अशी औरंगजेबाला भीती वाटली. त्याने शहाबुद्दिनला दरबारात हजर राहण्यासाठी दोन तीन पत्रे पाठविली. पण या पत्रांनाही शहाबुद्दिनने काही निमित्त दाखवून, आपण येऊ शकत नाही असे

१. खरे पाहाता हा वेढा नोव्हेंबर १६९२ ते मार्च १६९४ पर्यंत चालला होता.

२. औरंगजेबाचा नातू आणि शहा आलमचा मुलगा.

३. अधोनी तालुका आंध्र प्रदेशातील कर्नूल जिल्ह्यात, तुंगभद्रेच्या दक्षिणेस आहे. शहाबुद्दिनने अधोनी किल्ला ७ ऑगस्ट १६८८ रोजी जिंकून घेतला.

कळविले. शेवटी औरंगजेबाने शहाबुद्दिनला पत्र पाठवून ताबडतोब निघून आलेच पाहिजे अशी कडक आज्ञा केली. पत्र वाचून शहाबुद्दिनच्या डोळ्यातून रक्त वाहू लागले. यामुळे तो आंधळा झाला. आता औरंगजेबाला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला होता. त्याला शहाबुद्दिनची गरज भासू लागली होती. कारण पन्हाळगड आपल्या हाती येईल असे तो धरून चालला होता. पण मराठ्यांनी या बाबतीत फार फसवणूक केली होती. औरंगजेबाने हकीम वगैरे पाठवून शहाबुद्दिनच्या रोगावर इलाज करण्याचा प्रयत्न केला. परंतु वेळ निघून गेली होती. शहाबुद्दिनला अंधत्व आले ते कायमचे. यामुळे तो आयुष्यात पुढे मोठमोठी कामे करू शकला नाही[1].

औरंगजेबाचा संपूर्ण विश्वास संपादन केलेला कोणीही अधिकारी माझ्या (मनुची) माहितीत नाही. असदखान (मुख्य प्रधान) हा त्यातल्या त्यात औरंगजेबाचा विश्वासू दिसतो. तो शहाजहानचा एक एकनिष्ठ सेवक होता. तो औरंगजेबाचीही त्याच निष्ठेने सेवा करीत आहे. आजपर्यंत तरी असदखानाचा उत्कर्षच होत आहे. पण याबाबतीत निर्णय त्याच्या (असदखानाच्या) मृत्युनंतरच घेता येईल. जर असदखानाचा मृत्यु सुखाने आणि शांतपणे झाला तर औरंगजेबाच्या राजवटीतील ही एक दुर्मिळ बाबच म्हणावी लागेल.

**राजाराम जिंजीला जातो. औरंगजेबाच्या फौजा जिंजीला वेढा घालतात :** राजाराम हा जिंजीकडे[2] रवाना झाला होता. त्याने बळ वाढण्यापूर्वी त्याला जिंजीतून बाहेर पडू देऊ नये. त्या किल्ल्याला वेढा घालून राजारामाचा तिथेच निकाल लावावा या हेतूने औरंगजेबाने कर्नाटकात सैन्य पाठविले. सैन्याचे नेतृत्व असदखानाचा मुलगा झुल्फिकारखान याजकडे होते. त्याच्याबरोबर इतर सेनापतीही देण्यात आले. जिंजीच्या किल्ल्यात रसदेची व्यवस्था उत्तम असल्यामुळे झुल्फिकारखानाला किल्ला घेता येईना. त्याने औरंगजेबाला वृत्तांत कळवून अधिक सैन्याची मागणी केली. यावरून औरंगजेबाने आपला धाकटा मुलगा कामबक्ष[3] आणि असदखान यांना जिंजीकडे पाठविले.

जिंजीचा किल्ला जवळ जवळ सर झाला होता. पण वेढा घालणाऱ्या मोगल सैन्याला वाटले की ही मोहीम एकदा आटोपली की मोगल सैनिक आणि अधिकारी

१. ही हकीकत विश्वसनीय नाही. शहाबुद्दिन फिरोजजंग याला विजापूर येथे १६८८ मध्ये प्लेगच्या साथीत अंधत्व आले. पण पुढे मरेपर्यंतही तो मोठमोठ्या कामावर राहिला.

२. जिंजी—मद्रासच्या नैऋत्येस ८२ मैलांवर आहे.

३. कामबक्षला, रमजान ९, ११०२ हि. जलूसाचे ३५ वे वर्ष-जून ६, १६९१ न.प.ला जिंजीकडे पाठविण्यात आले. तो २० शव्वाल ११०४ (जून २५, १६९३ न.प.) ला जिंजीहून दरबारला परत आला (मासीरे-आलमगिरी ३३९, ३५९).

हे बेरोजगार होतील. यासाठी त्यांनी थंदता अशी उठविली की, राजपुत्र कामबक्ष याचे राजारामाबरोबर अंतस्थ सूत्र असून तो आपल्या बापाला सोडून मराठ्यांना जाऊन मिळण्याच्या विचारात आहे. अजून दोन दिवसांनीच किल्ला मोगलांच्या हाती पडणारच होता. पण तेवढ्यात असदखानाने कामबक्षला कैद करून औरंगजेबाकडे नेले. आपला मुलगा खरोखरीच बंड करणार होता अशी औरंगजेबाची समजूत झाली. यामुळे तो कष्टी झाला. पण कामबक्ष हा त्याचा सर्वांत धाकटा मुलगा आणि त्याची लाडकी राणी उदेपुरीच्या पोटी झालेला. यामुळे औरंगजेबाने कामबक्षविरुद्ध नाराजी दाखविली नाही. आपल्या हेतूंना विरोध करणारांना औरंगजेब कधीच क्षमा करीत नसे, हे मी आतापर्यंत लिहिलेल्या मजकुरावरून वाचकांना माहीत झाले असेल. कामबक्षाच्या बाबतीत औरंगजेबाने काही केले नाही, हे पाहून वाचकांना आश्चर्य वाटणे साहजिक आहे.[1]

झुल्फिकारखान हा आजपर्यंत कर्नाटकाचा सुभेदार म्हणून काम करीत आहे. पण त्याने जिंजी काही घेतली नाही. आठ वर्षे झाली तरी जिंजीचे स्थळ हस्तगत केले नाही म्हणून औरंगजेबाने रागावून झुल्फिकारखानाला पत्रावर पत्रे लिहिली. यावरून झुल्फिकारखानाने अशी व्यवस्था केली की, किल्ला तर हाती यावा पण राजारामने किल्ल्यातून निसटून जावे[2]. औरंगजेबाच्या आज्ञेचे त्याच्या सेनापतींनी पालन केले असते तर जिंजीची मोहीम मोगलांनी कधीच संपविली असती. औरंगजेबापाशी भक्कम खजिना होता. त्याचे सैन्यही प्रचंड होते. तो याहूनही अधिक खिजना मिळवू शकला असता. राजारामाचे बळ संभाजीहूनही अधिक वाढले असले तरी त्याचा नाश करणे सहज शक्य आहे. परंतु मराठ्यांच्या विरुद्ध मोहिमा निकालात काढणे हे औरंगजेबाच्या अधिकाऱ्यांच्या स्वार्थाच्या विरोधी आहे. औरंगजेबाच्या मुलांच्याही महत्त्वाकांक्षा पाहता राजारामाचा पूर्ण पाडाव होणे हे त्यांना सोयीचे वाटत नाही.

औरंगजेबाच्या मुलांना हे ठाऊक आहे की, राज्य मिळविण्याकरिता आपल्याला परस्परात लढणे आवश्यक आहे. यामुळे राजारामाचा पूर्ण पाडाव व्हावा अशी त्यांची इच्छा नाही. योग्य वेळेला आपला बेत (मोगल सिंहासन हस्तगत करण्याचे)

१. झुल्फिकारखान हा कामबक्षाच्या कैदेच्या वेळी फार क्रूरपणे वागला. त्याने 'शितकेचा पोर' म्हणून त्याला (कामबक्षला) हिणविले. त्याच्या थोबाडीत मारल्या आणि त्याला बेड्या ठोकल्या. (वाक्यात्मान तामकीर-उल-उमरा-उलमुल्क इंडिया ऑफिस प्रभाकर फॉलिओ ११९७). कामबक्षला (१६९२-९३) कैद करण्यात आले तेव्हा एक नाणकर्ण उद्गारला "क्षमेत जो आनंद आहे तो दंड करण्यात नाही" आणि औरंगजेबाने त्याची दखल घेऊन आपल्या मुलाला शिक्षा केली नाही

२. ग्रँट डफ (१७१) म्हणतो—किल्ल्याच्या भिंतीवर चढून जिंजी जानेवारी १६९८ त घेण्यात आले. राजाराम मोगल फौजेतून डिसेंबर १६९७ त पळून गेला.

पार पाडू शकू अशी त्यांना आशा वाटते. राजाराम शिल्लक राहावा असे औरंगजेबाच्या मुलांपैकी त्यांना वाटते, त्यामध्ये राजपुत्र आज्जम हा प्रमुख होय. हे मी (मनुची) खात्रीच्या माहितीवरून सांगू शकतो. कोणी सांगावे हे पुस्तक मी लिहून संपविण्यापूर्वी हे युद्ध (मोगल-मराठ्यांचे) संपेल आणि औरंगजेब नाहीसा झाला असे नोंदविण्याची माझ्यावर पाळी येईल.

माझ्या या पुस्तकाच्या तिसऱ्या भागात हिंदुस्तानातील सेनापती आणि लष्करी अधिकारी कसे वागतात याची मी (मनुची) चर्चा करणार आहे. त्यांची दृष्टी केवळ स्वार्थावर असते. सामान्यपणे बादशाही आज्ञांना ते भीक घालीत नाहीत. आज्ञा पालन केले नाही तर आपण उघडपणे द्रोही ठरू असे जेव्हा त्यांना दिसून येते तेव्हाच ते बादशहाच्या आज्ञेप्रमाणे वागतात.

**राजपुत्र शाहाआलमची व त्याच्या मुलांची सुटका :** औरंगजेबाची मराठ्यांच्या विरुद्ध मोहिम चालूच होती. पण या मोहिमेत औरंगजेबाचा पवित्रा आक्रमक म्हणण्यापेक्षा बचावाचाच अधिक होता. राजारामाने आपल्या बापाची (शिवाजीची) युद्धनीतीच अमलात आणली. तो उघड्या मैदानात मोगल सैन्याशी गाठ घेण्याचे टाळी. त्या ऐवजी तो चहूकडे मोहिमा काढून लूटमार आणि धामधूम उडवून देई. औरंगजेबाच्या सैन्याला तो क्षणाचीही विश्रांती मिळू देत नसे. मराठे अमक्या अमक्या भागात धुमाकूळ घालीत आहेत असे कळले की, मोगल अधिकारी सैन्य घेऊन त्या दिशेने धावत पण ते पूर्वेच्या दिशेने चालून गेले की मराठे एकाएकी पश्चिमेकडे गोळा होत. मराठ्यांनी न चुकता ही पद्धत चालू ठेवली.

याच सुमारास बंगाल प्रांतात शोभासिंगाचे बंड झाले.[1] बंडखोर, बंगालचे प्रमुख शहर राजमहालपर्यंत येऊन ठेपले. यामुळे औरंगजेबाने बंडखोराविरुद्ध सैन्य पाठविले. पण या फौजेची दुर्दशा झाली. वरील कारणामुळे औरंगजेबाने आपला मोठा मुलगा शाहाआलम आणि त्याचे कुटुंबिय यांना बंधमुक्त करण्याचे ठरविले. या सुमारास असा निर्णय घेण्यास औरंगजेबास आणखी एक कारण घडले. त्याला पुढीलप्रमाणे बातमी कळली. "इराणचा बादशहा सुलतान सुलेमान (१६६७–१६९४) याने राजपुत्र अकबर (औरंगजेबाचा मुलगा) याला सोन्याचा मुकुट दिला आहे. मोगल राज्यावर तुझा जो दावा आहे, त्याला माझा पाठिंबा आहे. असे सुलेमानाने अकबरला वचन दिले आहे. तुझा बाप जो औरंगजेब, त्याच्या विरुद्ध आपण तुझी बाजू घेऊ असे आश्वासन सुलेमानाने अकबरला दिले आहे."

ही बातमी औरंगजेबाला कळली. राजपुत्र अकबर याचा धाडशी स्वभाव त्याला माहीत होता. आपला मोठा मुलगा शाहाआलम याच्या बरोबर मोठे सैन्य देऊन

1. बरद्वान जिल्ह्यातील चेतवा आणि बरद्दा येथील जमीनदार शोभासिंग याने बंड केले ११०७ हि. (१६९५–९६).

त्याला उत्तरेच्या सीमांचे रक्षण करण्यासाठी पाठविण्याचे औरंगजेबाने ठरविले. बंगालमधील बंड मोडून काढण्यासाठी त्याने शाहाआलमचा दुसरा मुलगा अजिमुद्दिन-(अजिमुश्शान) यास पाठविण्याचे ठरविले. यामुळे अनायासे शाहाआलम आणि त्याचा मुलगा हे एकत्र राहू शकत नव्हते. शाहाआलमला एका शुक्रवारी बंधमुक्त करण्यात आले[1]. (३० मे १६९४).

**आग्र्याजवळील शेतकऱ्यांनी अकबर बादशहाची हाडे जाळली :** आग्र्याच्या परिसरातील शेतकऱ्यांच्या बंडाचे उल्लेख मी (मनुची) यापूर्वी केले आहेत. पण १६९१ मध्ये त्यांनी केलेले धाडस कमालीचे होते. औरंगजेब दक्षिणेत गुंतला आहे हे पाहून त्यांनी पुनः बंड केले. आपण औरंगजेबाची शक्ती, त्याचे सुभेदार यांची पर्वा करीत नाही हे त्यांनी दाखवून दिले. मोगल सुभेदार आणि फौजदार शेतसाऱ्यासाठी सतत तगादा करीत त्यामुळे चिडून जाऊन हजारो शेतकरी एकत्र झाले आणि ते अकबर बादशहाच्या दर्ग्यावर (कबरीवरील इमारत) चालून गेले. त्यांनी इमारतीचे दरवाजे फोडले. इमारतीत असलेली मूल्यवान रत्ने आणि सोने यांची लुटालूट केली. जे नेता आले नाही ते त्यांनी नष्ट केले. कबरीतून त्यांनी अकबर बादशहाची हाडे बाहेर काढली आणि त्वेषाने अग्नीत टाकून ती (हाडे) जाळून टाकली.[2]

या भयंकर प्रकाराने औरंगजेब अतिशय कष्टी झाला. या शेतकऱ्यांनी आग्रा आणि दिल्लीच्या वाटा ताब्यात घेतल्या तर एक चिटपाखरूही त्यावरून जाऊ शकणार नाही.

---

१. भगवंतदास (मुतखबुत्तवारीखचा कर्ता) (ब्रिटिश म्युझियम जादा हस्तलिखिते २६,२५३ फोलिओ ३६६) प्रमाणे शाहाआलम व त्याचे कुटुंबिय यांना ५ शव्वाल ११०५ हि. (२० मे १६९४) ला मुक्त करण्यात आले. स्थळ विजापूर होय. राजपुत्र शाहाआलम ९ शव्वाला (३९ वे वर्ष) ११०६ हि २३ मे १६९५ ला आग्र्यास पोहचला.

२. अकबर बादशहाच्या कबरीची लूट केल्याचे फक्त एकच लेखक सांगतो आणि तो ईश्वरदास नागर हा होय. हा आपल्या फतुहाते-आलमगिरी (ब्रिटिश म्युझियम जादा हस्तलिखिते न. २३,८८४, फो. १३१अ. व पुढील भाग) यात त्याचा निर्देश करतो तो असा—सन्सनी येथील राजाराम जाट याने पहिले बंड केले. ते मीर अब्दुल-फझल फौजदार याने मोडून काढले. याबद्दल त्याला इतिफात खान हा किताब देण्यात आला. गुजरातमधून सुभेदार म्हणून लाहोरच्या नव्या नेमणुकीवर जात असताना महाबतखानाने आपली छावणी शिकंदराला (अकबराची कबर) टाकली आणि जाटांशी लढाई करून त्याने ४०० जाट ठार केले. याच सुमारास औरंगजेबाचा मामा शाईस्ताखान यास आग्र्याचा सुभेदार नेमण्यात आले. पण तो अधिकार ग्रहण करण्यापूर्वीच जाटांनी शिकंदरावर पुनः हल्ला केला. अकबराची कबर लुटली. अकबराचा दर्गा आणि इतर बहुतेक वस्ती यांची मोडतोड केली. नायब सुभेदार सहम्मद बका (मुजफर-खान) याने काहीही हालचाल केली नाही. त्याच्यावर आणि नियुक्त होणारा सुभेदार जहान बहादूरवर औरंगजेबाची इतराजी झाली. अंबर (जयपूर) चा राजा बिशनसिंग यास जाटांच्या विरुद्ध पाठविण्यात आले. राजाराम जाट याने, शेकावत आणि चोहान रजपूत यांच्या भांडणात एकाचा पक्ष घेतला होता. त्या लढ्यात तो मारला गेला. हे वर्ष १०९८ अथवा १०९९ हि. (१६८६—८७) असावे. पण राजाराम जाटाचा भाऊ चूडामण याने ११०२ हि. (१६९०—९१) मध्ये हा लढा (मोगलांविरुद्ध) चालू ठेवला होता.

हे त्याला जाणवले. म्हणून त्याने आपला दुधभाऊ बहादूरखान यास तिकडे रवाना केले. [1]बहादूरखान शूर होता. पण कडव्या जाटांच्या विरुद्ध त्याला काही करता येईना. म्हणून त्याने राजा जयसिंगाचे नातू आणि इतर राजे यांची मदत घेतली. मोगल सैन्याला बरीच हानी सोसावी लागली. कसेबसे करून बहादूरखानाने त्या खेडुतांना माघार घेण्यास लावले.

**शाइस्ताखानाचा मृत्यू** : वरील घटनानंतर पाच वर्षांनी औरंगजेबाचा मामा शाइस्ताखान हा आग्र्याला सुभेदार असताना मरण पावला. शाइस्ताखानाला अनेक मुले व मुली होत्या. हा ९५ वर्षेपर्यंत जगला. त्याची मुले साम्राज्यात मोठमोठ्या हुद्यावर होती. शाइस्ताखान हा मोठा मुत्सद्दी होता. तो अतिशय संपत्तिमान होता. त्याचा लौकिकही चांगला असे. तो वृत्तीने दानशूर होता. दानधर्मात तो दरवर्षी ५० हजारांपर्यंत ( रुपये ) खर्च करी. यासाठी त्याने साम्राज्यातील मोठमोठ्या शहरांत गरीबगुरीबांना आणि अनाथ स्त्रिया आणि मुलांना मदत करण्यासाठी माणसे नेमली होती. आग्र्याहून दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गावर नरवर येथे त्याने एक मोठा पूल बांधला, हे त्याचे स्मारक होय. या पुलाच्या बांधकामास २५ वर्षे लागली. शाइस्ताखानाला युरोपियन लोक विशेषतः युरोपियन पाद्री आवडत. लोकांना त्यांच्याबद्दल प्रेम आणि आदर वाटे. मूल्यवान रत्ने गोळा करण्याचा त्याला नाद होता. इ. स. १६९५ मध्ये तो वारला.[2] त्याच्या वारसांना मोठी इस्टेट मिळाली. शाइस्ताखानाने एक हजार स्त्रियांना दास्यातून मुक्त केले आणि त्यांच्या पोटापाण्याची सोय लावून दिली. औरंगजेबाला त्याने जी संपत्ती दिली त्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे. सोन्या चांदीची नाणी २० कोटी रुपये, रत्ने २० कोटी रुपये, सामान सरंजाम, हत्ती, उंट आणि घोडे २० लाख रुपये. शाइस्ताखानाला आग्रा येथे त्याचा बाप असफखान याच्या कबरी शेजारी पुरण्यात आले.

**राजपुत्र अकबरचे मोगल साम्राज्याच्या सीमेवर आगमन आणि त्याची माघार** : शाहाआलमचे वायव्य प्रांताकडे जाणे अगदी योग्य वेळी झाले, कारण या सुमारास औरंगजेब मेला अशी खोटी बातमी पसरली होती. त्यामुळे मोगल राज्य हस्तगत करता आले तर पाहावे म्हणून राजपुत्र अकबर हा बारा हजार इराणी स्वारांचे सैन्य घेऊन मोगल साम्राज्याच्या सीमेपर्यंत चालून आला. पण मुल्तानपासून काही

---

१. औरंगजेबाच्या अमदानीच्या ३१ व्या वर्षी १०९९ हि. (१६८७–८८) : राजपुत्र बेदारबख्त आणि खान जहान बहादूर जाफरजंग (बहादूरखान) या दोघांना सनसनीचा राजाराम जाट याच्या विरुद्ध पाठविण्यात आले. ते स्थळ १४ जुलै १६८८ मध्ये जिंकून घेण्यात आले. (मासीरे आलमगिरी ३११).

२. शाइस्तेखानाचा मृत्यु—११०५ हि. चा मध्य (इ. स. १६९४ फेब्रुवारी अगर मार्च महिना) यावेळी झाला असावा.

अंतरागरच शाहाआलमचे मोठे सैन्य उभे आहे हे पाहून त्याला मागे परतावे लागले. यानंतर ऐकण्यात आले ते हे की, राजपुत्र अकबर हा इराणी मुलखात कंदाहार येथे तळ देऊन होता आणि आपल्या बापाच्या मृत्यूची वाट पहात होता. त्याचा पक्ष उचलून धरणार काही कमी नाहीत, असे दिसून येते. म्हणून शाहाआलम हा त्या प्रांतातच राहिला. सीमेवर त्याने आपले सैन्य ठिकठिकाणी ठेवले. आपला भाऊ अकबर याने हिंदुस्तानावर स्वारी करू नये म्हणून तो सारखे लक्ष देऊन होता.

राजपुत्र अकबरने हिंदुस्तान सोडले तेव्हा त्याच्या दोन मुली मागे राहिल्या. औरंगजेबाने त्यापैकी एकीचे लग्न राजपुत्र मुईजुद्दिन आणि दुसरीचे लग्न अजमुद्दिन यांच्याशी लावून दिली.[1] ही लग्ने औरंगजेबाने का घडवून आणली ते कळत नाही. अकबर हिंदुस्तान सोडून गेला तेव्हा त्याच्या दोन बायका गर्भवती होत्या. त्यांना दोन मुलगे झाले. अकबर हिंदुस्तानात परत येत नाही असे पाहून राजा जसवंतसिंगाच्या विधवा राणीने मुलांना औरंगजेबाकडे पाठविले.[2] ही मुले औरंगजेबाकडे आली तेव्हा त्यांना फक्त रजपुतांची बोलभाषा येत होती. औरंगजेबाला यांची मोठी करमणूक होई. औरंगजेबाने मुलांचा सांभाळ उत्तमरीतीने केला. राजपुत्र अकबराने मोगल साम्राज्यात परत यावे अशी औरंगजेबाची इच्छा होती. यासाठी तो त्याला सतत स्नेहाची पत्र पाठवीत होता. तुला मी सिंध प्रांत देईन असेही तो त्याला आश्वासन देत होता. पण अकबरला आपल्या बापाचा स्वभाव माहीत होता. आजपर्यंत (इ. स. १७००) औरंगजेबाच्या पत्रांवर किंवा आश्वासनावर अकबराचा विश्वास नाही.

मोगल साम्राज्याची ही अशी परिस्थिती आहे. हा म्हातारा बादशहा (औरंगजेब) मेल्यानंतर जे भयंकर झगडे होणार आहेत त्यासाठी औरंगजेबाची मुले, नातू आणि पणतू तयारी करू लागले आहेत. मोगल राज्य आपल्याला मिळावे अशी त्यांची इच्छा आहे. त्यांच्यात म्हणच आहे की, 'अशा प्रकरणात बापाने मुलावर अगर मुलाने बापावर विश्वास ठेवू नये.'

एका गोष्टीचे मात्र अतिशय आश्चर्य वाटते; आणि ती म्हणजे औरंगजेबाचे शहाणपण आणि मुत्सद्दिगिरी ही होय. औरंगजेब हा आता चौऱ्याऐंशी वर्षांचा

---

१. या लग्नांना पुरावा मिळत नाही.

२. अकबरला तीन मुले होती—एक मुलगा आणि दोन मुली. ही राजस्थानमध्ये जन्मली होती. मे १६८१ मध्ये अकबराच्या मुलाला दुर्गादास राठोड याने औरंगजेब बादशहाच्या स्वाधीन केले. हा तरुण अहमदनगर येथे मरण पावला. (मासीरे आलमगिरी २०१, ३९५)

आहे. असे असूनही तो अत्यंत कुशलतेने साम्राज्याचा बंदोबस्त करीत आहे. साम्राज्याचे इतके दावेदार (मुले, नातू वगैरे) असून तो अत्यंत कुशलतेने आपले स्थान टिकवून आहे. या वयातही तो घोड्यावर स्वारी करतो हे विशेष होय.

# मोगलांची राज्यव्यवस्था

## औरंगजेबाची राजवट चालू

आतापर्यंत मी (मनुची) जो मजकूर लिहिला, तो वाचून पाहता मोगल सम्राट, इतर राजे आणि त्यांचे शेजारी, यांची संपत्ती, वैभव आणि धोरणे हे समजणे सुलभ व्हावे. परंतु ही माहिती माझ्या ग्रंथात इतस्ततः विखुरलेली आहे. म्हणून या विषयावर मी माझ्या या ग्रंथाचा तिसरा भाग लिहून काढीत आहे. यांत वाचकांचे कुतूहल पुरवावे हाच हेतु नसून त्यांना विषय उपयुक्त व्हावा ही माझी इच्छा आहे. यासाठी मी इतरांच्या माहितीवर अवलंबून राहिलो नाही. मी अठ्ठेचाळीस वर्षे हिंदुस्तानात आहे. या काळात मी बरेच पाहिले आणि बराच अनुभव घेतला आहे. त्याचाच उपयोग मी माझ्या ग्रंथात करीत आहे. मी एका ठिकाणीच बसून राहिलो नाही. मी सारखा प्रवास करीत होतो. मी चांगल्या हुद्यावर कामे केली आहेत. यामुळे या मोठ्या साम्राज्यात काय काय घडत होते हे अधिक चांगल्या रीतीने जाणून घेणे मला शक्य झाले.

कित्येक युरोपियनांची अशी समजूत आहे, की त्यांच्या (युरोपमधील) राजांच्या दरबारातील वैभव पाहता, असे वैभव कोणत्याही दरबारात आढळणार नाही. ऑस्ट्रियाचा सम्राट, फ्रान्सचा राजा, स्पेनचा राजा यांचे वैभव आणि तेज ही काही औरच आहेत असे इतरत्र आढळणे शक्य नाही. चीनच्या सम्राटाच्या दरबारासंबंधी असे म्हणतात की तो अतिशय वैभवशाली आणि तेजस्वी आहे. त्याबद्दल मी काही म्हणत नाही. पण हे मी निश्चितपणे सांगू शकेन की मोगल सम्राट आणि सरदार ज्या ऐश्वर्यात आणि वैभवात राहतात त्याच्या तुलनेने पाहता कोणत्याही युरोपियन राजाचा दरबार बरोबरी करू शकणार नाही.

### बादशहाचे अंतःपुर

बादशहाच्या अंतःपुरातील निरनिराळ्या जातींच्या स्त्रियांची संख्या सुमारे दोन हजार आहे. या स्त्रियांचे हुद्दे आणि त्यांनी करण्याची कामे नेमून दिलेली आहेत. ही कामे म्हणजे बादशाहा, व त्याच्या बायका, रखेल्या आणि मुली यांची नोकरी करणे ही होत. रखेल्यांच्या बाबतीत पद्धत अशी की प्रत्येक रखेलीला काही खोल्या दिलेल्या असतात. त्यांच्यावर देखरेख करण्यासाठी व्यवस्थापिका (मेट्रन) नेमलेल्या

असतात. प्रत्येक स्त्रिच्या दिमतीला मग ती बादशहाची बायको असो की मुलगी असो अगर रखेली असो, दहा-बारा दासी तैनात केलेल्या असतात. या दासींची निवड वर उल्लेखलेल्या दोन हजार स्त्रियांमधून करण्यात येते.

व्यवस्थापिकांचा पगार त्यांच्या हुद्याच्या प्रतिष्ठेप्रमाणे महिन्याला ३०० रुपयांपासून ५०० पर्यंत असतो. या व्यवस्थापिकांच्या शिवाय नृत्य-गायनाच्या व्यवस्थापिका असतात. त्यांच्या बरोबर त्यांचा वाद्य वाजविणाऱ्या स्त्रियांचा ताफा असतो. या व्यवस्थापिकांना जवळ जवळ तितकाच पगार मिळतो. अर्थात मधून मधून त्यांना राजपुत्र आणि राजकन्या यांजकडून भेटीदाखल वस्तू मिळतात. काही स्त्रियांना राजकन्यांना लिहिणे वाचणे शिकविण्याच्या कामावर तैनात केलेले असते. शिक्षणामध्ये सामान्यपणे शृंगारिक कवितांचे लेखन, वाचन हा भाग असतो. अंतःपुरातील स्त्रिया शेख सादी, शिराझी, लिखित गुलीस्तान, बोस्तान आणि प्रेमविषयक गोष्टी वाचण्यात वेळ घालवितात.

अंतःपुरातील स्त्रिया बादशहाची कशी चाकरी करतात हेही सांगितले पाहिजे. बाहेर जसे बादशहाचे अधिकारी असतात तसे अंतःपुरातील स्त्री-अधिकारी असतात. बादशहा अंतःपुरात असताना त्याने दिलेल्या आज्ञा बाहेर कळविण्याचे काम या अधिकारी स्त्रिया करतात. त्या अधिकाऱ्यांची निवड काळजी पूर्वक करण्यात येते. त्या स्त्रिया चतुर, समंजस आणि बहुश्रुत असतात. साम्राज्यात काय चालले आहे याची त्यांना खडानखडा माहिती असते. साम्राज्यातील घटनांचे वृत्तांत लिहून बादशहाकडे अंतःपुरात पाठविण्यात येतात. या वृत्तांताना बादशहा सांगेल तशी उत्तरे देण्याचे काम या स्त्रिया करतात. निरोपांची ने-आण खोजांच्या द्वारे करण्यात येते.

मोगल साम्राज्यात वाकेनवीस, खुफीयानवीस असे अधिकाऱ्यांचे दोन वर्ग आहेत. दर आठवड्यात साम्राज्यात घडणाऱ्या घटनांच्या बातम्या वाकेनवीस कळवितात. खफीयानवीसाकडील बातम्या गुप्त असतात. बादशहा अंतःपुरात असताना वर उल्लेखलेल्या स्त्रिया रोज रात्री ९ वाजता या बातम्या वाचून दाखवित असतात. या शिवाय हेरांनी पाठविलेल्या बातम्या वेगळ्या असतात. राजपुत्र कसे वागतात या आणि अशाच प्रकारच्या बातम्या हे हेर दर आठवड्यास लिहून पाठवितात. बादशहा हा वरील बातम्या वाचण्यात रात्री १२ वाजेपर्यंत जागत असतो. तो फक्त तीन तास झोप घेतो. सकाळी उठल्यावर तो नित्याची प्रार्थना करतो. यात त्याचा दीड तास जातो. दर वर्षी बादशहा हा ४० दिवस (रमजानचा महिना) उपवास तापासात घालवितो. या काळात तो दानधर्म करतो. सध्या वार्धक्यामुळे आणि मोहिमांच्यामुळे त्याला वरीलप्रमाणे कार्यक्रम पूर्णपणे अंमलात आणता येत

नाही. असे असूनही दररोज सकाळी आवश्यक ते निर्णय घेण्यात आणि आज्ञा करण्यात तो कसूर करीत नाही.

चोवीस तासांत बादशहा एकदाच जेवतो. त्याची झोप तीन तासांची असते. तो झोपला असता धनुष्य-बाण वगैरे शस्त्रे चालविण्यात कुशल असलेल्या दासी खडा पाहारा देत असतात.

बादशहाच्या मुदपाकखान्यावर रोजचा खर्च एक हजार रुपयांचा आहे. भोजनाच्या वेळी बादशहासमोर निरनिराळी पक्वान्ने व सामिष पदार्थ ठेवले जातात. बादशहा या अन्नातील काही भाग आपल्या कृपेचे प्रतीक म्हणून राण्या, राजकन्या व लष्करी अधिकारी यांच्याकडे पाठवितो. ते वाहून नेणार खोजे यांना याबद्दल भक्कम बक्षीस मिळते, हे सांगणे नकोच. मोहिमेवर असताना रोजच्या एक हजार रुपयांचे बंधन पाळण्यात येत नाही.

अंतःपुरात राण्या, राजकन्या, आणि इतर स्त्रिया यांना वेगळे तनखे मुकर केलेले असतात. मोगल अंतःपुरातील राण्या, राजकन्या, रखेल्या, व्यवस्थापिका, नर्तकी, गायिका, दासी इत्यादींना दिलेली नावे वाचकांना मनोरंजक वाटतील. राण्यांची व राजकन्यांची काही नावे पुढीलप्रमाणे :—

**राण्यांची व राजकन्यांची नावे** : ताजमहाल नूर महाल, नूरजहान, फर्झाना बेगम, अकबराबादी बेगम, औरंगाबादी बेगम, नवाबबाईजी, उदेपुरी, केशर, छत्रवती, जानी बेगम, माहरुखानुम, शाह खानुम, फर्खुन्दा खानुम, पुर-अन्वर बेगम, अकिला बेगम, फाझिल खानुम, शादमान खानुम, नुरुन्निसा खानुम, जफा-खानुम, नफीजा खानुम, दुर-दुर्रान बेगम, नादीर बेगम, जहानआरा बेगम, बेगम साहेब, रोशन आरा बेगम.[1]

या राण्या किंवा राजकन्या प्रवासाला निघतात किंवा हत्तीवर बसून प्रवास करतात, तेव्हा परत येताना राजवाड्याजवळ असलेल्या तंबूत प्रथम जातात. त्या हत्तीवर चढेपर्यंत माहुताला आपले तोंड कापडाने झाकून घ्यावे लागते.

राण्या व राजकन्या यांना बेगम अथवा खानुम ही पदवी असते. बेगम हे, तुर्की शब्द बेग (सरदार, स्वामी) या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप होय. तसेच खानुम हे खान ह्या शब्दाचे स्त्रीलिंगी रूप होय.

**बादशहाच्या रखेल्यांची नावे** : बादशहाच्या रखेल्यांची नावे पुढीलप्रमाणे :—

रानादिल, बदामचष्म, नाजूकचष्म, मतलब, मुखदन, कुतूहल, शिंगार, प्यार, महान.

१. यांतील काही शब्दांचे अर्थ वाचकांना मनोरंजक वाटतील. नूर=प्रकाश, जहान=जग, फर्खुन्दा=भाग्य, अकिला=विवेकी, फाझील=शहाणा, शादमान=खूष, नफीजा=चांगला, दुर=मोती.

बादशहा आपल्या राण्या, रखेल्या इत्यादींना हिंदी नावेही देत असत. यातील काही स्त्रिया हिंदू होत्या. पण हिंदी नावे देण्यामागे, अशा नावांची आवड हे कारण असले पाहिजे.

**व्यवस्थापिकांची काही नावे पुढीलप्रमाणे :**

नियाझ बाशीबानु, फईमाबानु, फल्कीबानु, गुलसुलतानबानु, कादर बीबीबानु, दिलजुबानु, सिमतीनबानु.

**गायिका व नर्तकी यांची नावे :** अंतःपुरामध्ये गायिका, नर्तकी असत. त्यांची नावे एकजात हिंदी असत. पण या धर्माने मुसलमान असत. अर्थात यांपैकी बहुतेक मूळच्या हिंदू असून त्यांना लहानपणी राजवाड्यात आणलेले असे. या गायिकांची व नर्तकींची नावे मनोरंजक वाटतील. येथे हे लक्षात घेतले पाहिजे की, औरंगजेबाने संगीताला बंदी केली असली तरी अंतःपुरातील स्त्रियांच्या करमणुकीसाठी गायिका आणि नर्तकी राजवाड्यात बाळगण्यात आल्या होत्या. त्यांची नावे—

सुंदराबाई, खुरोशबाई, मृग-नयना, लालबाई, हिराबाई, मनसाबाई, आलियाबाई, रसबाई, शानबाई, वैकुंठबाई, मुरादबाई, मतलबबाई, निहालबाई, गुलाबबाई, कस्तुरीबाई, गुलरूबाई, चंचलबाई, वसनाबाई, उदारबाई, अप्सराबाई, आकाशबाई, केशरबाई.

या गायिका आणि नर्तकी ज्या राण्या किंवा राजकन्यांपाशी तैनात असतात त्यांच्या समोरच गातात अगर नर्तन करतात. क्वचित प्रसंगी सणवार असला तर या सर्व एकत्र येऊन कार्यक्रम करतात. या स्त्रिया सुंदर असतात आणि त्यांच्या बोलण्याचालण्यात मोहकता व मार्दवही असते.

**दासींची नावे :** काही दासींची नावे पुढीलप्रमाणे :

गुलाल, चमेली, नरगीस, केशर, गुलें-बदाम, सोसन, यास्मीन, कस्तुरी, चम्पा, वेल, शेवन्ती, नैनुफार, रानागुल, गुले-फरंग, गुल-अंदाम, गुल-अनार, मेन्दी, केतकी, मृग-नयना, नयन-सुख, कमल-नयन, दिल-आराम, दिल-पसंत, मोती, किस्मत.

बादशहाच्या अंतःपुराचा एकंदरीत खर्च हा विलक्षण म्हणावा लागेल. तो एक कोटी रुपयांपेक्षा कमी नसतो. अर्थात यातूनच सरदारांना आणि अधिकाऱ्यांना मानाची वस्त्रे देण्याचा खर्च बादशहा भागवितो ते सांगितले पाहिजे. हिंदुस्तानात सर्वांनाच फुले आणि सुगंधी द्रव्ये (अत्तरे वगैरे) आवडतात. यावर बराच खर्च होतो. शिवाय विड्याच्या पानांचा खर्च वेगळाच. पानांचा वापर सतत चालू असतो.

याशिवाय मुल्यवान रत्नांची खरेदीही नेहमी चालू असते. अंतःपुरामध्ये अलंकारांचा विलक्षण संच आहे. मी तर लहान मोठ्या आकाराचे प्रत्येक जातीचे रत्न पाहिले आहे. अंतःपुरातील स्त्रियांना जड-जवाहिरांचा वापर करण्याची मोठी हौस आहे. आपण उपरणी घेऊ तसे त्या रत्नांचे हार घालतात. मोत्यांच्या सरांचे तीन ते पाच पदर मानेपासून कमरेपर्यंत रुळत असतात. त्यांच्या दागिन्यात, कपाळावर मोत्यांचा झुबका, आणि डोक्यावर सूर्य, चंद्र, नक्षत्रे अथवा एखाद्या फुलाच्या आकाराची रत्ने आणि तीही मोत्यामध्ये बसविलेली असा थाट असतो. त्यांच्या कानांत मोती असून दोन मोत्यांच्या मधोमध माणके बसविलेली असतात. त्यांच्या हातांना बाजुबंद, मनगटांना कडी आणि मोत्यांच्या बांगड्या असा थाट असतो. त्यांच्या बोटांवर मूल्यवान आंगठ्या असतात. उजव्या आंगठ्याच्या अंगठीत एक लहान आरसा बसविलेला असतो. त्यांच्या कमरेला सोन्याचा कमरपट्टा असतो. त्यात मुल्यवान रत्ने जडवलेली असतात. त्यांच्या पायजम्याला मोत्यांच्या सरांचे पंधरा-पंधरा पदर रुळत असतात त्याचप्रमाणे त्यांच्या पायांत मुल्यवान धातूंची व उंची मोत्यांची पैंजणे असतात.

त्या राण्या आणि राजकन्यांच्यापाशी रत्नांचे सहा ते आठ जोड असतात. त्यांची वस्त्रेही अतिशय उंची व मुल्यवान असतात. त्यांच्यावरील अत्तरांच्या शिडकाव्यामुळे ती वस्त्रे अतिशय सुगंधी बनलेली असतात.

हिंदुस्तानातील स्त्रियांना हातापायाला मेन्दी लावण्याची सवय आहे. राण्या व राजकन्या यांची वस्त्रे अतिशय तलम असतात. साड्यांना जरीची किनार लावलेली असते. अंतःपुरातील स्त्रिया वेणीफणी आणि सुगंधी द्रव्यांचा केसांना वापर यांची अतिशय काळजी घेतात. डोक्यावर जरीचा पदर घेण्याची त्यांची पद्धत असते. काही राजकन्यांना डोक्यावर तुरा आणि मंदिल वापरण्याची परवानगी असते. गाणे बजावणे, रात्रीची रोषणाई इत्यादी करमणुकीमध्ये या स्त्रिया आपला वेळ घालवित असतात.

अंतःपुरातील स्त्रिया आजारी पडल्या तर त्यांच्या शुश्रुषेची व्यवस्था अतिशय उत्तम असते.

औरंगजेबाची राहाणी अतिशय साधी असली तरी अंतःपुरातील स्त्रियांच्या वैभवशाली राहणीत त्याला काही वावगे दिसत नाही. कारण मुसलमानांना स्त्रियांबद्दल फार आसक्ती असते. स्त्रिया हीच त्यांची मुख्य करमणूक आणि जवळ जवळ एकमेव सुख होय.

औरंगजेबाचे स्वतःचे कपडे अतिशय साधे असतात. तो फार थोडे अलंकार वापरतो. डोक्यावरील पागोट्यात एक तुरा आणि एक मुल्यवान रत्न आणि कमरेला एक रत्न, हे झाले त्याचे अलंकार. आपल्या मुलानातवांप्रमाणे तो आपल्या गळ्यात

मोलाचे हार घालीत नाही. त्यांचे कपडे माफक किंमतीचे असतात. त्यांच्या प्रत्येक झग्याची किंमत दहा रुपयांच्यावर नसावी. औरंगजेबाकडे असंख्य रत्ने असलेली आहेत. आता तर हिऱ्याच्या खाणी त्याच्या ताब्यात आल्या आहेत.

राजकन्येचा जन्म झाला तर अंतःपुरात मोठा उत्सव केला जातो. राजपुत्राचा जन्म झाला तर सगळा दरबार उत्सवात सहभागी होतो. हा उत्सव कित्येक दिवस चालू असतो. राजपुत्राच्या नामकरणाबरोबरच त्याचा सरंजाम आणि त्याबरोबरचे अधिकारी हा ठरवून देण्यात येतात. त्याच्या सरंजामातून वर्षाकाठी काही शिल्लक राहिली तर ती रक्कम खजिन्यात वेगळी काढून ठेवण्यात येते. राजपुत्र मोठा झाला, त्याचे लग्न होऊन त्याला राहण्यासाठी एक वेगळा वाडा देण्यात येईल, तेव्हा ती रक्कम त्याच्या हवाली करण्यात येते.

कोणत्याही राजपुत्राला कितीही मोठी मनसब मिळाली तरी ती ५० हजारी मनसब नसते. तो मान फक्त बादशहाच्या मोठ्या मुलाचा असतो. सध्या हा मान औरंगजेबाचा मोठा मुलगा शाहा आलम याचा आहे. त्याचे वार्षिक उत्पन्न दोन कोटी रुपयांचे आहे. त्याच्या अंतःपुरात दोन हजार स्त्रिया आहेत. राजपुत्रांना राहण्यासाठी वेगवेगळे वाडे मिळाल्यावर ते हिंदू राजेरजवाडे आणि मुसलमान सेनाधिकारी यांच्याशी गुप्त पत्रव्यवहार करून आपल्यासाठी त्यांचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न करतात.

राजपुत्रांना मुलगा झाल्या की, बादशहा स्वतः त्याचे नाव ठरवितो; त्या वेळेपासून त्या मुलाला रोजी दोन-तीनशे रुपयांचा तनखा सुरू करतो. मुलाला त्याच्या बापाकडूनही ठरीव रक्कम मिळते. मुलगा मोठा झाल्यावर त्याचा सरंजाम वाढविण्यात येतो. बादशहाच्या मुलाला 'बादशहाजादा' म्हणतात आणि राजपुत्रांच्या मुलांना 'शाहाजादा' म्हणतात आणि शाहाजाद्यांचे संबोधन 'सुल्तान' असे असते.

बादशहाला ज्या वस्तू भेटी दाखल देण्यात येतात, त्या जणु काय आपल्याला दिलेला करभारच आहे अशा पद्धतीने बादशहा स्वीकारतो. परराष्ट्रांतील दूतांनी आणलेल्या भेटींबद्दलही हीच भावना आढळून येते. भेटी देणाऱ्यांना आपल्याला मोबदल्यात आपले ईप्सित मिळेल असे वाटत असेल तरी अनेकांना निराशाच पदरी येते. उदाहरणार्थ ल्युशिए रेसीन या फ्रेंच व्यापाऱ्याने एकदा बादशहाला एक हजार रुपये किंमतीचा पाचू नजर केला. त्याला आशा अशी होती की आपल्याजवळ असलेली सर्व रत्ने बादशहा विकत घेईल. परंतु बादशहाने काहीच विकत घेतले नाही. रेसीनने त्याबद्दल तक्रार करून आपला पाचू आपल्याला परत मिळावा, अशी विनंती केली. मोठ्या मुष्किलीने त्याला तो पाचू परत मिळाला. तोही रेसीन परकी होता म्हणून आणि यासाठी त्याला पाचूच्या किंमतीची निम्मी रक्कम खर्च करावी लागली.

हिंदुस्तानात दृढमूल झालेली पद्धत, म्हणजे वशिला असल्याखेरीज कोणतेही काम होत नाही, ही होय. राजपुत्रांना सुद्धा आपले काम करून घेण्यासाठी पैसे द्यावे लागतात. एखादा खोजा अगर एखादी राजकन्या एखाद्या अधिकाऱ्याबद्दल बादशहापाशी शिफारस करतात तेव्हा त्याबद्दल, तुम्हाला किती पैसे मिळाले आहेत, असे बादशहा त्यांना उघडपणे विचारतो. किती रकम मिळाली, ही हे लोक मनमोकळेपणाने सांगतात आणि मग बादशहा थोडी रकम त्यांना ठेऊन बाकीची खजिन्यात दाखल करतो. पण बादशहाच्या या वागणुकीमध्ये एक जाफरखान याचा अपवाद केला गेलेला दिसतो. जाफरखानाच्या बाबतीत बादशहाने अशा सूचना दिल्या होत्या की, त्याच्या शिफारशींवरून झालेल्या नेमणुकांच्या बाबतीत जितके पैसे मिळत, ती रकम २५ हजार रुपयांहून अधिक असेल तरच ती रकम आपल्याकडे आणण्यात यावी. कमी रकम असेल तर हिशेब पाठविण्याची जरूरी नाही. याचा उघड अर्थ असा झाला की, २५ हजार रुपयांपेक्षा कमी रकमा खिशात गेल्या तर त्याला बादशहाची हरकत नव्हती.

एकदा असे झाले की, फिदाईखान (उर्फ अझमखान–बहादूरखानाचा भाऊ) हा अलाहाबादचा सुभेदार एक दिवस दरबारात आला. त्याने एका नोकरी शोधणाऱ्या प्रतिष्ठित माणसाला बरोबर आणले. त्याला बादशहासमोर हजर करताना फिदाईखान बादशहासमोर उघडपणे म्हणाला "या अगदी क्षुल्लक गोष्टीसाठी जाफरखानाच्या पदरात फक्त १२ हजार रुपये पडले." इतका उघड उघड आरोप बादशहाला आवडला नाही. पण त्याने आपला राग न दाखवता वेळ मारून नेली. इतके मात्र खरे की काही दिवसांनी फिदाईखानाची अलाहाबादेतून बदली होऊन त्याची नेमणूक लाहोरचा सुभेदार म्हणून करण्यात आली.

**वाढदिवस व सणवार समारंभ :** वाढदिवस आणि सणवार इत्यादी प्रसंगी अंतःपुरात मोठा उत्सव करण्यात येतो. अशा प्रसंगी बादशहा आणि राजपुत्र यांची तुलादाने होतात. उत्सवात मोठमोठ्या सरदारांच्या स्त्रियांना अंतःपुरात राण्या आणि राजकन्या यांच्या भेटीला जावे लागते आणि बरोबर मूल्यवान वस्तूही न्याव्या लागतात. या स्त्रियांना उत्सव संपेपर्यंत म्हणजे ६ ते ९ दिवस राजवाड्यात राहावे लागते. पठाण सरदारांच्या स्त्रियांना मात्र राजवाड्यात जाण्याची सक्ती करण्यात येत नाही. उत्सवप्रसंगी गायिका आणि नर्तकी यांना सोनेनाण्यांच्या खूप देणग्या मिळतात. या प्रसंगी राजवाड्यातील व्यवस्थापिकांना (मेट्रन) वस्त्रे आणि रत्ने देणग्या म्हणून देण्यात येतात. आणि त्यांचा पगारही वाढविण्यात येतो. सरदारांच्या स्त्रियांचे फार उत्तम स्वागत करण्यात येते. त्यांनाही उंची वस्त्रे आणि रत्ने देण्यात येतात. निरोपाच्या वेळी मुबलक सोनेचांदीची नाणी आणि रत्ने ही मिसळून त्यांना देण्यात येतात. या प्रकाराला खिचडी असे नाव देतात.

राजपुत्रांचा अथवा राजकन्यांचा जन्म झाल्याबरोबर त्यांना एक गाठ असलेला पिवळा रेशमाचा दोर बांधण्यात येतो. दरवर्षी एक एक गाठ वाढविण्यात येते. तसेच जन्मल्याबरोबर कापलेला नाळ एका पिशवीत ठेवण्यात येऊन ती पिशवी नवीन अर्भकाच्या उशीखाली ४० दिवस ठेवण्यात येते.

**बादशहाला कसे संबोधतात :** औरंगजेब बादशहाला संबोधताना त्याचे दरबारी आणि मांडलिक पुढील शब्द वापरतात. (१) हजरत सलामत, (२) किबलाये दीनो दुनिया, (३) किबलाये दो जहानान, (४) किबला जाये समा, (५) आलम पन्हा. औरंगजेबाचा उल्लेख सामान्य लोक 'इरे दस्तगीर' म्हणजे 'आधार देणारा संत पुरुष' असा करतात.

**राजपुत्रांचे शिक्षण :** राजपुत्र पाच वर्षांचे झाले की त्यांना तुर्की भाषा शिकवण्यात येते. ती त्यांची मूळ भाषा आहे असे समजण्यात येते. त्यानंतर त्यांच्या शिक्षणासाठी चांगले चांगले शिक्षक नेमण्यात येतात. हे शिक्षक त्यांना उत्तम शिक्षण देतात. यात युद्ध कलांचाही समावेश असतो. विद्यार्थ्यांच्या मनोरंजनासाठी काही आनंद पर्यवसायी नाट्य प्रसंगही खेळले जातात. राजपुत्रांना कायद्यांचे ज्ञान व्हावे यासाठी अभिरूप न्यायालयेही घडवून आणण्यात येतात. लुटुपुटुच्या लढाया व असे इतर खेळही राजपुत्रांसमोर करण्यात येतात. राजपुत्रांना वाईट सवयी लागू नयेत याची अत्यंत कसोशीने काळजी घेण्यात येते. त्यांनी आपल्या भावना आवरण्यास शिकावे, विवेक करावा, राग लोभ इत्यादी विकार दाखवू नये, चेहरा शक्य तोवर निर्विकार ठेवावा, अशी त्यांना शिक्षण देताना काळजी घेण्यात येते.

एकदा असे झाले की, सुल्तान मुईजोद्दिनच्या (हा पुढे जहानदाज शाहा म्हणून बादशहा झाला, शाहा आलमचा मुलगा) मुलाला डोक्याला फोड झाला होता. मी (मनुची) औषध लावीत होतो. त्याला दुःखाचा विसर पडावा म्हणून मी त्या मुलाला हसत हसत म्हटले "तुम्ही रागावू नका बर का?" तेथे असलेले खोजे आणि व्यवस्थापिका यांना माझे बोलणे चमत्कारिक वाटले. ती माणसे म्हणाली "मोगल राजपुत्र बेचैन कधीच होत नाहीत. त्यांची वृत्ती ही विवेकपूर्ण आणि विकाररहित असते."

बादशहा शिकारीला अगर प्रार्थनेसाठी मशिदीला जातो, तेव्हा तो या राजपुत्रांना आपल्याबरोबर नेतो. राजपुत्रांचे अशा रीतीने पालन पोषण होते. त्यांची लग्ने झाल्यावर त्यांना वेगळे वाडे राहण्यास देण्यात येतात. त्यांचे लहानपणीचे शिक्षकांना पेन्शन देऊन वाड्यात ठेवण्यात येते.

आपापल्या वाड्यात हे राजपुत्र वर सांगितल्याप्रमाणे आपापल्या परीने सणवार, वाढदिवस, जन्मोत्सव इत्यादी समारंभ साजरे करतात. अशा प्रसंगी त्यांचे अधिकारी त्यांना नजराणे देतात. याचे उदाहरण म्हणून १६७९ मध्ये औरंगाबाद

मुक्कामी राजपुत्र शाहा आलम याने आपला वाढदिवस साजरा केला याचे देता येईल. त्यावेळी शाहा आलमची आई त्याच्या जवळ राहत होती. या प्रसंगी तिने एकंदरीत पन्नास हजार रुपये किंमतीच्या भरतील अशा अनेक दुर्मिळ वस्तू आपल्या मुलाला भेट म्हणून दिल्या. तरी शाहा आलमने कुरकूर केली. मागल्या वर्षीच्या मानाने आपल्या आईने कमीच देणग्या दिल्या.

नवरोज सण : त्यांचे वर्ष (मोगल बादशहांचे) २२ मार्चला सुरू होते.[1] त्या दिवशी राजवाड्यात फार मोठा उत्सव करतात. बादशहा मयूर सिंहासनावर बसतो. त्या प्रसंगी, पूर्वीचे बादशहा ज्या सिंहासनावर बसत ती आसने मयूर सिंहासनाच्या आजुबाजूला मांडून ठेवण्याची पद्धत आहे. शाहाजहानने जरी हे मयूर सिंहासन घडविले तरी त्याच्यावर बसण्याचा योग त्याच्या नशिबी नव्हता. नवरोज या वर्षारंभाच्या दिवशी बादशहा आणि राजपुत्र यांची विविध धातू, धान्ये, कापड-चोपड इत्यादींनी तुलादाने केली जातात. या वस्तू नंतर गरीबांना दान म्हणून वाटण्यात येतात. या दिवशी बादशहाला नजराण्याच्या रूपाने आपल्या सरदारांच्याकडून मुबलक भेटी मिळतात. बादशहाही सरदारांना हत्ती, घोडे, उंची वस्त्रे, रत्ने इत्यादी देतो.

मोगल बादशहांचा दुसरा सण म्हणजे ईदे-कुरबान होय. ईदे-कुरबान म्हणजे बकरीदचा सण होय. त्या दिवशी बादशहा राजवाड्यातून मोठ्या थाटाने निघून जुम्मा मशिदीला जातो. तेथे मुख्य काझी त्याचे स्वागत करतो. आणि प्रवचन करतो. प्रवचनात तैमूरवंशातील सर्व बादशहांची नांवे घेण्यात येतात. आणि औरंगजेब बादशहाची स्तुती करण्यात येते. अर्थात औरंगजेब बादशहाबद्दल बोलताना काझीला अत्यंत सुज्ञदीर्घदृष्टीने वागावे लागते हे सांगणे नकोच. प्रवचनात थोडीही चूक झाली तर प्राणावर बेतलेच म्हणून समजावे.

प्रवचन संपल्यावर काझीला सात वस्त्रांचे जोड देण्यात येतात. बादशहा मशिदीतून बाहेर निघतो. पायऱ्यापाशी बकरीदचा बळी म्हणून उंट उभा करण्यात आलेला असतो. घोड्यावर स्वार होण्यापूर्वी बादशहा किंवा राजपुत्रांपैकी कोणी, उंटाला भाल्याने एकदम भोसकतात. त्यानंतर बाकीचे लोक उंट मारून टाकतात.

अंतःपुरातील खोजे : अंतःपुरातील महत्त्वाच्या खोज्यांना मोठमोठी जबाबदारीची कामे सोपविली जातात. व्यवस्थापक खोज्यांना नाझीर म्हणतात. त्यांना चांगला पगार असतो. खजिन्यावर देखरेख, वस्त्रागारांची व्यवस्था इत्यादी कामे त्यांच्याकडे असतात. बादशहा, राजपुत्र, राण्या इत्यादींचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास असतो.

१. हे इराणी वर्ष होय. त्याला नवरोज म्हणतात. याचा वर्षारंभ सूर्याच्या मेषराशीतील प्रवेशापासून होतो. त्यावरून हे नाव दिले आहे.

नाझीरच्या हाताखाली लहान मोठे असे अनेक खोजे असतात. अंतःपुरात येणाऱ्या जाणाऱ्यांची कडक तपासणी केली जाते, ती या खोज्यांच्या द्वारे होय. भांग, दारू, अफू इत्यादी मादक पदार्थ अंतःपुरात येऊ नयेत याची काळजी घेतली जाते. फार काय सांगावे! अंतःपुरात मुळे, काकड्या, अशा लांबट भाज्या यांच्याही आणण्यावर कडक देखरेख असते. अंतःपुरात त्यांचा दुरुपयोग होऊ नये म्हणून ही व्यवस्था करतात. बाहेरून राजवाड्यात कोणाला भेटण्यास एखादी स्त्री आली आणि ती सुप्रसिद्ध आणि सर्वांच्या माहितीची नसेल तर तिची अतिशय कडक झडती घेण्यात येते. स्त्रीवेषात कोणी पुरुष तर दाखल झाला नाही ना अशी खोजांना सारखी भीती वाटत असते. सुतार, गवंडी इत्यादींना आत सोडण्यापूर्वी त्यांची पूर्णपणे शहानिशा करून मग आत आणण्यात येते. प्रत्येक फाटकावर त्यांची नावे आणि वर्णनें नोंदली जातात. काम संपल्यावर माणसे तीच आहेत ना याची चौकशी केल्यानंतर त्यांना बाहेर जाऊ देण्यात येते.

अंतःपुराच्या दारावर सामानाची ने-आण करण्यासाठी स्त्रिया नेमलेल्या असतात. त्या पडदा पाळीत नाहीत. महालाचे प्रमुख दरवाजे सूर्यास्ताचे वेळी बंद करण्यात येतात. मुख्य प्रवेशद्वारावर कडक पाहारा ठेवण्यात येतो. दरवाज्यावरील कुलपांना मोहर लावण्यात येते. मशाली रात्रभर जळत ठेवण्यात येतात. अंतःपुरातील प्रमुख स्त्रियांपाशी घड्याळे असतात. प्रत्येकीच्या खोलीतून कोण आले कोण गेले याचा वृत्तांत खोजांच्या नाझीरला तावडतोब पोहचविण्याची कडक व्यवस्था असते.

**हकीम व वैद्य यांचा अंतःपुरात प्रवेश :** हकीम-वैद्य इत्यादी अंतःपुरात बोलावले जातात. त्यावेळी त्यांना डोक्यापासून कमरेपर्यंत वस्त्राने झाकण्यात येते. बादशहाप्रमाणे त्याचे सरदारही आपल्या स्त्रियांच्यावर कडक देखरेख ठेवीत असतात. त्याचे कारण असे की, स्त्रियांच्या बाबतीत मुसलमान हे कमालीचे संशयखोर असतात. काहींचा तर आपल्या भावावरही विश्वास नसतो. त्याच्यासमोरही ते आपल्या बायकोंना येऊ देत नाहीत. इतकी कडक देखरेख, स्वातंत्र्याचाही अभाव आणि करण्याजोगे कोणतेही काम नाही, अशा परिस्थितीत स्त्रियांच्या मनात चहाडी, चुगली, चावटपणा, शृंगार प्रसाधन इत्यादींचेच विचार घोळत असल्यास नवल काय?

ही गोष्ट मला मुख्य वजीर असदखान याची बायको नवलबाई हीजकडून कळली. ती मला म्हणाली "माझा नवरा हा माझ्याशी नेहमी संतुष्ट असावा आणि त्याने इतर स्त्रियांच्याकडे जाऊ नये, याचाच मी नेहमी विचार करीत असते." या स्त्रियांचे इतर उद्योग म्हणजे, उत्तम उत्तम कपडे करणे, आणि शरीराला उत्तम सुगंधी द्रव्ये लावणे, उत्तम पक्वान्नांचे सेवन करणे हे होत, खेळ पाहणे, नृत्य गायन घडवून आणणे, प्रेमकथा ऐकणे, पुष्पशय्येवर लोळणे, बागातून फिरणे, कारंजी, कालवे इत्यादींच्याकडे पाहणे, असे आणि इतर करमणुकी उपभोगण्याची त्यांना मुभा असते.

अंतःपुरातील स्त्रियांपैकी काही जणी आजारी असल्याचे सोंग करतात. हकीम-वैद्याने आपला हात धरून नाडी पाहावी आणि त्याच्याशी चार शब्द बोलण्यास मिळावे एवढीच त्यांची इच्छा असते. येथे हे सांगितले पाहिजे की, हकीम-वैद्य हा पडद्याच्या आत हात घालून स्त्रियांची नाडी पाहतो. याचा फायदा घेऊन कित्येक स्त्रिया त्याच्या हाताचा मुका घेतात अथवा चावतात. काही जणी तर कुतूहल म्हणून हकीमाचा हात आपल्या वक्षःस्थलाला लावतात. मला हा अनुभव अनेक वेळा आला. पण मी जणु काहीच घडले नाही असे भासविले. नाहीतर माझ्याजवळ उभे असलेले खोजे आणि व्यवस्थापिका यांना संशय यावयाचा. अंतःपुरातील स्त्रियांच्याकडून हकीम-वैद्यांना चांगली वागणूक मिळते. हे हकीम-वैद्यही आपल्या बोलण्या चालण्यात मोठ्या विवेकीपणे वागतात. औषधोपचाराबद्दल अशा हकीम-वैद्यांना अंतःपुरातील प्रतिष्ठित स्त्रियांकडून चांगली बक्षिसेही मिळतात.

येथे हेही सांगितले पाहिजे की, दरबारातील सरदारांना अंतःपुरातील स्त्रियांच्याकडून जी वागणूक मिळते ती त्या त्या सरदारांच्या दर्जाला व प्रतिष्ठेला साजेशी असते. या बाबतीत कसा विवेक पाळण्यात येतो याचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे :– औरंगजेबाचा मुख्यप्रधान असफखान याचा मुलगा झुल्फिकारखान हा सुप्रसिद्ध आहे. त्याची बायको औरंगजेबाच्या मुलीच्या नात्यातली होती. झुल्फिकारखानाची कर्नाटकावर नेमणूक झाली[1]. तो जेव्हा औरंगजेबाच्या मुलीचा निरोप घेण्यास गेला, तेव्हा तिने झुल्फिकारखानाला रत्नजडित सोन्याचे पानदान आणि पिकदाणी या वस्तु भेट म्हणून दिल्या. एक वर्षानंतर औरंगजेबाने आपला मुख्यप्रधान असफखान याला कर्नाटकात पाठविले. असफखान जेव्हा राजकन्येचा निरोप घेण्यास गेला, तेव्हा तिने त्याला फक्त चांदीचा मुलामा दिलेले पानदान भेट म्हणून दिले. आपल्या मुलाला सोन्याचे पानदान आणि आपण साम्राज्याचे मुख्यप्रधान असूनही आपल्याला अशी क्षुल्लक भेट ! याचे असफखानाला नवल वाटले. निदान आपल्याला आपल्या मुलाच्या बरोबरीने तरी वागवावयास हवे होते, अशी त्याने गोड शब्दात विनंती केली. यावर औरंगजेबाच्या मुलीने म्हटले "तुमच्यात आणि तुमच्या मुलात फरक आहे. तुमचा मुलगा हा आमचा नातेवाईक आणि तुम्ही आमचे नोकर." या उत्तरामुळे असफखानाला काही बोलणे सुचेना. त्याने राजकन्येच्या प्रतिष्ठेला साजेसा नम्र मुजरा करून तिचा निरोप घेतला.

सरदार लोक जेव्हा प्रतिष्ठित स्त्रियांचा निरोप घेतात तेव्हा ते समोरासमोर भेटतात अशी कोणी कल्पना करून घेऊ नये. निरोप घेण्याची पद्धत पुढीलप्रमाणे आहे :— निरोप घेणारा सरदार अंतःपुराच्या महालाच्या प्रवेशद्वारापाशी जातो. आपण कशासाठी आलो, आणि आपण कोणाचा निरोप घेण्यास आलो, हे तो

१. ही नेमणूक १६९० ला झाली होती.

खोजाला समजावून सांगतो. खोजा याचा निरोप त्या प्रमुख स्त्रीकडे पोहचवितो आम्हाला तुमचा निरोप कळला असा त्या स्त्रीचा निरोप घेऊन खोजा परत येतो.

अंतःपुरातील स्त्रिया जेव्हा बाहेर पडतात, तेव्हा त्या पडदा झाकलेल्या मेण्यातून प्रवास करतात. मेण्याला जराच्या जाळीची एक लहान खिडकी असते. तीतून त्या बाहेर पाहू शकतात. अशा वेळी रस्त्यात कोणी सरदार समोर आला तर तो घोड्या-वरून खाली उतरतो आणि लांबून मेण्याला मुजरा करतो. त्या सरदारावर विशेष कृपा असली तर मेण्यातील स्त्री खोजाच्याबरोबर विडा सरदाराकडे पाठविते. विडा मिळाल्यावर सरदार पुनः मुजरा करून निघून जातो. असा प्रकार अनेकवेळा माझ्या (मनुचीच्या) ही वाट्याला आला आहे.

राजपुत्र शाहा आलम याची आई आणि औरंगजेबाची बायको हिच्या आजारा-वर मी अनेक वेळा उपचार केला. गोव्याच्या स्वारीहून शाहा आलम दरबारात परत आला तेव्हा मी त्याच्या दिमतीला होतो. यामुळे शाहा आलमच्या आईने माझ्यावर विशेष कृपा दाखविली. तिला संधिवाताचा (गाउट) विकार होता. याशिवाय यासाठी तिच्या अंगातील रक्त काढून घेण्यासाठी (ब्लीडिंग) मला तिच्याकडे जावे लागे. ती मला अनेक खाण्यापिण्याची पक्वान्ने नेहमी पाठवी. तिच्या अंगातून रक्त काढण्याचे वेळी ती आपला हात पडद्याच्या बाहेर काढी. हात झाकलेला असे, फक्त शिरेच्या जवळ दोन बोटा एवढी जागा मोकळी ठेवण्यात येई. शाहू आलमच्या आईचा इलाज केल्याबद्दल, मला चारशे रुपये आणि पोशाख भेटी म्हणून ती वर्षा-तून दोनदा देई. तिच्या अंगातून रक्त काढण्याचा इलाज मी वर्षातून एकदा करीत असे.

एखाद्या युरोपियन डॉक्टरची नेमणूक करण्यापूर्वी मोगल बादशहा आणि राज-पुत्र अतिशय काळजी घेत. या बाबतीत ते अतिशय संशयी आणि चोखंदळ अस-तात. शाहा आलमच्या बायका आणि मुली यांच्या अंगातील रक्त मी जेव्हा काढी तेव्हा त्याबद्दल प्रत्येकीबाबत मला दोनशे रुपये आणि पोशाख मिळे. पण शाहा आलमच्या अंगातून रक्त काढण्यासाठी बादशहाची परवानगी घ्यावी लागे आणि काम संपल्यावर बादशहाकडे तपशीलवार वृत्तांत द्यावा लागे. याबद्दल मला चारशे रुपये, पोशाख आणि घोडा हे बक्षीस मिळे. शाहा आलमच्या मुलांवरील उपचारा-बद्दल मला प्रत्येकी दोनशे रुपये, घोडा आणि पोशाख हे मिळत.

आपल्या हकीम-वैद्यांच्या नेमणुकीबाबत औरंगजेब बादशहा हा अतिशय काळजी घेतो. त्याच्या दरबारात अनेक हकीम आहेत. हे हकीम इराणी वंशाचे आहेत. यापैकी ज्यांना खान ही पदवी[1] आहे त्यांना वार्षिक मुशाहीरा वीस हजारांपासून

१. या ठिकाणी मनुचीने पंचवीस हकिमांच्या पदव्या दिल्या आहेत.

दोन लाख रुपयांपर्यंत असतो. त्यांच्यापैकी काहींना उष्ण विकार शीतोपचारांनी नाहिसे करताना मी पाहिले आहे. पण खडा, पक्षघात, फेपरे, जलोदर, रक्तक्षय, दूषितज्वर अशा अवघड दुखण्यांवर त्यांच्यापैकी फारच थोड्यांना माहिती असलेली दिसली. ते आपल्या वैद्यकीय ग्रंथात दिलेल्या औषधांची योजना करतात. पण ह्या ग्रंथात फापटपसारा जास्त व कामाच्या गोष्टी कमी असा प्रकार आहे. पण हे सांगितले पाहिजे की, मोगल साम्राज्यातील आजार हे थोड्याशा उपचारांनी बरे होतात. कारण देश उष्ण आहे आणि त्यामुळे घाम लवकर येऊन रोग्याची लवकर मोकळीक होते.

बादशहाचे गुलाम : मोगल बादशहाच्या पदरी निरनिराळ्या राज्यांतून आलेले हजारो गुलाम असतात[1]. हे गुलाम मोठमोठे हुद्दे सांभाळून असतात. ते शिपाईगिरी आणि सरदारी करतात. त्यांना पगारही चांगला देण्यात येतो. या सैनिकांवर दोन सरदारांची नेमणूक केलेली असते. या गुलामांच्या पथकात तीन हजार घोडेस्वार, चार हजार पायदळ शिपायी आहेत. यांचे मुख्य काम राजवाड्यात अथवा त्याच्या अनुषंगाने असलेली इतर कामगिरी पार पाडणे हे असते. एखादी धाडसी कामगिरी (उदाहरणार्थ–अचानक छापा घालून कोणाला अटक करणे, किंवा राजवाड्यात एकाएकी दंगल उद्भवली तर तिचा बंदोबस्त करणे, इत्यादी प्रकार यात मोडतात)[2] आणि सरदार व सामान्य जनता यांच्यात काय चालले आहे, याबद्दल हेरगिरी करून बादशहाकडे बातमी पोहचविण्याची कामेही हे लोक करतात.

बादशहा आणि राजपुत्र यांना तलवारी, ढाली, घोडे, हत्ती, तोफा इत्यादींचा मोठा शौक आहे. आपल्या उत्तमोत्तम तलवारी, खंजिरी, ढाली इत्यादींना ते हौसेने नावे देतात. त्यांच्या कट्यारींची व तलवारींची नावे पुढीलप्रमाणे आहेत :–दुष्मन-कुश, आर-पार बिजली, आबदार, बे-खता, दुष्मन-सिनान, आलम-सिनान, काफोर, आलमगीर, फते-आलम, दमदार इत्यादी.

औरंगजेब स्वतःपाशी बाळगतो त्या तलवारीचे नाव आलमगीर आहे. तलवारींच्या मुठी सोन्याच्या असून त्या रत्नजडित असतात. खंजिरीचे तीन प्रकार असतात. त्यांना खंजीर, बांक आणि कट्यार असे म्हणतात. ते सुद्धा रत्नजडित असतात. दर शुक्रवारी सकाळी बादशहा आपल्या या शस्त्रांची तपासणी करतो, आणि त्यांच्या द्वारे आपल्याला विजय मिळावा अशी प्रार्थना करतो. यापैकी पुष्कळ तलवारी, खंजीर मागील राजांच्या काळापासून चालत आलेले आहेत.

---

१. या ठिकाणी मनूचीने चाळीस प्रमुख गुलामांची नावे दिली आहेत.

२. हे बादशहाला एकनिष्ठ राहणारे असे त्याचे स्वतःचे खाजगी संरक्षक-दळ समजावे.

**बादशहाच्या ढाली :** बादशहाच्या ढालीही मजबूत आणि मूल्यवान असतात, त्यांपैकी काहींची नावे पुढीलप्रमाणे होत :–

आफताब-आलम, महताब-आलम, साया-ए-आलम, रोशन-ए-आलम इत्यादी. अनेक ढाली गेंड्याच्या कातड्याच्या बनविलेल्या असतात. बंदुकीची गोळी या ढाली झेलू शकतात. काही ढाली रेड्याच्या कातड्याच्या असतात. बाण त्यांच्यातून आरपार जाऊ शकत नाही.

**घोड्यांची नावे :** बादशहाला घोड्यांचा शौक आहे. बादशहाच्या वापरातील काही घोड्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत :–

बाद-रफ्तार (वायु-वेग), खुप-रफ्तार, शाहा, पसंद, दिल-रुबा, सूरत-सीरत, खुश-अंदाम (उत्तम-चाल), कोहे-तीला, (सुवर्ण-मेरु), काहे-नरसा, जमीन-दोझ, राहदार (वेगवान) फर्जी, सर-बुलंद, तुरे-गर्दीन, माणिक, लाले-बहा, हिरा-ज्योत, फुलवारी, कलदार अबलक, शाहा-रफ्तार इत्यादी.

हे घोडे अरब, इराणी किंवा तुर्की जातीचे असतात. घोड्यांना पुठ्यावर डाग देण्यात येतो. त्यांची उत्तम बडदास्त ठेवण्यात येते. सकाळचे वेळी त्यांना रोटी, लोणी आणि साखर आणि संध्याकाळी भात, गाईचे दुध ही देण्यात येतात.

बादशहा स्वारी करण्यापूर्वी घोड्याचा व्यवस्थापक अनवाणी पायांनी प्रथम घोड्याला हाताने फिरवून आणतो. बादशहा घोड्यावर स्वारी करतो तो आवश्यक म्हणून नव्हे तर आवडीमुळे होय. बादशहा कधी माल वाहून नेणाऱ्या तट्टावर बसेल किंवा हत्तीवर बसेल. बादशहाच्या स्वारीच्या घोड्यांनी आग किंवा इतर गोष्टींना घाबरू नये म्हणून त्यांना खास शिकविण्यात येते. बादशहाच्या घुसलखान्या (दिवाणी-खास) पाशी नेहमी चार घोडे सज्ज असे ठेवण्यात येतात. कधी कधी बादशहा आपल्या मुलांना आपला एखादा आवडता घोडा आणि वीस ते पंचवीस असे इतर घोडे बक्षीस म्हणून देतो.

**स्वारीचे हत्ती :** बादशहाच्या स्वारीचे अनेक हत्ती आहेत. त्यापैकी अनेकांना हिंदु[1] नावे दिली आहेत. काही हत्तींची नावे पुढीलप्रमाणे होत :–

दिलपसंद, एक दंत, मदान-मस्त, सदा-मस्त, खुदादाद, खालीक-दाद, बाबा-बक्ष, दिल-खुशाल, नेक-बक, बुलंद, लतीफ, नरसिंह, फत्ते-जंग, फत्ते-लष्कर, रणजीत, दल-शृंगार, लष्कर-शोभा, दुष्मन-कुश (शत्रुघ्न), काला-पहाड, खुनी, बाघ-मार (वाघमार), महा-मोहन, उत्तम, सुंदर-गज, नूर, लाल, हिरा, माणिक-सूरत, बाघेला इत्यादी[2].

१. मनुचीला हिंदी हा शब्द अभिप्रेत असावा.

२. येथे मनुचीने बादशहाच्या खास तैनातीत असलेल्या ६६ हत्तींची नावे दिली आहेत.

सामान्यपणे बादशहाच्या स्वतःच्या वापरात शमर उंच हत्ती आहेत. हत्तिणी पण आहेत. बादशहा कधी कधी हत्तिणीवर प्रवास करतो. बादशहाच्या स्वारीच्या हत्तींना बंदुका, तोफा आणि आतषबाजी इत्यादींची भीती वाटू नये म्हणून विशेषप्रकारे शिकविण्यात येते. शिकारीच्या वेळी, वाघ, सिंह इत्यादी श्वापदांची भीती वाटू नये म्हणून वाघ, सिंह यांची कातडी पेंढ्यांनी भरतात. आणि दोरीने त्यांना इकडे तिकडे ओढतात, माहूत हत्तींना त्यांच्यावर चाल करून जाण्यास शिकवितो. काही दिवसांनी हत्ती आपली भीती टाकून देऊन पेंढ्यांनी भरलेल्या वाघ किंवा सिंहावर तुटून पडतात आणि त्याच्या चिंधड्या उडवितात. अशा रीतीने खऱ्या शिकारीच्या वेळी वाटणारी भीती नाहीशी होते. या हत्तींची चांगली बडदास्त ठेवण्यात येते. युद्धाच्या वेळी या हत्तींना हिंमत यावी म्हणून त्यांना मादक द्रव्ये पाजण्यात येतात. राजवाड्याच्या प्रवेशद्वाराजवळ नदीच्या काठावर, एक सजविलेला हत्ती पाहण्यावर म्हणून रात्रंदिवस उभा करण्यात येतो. सर्वांत मोठा हत्ती दरबारात आणतात, तेव्हा त्याला उत्तम प्रकारे सजविलेले असते. त्याच्या बरोबर इतर अनेक हत्ती आणण्यात येतात. हे हत्ती जेव्हा दरबारात आणण्यात येतात, तेव्हा शिंगे, कर्णे इत्यादी वाद्यांची एकच गर्दी होते. आणि एकंदरीत देखावा मोठा भारदस्त वाटतो. मुख्य हत्तींचा रोजचा खुराक म्हणजे १६५ पौंड (सुमारे ८२ शेर) अन्नाचा असतो. यात कणिक, तांदूळ, मांस, लोणी, मसाले आणि पंधरा शेर ऊस यांचा समावेश असतो. याशिवाय त्यांना गवत, पाचोळा इत्यादींसाठी रोजी २५ रुपये खर्च होतात. प्रत्येक हत्तीसाठी दहा माणसे तैनात असतात. दोन माहूत, दोन साखळ्या बांधणारे, दोन भालाईत, दोन आतषबाजी आणि रोशणाई करणारे, एक हत्तीची लीद काढण्यासाठी आणि एक त्याला पाणी पाजणे व आंघोळ घालणे यासाठी. हत्तीसाठी २५ रुपये रोजचा भत्ता ठरलेला असतो. त्यातून या लोकांचे भागते. याशिवाय प्रत्येकाला महिन्याला ४ रुपये पगार दिला जातो. हत्तीच्या खुराकामधूनही काही धान्य हे लोक चोरतात ते वेगळेच.

वर उल्लेखलेले हत्ती हे बादशहाच्या खास तैनातीतील होत. याशिवाय राजवाड्यातील मंडळींना नेणे-आणणे, तंबू, मुदपाकखाना, सरंजाम, इत्यादींची ने-आण करण्यासाठी चौदाशे हत्ती आहेत. यांपैकी मजबूत हत्तींना सुळे नसतात. त्यांच्याकडून तोफा वाहून नेणे आणि अशीच जड कामे घेण्यात येतात. लहान सहान हत्तींना रोज तीन रुपये भत्ता असतो. आणि तीन माणसे तैनात असतात. हत्तींच्या पाठीवर घंटा लावलेल्या असतात. वाटेतून लोकांनी बाजूला व्हावे म्हणून इशारा देण्यासाठी या घंटा असतात. कारण एखादा हत्ती चालू किंवा पळू लागला तर घोड्याप्रमाणे तो मध्ये थांबत नाही.

मी (मनुची) हत्तींच्या अनेक झुंजी पाहिल्या आहेत. अशा प्रसंगी माहुतांचे जीव खरोखरीच धोक्यात असतात. अशा साठमारीतून माहूत परत आले तर

पुनर्जन्म झाला असे त्यांच्या बायकांना वाटते. झुंजीसाठी निघण्यापूर्वी मालुताच्या बायका आपण विधवा झालो असे समजून सुतकी वस्त्रे अंगावर घालतात. आणि आपल्या बांगड्या फोडून टाकतात. झुंजीहून आपले नवरे परत आले की पुनः नव्याने विवाह झाल्यासारखा उत्सव करतात.

बादशहाच्या तोफा : बादशहापाशी असलेल्या उत्तम तोफांपैकी काहींची नावे पुढीलप्रमाणे आहेत[1] : —

औरंग-बार, काले-खान, बिजली-पसंद, दलदली, दौलत-मैदान, मलिक-मैदान दिलावर, बुर्ज-शिकन, बे-खता, जलजला इत्यादी.

बादशहा मोहिमेवर जातो तेव्हा काही तोफा त्याच्या बरोबर असतात. विजापूरच्या मोहिमेत बादशहाने वरीलपैकी काही तोफा दिलेरखान आणि बहादूरखान यांजकडे पाठविल्या होत्या असे मला आढळून आले.

बादशहाचे सरदार : औरंगजेबाच्या प्रमुख सरदारांची (एकशे चौदा) नावे पुढीलप्रमाणे आहेत : —

वझीरखान, जाफरखान, जफरखान, फाझीलखान, शाइस्ताखान, अलीमर्दानखान, असफखान, सफशिकन-खान, फिदाईखान, बहरामंदखान, बू-अलीखान, खलीलुल्लाखान, मीरखान, शेख-मीर, असदुल्लाखान, लुत्फुल्लाखान, मरहमतखान, बमनयार, फखरखान, मुस्तफाखान, काझिमखान, आझमखान, नासीरखान, रणमस्तखान, दिलेरखान, बहादूरखान, अब्दुल्लाखान, अझीझखान, इनायतखान, सादतखान, अलीयारखान, दीनदारखान, नजाबतखान, काश्मखान, महाबतखान, नौरोजखान, खानखानान, अफियतखान, नेकनामखान, बाराबरखान, अमानतखान, खैर अंदेशखान, खानजादखान, मुहतफतखान, फखरुद्दिनखान, सालेहखान, आजमखान, कमरुद्दीनखान, फैय्याझखान, जान-नीसारखान, जान-सोपारखान, शुजावरखान, शफीखान, बीनाखान, शमशेरखान, फौजदारखान, मिर्झाखान, मिर्झा-नौझार, धालीब-नाझीर, दानीशमन्दखान, महरमखान, सलाबतखान, गैब-नाझीरखान, कितायतखान, कामयाबखान, रुस्तुमखान, नामदारखान, कामदार, खान, अझमतखान, आदिलखान, पुरदिलखान, कमालुद्दिनखान, शहाबुद्दिनखान, बीयामुद्दिनखान, किल्चिखान, जबरदस्तखान, शहाजोरखान, दायमखान, फत-याबखान, मझरखान, झुल्फिकारखान, जैन अलीखान, अफझलखान, दाऊदखान, जान अलीखान, इब्राहिमखान, हसनखान, सर्फराजखान, जाकीरखान, दियानतखान, असालतखान, मीरानबुलखान, मुबारकखान, रसीदखान, मेमतखान, फतेउल्लाखान, गझनफरखान, खादीखान, हबशीखान, हैबतखान, नबीखान, तबरखान,

1. मनुचीने बादशहापाशी असलेल्या ६१ उत्तम तोफांची नावे दिलेली आहेत.

खुरखुबेल्या, इतिकारखान, इक्रमतखान, रणजीतखान, आतारखान, बरकन्दाजखान, जहांगीर खान, खुषनजरखान, आरीफखान, अब्दुल्लाबफा, अब्दुल फेताव, अब्दुल अझीझ, अब्दुल रज्जाक, कामीलखान, होशदारखान.

सर्व उल्लेखिलेले सरदार हे धर्माने मुसलमान असून वंशाने मात्र वेगवेगळे[1] असतात. हे हिंदुस्तानातील प्रमुख सरदार होत. यांना पदव्या आणि तनखे देण्यात येतात. शहाजहानाच्या काळात अशांची संख्या कमी होती. औरंगजेबाच्या काळात ती संख्या बरीच वाढली आहे. औरंगजेब हा पदव्या देतो पण त्या मानाने पगार कमी असतो.

मोगल बादशहा आपले शिपाई, सरदार, सेनाधिकारी, मुले, राण्या आणि राजघराण्यातील इतर स्त्री-पुरुष यांना जी उत्पन्ने लावून देतात त्याची पद्धत बादशहा अकबर याने घालून दिली आहे[2]. मोगलांचा नोकरवर्ग हा "मनसबदार" (मनुचीच्या शब्दात पगारदार) म्हटला जाई. हे वीस, चाळीस, साठ, ऐंशी, शंभर असे मनसबदार असत. त्यानंतर शंभरपासून वाढत वाढत हजारपर्यंत जात त्यांना हजारी म्हणत. हजारी मनसबदारांना उमरा असे म्हणत. तीन हजारी मनसबदारांना नगारी नौबतीचा मान असे. हा मान चार आणि पाच हजारी लोकांना असे. सहा हजारी मनसबदारांचे वार्षिक उत्पन्न ३० लाख, सात हजारींचे ३५ लाख असे. या तीन, चार आणि पाच हजारी मनसबी अगदी श्रेष्ठ सरदारांच्या व राजपुत्रांच्या वाट्याला येत. त्यांचे हुद्देही मोठे असत. उदाहरणार्थ मुख्य प्रधान, इतर मंत्री आणि मोठ्या प्रांताचे सुभेदार. अगदी लहान पगाराचे अधिकारी आणि शिपाई यांना नगद तनखा देण्यात येतो. राण्या आणि राजकन्या यांना अर्धा तनखा नगद आणि अर्ध्यासाठी गावे लावून देण्यात आलेली असतात. अंतःपुरातील इतर स्त्रियांना मात्र नगदी तनखा देण्यात येतो. मुख्य हकीम-वैद्य व विद्वान माणसे यांना काही नगद तनखा आणि काही उत्पन्नाच्या जमिनी अशा रीतीने मोबदला देण्यात येतो.

मनसबदारांनी बाळगावयाचे घोडेस्वार सगळे एकाच जातीचे असू नयेत याची काळजी घेण्यात येते. उदाहरणार्थ एक हजारी मनसबदाराला २५० घोडेस्वार

१. तुर्क, पठाण, इराणी, हिंदुस्तानी इत्यादी वंशाचे असतात.

२. या पद्धतीला मनसबदारी पद्धत म्हणतात. याची चर्चा करताना मनूचीला वस्तुस्थितीचा बोध झालेला दिसत नाही. मनसबीचा आकडा आणि पगार तो एकच समजतो. म्हणजे मनसब म्हणजेच पगार अशी त्याची समजूत दिसते. वास्तविक तसे नाही. उदाहरणार्थ, हजारी मनसबदार याचा अर्थ, एक हजार रुपये पगारवाला असे नाही. तर तत्त्वतः एक हजार घोडेस्वारांचा सरदार असा होतो. यामुळे मनुचीची चर्चा, दुर्बोध झाली आहे. ब्लोकमॅन याने अनुवादलेल्या ऐने अकबरी ग्रंथातील (खंड १ ला पाने २३६-२४९) दिलेले तक्ते आणि शेरे ही पाहिल्यास या पद्धतीचे स्पष्टीकरण होईल.

बाळगावे लागतात. त्यात ६४ पठाण, ६४ मोगल, ६४ रजपूत आणि उरलेले सैय्यद, शेखजादे इत्यादी जातींचे असतात.

बादशहाच्या तैनातीतील आणि सरंजामीतील घोड्यांना डाग देण्याची पद्धत आहे. एखाद्या स्वाराचा घोडा मेला तर दुसरा घोडा घेण्यासाठी त्याला सात दिवसांची मुदत देण्यात येते. त्या अवधीत त्याने घोडा आणला नाही तर त्याची मनसब कमी करण्यात येते.

रोजींदारांचा एक वर्ग आहे. पायदळ शिपाई, काही स्वार, अंतःपुरातील माणसे, तोफखान्याबरचे ख्रिस्ती नोकर, इत्यादींना असे पगार देण्यात येतात. परंतु नाव जरी रोजंदारी म्हणजे रोजचा पगार असे असले, तर प्रत्यक्षात पगार वादप रोज होत नाही. अनेक वेळा महिनोन महिने त्यांना पगार मिळत नाही.

आणखी एक पद्धत सांगण्यासारखी म्हणजे कोणाही माणसाला, मग तो लहान असो वा मोठा शिपायी असो, सरदार असो, अगर सेनाधिकारी असो, नोकर मिळण्यापूर्वी जामिनकी देणे अत्यंत आवश्यक असते.

वर्षातून दोनदा बक्षी हा अधिकारी दरबारात असलेल्या घोडेस्वारांची पाहणी करतो. म्हातारे वा निकामी घोडे अशा तपासणीत काढून टाकण्यात येतात. आणि चांगले घोडे घेण्यासाठी स्वारांना भाग पाडण्यात येते. प्रांतोप्रांतीच्या बक्षींनाही हे काम करावे लागते. बादशहाने एखाद्या सरदाराला एखाद्या मोहिमेवर पाठविण्याचे ठरविले तर तो सरदार आपले स्वार, सरंजाम घेऊन बादशहाच्या पाहणीसाठी राजवाड्याखाली हजर होतो. स्वार डोळ्यात भरण्यासारखे नसले तर त्यांना काढून टाकण्यात येते. किंवा तितका मोबदला सरदाराच्या सरंजामातून कमी करण्यात येतो. एकेका सरदाराच्या तबेल्यात पन्नासपासून दोनशेपर्यंत घोडे असतात. पुष्कळदा हे सरदार खाजगी नोकरांना अशा घोड्यावर बसवून ते खरेखुरे स्वार आहेत असे भासविण्याचा प्रयत्न करतात पण बादशाही अधिकारी या गोष्टीवर नजर ठेवतात. निदान अशी नजर ठेवणे हे त्यांचे कर्तव्य आहे. अर्थात राजधानीपासून लांब असलेले बादशाही अधिकारी लाचलुचपतीमुळे आपल्या कामात कुचराई करतात. हा प्रकार मी (मनुची) अनेकदा पाहिला आहे. ज्यांनी पन्नास घोडे ठेवावे त्यांच्याकडे ६ ते ८ पेक्षा अधिक नसतात असे लोक नियमांची पर्वा करत नाहीत. पन्नास घोडेस्वारांचा पगार मात्र ते उचलतात आणि बादशाही अधिकारी लाचलुचपतमुळे तिकडे दुर्लक्ष करतात.

सरदार आणि सेनाधिकारी आपल्या शिपायांना नियमितपणे पगार देत नाहीत. अनेकांच्या नशिबी प्रत्येक वर्षात ७-८ महिन्यांहून अधिक पगार नसतो. तो सुद्धा सगळा नगद मिळतो असे नाही. सरदारांच्या घरातील जुने कपडे, पगाराऐवजी

देण्यात येतात इतकेच नव्हे तर दोन दोन, तीन तीन वर्षांच्या पगाराची थकबाकी हा नेहमीचाच आढळून येणारा प्रकार आहे. यामुळे शिपायांना सराफांकडून व्याजा-वर कर्ज काढावे लागते. कमाल ही की सरदार आणि सराफ हे ते व्याज वाटून घेतात. कधी कधी या शिपायांना आपल्या नेमणुकांचे कागद सराफांच्याकडे विकावे लागतात. शंभर रुपयांच्या रोख्यावर शिपायांच्या पदरी २० ते २५ रुपये पडतात. अशा दैन्यावस्थेत शिपायाला नोकरी सोडून जाताही येत नाही, आणि पोटही भरत नाही. शिपायाने आपण होऊन नोकरी सोडली तर त्याचा दोन महिन्यांचा पगार कापून घेण्यात येतो.

आताच पाहा. हा ग्रंथ मी (मनुची) लिहित आहे. याचवेळी[1] सॅन थोम (मद्रास) येथे पुढील घटना घडली. तीवरून माझ्या म्हणण्यातील सत्यता पटेल जिंजीचा किल्ला हा कर्नाटक[2] प्रांतात आहे. येथील एक हजार शिपाई हे सॅन थोमला आलेले आहेत. प्रांताच्या मोगल दिवाणाला ते पुढीलप्रमाणे विनंती करीत आहेत "आमचा खर्च भागविण्यासाठी, आम्हाला आणि किल्ल्यामागे असलेल्या शिबंदी-तील ७ हजार लोकांच्यासाठी पुरेशी रक्कम द्या. तीन वर्षांपासून आम्हाला बाद-शहाकडून पगार मिळालेला नाही." दिवाणाने प्रथम त्यांची विनंती नाकारली. पण त्यांनी त्याला धरणे धरून पेचात घातले. शेवटी दिवाणाने त्यांचा ५ महिन्यांचा पगार चुकता केला, त्यात सुद्धा निम्मा पगार नगद आणि निम्या पगाराच्या मोब-दल्यात जुने कपडे दिले. या कापडांचीही किंमत त्याने अव्वाच्या सव्वा लावली.

या दिवसांत अशा प्रकारच्या अनेक भानगडी उपस्थित आहेत. राज्यकारभारात शिस्त राहिलेली नाही. प्रत्येकजण आपण किती लुबाडू शकू याचाच विचार करत असतो. पण काहीही घडले तरी त्याची बातमी बादशहाकडे क्वचितच देण्यात येते. तो आता म्हातारा झाला आहे. त्याचे वय सुमारे ८५ वर्षांचे आहे. तो मराठ्यांशी मोहीम करण्यात गुंतला आहे. त्याचे साम्राज्यही अतिशय मोठे आहे. त्यांचे अधिकारी अन्याय आणि जुलूम करतात पण त्यांना आवरणे त्याला जमत नाही. त्यांना जे हवे तेच ते त्याला सांगतात. बादशहाच्या दरबारात त्यांचे मित्र आणि हितचिंतक असतात. ते लोक बादशहाच्या जवळपासच्या अधिकाऱ्यांना लाच स्वाऊ घालतात. आणि आपले हेतू बिनधोकपणे साध्य करून घेतात.

बादशहाच्या दरबारापासून दूर अंतरावर असलेल्या स्थळांचे काही अधिकारी बादशहाकडून आलेल्या हुकूमांची पर्वाही करत नाहीत. अमके अमके ठिकाण शत्रूने वेढले आहे, तो वेढा उठवा, किंवा अमक्या अमक्याच्या मदतीला जा, अशी बादशहाने आज्ञा केली तर, आपल्यापाशी खर्चाला रकमा नाहीत ही सबब सांगून

१. सुमारे इ. स. १७००.

२. आता तामीळनाडू राज्यात.

हे अधिकारी कामगिरी टाळतात. मग बादशहा त्यांना खजिन्यातून काही रकमा देतो. ती रक्कम त्यांच्या मनसबीतून पुढे वजा करण्यात यावी अशी व्यवस्था करण्यात येते. पण या अवधीत शत्रू आक्रमण करून लुटालुट करून जातात. या अधिकाऱ्यांना फक्त आपला स्वार्थ दिसतो. चांगली माणसे प्रांतातून प्रवास करत असली आणि त्यांना सगळ्या सोयी पुरविण्यात याव्यात असे बादशहाचे आदेश असले तरी हे अधिकारी आपल्या स्वार्थासाठी अशा लोकांनाही अडवणूक करून त्यांचे नुकसान करतात. असे प्रकार अनेक वेळा झालेले मी (मनूची) पाहिले आहेत.

नुकतेच घडलेले एक उदाहरण मी पुढे देत आहे. इंग्लंडचा राजदूत नुरीस (सर बुइल्यम नॉरिस) हा मच्छलीपट्टणहून औरंगजेबाला भेटण्यासाठी निघाला. बादशहाने त्याच्या सोबती चार दंडधारी पाठविले. त्याशिवाय बादशहाने प्रांतोप्रांतीचे सुभेदार, नायब सुभेदार आणि इतर अधिकारी यांना आदेश (हस्बुल हुकूम) पाठविले की, नॉरिसला प्रवास करून देण्यात यावे. आणि संरक्षण देऊन आपापल्या प्रांताच्या सरहद्दीपर्यंत पाठविण्यात यावे.

नॉरिस मच्छलीपट्टणहून निघाला. थोड्याच अंतरावर त्या जिल्ह्याच्या फौजदाराने त्याला अडविले. आणि त्याला कळविले की, नॉरिसबरोबर असलेल्या सामानाबद्दल त्याने जकात दिली पाहिजे. फौजदार म्हणाला "बादशहाच्या हस्बुल हुकुमाला काही महत्त्व नाही". नॉरिसबरोबर असलेले बादशहाचे दंडधारी फौजदाराचा निषेध करू लागले. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. परिणाम असा झाला की, नॉरिस मच्छलीपट्टणला परतला. प्रवासासाठी त्याने जमविलेले घोडे, उंट, बैल-गाड्या इत्यादी सामान विकून टाकले. त्यात त्याचे फार नुकसान झाले. यानंतर नॉरिस हा १७०० च्या ऑगस्ट महिन्यात समुद्रमार्गे सुरतेकडे रवाना झाला.

वर मी जे काही सांगितले आहे, त्यावरून मोगलांचा कारभार म्हणजे एक प्रचंड गोंधळ होय, असे दिसून येईल. या प्रसंगी एका म्हाताऱ्या बाईला आलेला अनुभव सांगणे अनुचित होणार नाही. अधिकाऱ्याने आपली जमीन बळकावली अशी या बाईने बादशहापाशी तक्रार केली. तिची जमीन तिला परत मिळावी असे एकदा नव्हे तर सहा वेळा तिने बादशहाचे हुकूम मिळविले. पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. सातव्या वेळेस हुकूम मिळवून ती अधिकाऱ्याकडे गेली, तेव्हा अधिकाऱ्यांनी तिला धुडकावून लावताना जे शब्द वापरले ते अशिष्ट असल्यामुळे येथे देता येत नाहीत. त्या बाईने ते शब्द बादशहाला सांगितले. यावर कोणत्याही प्रकारचा राग न दाखविता बादशहा तिला म्हणाला "माझे अधिकारी माझ्या हुकूमाची अम्मलबजावणी करत नाहीत. मी या बाबतीत काही करू शकत नाही. तू आपले गाऱ्हाणे परमेश्वराजवळ मांड".

अशा प्रकारच्या दुर्लक्षामुळेच हे साम्राज्य मोडकळीस आले आहे. औरंगजेबाने या बाबतीत आपल्या बापाचे धोरण चालविले असते, तर आज साम्राज्यात दिसत आहे, इतकी बेशिस्त माजली नसती. हुकूम न पाळणाऱ्यांचा शहाजहान बादशहा त्यांचा शिरच्छेदन करी अगर विषारी सापाकडून त्यांना दंश करी. हा बेशिस्तपणा मोगल अधिकाऱ्यांच्याचमुळे होतो असे नाही. औरंगजेब बादशाहाही अनेक वेळा दिलेली वचने पाळत नाही. फर्मानाच्या द्वारे त्याने काही गावे किंवा जमिनी दिल्या असल्या तर अनेक वेळा बादशहा स्वतःच्या फर्मानांची सुद्धा किंमत ठेवीत नाही. शहाजहान बादशहाने चिनाब नदीजवळ निकोदर नावाचे एक खेडे अलीमर्दानखान या सरदाराला वंशपरंपरा दिले होते, औरंगजेबाने ते काढून घेतले. राजा जयसिंगाने मेवाती लोकांच्याकडून जिंकून घेतलेल्या सांभर या प्रांताबद्दलही तो असेच वागला. शिवाजीशीही त्याची वागणूक अशीच होती. हिंदु राजे, उदेपूरचा राणा, आणि इतर अनेकांना औरंगजेबाच्या या वागणुकीचा अनुभव आला. डच लोकांना त्याने फर्मान दिले होते. त्याचीही अमलबजावणी झाली नाही.

फायदेशीर फर्मान मिळविणे या साम्राज्यात कठिण नाही. पण अधिकारी तुमचे मित्र नसतील तर ती फर्माने निरुपयोगी ठरतील. म्हणून ज्यांना काही कामे करून घ्यावयाची असतील त्यांनी या लोकांशी मैत्री केली पाहिजे. त्यांना भेटी, नजराणे दिले पाहिजे. हिंदुस्थानात हा प्रकार सर्रास चालतो. कारण आपल्या कामात यश मिळविण्यासाठी या नोकरवर्गाची कृपादृष्टी असणे आवश्यक असते. ते आपल्या मालकांना मनात येईल त्याप्रमाणे खरे खोटे सांगून तुमच्या कार्यात विघ्ने आणू शकतात.

**निवृत्त अधिकाऱ्यांना मोबदला :** एखादा मोठा अधिकारी किंवा सेनापती वार्धक्यामुळे किंवा इतर काही कारणामुळे सेवानिवृत्त झाला तर बादशहा त्याच्या उपजीविकेसाठी काही वेतन मंजूर करतो. पण याचे निश्चित नियम ठरलेले नाहीत. हा बादशहा आपल्या मर्जीप्रमाणे वागतो. याची दोन उदाहरणे पुढे देत आहे. शाइस्ताखानाला दोन भाऊ होते. एकाचे नाव बहमनयार आणि दुसऱ्याचे होते फर्रुखयार. बहमनयार हा अन्तर्गळाने आजारी असल्यामुळे काही काम करू शकत नव्हता. फर्रुखयार हा शारीरिक व्यंगामुळे काम करू इच्छित नव्हता. बादशहाने त्या दोघांना प्रत्येकी एक लाख रुपये वार्षिक वेतन मंजूर केले. बादशहाने वजीर जाफरखान याच्या मुलाबरोबर याच्या अगदी उलट वागणूक केली. जाफरखान वारल्यावर त्याचा मोठा मुलगा नामदारखान[1] याने निवृत्त होण्याची इच्छा दाखविली. कारण बादशहाने त्याला १० हजार रुपये वार्षिक वेतन मंजूर केले. नामदारखानाला वाटले की आपल्या प्रतिष्ठेच्या मानाने ही रक्कम फार अपुरी आहे. नामदारखानाची

1. जाफरखान १६७० मध्ये मरण पावला.

आणि फर्झाना बेगम (शहाजहानच्या बायकोची बहीण) ही मी (मनुची) तर म्हणेन की ती शहाजहानची प्रेयसी होती. लोक असेही म्हणत की, नामदारखान हा शहाजहानकडून फर्झाना बेगमला झालेला मुलगा होता. या बाबतीत मलाही काही संशय वाटत नाही कारण नामदारखान हा राजपुत्र दारासारखा दिसत असे. नामदारखान हा माझा मोठा मित्र होता. माझी आणि त्याची घनिष्ठ ओळख होती. त्याचे गुण आणि वागणूक एखाद्या राजपुत्राप्रमाणे होती. नामदारखान हा कसलेला शिपाईगडी होता. या मोठ्या माणसाला पुढे घशात कर्क रोग झाला. औरंगजेबाने त्याचा इलाज करण्यासाठी आपले हकीम पाठविले खरे, पण इतर कोणीही नामदारखानाला भेटता कामा नये अशी आज्ञा केली. नामदारखानाचा १६८७ मध्ये मृत्यु झाला.[1]

राण्यांच्या आणि राजकन्यांच्या नोकरवर्गापैकी शिपायी, खोजे आणि इतर नोकर यांना मोगल सैन्यातील इतर शिपायांच्या मानाने अधिक नियमितपणे पगार मिळतो. इतर शिपायांप्रमाणे त्यांचे हाल होत नाहीत. हे लोक मोहिमेवर कधी जात नाहीत. अर्थात बादशहा आणि राजपुत्र यांच्या बायका, मुली, रखेल्या ह्या जेव्हा जातात, तेव्हा हे नोकर लोक त्यांच्या बरोबर असतात. हा जनानखाना सैन्याच्या पिछाडीला असतो. जनानखान्याच्या मागे खजिने लादलेले हत्ती असतात. आपत्काली किंवा बादशहाचा जनानखाना व इतर लवाजमा यांच्यावर दुर्धर प्रसंग ओढवला तर या खजिन्यांचा उपयोग करतात. असे म्हणतात की तैमूरलंगाच्या वेळेपासून मोगल राजवंशात कोणतीही राणी युद्धात कैद झालेली नाही. याला अपवाद बादशहा हुमायूंच्या बायकोचा. ती शेरशहाच्या ताब्यात सापडली. पण त्याने तिला इराणला हुमायूंकडे पोहचती केली.

घोडे : मोगल सैन्यात वापरले जाणारे घोडे हे बल्क, बुखारा आणि काबूल येथून आणले जातात. त्या भागांतून दरवर्षी एक लाखाहून अधिक घोडे आयात केले जातात. त्यांच्यावरील करामुळे बादशहांना बरेच उत्पन्न मिळते. सिंधू नदी ओलांडून हिंदुस्तानात येताना घोड्यांच्या किंमतीवर शेकडा २५ जकात घेतली जाते.

१. नामदारखान—हा उमदत-उल्मुल्क जाफरखान याचा सर्वांत थोरला मुलगा (मासीर-उल उमरा III. ८३०) या ग्रंथाच्या ८३३ पानावर (पहिली ओळ) असे दिले आहे की, औरंगजेबाच्या अमदानीत १७ व्या वर्षी (१६७३–७४) याच्यावर बादशहाची इतराजी झाली. त्याची मनसब काढून घेण्यात आली आणि त्याला ४० हजार रुपये निवृत्ती वेतन देण्यात येऊ लागले. तो एकांतवासात राहिला होता. मनुचीच्या वर्णनावरून हा प्रसंग जाफरखानाच्या मृत्युनंतर लवकरच घडून आला असावा असे वाटेल. पण तसे नाही. बापाच्या मृत्युनंतर (इ. स. १६७०) त्याचवर्षी नामदारखानाची दिल्लीचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. इ. स. १६७३–७४ मध्ये त्याच्यावर बादशहाची इतराजी झाली असावी. पण १६७५ मध्ये ही इतराजी दूर झाली. कारण त्या वर्षी अवध प्रांताच्या सुभेदारीवर त्याची नेमणूक झाली आहे.

उत्तमोत्तम घोडे बादशहाच्या तैनातीसाठी ठेवले जातात. साधारणपणे १२ हजार घोडे निवडून घेण्यात येतात. बल्ख, बुखारा या भागातून दरवर्षी अनेक उंटावर लादलेली खरबुजे, टरबुजे, नासपाती, बेदाणा, डाळिंबे, कीसमीस आणि इतर सुका-मेवा यांची हिंदुस्थानात आयात होत असे. या भागातून येणाऱ्या घोड्यांना तुर्की म्हणतात. हे घोडे चपळ, काटक, निर्भय वृत्तीचे आणि इमानी असतात.

**औरंगजेब आणि त्याची मुले :** औरंगजेबाच्या वागणुकीतील दक्षपणा आणि धूर्तता ही पूर्वीच्या बादशहांत याप्रमाणात कधीच आढळून आली नाही. कित्येकांना तो बादशहा म्हणून राहणे पसंत नव्हते. त्यामुळे मिळालेले सिंहासन टिकविण्याची त्याला सतत धडपड करावी लागली आहे. आता औरंगजेबाचे मुलेच घ्या. तो त्यांच्यावर सतत लक्ष ठेऊन असतो. आपण आपल्या बापाचा विश्वासघात केला तसेच न जाणो आपली मुले ही वागतील अशी त्याला सतत काळजी वाटते. आपली मुले काय करतात याची बित्तं बातमी काढण्यासाठी त्याचे हेर सतत कामावर असत. याशिवाय औरंगजेबाची आणखी एक सवय होती. सुरवातीस तो रात्रीच्या वेळी वेषांतर करून आपला मुलगा शाहा आलम याच्या वाड्यावर जाऊन तेथे काय चालले आहे हे पाहत असे.

शाहा आलमला आपल्या बापाच्या कृत्यांची चांगली माहिती होती. तोही चातुर्याने आपल्या बापावर मात करण्याचा प्रयत्न करी, शाहा आलमपाशी धूर्त हेर होते. औरंगजेबाचे येत तें त्याला कळवित असत. एके रात्रीची हकीकत. उत्तम चांदणे पडले होते. राजपुत्र शाहा आलम हा आपल्या रखेल्यांच्या बरोबर मौज मजा करीत होता. इतक्यात हेरांनी त्याला कळविले की बादशहा येत आहे. ही बातमी ऐकताच शाहा आलम ताबडतोब उठला. त्याने बायकांना निरनिराळ्या खोल्यातून लपवून ठेवले आणि स्वतः एका खोलीत बसला. तेथे कुराणाची प्रत समोर घेऊन तो मोठमोठ्याने पठण करू लागला. औरंगजेब आत येऊन पाहतो तो शाहा आलमचा हा उद्योग चाललेला. औरंगजेबाने त्याला म्हटले "हे काय चालवले आहेस ? हा चंद्र कुराण पठणाच्या ऐवजी मौजमजेलाच अनुकूल आहे.' त्यावर शाहा आलमने उत्तर दिले "कुराणातील या ओळी मला चंद्रापेक्षा अधिक सुंदर वाटतात आणि सूर्यप्रकाशाने होणार नाही इतका आनंद त्या ओळी वाचून मला होतो." या उत्तराने औरंगजेब मुग्ध झाला. त्याने शाहा आलमचा तनखा वाढविला. शाहा आलमचा हा गुण आपल्याला फार आवडला हे दाखविण्यासाठी त्याने आणखी वस्तु देऊन अनेक प्रकारे आपला संतोष व्यक्त केला.

औरंगजेब वाटेल तेव्हा शाहा आलमकडे येतो, हे शाहा आलमच्या लोभातल्या माणसांच्या लक्षात आले. या संधीचा उपयोग करून घेऊन त्याला ठार मारता येईल, या गोष्टीस तुम्ही आपली संमती द्या. असे त्यांनी शाहा आलमला सुचविले. नाही

तरी औरंगजेब आपल्या बापाशी आणि भावांशी कसे वागला हे आपल्याला माहितच आहे. या म्हाताऱ्याच्या (औरंगजेब) मृत्युनंतर आपण सहजपणे बादशहा होऊ शकाल असेही त्या लोकांनी शाहा आलमला सुचविले. शाहा आलम या गोष्टीला कधीच कबूल झाला नाही. तो म्हणाला "मी असे करीन तर माझी मुलेही एक दिवस माझ्याशीही असेच वागतील. आणि मग ही घातुक पद्धत आमच्या घराण्यात पिढ्यानपिढ्या चालत राहील. या बाबतीत परमेश्वर मला माझ्या बापाचे अनुकरण करू देणार नाही अशी मला आशा आहे. शिवाय मला घाई करण्याचे कारण काय ? मी अद्याप तरुण आहे."

राजपुत्र शाहा आलम पंचवीस वर्षांचा झाला. शौर्य आणि साहस या गुणांचा आपल्यामध्ये अभाव आहे हे त्याला पूर्णपणे माहीत होते. वेळ प्रसंगी आपल्या बचावाचे साधन म्हणून तो मंत्रविद्या शिकण्याचे मागे लागला. औरंगजेबही स्वतः राजपुत्र असताना मंत्रविद्येचा अभ्यास करीत असे. शाहा आलम हा मंत्रविद्येच्या ग्रंथांचा अभ्यास करू लागला. पण या छंदामुळे शाहा आलमला मतिभ्रंश झाला. शाहा आलम आजारी आहे असे कळल्यावरून एक दिवस औरंगजेब त्याला भेटण्यास गेला. शाहा आलमच्या खोलीत औरंगजेबाने प्रवेश केला तोच शाहा आलमने औरंगजेबाची दाढी धरली आणि रागाने त्याला विचारले "तू कोण आहेस, आणि माझ्या घरात का आलास ? शाहा आलम हा नेहमीच बादशाहाशी आज्ञाधारकपणे वागत असे आणि बादशहाही त्याच्यावर प्रेम करी." आपल्या मुलाची अशी अवस्था पाहून औरंगजेबाला अतिशय काळजी वाटू लागली. त्याने शाहा आलमवर उपचार करण्यासाठी आपले खास हकीम पाठविले. हकिमांनी ठरविले की शाहा आलमच्या अंगातून रक्तस्राव करविल्याने त्यास आराम वाटेल. तसे करण्यात आले. शाहा आलम बरा झाला. पण मंत्र विद्येचा अभ्यास चालू ठेवला तर आपला निकालच लागेल असे त्यास वाटू लागले. या कटु अनुभवानंतर त्याने तो नाद पूर्णपणे सोडून दिला.

या नंतर शाहा आलमने आपल्या राहणीची पद्धत बदलून टाकली. तो आता पुरा ऐषआरामाच्या मागे लागला. दारू व लहर लागेल त्या करमणुकीच्या प्रकारांनी तो आपला वेळ घालवू लागला. पण या सर्व गोष्टी तो गुप्तपणे करी. या त्याच्या वागणुकीची औरंगजेबाला काहीच माहिती नव्हती. आपली मुले आपल्याप्रमाणे अतिशय कर्मठपणे वागतात हे पाहण्यात औरंगजेबाला मोठा आनंद वाटत असे. शाहा आलमला आपल्या बापाचा हा स्वभाव ठाऊक होता. औरंगजेबाने आपल्यावर खूप व्हावे म्हणून शाहा आलम आपण अतिशय धर्मनिष्ठ आणि कर्मनिष्ठ आहोत असे शक्य तितक्या मार्गांनी दाखवित असे. अनासक्ती आणि नम्रभाव ही औरंगजेबाला फार आवडतात, हेही शाहा आलमला माहीत होते. म्हणून शाहा आलम हा संपत्ती, छानछोकीपणा इत्यादींसंबंधी वरकरणी अतिशय तिरस्कार दाखवीत असे.

आपली खाण्यापिण्याची पात्रे ही लाकडाची बनविण्यात यावी. अशी त्याने आज्ञा केली आणि आपण या काष्ठपात्रातूनच जेवणखाण करतो असा त्याने बाहेर मुद्दामच पुकारा करविला. त्याच्या स्वारीच्या घोड्यांच्या खोगीरी वगैरे साध्या कातड्याच्या असत. घोड्यांना मुळीच सजविण्यात येत नसे. अर्थात त्यांच्या खजिन्यातील माणसांचे घोडे उत्तम सजविलेले असत.

शाहा आलमचा हा देखावा वरवरचा आहे, वस्तुस्थिती याच्या अगदी उलट होती. ही गोष्ट मला स्वतःला पूर्णपणे माहीत होती. आपल्या वाड्यात शाहा आलम ऐषारामात राही. तो सुवर्ण पात्रातून आपले खाणेपिणे करी. त्याच्या मदिरापानाबद्दल मी (मनुची) अचूक माहिती सांगू शकतो. कारण इराण आणि युरोप येथून उत्तमोत्तम दारू आणविण्याचे काम माझ्याकडे सोपविले होते. मी हे मद्य सुरतेहून मागवीत असे. अनेक वेळा शाहा आलमजवळील मद्याचा साठा संपला की तो माझ्याकडे माणसे पाठवून मद्य मागवून घेई. या बाबतीत आपल्या मुसलमान नोकरांपेक्षा त्याचा माझ्यावर अधिक विश्वास असे. एकदा त्याला मद्य चढले असताना तो मला म्हणाला "रत्नाच्या पात्रातून भोजन न करणारा राजा मला तिरस्करणीय वाटतो."

शाहा आलमची मुले बापासारखीच ढोंगी होती. ती आपल्या आजोबाला संतुष्ट करण्याचा प्रयत्न करत असत. गुप्तपणे तेही आपल्या बापासारखे (शाहा आलमसारखे) ऐषारामाने वागत. एके दिवशी एका हेराने औरंगजेबाला कळविले की, आपण सुलतान मोईजुद्दीन[1] (शाहा आलमचा मुलगा) याच्या वाड्यात मद्याची बाटली नेली जात असताना पाहिले. वास्तविक पाहता ही दारू सुल्तान मोईजुद्दिनने माझ्याकडून (मनुची) मागविली होती. औरंगजेबाने आपला मुलगा शाहा आलम आणि नातु सुल्तान मोईजुद्दिन यांना बोलावणे पाठवून त्यांना बराच उपदेश केला. सुल्तान मोईजुद्दिन म्हणाला "माझ्या वाड्यात एक बाई आजारी आहे. तिला औषध म्हणून मद्य हवे होते." शाहा आलमने या प्रकरणात आपला काहीच हात नाही असे दाखविले. औरंगजेबाला खुष करण्यासाठी त्याने आपल्या मुलाचा दुधभाऊ यानेच ही दारू पाठविली असा आरोप करून त्याला वाड्यातून हाकलून लावले. यामुळे माझ्यावरील आपत्ती टळली. दारू मी पाठविली हे जर त्यांना कळले असते तर खात्रीने मला शिक्षा झाली असती. तीतून मी वाचलो.

राजपुत्र आजमशाहा उर्फ आजम तारा हाही मद्यपान करी; पण ते उघडउघड. इतकेच नव्हे तर मद्याच्या धुंदीत तो आपल्या बापाची पर्वा न करता धिंगाणा घाली. औरंगजेबाला आजमच्या या वागणुकीचा फार राग येई. पण या मुलावर त्याचे प्रेम असल्यामुळे तो त्याच्या दोषाकडे काणाडोळा करी. एके दिवशी नावेतून

१. मोईजुद्दिन—हा पुढे जहान्दर शाहा या नावाने गादीवर आला.

दरबाराकडे जात असता, आजमतारानें नावाड्यांना विचारले याच नावेतून बंगाल-कडे जाण्यास किती दिवस लागतील. त्याच्या (राजपुत्र आजम) पाठीमागे बसलेल्या खोजाने नावाड्यांना राजपुत्राच्या प्रश्नाचे उत्तर न देण्याबद्दल खुणावले. दरबारी पोहचल्यावर त्या खोजानें, आजमतारानें नावाड्यांना विचारलेल्या प्रश्ना-संबंधीची हकीकत बादशहाच्या कानावर घातली. राजपुत्र आजम राजवाड्यात दाखल होताच त्याला (राजपुत्राला) अटक करून निर्बंधात ठेवण्यात आले. हा निर्बंध वर्षभर होता. या अवधीत त्याला मद्य पिण्यास मिळाले नाही. दाराची मुलगी जानी बेगम हिच्याशी त्याचे लग्न झाल्यानंतरच राजपुत्र आजमची सुटका झाली.[1]

आपल्या मुलांपैकी प्रत्येकाला राज्यपद हवे आहे, याची औरंगजेबाला जाणीव होती. कुतूहल म्हणून एक दिवस त्याने, तुम्हाला राज्य करण्याची इच्छा आहे काय, असे आपल्या मुलांना विचारले. यावर शाहा आलम म्हणाला "कधी काळी आपल्याला विश्रांतीची आवश्यकता वाटली आणि राज्य मला द्यावयाचे आपण ठरविले तर राज्यपद स्वीकारण्यास मला आनंद वाटेल. मी मोठा मुलगा असल्या-नेही न्याय्यच गोष्ट होईल. या शिवाय राज्यपदाला लागणारे गुण माझ्यात आहेत. मी एक सत्प्रवृत्तीचा मनुष्य आहे. असे असूनही आपल्या हयातीत शांतपणे काल-क्रमणा करणे हेच माझे कर्तव्य आहे." बापाच्या मृत्युनंतर आपण गादीवर येण्याचा शक्य तो प्रयत्न करू असे शाहा आलमने सूचित केले.

औरंगजेबाचा दुसरा मुलगा आजम म्हणाला "माझे एक वडील बंधू असले तरी राजा होण्यासाठीच माझा जन्म झाला आहे. कारण माझे आई आणि वडील ही दोघे मुसलमान असून दोघे राजघराण्यातील आहेत."

औरंगजेबाचा तिसरा मुलगा राजपुत्र अकबर म्हणाला "माझे ग्रह भाग्यशाली आहेत. यामुळे राज्यपदावर माझा हक्क आहे असे मी समजतो. माझा जन्म सुमुहूर्तावर झाला. मी मोठा पायगुणाचा आहे. माझ्या जन्मानंतर बादशहाचा भाग्योदय झाला. माझ्या जन्माच्या वर्षीच बादशहाने जसवंतसिंग, करीमखान आणि दारा यांचे पराजय केले."

औरंगजेबाचा चौथा मुलगा राजपुत्र कामबक्ष म्हणाला "हे राज्य माझ्या हक्काचे आहे यात संशय नाही. कारण तुम्ही सगळे भाऊ बादशहा राजपुत्र असताना झालेले आहात. मी मात्र माझे वडील बादशहा झाल्यानंतरच जन्मलो आहे." असे म्हणून कामबक्षाने आकाशाकडे पाहिले आणि म्हटले "परमेश्वराच्या

१. राजपुत्र आजमचा जन्म १६५३ मध्ये झाला. त्याचे लग्न १६६८ मध्ये झाले. लग्नाच्या पूर्वीची घटना असे मनुची म्हणतो. आजमचे वय विचारात घेता ही घटना विश्वासार्ह वाटत नाही आणि आजम तारा एक वर्ष निर्बंधात होता यालाही पुरावा नाही.

मर्जीप्रमाणे घडो", कामबक्षाच्या या वाक्याने औरंगजेबाला फार आनंद झाला. त्याने त्याचा तनखा वाढविला. कामबक्ष त्याला अधिक आवडू लागला.

पण औरंगजेबाने आपल्या भावना उघड केल्या नाहीत. तो आपल्या मुलांना म्हणाला "तुमच्या या सर्व इच्छा पूर्ण होण्यास फार मोठा काळ लागणार आहे. ज्योतिष्यांनी, मी १२० वर्षे राज्य करणार आहे असे मला सांगितले आहे. आणि त्यांच्या बोलण्यावर माझा दृढ विश्वास आहे." यावर आपली मुले अभावितपणे काही तरी बोलून जातात की काय हे पाहण्याचा त्याचा हेतू होता. पण कोणीही तोंड उघडले नाही. आपला वडील भाऊ सुलतान महम्मद याच्या नशिबी आलेली कैद आणि मृत्यु याचे उदाहरण त्यांच्या समोर होते.

औरंगजेबाला आपला मोठा मुलगा शाहा आलम याच्या स्वभावाचा काना-कोपरा माहीत होता. त्याने शाहा आलमची हरप्रकारे परीक्षा केली होती. शाहा आलममध्ये साहस आणि धैर्य यांचा पूर्ण अभाव आहे आणि बंड करण्याचे धाडस तो कधीच करू शकणार नाही याबद्दल औरंगजेबाला पूर्ण खात्री होती. शाहा आलमच्या भित्र्या स्वभावाचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे. तो लहान होता त्यावेळची गोष्ट. तो एकदा शौच्याला बसला असताना, एक उंदीर समोरून पळत गेला. शाहा आलम इतका बावरला की इजार हातात धरून तो ओरडतच बाहेर आला. जवळपास असलेल्या खोजांना प्रथम असे वाटले की शाहा आलमला कदाचित साप चावला असावा. औरंगजेबाला ही बातमी कळली तेव्हा तो म्हणाला "तैमुरच्या वंशात इतका भित्रा राजपुत्र जन्मावा हे मोठे आश्चर्यच म्हणावे लागेल." शाहाआलममध्ये साहस आणि धैर्य यांचा अभाव आहे.[1] उलट शाहाआलमचा मोठा भाऊ सुल्तान महम्मद याच्यामध्ये हे गुण बाजवीपेक्षा अधिकच आहेत. असे असले तरी तितक्याने औरंगजेबाचे समाधान होण्यासारखे नव्हते. तो स्वतः आपण धार्मिक बाबतीत कडवे आणि कर्मठ असल्याचा आव आणी. त्यामुळे शाहा-आलमचा भित्रेपणा हे सुद्धा त्याचे ढोंगच तर नसेल असे त्याला वाटू लागले. म्हणून शाहा आलमची परीक्षा पाहण्यासाठी औरंगजेब एकदा त्याला म्हणाला "ज्योतिष्यांनी असे भाकित केले आहे की, तू मोठा झाल्यावर माझ्या विरुद्ध बंड करणार आहेस". बापाचे हे शब्द ऐकताच शाहाआलम थरथर कापू लागला. आपली तलवार बादशहाच्या पायाजवळ टाकून तो म्हणाला "मी असे करण्यापेक्षा माझा शिरच्छेद झालेला बरा". हे बोलताना त्याने व्यक्त केलेल्या भावना बादशहाला समजून आल्या. शाहाआलमला आलिंगन देऊन बादशहाने त्याची तलवार त्याला परत केली आणि बादशहा त्याला म्हणाला "तू असे काही (बंड) करशील असे मला मुळीच वाटत नाही".

---

१. आजम तर शाहा आलमला तुच्छतेने बनिया (वाणी) म्हणत असे.

राजघराण्यात एकमेकांवरचा अविश्वास इतका तीव्र असतो की, बापाला मुलाचा अथवा मुलाला बापाचा तिळमात्र भरवसा वाटत नाही. माझाच (मनुची) एक अनुभव पुढील प्रमाणे आहे. गोव्याच्या घटनेनंतर मला परत शाहाआलमच्या नोकरीत घेतले जावे असे शाहाआलमचा थोरला मुलगा मोईज्जुद्दिनला वाटे. त्याने मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला. परंतु बापाने (शाहाआलमने) काही एक कारण नसता, मला मोइजुद्दिनच्या दरबारी न जाण्याचा हुकूम केला. त्याने आपला मुलगा सुलतान मोइजोद्दिन याला पुढील प्रमाणे आज्ञा केली. 'तुम्ही मनुचीला आपल्या-कडे बोलावून घेऊ नये. तुम्ही स्वतःच्या हकीम-वैद्याकडून कामे घ्या. मनुचीकडून काम घेण्याची जरूरी नाही." यावर पितापुत्रांची थोडी बोलाचाली झाली.

काही काळाने सुलतान मोईजोद्दिनने आजारी पडल्याचे सोंग केले आणि तो बापाच्या (शाहाआलमच्या) दरबारी जाईनासा झाला. शाहाआलमने त्याचा इलाज करण्यासाठी आपले इराणी हकीम त्याच्याकडे पाठविले. हकिमांनी कळविले की सुलतान मोईजुद्दिनला काहीही झालेले नाही. या हकिमांना खोटे पाडून आपल्या इलाजासाठी मनुची हवा हे दाखविण्यासाठी मोइजुद्दिनने आपल्या एका दासीला आपल्या मानेचा चावा घेण्यास लावले. यामुळे मानेवरील तो भाग हिरवा निळा झाला. सुलतान मोईजुद्दिनच्या मानेवरील भाग हिरवा निळा झाला आहे हे, शाहाआलमला समजले. पण त्याचे खरे कारण त्याला उमगले नाही. त्याला वाटले की रक्तस्राव केल्याने मोइजुद्दिनचा आजार बरा होईल. शाहाआलमने मला (मनुचीला) बोलावणे पाठविले आणि "माझा मुलगा सुलतान मोईजुद्दिन तुला बोलविले तेव्हा तू त्याच्याकडे जात जा" असे त्याने मला सांगितले. अशा रीतीने पितापुत्रांची दिलजमाई झाली.

शाहाआलमच्या परिवारातील या बारिक सारिक गोष्टी मी कशा सांगू शकतो. याचे वाचकांना आश्चर्य वाटेल. या गोष्टी मला कशा समजल्या हे मी पुढे सांगतो. शाहाआलमच्या अंतःपुरातील दिलशू नावाची दासी आजारी पडली. तिला शोष येत नसे. वेळोवेळी तिची शुद्ध जाई. यावर सर्व उपाय झाल्याबर मला उपचार कर-ण्यास सांगितले. मी म्हटले "मी उपचार करू शकणार नाही. पण उपाय सुचवीन आणि त्यामुळे तिची प्रकृती सुधारेल.

तिचे लग्न करण्यात यावे हा उपाय मी सुचविला होता. त्याप्रमाणे तिचे लग्न होताच तिची प्रकृती सुधारली. मग इतर काही दासींनीही याच रोगाने ढोंग केले. त्यांच्याही बाबतीत तोच उपाय करण्यात आला. त्याही बऱ्या झाल्या. या सुखी झालेल्या स्त्रिया माझ्याबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त करीत आणि म्हणुनच त्या राजपरिवारातील अनेक गोष्टी त्यांच्याकडून मला कळत.

राजपुत्र शाहाआलमची माझ्यावर फार कृपादृष्टी होती. त्यामुळे या राजपुत्राकडे मी असताना ज्या अनेक घटना घडल्या त्या मजवरील त्याच्या प्रेमाच्या द्योतक होत्या. म्हणून त्यांतील काही येथे सांगणे निरर्थक वाटणार नाहीत असे मला वाटले. मी अविवाहित आहे असे पाहून राजपुत्र शाहाआलमने मला एकदा अंतःपुरात बोलावणे पाठविले. तो पडद्याच्या मागे बसला होता, हे मला माहीत नव्हते. त्याची मोठी पट्टराणी पडद्याआडून माझ्याशी बोलू लागली. ती म्हणाली "तुम्ही लग्न का करत नाही?" मी म्हटले "माझ्या प्रतिष्ठेला अनुरूप अशी कोणी आकर्षक स्त्री मला भेटली नाही." शाहाआलम आणि पत्नी यांची इच्छा, मी लग्न करून त्यांच्या पदरी रहावे अशी होती. लग्नामुळे मी हिंदुस्तान सोडणार नाही आणि त्यांच्या दरबारी राहीन अशी त्यांची समजूत होती. शाहा आलमची पत्नी मला म्हणाली "मी, युरोपियन किंवा आर्मिनीयन खिस्ती लोकांच्या सर्व मुलींना येथे बोलावून घेते. तुम्ही त्यांच्यापैकी जी आवडेल ती निवडून घ्या. ती मुलगी तुम्हाला प्राप्त होईल अशी मी व्यवस्था करते. मी स्वतः तिचे लग्न तुमच्याशी लावून देईन. मी लग्नाचा सगळा खर्च मी करीन." या बरोबरच तिने आणखीही अनेक आश्वासने दिली. मी तिचे आभार मानले. मी तिला म्हटले तुम्ही दाखविलेल्या कृपेबद्दल मी तुमचा फार ऋणी आहे. पण मी एका प्रतिष्ठित कुटुंबातला आहे. तुम्ही म्हणता तशी मुलगी मी पत्करणे योग्य होणार नाही. शाहा आलमची पत्नी म्हणाली "मुसलमान तर कोणतीही मुलगी करून घेतात. ती कोणत्या घराण्यात व कुळात जन्मली आहे याचा विचार करीत नाहीत. पण तुमची इच्छा असली तर मी माझ्या खास दिमतीतल्या सर्व प्रतिष्ठित दासींना आणून तुमच्या समोर उभी करते. तुम्ही त्यांच्यापैकी कोणाचीही निवड करा. मी तिला तुमच्याकडे सोपवून देईन."

स्त्रियांच्या संबंधाच्या बोलण्याचा मला कंटाळा आला. शेवटी काहीतरी उत्तर द्यावे म्हणून मी म्हटले "अहो प्रकृतिनेच मी विवाह सुख भोगण्यास असमर्थ आहे." पण ती म्हणाली "तुमचे बोलणे, चालणे आणि तुमचे आरोग्यही पाहता तुमच्या बोलण्यात तथ्य नाही."

या नंतर तिने मला सांगितले "पडद्यात हात घालून माझी नाडी पहा बरे." मी पडद्यात हात सरकावला. नाडी पाहण्यासाठी मी हात धरला तो दणकट आणि केसाळ वाटला. हा हात पुरुषाचाच आहे हे मी ताबडतोब ओळखले. मी उठलो आणि शाहा आलमच्या पत्नीला म्हटले "हा हात पुरुषाचा आहे आणि शाहा आलम यांचाच आहे." माझ्या बोलण्यावर, आत असलेला शाहाआलम मोठ्याने हसू लागला आणि म्हणाला "स्त्री आणि पुरुष यांच्यातील फरक कळतो म्हणायचे" वरील मुलाखतीवरून शाहा आलमचा माझ्याबद्दलचा आपलेपणा दिसून आला खरा. पण त्याबरोबरच त्याला माझी वैद्य म्हणूनही परीक्षा पाहावयाची होती असे दिसते.

मी दरबारातच रहावे आणि आपल्याला सोडून जाऊ नये असे शाहा आलमला फार वाटे आणि सर्व प्रकारे त्याचा हितचिंतक बनावे असे त्याला फार वाटे. त्याकरिता तो वेगवेगळ्या कल्पना योजित होता. स्त्रियांचा मोह पडला तर मी तेथे निश्चितपणे राहीन असे वाटल्यावरून त्याने तोही प्रयत्न करून पाहिला. पण त्यात त्याला यश आले नाही. आपल्या स्त्रियांच्या बरोबर मौजमजा करीत काळ घालविणे हीच शाह आलमची मोठी करमणूक. बहुतेक मुसलमान हे आपला बराच मोठा काळ बायकांच्या संगतीत घालवीत असतात. दरबारातील बरीचशी कामे बायकांच्या मार्फतीने पार पडतात. मी (मनुची) स्वतः आपली बरीचशी कामे शाहा आलमच्या मोठ्या राणीच्या द्वारे करवून घेतली आहेत.

अंतःपुरातील स्त्रियांना इलाज करण्यासाठी हकीम-वैद्य यांना नेत, तेव्हा त्यांच्या (हकिमाच्या) तोंडावर कपडा घालण्यात येई, हे वर सांगितले आहे. पण माझ्या बाबतीत मी (मनुची) उघड्याच चेहऱ्याने येत जात असावे अशी शाहा आलमने आज्ञा केली. तो म्हणाला "खिस्ती लोकांची मने मुसलमानांसारखी दूषित नसतात." शाहा आलमची माझ्यावर इतकी मर्जी होती की, त्याने मला घुसलखान्यात येण्याची परवानगी देऊन ठेवली होती. घुसलखाना म्हणजे खलबतीचे स्थान. त्यात शाहा आलमचे प्रमुख अधिकारी आणि मोठे सरदार हेच जाऊ शकतात. याही कारणाने एखाद्या बैठकीला एखादा सरदार किंवा अधिकारी हजर राहू शकला, नाही तर नवीन परवानगी काढल्याशिवाय त्याला पुढच्या बैठकीला घुसलखान्यात प्रवेश नसतो. तो प्रवेश मिळविण्यासाठी त्याला काही तरी नजराणा शाहा आलमला द्यावा लागतो. निदान सोन्याचे एक नाणे आणि चांदीची नऊ अशी नजर म्हणून दिलीच पाहिजेत. पण मला कोणत्याही निर्बंधावाचून घुसलखान्यात येण्याजाण्याची पूर्ण मुभा होती.

स्त्रियांच्या मोहाला मी बळी पडत नाही हे पाहून शाहा आलमने मी धर्मांतर करावे असा प्रयत्न केला. "तू आमचा धर्म स्वीकारल्यास मी तुला माझ्या दरबारातील सरदारी देईन" असे त्याने मला सांगितले. मी नम्रपणे मुजरा करून म्हटले "कुराणात काय आहे हे मला चांगलेच माहीत आहे. आमच्या बायबलमध्ये आहे तेही मला माहीत आहे. बायबलमधील शिकवणीप्रमाणे जो बाप्तिस्मा घेत नाही, त्याला स्वर्गात प्रवेश नाही आणि तो प्रवेश मिळविण्यासाठी मी माझे प्राण-सुद्धा अर्पण करण्यास तयार आहे." माझा निश्चय पाहून शाहा आलमने विषय बदलला.

यानंतर शाहा आलम मला म्हणाला "पाणी पिण्यासाठी चांगली स्फटिकाची पात्रे कोठून तरी मागवून घे पाहू." मी अशी पात्रे आणण्यासाठी मुंबईला मनुष्य पाठविला. त्याने मुंबईहून सुंदर पात्रे आणली, मी ती शाहा आलमला नजर म्हणून

दिली. ही पात्रे नैसर्गिक खड्यांची (रॉक क्रिस्टलची) असावीत अशी त्याची समजूत होती. म्हणून एवढ्या मोठ्या खड्याबद्दल त्याला आश्चर्य वाटले. हे खडे किंमतीही असतात. वास्तविक ही पात्रे काचेची होती. या पात्रांची किंमत काय असे शाहा आलमने मला विचारले. मी म्हटले "ही माझ्याकडून नजर आहेत. डॉ. निकोलस (मनुची) हा राजपुत्रांना किंमती सांगत नसतो." माझ्या या उत्तराने शाहा आलमला फार समाधान वाटले. माझ्याजवळ येऊन त्याने माझे खांदे थोपटले आणि म्हटले "परमेश्वराने कधी काळी कृपा केली आणि मला बादशहा बनविले तर मी तुझे औदार्य लक्षात ठेवीन" शाहा आलमने त्याच वेळी मला उंची वस्त्रे आणि एक चांगला घोडा बक्षीस म्हणून दिला.

या ठिकाणी एक गोष्ट सांगितली पाहिजे. बादशहा आणि राजपुत्र जेव्हा दरबारात बसतात तेव्हा ते अतिशय रूबाबात आणि गंभीरपणे वागतात. सगळ्यांना आपला धाक बसावा असा त्यांचा हेतू असतो पण हीच माणसे महालात आणि खाजगी बैठकीत थाल्लिशपणे वागतात याचा मला अनेक वेळा अनुभव आला आहे. यावर कोणी म्हणेल की, मी वर सांगितलेले माझे अनुभव सामान्य वाचकांना क्षुल्लक वाटतील; पण त्यामुळे या गोष्टी सांगण्यात अल्पसे समाधान वाटते हे खरे. याबद्दल सहृदय वाचक मला क्षमा करतील अशी माझी कल्पना आहे. याशिवाय या भागात प्रवास करण्याचा कुणाला प्रसंग आला तर माझे अनुभव त्याला अगदीच निरर्थक वाटणार नाहीत असे मला वाटते.

आपल्याला बादशाही कशी मिळेल, याचा प्रत्येक राजपुत्र सतत विचार करीत असतो. कोणता सरदार बलिष्ठ आहे, कोणाचा आपल्याला पुढे मागे उपयोग होण्यासारखा आहे, याचा विचार करून हे राजपुत्र अशा सरदारांना कृपालोभ दाखवून आपल्या बाजूस ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात. शाहा आलमच्या तैनातीत भाऊसिंग[1] हा होता. त्याच्या पदरी १२ हजार स्वार होते. पुढे भाऊसिंग आजारी पडला. दरबारात येणे त्याला जमेना. शाहा आलमने भाऊसिंगाला भेटून इलाज करण्याची तयारी दाखविण्यासाठी मला त्याच्याकडे पाठविले. वेळप्रसंगी भाऊसिंग आपल्याला उपयोगी पडावा, हा त्याचा हेतु होता. भाऊसिंग हा म्हातारा झाला होता. त्याला फुफ्फुसाचा विकार झाला होता. तो किती दिवस जगू शकेल याचा अंदाज काढा, असेही मला शाहा आलमने सुचविले होते. पण भाऊसिंगाने औषध घेण्याचे नाकारले. तो कोणतेच औषध घेत नसे. आपल्याला विष प्रयोग होऊ नये याबद्दल तो काळजी घेत असे. राजा जयसिंग आणि इतर लोक

१. बुन्दी संस्थानचा राजा भाऊसिंग हाडा याच्या विषयींच्या माहितीकरिता मासीरे-उल्-उमरा, भा. ३०५ पाहा. तेथे असे सांगितले आहे की, तो औरंगाबादेस बरीच वर्षे होता. याची शाहा आलमशी घनिष्ट मैत्री होती. १०८८ हि. स. (मार्च १६७७ ते फेब्रुवारी १६७८ च्या दरम्यान) तो मरण पावला.

यांची उदाहरणे त्याच्या डोळ्यासमोर होती. त्यामुळे तो याबाबतीत फार काळजीने वागे. पण शाहा आलमना अशा प्रकारचा कोणताच हेतू नव्हता. भाऊसिंगावर कृपा करावी एवढाच त्याचा उद्देश होता, हे मी निश्चितपणे सांगू शकतो. मी त्याच्या पदरी होतो त्या काळात एकदाही त्याने अशा प्रकारचे काम आपल्यातर्फे करावे असे मला कधीच सुचविले नाही.

असे असले तरी माझा स्वभाव अशा प्रकारचा आहे की काय हे पाहण्यासाठी तो अप्रत्यक्षपणे माझी परीक्षा घेई. उदाहरणार्थ त्यानी काही अज्ञात माणसे माझ्याकडे पाठविली. मी उपचार करीत असलेल्या रोग्याला मी मारले तर आपण तुम्हाला बरीच रक्कम देऊ अशी ही माणसे मला म्हणाली. काहीजण माझ्याकडून विष विकत घेण्यास येत. अशा गोष्टींना मी कधीच बधलो नाही. माझी परीक्षा घेण्यासाठी शाहा आलम आणखी एक युक्ती करी. उदाहरणार्थ, रोगी म्हणून एक तरूण मुलगी माझ्याकडे पाठविण्यात आली. अर्थातच अशा युक्तीचा काहीही उपयोग झाला नाही. दुसऱ्यांदाही असाच प्रकार घडला त्याचाही उपयोग झाला नाही. अशा सुंदर आणि खोट्या रोग्यांच्या प्रेमात सापडून मी माझा धर्म बदलेन आणि हिंदुस्तानात राहीन असे त्याला वाटे. असे प्रकार घडले नाहीत असे नाही. काही वर्षांपूर्वी इराणमधील इस्फाहान शहरात कॅप्युच्चिन पंथाचे दोन पोर्तुगीज पाद्री असेच गठले आणि त्यांना मुसलमान व्हावे लागले. अशा लोकांना पाद्री म्हणून जे पाठवितात त्यांना देव क्षमा करो.

**मनुची शाहाआलमच्या पदरी डॉक्टर म्हणून राहिल्यावर त्याला आलेले अनुभव :** मी शाहाआलमच्या पदरी डॉक्टर म्हणून असल्यामुळे त्याच्या पदरचे इतर इराणी हकीम माझा मत्सर करीत. एकदा शाहाआलमचा मेव्हणा मिर्झा सुलेमान बेग हा आजारी पडला. शाहा आलमने आपले दोन इराणी हकीम मुकीम आणि मुहसिनखान यांना त्याच्याकडे पाठविले. त्यांनी चुकीचा इलाज केला. त्यामुळे रोगी अत्यवस्थ झाला. शेवटच्या क्षणी रोग्याचा भाऊ मिर्झा मोहम्मद मुकीम याने मला आपल्या घरी नेले. पण इलाजाची वेळ निघून गेली होती. रोग्याची अशी परिस्थिती होण्यास मनुची कारण आहे, असे हकिमांनी खोटेच सांगितले. शाहाआलमने खरी परिस्थिती काय आहे हे पाहण्यासाठी आपला खोजा नाझीर दौलत याला पाठविले. रोगी, दौलतला म्हणाला "या हकिमानीच मला मारले. डॉ. निकोलस (मनुची) नी माझा इलाज केला असता तर माझे मरण ओढवले नसते." असे बोलत असतानाच मिर्झा सुलेमान बेगचा प्राण गेला. त्याच्या उद्गारामुळे दरबारात लोकांना माझा खरेपणा पटला व माझ्याविषयी आदर वाटू लागला.

यानंतर काही दिवसांनी मी वर उल्लेखिलेला रोगी मिर्झा सुलेमान बेग याचा भाऊ मिर्झा महम्मद मुकीम याला वेड लागले. वेडाच्या भरात त्याने आपला सासरा आणि इतर काही नोकरांना ठार मारले. शाहाआलमच्या हकिमांनी हा रोगी बरा

होऊ शकणार नाही असे सांगितले. कुराणामध्ये वेड हा बरा न होणारा रोग आहे, असे म्हटले आहे. असेही या लोकांनी शाहा आलमला सांगितले. शाहा आलमने रोग्यावर इलाज करण्याचे काम माझ्याकडे दिले. मी इलाज केला आणि परमेश्वराच्या कृपेने मिर्झा महम्मद मुकीम हा काही दिवसांतच बरा झाला. इलाजाचा मोबदला म्हणून त्याने माझ्याकडे फक्त एक घोडा पाठविला. पैसे वगैरे काही दिले नाही, याचे कारण त्याचा चिक्कूपणा हे होय. त्याच्या माणसांना मी मुद्दामच म्हटले "हा घोडा परत घेऊन जा. तुमच्या मालकाचे वेड पूर्णपणे बरे झाले नाही असे दिसते. म्हणूनच त्याने मोबदला म्हणून फक्त एक घोडा पाठविला आहे. तो पूर्णपणे बरा झाल्यावर निश्चितच मला योग्य तो मोबदला देईल आणि तो मी कबूल करीन." माझा निरोप कळताच मिर्झा महम्मद मुकीमने घोडा, एक हजार रुपये आणि उंची पोषाख ही माझ्याकडे पाठविली. हा मोबदला त्याने राजी खुषीने दिला असे नाही. त्याला वाटले की माझे वेड अद्याप गेले नाही असे मनुची सगळ्यांना सांगत सुटणार, आणि यामुळे दरबारातील आपली नोकरी जाणार. शाहा आलमला ही सगळी हकीकत समजली. त्याला मोठे समाधान वाटले. त्याने मला एक घोडा आणि पोषाख या वस्तू दिल्या आणि माझी तारीफ केली.

शाहा आलमच्या सांगण्यावरून मी, इतर हकिमांनी निराश म्हणून सोडून दिलेले अनेक रोगी बरे केले. त्यांत शाहा आलमचा आवडता सरदार मुबारिज खान याची बायको, शाहा आलमचा दुध भाऊ महम्मद रीझा, हे होते. फत्तेउल्लाखानालाही[1] मी असाच बरा केला. बल्क प्रांताचा मूळ रहिवाशी असलेला तुर्क सरदार फत्तेउल्लाखान याची हकिकत देण्यासारखी आहे. याची बायको अतिशय सुंदर होती. ती त्याला या देशातील पक्वान्ने करून खाऊ घाली. परिणाम असा झाला की फत्तेउल्लाखानाची भूक मारली गेली आणि त्याचा केवळ अस्थिपंजर राहिला. त्याच्यावर मी उपचार केला. पथ्य म्हणून त्याला घोड्याच्या मांसाचे तुकडे शिजवून खाण्यास सांगितले. त्याच्या देशाचे ते मुख्य खाद्य होते. या साध्या गोष्टीमुळे काही दिवसातच तो खडखडीत बरा झाला. हे तुर्की लोक माझ्याकडे इलाजाकरिता येत पण ते स्वभावाने चिक्कू आणि लोभी असत. ते माझी अचळपचळ स्तुती करीत पण देत कमी असत. मी गरिबांचा मोफत इलाज करतो. हा लौकिक झाल्यामुळे माझ्याकडे रोग्यांची नेहमी गर्दी असे. हिंदु आणि मुसलमान हकिमांचा धंदा बसू लागल्यामुळे ते माझा द्वेष करीत. रोग्यांच्या शरीरातील रक्त काढून मी पितो, अशीही कंडी त्यांनी पिकविली. पण रोग्यांनी त्यांच्या शरीरातून काढलेले रक्त आपण बरोबर घेऊन जावे अशी व्यवस्था करून मी कंडी खोटी पाडली.

---

१. फत्तेउल्लाखान—हा बहुतकरून मुहम्मद गाजिद दोस्ती असावा. याला फत्तेउल्लाखान बहादूर आलमगीर शाही असा किताब होता. १७०७ नंतर थोड्याच दिवसांनी तो मरण पावला. (मासीरे-उल-उमरा iii ४०) विशाळगडाच्या वेढ्यात मोगलांतर्फे याने मोठी कामगिरी केली.

एकदा बादशहाचा एक गुलाम माझ्या दवाखान्यात येऊन धिंगामस्ती करू लागला. "तुला रक्ताचा विकार आहे, म्हणून रक्तस्राव केला पाहिजे," असे मी खोटेच सांगून जबरदस्तीने त्याच्या शरिरातून बरेच रक्त काढले. यामुळे तो मऊ पडला. त्याची केव्हाही गाठ पडली की तो माझ्याशी अतिशय अदबीने वागे. न जाणो मनुची आपल्याला पुनः वेडा ठरवून आपल्या शरिरातील सगळे रक्त काढून घेणार नाही ना? अशी त्याला भीती वाटे. मी ज्या हकिमाचा वर उल्लेख केला आहे त्याची मुलगी बाळंतपणात अडली होती. माझ्या औषध योजनेने तिची सुटका झाली. हा उपचार मी त्या हकीमाला सांगितला. त्याचाच उपयोग करून त्याने राजपुत्र कामबक्ष याच्या बायकोची प्रसूती उत्तम रितीने घडवून आणली. याबद्दल त्याला औरंगजेब आणि कामबक्ष यांच्याकडून अनेक भेटी मिळाल्या. पण या हकिमाने माझा चुकूनही उल्लेख केला नाही. उलट त्याने माझा जीव घेण्याचा प्रयत्न केला. मी महम्मद पैगंबराला शिव्या दिल्या, असे त्याने फौजदारी खटल्याचा अधिकारी मीर आदिल याला खोटेच सांगितले. अशा गुन्हाला देहान्ताची शिक्षा असते. पण शाहा आलम मला पूर्णपणे ओळखत होता. हे मत्सरामुळे झाले आहे, हे त्याच्या लक्षात आहे. तो म्हणाला "मीर आदिलला माहिती चुकीची देण्यात आली आहे. मनुची हा निरपराधी आहे. हवे असेल तर मी स्वतः त्याचा जामीन होण्यास तयार आहे." या शाहा आलमच्या उद्‌गारामुळे माझे शत्रू गोंधळात पडले. आठ दिवसाने मीर आदिलला (फौजदारी खटल्याचा अधिकारी) बडतर्फ करण्यात आले. माझा अशा रितीने सतत पिच्छा पुरविण्यात येऊ लागला. या आणि इतर कारणामुळे मी मोगलांच्या राज्यातून निघून जाण्याचे ठरविले.

बादशहा आणि राजपुत्र हे आपल्या अमीर उमरावांना इतर राजपुत्रांच्या मर्जीतील नोकर लोकांच्या बरोबर संपर्क ठेऊ देत नाहीत. यांतून ते कुठे एखादे कारस्थान शिजवतील अशी त्यांना भीती वाटते. असा संपर्क ठेवावयाचा असेल तर आधी त्याला आपल्या मालकाकडून परवानगी काढावी लागते. त्याचे असे झाले. दिलेरखान हा सरदार आजारी पडला. तो शाहा आलमचा शत्रु होता. तरी पण दिलेरखानाने मला बोलावू पाठविले, आणि पुढीलप्रमाणे निरोप पाठविला. "तुम्ही (मनुची) माझ्या घरी आलात तर शाहा आलमची मर्जी संपादन करण्याची मला चांगली संधी मिळेल. जरूर पडेल तेव्हा मी माझ्या घोडदळानिशी शाहा आलमची सेवा करण्यास तयार राहीन."

मुसलमानांच्या दरबारातील डावपेच मला माहित होते. मी शाहा आलमला सगळी हकिकत सांगितली आणि दिलेरखानाने मला बोलावू पाठविले आहे, हेही त्याला सांगितले. माझे बोलणे ऐकताच शाहा आलमचा चेहरा लालबुंद झाला. "तू त्याच्याकडे जाणार आहेस काय?" असे त्याने मला घाईघाईने विचारले. यावर मी त्याला

हसत म्हणालो "मी जर त्याच्याकडे गेलोच तर त्याची परिस्थिती कशी आहे, तो जगणार की मरणार हे पाहण्यासाठीच जाईन म्हणजे मला तुमच्याकडे त्या बाबतीत अहवाल सादर करता येईल." माझ्या शब्दांनी शाहा आलमचे समाधान झाले. त्याने मला दिलेरखानाकडे जाण्याची मनाई केली. दिलेरखान मेला. त्याच्यावर त्याचा जावई आजिलखान आणि शाहा आलमचा एक अधिकारी यांनी विषप्रयोग केला असे उघडकीस आले.[1]

मोगल राजपुत्रांनी फक्त चार मुले वाढवावीत असा प्रघात पडलेला होता.[2] याला अपवाद होता शाहा आलमचा. त्याला पाच मुले होती. नंतर असे घडले की त्याची आवडती पत्नी नुरुन्नीसा बेगम गरोदर राहिली. औरंगजेब या अपत्यास जिवंत राहू देणार नाही, असे वाटून तिने गर्भपाताची औषधे घेतली. परंतु काही परिणाम झाला नाही. म्हणून एकदा आपल्या पतीच्या देखत, गर्भपाताचे औषध देण्याबद्दल तिने मला विनंती केली. मला आश्चर्य वाटले. या गोष्टीपासून तिला परावृत्त करण्याचा मी यशस्वी प्रयत्न केला. पुढे तिला मुलगा झाला. परंतु तो वर्ष दीड वर्षाचा होताच गुप्तपणे विष घालून त्याचा अघोरी बादशहाने नाश करविला.[3] गर्भपाताचे औषध त्यांनी उपयोगात न आणण्याचे कारण त्याच्याच लिहिण्यावरून असे दिसते की, त्यामुळे आईच्या जीवाला काही अपाय होईल अशी त्यांना भीती वाटली.

याच सुमारास शाह आलमचा मुलगा सुलतान मोईजुद्दिन याला काही कारणांवरून आपल्या पत्नीचा मनस्वी संशय वाटू लागला. सर्व महालात तिच्या इतकी लावण्यवती स्त्री नव्हती. त्याने आपल्या हाताने तिला विड्यातून विष दिले. तिची दारूण अवस्था पाहून तिच्या आईने मला उपचार करण्यास बोलाविले. मी तिला गुप्तपणे औषधे दिली. ती वाचली. त्याने पुनः तीन वेळा तिला विष दिले. प्रत्येक वेळी मी त्यावर उतारा देत राहिलो. मोईजुद्दिनला हे कळल्यावर त्याने मला भेट देण्याचे बंद केले. शेवटी त्याला एक संधी मिळाली. औरंगजेबाने त्याला बऱ्हाणपूरचा सुभेदार

१. दिलेरखान—जलाल याला दिलेरखान अशी पदवी होती. हा दर्याखान दाउदखानचा मुलगा होता. औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या २७ व्या वर्षी १०९४ हि. १ रमजान आणि वर्षाचा शेवट यांच्या दरम्यान तो औरंगाबादेस मरण पावला. डिसेंबर १८, १६८३ (मासीरे-उल-उमरा ii ४९ पान) व (तारीखे-महम्मद) पाहिल्यात असे दिले आहे की, (पुढे ते असत्य असल्याचे सांगण्यासाठी) अशी वदंता होती की, औरंगजेबाने त्याला विष घालून मारले. मासीरे-आलमगीरीप्रमाणे तो रमजान २५ ला १०९४ हि. (सप्टेंबर १७, १६८३) ला मरण पावला. मनूची त्यावेळी गोव्याला होता. तो औरंगाबादेला असण्याची शक्यता नव्हती.

२. हे विधान विश्वासार्ह वाटत नाही.

३. मनूचीच्या अशा विधानावर विश्वास ठेवावा का, हे ठरविणे कठीण आहे. आर्विनने म्हटल्याप्रमाणे मनूचीला साध्या मृत्यूतही विषप्रयोग आढळतो. ही त्याच्या स्वभावाची एक लकब समजली पाहिजे.

म्हणून पाठविले. शाह आलम त्यावेळी औरंगाबादेस होता. मी शाह आलम बरोबर तेथेच होतो. मोईजुद्दिनने पुनः एकदा आपल्या बायकोला विष दिले. तिच्या आईने शाहा आलमला पत्र लिहून मला त्वरीत पाठविण्याची विनंती केली. पण त्याने तेथील हकिमाचीच मदत घेण्याची सूचना केली. हे उत्तर पोहचण्यापूर्वीच तिचे प्राणोत्क्रमण झाले होते. या शोचनीय घटनेनंतर मोईजुद्दिन माझ्याशी पुनः स्नेहभावाने वागू लागला.

राजपुत्र शाहा आलम हा स्वभावाने सज्जन व प्रेमळ आहे. मी त्याला चांगलाच ओळखतो. तो बादशहा झाला तर कोणालाही त्रास देणार नाही असे माझे मत आहे. त्याच्या आणि बापाच्या स्वभावामध्ये फार फरक आहे. त्याच्या स्वभावावर प्रकाश पाडणारी एक घटना येथे देण्यासारखी आहे. काबूल प्रांतात असताना शाहा आलम एकदा शिकारीसाठी बाहेर गेला. ऐनवेळी पाऊस आल्यामुळे त्याला एका धनगराच्या झोपडीत थांबावे लागले. धनगराची मुलगी अतिशय सुंदर होती. केवळ करमणूक म्हणून तू माझ्याशी लग्न करशील काय असे शाहा आलमने तिला विचारले. हा राजपुत्र आहे हे तिला माहीत नव्हते. ती म्हणाली "गोऱ्या लोकांची इकडे वाण नाही मग तुमच्या सारख्या काळ्या लोकांशी मी लग्न का करावे?" तिच्या उत्तरावर शाहा आलम खूप हसला. त्याच्या बरोबर असलेले खोजे तिला बडवू इच्छित होते. पण त्याने त्यांना सक्त मनाई केली. त्याने त्या मुलीला विचारले माझ्या नोकरापैकी, हा पाहा गोरा मनुष्य त्याच्याशी लग्न करशील काय? तिने आनंदाने संमती दिली. या लग्नानंतर ती राजवाड्यात येत जात असे. शाहा आलमला ती बरीच आवडायची.

### मोगल साम्राज्यातील प्रांत

मोगल साम्राज्यात पुढील प्रांत आहेत

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १. दिल्ली | ... | ८ सरकार (जिल्हे) | | २२० परगणे (तालुके) |
| २. आग्रा | ... | १४ सरकार | ... | २७८ परगणे |
| ३. लाहोर | ... | ५ सरकार | ... | ३१४ परगणे |
| ४. अजमीर | ... | प्रांत अजमीर | | |
| ५. गुजरात | ... | ९ सरकार | ... | १९ परगणे |
| ६. माळवा | ... | ११ सरकार | ... | २५० परगणे |
| ७. बिहार | ... | ८ सरकार | ... | २४५ परगणे |
| ८. मुलतान | ... | १४ सरकार | ... | ९६ परगणे |
| ९. काबूल | ... | ... | ... | ३५ परगणे |
| १०. ठठ्ठा (सिंध) | ... | ... | ... | ... |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११. भक्कर (सिंध) | ... | ... | ... | ... |
| १२. ओरिसा | ... | ११ सरकार | ... | १०० परगणे |
| १३. काश्मीर | ... | ... | ... | ४६ परगणे |
| १४. अल्लाहाबाद | ... | ... | ... | ... |
| १५. औरंगाबाद | ... | ८ सरकार | ... | ७९ परगणे |
| १६. वऱ्हाड | ... | ६ सरकार | ... | १९१ परगणे |
| १७. खानदेश | ... | ३ सरकार | ... | १०३ परगणे |
| १८. बागलाण | ... | ... | ... | ४३ परगणे |
| १९. नांदेड[1] | ... | ... | ... | ... |
| २०. बंगाल (ढाका) | ... | ... | ... | ... |
| २१. उज्जयनी | ... | ... | ... | ... |
| २२. राजमहाल | ... | ... | ... | ... |
| २३. विजापूर | ... | ... | ... | ... |
| २४. गोवळकोंडा | ... | ... | ... | ... |

आपल्या राज्यात ५४ प्रांत आहेत, असे मोगल बादशाहा म्हणतात. मी (मनुची) सर्व प्रांतांची नावे दिली नाहीत. कारण त्यापैकी बरेचसे, मी वर दिलेल्या प्रांतांचे विभाग होत. मोगल साम्राज्याचे उत्पन्न (शेतसारा इत्यादी) एकंदरीत ३८ कोटी, ७२ लक्ष, ५९ हजार रुपये आहे.[2] याशिवाय उत्पन्नाच्या इतर बाबी पण आहेत.

मोगल साम्राज्यातील उत्पन्नाच्या काही बाबी : एक बाब म्हणजे हिंदूंच्यावर लादलेला कर ही होय. या उत्पन्नाची नक्की रक्कम सांगता येत नाही. कर देणाऱ्यांने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणाकडे जाण्यायेण्यामुळे अगर मृत्युमुळे उत्पन्नात फेरबदल होतो. कराची पावती असेल तर लोकांना जाऊ देण्यात येते. पावती हरवली असल्यास पुनः तितकीच रक्कम भरावी लागते. सरकारी अधिकारी, रकमेची अफरातफरही बरीच करतात यामुळे बादशहाच्या, अनेक वेळा निम्म्या उत्पन्नापेक्षा कमी रक्कम हाती पडते.

उत्पन्नाची दुसरी बाब म्हणजे हिंदु व्यापाऱ्यांनी आणलेल्या मालावर, त्यांना दुसऱ्यांदा जकात कर द्यावा लागतो, ही होय. हा कर शेकडा पाच आहे. मुसलमानांना हा कर द्यावा लागत नाही. तरीपण दुसऱ्या पद्धतीने, तो मुसलमान व्यापाऱ्यांकडून शेकडा अडीच रुपये भाडे आणि जकात या नावाने वसूल करतो.

१. नांदेड—हे मराठवाड्यातील नांदेड होय.

२. आर्विनने १७०७ च्या मोगल साम्राज्याच्या उत्पन्नाचा तक्ता समकालीन ग्रंथावरून दिला आहे. त्यावरून १७०७ मध्ये साम्राज्याचे उत्पन्न १८ कोटी, ९९ लक्ष, २४ हजार, ८९९ रुपये होते. यावरून मनुचीचे आकडे अतिशयोक्तीचे आहेत, हे आर्विनने दाखवून दिले आहे.

उत्पन्नाची तिसरी बाब म्हणजे हिंदूंच्या तीर्थस्थानांवर यात्रेकरूंच्यावर लादलेला कर होय. राज्यातील हिऱ्यांच्या खाणी, ही उत्पन्नाची आणखी एक बाब होय. एका विशिष्ट वजनापेक्षा अधिक असलेला हिरा बादशहाच्या मालकीचा समजला जातो. समुद्रकाठच्या बंदरांपैकी त्याला बरेच उत्पन्न मिळते. या बंदरांत सिंध, भडोच, सुरत आणि खंबायत यांचा समावेश होतो. एका सुरतेचे उत्पन्न त्याला ३० लाख रुपये होते. या शिवाय सुरतेतील टंकसाळीतून त्याला ११ लाख रुपये मिळतात. समुद्राच्या पूर्व किनाऱ्याचे म्हणजे कोरोमंडल किनाऱ्याचे आणि गंगा नदीवरील बंदराचेही त्याला बरेच उत्पन्न मिळते.

कोणी अधिकारी, मनसबदार किंवा सरंजामदार वारला, तर त्याची इस्टेट बादशहाचे अधिकारी आपल्या ताब्यात घेतात. हे अधिकारी सरकारी देणे लागत होते या सबबीवर त्याची बरीच मालमत्ता बादशहाच्या ताब्यात येते. त्यांच्या वारसांना उपजीविकेसाठी थोडेसेच ठेवण्यात येते. कोणी व्यापारी मेला आणि त्याला वारस नसला तर त्याची मालमत्ता अशाच प्रकारे घेण्यात येते. हिंदु राजे, जमीनदार आणि त्यांचे नोकर यांच्याकडून मिळणाऱ्या खंडण्या आणि नजराणे यांच्या द्वारे बादशहाला पुष्कळ उत्पन्न मिळते.

मोगल साम्राज्यातून निर्यात होणारा माल म्हणजे कापूस, नीळ, अफू आणि रेशीम, हे होत. युरोपियन आणि इतर व्यापारी हा माल निर्यात करीत आणि त्यांच्या मोबदल्यात बरीचशी रक्कम देशाला येई. याशिवाय देशातून हिरे आणि सोरा यांची निर्यात होई. व्यापारी लोकांच्यामुळेही चीन आणि सुमात्रा या देशांतून बरेच सोने आणि नाणे देशात येत असे. इराणमधून नाणी, फळे आणि मद्येही येत.

### राज्य कारभार

या विशाल साम्राज्याचा कारभार कसा चालतो हे येथे देणे सोयीचे होईल. साम्राज्याचे तीन प्रमुख कारभारी होत, ते म्हणजे वजीर, दिवाण आणि मीरसामान हे होत. वजिराची कामे पुढीलप्रमाणे आहेत. — १. जमिनी लोकांना देणे आणि त्यांचे (जमिनींचे) उत्पन्न सरकारला दाखल करणे. २. निरनिराळ्या हुद्यांवर लोकांच्या नेमणुकी करणे. साम्राज्यातील दुसरा अधिकारी जो दिवाण, त्याची कामे पुढीलप्रमाणे होत. १. साम्राज्याचा महसूल दाखल करून घेणे. २. मृत व्यक्तींची मालमत्ता ताब्यात घेणे. ३. बडतर्फ नोकरांची मालमत्ता ताब्यात घेणे आणि ४. निरनिराळ्या हुद्यांत अगर वेतनांत बदल घडवून आणणे[1]. साम्राज्याचा तिसरा प्रमुख अधिकारी मीरसामान हा होय. राजवाड्यासंबंधी सर्व प्रकारच्या खर्चांची व्यवस्था करण्याचे काम त्याच्याकडे असते.

१. दिवाणाचे मुख्य काम जहागिरींची व्यवस्था आणि पगाराच्या मोबदल्यात किती उत्पन्नाचा सरंजाम द्यावा, हे ठरवून सरंजाम लावून देणे, हे असे.

वरील अधिकाऱ्यांच्या शिवाय इतरही अनेक अधिकारी आहेत. एक अधिकारी म्हणजे मीर बक्षी हा होय. साम्राज्यातील सर्व घोडदळ याच्या हाताखाली असते. दुसरा एक मीर बक्षी असतो त्याच्याकडे पायदळ सोपविण्यात आलेले असते. आणखी एक प्रमुख अधिकारी म्हणजे काजी[1] हा होय. त्याच्याकडे खटले अंतिम निर्णयासाठी येत असतात. काजीला फार मोठे अधिकार आहेत. हे खरे असले तरी एखाद्या माणसाला त्याने देहान्ताची शिक्षा दिल्यास बादशहाच्या कानावर हे वृत्त तीनदा घातल्यानंतरच शिक्षा अमलात आणता येत नाही. याच्या कोर्टाला दोन मदतनीस न्यायाधीश असतात. त्यांना मुफ्ती म्हणतात. एखादी स्त्री नवऱ्याजवळ संसार करण्यास नाखुष असली आणि त्याबद्दल तिने जर फिर्याद केली तर काजी तिला आपल्याकडे तीन दिवस ठेवून घेतो आणि त्यानंतर नवरा-बायकोच्या भांडणाचा योग्य वाटेल तो निकाल देतो त्या निर्णयाच्या योग्यायोग्यतेबद्दल कोणालाही कारणे विचारता येत नाहीत.

या काजीचे—मुख्य न्यायाधीशाचे नाव अब्दुल वहाब असे होते. तो माझा मित्र होता. तो मला आपल्या घरी नेहमी बोलावी. त्याने माझ्यासमोर दिलेल्या एका निकालाची हकिकत मी पुढे देत आहे.

एका माणसाचा खून झाला. खुनी मनुष्य तरुण होता. त्याला कैदेत ठेवण्यात आले. त्याला शिक्षा करण्यात यावी हे सांगण्यासाठी मृत माणसाची विधवा काजी अब्दुल वहाबकडे आली. काजीने तिला सौम्य शब्दात पुढीलप्रमाणे सल्ला दिला. "तू त्या माणसाला क्षमा कर. माझे तू ऐकणार असशील तर तू त्या खुनी माणसाशी लग्न करावे. हे वर तुला पसंत नसेल तर इतर कोणाशीही लग्न करावे." त्या तरुणीने काजीचा सल्ला मानला. खुनी माणसाची सुटका करण्यात आली आणि तिने आपल्या नवऱ्याचा खून करणाऱ्या त्या माणसाशी लग्न केले. इतक्या सहजरीतीने निकालात काढलेल्या या फिर्यादीबद्दल मी त्या काजीला म्हटले, "तुम्ही दिलेल्या निकालाचा परिणाम असा होईल की असे अनेक खून होऊ लागतील. नवऱ्याशी न पटणाऱ्या अनेक स्त्रिया असतात आपल्या प्रियकरांच्याकडून नवऱ्याचे खून करवून त्यांच्याशी (प्रियकरांशी) लग्ने करतील. माझ्या म्हणण्याचा भाव त्याला पटला. पण त्याने सर्व हसण्यावर नेले व तो मला म्हणाला "मी त्या तरुणावर दया केली होती. त्याचा जीव वाचविला होता. तिने जर आपला हेका चालविला असता तर त्या तरुणाला फासावर जावे लागले असते." पण मला वाटते की त्या काजीला तिला तीन दिवस आपल्या घरी ठेवायचे होते. जरी वय झाले होते तरी तो असल्या गोष्टींना पारखा नव्हता. कारण ती स्त्री फार सुंदर होती.

१. साम्राज्याच्या मुख्य काजीला "सदरुस्सुदूर" म्हणजे मुख्य न्यायाधीश म्हणतात.

काझीनी दिलेल्या निर्णयावर अपील नसते. याचे एक उदाहरण मी पुढे देत आहे. काझी अब्दुल वहाबला एक पुतण्या होता. तो त्याला फार आवडता होता. अनेक वेळा हा तरुण आपल्या काकाच्या म्हणजे अब्दुल वहाबच्या गैरहजेरीत त्याच्या ऐवजी खटले ऐकी आणि निर्णय देई. या तरुण न्यायाधिशाला एका हिंदूच्या अतिशय सुंदर पत्नीबद्दल माहिती मिळाली. त्याने तिचे अपहरण करून तिला आपल्या घरात आणून ठेवली. ही गोष्ट कळल्यावर त्या तरुणीच्या नवऱ्याने काझी अब्दुल वहाबकडे आणि इतर अधिकाऱ्यांकडे तक्रार केली. पण तिचा काही उपयोग झाला नाही. काझी अब्दुल वहाब इतकेच म्हणाला "ह्या गोष्टीची कल्पनाच भयंकर आहे. माझ्या पुतण्याने तुझ्या बायकोशी असा अनैतिक संबंध करावा या बद्दल त्याला देहांताचीच शिक्षा योग्य होय". पण प्रत्यक्षात काहीच झाले नाही. या अन्यायामुळे तो हिंदु तरुण अतिशय चिडला. पण त्याने आपला क्षोभ लपवून ठेवला. एक दिवस अब्दुल वहाबचा पुतण्या न्यायदानाचे काम करण्यासाठी न्यायालयाकडे पालखीतून चालला होता. तो हिंदु तरुण पालखी भोवती जमलेल्या लोकांत सामील झाला आणि त्याने त्या तरुण न्यायाधिशाच्या पोटात खंजीर खुपसला. त्यानंतर तो गर्दीत मिसळून नाहीसा झाला. पालखी वाहणाऱ्यांनी पालखी खाली ठेवली. पालखी उघडून पाहतात तो त्या तरुण न्यायाधिशाचे प्रेत त्यांना आढळले.

साम्राज्यातील आणखी एक अधिकारी म्हणजे कोतवाल हा होय. हा एक प्रकारे पोलीसचा अधिकारी म्हणावा लागेल. दारू गाळण्याची बंदी पाळली जाते की नाही, हे तो पाहतो. शहरात वेश्या असू नयेत इकडेही त्याचे लक्ष असते. बादशहाने कोणत्याही गोष्टीला बंदी केली की ती अमलात आणण्याचे काम याच्याकडे असते. कुठे काय घडत आहे याची बित्तंबातमी त्याला ठेवावी लागते. या कामासाठी भंग्याचाही उपयोग करण्यात येतो. कोणत्याही घटनेचा रिपोर्ट बादशहाकडे तावडतोब करणे हे कोतवालाचे काम आहे. चोर आणि गुन्हेगार यांना पकडण्याचे हे काम कोतवालाचे असते. कोतवाल हा काझीच्या नियंत्रणाखाली असतो आणि काझीचे हुकूम अमलात आणतो. त्याच्या अधिकारक्षेत्रात चोरी झाली तर माल हुडकून काढणे, गुन्हेगार शोधून काढणे नाहीतर मालाची भरपाई करणे हे त्याला करावे लागते. शहरात निरनिराळ्या बाबींवर लादलेले करही वसूल करण्याचे काम त्याचे असते. त्याच्या हाताखाली घोडदळ आणि अनेक पायदळ शिपायी असतात. शहराच्या प्रत्येक विभागात एक स्वार आणि २५-३० पायदळ शिपायी असतात. शहरात गस्त घालण्याचे त्याचे काम असते. बाजारातील धान्याच्या पुरवठ्यासाठी एक वेगळा अधिकारी असतो. रोजचे बाजार भाव बादशहाला कळविणे हे त्याचे काम असते.

सरदार आणि महत्त्वाचे अधिकारी यांच्यापाशी वाकियानवीस आणि खुफिया-नवीस हे असतात. घडलेल्या हकिकतीची बातमीपत्रे दरबारात पाठविणे हे त्यांचे काम असते.

### मोगल साम्राज्यातील प्रांताची माहिती

प्रांतातील ठाण्याच्या शिबंदीकरता ठेवलेले घोडदळ, प्रांतात होणारा माल, त्यांची मुख्य ठिकाणे व नोंद करण्यासारखा इतर तपशील पुढे दिला आहे :-

#### दिल्ली

साम्राज्यात दिल्ली प्रांताचे स्थान मध्यवर्ती आहे. राजधानीचे नावही तेच आहे. बादशहाचे वास्तव्य सामान्यपणे येथेच असते व दरबारही येथेच भरतो. कारण येथेच पुरातन काळी पराक्रमी हिंदुराजे राहात असत. तसेच चिनी[1] अधिकारी व जे एकंदीत पठाण राजे होऊन गेले ते सर्व इतर सय्यद व रजपूत राजे वास्तव्य करत होते आणि शेवटी मोगल साम्राज्य स्थापन झाल्यावर मोगल बादशहांचे राहणेही येथेच असे.

राजधानीचे ठिकाण असूनही येथे उद्योगधंदे कमी आहेत. परंतु हा प्रदेश धन-धान्यांनी समृद्ध आहे. या शहराच्या निरनिराळ्या भागात हिंदू व पठाण राजांनी पुरातनकाळी बांधलेले अनेक प्रासाद अजूनही पाहावयास मिळतात. नवव्या पठाण[2] राजाने बांधलेल्या तुघलकाबाद नावाच्या गावाचा बराचसा भाग अजूनही सुरक्षितपणे उभा आहे.

शिवाय या प्रांतात अनेक ओस पडलेली गावे आहेत. मुसलमान लोक भाविक-पणे अनेक वेळा तेथे जातात. उदाहरणार्थ ख्वाजा कुतुबुद्दिन नावाच्या एका साधूची कबर असलेले एक ओसाड गाव आहे[3]. दुसरे सुलतान उल-मशाइखची कबर असलेले गाव जवळच आहे. भद्दाळू लोक तेथे जातात. त्यांना तेथे चमत्कार दाखविण्याकरिता केलेल्या अनेक कल्पना मी ( मनुची ) पाहिलेल्या आहेत.

बादशहा दिल्लीच्या प्रांतात सामान्यपणे ५० हजार घोडदळ बाळगतो. तितकेच घोडदळ तो फिरते ठेवीत असतो. यामध्ये २० हजार रजपुतांचे पायदळ आहे. यापैकी १२ हजार तोफखान्याकडे सुपूर्द केले आहेत व बाकीचे राजवाड्याच्या संरक्षणाकरिता ठेवलेले आहेत. राजवाड्याच्या व्यवस्थेकरिता खास चौकीचा दारोगा म्हणून एक अधिकारी असतो. त्याच्या हाताखालील शिपाई, शिलेदार हे नियमक

१. हा उल्लेख अनैतिहासिक आहे.

२. तुघलक राजे हे पठाण नव्हते. ते तुर्क होते.

३. हा निजामउद्दिन अवलियाचा दर्गा होय. हे दिल्लीच्या नगरपालिकेत आले आहे.

आणि प्रतिष्ठित कुटुंबातील असतात. सामान्यपणे खास चौकीतील या पथकात चार हजार स्वार असतात. खास चौकीच्या दारोग्याकडे गुसलखान्याची (दिवाणी खास) व्यवस्था असते. या दारोग्याच्या हाताखाली काही गुलाम अधिकारी आणि त्यांची काही पथके असतात त्यांना चेला म्हणतात.

राजवाड्यातील आणखी एक अधिकारी म्हणजे दंडधारी लोकांचा मुख्य होय. या लोकांच्या हातातील दंड सोनेरी असतात. त्यांचे पगार[1] त्यांच्या योग्यतेप्रमाणे ३०० पासून १,००० रुपये दरमहा असतात. राजपुत्रांचे निरोप आणणे आणि पाठविणे आणि इतर महत्त्वाची कामेही त्यांच्याकडे असतात.

अशाच प्रकारे चांदीचे दंड असलेले एक हजार दंडधारी एका वेगळ्या अधिकाऱ्याखाली असतात. तेही मनसबदारच होत आणि त्यांचा पगार (मनसब) २०० ते ५०० दरमहाचा असतो. सेनाधिकारी आणि सरदार यांच्याकडे पत्रे आणि निरोप यांची ने-आण यांच्याकडे असते. राजदूतांचा सत्कार आणि इतर किरकोळ कार्यक्रमांच्या प्रसंगी हे हजर असतात.

दंडधाऱ्यांचा आणखी एक तिसरा अधिकारी असतो. त्याच्या हाताखाली लोखंडी दंड घेतलेले मनसबदार असतात. त्यांना इतर शिपायांप्रमाणे पगार (मनसब) मिळतो. लहान सहान लोकांच्याकडे निरोपांची ने-आण करण्याचे काम यांच्याकडे असते. बादशहा जेव्हा दरबार भरवतो, तेव्हा या तिन्ही प्रकारच्या दंडधाऱ्यांच्यामुळे दरबारला मोठी शोभा येते.

याशिवाय दरबारात पटांगणाच्या भोवती, ठिकठिकाणी अनेक शिपाई तैनात केलेले असतात. दरबार प्रसंगी पटांगणात उत्तम झुली घातलेले आणि सजविलेले नऊ हत्ती असतात. याशिवाय दहा हत्ती आणि हत्तिणी पटांगणात आणण्यात येतात. हे दहा हत्ती दरबारच्या प्रसंगी बादशहाला मुजरा करून परत जातात. वर उल्लेखलेले नऊ हत्ती मात्र दरबार संपेपर्यंत पटांगणात हजर असतात. याशिवाय पटांगणात उत्तम रितीने सजविलेले नऊ घोडे तयार असतात. मोहिमेवर निघताना दरबारातून राजपुत्र निरोप घेऊन जातात. एकेका वेळी दोन दोन लाखांचे सैन्य या राजपुत्रांच्या बरोबर असते. इतकी माणसे राजपुत्रांच्या बरोबर गेली तरी दरबारातील हजर असलेल्या अगर तैनात असलेली माणसे कमी झाली असे कधी होत नाही.

## आग्रा (अकबराबाद)

या प्रांतात पांढरे कापड, रेशमीवस्त्र व पागोटी, किनारीवस्त्र आणि स्त्रियांच्या इतर वस्त्राकरिता लागणारे जरीचे सुंदर कापड, इत्यादी प्रकारचा माल तयार होतो.

१. पगार नव्हे मनसब.

हा सर्व माल या शहरातच बनतो. आजुबाजूच्या भागात निळीचे पीक येते. मुख्य शहराचे नावही तेच आहे. हे शहर अकबर बादशहाने वसविले. बंगाल प्रांतातून येत असलेले सोन्यानाण्याचे उत्पन्न आग्र्यात ठेवण्यात येते. शिबंदीकरिता येथे पंधरा हजारांचे घोडदळ ठेवले आहे. या प्रांतातील शेतकरी वर्ग बंडखोर वृत्तीचा आहे. त्याला काबूत ठेवण्याकरिता ह्या घोडदळाचा बराचसा भाग उपयोगात आणावा लागतो.

### लाहोर

लाहोर हे प्रांताचे मुख्य शहर होय. येथे तलम पांढरे कापड तयार होते. येथे जे रंगीबेरंगी रेशमी कापड तयार होते त्याला "अलाचा" असे म्हणतात. भरतकाम केलेले कापड, साधे व फुलांचे गालीचे, धनुष्यबाण, तंबू, जीन, तलवारी, जाडेभरडे लोकरी कापड, पादत्राणे, इत्यादी माल येथे तयार होतो. जवळच्या पर्वतातून मीठ मिळते, हा सर्व माल दिल्लीला रवाना होतो. तेथे त्याला चांगली बाजारपेठ आहे. येथील लोक धिप्पाड, गौरवर्णी, स्वभावाने मनमिळाऊ व मदत करण्यास तत्पर असे आहेत. या प्रांतात मुस्लीम धर्मशास्त्रे, अरबी, फारशी भाषा इत्यादी विषयांत प्रवीण असलेले लोक बरेच आहेत. येथील जमीन सुपिक असून त्यात भात व इतर धान्ये पिकतात. येथे साखर मात्र फार महाग मिळते. या प्रांतात पाच मोठ्या नद्या वाहतात म्हणून याला पंजाब म्हणतात. येथे शिबंदीमध्ये बारा हजार घोडेस्वार आहेत.

### अजमीर

अजमीर हे प्रांताचे मुख्य शहर होय. येथे पुष्कळ तलम कापड तयार होते. धान्य विपुल पिकते. दुधदुभते भरपूर होते. याच प्रांतातील सांभर या जिल्ह्यातून पुष्कळ मीठ मिळते. या प्रांताचे उत्पन्न सतरा लाख रुपये आहे. शिबंदीमध्ये सहा हजार घोडेस्वार ठेवले आहेत. रजपुतांची राज्ये या प्रांताला लागून आहेत.

### गुजरात (अहमदाबाद)

या प्रांतात जरीचे व फुलांच्या आकृत्या काढलेले सुबक रेशमी कापड मुबलक तयार होते. या मालाला सर्वत्र मागणी आहे. येथे सोन्याचांदीचे व रत्नजडित अलंकाराचे काम पुष्कळ होते. त्यासाठी व्यापारी लोक पेगु, पेस्कारी[1] व इतर ठिकाणांहून रत्ने मागवतात. हे व्यापारी गुजराती हिंदू होत. ते दिसण्यात चांगले असतात. त्यांच्या बायका अलंकाराखाली नेहमी दबलेल्या असतात.

### माळवा

पांढरे तसेच रंगीत कापड या प्रांतात विपुल तयार होते. धान्याच्या बाबतीतही हा प्रांत समृद्ध आहे. या प्रांतात सात हजार स्वार तैनात असतात.

१. पेस्कारी—कन्याकुमारीजवळील तिनेवेल्ली वगैरे भाग.

## पाटणा (बिहार)

येथे पांढरे तलम कापड पुष्कळ तयार होते. कच्चा सोरा येथे विपुल मिळतो. युरोपियन लोक तो युरोपला पाठवितात. या प्रांताचे मुख्य शहर पाटणा येथे मातीची भांडी पुष्कळ तयार होतात. या भांड्यांना एक तऱ्हेचा सुवास येतो. ही भांडी कागदाइतकी पातळ व फार नाजूक असतात. दिल्लीतील अमीर उमराव या भांड्यांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग करतात. येथे सात हजार स्वार तैनात असतात.

## मुलतान

चीटाचे कापड आणि धनुष्यबाण हा माल या प्रांतात पुष्कळ तयार होतो. आखूड केसांचे उंट, खेचरे आणि गाढवे येथे विपुल आहेत. या प्रांतात बरेच प्रतिष्ठित जमीनदार आहेत. ते बलुची वंशाचे असून बादशहाशी एकनिष्ठ आहेत. ते सर्व मुसलमानी धर्माचे आहेत. येथे शिबंदीसाठी सहा हजार स्वार ठेवले आहेत.

## काबूल

काबूलला उत्तम घोड्यांची निपज होते. त्यांना तुर्की घोडे म्हणतात. लांब केसांचे उंट येथे पुष्कळ आहेत. युरोपप्रमाणे येथे फळांचे वैपुल्य आढळते. येथील हवामान फार थंड आहे. लोक गौरवर्णीय आहेत. युरोपियन लोकांप्रमाणे ते टेबल मांडून जेवतात. कृष्णवर्णीयांना जे आपल्या पंक्तीत बसू देत नाहीत त्यांना ते गुलाम म्हणतात. हिंदुस्थानचे व्यापारी तिकडून बीव्हर (मुंगसासारखा प्राणी) प्राण्याची कातडी, कस्तुरी, माणिके इत्यादी विकत घेतात. या वस्तू काबूल प्रांतात बल्क, बदकशान इत्यादी शेजारी देशांतून येतात. काबूल प्रांताचे उत्पन्न फार थोडे आहे. असे असूनही या प्रांतात ६० हजार स्वार तैनात आहेत. याचे कारण हा प्रांत इराक, बल्क आणि पठाण यांच्या देशांना लागून आहे हे होय.

## ठठ्ठा (सिंध)

या प्रांतात तलम, जाडे भरडे व रंगीत अशा प्रकारची कापडे पुष्कळ तयार होतात. कातडेही तयार होऊन ते इराण आणि अरबस्तानकडे निर्यात करण्यात येते. या प्रांतात धान्यही विपुल पिकते. येथे तयार होणारे लोणी मस्कतकडे निर्यात करतात. या प्रांतात ५ हजार स्वार तैनात आहेत. मी (मनुची) जेव्हा प्रथम ठठ्ठा येथे गेलो होतो, तेव्हा ठठ्ठाच्या माजी राजाच्या मुलाशी मैत्री झाली होती. तो दुर्दैवी मनुष्य आंधळा होता. कारण हा धाडशी व चळवळ्या मनुष्य पळून जाऊन बापाचे राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न करील या भीतीने अकबर बादशहाने त्याचे डोळेच फोडून टाकण्याची आज्ञा केली होती. येथील अनेक लोक आपला जन्म अकबराच्या काळी झाला आहे असे सांगतात.

भक्कर (सिंध)

या प्रांतात पांढरे व रंगीत अशी कापडे बरीच तयार होतात. जमीन सुपीक आहे. उत्तम प्रतीचे धान्य येथे पिकते. सामान्यतः येथील रहिवाशी आर्थिक दृष्टीने गरीब आहेत. लोक सामान्यपणे दुधदुभत्याचा धंदा करतात. या प्रांतात दोन हजार स्वारांची तैनात आहे.

ओरिसा

या प्रांतात अनेक बलाढ्य हिंदू जमीनदार आहेत. या प्रांतात बरेच पांढरे तलम कापड तयार होते. भाताचे पीक विपुल येते. जगन्नाथाचे देऊळ याच प्रांतात आहे.

काश्मीर

या प्रांतात लोकरी कापड मोठ्या प्रमाणावर तयार होते. तबके, पेट्या, चमचे तसेच पलंग हे सर्व सामान, काश्मीरी लोक एक प्रकारच्या लाकडापासून तयार करतात. काबूलप्रमाणेच येथेही फळे विपुल होतात. येथील लोक गोरे व देखणे आहेत. येथे चार हजार स्वारांची शिबंदी तैनात आहे.

अलाहाबाद

या प्रांताचे व त्याच्या मुख्य शहराचे नाव एकच आहे. अलाहाबाद शहरी मातींची भांडी होतात. पण ती फारशी टिकाऊ नसतात. बनारस व इतर ठिकाणी रेशमी व जरीचे अशा प्रकारांचे कापड पुष्कळ तयार होते. त्यांचा उपयोग पागोटी, कंबरपट्टे व स्त्रियांची तऱ्हेतऱ्हेची वस्त्रे तयार करण्याकडे होतो. या प्रांतात आठ हजार स्वार तैनात आहेत. पण ते सर्व बाहेर पाठवितात. कारण येथील शेतकरी फार बंडखोर वृत्तीचे आहेत. येथे अन्नधान्ये व भाजीपाला पुष्कळ होतो.

औरंगाबाद

औरंगजेब बादशहा स्वतः येथे सुभेदार असताना त्याने हे शहर वसविले आहे. या प्रांतात पांढरे सुती कापड व रेशमी धाग्याचा माल अशा प्रकारांचा बराच माल तयार होतो. औरंगाबाद हे शहर विजापूर व गोवळकोंडा या राज्यांच्या सरहद्दीवर होते. तसेच शिवाजीचा मुलूखही औरंगाबादेजवळ होता. त्यामुळे पूर्वी येथे बरेच मोठे घोडदळ तैनात होते. पण सध्या येथे थोडी शिबंदी आहे. कारण बाकीचे सगळे सैन्य मराठ्यांशी लढण्यात गुंतले आहे.

वऱ्हाड

धान्याच्या उत्पादनास योग्य अशीच वऱ्हाडची जमीन आहे. धान्य, भाजीपाल्याची येथे समृद्धी आढळते. अफूची व उसाची बरीच लागवड होते. सात हजार स्वार येथे तैनात आहेत.

## बऱ्हाणपूर (खानदेश)

येथे होणारे पांढरे कापड व रंगीत कापड, इराणी व अर्मेनियन व्यापारी मोठ्या प्रमाणावर, इराण, तुर्कस्थान आणि अरबस्तानला निर्यात करतात. जमीन सुपीक असल्यामुळे अनेक धान्यांची पिके येथे काढली जातात. येथील शिबंदी सहा हजार स्वारांची आहे.

## बागलाण

येथे जाडेभरडे कापड पुष्कळ तयार होते पण तलम कापड तयार होत नाही. धान्ये पुष्कळ पिकतात. यात ५ हजार स्वार तैनात आहेत.

## [1]नांदेड

पांढरे कापड पुष्कळ तयार होते. जमीन सुपीक असल्यामुळे धान्य पुष्कळ पिकते. यात सहा हजार स्वारांची तैनात आहे.

## ढाका (बंगाल)

बंगाल मधील सर्वात मोठे व मुख्य शहर. पांढरे तलम कापड व रेशमी माल फार मोठ्या प्रमाणावर तयार होतात. त्या मालाची युरोपला व इतरत्र अनेक जहाजातून निर्यात होते. गोहाती, हाजोचा (आसाममधील) किल्ला, चितगाव वगैरे मुलूख या शहराचे देखरेखीखाली येतो. अर्कान आणि आसाम ही राज्ये सरहद्दीवर असल्या मुळे या प्रांतात ४० हजार स्वार तैनात आहेत.

## उज्जयनी

या प्रांतात फक्त धान्य व मीठ यांचे उत्पादन होते. हा प्रांत महत्त्वाचा असल्या-मुळे आणि याच्याभोवती प्रबळ राजांचे प्रदेश असल्यामुळे या प्रांतावर एक मोठा सरदारच सुभेदार म्हणू नेमला जातो आणि दहा हजार स्वार तैनात असतात. कधी कधी एखाद्या राजपुत्राचीही सुभेदार म्हणून नेमणूक होते. हे एक पवित्र क्षेत्र आहे. हे गाव मोडकळीस आले असले तरी अजूनही यात्रेचे मोठे ठिकाण आहे.

## राजमहाल (बंगाल)

या प्रांतात शहाजहान बादशहाचा दुसरा मुलगा शाहामुजा हा राहत होता. येथे चांगल्या प्रकारचे तलम कापड तयार होते. भाताचे पीक पुष्कळ येते. येथे चार हजार स्वार तैनात आहेत.

---

१. नांदेड—हे मराठवाड्यातील नांदेड होय.

### विजापूर

या प्रांतात सध्या औरंगजेब आणि मराठे यांचे युद्ध चालू आहे. औरंगजेबाने या प्रांतातच छावणी केली आहे. मराठे हा प्रांत जिंकून घेतील या भीतीने तो या प्रांतातच राहिला आहे.

### गोवळकोंडा (हैद्राबाद)

हिऱ्याच्या खाणीकरिता हा प्रांत प्रसिद्ध आहे. येथे उत्कृष्ट चिटाचे कापड, तसेच तलम व जाडे पांढरे कापड अशा अनेक प्रकारांचे पुष्कळ कापड तयार होते. या प्रांतात लोखंड बरेच सापडते. या प्रांतात शिबंदी २० हजार स्वारांची आहे. पण कर्नाटक जिंकून घेतल्यापासून बादशहानी ती वाढवून एकूण प्रांतात (कर्नाटकसहित) ६० हजारांची केली आहे. परंतु अधिकारी सरंजामाचे खोटे आकडे दाखवून बादशहाला न मिळता पैशाचा अफरातफर करतात. वरील सर्व प्रांतात टांकसाळी आहेत व त्यांत नाणी पाडली जातात.

वरील प्रांतात जेथे जेथे ज्या ज्या प्रकारचा उत्तम माल तयार होतो, तो मिळविण्यासाठी बादशहा आणि राजपुत्र आपले स्वतःचे अधिकारी त्या त्या प्रांतात तैनात ठेवतात. प्रांतोप्रांतीचे मोगल सुभेदार यांच्या त्या त्या प्रांतातील हिंदु राजे आणि जमीनदार यांच्याशी कटकटी चालू असतात.

### हिंदु राजांच्या संबंधी माहिती

आता हिंदु राज्यांत काय उत्पन्न होते ते थोडे सांगितले पाहिजे. राण्याच्या (उदेपूरच्या) राज्यात धान्य बरेच पिकते. पपई सारखी फळे, अफू, हळद इत्यादि वस्तू निपजतात. राण्याच्या मालकीच्या तांब्याच्या खाणी बऱ्याच आहेत. याशिवाय त्या राज्यात जाडे भरडे चिटाचे कापडही बरेच तयार होते.

**राठोड घराणे (जोधपूर, बिकानेर) :** राठोडांच्या (जोधपूर, बिकानेर) राज्यात नऊ जिल्हे आहेत. हा भाग वाळवंटाचा आहे. येथे पाणी फार कमी मिळते. विहिरी अतिशय खोल असतात. या राज्यातील धान्याची निपज पावसाळ्यावर अवलंबून असते. या राज्यात उंट बऱ्याच संख्येने आढळतात.

इतर राजांच्या राज्यांत वरील प्रकारचीच धान्ये पिकतात. लोखंडाची निपज बरीच आहे. यापासून तलवारी, भाले आणि इतर शस्त्रे तयार करतात.

नर्मदेच्या उत्तरेस मोगलांचे मांडलिक असलेले ८४ हिंदु राजे आहेत. त्यापैकी प्रबळ राजे असे तीन होत.

**( १ ) उदेपूरचा राणा :** यात पहिला म्हणजे उदेपूरचा राणा हा होय. याचे राज्य मोठे असून त्याचे उत्पन्नही बरेच आहे. त्याच्या सैन्यात ५० हजार स्वार आणि

२ लाख पायदळ शिपायी असून ते रजपूत जातीचे आहेत. आवश्यक वाटल्यास तो अधिक सैन्यही उभे करू शकतो. त्याला छत्र धारण करण्याचा मान आहे. मोगल साम्राज्यात इतर कोणालाही हा मान नाही.

(२) जोधपूरचा राजा : दुसरा राजा हा जोधपूरचा होय. तोही उदेपूर इतकेच सैन्य उभे करू शकतो.

(३) अंबरचा कचवहा राजा : तिसरा राजा म्हणजे अंबरचा कचवहा राजा हा होय. अंबरचा राजा जयसिंग याने औरंगजेबाची मोठी कामगिरी बजावली. पण याचा मोबदला म्हणून औरंगजेबाने याच्यावर विषप्रयोग करविला. अंबरचे राजे हे जरूर पडल्यास ४० हजार स्वार आणि दीड लाख रजपूत उभे करू शकतात.

वरील तीन राजे अतिशय प्रबळ होत. यांच्यापेक्षा बळाने कमी असे तीस राजे आहेत. त्यांच्यापैकी चार राजांची नावे पुढे देत आहे. पहिला बिकानेरचा करण[१] हा होय. याच्या सैन्यात २५ हजार स्वार आणि ८० हजार पायदळ शिपायी आहेत.

दुसरा राजा बुंदीचा होय. तो हाडा वंशाचा रजपूत आहे. छत्रसाल हाडा याचा उल्लेख पूर्वीच आला आहे. दारातर्फे औरंगजेबाविरुद्ध लढत असताना हा मारला गेला. बुंदीच्या सैन्यात २० हजार स्वार आणि ५० हजार पायदळ शिपायी आहेत.

तिसरा राजा बुंदेला राजा होय. याचे नाव दलपतराय असून त्याच्यापाशी १५ हजार स्वार आणि बरेच पायदळ असे सैन्य आहे.

चौथा राजा रावतेला (राठोड) वंशाचा रामसिंग[२] हा होय. हा दारातर्फे लढत असताना मारला गेला. या घराण्यातील राजे २५ हजार स्वार आणि ७० हजार पायदळ इतके सैन्य उभे करू शकतात.

तीस राजांपैकी चार राजांची नावे वर दिली आहेत. या तीस राजांना सोडून तितक्याच महत्त्वाचे आणखी २७ राजे आहेत. ते रजपूत आहेत. ते ज्या जमातींचे आहेत त्यापैकी काही नावे खालीलप्रमाणे आहेत.

चव्हाण, पवार, भादोरिया, बंधलगोटी, रामवंशी, बच्चगौर, भुर्तीया, चंद्रावत, चंदेल, बनाफीर, सोळंखी, सुरजवंशी, सोमवंशी, यदुवंशी इत्यादि. बाकीचे पाच-पन्नास राजे यापेक्षा कमी महत्त्वाचे आहेत.

---

१. मृत्यू १०७७ हि. इ. स. १६६६–६७.

२. हे किशनगडचे राज्य होय.

**काही राजांचे धर्मांतर :** वरील ८८ राजांपैकी औरंगजेबाच्या भरघोस आश्वासनांना बळी पडून तीन राजे मुसलमान झाले. त्यांची सुंता करण्यात आली. औरंगजेबाने त्यांची राज्ये घेतली. त्यांना पदव्या दिल्या आणि उपजीविकेसाठी त्यांना फार थोडी मनसब दिली. त्यांना काय काम दिले म्हणाल तर आपल्या खाजगीकडे त्यांना ल्हानसहान हुद्दे दिले.

एका राजाकडे त्याने पुढील काम दिले. राजवाड्यात वापरण्यासाठी लागणाऱ्या सतरंज्या तयार करून घेणे आणि त्यांच्या साठ्यावर देखरेख करणे.

दुसऱ्या राजाला त्याने राजवाड्यातील लागणारी रत्ने, अलंकार इत्यादींची कामे करणारे सोनार आणि कारागीर यांच्यावर देखरेख करण्याच्या कामावर नेमले.

आणि तिसऱ्या राजाकडे अत्तरे आणि अर्क यांची व्यवस्था करण्याचे काम दिले. हा राजा माझा मोठा मित्र होता. तो चोरून दारू पीत असे. तो मला नेहमी म्हणे, "मी जे काही (धर्मांतर) केले त्याचा मला पश्चात्ताप होतो. यामुळे मी बादशहाचा केवळ गुलाम बनून राहिलो आहे." वरील तिन्ही राजांना बादशहाने मोठे हुद्दे दिले नाहीत. याचे कारण म्हणजे ते हिंदु धर्मात परत जाऊन आपल्याविरुद्ध बंड करतील अशी त्याला भीती वाटते.

अशी उदाहरणे घडली आहेत. फिदाईखानाला याचा अनुभव आला. तो[1] अलाहाबादेचा सुभेदार होता. त्याने एका राजाला मी तुला फार मोठा हुद्दा मिळवून देईन अशी वचने देऊन फसविले. तो राजा त्याच्या तावडीत आल्यावर त्याने त्याला कैद केले आणि आपल्याबरोबर लाहोरला नेले. येथे त्याने त्याला जबरीने मुसलमान व्हावयास लावले. त्याचा छळ म्हणून तो त्याला दर आठवड्यास १०० फटके मारावयास लावी. राजाला हा छळ सहन होईना. तो आजारी पडला. मी (मनुची) त्याच्या आजारात औषधोपचार केला आणि त्याला बरे केले. त्याबद्दल मी त्याच्याकडून काहीही घेतले नाही. त्याला प्रवासासाठी म्हणून मी ११० रुपये दिले. तो तावडतोब येथून पळाला. त्याने आपल्या देशात आश्रय घेतला आणि हिंदु धर्माचा स्वीकार केला. त्यानंतर तो मोगल राज्यावर आक्रमणे करू लागला आणि त्याने शक्य तितकी लुटालूट केली. माझ्या बाबतीत मात्र तो कृतघ्नच म्हणावा लागेल. कारण मी त्याचे जे काही भले केले त्याचा त्याने कधीच विचार केला नाही.

**रजपूत राजे, रजपूत लोक :** रजपूत राजाच्या बद्दल असे सांगता येईल की, ते नम्रवृत्तीचे, धर्मनिष्ठ आणि आपल्या वचनाचे पक्के असतात. या शेवटच्या बाबतीत ते मुसलमानाहून अगदी वेगळे होत. कोणालाही शक्य त्या मार्गाने फसविणे हा मुसलमानांना पोरखेळ वाटतो.

---

१. येथे लाहोर असे पाहिजे.

वर दिलेल्या ८४ राजांपैकी बऱ्याच राजांची राज्ये मैदानी मुलुखात आहेत. रजपुतांना शेती अगर शिपायीगिरी हे दोनच व्यवसाय माहीत आहेत. राजाकडून त्यांना उपजीविकेसाठी आणि घोडे पदरी पाळण्यासाठी जमिनी देण्यात येतात. राजास जरूर लागेल तेव्हा ते रजपूत घोडे आणि शस्त्रास्त्रे घेऊन राजाकडे येतात. यांना अफू खाण्याची सवय असते. घोड्यांनाही अफू देण्यात येते. युद्धात त्यांना थकवा जाणवू नये हा हेतु असतो. रजपूत शिपायी युद्धप्रसंगी केशरी पोशाख करतात. बहुसंख्य रजपूत शिपायी हे भालाईत होत. युद्धाच्या प्रसंगी सैन्याबरोबर भाट, चारण रणवाद्ये वाजवीत असतात. अफूने धुंद होऊन रजपूत शिपायी "मे मरीचे" म्हणजे आज आम्ही मृत्यूला कवटाळणार आहोत असे म्हणत आपले भाले हातात घेऊन वेड्यासारखे शत्रूवर तुटून पडतात. लढाईत भाला मोडला तर कमरेची कट्यार काढून ते वार करीत सुटतात. ते माघार कधीच घेत नाहीत. एक तर जय तरी मिळवितात किंवा आपले प्राण तरी गमावतात.

शत्रूवर हल्ला करण्यासाठी रजपूत घोडेस्वार इतके उतावीळ असत की, रणवाद्ये वाजू लागली की शत्रू दूर असूनही ते आपल्या तुकडीतून बाहेर पडून भरधाव घोडे सोडीत आणि अक्षरशः वेड्यासारखे शत्रूवर तुटून पडून मरण पावत. हे मी (मनुची) प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले आहे.

रजपूत शेतकरी, शेते नांगरीत असताना नेहमी भाले जवळ बाळगीत असतात. शेतीच्या कामाच्या वेळी तलवार, ढाल, खंजीर ही शस्त्रे त्यांच्याबरोबर नेहमी असतात.

उत्तरेकडच्या डोंगराळ भागात काही राजे आहेत. त्यांच्यापैकी प्रमुख म्हणजे श्रीनगर (गढवाल) चा राजा होय. तो मोगलांना खंडणी देत नाही.

काश्मीरला लागून असलेल्या प्रदेशात अनेक राजे आहेत. त्यापैकी काहीजण मोगलांना खंडणी देतात. पण अनेक वेळा ते बादशहाची आज्ञा पाळीत नाहीत. यामुळे त्यांच्याविरुद्ध लढाया चालू असतात. त्यापैकी प्रमुख राजा म्हणजे रूपसिंग हा होय. काही राजांना खंडणी आणि डोंगरातील बर्फ दिल्लीकडे पाठवावे लागते. त्यापैकी एक हा सीरमूर (आता हिमाचल प्रदेश) चा राजा होय. त्याला बर्फी राजा असे म्हणतात.

या डोंगराळ प्रदेशातील लोक वर्णाने गोरे असतात. चेहेरपट्टीत त्यांचे चिनी लोकांशी बरेच साम्य दिसते. या डोंगराळ भागातच भूतान नावाचे राज्य आहे. त्या राज्यात सोने, कस्तुरी, लाल माणके आणि इतर रत्ने आढळतात.

रजपूत राजे हे शूर आणि बलिष्ठ म्हटले पाहिजेत. ते आपल्या जुन्या धार्मिक आणि सामाजिक आचारविचारांशी एकनिष्ठ आहेत. आपल्या वाडवडिलांचे मित्र

ते आपले मित्र आणि शत्रू ते आपले शत्रू अशी त्यांची भूमिका असते. या रजपुतांची परिस्थिती खालावलेली असली तरी ते आपली जुनी धार्मिक परंपरा सोडीत नाहीत. रजपुतांच्या वरील स्वभावाचा आणि प्रवृत्तीचा मोगल बादशहा हे आपल्या लाभासाठी उपयोग करून घेतात. त्यांना हवे असेल तेव्हा रजपूत राजांना वर चढवतात आणि रजपुतांच्या विरुद्ध लढणे असल्यास ते (बादशहा) रजपुतांचाच उपयोग करतात. [1]राणा, [2]राठोड, [3]कच्चवहा, [4]बुंदेल इत्यादी रजपूत राजे हे जरी एक झाले तरी ते मोगलांना हिंदुस्तानातून सहजपणे हाकलून लावू शकतील.

रजपूत हे आपपसात पिढ्यानपिढ्या वैर कसे बाळगतात याचे एक उदाहरण पुढे देत आहे. एका रजपूत शिपायाने राजा जयसिंग याला भाल्याने मारण्याचा प्रयत्न केला. या रजपुताला बिकानेरच्या राजाने पाठविले होते. बिकानेरचे आणि जयपूरचे आपपसातील वैर पाचशे वर्षे चालले होते. यावरून हिंदु आपल्या परंपरागत चालींना आणि त्यातल्या त्यात आपल्या धर्माला कसे चिकटून राहतात याचा वाचकाने विचार करावा.

मी मोगलांच्या वैभवाचे आणि शक्तीचे आतापर्यंत वर्णन केले. मी (मनुची) जे काही पाहिले आणि अनुभवले त्यावरून माझे स्पष्ट मत पुढीलप्रमाणे आहे. उत्तम सेनापती आणि ३० हजार कसलेल्या युरोपियन शिपायांचे सैन्य जर या देशात आले तर हे सगळे साम्राज्य निकालात काढून ताब्यात आणणे सहज शक्य होईल.

**मोगल साम्राज्यातील प्रदेश :** येथे वाचकांच्या करिता, मी (मनुची) या साम्राज्याने व्यापलेल्या प्रदेशाची माहिती देत आहे. यातील रस्ते सरळ नाहीत. कारण वाटेत डोंगर, नद्या व इतर राजांचे मुलूख येतात. हे राजे प्रवाशांना, मोगलांच्या भीतीने आपल्या प्रदेशातून जाऊ देत नाहीत. वाटेत चोर, दरोडेखोर लोकांना लुटतात, म्हणून हे रस्ते सुरक्षित नाहीत. मोठे व पुष्कळ रहदारीचे रस्ते खालीलप्रमाणे आहेत :—

| | | | |
|---|---|---|---|
| मद्रास बंदरापासून गोवळकोंड्यापर्यंत | | ... | २१६ कोस. |
| गोवळकोंडा ते औरंगाबाद | ... | ... | १६८ कोस. |
| औरंगाबाद ते बऱ्हाणपूर | ... | ... | ७२ कोस. |
| बऱ्हाणपूर ते सिरोंज | ... | ... | १४४ कोस. |
| सिरोंज ते आग्रा | ... | ... | १४४ कोस. |
| आग्रा ते दिल्ली | ... | ... | ७६ कोस. |

१. राणा—उदेपूर.
२. राठोड—जोधपूर, बिकानेर इत्यादी.
३. कचवहा—जयपूर.
४. बुंदेल—ओर्छा, दतिया, इत्यादी.

| | | | |
|---|---|---|---|
| दिल्ली ते सरहिंद | ... | ... | ८४ कोस. |
| सरहिंद ते लाहोर | ... | ... | १०४ कोस. |
| लाहोर ते लहान गुजरात | ... | ... | ३६ कोस. |
| लहान गुजरात ते सिंध नदी किनारा | | ... | १३६ कोस. |
| सिंधु नदी ते पेशावर | ... | ... | ३६ कोस. |
| पेशावर ते काबूल | ... | ... | १४४ कोस. |
| काबूल ते गझनी (आता उध्वस्तावस्थेत) | | ... | ७२ कोस. |

गझनीपासून वीस कोसांवर कंदाहारची सीमा लागते. कंदाहार हे इराणी राज्यात आहे. येथे मोगल साम्राज्याचा प्रदेश संपतो. उत्तरेकडील या बिंदूपासून बंगालमधील हुगळीपर्यंतचे अंतर येथून मद्रासपर्यंतच्या अंतराइतकेच येते. मात्र यातून आसामच्या जवळील भाग वगळला आहे.

या साम्राज्याच्या रुंदीचा विचार करता पुढीलप्रमाणे अंतरे आढळतात :-

| | | | |
|---|---|---|---|
| दक्षिणेकडील सुरत ते बऱ्हाणपूर | ... | ... | १६८ कोस. |
| बऱ्हाणपूर ते आग्रा | ... | ... | २८८ कोस. |
| आग्र्यापासून उत्तरेकडील डोंगराळ भागातील राजांच्या प्रदेशापर्यंत. | | | १२० कोस. |
| ठठ्ठा ते मुलतान | ... | ... | २७८ कोस. |
| मुलतान ते लाहोर | ... | ... | १४४ कोस. |

लाहोरपासून काश्मीरच्या डोंगराळ प्रदेशापर्यंत १६० कोस.[1] वाचकांनी हे लक्षात ठेवावे की मोगलांच्या मुलुखातील कोस अगर लीग अंतर हे युरोपच्या लीगहून भिन्न आहे. हिंदुस्थानचे १० लीग म्हणजे युरोपचे १२ लीग होत.

मागे वर्णन केलेल्या राज्यांच्या खेरीज नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशात काही राजांचे मुलूख येतात. यांच्यापैकी बरेच राजे शूर व पराक्रमी आहेत. लहानसहान राज्ये वरीच आहेत. ते मोगल बादशहाचे मांडलिक आहेत. त्यांच्या राज्यातील निवडक माल त्यांना मोगल बादशहाकडे पाठवावा लागतो. काही राजे बहिरी ससाणे व इतर सुंदर पक्षी, मध आणि मेण पाठवितात. मेणाच्या मेणबत्त्या व मेणकापड तयार करण्याकडे उपयोग होतो. या कापडाचा उपयोग, तंबु व तशाच प्रकारच्या वस्तू-करिता होतो. इतर काही राजे त्यांच्या राज्यात होणारी फळे, गुलाम, वाघ इत्यादी गोष्टी पाठवितात.

१. एक लीग म्हणजे ३ मैल आणि युरोपमधील १० लीग म्हणजे हिंदुस्तानातील १२ कोस असले तर १२ कोसांचे ३० मैल अगर १ कोसाचे २॥ मैल होतात. मूल (पा. २६१) च्या मते अकबराच्या काळातला १ कोस हा २ मैल ४ फर्लांग, १६८ गज लांब असे.

आपल्या राज्यात पूर्ण न्याय आणि शांतता ही आहेत आणि शेळी आणि सिंह हे अक्षरशः एकत्र नांदतात हे पटविण्यासाठी औरंगजेब दरबारच्या अंगणात शेळी आणि सिंह फिरवितो. पण माझा (मनुचीचा) अनुभव असा आहे की औरंगजेबाच्या दरबारात काय आणि साम्राज्यात काय न्याय नावाची वस्तु नाही. प्रत्येक जण लुबाडण्याचाच विचार करीत असतो. बादशहाला या परिस्थितीतून मार्ग सापडत नाही.

या साम्राज्यात जमीनदार नावाचा एक वर्ग आहे. जरूर पडल्यास बंदुकी चालवणारे, धनुष्यबाण चालवणारे, भालाईत, असे एकंदर ४० हजार शिपाई हे जमीनदार उभे करू शकतात. त्यांच्यापाशी घोडदळ नसते.[1] बहुसंख्य जमीदारांचे इलाखे हे अरण्यमय भागात आहेत. शस्त्रबळ वापरल्याशिवाय हे जमीनदार बादशहाला कर किंवा खंडणी देत नाहीत. मोगल साम्राज्यातील हे लहान मोठे राजे आणि वर उल्लेखिलेले जमीनदार यांची संख्या ५ हजाराहून अधिक आहे.

**विजापूर-गोवळकोंडा राज्ये :** औरंगजेबाने जिंकून घेतलेल्या विजापूर व गोवळकोंडा या राज्यात कर्नाटकचे दोन प्रांत होते.[2] विजापूर कर्नाटकात काही हिंदु राज्ये आहेत. कन्याकुमारीला लागून असलेली राज्ये मोगल बादशहाला खंडणी देत नाहीत. याशिवाय तंजावरचे[3] राज्य आहे. तंजावरचा राजा हा वर्षाला ६० लाख रुपये बादशहाला देतो. मराठ्यांशी चालू असलेल्या युद्धामुळे मोगलांनी ही राज्ये आजपर्यंत जिंकली नाहीत. औरंगजेब काही वर्षे जगला तर तो ही राज्ये जिंकून घेईल. औरंगजेबाचे धोरण असे आहे की, राजांची संपत्ति हळूहळू हरण करावी, क्रमाक्रमाने राज्याचा प्रवेश घ्यावा आणि शेवटी राज्य बुडवावे. असा अनुभव असूनही ही राज्ये मोगलांचा प्रतिकार करण्यासाठी एकत्र येत नाहीत.

गोवळकोंडा राज्यातील कर्नाटक विभागात साठ किल्ले आहेत. त्यापैकी एक म्हणजे वेलूरचा[4] किल्ला होय. हा किल्ला मराठ्यांच्या ताब्यात होता. त्या किल्ल्याचा तळ करून मराठे जवळपासच्या मोगल इलाख्यावर आक्रमणे करीत. या आक्रमणांकडे मोगल सेनापती जाणूनबुजून दुर्लक्ष करीत. तो भाग जिंकून घेण्याची मोहीम रेंगाळत राहावी, असे या मोगल सेनापतींना वाटे. या सेनापतींना मोठमोठे हुद्दे, पदव्या हव्या असत. त्यांना संपत्ति गोळा करावयाची असे. हे मोगल सेनापती लहानसहान राजे लोकांच्यावर दहशत बसवीत. पण आपल्या शिपायांना पगार देत नसत. या उपासमारीमुळे मोगल सैन्याचे अनेक लोक मराठ्यांना जाऊन मिळत.

१. गोंडवन, ओरिसा, सौराष्ट्र इत्यादी भागातील लहान मोठे राजे मनूचीला अभिप्रेत दिसतात.

२. ही दोन राज्ये जिंकून घेतल्यावर औरंगजेबाने त्याचे चार भाग केले. १ सुभे विजापूर २. विजापूर, कर्नाटक. ३. सुभे गोवळकोंडा. ४. गोवळकोंडा-कर्नाटक.

३. हा रामेश्वर-रामनाडचा सेतुपति राजा असावा.

४. हा किल्ला मद्रास (आता तामीळनाडू) राज्यात आहे.

यामुळे मराठ्यांचे बळ अधिक वाढते. असा प्रकार ( शत्रूशी संगनमत करणे, मोहीम लवकर संपू नये म्हणून हल्ले करण्याचे टाळणे, इत्यादी ) मोगल राज्यात सर्रास चालतो, हे मी अनेक वेळा प्रत्यक्ष पाहिले आहे. त्याचे एक उदाहरण देतो.[1] महाबतखान हा एकदा एका राजाविरुद्ध लढाईचे सोंग करीत होता. त्याच्या पदरी बॉस नावाचा डच इंजिनिअर होता. तो महाबतखानाला म्हणाला "आपण परवानगी द्याल तर मी लढण्याची अशी मसलत सांगेन की, त्यामुळे थोड्याच काळात शत्रूचा मुलूख जिंकून घेऊ शकाल." महाबतखानाने मद्दडपणाचा आव आणून त्याला म्हटले "तुमचा पगार तुम्हाला मिळतो ना आणि मी रोज तुम्हाला पुलाव-पक्वान्न पाठवतो तो तुम्हाला मिळतात ना." डच इंजिनियर म्हणाला "होय." यावर महाबतखानाने म्हटले "मग तुम्ही आपल्या तंबूत परत जा आणि मी सांगेन तेव्हा तुमचा सल्ला देत जा".

## किल्ले

मोगल साम्राज्यातील प्रमुख किल्ले म्हणजे दिल्ली, आग्रा, ग्वाल्हेर, काबूल, दौलताबाद, विजापुर, गोवळकोंडा, रोहतास[2] हे होत. या किल्ल्यांवर अत्यंत विश्वासू अशाच अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात येते.

हिंदुस्तानात काबूलपासून बंगालपर्यंत १०० किल्ले असावेत. विजापूर, गोवळकोंडा आणि कर्नाटकचे दोन प्रांत अशी सगळी दक्षिण मिळून ३८० किल्ले आहेत. म्हणजे एकंदरीत मोगल साम्राज्यात ४८० किल्ले होत. या किल्ल्यांवर किल्लेदार म्हणून विश्वासू लोकांचीच निवड करण्यात येते. ते रजपूत, सैय्यद आणि मोगल या जमातींचे असतात. पण पठाणांना किल्लेदारीचे काम कधीच सांगण्यात येत नाही. कारण ते हुमायू बादशहाच्या काळात झाले तसे फितुरीचे एखादे कारस्थान करतील अशी मोगल बादशहांना भीती वाटते.

या किल्लेदारांना त्यांच्या नेमणुकीच्या काळात किल्ला सोडता येत नाही अथवा एखाद्या अपरिचित माणसाला प्रवेश देता येत नाही. आवश्यक त्यावेळी फक्त परिचित हकिमांना प्रवेश मिळतो. मी (मनुची) सुरतला आलो त्यावेळी तेथील सेनाधिकारी आजारी होता. सुभेदाराच्या विनंतीवरून मी त्याला पाहण्यास गेलो. आत जाताच माझे तोंड झाकण्यात आले आणि तो आजारी मनुष्य मला प्रवेशद्वाराशीच भेटला, कारण कोणालाही आत येऊ देऊ नका असा बादशहाचा हुकूम असल्याचे त्याने मला सांगितले. पुढे माझ्या बाबतीत हा हुकूम मागे घेण्यात आला

१. महाबतखान—हा गोवळकोंड्याचा अधिकारी महम्मद इब्राहिम हा असावा. त्याला पुढे बादशहाने महाबतखान ही पदवी दिली. किंवा दक्षिणेत १६७०–७१ मध्ये मराठ्यांशी लढणारा औरंगजेबाचा सरदार महाबतखान तर हा नसेल ना ?

२. रोहतास—बिहार प्रांतात आहे.

होता. मला वाटते हा हुकूम समुद्रकाठच्या किल्ल्यांना लागू असावा. युरोपियनांच्या बद्दल संशय हे त्याचे कारण असावे. कारण साम्राज्याच्या इतर भागात असा अनुभव आला नाही.

हिंदुस्तानात नोकरांच्या बाबतीत मनुष्य अगदी हताश होऊन जातो. त्यांच्यात चांगुलपणाचा पूर्ण अभाव असतो. ते अतिशय मत्सरी असतात. चोरी करणे, विश्वासघात करणे, खोटे बोलणे, आळसात वेळ घालविणे, वायफळ बडबड करणे या गोष्टी त्यांच्यात प्रकर्षाने आढळतात. त्यांना गुप्तता राखता येत नाही. प्रेम, इमान त्यांना ठाऊक नसते. मालकाबद्दल त्यांच्यात सदा कुरकूर चाललेली असते. त्यांना आपल्या मुलासारखे प्रेमाने वागवा, तरीही ते दुष्टपणा केल्याखेरीज राहणार नाहीत. त्यांच्याकडून काम करून घ्यायचे म्हणजे त्यांना कठोरपणेच वागविले पाहिजे.

कूच करत असताना, सैनिक नोकरांच्या उद्धटपणाकडे दुर्लक्ष करतात. त्रास सहन करतात आणि शांतपणा दाखवितात. कारण त्यांनी लक्ष घालून नोकरांच्या बाबतीत काही उपाय योजिला तर नोकर निघून जाण्याची भीती असते आणि मग सैनिकाला आपला घोडा, उंट व तंबू यांच्याकडे स्वतः लक्ष पुरवावे लागते. स्वतःच स्वयंपाक करावा लागतो. या सर्व गोष्टी एकट्याने करणे शक्य नसते.

शहाजहानचा सासरा असफखान हा वंशानी इराणी होता. एक दिवस त्याच्या निकटच्या लोकांनी पाहिले की त्याच्या डोळ्यात अश्रू आले होते. आपण एवढे श्रीमंत आणि प्रबळ सरदार, आपल्याला दुःख करण्याचे काय कारण आहे, असे विचारता त्याने उत्तर दिले "हिंदुस्तानी नोकर माझ्या वंशाच्या (इराणी) लोकांशी उद्धटपणे वागत असतात. त्यांचा पदोपदी अपमान करतात. त्यामुळे मला अश्रू ढाळण्याची पाळी आली आहे."

मोगल सैन्यातील स्वारांचे नोकर आपल्या धन्याशी कधी कधी चांगले वागतात. पण त्याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत. अनेक वेळा मोगल स्वार छावणीमध्ये आपली बायकापोरे बरोबर घेऊन जात. त्यांच्याबरोबर मोलकरणीही असत. नोकरांची आणि मोलकरणींची आपसात लफडी असल्यामुळे नोकर आपल्या मालकांना चिकटून राहतात. एरव्ही मोगल स्वारांचे हे नोकर एखाद्या मोहिमेवर आपल्या मालकांच्या बरोबर जाण्यास नाखुष असतात. याची कारणे पुढीलप्रमाणे आहेत. मोहिमेत उपासमार होते. दुसरे असे की, शत्रूंच्यामुळे या लोकांची मोठी तारांबळ होत असते. मोहीम चालू असताना छावण्यामध्ये महागाई फार असते. हिंदुस्तानात शेर हा

२८ औंसांचा होय.[१] एक शेर धान्याची किंमत ३ ते ४ रुपये किंवा कधी कधी ८ ते १० रुपये होते. औरंगजेबाच्या विजापूर, गोवळकोंडा आणि मराठे यांच्यावरील मोहिमांमध्ये काही दिवस तर धान्याची धारण १८ रुपयांना एक शेर झाली होती.[२] बरे, या स्वारांना आपल्या नोकरांना अन्न देण्यावाचून गत्यंतर नाही. मराठ्यांच्या विरुद्ध औरंगजेब प्रत्यक्ष गुंतला असताना बैलावरच्या गवताच्या एका भाऱ्याला १० रुपये लागत. औरंगजेबाच्या एकंदरीत मोहिमांत धान्य आणि इतर वस्तू बऱ्याच महाग होत्या. याशिवाय छावण्यांतून रोगराईचा नेहमीच आढळ असे तो वेगळाच

### कायस्थ

मोगल साम्राज्यात हिंदूंची एक जमात आहे. त्याना कायस्थ म्हणतात. हे फार लेखक आणि हिशेबात वाकबदार असे असतात. वरील गुणांमुळे सर्व दरबारांतून[३] त्यांचा वरचष्मा असल्यामुळे मोठे लोक त्यांची फार कदर करतात. कायस्थ दारूचे मोठे शोकी आहेत. ते आपल्या देवतांना दारूचा नैवेद्य दाखवतात. सकाळी उठून ते आंघोळ करतात आणि उघड्या अंगाने देवासमोर प्रार्थना करतात. देवाजवळ दौत आणि टाक यांचे कलमदान ठेवलेले असते. त्याला लागूनच उत्तम दारूची एक बाटली ठेवलेली असते. कायस्थांची पूजा तासभर चालते. पूजेच्या वेळी ते दौतीत थोडी दारू ओततात आणि थोडी दारू देवाच्या मूर्तीवर शिंपडतात. देवासमोर दौत टाकाची पेटी ठेऊन या लेखणीच्या योगे तू आम्हाला साह्यकारी हो अशी ते देवाची प्रार्थना करतात. देवाच्या मूर्ती लहान लहान असून त्या धातूच्या बनविलेल्या असतात.

कायस्थांच्या संबंधी पुढील एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. शहाजहानच्या काळात एक शिपायी आपला पगार घेण्यासाठी म्हणून अधिकाऱ्यांकडे गेला. हा अधिकारी कायस्थ होता. तो कामात असल्यामुळे शिपायाकडे लवकर लक्ष देऊ शकला नाही. त्यामुळे शिपायी चिडला आणि म्हणाला "माझ्या तलवारीने तुमचे दांत पाडून टाकीन." अधिकारी काहीच बोलला नाही. त्याने शिपायाचा पगार दिला. नंतर तो शिपायाला थट्टेने म्हणाला "तुमच्या तलवारीपेक्षा माझी लेखणी अधिक काम करू शकेल." शिपायी निघून गेला. त्या कायस्थ अधिकाऱ्याने शिपायाचे वर्णन असलेली वही मागवली. त्याने सदर शिपायाच्या पुढे, त्याचे समोरचे दोन दात पडले आहेत असे लिहून ठेवले. मोगलांच्या राज्यात सरकारी नोकरांची नावे आणि शरीराच्या खाणाखुणा लिहून ठेवण्याची पद्धत आहे. वरील गोष्टीला काही महिने

१. हे वर्णन बहुधा मद्रास प्रांताला लागू असावे. तेथे कच्चा शेर १$\frac{3}{4}$ औंसांचा आणि पक्का शेर २ पौंडाचा म्हणजे ३२ औंसांचा असतो.

२. हे वर्णन मोगल छावणीतील धान्याला लागू असावे.

३. बादशहा, राजपुत्र, अमीर उमराव, सेनाधिकारी, किल्लेदार, प्रांतीय सुभेदार वगैरेंचा दरबार.

झाले. तो शिपाई आपला पगार मागण्यास पुनः आला. वाटप करणाऱ्या कारकुनाने शिपायांचे नावाचे आणि वर्णनाचे रजिस्टर उघडले. तो शिपायाला म्हणाला "मी तुला पगार देऊ शकत नाही. कारण नावासमोरील नोंदीत, समोरचे दोन दात पडले आहेत असे नोंदले आहे आणि तुझे दात तर शाबूत आहेत" हे ऐकून शिपाई गोंधळला त्याने पुष्कळ तक्रार केली. पण काही उपयोग झाला नाही. शेवटी आपला पगार आणि नोकरी ही जातील, असे पाहून त्या शिपायाने आपले दोन दात पाडून नेतले आणि पगार मिळविला.

मोगल साम्राज्यात जिल्हाजिल्ह्याचे प्रमुख अधिकारी असतात त्यांना फौजदार[1] म्हणतात. त्याचे प्रमुख काम म्हणजे शेतसारा, खंडणी आणि उत्पन्नाच्या इतर बाबी वसूल करणे हे होय. वसुलीच्या बाबतीत फार सक्ती करण्यात येते. वसुलीसाठी प्रमुख जमीनदारांना[2] जबाबदार करण्यात येते. हे लोक इतक्या सक्तीने शेतकऱ्याकडून सारा वसूल करतात. कैदेत टाकणे, उपासमार करणे, चाबकाचे फटके मारणे, असे प्रकार चालतात.

फौजदारांना रस्त्यांची देखरेख करावी लागते. एखाद्या प्रवाशाला अथवा व्यापाऱ्याला जर कोणी दिवसा लुटले तर फौजदारांना त्याबद्दल नुकसानभरपाई करावी लागते. रात्रीच्या वेळी जर तो लुबाडला गेला तर तो प्रवाशाचा दोष आहे असे मानले जाते. त्याने रात्रीच्या वेळी कोठेतरी मुक्काम करावयास हवा होता, या सबबीवर तक्रारच ऐकली जात नाही आणि त्याला सर्वस्व गमावून बसावे लागते.

शहाजहानच्या काळात मोगल दरबारात तुर्कस्तानचा[3] राजदूत आला होता. प्रजेवर इतकी सक्ती होत असलेली पाहून, त्याने बादशहाकडे याबद्दल बोलणे काढले. शहाजहान म्हणाला "ही माणसे तुर्कस्तानच्या माणसासारखी आहेत असे समजू नका. या लोकांशी मी असा सक्तीने वागलो नसतो तर त्यांनी मला पळभरही चैन पडू दिले नसते."

येथील वस्तुस्थिती अशी आहे की, सर्वसामान्य माणसे जवळ चार रुपये असले तर आपणास फार श्रेष्ठ व विशेष मानतात. ते नोकरी करू इच्छित नाहीत. जेव्हा खायलाच काही नसेल तरच ते नोकरी धरतात. ते अगदी अडाणी असतात. त्यांना काही शिकव म्हटले, तर मार मारून सरळ केल्याशिवाय करता येत नाही. म्हणूनच मोगल लोक येथील प्रजेला 'जुलम-परस्त' जुलमी अधिकाऱ्यांचे पूजक असे म्हणतात. काही वेळा हे फौजदार जुलमाची पराकाष्ठा करतात. याचा परिणाम असा होतो

१. आजच्या शब्दात कलेक्टर किंवा जिल्हाधिकारी होय.

२. देशमुख, देशपांडे, देसाई इत्यादी होत.

३. तुर्कस्तान—कॉन्स्टॅन्टिनोपल अथवा इस्तंबूल होय.

की, त्यामुळे बंड होते अथवा लढाईपर्यंत मजल जाते. यात शेतकऱ्यांचा पराजय झाला, तर त्यांची कत्तल करण्यात येते आणि त्यांच्या बायका, मुले, मुली आणि गुरेढोरे यांना पकडून नेण्यात येते. त्यापैकी सुंदर मुली बादशहांना नजर करण्यात येतात. काही मुली ते अधिकारी आपल्याजवळ ठेवतात आणि बाकीच्यांना विकून टाकण्यात येते.

औरंगजेबाचे पूर्वीचे अधिकारी म्हातारे, पोक्त आणि संपन्न होते ते वारले. आता तो तरुण पोरांना अधिकारी म्हणून नेमतो. हे लोक झटपट संपत्ति गोळा करावी या हेतूने धुमाकूळ घालतात. लुटालूट करणे आणि बेकायदेशीर वागणे हा त्यांचा स्वभाव होय. आपल्याविरुद्ध बादशहाकडे तक्रार करू नये म्हणून वाकियानवीस आणि खुफीयानवीस यांना ते लाच चारतात.

अशा रीतीने लोकांचे हाल होत आहेत. राजधानीपासून दूर असलेल्या प्रांतातील प्रजेचे हाल तर विचारायलाच नकोत. यात आणखी एका गोष्टीची भर पडते. मोगल सैन्य एखाद्या प्रांतातून कूच करू लागले की शिपायी लोक प्रजेची गुरेढोरे, अन्नधान्य, गवत, कडबा इत्यादी लुटतात, जळण्याच्या लाकडासाठी त्यांची घरे उध्वस्त करतात आणि मारहाण करीत शेतकऱ्यांना बेगार नेण्यास भाग पाडतात.

मला असे वाटते की, लोकांना त्यांच्या पापाचरणाबद्दल ही योग्य शिक्षा परमेश्वराने दिलेली असावी. कारण त्यांना ईश्वराचे भय वाटत नाही. काही गोष्टी ऐकून घेण्याचा समजूतदारपणा ते दाखवित नाहीत. लहानथोर सर्वच अतिशय उपद्रव देणारे असतात. मुसलमान होणारे हिंदू हे सर्वांत वाईट होत. ते अतिशय उद्दाम आणि वल्गना करणारे असतात. हिंदुस्थानातील एकही मनुष्य खरे बोलत नसतो. येथील लोक लुच्चे, स्वार्थी, कुजतखोर आहेत. असे असूनही त्यांच्यातील खालच्या जमाती आमची घृणा करतात. स्वतः मात्र डुकराहूनही हीन असले तरी आम्हाला ते अपवित्र समजतात.

मला येथे हिंदुस्थानात येऊन आता अठ्ठेचाळीस वर्षे झाली आहेत. तरीपण एकही मुसलमान खिस्ती झालेला मी पाहिलेला नाही. पण मी असे म्हणू शकतो की, अनेक खिस्ती लोकांनी, नोकरीकरिता अथवा स्त्रियांशी आलेल्या संबंधामुळे अथवा काही किटाळ आल्यामुळे मुसलमानी धर्म स्वीकारल्याचे ढोंग केले आहे. पण कोणीही प्रतिष्ठित मनुष्य मुसलमान झालेला नाही.

याबाबतीत दिल्ली शहरात घडलेले एक उदाहरण मी (मनुची) देत आहे. तेथे अँन्टोनिओ डीसूझा सरफाना नावाचा एक पोर्तुगीज इसम होता. त्याचे इतर पोर्तुगीजांशी भांडण होते. तू आपल्या बायकोला आवरू शकत नाहीस तिची दुसऱ्या बरोबर लफडी आहेत, असे म्हणून ते त्याची टिंगल उडवू लागले. यामुळे चिडून

जाऊन त्या पोर्तुगीज इसमाने आपल्या बायकोचा आणि लहान मुलीचा खून केला. चौकशीत मोगल अधिकाऱ्यांनी त्याला सांगितले की, "तू मुसलमान होत असशील तर आम्ही तुझी सुटका करू." पोर्तुगीज इसमाने धर्मांतर करून केले नाही, शिरच्छेदाची शिक्षा धैर्याने स्वीकारली.

कोरोमंडल किनाऱ्यावर आणि बंगालमध्ये दारिद्र्याने पीडलेल्या काही हिंदुना मी ख्रिस्ती झालेले पाहिले आहेत. पण याला कारणे उपासमार अगर एखाद्या ख्रिस्ती पोरीशी लग्न करण्याची इच्छा ही होत. धर्मांतरानंतरही त्या लोकांनी आपल्या हिंदु पद्धती टाकून दिल्या नाहीत.

**मुसलमानी जमाती :** आता काही मुसलमानी जमातींचा मी उल्लेख करीन. त्यापैकी पठाण ही एक प्रमुख जमात होय. हे सिंधु नदीच्या पलीकडे रहातात. मोगल बादशहा त्यांच्याबद्दल फार सावधगिरीने वागतात. कारण एकेकाळी आपण बादशाही केली आहे असा पठाणांचा दावा आहे. मोगलांशी त्यांचे पटत नाही. त्यांच्याशी ते बेटी व्यवहार करीत नाहीत. जरूर पडल्यास हे पठाण ८० हजार स्वार आणि बरेच पायदळ उभे करू शकतात. अर्थात त्यांच्यात आपापसात भांडणे ही आहेतच. त्यांच्या काही टोळ्यांची नावे युसुफ जायी, महंमद जायी, इसा जायी, पन्नी, लोदी इत्यादी होत.

मुसलमानांची दुसरी जमात म्हणजे सैय्यदांची होय. हे पैगंबराचे वंशज म्हणवतात. मुसलमानांना त्यांच्याविषयी फार आदर असतो. हे साम्राज्यात सर्वत्र पसरले आहेत. पण त्यांचे मुख्य ठिकाण यमुना नदीच्या काठावरील बारा खेडी[1] होत. या बारा खेड्यातील सैय्यदांमध्ये उत्तम शिपायी, विद्वान आणि साधुवृत्तीच्या माणसांचा आढळ होतो. वेळप्रसंगी एक हजार स्वार आणि बरेच पायदळ ते उभे करू शकतात.

मुसलमानांची तिसरी जमात शेख जादांची होय. हे जमीनजुमला बाळगून असतात आणि बादशहाच्या चाकरीतही यांचा भरणा आहे.

चौथी जमात बलुच्यांची होय. यांचा प्रदेश हा मुल्तानच्या आसपास आहे.

चिनाब नदीच्या पलीकडे आणि सिंधु नदीच्या अलीकडे धक्कर जमातींचा प्रदेश आहे. हे वेळप्रसंगी १२ हजार स्वारांचे सैन्य उभे करू शकतात.

आणखी एक जमात म्हणजे जाटांची होय. हे लाहोरच्या पलीकडे आहेत.

आणखी एक जमात भटी लोकांची होय. हे सिरहिंद आणि लाहोरच्या दरम्यानच्या प्रदेशात आहेत.

---

१. बारा खेडी प्रदेश मीरत आणि सहारणपूर यांच्या दरम्यान आहे. तो आता मुझफरनगर जिल्ह्यात मोडतो.

मेवाती ही आणखी एक जमात होय.[1]

हिंदुस्थानातील गोरिया आणि मिना या दोन जमातींचा उल्लेख केला पाहिजे.

दक्षिणेत अशाच प्रकारची जमात म्हणजे वेडरांची होय. राजपुत्र शहा आलम याने कोकणावर स्वारी केली त्यावेळी त्याच्या सैन्यात ७ हजार शिपायी वेडर जमातीचे होते.

मोगलांच्या सैन्यातील पायदळ शिपायात प्रामुख्याने बुंदेले रजपूत आणि अलाहाबादकडचे पुरभय्ये यांचा भरणा असतो. ते बंदुकी आणि धनुष्यबाण वापरतात. सैन्याच्या सामानाची देखरेखही ते करतात. ते आपल्या मालकाबद्दल निष्ठा बाळगतात. पण सैन्य कूच करीत असताना ते प्रजेची अन्नधान्ये, जळणाचा लाकडी वगैरे हिसकावून घेण्यात मागे पुढे करीत नाहीत. यासाठी त्यांना शिक्षाही होते. भांडणे उद्‌भवली की ते सर्व एक होतात व प्रतिस्पर्ध्यांना पळवून काढतात. हे मी (मनुची) अनेक वेळा पाहिले आहे. हिंदुस्थानातील लोकांच्या चालीरीती आणि स्वभाव यांचे मी पुरेसे वर्णन केले असे वाटते. या देशातील प्रतिष्ठित लोकांची मोठी करमणूक म्हणजे बुद्धिबळे खेळणे ही होय.

इ. स. १६८९ मध्ये तुर्कांच्या सुलतानाने एक राजदूत[2] औरंगजेबाकडे पाठविला. सुलतानाने औरंगजेबाकडे पैशाचे सहाय्य मागितले. तुर्की राजदूताने औरंगजेबाला म्हटले, "फिरंगी (युरोपियन्स) सैन्याकडून आमच्या बादशहाला धोका निर्माण झाला आहे. औरंगजेबाने त्याच्याकडे १ लाख रुपये दिले. याहून अधिक मदत न देण्याबद्दल त्याने काही निमित्त सांगितले. कारण यावेळी औरंगजेबही मराठ्यांविरुद्ध लढत होता. तुर्की राजदूताच्या आगमनामुळे औरंगजेबाला युरोपियन राष्ट्रांच्या शक्तीची कल्पना आली. हिंदुस्थानातील लोकांची अशी समजूत होती की, युरोपियन म्हणजे बेटावर राहणारे लोक. ते फक्त समुद्रावरच लढू शकतात. युरोपमध्ये अनेक लढाया झाल्या. त्यांची वर्णने केली तरी हिंदुस्थानच्या लोकांवर त्यांचा काही परिणाम होत नसे. तुर्कांचा राजदूत आल्यानंतर मात्र वरील वर्णने (भूमीवरील लढायांची) सत्य असावीत असे त्यांना वाटू लागले. तुर्कांचा सुलतान हा सर्व मुसलमानांमध्ये अतिशय शूर आणि प्रबळ आहे, असा मुसलमानांचा समज आहे. पण युरोपियनांची शक्ती निःसंशयपणे तुर्कांहूनही अधिक आहे हे मान्य करणे औरंगजेबाला भाग पडले.

१. मेवाती या जमातीचा प्रदेश दिल्ली आणि अलवर यांच्यामध्ये आहे.

२. राजदूत—रूमच्या कायसरचा अहमद आका, बुखारच्या वालीचा नदरबे आणि काशगरच्या हकीमाचा अब्दुर रहिम बेग, असे ते राजदूत होते. औरंगजेबाच्या अमदानीच्या ३४ व्या वर्षी ११०१ हि. (१६८९–९०) हा राजदूतानी बादशहाची दरबारात भेट घेतली होती. (मासीरे आलमगिरी पा. ३३७)

आता मोगलांच्या राज्यकारभाराच्या पद्धतीविषयी थोडा विचार करावयाचा आहे. मी (मनुची) मागेच सांगितले आहे की, बादशहा आपला सार्वजनिक दरबार आमखास या दिवाणखान्यात भरवितो. ज्यांना आपली गाऱ्हाणी सांगावयाची असतात ते तेथे येऊन आपली फिर्याद मांडतात. काही लोक गुन्ह्यांना शिक्षा व्हावी अशी मागणी करतात. काही लोक अन्याय व अत्याचार झाल्याबद्दल गाऱ्हाणे सांगतात व इतर तक्रारी मांडतात. आपली समतेची भावना, सत्ता, थोरवी दाखविण्याकरिता बादशहा संताप दाखवून थोड्या शब्दांत गुन्हेगारांचा शिरच्छेद करण्याबद्दल हुकूम करतो. लुटलेल्या प्रवाश्यांना नुकसानभरपाई करण्याचा हुकूम करतो आणि दरबारात येऊन आपल्या गैरकारभाराचा जाब देण्याबाबत सुभेदार व फौजदार यांना कळवितो. काही वेळा तो गुन्हेगारांना क्षमा नाही असे जाहीर करतो व काही बाबतीत चौकशी करून रिपोर्ट (वृत्तांत) सादर करण्याची आज्ञा करतो. हा सर्व देखावा असतो. बादशहाला आपल्या मनाचे फक्त हेच समाधान करून घ्यावयाचे असते की, झालेल्या अन्यायात आपले काहीसुद्धा अंग नाही.

या संदर्भात पुढील घटना पहा. हिंदुस्थानात विकण्याकरिता मस्कतहून घोडे घेऊन आलेल्या अरब व्यापाऱ्यांची गोष्ट आहे. हे व्यापारी सुरतेजवळ आले तेव्हा काही फिरंगी चाच्यांनी त्यांचे घोडे लुबाडले. दिल्लीला जाऊन त्यांनी दरबारात फिर्याद गुदरली. बादशहाने सुरतच्या सुभेदाराला ताबडतोब एक पत्र पाठविले आणि चाच्यांना पकडून दरबारला पाठविण्याचा त्याला हुकूम केला. यापेक्षा अधिक तो काय करणार? कारण सुभेदाराने फिरंगी चाच्यांना पकडणे आणि त्यांना दरबारला पाठविणे ही गोष्ट केवळ अशक्य होती. आम्ही सर्व शक्तिमान आहोत, आम्ही कोणाचीही सत्ता मानत नाही, अशा रीतीने बायफळ बोलण्याचा मोगल बादशहांचा स्वभावच आहे. एक आमचीच सत्ता. दुसऱ्या कोणाचीच सत्ता आमच्या खिजगणतीतही नाही असे दाखविण्याचा आव म्हणजे वरील प्रकारची वागणूक होय.

सामान्यतः मोगल साम्राज्यात कोठेतरी राजे आणि जमीनदार यांची बंडे सारखी चालू असतात. तो दरबारात बसून पुढीलप्रमाणे हुकूम देतो. सुभेदार आणि फौजदार यांना तावडतोब आदेश पाठवा. त्यांनी आपली सैन्ये एकत्र आणून बंडखोरांचा नाश करावा आणि त्यांची डोकी दरबारात पाठवावी. सुभेदारांची सैन्ये कमी असली तर त्यांनी तसे कळवावे. अधिक सैन्ये येथून पाठविण्यात येतील. बंडखोरांचा पाडाव व्हावा व साम्राज्यातून त्यांना काढून टाकण्यात यावे. कधी कधी बादशहा हुकूम देतात की, बंडखोरांना जिवंत अथवा मृत दरबारात पाठविण्यात यावे किंवा सुभेदाराने बंडखोराचे डोके कापून ते पाठवावे. असे हुकूम देण्यास सोपे पण अमलात आणणे अत्यंत कठीण होय.

वरील प्रकारे आज्ञा देण्याचे काम आम-दरबारात होते. हे काम आटोपल्यानंतर बादशहा दरबारातून निघून घुसलखान्यामध्ये जातो. घुसलखाना म्हणजे सल्लामसलतीची आणि निवडक लोकांच्या भेटण्याची जागा होय. या ठिकाणी बादशहा काय काय करायचे याबद्दल अधिकाऱ्यांना खाजगीमध्ये हुकूम देतो. अर्थात प्रत्यक्ष अम्मलबजावणी अधिकारीच करतात. बादशहाला इतर अनेक कामांमुळे बारीकसारीक गोष्टींची चौकशी करणे शक्य होत नाही. अधिकारी जर प्रामाणिकपणे काम करतील आणि बादशहाशी निष्ठेने वागतील तर साम्राज्यातील अनेक कामे पार पडू शकतात, यात संशय नाही. घुसलखान्याचा मूळचा अर्थ स्नानगृह अथवा स्वच्छतागृह असा आहे. या बैठकीत उत्तम सल्लामसलत होते, चांगले निर्णय घेतले जातात आणि योग्य हुकूम दिले जातात. घुसलखाना म्हणजे निवडक लोकांनी जाण्याची मानाची जागा होय.

**बादशहाची निवासस्थाने :** बादशहाची एकंदर तीन प्रमुख निवासस्थाने आहेत. दिल्ली हे सर्वांत जुने; दुसरे आग्र्याला आणि तिसरे लाहोरला आहे. प्रत्येक ठिकाणी एक मोठा बुरुज आहे. त्याला शाहाबुरुज म्हणतात. त्यावर घुमट आहेत. हे घुमट मीना व रत्नजडीत काम यांनी शिल्पाच्या दृष्टीने अत्यंत शोभिवंत केलेले आहेत. या निवासस्थानी निवडक व्यक्तींच्याकरिता अनेक वेळा बादशहा दरबार भरवितो. तेथून तो हत्तींची झुंज पाहून आपली करमणूकही करून घेतो.

या सर्व राजवाड्यांत उत्कृष्ट बगीचे आहेत. बगीच्यांमधून पाणी खेळते ठेवण्यात आले आहे. हे वाहते पाणी सूर्यकांत, संगमरवर या दगडांच्या घडविलेल्या टाक्यांत जाते. ठिकठिकाणी कारंजी आहेत. बगीच्यांमध्ये ऋतुकालाप्रमाणे अनेक फुले फुललेली असतात. बागांत मधूनमधून व वाहत्या पाण्यात ठिकठिकाणी बसण्याचे ओटे केले आहेत. पाण्यात तऱ्हेतऱ्हेचे मासे सोडलेले आहेत.

बादशहा विश्रांतीसाठी एकाच जागी जातो असे नाही. त्याला वाटेल त्या खोलीत तो विश्रांती घेण्यास जातो. बादशहाच्या संरक्षणाची उत्तम व्यवस्था असते. तरीही दगा फटक्याच्या भीतीने तो वारंवार आपली विश्रांतीची स्थाने बदलत असतो. या राजवाड्यांच्या व शहरांच्या (दिल्ली, आग्रा, लाहोर) मोठमोठ्या बागा आहेत. करमणुकीसाठी केलेल्या या बागांमध्ये फुले व फळे पुष्कळ होतात. फुलांमध्ये विशेषतः गुलाबाच्या फुलांची लागवड करतात. या फुलांपासून बादशहाच्या कुटुंबाकरिता गुलाबाचे अत्तर तयार करण्यात येते.

**बादशहाचे मांडलिक राजे :** मी (मनुची) असे पाहिले आहे की, मांडलिक राजे बादशहासमोर असताना भीतीचे व भित्रेपणाचे ढोंग करतात. या त्यांच्या हावभावामुळे बादशहा खूष होतो. आणखी एक गोष्ट येथे नमूद करण्यास हवी. पूर्वी

होऊन गेलेले किंवा आताचे मोगल बादशहा यांनी अनेक युद्धे केली आणि विजय मिळविले. यापैकी बऱ्याच मोहिमांत शस्त्रबळापेक्षा अधिक वापर फसवाफसवी आणि विश्वासघात यांचा करूनच हे विजय मिळालेले दिसतात. एखादा फितूर हाताशी आहे याची खात्री झाल्याशिवाय मोगल बादशहा एखाद्या ठिकाणावर हल्ला करणे अगर लढाई करणे इत्यादी गोष्टींचा विचार करीत नाहीत.

बादशहा आपल्या मांडलिकांना पोषाख, हत्ती, घोडे, शस्त्रास्त्रे वगैरे देणग्या देतोच, परंतु त्याशिवाय दरबारातील अथवा साम्राज्यातील श्रेष्ठ व्यक्तींच्या करिता काही वेगळ्या देणग्या असतात. दरवर्षी तो त्यांना एक "बारानी" म्हणजे रेन-कोटसारखा झगा देतो. पावसापासून रक्षण म्हणून तो दिलेला असतो. "बारानी" हे उत्तम कापडाचे बनविलेले असते. उमरावांचा बहुमान करण्याची आणखी एक पद्धत आहे; ती म्हणजे राण्या अथवा राजकन्या यांच्या मुलींच्या बरोबर त्यांचे विवाह घडवून आणणे.

आपल्या एखाद्या अमीर उमरावावर आपली कृपा आहे हे दाखविण्याची बादशहाची आणखी एक पद्धत आहे. बादशहा दरबारात असताना, त्यावेळी त्यांच्या अंगावर जो झगा असतो तो काढून समोरच्या आपल्या कृपापात्र अमीराला देतात आणि आपल्या समोरच तो त्याला अंगावर घालायला लावतात. पण अशी कृपा करूनही औरंगजेबाने जयसिंग आणि इतर यांचा मृत्यू घडवून आणण्याचे कमी केले नाही हे मी पाहिले आहे. आणि अद्यापही तो प्रेमाचे धोरण दाखवीत लोकांचा नाश करीत आहे.

**राज्यव्यवहार आणि राजवाड्यांची व्यवस्था :** राज्यव्यवहार आणि राजवाड्यांची व्यवस्था यांचे काही नियम पहिल्यापासून चालत आलेले आहेत. राजवाडा, अंतःपुर आणि दरबार यासंबंधीचे नियम ठरलेले असतात व विश्वासू लोकांना ते माहीत असतात. ते मोडणारांची गय केली जात नाही. या ठिकाणी मी पाहिलेली हकिकत सांगतो. मी (मनुची) शाहा आलमच्या पदरी असताना सामान्येकरून आणि विशेषेकरून छावणीत, शाहा आलमच्या निवासस्थानाभोवती व्यवस्था ठेवण्याचे काम आतिषखान याच्याकडे होते. एक दिवस तो अंतःपुराच्या दरवाज्याजवळ आला. तो अगदी नवीन पद्धतीने काही व्यवस्था अमलात आणू पाहत होता हे पाहून अंतःपुरातील खोजे, पाहरेकरी, काश्मिरीदासी, इत्यादींनी दगड, धोंडे, वरवंटे, मुसळे, जोडे, तंबुच्या मेखा, भांडी, बाऱ्या, ताम्हणे, इत्यादींचा त्याच्यावर मारा करून त्याला आणि त्याच्या शिपायांना पळवून लावले. त्याने शाहा आलमपाशी तक्रार केली. शाहा आलमने सौम्यपणे आणि शांतपणे म्हटले "तुम्हाला बादशाही पद्धतीची पुरेशी माहिती नाही. अंतःपुराच्या प्रवेशद्वाराच्या व्यवस्थेशी शिपायी लोकांचा काहीही संबंध नाही. अंतःपुराची व्यवस्था खोजे लोकांकडे असते."

औरंगजेब बादशहाने आपल्या राजवटीत असा एक हुकूम देऊन ठेवला आहे की, प्रत्येक राजपुत्राने आपल्याला ठरवून दिलेल्या दिवशीच बादशहाला भेटण्यास जावे. याला पुढीलप्रमाणे कारण घडले. १६८०त अजमीर शहरी शाहा आलम एके दिवशी बादशहा तेथे असताना त्याच्या भेटीस निघाला होता. एका पुलाजवळ, आझमताराचा लवाजमा दरबारला आधी पोहचण्याकरिता घाईघाईने जाताना त्याला दुरून दिसला. मध्येच कोणी अडवणूक केली तर त्याला त्याचा प्रतिकार करण्याचीही आझमताराच्या माणसांनी तयारी केली होती, असे दिसले. शाहा आलमने समंजसपणाने अथवा भित्रेपणाने आपल्या घोड्याचा लगाम खेचला आणि हल्ला झाल्यास आपण तयार आहोत हे दाखविण्याकरिता त्याने आपल्या कटारीवर हात ठेवला. आझमतारा आणि त्याची माणसे यांना जाऊ द्यावे आणि आपण थांबावे अशी शाहा आलमने आपल्या माणसांना आज्ञा केली. आझमताराने शाहा आलमकडे लक्ष दिले नाही, तो आपल्या मोठ्या भावाशी शिष्टाचाराने वागला नाही. अतिशय तोऱ्यात तो आपला घोडा उडवीत निघून गेला. असे प्रसंग पुनः येऊ नयेत आणि दरबारात गोंधळ होऊ नये म्हणून बादशहाने वरील हुकूम दिला आहे.

औरंगजेबाची मुले आपापसात, एक दुसऱ्या विषयी काळजीने व भिऊन वागतात. म्हणूनच हा म्हातारा (औरंगजेब) आतापर्यंत राज्यावर टिकून राहणे शक्य आहे. परमेश्वराने मला (मनुची) आयुष्य दिले तर औरंगजेबाचा शेवट आणि दुसऱ्या राजवटीची सुरुवात याची मला नोंद घेता येईल.

औरंगजेबाकडे शाहा आलम जाण्याच्या घटनेचा मी (मनुची) उल्लेख केला त्या दिवसाची गोष्ट. दरबारात प्रवेश करताना शाहा आलमच्या बरोबर अनेक शिपायी सैनिक होते. ती गर्दी पाहून पहारेकऱ्यांनी, त्यांनी प्रवेश करू नये म्हणून सैनिकांना अडविले. त्यासाठी त्यांनी हातातील काठ्याही वापरल्या. एका पहारेकऱ्याचा हात शाहा आलमच्या दाढीला लागला. शाहा आलमने मागे वळून पाहिले. तो हसला. आपल्या वडिलांच्या नोकरांचा आपण किती मान राखतो हे दाखविण्यासाठी सगळ्या पहारेकऱ्यांना ५ हजार रुपये वाटून द्यावेत असा त्यांनी हुकूम दिला.[1]

मोगल लोक आपल्या करमणुकीकरिता कबुतरे पाळतात, हे मागेच सांगितले आहे. उमराव, या पक्ष्याचा आणखी एक उपयोग कसा करतात ते मी (मनुची) येथे सांगतो. बादशहा राजवाड्यातून निघाला की नाही आणि दरबार भरविण्याकरिता दिवाणखान्यात आला की नाही, हे कळण्यासाठी उमराव या पक्ष्याचा उपयोग करतात. जाण्यायेण्याचे वृथा श्रम नकोत ही याच्या मागची कल्पना असते. कारण त्यांची घरे राजवाड्यापासून एक एक कोस अंतरावर असतात. आपला लवाजमा ते तयार ठेवतात. प्रथम ते नोकराबरोबर दोन वेगवेगळ्या रंगांची कबुतरे पाठवितात.

१. शाहा आलमच्या सौम्य, मृदु आणि धोरणी वृत्तीवर यामुळे प्रकाश पडतो.

बादशहा राजवाड्यातून निघाला अथवा दरबार भरला असे कळताच, त्या उमरावाचा नोकर, दोहोंपैकी ठरलेल्या रंगाचे कबुतर सोडून सोडतो. ते घरी परत आले की, जासुदाचे काम बजावल्यासारखे होते. त्या कबुतरावरून बादशहा निघाला आहे अथवा दरबार भरला आहे, असे कळते. मग तो उमराव आपला लवाजमा घेऊन तातडीने निघतो. कारण तेथे हजर असणे ही त्याची एक ठराविक कामगिरीच असते. जर दुसरे कबुतर परत आले, तर बादशहा निघाला नाही अथवा दरबार भरविला जाणार नाही, असे तो धरतो. यामुळे तो आपल्या लवाजम्याला रजा देतो व आपण स्वतः घरी आराम करतो.

१६९४ साली औरंगजेब विजापूर प्रांतात असताना अतिसाराने फार आजारी पडला. तो बाहेर दरबारात येऊ शकला नव्हता. तो अशक्त इतका झाला होता की कित्येक वेळा त्याची शुद्धच हरपत असे. यामुळेच तो मरण पावल्याची अफवा पसरली.

आझमतारा धाकेली छावणीत हजर होता. त्याला या परिस्थितीचा उपयोग करून घ्यावेसे वाटले आणि ही बातमी खरी आहे असे धरून तो निघाला. घोड्यावर बसला आणि आपले सशस्त्र पथक घेऊन छावणीतील बापाच्या निवासस्थानापाशी तो आला. तेथे त्याने आपल्या सैनिकांना बादशहाच्या तंबुजवळ तैनात केले. बादशहाच्या तंबूत प्रवेश करण्याचा त्याने निर्धारपूर्वक प्रयत्न केला. बादशहा अद्याप मेला नसला तरी त्याला मारावे असा त्याचा हेतु होता. परंतु त्याच्या अपेक्षेप्रमाणे घडले नाही. तो चाल करून येत आहे असे समजल्यावरून, बादशहाच्या निवासस्थानाजवळ असलेला बहादूरखान चटकन आपले स्वारांचे पथक घेऊन आला. त्याचवेळी आझमतारा बादशहाच्या तंबूत शिरला होता. त्याचा हात धरून बहादूरखान त्याला म्हणाला "तुम्ही बादशहाची आज्ञा मोडत आहात. त्याने बोलावल्याखेरीज तुम्हाला बादशहाला भेटता येणार नाही." मोठ्या कुशलतेने पण निर्धारपूर्वक त्याने आझमताराला हे पटवून दिले व सांगितले "यापुढे तुम्हाला एक पाऊलही आत टाकता येणार नाही. बादशहा जिवंत आहे. मी स्वतः जाऊन तुम्ही आल्याची वर्दी देतो. तुम्हाला आत बोलावले जाईल अशी पण व्यवस्था करतो." बहादूरखानाने म्हटल्याप्रमाणे केले. आझमतारा बादशहाजवळ गेला. त्याला बादशहा अतिशय अशक्त झालेला आढळला. बादशहाने बाहेर जाऊन लोकांना दर्शन द्यावे, अशी आझमताराने सूचना केली. सर्व फौज क्षुब्ध झाली आहे. तिला शांत करण्याचा हाच एक उपाय आहे, असे त्याचे मत पडले. बादशहा क्षणभर बाहेर आला. बादशहा भेट देत आहे हे दर्शविण्यासाठी वाद्ये वाजू लागली. लोक शांत झाले. या प्रकारानंतर आझमताराने आपली छावणी काही कोस अंतरावर ठेवावी असा बादशहाने त्याला हुकूम केला आणि आजतागायत तो पाळला जात आहे.

मोगल बादशहा हे धर्माने मुसलमान असले तरी काही हिंदु चालीरीती त्यांनी उचललेल्या आहेत, हे वाचकांनी लक्षात ठेवले पाहिजे. तसेच मुसलमानांच्या वागणुकीत काही बाबतीत नैतिक तत्त्वेही आढळून येतात. हिंदूंच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. हिंदूंची वृत्ती सामान्यपणे दुष्टपणाकडे असली तरी त्यांच्यामध्येही उदार, विवेकी अशी माणसे होऊन गेली आहेत. अशांपैकी एक विक्रमादित्य नावाचा राजा हा होता.

**हिंदु लोक :** मी (मनुची) हिंदुस्थानात अनेक प्रांतांतून फिरलो आहे. पुष्कळ ठिकाणे पाहिली, अनेक लोकांच्या भेटी झाल्या. मोगल बादशहाच्या साम्राज्यात असंख्य हिंदु प्रजाजन पसरलेले आहेत. नद्या, पर्वतादी नैसर्गिक गोष्टींमुळे या प्रदेशाचे वेगवेगळे विभाग बनले आहेत. त्यामुळे वेगवेगळ्या भागांत राहणाऱ्या हिंदूंच्या राहणीत विभिन्नता दिसते. त्यांची मंदिरे, त्यांच्या देवता यात विविधता आढळते. त्यांचे आचारविचार, धर्मतत्त्वे यात वेगळेपणा दिसतो.

**मोगल व इंग्रज यांच्यातील बेबनाव :** इ. स. १६८६ साली मी मद्रासला आल्यावर सात दिवसांनी मद्रासच्या गव्हर्नर विल्यम गिफोर्ड याने मला बोलावू पाठविले. त्याने मला सांगितले की, "बंगाल प्रांतातील बादशहाचे अधिकारी माझ्या वखारीवाल्यांना वाईट रीतीने वागवीत आहेत. बादशहाने इंग्रजांना दिलेल्या सवलतींचा ते त्यांना उपयोग करून घेऊ देत नाहीत. दोन वर्षांपासून मी आपल्या तक्रारी बादशहासमोर मांडण्याचा प्रयत्न करीत आहे. त्यात माझा पैसाही बराच खर्च झाला आहे. पण असे असूनही आपले झालेले नुकसान मी बादशहापर्यंत पोहोचवू शकलो नाही. यामुळे इंग्रजांना हुगळीच्या मोगल अधिकाऱ्यांच्या विरुद्ध लढणे भाग पडत आहे." गिफोर्डने मला विनंती केली की, "मोगल अधिकाऱ्यांनी आपल्यावर केलेला अन्याय बादशहाच्या नजरेत आणून देण्याचा उपाय मला सांगा." बादशहाचा एक खोजा नेकोरज हा माझ्या चांगल्याच परिचयाचा होता. त्याला मी पत्र लिहिले. हे पत्र बादशहाच्या हाती पडल्यावर तो म्हणाला, "इंग्रजांचे म्हणणे बरोबर दिसते. माझ्या अधिकाऱ्यांचा हा दोष आहे." बादशहाने दरबारात महाबतखानाला[1] म्हटले, "मद्रासच्या गव्हर्नरास पुढीलप्रमाणे पत्र लिहा : "तुम्ही हुगळीचे शहर लुटून[2] उद्धटपणा दाखविला आहे. त्याबद्दल मी तुम्हाला क्षमा करतो. माझ्या अधिकाऱ्यांची वागणूक ही तुम्ही मनावर घेऊ नये. तुम्ही एखादा योग्य मनुष्य दरबारात पाठवावा." या अवधित बंगालमध्ये लढा चालूच होता. मोगल बादशहाचे गव्हर्नर गिफोर्डला वरीलप्रमाणे उत्तर आले. तोपर्यंत गिफोर्डची बदली झाली होती. त्याच्या जागी ईयेल हा गव्हर्नर होऊन आला होता. मुंबईच्या इंग्रज अधिकाऱ्याकडे रिपोर्ट करावा

1. महंमद इब्राहीम महाबतखान हा पूर्वी गोवळकोंड्याचा सरदार असून तो मोगलांना मिळाला होता.

२. इंग्रजांनी १६८६ च्या १८ सप्टेंबर रोजी हुगळी शहरावर हल्ला केला.

लागल्यामुळे हेयेल्ला आपला वकील मोगल दरबारात पाठविता आला नाही यामुळे बादशहाने मुंबई शहराला वेढा दिला. मुंबई जवळ जवळ मोगलांच्या ताब्यात गेली होती. मुंबईच्या इंग्रज अधिकाऱ्याला आपला वकील दरबारात पाठविणे भाग पडले. इंग्रजांना बराच पैसा खर्च करावा लागला. मोगलांनी मुंबईचा वेढा उठविला. इंग्रजांनीही बंगालमधून आपले आरमार परत बोलाविले. इंग्रजांनी वेळेवर प्रयत्न केले असते तर त्यांची इतकी हानी झाली नसती. केवळ एका बाबतीत दुर्लक्ष केल्यामुळे अनेक अनर्थ उद्भवले.

**मद्रास शहर** : गोवळकोंडा राज्याच्या कोरोमंडळ किनाऱ्यावर मद्रास हे एक उजाड पुळिन होते. या गोष्टीला आता (१६९९) साठ वर्षांच्या पेक्षा अधिक काळ झालेला नाही. तेथे इंग्रजांनी वस्ती झोपड्या बांधण्यास सुरुवात केली[1]. मग हळूहळू दूरदर्शीपणाने व कुशलतेने कारभार चालवून त्यांनी किल्ला बांधला, तटबंदी केली व प्रशस्त उपनगरे वसविली. सर्व देशांच्या व्यापाऱ्यांना जे स्वातंत्र्य देण्यात आले आहे त्यामुळे आणि त्यांच्या गरजेच्या सर्व गोष्टी तेथे मिळत असल्यामुळे सर्व ठिकाणचे व्यापारी तेथे गोळा झाले आहेत. त्यांना मिळकतही भरपूर होत आहे. आता मद्रास हे शहर चांगलेच गजबजलेले आहे. कोरोमंडळ किनाऱ्यावरील सर्वात मोठे व प्रसिद्ध शहर बनले आहे.

**मनुचीचा पोर्तुगीजांसंबंधीचा अनुभव** : जुन्या काळच्या पोर्तुगीजांनी मिळविलेल्या विजयाची माहिती पाहता, ही माणसे धार्मिक, न्यायी, शूर, निर्भय आणि वचनाचे पक्के असावेत असे दिसते. यामुळे परमेश्वराने त्यांचे सहाय्य केले. पण आजच्या पोर्तुगीजांचा मला जो अनुभव आला आहे, त्यावरून ते पाखंडी आणि पोकळ डौलाचे वाटतात. ते अन्यायी, लुटारू, जुलमी, लोभी, मत्सरी, भित्रे, दिलेली वचने मोडणारे आणि निर्लज्ज बनले आहेत. पण त्यांचा गर्व पहावा तर विलक्षणच. यामुळे ते आज दारिद्र्यावस्थेला पोहोचलेले आहेत. डच आणि अरब यांनी त्यांना खुबाडले आहे. मोगलही त्यांचा छळ करतात. पोर्तुगालमधील पोर्तुगीजांसंबंधी मी बोलत नाही. पण ती माणसे इकडे आल्याबरोबर बदलून जातात. पोर्तुगीजांचे मी इतके भले केले, पण त्याबद्दल आभार मानण्याचे सोडून त्यांनी मला गुन्हेगार व अपराधीच ठरविले.

इ. स. १६८२ मध्ये याचा मला अनुभव आला. त्यावेळी राजपुत्र शाहा आलम याने गोव्यानजिक तळ दिला होता. पोर्तुगीजांना त्याच्याशी वाटाघाटी करावयाच्या होत्या. त्यासाठी त्याने जी माणसे शाहा आलमकडे पाठविली त्यामध्ये मी होतो. मी आणि गोव्याचा वकील जो अँटोन पोर्तुगाल, हे गोव्याच्या इलाख्याला लागूनच असलेल्या शाहा आलमच्या तळाकडे निघालो. आम्हा मंडळीत वीस प्रतिष्ठित

१. इंग्रजांना मद्रासची जागा ज्या सनदेने मिळाली त्याची तारीख १ मार्च १६३९ आहे.

माणसे होती. त्यात अॅन्टोनिओ बॅरोडें हा जेसुईट, डॉन जोसेफ टेडेस्की, गोन्सॅल्व्ह लोपेज पाद्री हे होते. शाहा आलमची इच्छा मी त्याच्या नोकरीत परत यावे अशी होती. माझे मन वळविण्यासाठी त्याने आपला अधिकारी आणि माझा मित्र मिर्झा महम्मद रीझा याच्याबरोबर माझ्याकडे दोन हजार रुपये पाठविले. मी ते रुपये घेतले नाहीत. पण ते परत न नेता मोगल रीझा निघून गेला. मी ते रुपये कप्प्या कुलुपात ठेऊन दिले. पोर्तुगीजांचा वकील आणि इतर मंडळी यांनी खोटीच अफवा पसरविली की, राजपुत्रानी ते रुपये वकीलाला म्हणून दिले असताना मनुचीने ते दाबले आहेत.

ही बातमी कळल्यावर शाहा आलमला राग आला. त्याने पोर्तुगीज वकील आणि त्याची माणसे यांना बोलावू पाठविले. माझ्या समोरच तो वकिलाला म्हणाला, "मनुचीने पैसे चोरले असे म्हणण्यात येते, असे कोण म्हणतात हे मला कळू द्या. मी त्यांच्या तोंडात माती भरून टाकीन." वाटाघाटी संपल्यानंतर राजपुत्राने पोर्तुगीज वकिलांना दोन हजार रुपये वेगळे दिले आणि तेही जाहीर रीतीने. हेतू हा की, मला वेगळे दिलेल्या दोन हजार रुपयांबद्दल काही संशय राहू नये. आपण मनुचीवर विनाकारण संशय घेतला याबद्दल खेद व्यक्त करण्याचे बाजूसच राहिले. त्याने माझा जीव घेण्याचा प्रयत्न केला. मी गोव्यात न राहता शाहा आलमच्या नोकरीत शिरलो म्हणून त्याच्या प्रयत्नाना यश आले नाही.

**राव दलपत बुंदेला याचा आजार :** इ. स. १६९२ मध्ये मी मद्रास येथे असताना दक्षिणेतील (कर्नाटकातील) मोगल सैन्यातील एक पाच हजारी हिंदु सरदार[1] माझ्याकडे इलाज करून घेण्यासाठी आला. मोगल सरसेनापती नबाब झुल्फिकारखान, घोडदळाचा प्रमुख मिर्झा मेंदी, आणि इतर मित्र यांनी राव दलपतकडे माझी डॉक्टर म्हणून शिफारस केली होती. राव दलपतने मला इलाजासाठी म्हणून चार हजार रुपये देण्याचे आश्वासन दिले. पण या प्रकरणात सॅन थोम या गावचे पोर्तुगीज मध्ये आले. या लोकात सॅन थोमचा मुख्य पाद्री आणि गावचा मुख्य अधिकारी हा होता. खरे पाहिले तर मी औषधोपचार करून त्याला बरा केला होता. पण या लोकांनी राव दलपतला दुसऱ्या एका डॉक्टरकडे नेले. कमी मोबदल्यात मी तुम्हाला बरे करीन असे त्या डॉक्टरने राव दलपतला सांगितले. वरील पोर्तुगीजांमुळे राव दलपतचा त्या डॉक्टरवर विश्वास बसला. त्याने मला निरोप पाठविला की "तुम्ही कष्ट (उपचार करण्याची) घेण्याची जरूरी नाही. मला लागेल तर तुम्हाला कळवीन." या गोष्टीला काही दिवस झाले. राव दलपतनी मला निरोप

१. हा सरदार म्हणजे दतियाचा राजा राव दलपत बुन्देला हा होय. त्याचा चिटणीस भीमसेन सक्सेना याने आपल्या "तारीखे दिलकुशा" या आत्मचरित्रात राव दलपतने मद्रासच्या डॉक्टराकडून आपल्या डोळ्यावर उपचार करून घेतला असे लिहिले आहे.

पाठविला की, "मला वाटले तितकीशी माझी प्रकृती सुधारलेली नाही." पण मी त्याचा उपचार करण्याचे नाकारले. माझ्या मित्रांनी राव दलपतला माझ्याकडे पाठविले होते. त्यांना मी कळविले की, "राव दलपतने माझा सल्ला मानला नाही." राव दलपत आपल्या नशिबाला दोष लावीत तसाच परत गेला.

**मराठे औरंगजेबावर डाव उलटवतात :** आपण अतिशय बुद्धिमान आणि कारस्थानी आहोत असे औरंगजेबाला वाटते. पण मराठेही त्याचा डाव त्याच्यावर उलटवतात. त्याची मी बरीच उदाहरणे मागे दिली आहेत. अशीच आणखी एक उदाहरण इ. स. १६९८ मध्ये घडले. गोवळकोंड्याचा बादशहा अबुल हसन हा दौलताबादेच्या किल्ल्यात नजर कैदेत होता. मराठ्यांनी जाहीर केले की, हा बादशहा कैदेतून निसटला आणि आम्ही त्याला घेऊन गेलो. तो आता आमच्या मुलखात आहे आणि अबुल हसनला त्याच्या गोवळकोंड्याच्या गादीवर परत बसविण्यासाठी आम्ही सैन्याची तयारी करीत आहोत. गोवळकोंडा राज्याचे अनेक माजी अधिकारी मोगलांच्या नोकरीत होते. त्यांना मराठ्यांनी वरील अर्थाची पत्रे लिहून अबुल हसन बादशहाला येऊन मिळा आणि मोगलांविरुद्ध लढा, असे कळविले.

अबुल हसन दौलताबादेहून निसटला ही अफवा मराठ्यांनी उठविल्यामुळे मोगल सैन्यातील गोवळकोंड्याचे माजी अधिकारी आणि सेनापती आपल्या सैन्यासकट मराठ्यांना जाऊन मिळाले. अशा अधिकाऱ्यांमध्ये पुरदिलखान नावाचा एक सरदार होता. तो एका प्रांताचा मुख्य अधिकारी असून त्याच्या ताब्यात सात किल्ले होते. मराठ्यांनी पसरविलेल्या बातमीवर त्याचा विश्वास बसला. त्याने आपल्या ताब्यातील सर्व किल्ले मराठ्यांना देऊन टाकले. इतकेच नव्हे तर तो स्वतः जाऊन मिळाला. पण अपेक्षेप्रमाणे त्याला अबुल हसन आढळला नाही. पुरदिलखानची फसगत झाली. पण मराठ्यांची नोकरी पत्करण्याशिवाय त्याला इलाजच नव्हता. तो मोगलांचा इलाखा लुटीत फिरू लागला.

ही वार्ता औरंगजेबाच्या कानावर गेल्यावर तो फार काळजीत पडला. कारण तोपर्यंत ती सर्वदूर पसरली होती. मग या बातमीत काही तथ्यांश नाही हे सिद्ध करण्याकरिता औरंगेबाला अबुल हसनला दौलताबादच्या किल्ल्यातून काढून ग्वाल्हेरला पाठविणे भाग पडले.[1]

**साताराचा वेढा :** एकोणीस वर्षांच्या युद्ध काळानंतरही आपल्या मुलुखात मराठ्यांचे हल्ले थांबलेले नाहीत, असे पाहून औरंगजेबाने सोळाशे नव्याण्णवच्या नोव्हेंबर महिन्यात स्वतः स्वारीवर निघण्याचे ठरविले. साताऱ्याच्या किल्ल्याला त्याने वेढा दिला. तो त्या वाटेवर होता तेव्हा मराठ्यांचे सैन्य गावे लुटून मोगल मुलुखात

१. अबुल हसनला दौलताबादेहून ग्वाल्हेरला पाठविल्याचा काही पुरावा नाही. अबुल हसनचा मृत्यू दौलताबाद येथे इ. स. १७०२–०३ (१११४–१५ हि.) मध्ये झाला.

धुमाकूळ घालत होते. वाटेत बादशहाच्या फौजेकरिता नेला जाणारा पैसा अडका, रसद वगैरे अडवून ते ती लुटत होते. सेनाधिकाऱ्यांच्या आळशीपणामुळे आणि भित्रेपणामुळे अथवा शहाणपणामुळे म्हणा, बादशहाच्या फौजांनी त्यांना कोणताही विरोध केला नाही. याचा परिणाम असा झाला की, युद्ध, अन्न तुटवडा, दूषित पाणी व अन्य अडचणी यामुळे बादशहाचे सैन्य हैराण झाले.

परंतु दैवाची अजूनही औरंगजेबाला अनुकूलता होती. कारण मराठ्यांचा राजा रामराजा (राजाराम) याच सुमारास आजारी पडला व थोड्याच दिवसांनी, मार्च सतराशेला मरण पावला. काही किल्लेदारांनी, आपला राजा नाही या गोष्टीमुळे, आणि औरंगजेबाने दिलेल्या देणग्या यांना भुलून आपल्या ताब्यातील काही सुरक्षित किल्ले आणि पाच-सहा लहान ठिकाणे औरंगजेबाच्या स्वाधीन केली. त्यापैकी एक साताऱ्याचा किल्ला हा होता. परंतु मराठ्यांच्या फौजा, छापे घालण्याचे सोडत नव्हत्या. राजारामाचा प्रधान रामचंद्रपंत आमात्य हा बुद्धिमान आणि धोरणी होता. त्याने योग्य तो बंदोबस्त केला. राजारामाच्या मृत्यूनंतर त्याने त्याच्या मुलाला गादीवर बसविले. या मुलाचे नाव शिवाजी होते. मी हे लिहित आहे यावेळी मराठ्यांचे मोगलांविरुद्ध युद्ध चालूच आहे. या घटकेस, म्हणजे इ. स. १७०० च्या डिसेंबर महिन्यात औरंगजेबाचा तळ ब्रह्मपुरी येथे आहे.[1] या काळात औरंगजेबाने मराठ्यांचे काही किल्ले घेतले. याच काळात विजापूरचा माजी बादशहा सुलतान सिकंदर हा मोगल छावणीत कैदेत होता. तो ३० वर्षांचा होता. छावणीतून पळून जाऊन तो बंडाळी करील अशी औरंगजेबाला भीति वाटली. विषप्रयोगाने सिकंदर शाहाचा मृत्यू घडवून आणण्यात आला.[2]

---

१. औरंगजेबाने ब्रम्हपुरी येथे मुख्य तळ ठेवला. पण तो स्वतः सैन्यासहित १६९९ च्या अखेरीस सातारा घेण्यासाठी बाहेर पडला. १७०० सालच्या डिसेंबरमध्ये तो पन्हाळगडच्या वाटेवर आहे. ब्रम्हपुरीच्या तळावर बायका, मुले आणि इतर लवाजमा राहत असे.

२. सिकंदर आदिलशहाचा मृत्यू औरंगजेबाच्या छावणीत १११२ हिज (जून १७०० ते जून १७०१ या काळात) झाला.

भाग ४ था

# दक्षिणेकडील मोहीम चालू

## औरंगजेबाची राजवट चालू

मागील भागात (भाग ३ रा) मी असे वचन दिले होते की, ईश्वरकृपेने जर माझी प्रकृती बरी राहिली, तर हे इतिहासकथन मी चालू ठेवीन. परंतु मी आता वृद्ध झालो आहे. विश्रांती घ्यावीशी वाटते. पण विश्रांती घेण्याची कितीही इच्छा असली तरी दिलेले वचन पुरे करण्याची मला चिंता लागली आहे. आणि म्हणून औरंगजेब बादशहाच्या दरबारात काय घडत आहे ते सांगण्यासाठी मी लेखणी हाती घेत आहे. माझ्या आतापर्यंतच्या कथनात राहिलेल्या गोष्टी मी या चौथ्या भागात सांगणार आहे.

हिंदुस्तानात काही तरी मोठी क्रांती घडणार अशी चिन्हे दिसत आहेत. औरंगजेब आता ८६ वर्षांचा झाला आहे. आपल्याला गादी मिळावी अशी त्याच्या मुलानातवांपैकी प्रत्येकाची महत्त्वाकांक्षा आहे. यामुळे शहाजहानच्या राजवटीच्या शेवटी घडून आले तसे अनर्थ घडण्याचा संभव आहे.

असे असूनही या राज्यातील अनुभवी आणि मुरब्बी राजकारणी लोकांना असे वाटते की, औरंगजेब आहे तोपर्यंत सर्व काही शांत राहील. त्यांचे म्हणणे असे की, औरंगजेब हा जरी वृद्ध झाला असला तरी आपली सत्ता गाजविण्यात त्याची पूर्वीचीच तडफ कायम आहे.

पन्हाळ्यासमोर मोगल : माझ्या ग्रंथाचे चौथ्या भागाला सुरुवात इ.स. १७०० च्या नंतरच्या घटनांनी करतो. मराठ्यांच्या हालचाली प्रथम आपले लक्ष वेधून घेतात. या वर्षाच्या (१७०१ ?) सुरवातीला मोगल सेनापती झुल्फिकारखान याने पन्हाळगडला वेढा घातला. त्याच्यापाशी पन्नास हजार पायदळ आणि तीस हजार घोडदळ असे सैन्य होते. फेब्रुवारी महिन्यात मराठ्यांनी किल्ल्यासमोरील मोगलांच्या सैन्यावर हल्ला केला. ते मोगल मोर्च्यापर्यंत चालून आले. मारामारी मोठी निकराची झाली. झुल्फिकारखानाला आपले मोर्चे मागे हटवावे लागले. मराठे मोगल सैन्यावर सतत छापे घालीत असतात. आज एके ठिकाणी छापा घालतील तर उद्या दुसरीकडून मोगलांना येणारी रसद ते तोडीत असतात. वरील कारणामुळे बादशहाच्या छावणीत धान्याचा नेहमीच भयंकर तुटवडा असतो.

**शाह आलमच्या पत्नीचा मृत्यू :** या महिन्यात (फेब्रुवारी १७०१ ?) राजपुत्र शाहाआलम याची बायको नुरुन्निसा बेगम हिचा काबुल प्रांतात मृत्यु झाला. ती अतिशय गुणी अशी स्त्री होती. तिच्या मृत्युने शाहा आलम आणि औरंगजेब यांना अतिशय दुःख झाले.[1]

पन्हाळगडच्या समोर झुल्फिकारखानाचा मोड झाला हे ऐकून औरंगजेब आपल्या सैन्यासहित पन्हाळगडला निघाला. याच वर्षाच्या मार्च महिन्यात (१७०१ ?) बादशहाला एक अपघात घडला. पन्हाळगडचा वेढा चालू असताना बादशहा शौच आटोपून येत असताना पडला. त्यामुळे त्याचा उजवा गुडघा दुखावला. या अपघातामुळे बादशहा पंगू झाला आहे. त्याला चालण्यास कष्ट पडतात. आपले हे व्यंग लपविण्यासाठी तो सिंहासनावर बसल्यावरच पडदा सरकवण्यात येतो.[2] औरंगजेबाच्या मनाचा निर्धार मोठाच म्हटला पाहिजे. या वर्षीच्या जून महिन्यात पन्हाळगडचा किल्ला त्यांतील रसद संपुष्टात आल्यामुळे औरंगजेबाच्या ताब्यात आला.

या बादशहाचा ढोंगीपणा आणि फसवाफसवी यांच्या सर्व गोष्टी द्यायचे म्हटले तर मला त्या सर्व लिहिणे शक्य झाले नसते. परंतु काही मनोरंजक तसेच मानवी दुबळेपणा व सद्गुण दाखविणाऱ्या कथांचे कथन करण्याचे ठरविल्यावरून हिंदुस्तानच्या या बादशहाच्या जीवनात तशा कथांचा भरपूर साठा मला मिळाल्यामुळे मी येथे त्यांतील काही थोड्या सांगणार आहे.

**आपण सत्पुरुष आहोत, असे दाखविण्याचे औरंगजेबाचे वेड :** आपण सत्पुरुष आहोत, असे दाखविण्याचे बादशहाला एक वेडच आहे. एके दिवशी रात्री तो प्रार्थना करण्याकरिता उठला. हातपाय धुतल्याखेरीज प्रार्थना करणे हे पाप आहे, असे मुसलमान लोक मानतात. म्हणून हातपाय धुण्याकरिता पाणी आणण्यासाठी बादशहाने एका सेवकाला जागे केले. झोपेतून पुरता जागा न झालेला तो सेवक घाईने जात असता, अडखळून बादशहाच्या अंगावर कोलमडला. बादशहा आणि नोकर दोघेही खाली कोसळले. भीतीने गांगरून गेलेला तो नोकर बादशहाच्या बाजूस पडला. बादशहाने ते पाहिले. तो नोकराजवळ जाऊन त्यास सौम्यपणे म्हणाला "अरे मी तर तुझ्याच सारखा माणूस. मग मला का भितोस. भीती बाळगावी परमेश्वराची. त्याचा अपराध करू नये. उठ, भिऊ नकोस" ही विलक्षण गोष्ट लोकांना समजली तेव्हा त्या सर्वांना बादशहाच्या साधेपणाची खात्री पटली.

---

१. नुरुन्निसा बेगम ही संजरखान नज्मसानीची मुलगी होती. तिचा आपल्या पतीवर फार प्रभाव होता. तिचा मुलगा रफी-उल्-कद्र शाहा आलमचा तिसरा मुलगा होय. (मासीरे आलमगिरी, १०६ १०७ खाफी खान ii पा. ३३०)

२. औरंगजेबाला हा अपघात पन्हाळगडाच्या वेढ्यात झाला नाही. माण नदीच्या काठी मोगलांचा तळ पडला असताना इ. स. १७०० च्या अखेरीस नदीला एकाएकी पूर आला आणि मोगलांचे बरेच लष्कर वाहून गेले. त्यावेळी हा अपघात झाला.

आणखी अशीच एक गोष्ट घडली. एकदा बादशहा मशिदीला गेला होता. तेथे त्या गालीच्यावरून तो प्रार्थनेच्या ठिकाणी चालला होता, त्याला एक भोक पडले होते. ते एका अधिकाऱ्याने पाहिले. ते झाकण्याकरिता त्याने त्यावर एक कापड पसरून दिले. हे त्याचे कृत्य बादशहाने पाहिले. त्या अधिकाऱ्याची कानउघडणी करून बादशहा त्याला म्हणाला "सफाई व नसती गडबड दरबारच्या दिवाणखान्यात ठीक आहे. पण येथे ईश्वराच्या घरी–मशिदीत–याची काही आवश्यकता नाही. येथे मी माझ्या प्रजाजनांच्या पेक्षा यत्किंचितही श्रेष्ठ नाही." हे बहुमोल उद्गार एका संताचेच होत असे सर्व लोक मानू लागले. आपल्याला लोकांनी संत म्हणावे हा एकच हव्यास औरंगजेबाला आहे. तो त्याच्या बोलण्यात व कृतीत सारखा व्यक्त होत असतो. या विषयींचे आणखी एक उदाहरण असे आहे—

काही दिवसांपूर्वी मक्केहून दोन अरब मोगल राज्यात आले. बादशहाच्या पदरी काही नोकरी मिळावी म्हणून त्यांनी पुष्कळ प्रयत्न केले, फार हाल अपेष्टा सोसल्या पण त्यांना काही यश आले नाही. मग त्यांनी एक मसलत केली. तिचा परिणाम फार चांगला झाला. त्यांनी बादशहाच्या स्वभावाचा अभ्यास केला. आणि मग एके दिवशी बादशहा मशिदीत जाणार आहे असे कळल्यावरून ते तेथे हजर झाले. बादशहा आल्यावर बाजूला उभे राहून एकमेकास सांकेतिक खुणा करू लागले. त्यावेळी त्यांनी बादशहाकडे कुतूहलाने पाहिले व चमकून गेल्यासारखे दाखवून आश्चर्य व्यक्त केले. बादशहाचे एक एक पाऊल असे त्यांच्या दिशेने पडत होते, तसे त्यांना वाटणारे नवल वाढतच जात आहे असे त्यांनी दाखविले. बादशहा त्यांच्या चेहऱ्यावरील भाव पाहत होता. त्याने त्यांना त्यांच्या आश्चर्याचे कारण विचारले. तेव्हा ते म्हणाले "बादशहा सलामत, त्याला कारणही तसेच मोठे आहे. काही महिन्यांपूर्वी आपणाला पैगंबराच्या दर्ग्यातून फकिराच्या वेशात बाहेर पडताना आम्ही पाहिले होते आणि आज येथे ह्या सर्व राजवैभवात आपणास आम्ही पहात आहोत." हे भाषण ऐकून बादशहा गंभीरपणे म्हणाला "पैगंबराच्या त्या दर्ग्यात परमेश्वराच्या निष्ठावंत सेवकांनाच मुक्तपणे प्रवेश मिळतो आणि थोरांना तेथे इतर कोणत्याही वेशात जाता येत नाही."

प्रार्थना संपल्यावर त्याने त्या अरबांना आपल्याकडे बोलावून घेतले. त्यांना चांगल्या नोकऱ्या दिल्या. या घटनेने मोगल साम्राज्यातील अनेक लोकांना बादशहा हा खरोखरच मोठा संत आहे, असे वाटू लागले. तसेच तो मनात येईल तेव्हा अदृश्य होतो, मक्केला जातो व त्याचे पैगंबराशी संभाषण होते यावर त्यांची श्रद्धा बसली. आपण संत आहोत अशी औरंगजेबाची कल्पना. पण वागणुकीत मात्र तो विनम्रभाव धारण करतो.

उदाहरणार्थ, एखाद्या दूरच्या अधिकाऱ्यास त्याच्या गैरवर्तनाबद्दल काही हुकूम पाठविला आणि त्याकडे दुर्लक्ष होऊन त्याचा अनादर झाला, आज्ञापालन झाले

नाही, असे बादशहास कळले तर तो आपला राग व्यक्त करीत नाही. अत्यंत सौम्य शब्दांत तो एवढेच म्हणतो की, "मी स्वतः पापी आहे. जर खुद्द परमेश्वराच्या आज्ञांकडे दुर्लक्ष होऊन माझ्याकडून त्यांचे उल्लंघन होत आहे, तर मग माझ्या आज्ञांचे उल्लंघन झाल्याबद्दल मला आश्चर्य वाटण्याचे कारण काय?" मात्र असे बोलत असतानाच तो त्या अधिकाऱ्याला पुनः हुकूम पाठवून आज्ञापालन करण्यास भाग पाडण्यास चुकत नाही.

आपण न्यायाचे मोठे चाहते आहोत असे लोकांना दिसावे अशी पण उत्कंठा या बादशहाला लागलेली असते आणि म्हणूनच तो एके दिवशी म्हणाला, "सर्वांना सारखाच न्याय मिळावा याबद्दल राजांनी अविरतपणे व दक्षतेने प्रयत्न करणे हे त्यांचे कर्तव्य आहे. हे कर्तव्य आणि स्वतःस परमेश्वराच्या सेवेला वाहून घेतल्यामुळे परमेश्वराबद्दलचे कर्तव्य, अशा कर्तव्यांच्या दोन प्रमुख भूमिकांवर त्यांचे आचरण आधारलेले असावे. परमेश्वरावर निःसीम श्रद्धा असणे जरूर आहे. राजांनी परमेश्वराचा महिमा वाढविण्यासाठी व धर्माचा प्रसार करण्यासाठी सतत श्रम केले पाहिजेत. माझ्याही प्रेरणा याच आहेत. याच हेतूंनी प्रेरित होऊन मी आतापर्यंत कार्य केले आहे. माझा भाऊ दारा जर गादीवर येता, तर हिंदुस्तानात मुसलमानी धर्माचा छळ झाला असता. जर माझ्या बापाची राजवट चालू राहिली असती तर राज्याचा नाश झालेला पाहावा लागला असता. म्हणून स्वार्थाचा विचार न करता मला हुसकून लावणाऱ्यांना मी विरोध केला. शिवाय मी अनुसरलेल्या या मार्गामुळे माझ्या प्रजेचा कितीतरी हालअपेष्टांपासून मी बचाव केला आहे. त्यामुळे मिळालेल्या सौख्याची फळे लोक मोठ्या शांततेने व आनंदाने उपभोगित आहेत. त्याचमुळे माझ्या राज्यात, मूर्तींची दाटी झालेल्या ओंगळ देवळांच्या ऐवजी भव्य मशिदी दिसत आहेत. मी जर नसतो तर आणखी देवळे बांधली गेली असती." परंतु बादशहा काहीही म्हणो, हिंदुस्तानात दररोज जगातील भयंकर गुन्हे घडत असतात ही गोष्ट कोणीही नाकारू शकणार नाही.

**औरंगजेब बादशहाची न्यायदान पद्धत :** न्यायदानाच्या बाबतीत बादशहाला फार आस्था आहे, हे लोकांचे बनलेले मत टिकविण्यासाठी तो शिकस्तीचा प्रयत्न करीत असतो. तो रोज दोनदा न्यायसभा भरवितो. तेथे भेदभाव न राखता कोणासही प्रवेश मिळतो. लोकांच्या तक्रारी तो शांतपणे ऐकून घेतो. आपण दिलेला निकाल तावडतोब तेथल्या तेथेच अंमलात आणण्यास लावतो. हे सर्व प्रयत्न होत असतानासुद्धा खोट्या साक्षी देणे, खोट्या सह्या करणे, हाच ज्यांचा व्यवसाय अशा लोकांचा त्याच्या राज्यात सुळसुळाट झाला आहे. हे हलके लोक साधा पोषाख घालून सौम्यपणाचा आव आणून भारून टाकण्याचा प्रयत्न करतात. काही लोक फकिराचा वेष घेतात, दाढ्या ठेवतात. हातात स्मरणी घेऊन प्रार्थना पुटपुटत मणी ओढत असतात. अशा तऱ्हेचे लोक या राज्यात सर्वत्र आढळतात.

कारण त्यांचे हे वर्तन बादशहाच्या अपेक्षेप्रमाणेच असते. तरी मुद्दा या दोघी लोकांनी सर्वत्र पैलावलेल्या दुष्ट व खोट्या कल्पनांच्यामुळे देशात सगळीकडे गैर-व्यवस्थाच आढळून येते.

**औरंगजेबाच्या पत्नीचा मृत्यू :** १६८९ मध्ये औरंगजेबाची बायको औरंगाबादी महाल ही विजापुर येथे मरण पावली.

**मोगल सरदारांची वागणूक :** मोगल सरदारांची वागणूक पाहिली की, मोठे आश्चर्य वाटते. लाचलुचपत, फसवाफसवी, वचनभंग यांचा ते सर्रास वापर करतात. बादशहाचीही ते पर्वा करीत नाहीत. शत्रूशी ते पत्रव्यवहार करतात. इतकेच नव्हे तर युद्ध लांबविण्यासाठी शत्रूंना ते पैसेही पुरवितात. त्याची काही उदाहरणे मी पुढे देत आहे :

बादशहाचा एक अधिकारी फाझलखान हा राजपुत्र अकबरकडे इराणमध्ये ५ लाख मोहरा पाठविण्याचा प्रयत्न करीत होता. त्याचा हा प्रयत्न सुरतेच्या सुभेदाराने उघडकीस आणला. हे पाहून फाझलखानाने विष घेऊन आत्महत्या केली.

झुल्फिकारखानाने अप्पा नाईक या सरदाराला जिंजीजवळ विश्वासघाताने ठार मारले.

मोगलांचा सरदार अलीमर्दानखान याचे आणि झुल्फिकारखानाचे पटत नव्हते. झुल्फिकारखानाने संताजी घोरपडेला विनंती केली की, अलीमर्दानखानावर हल्ला करून तुम्ही त्याचा निकाल लावा. संताजी घोरपडे याने अलीमर्दानखान याला पकडले. त्याची एक हजार माणसे ठार मारली आणि त्याच्याकडून ३ लाख ३० हजार रुपये खंडणी घेऊन त्याला सोडून दिले.

वरील उदाहरणावरून मला कवि कलशाची आठवण झाली. मी पोर्तुगीजांच्यातर्फे वाटाघाटी करण्यासाठी संभाजीकडे गेलो. त्यावेळी कवि कलश हा संभाजीचा मुख्य प्रधान होता. मी कवि कलशला म्हटले "तुमच्या मर्जीनुरूप गोष्टी घडून याव्या असेच पोर्तुगीज व्हाइसरॉयने मला सांगितले आहे." यावर कवि कलशने मला पुढील समर्पक उत्तर दिले "राजे आणि थोर माणसे अनेक गोष्टींची इच्छा करतात. पण आम्ही त्यांना त्यांच्या मसलती नेहमी यशस्वी होऊ देतो असे नाही."

**औरंगजेब जिजिया कर लावतो :** इ. स. १६७८–७९ मध्ये औरंगजेबाने हिंदूंच्यावर नवीन कर लादण्याचे ठरविले.[1] दरबारातील सगळी प्रतिष्ठित आणि अधिकारी माणसे यांनी या कराला विरोध केला. त्यांनी हा कर लादू नये म्हणून बादशहाला नम्रपणे विनंती केली. ते म्हणाले "हा कर म्हणजे लोकांच्यावर फार मोठा बोजा

१. हाच तो जिजिया कर होय. हा १०९० हि. १ रबिलावल (१२ एप्रिल १६७९) रोजी लादला गेला (मासीरे आलमगिरी).

होय. एकतर हा कर म्हणजे अगदी नवीन बाब आहे. दरवर्षी या कराची कडक वसुली होणे प्रजेला परवडणार नाही. प्रजेपाशी हा कर देण्याची कुवत नाही. या पूर्वीचे पठाण आणि मोगल राजे होते. अशा प्रकारे कर लादून त्यांनी प्रजेवर कधी जुलूम केला नाही." परंतु या विनंतींचा बादशहावर काही परिणाम झाला नाही. बादशहा आपल्या निश्चयात अढळ राहिला त्याचे प्रमुख कारण हे होते की, हा कर लादून हिंदूंच्या मध्ये इस्लाम धर्म पसरवावा असा त्याचा हेतू होता. या बाबतीत त्याचे मत पुढीलप्रमाणे होते. "हिंदूंचे धर्मांतर घडवून आणण्यास हा कर म्हणजे एक उत्कृष्ट साधन होय. याशिवाय आपला रिकामा होत असलेला खजिना भरून काढणेही शक्य होईल. खजिना रिकामा होण्याची कारणे दोन. एकतर वसुली बरोबर होत नव्हती किंवा आपल्याला अनेक कर माफ करावे लागले होते.' यामुळे औरंगजेब आपल्या सरदारांना म्हणाला "मी माझा आजा जहांगीर याच्याप्रमाणे आहे असे समजू नका. जहांगीरचा सगळा काळ कवि विरचल आणि त्याचे संगीत ऐकणे किंवा खेळ तमाशे पाहत बसणे यात जात असे. नाही, नाही. माझ्या बाबतीत असे कधीच होणार नाही. माझ्या राज्याची वृद्धी आणि कल्याण आणि महंमद पैगंबराच्या धर्माचा प्रसार या गोष्टींचाच मी सतत विचार करीत असतो." औरंगजेबाचे हे विचार मनःपूर्वक असते तर एका मोठ्या बादशहाला ते शोभणारेच होते, असे म्हणता येईल. पण माझ्या दीर्घ अनुभवाने मला पुढील गोष्टी आढळून आल्या आहेत. औरंगजेब काय किंवा इतर सगळे मुसलमान काय यांच्या कृतीची प्रेरणा म्हणजे स्वतःची सोय, आणि स्वतःचे भले करून घेणे हीच होय. अनेक मोगल सरदार आणि राजपुत्र दानधर्म करतात. पण हे परमेश्वराची भक्ती म्हणून नव्हे तर परमेश्वर आपल्या कार-भारात यश देईल या आशेमुळे होय. कित्येक जण याच विचाराने आणि श्रद्धेमुळे रात्री आपल्या उशाखाली पैसे ठेवतात. हा पैसा दुसऱ्या दिवशी दानधर्मात ते खर्च करतात. राजपुत्र शाहा आलम हा या कारणासाठी रोज रात्री दहा रुपये बाजूला काढून ठेवित असे.

**औरंगजेबाची बहीण बेगम साहेब हा कर लादू नये अशी त्याला विनंती करते :** औरंगजेबाची मोठी बहीण बेगम साहेब ही एक मोठी उदार राजकन्या होती. तिने या जिजिया करासंबंधी औरंगजेबाला विनंती करण्याचे ठरविले. ती औरंगजेबाकडे गेली आणि हा जिजिया कर लादू नका अशी तिने त्याला अतिशय नम्रपणे विनंती केली. या बाबतीत तिने त्याला म्हटले "बादशहा सलामत ! हिंदुस्तान देश हा एक विशाल समुद्रासारखा आहे. तुम्ही आणि राजकुटुंबातील सर्व माणसे म्हणजे या समुद्रातून मार्ग काढीत असलेल्या नौकाच होत. ज्या समुद्रावरून आपण प्रवास करतो त्याच्यावर भार घालण्याचा विचार कोणता बादशहा करील काय ! वैद्य बुवाने रोग्याला फी दिली असे कधी घडले आहे काय ! रोग्याने आपला इलाज करणाऱ्या वैद्याला मोबदला दिला पाहिजे. समुद्रावरचा प्रवास चांगला व्हावा यासाठी समुद्र

शांत आणि अनुकूल असावा आणि सुरक्षितपणे बंदराला पोहचता यावे अशाच प्रयत्न नौका आणि नौका चालविणारे करतात ना ? त्याचप्रमाणे प्रजेचा सागर शांत आणि सौम्य रहावा म्हणून आपण प्रयत्न करायला हवेत. प्रजेला अपरिचित असलेला हा कर लादून आपण या प्रजारूपी समुद्राच्या लाटांना क्षुब्ध करीत आहात. प्रजेवर आपण या कराचा असह्य बोजा लादीत आहात. प्रजा हा कर देईल अशी अपेक्षा आपण कशी बरे करू शकता ? बादशहा सलामत, या कराचा विचार आपण टाकून द्या. नाहीतर राज्यात बंड होईल. आपण विचार करा. सोसाट्याचे वारे वाहू लागले की समुद्राच्या पृष्ठभागावर खळबळ होते. उंच उंच लाटा निर्माण होतात. आणि या सर्वांचे रूपांतर एका भयानक आणि भीतिदायक वादळात होते. या तुफान वादळामुळे समुद्रावरील सर्व व्यवहार, नाना इत्यादी किनाऱ्यावर आदळतात. उध्वस्त होतात. त्यांचा चक्काचूर होतो. आणि गरीब आणि पीडित लोकांचा नाश होतो." हे बोलून जहानारा बेगम हिने औरंगजेबाच्या पायापाशी लोळण घेण्याचा प्रयत्न केला. आपणही प्रजेपैकी एक असून आपल्यासमोर बादशहा आहे हे दाखविण्याचा तिचा हेतू होता. प्रत्यक्ष आपली बहीणच असे करीत आहे हे पाहून औरंगजेबाला या गोष्टीचे महत्त्व पटावयाला हवे होते. परंतु औरंगजेबावर याचा काहीच परिणाम झाला नाही. त्याचा निर्धार कायम राहीला. तो म्हणाला "जहानारा, महंमद पैगंबर या जगात आले तेव्हा या जगात काफरांच्या मूर्तिपुजांना सुळसुळाट झाला होता. पैगंबर मोठे झाले तसे त्यांनी लोकांच्यामध्ये आपल्या पवित्र तत्त्वांचा प्रचार करून मूर्तिपुजेसारख्या भयानक परंपरेतून लोकांना मुक्त करण्यासाठी आपली शक्ती सर्वस्व वेचण्यास सुरुवात केली. आपले हे चांगले उद्दिष्ट गाठण्यासाठी त्यांनी कोणती साधने वापरली बरे ? लोकांवर कर आकारूनच ना ? आणि त्यामुळे पैगंबरांना त्यांच्या सर्व उद्योगांत चांगले यश मिळत गेले; हे तुम्ही पाहू शकता. अशा या थोर माणसाचे शक्य तितक्या गोष्टीत, कर आकारणीत सुद्धा अनुकरण करावे असे मी ठरविले आहे. परमेश्वराने पैगंबरावर कृपा केली तशीच तो माझ्यावर कृपा करून माझे बेत पार पाडण्यास सहाय्य करील अशी मला आशा आहे." असे बोलून औरंगजेबाने आपल्या बहिणीला निरोप दिला आणि तिच्याकडे पाठ फिरविली. जहानारास या गोष्टीचे फार वाईट वाटले.

कर लादल्यानंतर काही दिवसांनी एक मोठा भूकंप झाला. त्यामुळे सरदारांना असे वाटू लागले की, जिझिया कराची फेर तपासणी करण्यासाठी बादशहाला विनंती करावी. बादशहाच्या हुजुरात गेल्यावर ते त्याला म्हणाले "बादशहा सलामत ! आपल्या प्रजेवर जुलूम होत आहे. निसर्गालाही हे आवडले नाही. त्यामुळे त्याने भूकंपाच्या रूपाने आपली चीड व्यक्त केली आहे."

यावर बादशहा हसला आणि म्हणाला "तुमची बुद्धी इतकी कोती कशी ? या घटनेचा विपरीत अर्थ का घेता ? भूकंप झाला हे खरे. पण जे मी केले आहे त्यामुळे

पृथ्वी आनंदात हेलकावे घेत आहे. पृथ्वीच काय, सर्व सृष्टीत आनंदाची चिन्हे दिसत आहेत. आकाशात मेघ भरून आले असून ते पावसाच्या रूपाने आनंदाचे अश्रु ढाळीत आहेत. त्या पावसाबद्दल पृथ्वी कृतज्ञ आहे आणि माझ्या या कृत्याबद्दल अधिक आनंद दाखविण्यासाठी ती आम्हाला विपुल धान्य आणि फळे देऊ लागली आहे. जनावरांनाही, मी करीत असलेल्या उद्योगाची जाणीव आहे. कारण सुपीक पृथ्वीच्या उत्पादनातून त्यांची शरीरे पुष्ट होत आहेत. अंतराळातील पक्षी उड्डाण करून आपल्या विहाराने आणि मंजुळ स्वरांनी आमच्या उद्योगाबद्दल आनंद व्यक्त करीत आहेत. घोड्यांना खाणे पिणे भरपूर मिळाल्यामुळे तेही आनंदाने खिंकाळत आहेत. माझ्या सरदारांनो ! नैसर्गिक घटनांच्याकडे अशा दृष्टीने पाहिले पाहिजे. माणसांची विचारशक्ती विकारामुळे अगर गरजेमुळे नेहमी स्वार्थाकडे झुकत असते. आम्ही बुद्धी वापरून कोणती गोष्ट कशी आहे, आणि कोणत्या गोष्टीचा काय परिणाम होईल याचा सारासार विचार करण्याचा विवेक बाळगावा." आपल्या सरदारांना बादशहाने वरीलप्रमाणे उत्तर दिले. यानंतर त्याने वरील कर वसूल करण्याचा हुकूम दिला.

या जिजिया कराच्या वसुलीसंबंधी एक गोष्ट सांगितल्याखेरीज राहवत नाही. हा कर वसूल करणारे अधिकारी पंचविस हजार रुपये खजिन्यात भरतात; तर असे निश्चित समजावे की त्यांनी प्रजेकडून कमीत कमी एक लाख रुपये वसूल केले असले पाहिजेत. आपल्या वसुलीचा ३/४ भाग स्वतःकडे ठेवून फक्त १/४ रक्कम ते खजिन्यात भरतात. ही नेहमीचीच पद्धत आहे.

**१७०१ साल पुढील औरंगजेबाच्या हालचाली :** आपल्या राज्यातील मराठ्यांची सततची आक्रमणे थांबविता येत नाहीत हे पाहून मराठ्यांचे किल्ले घेण्याच्या उद्देशाने औरंगजेबाने त्यांच्या मुलुखात चालून जाण्याचे ठरविले. त्यात पहिले लक्ष्य म्हणून जो किल्ला होता, तो गोव्याच्या दिशेला डोंगराळ भागात होता. त्याचे नाव होते खेळणा.[1] खेळण्याच्या रोखाने जाणारा मार्ग अतिशय दुर्गम होता. शिवाय मोहिमेला सुरुवात केल्यावर लवकरच बादशहाला रसदेची टंचाई भासू लागली. तो अडचणीत सापडला. त्याच्या एका सेनाधिकाऱ्याकडून रसदेची मदत येईपर्यंत त्याला थांबावे लागले. बादशहाला अशी मदत येत आहे, हे मराठ्यांना समजले होते. म्हणून त्यावर हल्ला करण्याची संधी त्यांनी दवडली नाही. मोगल सैन्याशी त्यांची जी

१. खेळणा (विशाळगड) या मोहिमेसाठी बंदरवसाला बोलावण्यात आले. औरंगजेब पावगाव मधून १६ जमादीलावल १११३ हि. (नो. १३, १७०१) ला निघाला होता. अवेळी पावसामुळे मजल मारणे कठीण झाले. डिसेंबर २७, १७०१ ला बादशहाची छावणी खेळण्यापासून ६-७ मैलांवर पडली. परंतु तेथील जागेच्या अडचणीमुळे छावणीचे २-३ विभाग करावे लागले. मराठ्यांनी २२ मोहरम १११४ हि. (१७ जून १७०२) खेळण्याचा ताबा सोडला. औरंगजेबाने खेळणा (विशाळगड) किल्ल्याचे नाव 'सख्खरलना' असे ठेवले. (मासीरे-आलमगिरी ४४५-४५७, खाफीखान ii ४९१-५०२.)

झटापट झाली त्यात मोगलांचा पूर्ण पाडाव झाला. मोगल सेनापती मारला गेला. बादशहाकरिता त्याने आणलेली सर्व रसद मराठे किल्ल्यात घेऊन गेले. हा प्रसंग जरी ओढवला नसता तरी तो किल्ला बादशहाला वाटत होते त्याप्रमाणे काबीज करणे शक्य झाले असते की नाही याबद्दल शंकाच होती. किल्ला ज्या स्थळी बांधला होता ते स्थळ पाहता किल्ला लढवणाऱ्यांना परिस्थिती अतिशय अनुकूल होती. याशिवाय तेथील हवा-पाणी हे बाहेरच्या लोकांना अतिशय बाधणारे होते. यामुळे आणि अन्नाच्या तुटवड्यामुळे बादशहाच्या सैन्यात अंग सुजण्याची साथ पसरली.

मजल मारणे सैन्याला कमी श्रमाचे व्हावे म्हणून बादशहाने त्याचे दोन भाग करून काही तुकड्या एका मार्गाने व काही दुसऱ्या मार्गाने पाठविल्या. परंतु ही त्याची योजना यशस्वी झाली नाही. कारण मराठे काही स्वस्थ बसले नव्हते. त्यांनी आझमताऱ्याचा मुलगा राजपुत्र बेदारबख्त याला गाठून त्याचा पराभव केला. बेदारबख्तजवळ बारा हजारांचे घोडदळ व त्यावर २२ सेनाधिकारी होते. हे सर्व सेनाधिकारी लढाईत मारले गेले. खुद्द राजपुत्र बेदारबख्त मोठ्या कष्टाने निसटला. घोड्यावरून पळून जाताना त्याच्याबरोबर फक्त पाच सैनिक होते.

**इंग्रज व मोगल यांच्यातील बखेडे :** नव्याने स्थापन झालेल्या इंग्लिश कंपनीसाठी म्हणून इंग्रज सरकारचा वकील नॉरिस हा मच्छलीपट्टणहून सुरतेकडे निघाला, हे मी पूर्वीच सांगितले आहे. १७०१ च्या मार्च महिन्यात तो सुरतेस पोहचला. यावेळी बादशहा मराठ्यांविरुद्धच्या मोहिमेत गुंतला होता. सुरतेस आल्यानंतर नॉरिसने अफवा पसरविली की, गेल्या सतरा वर्षात चाललेल्या चाचेगिरीत चाच्यांजवळ असलेली जहाजे जुन्या ईस्ट इंडिया कंपनीच्या मालकीची होती. पण ही अफवा सिद्ध न करता आल्यामुळे नॉरिसने मोगलांपाशी बरीच मोठी रक्कम भरून या अडचणीतून आपली सुटका करून घेतली.

चाच्यांच्यामुळे आपले फार नुकसान होत आहे अशी सुरतेच्या व्यापाऱ्यांची सततची तक्रार असे. यामुळे बादशहाने सुरतेस असलेले कंपनीचे अधिकारी आणि इंग्रज व्यापारी यांना कैद केले. रक्कम भरूनच आणि बरेचसे विनंती अर्ज करून झाल्यावरच त्यांची सुटका झाली. व्यापाऱ्यांच्या नुकसानीच्या रोजच्या तक्रारींना कंटाळून बादशहाने सुरतेच्या इंग्रज, डच आणि फ्रेंच रहिवाश्यांकडून आपण मोगल जहाजांना चाच्यांपासून रक्षण देऊ अशा अर्थाचे मुचलके घेतले पण याचा उपयोग झाला नाही. चाचेगिरी थांबेना. यामुळे बादशहाने इंग्रजांना पुनः कैदेत टाकले. त्यांना मदत करण्यासाठी मुंबईहून गेअर हा अधिकारी जहाजे घेऊन सुरतेस आला आणि त्याने सुरतेची नाकेबंदी केली. यामुळे सुरतेच्या सुभेदाराने सर जॉन गेअरशी तडजोड करून तह केला. तहातील अटींवर विसंबून सर जॉन गेअर हा आपली

बायको आणि काही माणसे यांच्यासह बंदरावर उतरला असता मोगलांनी अचानक-पणे त्याला पकडून कैदेत टाकले. तो अद्याप कैदेत आहे.[1]

इंग्रज वकील नॉरिस मोठ्या हामहौलात मोगल दरबारी येऊन पोहोचला. आपले तंबू त्याने बादशहाच्या छावणीजवळ ठोकले. काही दिवस विश्रांती घेऊन तो बादशहाचा दिवाण असदखान यास भेटला. आपली मागणी पुरी व्हावी अशी त्याने त्यास विनंती केली. असदखानाला त्याने मोठा नजराणा दिला. त्याने तो स्वीकारला व इंग्रज वकिलाचे आभार मानले.

आपला खर्च, आपले वैभव यासंबंधी त्याने बऱ्याच कल्पना केल्या. त्याची अपेक्षा ही की, यामुळे लोक दिपून जातील व आपले काम लवकर होईल. परंतु त्याची निराशा झाली. काही दिवस गेल्यावर बादशहाने त्यास भेटीस बोलावले. नॉरिसने बादशहाला अनेक भेटी दिल्या पण त्यातील थोड्याच बादशहाने स्वीकारल्या. आपला कार्यभाग लवकर व्हावा म्हणून नॉरिसने धडपड केली. पण मोगल रिवाजांशी अपरिचित असलेल्या त्या वकिलाला तेथे नऊ महिन्याहून अधिक काळ राहावे लागले. बादशहाकडून निरोपाची परवानगी मिळावी म्हणून नॉरिसने बादशहाला सांगून पाठविले की, "मी दरबारात येऊन जवळ जवळ एक वर्ष होत आले आहे. मला परतण्याची परवानगी मिळावी. यासाठी मी ३ लाख रुपये देण्यास तयार आहे". बादशहाच्या अधिकाऱ्यांनी ही विनंती बादशहाला कळ-विली. पण ३ लाख रुपयांचा उल्लेख न करता त्यांनी नॉरिस हा एक लाख रुपये देतो असे सांगितले. अर्थातच बाकीचे दोन लाख रुपये अधिकाऱ्यांनी आपसातच वाटून घेण्यासाठी मागे ठेवले. बादशहाने नॉरिसची भेट घेण्याचे कबूल केले. आणि त्याला निरोप देण्याची तयारी दाखविली. बादशहाने एक अट घातली, ती ही की, चाच्यांच्यामुळे मोगल प्रजेचे जे नुकसान होईल त्याच्या भरपाईची सर्व जबाबदारी नॉरिसनी स्वीकारावी. नॉरिसनी या गोष्टीला मान्यता दिली नाही. परिणाम असा झाला की, नॉरिसला छावणीतून निरोप मिळेना. अधिकाऱ्यांनी गोड बोलून नॉरिसला झुलवित ठेवले. या अवधित हे अधिकारी त्याच्याकडून मधून मधून शक्य तितके पैसे उकळीतच होते. शेवटी या गोष्टीला कंटाळून नॉरिस हा मोगलांची छावणी सोडून निघाला. बादशहाच्या आज्ञेने त्याला गाझिउद्दीनने वाटेत अडविले. तो अजून वाटेतच आहे, आणि बादशहाच्या आज्ञेची वाट पहात आहे.[2]

**मराठे :** आता मराठ्यांच्याबद्दल विचार करू या. बादशहाचे सैन्य कूच करीत असताना ते त्याच्यावर सतत धाडसी हल्ले करीत. एकदा तर ते बादशहाच्या

१. गेजरला इ. स. १७०१ मध्ये कैदेत टाकण्यात आले. इ. स. १७१० पर्यंत त्याची सुटका झाली नव्हती.

२. विल्यम नॉरिस हा शेवटी १७०२ च्या मार्च महिन्यांत सुरतेला पोहचू शकला.

तंबूपासून अगदी जवळ नेऊन ठेपले होते. आपल्या सैन्याला उत्तेजन देण्यासाठी बादशहाने स्वतः धनुष्य बाण हातात धरले. ऐनवेळी एक रजपूत सरदार चार हजार सैन्य घेऊन बादशहाच्या मदतीला धावला. मराठे मागे हटले. ही मदत आली नसती तर औरंगजेबाला बंदी होण्याचा फार मोठा धोका निर्माण झाला होता. हा रजपूत सरदार म्हणजे जसवंतसिंगाचा (मिर्झा राजा जयसिंग असे पाहिजे) नातु होता.[1] बादशहाने सवाई जयसिंगाला बोलावले. त्या तरुण पोराची परीक्षा पाहण्यासाठी त्याने त्याचा हात आपल्या हातात घेतला. आणि तो सोडवून घेण्यास त्याला सांगितले. सवाई जयसिंग किती हजर जबाबी आहे हे त्याला पाहावयाचे होते. हे ओळखून सवाई जयसिंग म्हणाला, "बादशहा सलामत, मी माझा हात का बरे ओढून घेऊ? तो आपल्या हातात आहे ना? त्यापेक्षा अधिक मानाची जागा माझ्या हाताना कोणती मिळणार?" या लहान पोराच्या चतुर उत्तराने बादशहा खुष झाला. त्याला त्याने उंची पोषाख, दोन हत्ती, आणि एक उमदा घोडा बक्षीस म्हणून दिला.

गादीवर येण्यापूर्वी औरंगजेब म्हणत असे की, "परमेश्वर कृपेने मला राज्य मिळाले तर मी फक्त १२ हजार स्वार बाळगून राज्य करीन." हा त्याचा होरा चुकला. या घटकेस औरंगजेबाचे ५० हजार स्वार प्रत्यक्ष मैदानात आहेत. असे असूनही मराठ्यांच्या विरुद्ध त्याची डाळ शिजत नाही. याशिवाय राज्याच्या इतर भागांत त्याची अनेक सैन्ये आहेत. ती, त्या त्या प्रांतातील बडखोर हिंदु राजांची बंडे मोडण्यास सतत गुंतलेली असतात.

मराठेही काही स्वस्थ नव्हते. औरंगजेबावर आघात करण्याची एकही संधी ते गमावित नसत. मोगल सेनापती झुल्फिकारखान याच्या सैन्यावर त्यांचे सतत हल्ले चालू असत. यामुळे आणि मराठ्यांच्याकडून आपली हानी होत आहे हे पाहून झुल्फिकारखान यास माघार घेऊन सुरक्षित ठिकाणी आसरा घेणे भाग पडले. तो माघार घेत असताना मराठ्यांनी त्याचा पाच दिवस पाठलाग केला. झुल्फिकार-खानाची बरीच मनुष्यहानी झाली. मराठ्यांनी नंतर पाठलाग सोडला. त्यानंतर मराठ्यांनी आपला मोर्चा वऱ्हाडकडे वळविला. वाटेत त्यांनी आपल्या नेहमीच्या पद्धतीस अनुसरून लुटालूट केली.[2]

औरंगजेबाला ही जाणीव आहे की आपण जातीने जर फौज घेऊन निघालो नाही तर कोणताच किल्ला हस्तगत होणे शक्य नाही. हे युद्ध चालू ठेवण्यात त्याला

१. मनूचीचे म्हणणे बरोबर नाही. हा राजपुत मिर्झा राजा जयसिंग याचा पणतू असून त्याचे नाव सवाई जयसिंग होते. त्याचा जन्म १६८७ चा. १७०१ मध्ये तो १४ वर्षांचा होता.

२. या मोहिमेत हजर असलेला भीमसेन सक्सेना याने 'तारीख-इ-दिलकुशा' या आपल्या आत्मचरित्रात मोहिमेचा तपशील दिला आहे.

अतोनात खर्च येत आहे. सर्व गोष्टींचा हिशेब केला तर असे आढळते की, जरी या लढाईत त्याचे बरेच लोक कामी आले व बराच पैसा खर्च झाला असला तरी, कित्येक वर्षे त्याच्या पदरी काही पडेलसे दिसत नाही. असे असूनही तो आपले संकल्प सोडून देत नाही. या सर्वांचा फायदा मिळतो मात्र मराठ्यांना. बादशहाच्या या चिकाटीचा ते आपला स्वार्थ साधण्याच्या कामी उपयोग करून घेतात.

मराठ्यांचा कावा असा की, ते कधी कधी आपले किल्ले मोगलांना घेऊ देतात. मोगलांनी त्या किल्ल्यातून रसदेचा चांगला पुरवठा केला की, मराठे ते किल्ले पुनः तत्परतेने जिंकून घेतात. मराठ्यांची सैन्ये मोगलांच्या पेक्षा चांगली असून लढण्यात अधिक मुरलेली आहेत. मराठे सैनिक हे अतिशय धाडसी आणि शूर असा सर्व हिंदुस्तानात लौकिक आहे. मराठ्यांचे सगळे किल्ले घेतल्याशिवाय रहाणार नाही, असा आपला निश्चय औरंगजेबाने कायम ठेवला तर सर्व किल्ले त्याच्या हाती येण्यासाठी तो आजपर्यंत जितकी वर्षे जगला तितकीच वर्षे त्याला अजून जगावे लागेल. आपला लौकिक धुळीस मिळू नये या विचारानेच हे युद्ध औरंगजेब चालू ठेवित आहे. तसे नसते तर त्याने हे युद्ध तत्परतेने आवरते घेतले असते.

**बादशहाची वृत्ती :** बरे, बादशहाची वागणूक पाहावी तर अशी की, आपली इतकी हानी होत आहे याची त्याला जाणीव आहे असे दिसत नाही. दख्खन त्याच्या हातातून गेला, त्याचे अनेक सैनिक आणि अधिकारी मारले गेले, पण बादशहा आपल्याला वैफल्य आले आहे, असे मुळीच दर्शवित नाही. आता विजापूरचाच वेढा घ्या. या वेढ्यात किल्ल्यातील लोकांनी मोगलांच्या सुरुंगाना शह म्हणून आपले सुरुंग पेरून उडविले. त्यात मोगलांची बारा हजार माणसे मरण पावली. या घटनेने बादशहाच्या कपाळावर एक तरी सुरकुती पडली होती का? मुळीच नाही. बादशहा हसून म्हणाला, " हे काहीच नाही ". औरंगजेबाच्या साम्राज्यात खरोच लोकसंख्या आहे. युद्धे चालू राहिली की शत्रु धाकात राहातो. आणि सरदार आणि मांडलिक यांना काम मिळून ते बादशहाला चिकटून राहतात. वरील कारणामुळे या मोहिमांचा आपल्या मनावर प्रतिकूल परिणाम झाला आहे असे औरंगजेब कधीच दाखवित नाही.

**नॉरिसचे प्रकरण :** इंग्रज वकील नॉरिस हा सुरतेस परत जाण्यास निघाला असताना त्याला वाटेत अडविण्यात आले होते हे मागे सांगण्यात आले आहे. घियासुद्दीनखान याच्या मध्यस्थीने औरंगजेबाने नॉरिसकडे तलवार आणि रत्नखचित मुठीचा खंजीर ही बक्षीसे पाठवून त्याला सुरतेकडे जाऊ दिले. ही बक्षीसे त्याला जानेवारी १७०२ रोजी मिळाली.

या सुमारास सुरतेचा सुभेदार दानिशखान ( दियानतखान पाहिजे ) याने जबरीने इंग्रज व्यापाऱ्यांकडून १ लाख ८४ हजार रुपयांचा माल हस्तगत केला. डचांकडूनही

त्याच्या अंदाजाप्रमाणे ४ लाख ५६ हजार रुपयांचा माल घेण्यात आला. सुरतेचा सर्वांत मोठा वजनदार व्यापारी अब्दुल गफूर हा आहे. त्याच्या मालकीची वीस जहाजे आहेत. चाच्यांकडून त्याचे जे नुकसान झाले, त्याची भरपाई म्हणून सुरतेच्या सुभेदाराने इंग्रज आणि डचांकडून घेतलेला माल अब्दुलकडे देऊन टाकला. आणि बादशहाने या गोष्टीला मान्यता दिली.

यानंतर बादशहाने मुंबईच्या इंग्रज अधिकारी आणि इतर युरोपियन यांची सुटका करण्याचे हुकूम पाठविले.[1] चाच्यांनी केलेल्या नुकसानीची भरपाई करणे युरोपियनांना भाग पाडणे हे आंतरराष्ट्रीय कायद्याच्या विरुद्ध आहे. याशिवाय त्यामुळे मोगल साम्राज्याचे अहित होण्याचा संभव आहे. आणि आपला छळ झाला तर युरोपियन राष्ट्रे एक होऊन मोगलांची बंदरे नष्ट करतील, असा विचार औरंगजेबाने केला. असे असले तरी सुरतेतील युरोपियांवरची बंधने कडकच होत आहेत. चाच्यांमुळे गेल्या १७ वर्षांत मुसलमानांचे जे नुकसान होत आहे त्याची भरपाई म्हणून युरोपियनांच्या-कडून जास्तीत जास्त पैसा उकळावा हा औरंगजेबाचा उद्योग दिसतो. या सुमारास तंजावरमध्ये जेसुइटांची दंगल झाली.[2]

**दाऊदखान** : दाऊदखानाविषयी मागे मी (मनुची) बऱ्याच वेळा सांगितले आहे. जानेवारी १७०१ मध्ये तो कर्नाटकचा सुभेदार म्हणून आला. तेथे आल्यावर त्याने अर्काटच्या किल्ल्याच्या पायथ्याशी तळ टाकला. हे ठिकाण मद्रासपासून ६८–७० मैलांवर आहे. तेथून त्याने मला मद्रासला पत्र पाठवून छावणीत भेटीस बोलावले. पण मद्रासचा गव्हर्नर आणि त्याचे कौन्सिल यांना ही बातमी कळली. दाऊदखाना-कडे भेटी पाठवून त्याचे अभिनंदन करावे असा त्यांनी बेत केला. हे काम मी करावे अशी त्यांनी मला विनंती केली. रामप्पा नावाचा एक ब्राह्मण पूर्वी इंग्रजांच्या पदरी होता. आता त्याने नोकरी सोडली होती. त्यालाही त्यांनी माझ्याबरोबर दिले. मी दाऊदखान आणि त्याच्याबरोबर असलेल्या कर्नाटक सुभ्याचा दिवाण महंमद सैद यांची भेट घेतली. माझ्याविषयीच्या मत्सरामुळे रामप्पाने अनेक अडचणी आणल्या. पण त्या न जुमानता मी त्या भेटी दाऊदखानाला देऊन इंग्रजांचे काम करून दिले. अशाच प्रकारे मी दाऊदखानापाशी फ्रेंचांचीही शिफारस केली. आणि त्यामुळे त्यांचीही कामे पार पडली. यानंतर चार महिन्यांनी दाऊदखान तंजावरला गेला.

---

१. इंग्रजांनी सप्टेंबर ३, १७०३ पासून सुरतेची नाकेबंदी केली होती. यामुळे औरंगजेबाने १४ फेब्रुवारी १७०४ रोजी वरील हुकूम काढलेला दिसतो.

२. या पुढील मजकुरात जेसुइट लोकांच्या आपसातील भांडणांमुळे तंजावरमध्ये मोठा धामधूम होऊन जेसुइट मिशनऱ्यांच्या विरुद्ध तंजावर येथे मोठी दंगल झाली आणि त्यात चर्चेस वगैरे यांची बरीच हानी झाली याची हकीकत मनूचीने दिली आहे. यावेळी तंजावरच्या गादीवर व्यंकोजीचा मुलगा शहाजी (१६८३–१७११) हा होता. ही हकीकत १७००–०१ मध्ये घडली. मनूचीच्या मध्यस्थीने मोगल सुभेदार दाऊदखान याने तंजावरच्या राजाला लिहून ख्रिस्त्यांवरील अत्याचार थांबविले.

तेथे त्याने खंडणी गोळा केली. परततांना तो कडलूर, पांडिचेरी, मद्रासपट्टम[1] या स्थळावरून सेंन थोमाला आला. कडलूर येथे इंग्रज, पांडिचेरी येथे फ्रेंच, आणि मद्रासपट्टम येथे डच यांनी त्याला भेटी दिल्या. सेंन थोम येथे इंग्रजांचे अधिकारी त्यास भेटण्यास आले.[2] त्यावेळी मी (मनुची) हजर होतो. इंग्रजांनी दिलेल्या भेटी फार अल्प आहेत अशी त्याने कटकट केली. पण भेटी बरोबर ५ हजार रुपये दिले. मग ही कटकट दूर झाली. यानंतर मद्रासचा गव्हर्नर पिट याने दाऊदखानाला मोठ्या थाटाची मेजवानी दिली आणि मद्याच्या बाटल्या आणि इतर अनेक वस्तु भेटीदाखल दिल्या. यानंतर दाऊदखान मद्रासेहून अर्काटकडे निघून गेला.[3]

यानंतर मी मागे सांगितल्याप्रमाणे, तंजावरमधील मिशनरी विरोधी दंगलीच्या संबंधाने, १७०१ च्या डिसेंबरमध्ये मी पांडिचेरीला होतो. तेथे मला कळले की, इंग्रजांशी कडकपणे वागावे असा औरंगजेबाने दाऊदखानाला हुकूम पाठविला असून दाऊदखान आपल्या सैन्यासहीत अर्काटहून निघून मद्रासकडे लवकरच जाणार आहे. इंग्रजांनी त्याला भेटण्यासाठी आपल्या पदरी असलेले दोन व्यापारी ख्वाजा अहमद आणि नारप्पा (नारायण) यांना पाठविले. मी पण दाऊदखानास भेटण्यास गेलो त्यावेळी दाऊदखान, त्याचा दिवाण, बक्षी आणि इतर अधिकारी एकत्र जमले होते दाऊदखानाचा आग्रह असा की, औरंगजेबाचे पत्र इंग्रजांना दाखवायचे तर गव्हर्नरने आपणास येऊन भेटावे. त्या गोष्टीला पिट कबूल नव्हता.[4]

त्याने मद्रासच्या रक्षणाची तयारी केली. दाऊदखानाने मद्रासची नाकेबंदी केली. आणि मद्रास जवळील एग्मोर, पुरसेवाकम, ट्रिप्लिकेन, ही गावे ताब्यात घेतली. त्याने इंग्रजांचा व्यापारही थांबवला. इंग्रजांनी निषेध व्यक्त केला. तेव्हा दाऊदखानाने बादशहाकडून आलेल्या पत्राची प्रत त्यांच्याकडे पाठविली. मद्रासच्या गव्हर्नरने बोलणी करण्यासाठी मला दाऊदखानाकडे पाठविले. चांचेगिरीची जबाबदारी इंग्रज व्यापाऱ्यांवर येऊ शकत नाही. मोगलांच्या हुकुमाने युरोपियन लोक कदाचित ते प्रदेश सोडतील, पण मोगलांची जहाजे पकडून व बंदरावर हल्ले केल्याशिवाय राहणार नाहीत, असे सांगून मी दाऊदखानाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

१. मद्रासच्या दक्षिणेस ४० मैल.

२. दाऊदखान हा सेंन थोमला २ जुलै १७०१ रोजी येऊन पोहचला.

३. १७ जुलै १७०१.

४. ते पत्र म्हणजे १७०१ नोव्हेंबरचे होय. औरंगजेबाच्या आज्ञेने असदखान वजीर याने ते पाठविले होते. पत्रातील मजकूर असा होता, "युरोपियनांनी केलेल्या करारनाम्याच्या विरुद्ध चांचेगिरी केल्यामुळे यांचा व्यापार बंद पाडला पाहिजे. त्यांची मालमत्ता जप्त करून त्यांना कैद केले पाहिजे. 'अडव्हाइज' नावाचे जहाज समुद्रात बुडाले होते. त्यावरील मालमत्ता ७ लाख पॅगोडा किंमतीची होती. ती रक्कम नियमाप्रमाणे इंग्रजांनी बादशहाच्या खजिन्यात भरली पाहिजे."

दाऊदखानाने पांडिचेरीचे फ्रेंच, नेगापट्टमचे डच, आणि ट्रँकेबारचे डेन यांच्याकडे पत्रे लिहून त्यांना आपल्या मदतीस बोलाविले. त्यांनी काही निमित्त सांगून टाळाटाळ केली. फ्रेंचांनी माझ्या सांगण्यावरून आपला एक मनुष्य दाऊदखानाकडे पाठविला आणि माझ्या मध्यस्थीने त्याला आणि इतर मोगल अधिकाऱ्यांना भेटी दिल्या. डचांनी पण आपली माणसे पाठविली होती. इंग्रजांना पोर्तुगीजांचा संशय होता पण तो निराधार होता.

२ एप्रिल १७०२ रोजी दाऊदखानाने डच वकिलाला परत पाठविले. मद्रासची नाकेबंदी दाऊदखानाने अद्यापपर्यंत चालू ठेवली आहे. पण ही नाकेबंदी नावापुरती म्हणावी लागेल. बादशहाचा हुकूम येईपर्यंत आपण नाकेबंदी उठवणार नाही, असे दाऊदखानाचे म्हणणे आहे. इंग्रजांच्यावर काही परिणाम होत नाही असे पाहून दाऊदखानाने त्यांच्याशी तडजोड केली. इंग्रजांनी दाऊदखानाला २५ हजार रुपये दिले. दाऊदखानाने मद्रासचा वेढा उठवला आणि तो तेथून निघून गेला.[1]

खेळणा (विशाळगड) : औरंगजेब खेळण्याच्या वेढ्यात गुंतला आहे हे मागे सांगितले तो वेढा अद्याप चालू. पण औरंगजेबाला म्हणण्यासारखे यश येत नाही. मराठे त्याची मोहीम निष्फळ करण्यासाठी आणि त्याचे अधिकाधिक नुकसान करण्यात गुंतले आहेत. मोगलांच्या ज्या स्थळांना पुरेसे रक्षण नाही, अशी ते निवडतात. आणि त्यांच्यावर हल्ला करतात. नुकतेच त्यांनी बऱ्हाणपूरवर हल्ला चढविला. बऱ्हाणपूरची लुटालूट करून ते तेथील सुभेदाराला पकडून घेऊन गेले. खंडणी भरून त्याला आपली सुटका करून घ्यावी लागली.

मराठ्यांनी त्यानंतर आपला मोर्चा गोवळकोंड्याकडे वळविला. तेथे पोहचून त्यांनी शहर उध्वस्त करू, अशी धमकी दिली. ते टाळण्यासाठी तेथील सुभेदाराला मराठ्यांना जबर रक्कम देणे भाग पडले.

वृद्ध बादशहाला या सर्व दुर्घटनांची माहिती मिळाली. या घटना त्याच्या मनाला फार लागल्या. असे अनर्थ टाळण्यासाठी त्याने उपायांचा विचार केला. अशा घटनांच्यामुळे औरंगजेबाचा लौकिक आणि त्याचे हितसंबंध या दोन्हींना हानी पोहचत होती, हे उघड होते. औरंगजेबाच्या लक्षात एक गोष्ट आली ती ही की मराठ्यांचे यश त्यांच्या घोडदळाच्या चपळतेवर आहे. त्याला तोड म्हणून त्याने १५ हजार उंट आणि त्यावरील सशस्त्र आणि कसलेले स्वार यांचे दळ तयार करण्याचे ठरविले. उंटाची मजल एकेका दिवसात ७०–८० मैलांची होऊ शकते. उंटाच्या दळाचा मोगलांना उपयोग होईल यात शंका नाही. पण अडचण ही की एक वेळ इतके उंट मिळू शकतील पण त्यावर स्वारी करणारे तरबेज शिपायी मिळणे कठीण.

---

१. ५ मे १७०२ (नवीन कालगणनेप्रमाणे १६ मे १७०२).

इ. स. १७०२ चा मे महिना आला. पावसाळा नजिक आला होता. एकदा पावसाळा सुरुवात झाली की कोणतीही कामगिरी पार पाडणे अशक्य होऊन जाते. म्हणून खेळण्याचा किल्ला घेण्यासाठी शेवटचाच प्रयत्न करण्याचे औरंगजेबाने ठरविले. त्याला ताज्या दमाचे आणखी सैन्य मिळाले होते. त्याने वेढा अधिक बळकट केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. मराठ्यांनी त्याच्या सैन्यावर हल्ले चढविले. किल्ल्याभोवतीच्या डोंगरातून मोगलांचे जवळ जवळ ६ हजार मनसबदार मारले गेले. यामुळे औरंगजेबाला आपला बेत स्थगित करून अनुकूल संधीची वाट पाहत बसणे भाग पडले.

**राजपुत्र आझम :** आपल्या खास तैनातीतील सैनिकांना पगार देण्यासाठी औरंगजेब हा मधून मधून आग्र्याच्या खजिन्यातून पैसे मागवितो. तो त्याच्या छावणीत येऊन पोहोचतोच असे नाही. एकदा तर राजपुत्र आझम यानेच खजिना मध्ये थांबवून ते पैसे आपल्याकडे वळविले. आपल्याला पैशाची अडचण असल्यामुळे आपल्याला असे करावे लागले, असे त्याने अत्यंत नम्रतेने बादशहास कळविले. अर्थात औरंगजेबाला आझमचे हे कृत्य आवडले नाही.

**विशालगड ( खेळणा ) :** खेळण्याच्या वेढ्यात औरंगजेबाचे ६ हजार मनसबदार मारले गेले, तरी पण त्याने वेढा चालू ठेवला. किल्ला घेण्यासाठी शस्त्रांचा उपयोग होत नाही हे पाहून त्याने पैशाचा उपयोग केला. किल्लेदाराला रक्कम मिळाल्यामुळे त्याने मोगलांना आत येऊ दिले. अशा रीतीने १७०२ मध्ये २८ जूनच्या रात्री किल्ला मोगलांच्या ताब्यात आला. ही मोहीम असदखानाच्या प्रयत्नाने यशस्वीपणे शेवटास गेली. याबद्दल बादशहाने दरबारात बसण्याचा मान त्याला दिला. हा मान फार मोठा समजला जातो.

**वेल्लोर :** १७०२ च्या ऑगस्ट महिन्याच्या १४ तारखेस दाऊदखानाने मराठ्यांच्या कडून वेल्लोरचा किल्ला घेतला. यासाठी मोगलांनी खेळण्याप्रमाणे पैशाचा मुबलक वापर केला. आता कर्नाटकात मराठ्यांचे कोणतेही स्थळ राहिले नाही. किल्ला घेतल्यावर दाऊदखानाने बादशहाला ही बातमी लिहून कळविली.

**खेळणा ( विशाळगड ) :** खेळणा हाती आल्यामुळे औरंगजेबाला मोठे समाधान वाटले. किल्ल्यात शिबंदी ठेऊन किल्ल्याचा बंदोबस्त नीट ठेवावा अशी त्याने आज्ञा केली. यानंतर तो मागे फिरला. मराठेही काही स्वस्थ बसले नव्हते. औरंगजेब मागे फिरत आहे हे पाहून त्यांनी वऱ्हाड प्रांतावर हल्ला चढविला. वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान हा होता. या अलीमर्दानखानाविषयी मी ( मनुची ) पूर्वी सांगितले आहे. वऱ्हाडच्या आक्रमणात मराठ्यांनी वाटेवरची स्थळे उध्वस्त केली. अलीमर्दानखान आपले सैन्य घेऊन त्यांच्यावर चालून आला. मराठ्यांनी त्याचा दणदणीत पराजय करून त्याला कैद केले आहे. भक्कम रकमेची खंडणी भरल्याशिवाय

त्याची सुटका होईल असे वाटत नाही. मागेही याच अलीमर्दानखानाने खंडणी भरून मराठ्यांच्या तावडीतून सुटका करून घेतली होती, हे या पूर्वीच सांगितले आहे.

**मोगलांचे हाल :** खंडणा घेतल्यानंतर मुसळधार पावसामुळे आणि प्रतिकूल हवा-मानामुळे मोगल सैन्याचे परतीच्या प्रवासात फार हाल झाले. पाऊस इतका प्रचंड पडला की, त्यामुळे रस्ते वाहून गेले. पिके बुडाली आणि लोक निराधार झाले. बादशहाच्या छावणीत मोठा दुष्काळ पडला. मराठ्यांचे हल्ले, दुष्काळ, प्रचंड पाऊस, आणि या सर्वांच्या जोडीला रोगाची भयंकर साथ, वरील कारणांनी मोगलांचे अर्धे सैन्य मोहिमेत नष्ट झाले. मोगलांचे हाल काय वर्णावेत ? छावणीतील कित्येक बायकांना उघड्यावर यावे लागले. ही बेअब्रू टाळण्यासाठी कित्येकांनी आपल्या बायकांना ठार मारले. खुद्द औरंगजेबाच्या अंतःपुरातील अनेक बायका मरण पावल्या आणि खुद्द औरंगजेबाचीही या मोहिमेतील संकटातून मोठ्या कष्टाने सुटका झाली.

कर्नाटकातून[1] मराठे निघून गेले तसे तंजावर, त्रिचनापल्ली इत्यादी मांडलिक राजांकडून खंडणी घ्यावी असे बादशहाने दाऊदखानाला कळविले. त्याप्रमाणे या राजांना हत्ती आणि पैसा आणि खंडणी भरावी लागली.

**बहादूरखान :** औरंगजेबाचा दूधभाऊ आणि सेनापती बहादूरखान याच्याबद्दल मी (मनुची) मागे लिहिलेच पण त्याच्या मृत्यूच्या वेळची एक घटना मी सांगण्यास विसरलो.[2] असे म्हणतात की, आपल्या मृत्यूच्या वेळी बहादूरखानाने बादशहाला बोलावून त्याला सुमारे पन्नास लाख रुपये किंमतीचे रत्नखचित सिंहासन भेट म्हणून दिले. त्याशिवाय रत्नांनी भरलेली ताटे, दागिने, हत्ती, घोडे या भेटी निराळ्याच. बादशहाने या वस्तू स्वीकारल्या. बहादूरखानाने शिष्टाचाराप्रमाणे आपल्या गत अपराधांची बादशहापाशी क्षमा मागितली. बादशहाने म्हटले "मी तुला सर्व गोष्टींबद्दल क्षमा करतो. पण एका अपराधाची नाही." असे म्हणून बादशहा त्या भेटी घेऊन गेला. हा अपराध काय असावा ? मृत्यूच्या वेळी झाल्या गेल्या गोष्टींबद्दल क्षमा मागण्याचा आणि करण्याचा हिंदू आणि मुसलमान यांच्यात प्रचात आहे. मग क्षमा न मिळालेला असा अपराध कोणता होता, हे लोकांना समजेना. हा अपराध म्हणजे बादशहाच्या अंतःपुरातील एका नाजुक प्रकरणा-संबंधी असावा असा संशय व्यक्त करण्यात आला. बादशहाच्या कठोरपणाबद्दल इतके लोक कुजबुजू लागले, की बादशहाला त्याबद्दल गप्प बसणे भाग पडले पण बादशहाच्या रागाची झळ एका माणसाला लागली. तो म्हणजे संभाजीचा

१. आजचा तामीळनाडू.

२. बहादूरखानाचा मृत्यू ६ ऑगस्ट इ. स. १६९७ रोजी औरंगजेबाच्या छावणीत झाला

मेहुणा महादजी होय.[१] महादजी नाईक हा औरंगजेबाच्या कठोरपणाविषयी उघड उघड बोलू लागला. ही बातमी बादशहाला कळली. महादजीपाशी बरीच पथके असल्यामुळे त्याला शिक्षा करणे औरंगजेबास जमेना. त्याने दुसरी युक्ती योजिली. त्याने महादजीची ग्वाल्हेरच्या किल्लेदारीवर नेमणूक केली. किल्ल्यात शिबंदी बरीच असल्यामुळे तुम्हाला आपली माणसे नेण्याची जरूरी नाही, असे बादशहाने त्याला सांगितले. हिंदुस्थानातील एका प्रमुख किल्ल्याची किल्लेदारी आपल्याला मिळत आहे, हे पाहून महादजीला अतिशय आनंद झाला, ग्वाल्हेरला तो पोहोचला. किल्ल्यात पाऊल ठेवताच औरंगजेबाच्या आज्ञेने महादजीला ठार मारण्यात आले.

खेळणा किल्ला काबीज केल्यानंतर आणि औरंगजेब तेथून परत जात असताना आलेली संकटे मागे सांगितली आहेतच. मराठ्यांनी पुनः एकदा मोगलांच्यावर हल्ला केला. यावेळी मोगलांचे पाच अधिकारी त्यांनी कैद केले. हे अधिकारी इतके मोठे व महत्वाचे होते की, बादशहाने त्यांना सोडविण्याकरिता प्रत्येकी एक एक लाख रुपये मराठ्यांना दिले. यानंतर औरंगजेबाने कोंडाणा किल्ल्यावर स्वारी केली आणि सध्या तो तेथेच आहे व वेढा बळकट करीत आहे. मराठे मात्र तिकडे दुर्लक्ष करून ५० हजारांचे घोडदळ घेऊन नर्मदापार गेले आहेत. या फौजेने अनेक प्रांत उध्वस्त केले व त्यांची लुटालूट केली. यापैकी सिरोंज गावाची तर त्यांनी भयंकर नासधूस केली.

दाऊदखान : दाऊदखान हा जातीने शूर व धाडसी आहे. पण तो क्रूर वृत्तीचा आहे. विरोधी लोकांना गोड बोलून बोलावून त्यांना ठार मारणे हे तो सहज करतो. इतकेच नव्हे, त्याची एक ठेवलेली बाई प्रसूत झाली. तसे त्याने, हलक्या कुळातील बाईपासून झालेला माझा मुलगा शूर कसा असू शकेल, असे म्हणून त्या मुलाला ठार मारले.

इ. स. १७०३ मध्ये दाऊदखान आणि त्याचा दिवाण सादतुल्लाखान[२] यांनी मला बोलावू पाठविले. कडपा मुक्कामी मी (मनुची) त्यांना भेटलो.[३] महम्मद जाफर नावाच्या एका अधिकाऱ्याच्या इलाज करण्यासाठी त्यांनी मला बोलाविले होते. मी औषधोपचार केला. परत येताना दाऊदखानाच्या दिवानाने इंग्रज, फ्रेंच, इत्यादींच्या-कडून त्यांना पूर्वी देण्यास आलेली पेठा त्यांनी परत द्यावी अशा अर्थाची पत्रे लिहून ती त्यांनी माझ्यापाशी दिली. अर्थात इंग्रज, फ्रेंच डच इत्यादींनी त्या पत्रा-कडे लक्ष दिले नाही. दाऊदखानाकडून परत येताना मी वेल्लोरच्या किल्लेदार गुलाम अलीखान याला भेटलो. हा मराठ्यांच्या तर्फे पूर्वी वेल्लोरला किल्लेदार होता.[४]

१. शिवाजी महाराजांचा जावई महादजी नाईक निंबाळकर.
२. अर्काडच्या पहिल्या नबाब घराण्याचा मूळ पुरुष, सुप्रसिद्ध चंदासाहेब याचा सासरा
३. मार्च १७०३.
४. येथे मनुचीने वेल्लोरच्या किल्ल्याचे वर्णन केले आहे.

सुरत : इ. स. १७०३ ला चाच्यांनी मोगल व्यापाऱ्यांची जहाजे लुटली[1] आणि जहाजांवरील श्रीमंत प्रवाशांना ओलीस धरले. याचा सूड म्हणून सुरतेच्या मोगल सुभेदाराने सुरतेतील इंग्रज आणि डच अधिकाऱ्यांना पकडून कैदेत टाकले आणि त्यांच्याकडून ५-५ लाख रुपये घेतले. यामुळे डचांनी सुरतेची नाकेबंदी केली[2]. याचा परिणाम होऊन औरंगजेबाने सुरतेच्या सुभेदाराची बदली केली[3].

युरोपियनांची जहाजे सुरतेची नाकेबंदी करण्याच्या काही दिवसापूर्वी[4] मराठ्यांनी सुरत शहराला वेढा घातला होता. त्यांच्यापाशी २० हजार स्वार होते. बंदर घेणे त्यांना शक्य झाले नाही. पण त्यांनी शहराभोवतालचे तट पुरे उध्वस्त केले. मस्कतच्या अरबांची जहाजेही पश्चिम किनाऱ्यावर येऊन लुटालूट करीत. इ. स. १७०४ च्या जानेवारीत पोर्तुगीजांनी त्यांच्याशी लढा देऊन अरबांची दोन जहाजे पकडली.

औरंगजेबाच्या हालचाली : इ. स. १७०३ मध्ये औरंगजेबाने कोंढाण्याचा किल्ला घेतला[5]. यानंतर याने पुणे येथे तळ दिला.

आता आपले फार वय झाले आहे असे पाहून मराठ्यांचे किल्ले व प्रदेश जिंकण्याचे काही तरी उपाय शोधले पाहिजेत असे औरंगजेबास वाटले. मराठ्यांच्यात फूटपाडण्याचे कारस्थान करण्याचे त्याने ठरविले. संभाजीचा मुलगा[6] त्याच्याकडे छावणीत होता. त्याला त्याने लहानपणापासून वाढविले होते. बादशहाने शाहूला आपल्यासमोर बोलावून घेतले. त्यांनी बंदीतून मुक्ती केली. त्याला उंची वस्त्रे दिली व आपला मुलगा कामबक्ष यास त्याच्यावर देखरेख करण्यास सांगितले. बादशहाने शाहूला मोकळीक दिली. त्याला ७ हजारी मनसब दिली. आणि त्याला दक्षिणच्या सुभ्याच्या चौथाईचा हक्क दिला. कामबक्षला विजापूर आणि गोवळकोंडा या दोन प्रांतांचा सुभेदार करण्यात आले. औरंगजेब कामबक्षाला म्हणाला "तुला मी दक्षिणेस सोडून दिल्लीला जाईन आणि तेथे परमेश्वराची करुणा भाकित उरलेले आयुष्य घालवीन." ही बातमी चोहोकडे पसरली पण या गोष्टीला एक वर्ष होऊन गेले तरी औरंगजेबाने हा निर्णय अमलात आणलेला नाही.

औरंगजेबाची समजूत अशी की, या कारस्थानामुळे, मराठे सरदार आपला मुलगा कामबक्ष आणि शाहू यांना येऊन मिळतील आणि अशा रीतीने त्यांच्यातील एकी नाहीशी होईल. पण मराठ्यांना औरंगजेबाचा कावा माहीत होता. त्यांनी त्याच्या

१. ऑगस्ट १७०३.
२. २० सप्टेंबर १७०३.
३. मार्च १७०४.
४. सप्टेंबर १७०३.
५. १५ एप्रिल १७०३.
६. शाहू.

हुकुमाची मुळीच पर्वा केली नाही. साम्राज्यातील वेगवेगळ्या भागातून खजिने लुटणे हे त्यांना अधिक लाभदायक होते. शाहूच्या बाळ्याला मात्र अधिक कडक नजरकैद झाली.

आपले सैन्य मराठ्यांची काही हानी करू शकत नाही, म्हणून औरंगजेबाने आणखी एक युक्ती योजिली. त्याने रामचंद्र पंडित[1] याला पत्र लिहून "तुमच्या सारखी मुत्सद्दी आणि बुद्धीमान माणसे मला हवी आहेत. तुम्ही माझ्याकडे आलात, तर मी माझा तुम्हाला मुख्य प्रधान करीन" असे कळविले. पण दीर्घ अनुभवाने मराठ्यांना औरंगजेबाच्या आश्वासनांचा पोकळपणा कळून चुकला होता.

इ. स. १७०४ च्या फेब्रुवारी महिन्यात मराठ्यांनी मच्छलीपट्टणच्या जवळ पाला-पोद् या गावावर हल्ला चढविला. त्यांच्याबरोबर १२ हजार स्वार आणि १० हजार पायदळ होते. तेथे त्यांनी चौथाई वसूल केली. मच्छलीपट्टण हे सुरक्षित स्थान असल्यामुळे ते त्याच्या वाटेला गेले नाहीत.

१७०४ च्या जानेवारी महिन्यात मराठ्यांनी नर्मदा ओलांडली आणि त्यांनी सिरोंज हे शहर लुटले. तेथून ते ग्वाल्हेरपर्यंत पोहोचले. वाटेत त्यांनी बरीच लुटालूट केली. आणि बरीच संपत्ती घेऊन ते परत आले. हे मागे सांगितलेच आहे. अशा मोहिमातून मराठ्यांना बरीच संपत्ती मिळते. कोणत्याही प्रांतात ते घुसले की आपला प्रांत वाचविण्यासाठी तेथील मोगल अधिकारी त्यांना रकमा देतात. नाहीतर प्रांत उध्वस्त होण्याची भिती असते. यावेळी मराठ्यांचे बळ अतिशय वाढलेले आहे. त्यांच्यापाशी एक लाखाहून अधिक घोडदळ आहे. त्यामुळे ते मोगलांना हवे तसे आव्हान देऊ शकतात. औरंगजेब पूर्वी इतर राजे आणि मांडलिक यांना जशी वागणूक देत असे तशी मराठे त्याला देत आहेत.

या वर्षीच्या (१७०४) मे महिन्यात मराठ्यांचे ६० हजार सैन्य कर्नाटकात उतरले. त्यांनी अनेक किल्ले घेऊन "सिरा" या गावापाशी छावणी दिली. यानंतर मराठ्यांनी आपल्या सैन्याचे तीन विभाग केले. एक तुकडी त्रिचनापल्लीच्या दिशेने गेली. त्याने कर्नाटकातून[2] तीस लाख रुपये खंडणी घेतली. यानंतर मराठ्यांनी त्रिचनापल्ली राज्यातूनही खंडणी वसूल केली. त्यानंतर ते तंजावरला गेले. दाऊद-खानाने मी तुम्हाला दोन लाख रुपये देतो, माझ्याविरुद्ध मोहीम करू नका" अशी विनंती केली. मराठ्यांनी त्याचे म्हणणे ऐकले नाही. यामुळे दाऊदखानाने निराश होऊन अर्काटहून आपला तळ हलविला आणि त्याने वेल्लोरच्या किल्ल्याचा आश्रय घेतला. मराठ्यांच्या सैन्याची दुसरी तुकडी गोवळकोंडा प्रांतात पसरली आहे.

१. रामचंद्र पंत आमात्य.

२. म्हैसूर राज्य असावे

तिसरी तुकडी इतर भागात फिरत असून ठिकठिकाणचे किल्ले आणि इतर स्थळे ताब्यात घेत फिरत आहे.

**खुदाबंदाखान :** शाईस्ताखानाचा मुलगा खुदाबंदाखान हा कर्नाटकात सुभेदार असून अथोनी येथे रहात होता.[1] त्याला अशी भीती वाटत होती की, इतरांप्रमाणे आपणासही मराठ्यांच्याकडून उपद्रव होणार. आपणावर काही आपत्ती ओढवू नये म्हणून त्याने एक मोठी रक्कम मराठ्यांच्याकडे पाठवून दिली. मराठ्यांनी त्याला कळविले की, "शाईस्ताखान हा फेवढा श्रेष्ठ व दिलदार सरदार होता. त्याच्या मुलाला कोणत्याही प्रकारे इजा करण्याचा आमचा इरादा नाही." म्हणून त्यांनी खुदाबंदाखानाने पाठविलेला पैसा स्पर्शही न करता परत पाठविला. परंतु त्याला असे कळविले की, "तुमच्या दिवाणाला आणि महसूल कारभाऱ्याला आमच्याकडे पाठवून द्या, नाहीतर दोघांची डोकी उडविली जातील." हे संकट टाळण्याकरिता त्याने आपल्या दिवाणाला मराठ्यांच्याकडे पाठवून दिले. यामुळे खुदाबंदाखानाची सुटका झाली. त्याचे व त्याच्या कुटुंबाचे रक्षण झाले. मात्र त्याला आपला सरंजाम मागे टाकून सडे निघून जावे लागले.

**मराठ्यांचे वर्चस्व :** मराठ्यांचे इतके सरदार आहेत. खरे, वरून त्यांना कोणी मार्गदर्शन करणारा आहे असेही नाही. इतके असूनही ते मोगलांशी सतत लढत आहेत. ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. साम्राज्याच्या विविध भागांत ते सतत आक्रमणे करीत असतात. आणि बरीच संपत्ती हस्तगत करतात. आपले दूरदर्शित्व आणि शौर्य यामुळे ते सतत यशस्वी होत आहेत. त्यांच्या या यशाचे कारण मला एकच दिसते आणि ते म्हणजे इतकी वर्षे सतत चालत आलेली त्यांच्या सरदारांमधील एकी होय.

या दिवसात मराठ्यांची सैन्ये आणि त्यांचे सरदार हे मोठ्या आत्मविश्वासाने मोहिमा करीत फिरत आहेत. मोगल सरदार यांच्यापुढे दबले असून त्यांनी त्यांची धास्ती घेतली आहे. सध्या मराठ्यांची सैन्ये तोफा, बंदुका, धनुष्यबाण, हत्ती, उंट इत्यादींनी युक्त आहेत. ती तंबू आणि सरंजामही बरोबर बाळगतात. जरूर पडेल तेथे ते व्यवस्थितपणे छावणी करतात. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे मोगलांच्या सैन्याप्रमाणे त्यांची (मराठ्यांची) सैन्येही सरंजामांनी युक्त आहेत. काही वर्षांपूर्वी हा प्रकार नव्हता. त्यावेळी मराठ्यांची शस्त्रे म्हणजे भाला आणि दोन इंच रुंदीच्या तलवारी ही होती. त्या काळात ते मोगलांच्या सरहद्दीवर छापे घालीत फिरत. पण आता मात्र मोगलांची मुळीच भिती न बाळगता विजेत्याप्रमाणे मोहिमा करीत असतात.

१७०४ च्या जून महिन्याच्या सुरुवातीस मराठ्यांनी गोवळकोंड्यावर हल्ला चढविला आणि त्यांनी बरीच मालमत्ता ताब्यात घेतली. गोवळकोंड्याच्या सुभेदारांनी

१. इ. स. १७०३–०४.

किल्ल्यात आश्रय घेतला. मराठ्यांनी तेथेही त्याला स्वस्थ बसू दिले नाही. अनेक धमक्या देऊन त्यांनी त्याच्याकडून बरीच रकम वसूल केली.

आपल्यापाशी असलेले सैन्य आणि साधने ही पाहता आपण मराठ्यांना प्रतिकार करू शकू असे दाऊदखानाला वाटेना. त्याने मराठ्यांशी तडजोड केली आणि त्यांना ५ लाख रुपये दिले. मराठ्यांनी पैसे घेतले पण ते परत गेले नाहीत. अदोनी आणि सीरा या प्रांतांत लुटालूट करण्याचे त्यांनी चालू ठेवले. या घटकेपर्यंत औरंगजेबाने दाऊदखानाला कुमक पाठविली नाही. याचे कारण असे की, खुद्द त्याच्या सैन्याला मराठ्यांच्या सेनेने वेढले, ते चहूकडे धामधूम करीत फिरत आहेत.

गेल्या काही महिन्यांच्या घडामोडी सांगताना मी (मनुची) लिहिले होते की, मराठे ग्वाल्हेर किल्ल्याच्या जवळपर्यंत गेले होते. ते आग्रा घेतील की काय या भीतीने औरंगजेबाने त्यांचा पाठलाग करण्यासाठी आझमचा मुलगा आणि आपला नातू बेदारबख्त यास पाठविले. पण त्याच्याबरोबर थोडे सैन्य देण्यात आले. बेदारबख्तने मराठ्यांना टाळून दुसरी वाट धरली आणि तो उज्जयिनीला पोहोचला.[1] त्याचा बाप आझम गुजरात येथे सुभेदार होता. माळवा प्रांतातून मराठे परत निघून गेले. नंतर औरंगजेबाने बेदारबख्तला बोलावू पाठविले. पण आपण आजारी असल्याचे निमित्त करून तो आला नाही. बादशहापासून लांब असल्यावर ऐषआराम करण्यास या राजपुत्रांना तेवढीच मोकळीक मिळते.

**वृद्ध औरंगजेब बादशहाची अगतिकता** : औरंगजेब बादशहा आता वृद्ध झाला होता. त्याच्या अंगात काही त्राण उरले नव्हते. म्हणून दिल्लीला परतण्याची त्याला बळकट इच्छा होती. आपली बहीण बेगम साहेब हिचा सल्ला न मानल्याचा त्याला पश्चात्ताप होत होता. पण त्याचे दिल्लीला जाणे हे शहाणपणाचे ठरणे शक्य नव्हते. बरे आपल्या जागी कोणाला तरी दक्षिणेत ठेऊन जावे म्हणावे तर, तेही शक्य नव्हते. मराठ्यांचे सामर्थ्य,तडफ आणि धडाडी ही एक उघड गोष्ट आहे. अशा परिस्थितीत औरंगजेबाने इच्छिल्याप्रमाणे तो दिल्लीला परतला असता, अगर त्याने आपल्या मागे दक्षिणेत कोणाला तरी ठेवले असते तर, सगळी दक्षिण तर त्याच्या हातातून निघून गेली असती; याशिवाय साम्राज्याच्या इतर काही भागालाही मुकावे लागले असते. प्राप्त परिस्थितीत आपण जिंकून घेतलेल्या प्रदेशांचे रक्षण करणे आवश्यक आहे; तितके तरी केले पाहिजे हे ओळखून औरंगजेब आजपर्यंत विजापूर प्रांतात राहिला आहे. निरनिराळ्या भागांत असलेले मराठ्यांचे किल्ले जिंकून घेण्याचा तो उद्योग करीत आहे. त्या कामात त्याचे बरेच कालहरण, संपत्तीचा नाश आणि प्राणहानीही होत आहे. तो सारखे हुकूम सोडीत असतो. त्यात खंड पडत नाही पण त्या हुकुमांची कोणीही अम्मलबजावणी करीत नाही.

---

1. माळव्याच्या सुभेदारीवर बेदारबख्तची नेमणूक १७०४ मध्ये झाली.

वरील वर्षी (१७०४) ऑगस्ट महिन्यात औरंगजेबाने दाऊदखानाला[1] त्याच्या इतर हुद्यांच्या व्यतिरिक्त अदोनीच्या[2] इलाख्यावर सुभेदार म्हणून नेमले. दाऊदखान आपल्या सैन्यासहित कूच करीत असताना मराठ्यांच्या सैन्याने त्याला घेरले आणि त्याचा नाश करण्याचा खूप प्रयत्न केला. त्यात मराठ्यांना यश आले नाही. दाऊदखानाने धर्मावरमच्या[3] किल्ल्याचा आश्रय घेतला आणि त्याने शत्रूला निकराने तोंड दिले. दाऊदखानाचा पाडाव करता येत नाही हे मराठ्यांनी पाहिले. येथे वेळ दवडण्यात अर्थ नाही असे त्यांना दिसून आले. हिच वेळ दुसऱ्या एखाद्या दणदणीत मोहिमेवर खर्च करता येईल हे त्यांना पटले. दाऊदखानाशी त्यांनी बोलणी सुरू केली. त्यानेही आपल्यावरील प्रसंग ओळखून मराठ्यांना ७ लाख रुपये दिले. दाऊदखानाकडून ते पैसे गोळा करून मराठे ती जागा सोडून निघून गेले.

**समशेरखान पठाण :** औरंगजेबाच्या सैन्यात समशेरखान नावाचा एक अधिकारी होता. हा जातीने पठाण असून मोठा शूर होता. औरंगजेबाचा बंडखोर मुलगा अकबर हा यावेळी इराणमध्ये वास्तव्य करून आहे. समशेरखानाचा पुतण्या हा अकबरला जाऊन मिळाला होता. एक दिवस औरंगजेबाने दरबारात समशेरखानाला पाहिले. त्याचा पुतण्या अकबरला मिळाला आहे, हे औरंगजेबाच्या लक्षात आले. "तू त्याला इराणमधून बोलावून घे आणि दरबारात हजर कर" अशी औरंगजेबाने समशेरखानाला आज्ञा केली. तो रांगडा गडी शिष्टाचार सोडून फटकळपणे बादशहाला म्हणाला "माझा पुतण्या माझे कधीच ऐकणार नाही. आपले पुत्र अकबर[4] आपल्याशी जसे वागले तसा माझा पुतण्या माझ्याशी वागतो" या उत्तराने औरंगजेबाला राग आला. दरबार बरखास्त झाल्यानंतर समशेरखान हा आपल्या तंबूकडे परतत असताना बादशहाचा हुकूम त्याला मिळाला. "तुम्ही आपली तलवार देऊन टाका" असा तो हुकूम होता. तलवार देऊन टाकणे म्हणजे आपला मृत्यूच हे ओळखून पठाण म्हणाला "माझ्या कमरेची तलवार आणि माझी अब्रू ही एकत्र आहेत. तलवार देण्यापेक्षा मी सरळ व लढत मरून जाईन".

मग आपल्या लहान पथकानिशी तो लढून मरण्यास सिद्ध झाला. त्याच्या या उद्‌गारांनी बादशहाचा राग अधिकच वाढला. त्याने (बादशहाने) आपल्या शरीर

१. दाऊदखान—पुढे प्रसिद्धीस आलेला नामांकित मोंगल सरदार दाऊदखान पन्नी; हा वंशाने पठाण होता. हे घराणे आदिलशाहीची नोकरी सोडून मोंगलांच्या पदरी लागले होते.

२. अदोनी—हे आंध्र राज्यातील गाव, मद्रासच्या वायव्येस २६१ मैलांवर आहे.

३. धर्मावरम्—हे अनंतपूर (आंध्र राज्य) जिल्ह्यात आहे. ते मद्रास शहराच्या वायव्येस २०० मैलांवर असून अदोनीच्या दक्षिणेस ८० ते ९० मैलांवर आहे.

४. राजपुत्र अकबर—राजपुत्र अकबर हा १ जिल्हा १११७ हि. मार्च ३१, १७०६ ला इराणमध्ये मशहद या गावी मरण पावला.

रक्षकांच्या पथकांतील निवडक १२ हजार सैनिक समशेरखानावर चालून जाण्यासाठी पाठविले. समशेरखानाचे डोके कापून घेऊन या. जो कोणी प्रतीकार करील त्याला ठार मारा, असा बादशहाचा आपल्या सैनिकांना हुकूम होता. ही फौज येत आहे असे दिसताच, आपले मित्र व नातेवाईक मिळून ५०० लोक बरोबर घेऊन तो पठाण चालून आला. ते लोक बादशहाच्या फौजेवर तुटून पडले. आघाडीच्या प्रमुख लोकांची त्यांनी कत्तल केली आणि फौजेत गोंधळ उडवून दिला. बादशहाचे सैन्य मागे हटले. पण त्यांनी पुनः पुनः हल्ले करून शेवटी त्या पठाणाला ठार मारले. बादशहाच्या सैन्यातील ७५२ माणसे मारली गेली. बादशाही सैन्याचा अधिकारी संतापला. कारण छावणीतील लोक त्याची टिंगल उडवू लागले. "थोड्याशा पठाणांच्या समोर तुला माघार घ्यावी लागली. या तुझ्या अवसानघातकीपणाबद्दल राजद्रोही म्हणून तुझा शिरच्छेद झाला पाहिजे." असे लोक बोलू लागले.

**औरंगजेब बादशहाची युरोपियनांशी वागणूक :** सुरत बंदरी काय घटना घडल्या, तेथील युरोपियनांची मोगलांनी घेतलेली मालमत्ता परत करण्याचा औरंगजेबाने आपल्या अधिकाऱ्यांना कसा हुकूम केला, हे वाचकांस या ग्रंथाच्या याच भागात (भाग ४ था) मागेच कळले आहे. शहाजहानच्या वेळी युरोपियनांना मिळालेल्या सवलती औरंगजेबाने मान्य केल्या होत्या. पण ती एक फसवणूक होती. त्या लोकांना अमाप पैसा मिळविण्यास वाव दिला गेला आणि काही थोडे महिने जाऊ दिल्यावर औरंगजेबाने बंदरातील सर्व युरोपियन, ख्रिस्ती लोक व अर्मिनियन व्यापारी या सर्वांना कैद करण्याचा हुकूम केला. त्यांच्याकडून १ कोटी ९० लक्ष रुपयांची मागणी केली. यापूर्वी चाच्यांनी लुबाडलेल्या मुसलमान व्यापाऱ्यांची नुकसानभरपाई म्हणून युरोपियनांच्याकडून पैसा घेतला होताच. शिवाय बंदरातून (सुरत) बाहेर जाणाऱ्या जहाजांच्या (मुसलमानांच्या) सुरक्षिततेसंबंधीच्या करारास मंजुरी देण्याचीही त्यांच्यावर सक्ती करण्यात आली. सध्या ते लोक कडक बंदीवासात असून त्यांचे खाण्यापिण्याचे हाल होत आहेत. चार कॅप्युचिन पाद्र्यांनाही कैद करण्यात आले होते. त्यांनी एक महिना कैद भोगल्यानंतर जरूर पडेल तेव्हा हजर होण्याच्या अटीवर त्यांना सोडण्यात आले. तेथील फ्रेंच कंपनीचा एक डायरेक्टर मॉ. द. पिलाव्हॉं,[1] त्यांच्यापैकीच एक कैदी जामीन राहिला.

बादशहाचा हा हुकूम निघाला त्या सुमारास इंग्लंडहून दोन युद्धनौका सुरत बंदरी आल्या.[2] त्यावरील लोकांनी काही वर्षे कैदेत असलेल्या इंग्लिश सेनापतीच्या

---

१. पिलाव्हॉं हा १६७४ पासून सुरत कौंसिलचा सभासद होता. १६८० त त्याचा निर्देश केला गेला आहे. कालकता भेट देऊन १७०० च्या शेवटी तो सुरतला परतला होता. (जे सॉटन्चे हिस्टरी. पा. ३८२, ३९३, ४०९, ४१३) पाचव्या भागात याचे नाव परत एकदा आलेले आहे.

२. चाच्यांचे पारिपत्य करण्याकरिता व व्यापाऱ्यांना (इंग्लिश) संरक्षण देण्याकरिता दोन युद्धनौका सेप्टर (कॅ. रिचर्ड्स) आणि स्कारबरो (कॅ. फौल्स) ईस्ट इंडिजकडे पाठविण्यात आल्या. (बॉम्बे

मुक्तीसाठी व मुसलमान अधिकाऱ्यांनी युरोपियनांच्याकडून घेतलेल्या पैशाची मागणी केली. या गोष्टींना नकार मिळाल्यास जे मिळेल त्यास आग लावून देण्यात येईल असेही या लोकांनी कळविले. परंतु मुसलमान अधिकाऱ्यांनी त्यांच्या मागण्यांच्याकडे लक्षच दिले नाही. उलट कैद्यांचा अधिक छळ करण्यास सुरुवात केली. आज तागायत त्यांची वर दिल्याप्रमाणेच स्थिती आहे.

या ठिकाणी एक गोष्ट मला (मनुचीला) नमूद केली पाहिजे. युरोपियन आणि मोगल साम्राज्य यांच्या संबंधाबद्दलची ती गोष्ट होय. मोगल या युरोपियनांच्याकडून त्यांच्यापाशी असले नसलेले घेतात. पण याशिवाय युरोपियनांचा अपमान आणि छळ करतात. या प्रकाराला आळा घालण्याचा एकच उपाय मला दिसतो तो म्हणजे असा :– तीन हजार युरोपियनांनी एकत्र यावे. त्यांनी सुरत लुटून फस्त करावे. येथील प्रत्येक मुसलमानाला तलवारीने ठार मारावे, एकही मुसलमान सोडू नये. सुरत सोडून जाताना त्यांनी सुरतेमध्ये जे काही जळण्यासारखे असेल ते जाळून टाकावे. युरोपियन असे वागले तर त्यांच्या मागण्या मान्य करणे मुसलमानांना भाग पडेल. हे लोक शस्त्रांच्या दडपणानेच वठणीला येऊन सरळ होतात आणि मनात नसले तरी नीट वागू लागतात. मुसलमानांची ही दुटप्पी वागणूक पाहता, बंगालच्या बंदरात सुद्धा युरोपियनांनी असेच वागावे असेच मी म्हणेन. असे झाले तर मुसलमानांना एक गोष्ट कळून येईल ती म्हणजे ही. हिंदू राजे आणि मांडलिक यांचा आपण छळ करतो, अपमान करतो आणि त्यांच्यावर दंडेली करतो. अशा प्रकारची वागणूक सहन करण्याची युरोपियनांना सवय नाही; ही गोष्ट मुसलमानांना पटू लागेल.

१७०४ सालच्या सप्टेंबर[1] महिन्यात सुरत बंदरात तीन जहाजे आली. ती मक्केहून आली होती. जहाजात अतिशय मौल्यवान माल होता. जहाजावर एक साधु

जनरल लेटर्स १६ जून १७०३ लेटर बुक नं. १२ पा. १६५) या प्रवासात रिचर्डस मरण पावला. त्याच्या जागी रॉबर्ट हार्लंड हा आला. २७ मे १७०४ ला ही जहाजे मुंबईला पोहचली. पुढे सुरतेस गेली व डिसेंबर १७०४ मध्ये परत मुंबईस आली. हार्लंड व मुंबईच्या गेडीचा प्रमुख सर जॉन गेयर यांचा पत्रव्यवहार झालेला आहे. (फॅक्टरी रेकॉर्डस् सुरत, खंड ७ वा) युरोपियनांना कैद केल्याचा निर्देश सुरतेहून पाठविलेल्या एका पत्रात आहे. हे पत्र २८ जुलै १७०४ चे आहे. या पत्रात कैद केलेल्यांचा बंदिवास चालू ठेवावा असा औरंगजेबाच्या हुकुमाचा उल्लेख आहे.

१. १३ सप्टेंबर १७०४ ला सुरतेहून आलेल्या पत्रात इब्राहीम चुकुल इक्क या बादशहाच्या कर्जातील एका मनुष्याला डांबून ठेवल्याचा निर्देश केलेला आहे. फोर्ट सेन्ट जॉर्ज रेकॉर्डस् प्रेसीलिस्टस् नं. ७ पा. २१९) या घटनेच्या पुढे आणखी उल्लेख आहेत. सुरतेस पुन्हा धडाका; युरोपियनांच्याकडून पुनः शांतता भंग. मच्छलीपट्टणहून आलेले पत्र, हब व सुरतेतील मूर यांनी मिळते जुळते घेतले. (नोंद १६६५ पा. २२३; ऑक्टोबर २३. १७०४; नोंद १६७० पा. २२४; नोंद १६८२, नो. १४; १७०४; नोंद १७१९ डि. ३, १७०४) हब व इंग्रज हे युद्धेकरिता जळल्याचा व जहाजातून निघून गेल्याचा पुरावा नाही. एक टीप मात्र आढळते. इब्राहीमांनी आपल्याला मिळालेल्या वागणुकीची भरपाई म्हणून १ लक्ष रुपये मागितल्याचा उल्लेख आहे आणि ती मागणी नाकारताच जहाजावर निघून गेले. (सुरतची सामान्य पत्रे २४ फे. १७०५ परिच्छेद ६, मुंबईहून आलेल्या पत्रांचे संक्षेपी वृत्त, खंड १ ला)

होता. औरंगजेब त्याला फार मानीत असे. हा साधु हिंदुस्थानातून मक्केच्या यात्रेला गेला होता. वर उल्लेखलेली जहाजे डचांनी पकडली. त्यात तो साधु व त्याचे सहकारी होते. डचांनी त्यांना नीट वागविले. पण त्यांनी सुरतेच्या सुभेदाराला निरोप केला की, डचांकडून घेतलेले पैसे परत केल्यास आम्ही ही जहाजे सोडून देऊ. नाहीतर आम्ही आमच्याकडून घेण्यात आलेली रक्कम जहाजांतून वसूल करू आणि इतरही उपाय योजू. मोगल सुभेदाराने औरंगजेबाकडे ही बातमी पाठविली.

सुरतेत काही इंग्रज आणि डच यांना त्यांच्या राहत्या घरामध्येच कैद करून ठेवण्यात आले होते. त्यांनी आपल्या पहारेकऱ्यांना मारले, कैदेत असलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांना सोडविले आणि नदीत असलेल्या नावांमधून निसटून ते आपल्या जहाजांवर निघून गेले. ही घटना घडल्यानंतर औरंगजेबाने गोवळकोंड्याच्या[1] सुभेदाराला हुकूम पाठविला की, तेथील डच वखारीचा प्रमुख व त्याचे सहकारी यांना पकडण्यात यावे. या हुकुमाची तावडतोब अम्मलबजावणी करण्यात आली. हे पाहून कोरोमंडल, त्रिजरली, बंगाल येथील युरोपियनांना आपल्या विरुद्ध लढा सुरू होईल असे वाटले आणि त्यांनी आपली तयारी सुरू केली. मोगल साम्राज्यात दूर दूर असलेल्या आपल्या नोकरांना त्यांनी तेथील वखारीवरून काढून घेतले.

**मद्रासजवळील सॅन थोम पोर्तुगीज वसाहत :** इ. स. १७०४ च्या सप्टेंबर महिन्यात मद्रासला लागून असलेल्या सॅन थोम या पोर्तुगीज वसाहतीवर सिल्व्हेस्ट्रो फ्रेड या नावाचा पोर्तुगीज अधिकारी म्हणून आला. या भागावर मोगलांचा मीर उस्मान नावाचा अधिकारी फौजदार म्हणून होता. शिष्टाचाराप्रमाणे मीर उस्मानकडे पोर्तुगीज अधिकाऱ्याने भेटीस जावयास हवे होते, ते त्याने केले नाही. इतकेच नव्हे तर आपण सॅन थोमचे मालक आहोत असा आव आणून फ्रेड हा लवाजम्यानिशी, नौबती, नगारे वाजवीत फिरत असे. यामुळे चिडून, एका मिरवणुकीतील ख्रिश्चन आणि मुसलमान यांच्या मारामारीची संधी साधून मीर उस्मानने त्या पोर्तुगीज अधिकाऱ्याला पकडण्याचा प्रयत्न केला. या झटापटीत एक पोर्तुगीज आणि काही मुसलमान मारले गेले. मोगल अधिकाऱ्याने पोर्तुगीजांच्या वसाहतीची नाकेबंदी केली. यामुळे अनेक पोर्तुगीज मद्रासकडे निघून गेले. पोर्तुगीजांनी कर्नाटक प्रांताचा नायब सुभेदार दाऊदखान याच्याकडे तक्रार केली. मीर उस्मानने पोर्तुगीजांना परत येण्याचे आवाहन केले. पण त्यांनी ऐकले नाही. शेवटी ठरीव मुदतीत तुम्ही आला नाहीत तर तुमची घरे आणि चर्च ही धुळीला मिळवू अशी त्याने धमकी

१. डच एजंटाने गोवळकोंड्याहून पाठविलेल्या ६ आणि ११ डिसेंबरच्या पत्रात या घटनेचा निर्देश नाही. बटाव्हियाहून कंपनीला आलेल्या डच पत्रातही उल्लेख नाही. मात्र फोर्ट सेंट जॉर्ज, प्रेस लिस्ट नं. ७, नों. १०, १७०४ मध्ये एक पत्र नमूद केलेले आहे. हे पत्र मच्छलीपट्टमहून पाठविलेले होते. त्यात "गोवळकोंड्याच्या डच वकिलाकडून मूर लोकांनी मागितलेला पैसा" असा निर्देश आहे.

दिली. यामुळे यावरून जाऊन पोर्तुगीज आपापल्या घरी गेले. अशा रीतीने हे प्रकरण मिटले. पोर्तुगीजांच्यामध्ये एकी मुळीच नाही. त्यामुळे आणि इतर कारणांनी पोर्तुगीजांनी हिंदुस्थानातील आपले इलाखे गमावले.

१८ वर्षांपूर्वी सेन थोमसमध्ये अँतोनियो परेरा दसिल्व्हा नावाचा एक पोर्तुगीज अधिकारी होता. गावातील मुसलमानांवर आपली सत्ता आहे ही भूमिका त्याने घेतली आणि सरकारचा कर भरण्याचे नाकारले. सुभेदाराने त्याला सांगून पाठविले "सरकारी कामात ढवळाढवळ करू नये. हा मोगलांचा मुलूख आहे. तुम्ही व्यापारी आहात आणि व्यापाऱ्याप्रमाणेच तुम्ही वागले पाहिजे. लोकांना दंड करणे, किंवा त्यांच्यावर सत्ता गाजवणे या गोष्टी तुम्हा करता कामा नये." दसिल्व्हाने प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. पण सुभेदाराच्या सैन्याबरोबरच्या झटापटीत तो मारला गेला आणि मोगलांनी पोर्तुगीज वसाहतीतून नेहमीप्रमाणे कर वसूल केले. या आणि इतर उदाहरणांवरून पोर्तुगीज किती गर्विष्ठपणे अविवेकीपणे वागत याची कल्पना येईल.

वाचकाने माझे चार खंड या पूर्वीच वाचले असतील. त्यावरून ज्या आशेने मी ते पाठविले त्याची त्याला जाणीव झाली असेल. त्याचे लक्ष माझ्या लेखनातील विविधता व विषमता या गोष्टींच्याकडे गेल्याशिवाय राहिले नसेल. माझे लेखन असे होण्याचे कारण वेळेचा प्रश्न असल्यामुळे जशा गोष्टी घडत गेल्या तशा त्यांनी नोंदविल्या आहेत. म्हणून वाचकाने माझे लेखन आहे त्या स्वरूपात स्वीकारून समाधान मानले पाहिजे. ईश्वराने जर मला अधिक आयुष्य दिले तर मी पुढे पाचवा खंडही काढीन. माझे वय आता अडुसष्ट[1] वर्षांचे आहे. माझे लेखन लोकांच्या पुढे येण्यापूर्वीच ते नष्ट होईल या भीतीने मी ते वेळोवेळी पाठवून देत आहे. शिवाय मला जाणीव आहे की, मृत्यु कोणाला पूर्व सूचना देत नाही. अथवा एखाद्याचे कार्य अपुरे राहिले असल्यास ते पूर्ण होईतोपर्यंत थांबत नाही; तर माणसाला त्याचे इच्छेविरुद्ध घेऊन निघून जातो. तेव्हा हेही माझ्या बाबतीत घडणार याची अटकळ करून व माझ्या अनुभवावरून कायदे पंडितांच्या लहरीवर न ठेवता मिळालेल्या संधीचा फायदा घेऊन माझी हस्तलिखिते पाठवित आहे. कारण कायदेपंडित मृत्युपत्र करणाऱ्याने लिहून ठेवलेल्या इच्छेस जुमानीत नाहीत व मृत्युपत्र करणाऱ्याच्या इच्छेप्रमाणे त्याची विल्हेवाट लावत नाहीत. पुढे आपण बादशहा औरंगजेब याच्या चरित्राचा व त्याच्या कारकीर्दीचा विचार करू. त्याचे वय आता एकोणनव्वद (८९) वर्षांचे झालेले आहे. त्याच्याबद्दलची माहिती मी सादर करीनच.

५ जानेवारी १७०५.

मद्रास पट्टम. (स्वाक्षरी) निकोलाय मनुची.

(येथे हस्तलिखित अपुरे आहे. सुरुवातीचे वाक्यही अपुरे आहे. पुढील तुटक तुटक भाग ५ व्या भागाकरिता असावा. अपूर्ण वाक्य—माझ्या हजेरीत).

१. इ. स. १७०५ मध्ये लिहिलेल्या या परिच्छेदावरून लेखकाचा (मनुचीचा) जन्म १६३७ (सोळाशे सदतीस) मध्ये झाला असावा असे दिसते. यावरून तो जेव्हा हिंदुस्तानात आला (१६५६) त्यावेळी तो १८ वर्षांचा असावा.

**औरंगजेबाची मराठ्यांच्या विरुद्धची मोहीम चालू :** मराठ्यांच्या विरुद्ध मोहीम पुढे सुरू ठेवण्याबाचून गत्यंतर नाही असे औरंगजेब बादशहास वाटले आणि दुसऱ्यांचे देश शस्त्राने अगर विश्वासघाताने जिंकून घ्यावेत अशी त्याची प्रथमपासूनच महत्त्वाकांक्षा होती आणि आहे. त्याच्या या महत्वाकांक्षेपायी दरवर्षी त्याच्या सैन्यातील १ लाख माणसे मरण पावत आली आहेत. मेलेल्या घोडे, बैल उंट, हत्ती इत्यादी जनावरांची संख्या तीन लाख होईल. हे साम्राज्य मोठे आहे. गरजेच्या वस्तूंचा येथे फार मोठ्या प्रमाणावर पुरवठा होत असे. पण आज मात्र मोठ मोठे सरदार आणि अमीर उमराव यांना आवश्यक वस्तू शिवायच आपले काम भागवावे लागत आहे. त्यांची कुटुंबे विपन्नावस्थेत आहेत. या लोकांच्या बायकापोरांची स्थिती इतकी शोचनीय झाली आहे की त्यांना आता गल्लात भीक मागण्याची वेळ आली आहे. चांगल्या चांगल्या सेनाधिकाऱ्यांच्या बायकांना त्यांच्या विपन्नावस्थेमुळे घरातून बाहेर पडताना अंग झाकून घेण्यास पांढऱ्या चादरीशिवाय काही राहिले नाही.

दख्खनमध्ये (दक्षिणेत) १७०२ ते १७०४ या काळात पाऊस मुळीच पडला नाही. उलट रोगराई फार मोठ्या प्रमाणात पसरली. या दोन वर्षांत २० लाखांच्या वर लोक मृत्युमुखी पडले. भुकेने व्याकूळ झालेले बाप आपली मुले पावली ($\frac{1}{4}$ रुपया) ते अधेली ($\frac{1}{2}$ रुपया) पर्यंतच्या किंमतीला विकण्यास तयार झाले. पण कोणीच ती विकत घेण्यास तयार नसल्यामुळे त्यांची उपासमार थांबली नाही. त्यांना अन्नाशिवाय राहणे भाग पडत होते.

या मोहिमेसाठी औरंगजेब दक्षिणेत उतरला याला आता २५ वर्षे झाली. या काळात औरंगजेबाला अवाढव्य खर्च करावा लागला. असंख्य लोक मरण पावले. या काळातील झालेला अवाढव्य खर्च आणि असंख्य लोकांचे मृत्यू, या विलक्षण प्रकाराचे सूज्ञ वाचकाने मनन करावे. परंतु वरील घटनांच्यामुळे आपल्यावर परिणाम झाला आहे असे औरंगजेबाने कधीच दाखविले नाही. त्याच्यावर आणि त्याच्या सैन्यावर अनेक वेळा संकटे आली. फार मोठ्या प्रमाणावर त्याच्या मोहिमांत त्याला व त्याच्या सैन्याला विलक्षण कष्ट पडले. अशा वेळी औरंगजेब शांतपणे आपल्या अधिकाऱ्यांना म्हणे "माझे थोर पूर्वज तैमूरलंग यांच्यावरही अशाच प्रकारच्या आपत्ती कोसळल्या होत्या. पण म्हणूनच एक मोठा विजेता म्हणून त्यांची कीर्ती दिगंत पसरली."

या बादशहाने (औरंगजेब) मराठ्यांचे कोकणपट्टीतील बरेच किल्ले घेतले. गोव्यापासून चौलपर्यंत समुद्रापासून थोड्या अंतरावर ऊंच डोंगराची रांग पसरली आहे. हे किल्ले त्या डोंगरात वसले होते. पण हे किल्ले घेणे औरंगजेबाला सहजपणे जमले नाही. किल्ले घेण्यात औरंगजेबाची माणसे आणि जनावरे यांत विलक्षण हानी झाली. खर्चही अवाढव्य झाला. छावण्यांमध्ये धान्य नसल्यामुळे महर्गताही कमालीची

झाली. धान्याची टंचाई किती भयंकर होती याची कल्पना पुढील उदाहरणावरून येईल. कधी कधी असे घडे की, छावणीतील अधिकाऱ्यांना स्वतः भटाऱ्याकडे थोडेसे पीठ घेऊन जावे लागे आणि त्याच्याकडून चपात्या करून घेण्यासाठी त्याला दोन दोन रुपये द्यावे लागत. हे झाले अधिकाऱ्यांचे. त्यांना चिकटून राहिलेल्या नोकरांना झाडपाला आणि कंदमुळे खाऊन राहावे लागे. औरंगजेबाची परिस्थिती अत्यंत बिकट झाली. त्याला माघार घेणे भाग पडले. त्याने अहमदनगर किल्ल्याचा आश्रय घेऊन अहमदनगरजवळ छावणी केली.

औरंगजेबाची अहमदनगरकडे माघार चालू असताना त्याची मुलगी आणि अंतःपुरातील इतर स्त्रिया यांनी त्याच्यापाशी पुढीलप्रमाणे अर्ज केला. "दिल्ली सोडून आपल्याला तीस वर्षे झाली आहेत. या काळात आम्हाला सतत फिरावे लागत आहे. आम्हाला अनेक कष्ट पडले आहेत. आता आम्ही म्हाताऱ्या झाल्या आहोत. आता आम्हाला आमच्याच्या किल्ल्यास परतण्याची कृपा करून परवानगी द्यावी. यामुळे आपल्या (औरंगजेबाच्या) मृत्युनंतर आमच्या नशिबी येणारी कैद आणि विटंबना ही टळतील." यावर औरंगजेबाने पुढील उत्तर दिले, "माझ्या मृत्युच्या दोन वर्षांपूर्वी तुमच्या सुरक्षिततेसंबंधी सर्व काही करण्यात येईल अशी व्यवस्था मी करून ठेवली आहे."

मागे सांगितल्याप्रमाणे दाऊदखानाने मराठ्यांशी (द्रव्य देऊन) तडजोड केली. तो स्वतः मागे वळून हैदराबाद-कर्नाटक प्रांताचे मुख्य ठिकाण अर्काट येथे जाऊन राहिला. मराठे, विजापूर-कर्नाटकातील अधोनी आणि सीरा या भागात पसरले. या बाबतीत गप्प बसण्याशिवाय दाऊदखानाला गत्यंतर नव्हते. औरंगजेबाने दाऊदखानाची कर्नाटकचा मुख्य अधिकारी म्हणून नेमणूक केली, आणि अनेक पत्रे लिहून मराठ्यांना त्या भागातून हुसकावून लावण्याची आज्ञा केली. याशिवाय औरंगजेबाने त्याला हैद्राबाद-कर्नाटकचा सुभेदार म्हणून नेमले आणि त्या प्रांतातूनही मराठ्यांना काढून लावण्यास फर्माविले. मराठ्यांनी बडानगर (भागानगर ?) ला ३० हजार स्वारांनिशी वेढा दिला होता.

बादशहाच्या या हुकुमावर दाऊदखानाने पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले, "मराठ्यांची सैन्ये मोठी आहेत. माझ्या हाताखाली असलेले सैन्य त्यांच्याशी लढण्यास अगदीच अपुरे आहे. माझ्या जागी आपण इतर कोणीतरी अधिकाऱ्याची नेमणूक करावी. नाहीतर मराठे सगळा कर्नाटक प्रांत आपल्या ताब्यात घेतील, ही गोष्ट टळणारी नाही." दाऊदखानाने वरील उत्तर पाठविले त्याच वेळी त्याने औरंगजेबाच्या छावणीत असलेल्या आपल्या वकीलाला पुढीलप्रमाणे लिहिले, "बादशहाकडून आपण माझ्यासाठी (मोहिमेचा खर्च म्हणून) आगाऊ दहा लाख रुपये हर प्रयत्नाने मिळवावे." याबद्दलची हकिकत पुढे येईल.

मराठ्यांच्यामुळे मोगलांच्या साम्राज्याचा होत असलेला नाश हा सारखा वाढत आहे. पण बादशहाला त्याची पर्वा वाटत नाही. आता तो म्हैसूरच्या हिंदुराजाशी पुनः लढाई करण्याचा बेत आखीत आहे. राजाचा मोठा खजिना हस्तगत करण्याची त्याची (औरंगजेबाची) इच्छा होती. हे राज्य मलबार प्रदेशाजवळ आहे. त्यात दाट अरण्ये आहेत. राज्याचा विस्तार मोठा असून त्यात शंभराच्यावर किल्ले आहेत. राजाजवळ एक लाख बंदुकची आणि सहा हजारांचे घोडदळ ही आहेत. सर्व खर्च वजा जाता, राज्याचे महसूल उत्पन्न साडेतीन कोटीचे आहे.

सध्या गादीवर असलेला राजा हा माजी राजाचा पुतण्या आहे. तो बहिरा आहे. तो कायदेशीर वारस नाही ही सबब सांगून बादशहा त्याच्या राज्यावर स्वारी करून तो ताब्यात घेण्याचा बेत करीत आहे. यासाठी त्याने तंजावर, त्रिचनापल्ली, आणि शेजारचे इतर मांडलिक यांना म्हैसूरवर स्वारीसाठी तयार राहण्याचे हुकूम पाठविले आहेत. ही गोष्ट नाकारणारांना कडक शासन केले जाईल असेही त्यांना कळविले आहे.

गोवळकोंड्याच्या अबदुल्ला कुतुबशाहाने (१६११–७२) म्हैसूरच्या राजाचा अत्यंत समृद्ध खजिना व प्रदेश मिळविण्याच्या इराद्याने त्याच्या राज्यावर अनेक स्वाऱ्या केल्या. परंतु त्याला त्यात यश आले नाही. कारण त्या राजाने मोठ्या शौर्याने प्रतिकार करून आपले रक्षण केले.

मोगल साम्राज्यात अनेक खाणी आहेत हे पूर्वी सांगितले आहे. एकदा एका खाणीतून एक मोठा हिरा निघाला. त्याचे वजन २८ औंस होते. बादशहाला हे कळल्यावर त्याने तो हिरा आपल्याकडे पाठविण्यात यावा अशी आज्ञा केली. आज्ञे-प्रमाणे तो हिरा बादशहाकडे पाठविला जात असताना मराठ्यांनी हल्ला करून तो पळविला. तो हिरा बादशहाच्या हाती काही पडला नाही.

**वृद्ध औरंगजेब बादशहाची दुर्दशा, तरी पण बुद्धिचा तल्लखपणा कायम :** औरंगजेब बादशहा आता किती तरी वृद्ध झाला आहे. पण या युद्धाबद्दल आपल्याला खुमखुमी आहे हे दाखविण्याची त्याला मोठी हौस आहे. सैन्य कूच करीत असताना तो आपल्या शत्रूंना मधून मधून हातवारे करीत असतो. हे सगळे तो पालखीत बसला असताना होते हे लक्षात ठेवले पाहिजे. पालखीत बसल्या बसल्या तो म्याना-तून तलवार बाहेर काढतो आणि एकदा इकडे व एकदा तिकडे अशी तलवार फिरवतो. नंतर प्रसन्न मुद्रेने हास्य करीत तो कपड्याने तलवारीचे पाते स्वच्छ करतो; आणि ती म्यानात ठेऊन देतो. आपल्या धनुष्याशी सुद्धा तो असाच चाळा करतो. अजूनही आपण बाण मारू शकतो हे लोकांना दिसावे अशी औरंगजेबाची इच्छा असते.

असे असले तरी बहुतेक वेळ तो मान खाली घालून बसलेला असतो. त्याची मान इतकी वाकलेली असते की त्याची दाढी त्याच्या छातीवर पसरलेली असते. त्याच्याकडे पाहिले तर कोणाला असे वाटावे की त्याची दाढी त्याच्या मानेतून बाहेर पडली आहे. त्याचे अधिकारी त्याच्याकडे अर्जी देतात किंवा एखाद्या घटनेचा वृत्तांत सादर करतात अशा वेळी तो हळूहळू आपले डोके वर उचलतो आणि ताठ बसतो. अधिकाऱ्यांच्या अर्जांना अथवा अहवालांना अशी काही उत्तरे देतो की त्यावर पुन्हा काही बोलण्यास जागा राहत नाही. औरंगजेब इतका म्हातारा झाला असला तरी आपल्या सैन्यासंबंधीच्या बारीक सारीक गोष्टीकडेही तो लक्ष पुरवितो.

ही झाली खुद्द बादशहाच्या छावणीतील गोष्ट. छावणीपासून दूर अंतरावर जे लष्करी आणि मुलकी अधिकारी आहेत, ते औरंगजेबाच्या हुकुमाकडे फारच थोडे लक्ष देतात. ते हजार सबबी सांगतात, काही तरी निमित्ते काढतात. दरबारात असलेल्या अधिकाऱ्यांना भक्कम पैसे चारतात; आणि अडचणींच्या सबबी सांगून मनाला येईल तसे करतात. औरंगजेबाने आपण मोठे साधुपुरुष असल्याचे खोटे ढोंग करणे सोडून द्यावे आणि त्याचे हुकूम न पाळणाऱ्या काही अधिकाऱ्यांचा शिरच्छेद करावा. म्हणजे साम्राज्यात इतकी अंदाधुंदी माजणार नाही, आणि त्याच्या आज्ञा कसोशीने पाळल्या जातील. पण अधिकाऱ्यांना औरंगजेबाच्या वरील प्रकारच्या वागणुकीची माहिती आहे. त्याचा उपयोग करून घेऊन हे अधिकारी त्याचे हुकूम धाब्यावर बसवतात. याचे उदाहरण म्हणून बंगालमधील एका घटनेची हकिकत देतो.

औरंगजेबाचे दूर प्रांतातील अधिकारी त्याचे हुकूम धाब्यावर बसवितात : शहाजहानच्या काळी, बंगालमधील एका विभागाचा महसूल १७ लाख रुपये येत असे. औरंगजेबाच्या निदर्शनास असे आले की, आपल्या कारकिर्दीत तो (महसूल) ५ लाखांवर घसरला आहे. "उत्पन्न इतके घटण्याचे कारण काय?" असे त्याने आपल्या मुख्य वजीराला विचारले. मुख्य वजीर दांभिकपणे म्हणतो काय, "शहाजहानची कारकीर्द जुलमी होती. लोकांचा छळ होत असे. पण आपली कारकीर्द म्हणजे एक दयाळू आणि साधुवृत्तीच्या माणसाची होय. लोक शांततेने आणि सुखाने राहतात, हे आपल्याच कारकीर्दीत घडते." या शब्दांनी औरंगजेबाचे समाधान झाले. औरंगजेब बादशहाला बनविण्यासाठी अधिकारी अशी युक्ती योजतात, आणि आपल्याला हवे ते करतात. औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या सुरुवातीस असलेले बहुतेक अधिकारी मरण पावले आहेत. त्यांच्या जागी नेमलेले अधिकारी अननुभवी आहेत. त्यांना पगारही कमी मिळतो. त्यामुळे त्यांच्यात असंतोषही पसरलेला आहे. हिंदु राजेही त्याला अपवाद नाहीत. एक हिंदु राजा तर महम्मद अमीनखान[1] याच्या आश्रयावर

१. महम्मद अमीनखान बीन, हा पहिल्या निझाम उल्मुल्कचा चुलत भाऊ होता. तो पुढे १७२१ मध्ये महम्मदशाहा बादशहाच्या कारकीर्दीत मुख्य वजीर झाला आणि त्याच वर्षी मरण पावला.

चिडला आणि दोन हजार स्वारांनिशी शत्रुला (मराठ्यांना) जाऊन मिळाला. इतकेच नव्हे तर त्यांनी मोगल सैन्य कुच करीत असताना सैन्याचे बाजारबुणगे लुटून नेले.

**सगर येथील बेडरांशी युद्ध :** औरंगजेब बादशहा एका नव्या मोहिमेची तयारी करीत होता हे मी (मनुची) पूर्वीच सांगितले आहे. रमजानचा महिना असल्यामुळे त्याने कुच केले नाही. रमजान असूनही मोहिमेसाठी आवश्यक ती तयारी करण्यास तो विसरला नाही. बादशाही सैन्याला मिळावे म्हणून त्याने ठिकठिकाणच्या अधिकाऱ्यांना आणि मांडलिकांना पत्रे लिहिली. राजांना लिहिलेल्या पत्रांत त्याच्या नेहमीच्या सवयीप्रमाणे आश्वासने दिलेली असत हे सांगणे नकोच. विजापूर प्रांतात सगर[1] येथे (बेडरांचा) एक राजा होता. त्याला आश्वासनांची गोडगोड पत्रे पाठवून बादशहाने आपल्याकडे बोलावून घेतले.[2] राजाला ४ हजारी मनसबदार करण्यात आले. हत्ती, घोडे आणि खिलतीचे पोशाख ही त्याला देण्यात आले. बादशहाच्या छावणीतून तो आपल्या देशाकडे परत जात असताना पाच सहा दिवसांतच तो आजारी पडला आणि वाटेत मरण पावला.[3] औरंगजेबाने पीडनाईकाचे[4] (बेडरांच्या राजाचे) राज्य खालसा केले. पीड नाईकाच्या वारसांनी आणि बेडर जमातींनी सगर जवळ असलेले वाकिनखेडा[5] हे आपले मुख्य ठाणे केले. बेडर जमात ही अत्यंत प्रबळ आहे. त्यांच्यापाशी ८० हजार बंदुकची होते; या शिवाय भालाईत आणि तलवार वाळगणारे वेगळेच. पूर्वी औरंगजेबाने बेडरांच्या मुख्याला शरण आणण्याचे प्रयत्न केले.

बादशहाने बेडरांच्यावर रणमस्तखान यास पाठविले. पण या स्वारीत तो आणि त्याचे सैनिक मारले गेले. दुसऱ्या खेपेस दिलेरखानाला[6] बेडरांच्यावर स्वारी करण्याचा हुकूम देण्यात आला. पण त्यालाही मनुष्यहानी सोसून माघार घ्यावी लागली. अशा आघातांनी औरंगजेब डगमगणारा नव्हता. त्याने महुल्लाखान[7] याला बेडरांच्यावर

१. सगर—हे गाव सोलापूर शहराच्या आग्नेयेस ९५ मैलांवर आहे. पूर्वी हे गाव बेडरांची राजधानी होते. बेडरांच्याकडून जिंकून घेतल्यावर त्या गावाचे नाव नसरताबाद असे ठेवण्यात आले.

२. बेडरांच्या राजाचे नाव पीड नाईक असे होते.

३. "मासीरे आलमगिरीतील" नोंदीप्रमाणे पीड नाईक हा ५ फेब्रुवारी १६८८ रोजी बादशहापाशी हजर झाला आणि ५–६ दिवसांनी मरण पावला.

४. भीमसेन सक्सेना हा आपल्या तारीखे-दिलकुषा या ग्रंथात त्याचा उल्लेख पाम नाईक असा करतो. पीड नाईक हा पाम नाईकचा मुलगा होय.

५. बेडरांच्या मुख्याचे नाव, मनूचि वाकिनखेडा म्हणतो. पण वाकिनखेडा हे बेडरांच्या राजधानीचे नाव होते. मोगलांनी सगर घेतल्यानंतर बेडरांनी आपले ठाणे जवळ असलेल्या वाकिनखेड्याला हलविले.

६. या स्वारीसंबंधी मनूचीने गल्लत केली आहे. दिलेरखानाची स्वारी १६७९–८० तील होय.

७. महुल्लाखानाची स्वारी १६९१ ची होय. या महुल्लाखानाच्या स्वारीतच रणमस्तखान ऊर्फ बहादूर हा बेडरांशी लढत असताना मारला गेला. महुल्लाखान मोहिमेवरून परत गेला डिसेंबर १६९१ ला.

पाठविले, पण सहुल्लाखानाला शत्रूच्या मुलखात पाऊल टाकण्यास भीती वाटू लागली. त्याने बादशहाला मुत्सद्देगिरीची पत्रे लिहून स्वतःला या मोहिमेवरून परत बोलावून घेण्याची योजना केली. छावणीत परतल्यानंतर थोड्याच दिवसांनी तो मरण पावला[१].

**वाकिन खेडे :** या पटकेस औरंगजेबाचा हेतू वाकिनखेडा जिंकून घेण्याचा आहे. त्यानंतर तो म्हैसूरवर हल्ला करेल. वाकिनखेड्याच्या भागात मराठ्यांच्या घोडदळाला आश्रय मिळतो तो त्यांना मिळू नये असा औरंगजेबाचा बेत आहे. काय घडणार आहे ते काळच दाखविल. जर हा वृद्ध बादशहा आणखी काही वर्षे जगेल तर कर्नाटकातील वरील राज्ये घेण्यात त्याला यश मिळेल. आपले सेनापती मनःपूर्वक लढत नाहीत याची औरंगजेबाला जाणीव आहे. बादशहाला आपले बेत पार पाडण्याची इच्छा होते. पण त्यासाठी त्याला प्रत्येक मोहिमेवर जातीने हजर राहणे भाग पडत आहे.

**वृद्ध बादशहाचे उपासतापास चालू :** आपण किती धर्मनिष्ठ आहोत, आणि धार्मिक आचरण किती कडकपणे पाळत असतो हे औरंगजेबाचे दाखविण्याचे काम चालू आहे. उपासाच्या दिवसात तो २४ तास प्रार्थनाच करीत असतो. अशावेळी तो काही खातपीत नाही आणि शरीराची अगदी हालचाल करीत नाही. त्याचे डोके नेहमी जमिनीवर टेकलेले असते. एकदा त्याचे हे सगळे सोंग पाहून त्याची बायको उदेपुरी बेगम हिने त्याला उठविले. ती त्याला म्हणाली "आपण प्रार्थना करू लागल्याला किती तरी तास होऊन गेले. आपण काही तरी खाल्ले पाहिजे." औरंगजेबाने आपले डोके वर केले, "मी प्रार्थनेचा आणि ध्यानाचा आनंद लुटीत होतो. मला त्यातून बाहेर का काढले" असे म्हणून त्याने उदेपुरी बेगमची कडक हजेरी घेतली. आपण दिव्यानंदाचा अनुभव घेत आहोत, ऐहिक उपभोग आता आपल्याला तुच्छ वाटू लागले आहेत, असे त्याला सुचवावयाचे होते.

**बादशहाच्या छावणीची अवस्था :** अशाच प्रकारचे कडक प्रार्थना, उपासतापास, तो वेळोवेळी करीत असतो. हा महात्मा आणि साधु आहे अशी भावना सामान्य आणि अज्ञ अशा जनतेत पसरत चालली आहे. पण त्याची छावणी पाहा. ती अत्यंत घाणेरडी आणि गलिच्छ जागा आहे. छावणीतील रोज मरण पावणाऱ्या माणसांची आणि जनावरांची संख्या जर पाहिली तर ती छावणी नसून हा परमेश्वराचा प्रकोपच आहे असे वाटते. छावणीतील सामान्य माणसे मरण पावली की, मेलेल्या जनावराप्रमाणे त्यांच्या देहाची ओढाताण करण्यात येते. मेलेल्या माणसाजवळ काही पैसे आहेत काय हे प्रथम पाहण्यात येते. त्यानंतर प्रेताचे पाय दोरीने बांधले जातात, आणि छावणीतून ते ओढत नेऊन बाहेर सापडेल त्या खोल खड्ड्यात फेकून देतात.

१. रणमस्तखान मरण पावला, जुलै १६९२.

जनावरांच्या बाबतीत ही हाच प्रकार होय. माणसे काय, जनावरे काय, मेल्यानंतर दोघेही लांडगे, कोल्हे, कुत्री आणि कावळे यांचे भक्ष्य बनतात.

यामुळे फार दुर्गंधी सुटते आणि ही घाण काढून टाकण्याचा काहीच प्रयत्न केला जात नाही. अनेक वेळा ही दुर्गंधी सहन न झाल्यामुळे माझ्या घोड्याला टाच देऊन येथून त्याला भरधाव पळवावे लागले आहे. मानवी सहनशक्तीच्या बाहेरचे झाल्यामुळे काही वेळा मला वांती होत असे. छावणीत इतक्या माशा घोंघावत असतात की शांतपणे आपले अन्न खाणे अशक्य बनते.

या छावणीतून बाहेर जाणाऱ्या प्रवाश्यांचे, मराठ्यांच्या व इतर दरोडेखोरांच्या हल्ल्यापासून रक्षण करण्याची काहीच व्यवस्था केली जात नाही. यातून जर तो सुटला तर नाक्यात अधिकाऱ्यांच्या हातात तो सापडतो. ते त्याला मन मानेल तसे लुबाडतात. प्रवाशाजवळ फार पैसा आहे असे त्यांना कळल्यास ते त्याला लुटतात आणि त्याला ठार मारून पुरून टाकतात.

संत गणलेल्या बादशहाच्या धर्मशील राजवटीची आज अशी ही अवस्था झाली आहे. या साम्राज्यावर हक्क सांगणारे वयात आलेले असे १७ राजपुत्र आहेत. प्रथम येतात बादशहाचे मुलगे. हे आता वृद्ध झाले आहेत. त्याचे नातू आता ४५–४६ वर्षांचे झालेले असून त्यांच्या दाढ्याही पांढऱ्या झालेल्या आहेत. त्यांतील काही यापेक्षा कमी वयाचे आहेत. बादशहाचे काही पणतू २४–२५ वर्षे वयाचे आहेत. मी, त्याचे खापरपणतू आणि राजघराण्यातील स्त्रियांच्या विषयी काहीच बोलत नाही. हा म्हातारा बादशहा मरण पावल्यानंतर भयंकर शोककारी घटना घडून येतील. वरील पुत्रांपैकी फक्त एकच तख्तावर येणार. बाकीच्यांचा एक तर शिरच्छेद करण्यात येईल अथवा निरनिराळ्या प्रकारे त्यांना ठार मारण्यात येईल. शहाजहान बादशहाच्या राजवटीच्या शेवटी जो प्रकार घडला त्याहूनही भयंकर शोचनीय अशा घटना घडतील.

**हिंदूंवरील कराची वसुली** : या साम्राज्यात राहणाऱ्या हिंदु व्यापाऱ्यांना एक वैयक्तिक कर प्रतिवर्षी सुरुवातीसच द्यावा लागतो हे मी मागेच सांगितले आहे. हा कर भरल्याबद्दल त्यांना एक पावती दिली जाते. ही पावती त्यांना प्रवासाच्या परवान्यासारखी उपयोगी पडते. पण जर ते दुसऱ्या प्रांतात अथवा राज्यात गेले तर हा परवाना चालत नाही. त्यांना परतीच्या प्रवासाच्या वेळी परत कर द्यावा लागतो. अशा रीतीने व्यापाऱ्यांच्यावर फार बोजा पडतो. त्यामुळे त्यांच्यापैकी अनेक व्यापारी आणि सराफ यांची दिवाळी निघाली. त्यांच्यावर येणाऱ्या या आपत्तीचा बादशहाला आनंद वाटतो. कारण त्याची अशी समजूत आहे की अशा जुलमामुळे हिंदु लोकांना मुसलमानी धर्म स्वीकारणे भाग पडेल.

**दाऊदखान व मनुची यांची मद्रासेत भेट :** दाऊदखानाने[1] जिंजीच्या किल्ला घेतल्यानंतर तो १७६० च्या नोव्हेंबर महिन्यात सॅन थोमला आला. शहरात प्रवेश करण्यापूर्वी तो माझ्या ( मनुचीं ) घरी एक दिवस आणि एक रात्र राहिला. दुसऱ्या दिवशी तो सॅन थोम या गावात आला. मी त्याला भेटण्यास गेलो. मद्रासचा गव्हर्नर थॉमस पिट याने माझ्याबरोबर आपले अधिकारी दिले.[2] दाऊदखानाने आम्हा सर्वांचे फार उत्तम स्वागत केले. निरोप घेते वेळी त्याने आम्हाला भेटी दिल्या. दुसऱ्या दिवशी त्याने इंग्रजांच्या मेजवानीचा स्वीकार केला. इंग्रजांनी त्याला भेटी दिल्या. भेटीमध्ये कापड, चांदीची तबके, पानाचे डबे, दौती, थाळ्या, गुलाबदाण्या, पेट्या, सुबक चौकटीचे आरसे, दारूच्या बाटल्यांच्या पेट्या, इराणी दारू, गुलाबपाणी, सुकामेवा इत्यादी वस्तूंचा समावेश होता. भेटींची किंमत ७ हजार रुपये होती. दाऊदखानाला मोठा आनंद झाला. सॅन थोममध्ये तो ६ दिवस होता. मी रोज त्याच्या भेटीस जात असे.

दाऊदखानाला कटिभाग आणि मांडी यांच्या शिरांच्या दुखण्याचा ( Sciatica ) आजार होता. त्याच्या विनंतीवरून मद्रासच्या गव्हर्नराने त्याच्या औषधोपचारासाठी डॉक्टर पाठविला. दाऊदखान आजारी असताना लॉर्ड बिशप त्याला भेटण्यास गेला. दाऊदखानाने पण त्याची परत भेट घेतली. या भेटीच्या वेळी दाऊदखानाने बरेच मदिरापान केले. तो सॅन थोमहून निघण्यापूर्वी मी त्याला भेटण्यास गेलो. आमचे बराच वेळ संभाषण झाले. मी त्याला दारू आणि अर्क ही पुरविली होती. त्याबद्दल त्याने समाधान व्यक्त केले. त्याने मला मूल्यवान वस्त्रे आणि मुलांना देण्यासाठी २५० रुपये दिले. "आपली मैत्री अशीच राहू द्या. मी तुम्हाला कधीच विसरणार नाही." असे दाऊदखान मला म्हणाला. आमचे बोलणे चालू असताना दाऊदखानाला झुल्फिकारखानाचे पत्र आले. त्यात झुल्फिकारखानाने मला ७०० रुपये देण्यात यावेत असे लिहिले होते. झुल्फिकारखानाच्या बायकोला डोळ्याचा विकार होता. त्याने मला अनेकदा पत्रे लिहून माझ्याकडून औषधे मागविली होती. त्याच्या बायकोचा विकार बरा झाला. याची फेड म्हणून त्याने मला ७०० रुपये द्यावे म्हणून लिहिले होते.

दाऊदखानाने निघताना आपल्या बरोबर गव्हर्नराने पाठविलेला डॉक्टरही घेतला. तो त्याच्यापाशी एक महिनाभर होता. डॉक्टरला रोज १३ रुपये आणि २० माणसांचे

१. दाऊदखान पन्नी : मोगल सेनापति झुल्फिकारखान याच्या हाताखालचा दुय्यम अधिकारी आणि कर्नाटकचा नायब सुभेदार.

२. याची हकिकत या ग्रंथाच्या ५ व्या भागात येईल.

अन्न पाठवित असे. डॉक्टरने दाऊदखानाचा निरोप घेऊन त्याची छावणी सोडली तेव्हा दाऊदखानाने त्याला १५० सोन्याची नाणी दिली.

# औरंगजेबाचा मृत्यु इ. स. १७०७

### औरंगजेबाच्या राजवटीचा शेवट

### राजपुत्र शाहा आलमला दिल्लीची गादी मिळते.

परमेश्वराने आपल्या कृपेने आतापर्यंत मला सुरक्षित ठेवले आहे. मागे आश्वासन दिल्याप्रमाणे विद्यमान बादशाहा औरंगजेब याच्या राजवटीवरील माझ्या ग्रंथाचा पाचवा भाग पूर्ण करण्याचा आता माझा बेत आहे.

मी मागेच सांगितले आहे की, रमझानचा महिना संपल्यावर बादशाहा मोहिम करावी म्हणून तयारी करीत होता. या वर्षीचा रमजान महिना जानेवारीत आला होता.[1] वाकिनखेडा ताब्यात घेण्यासाठी आपले मुत्सद्दिगिरीचे डावपेच कामी येत नाहीत हे औरंगजेबाला कळून चुकले होते त्याने वाकिनखेड्याच्या किल्ल्यावर हल्ला चढविण्याचा हुकुम केला. औरंगजेबाने केलेल्या या हल्ल्यात त्याचे १२ अधिकारी आणि ७ हजार सैनिक मरण पावले. अनेक अधिकारी जखमी झाले. पण त्यामुळे औरंगजेब निराश झाला नाही. त्याने किल्ल्याचा वेढा अधिक कडक केला. पाच महिन्यांच्या वेढ्यानंतर वाकिनखेड्याचा किल्ला त्याच्या ताब्यात आला. किल्ला हातचा गेल्यावर बेडरांचा नेता हा मराठ्यांना जाऊन मिळाला आणि नेहमीप्रमाणे धामधूम करू लागला. अद्यापपर्यंत परिस्थिती अशीच आहे.

औरंगजेबाच्या पुढील मोहिमांचा मजकूर माझ्या हाती येईपर्यंत चौकस वाचकांच्या करमणुकीसाठी पुढील काही घटना देत आहे.—

**चिन किलीचखान ( निजाम उलमुक )** : बादशहाचा एक नवीन सेनापती उदयाला आलेला आहे. त्याचे नाव चिन किलीचखान हे होय. तो चघताई तातार वंशाचा असून त्याच्या हाताखाली ७५ हजार घोडदलाचे सैन्य आहे. तो बादशहाचा फार आवडता आहे. तो त्याच्या जातीचा आहे. त्याला मानाचा हुद्दा देण्यात आला आहे.

---

१. त्या साली रमजान महिना (१११६ हि.) २१ डिसेंबर १७०४ ते २७ जानेवारी १७०५ पर्यंत चालू होता.

२. हैद्राबादच्या निजाम घराण्याचा संस्थापक सुप्रसिद्ध निजाम उल्मुल्क तो हाच. हे घराणे मूळ आशियातील बुखाऱ्याचे. पण हा वंशाने चघताई तातार नव्हता.

चिन किलीचखानाला मोठा हुद्दा देण्यात एवढेच कारण नव्हते, तर आणी-बाणीच्या प्रसंगी त्याचा उपयोग व्हावा असा औरंगजेबाचा हेतु होता. औरंगजेबाचा सगळ्यात धाकटा मुलगा कामबक्ष याला कोणाचाच आधार नव्हता. चिन किलीचखान तरी कामबक्षाची बाजू घेईल अशी औरंगजेबाला आशा वाटे. औरंगजेबाचे दोन वडील मुलगे शहा आलम आणि आझमतारा आणि त्यांची मुले यांना संपत्ति आणि अधिकार यांचे भक्कम पाठबळ होते. ते समर्थ होते. औरंगजेब हा मोठा धोरणी आणि पोक्त बुद्धीचा होता. आपण मरताक्षणीच साम्राज्यात भयंकर अनर्थ वडून येतील हे भविष्य त्याला कळून चुकले होते. अशा प्रसंगी आपला लाडका मुलगा कामबक्ष हा अगदीच एकाकी पडू नये म्हणून औरंगजेबाने चिन किलीचखानाला महत्वाचा सेनापती म्हणून बढती दिली. इतकेच नव्हे तर कामबक्षाची मुलगीही त्याने त्याला देऊ केली. खरे पाहता अकबराच्या काळापासून चालत आलेल्या परंपरेच्या विरुद्ध ही गोष्ट होती. परंतु अशा उपायामुळे चिन किलीचखान हा वेळप्रसंगी मदत करील अशी औरंगजेबाला आशा वाटत होती.

चिन किलीचखानाला मी (मनुची) उपचार केला होता. वर उल्लेखिलेल्या मोहिमेत (वाकिनखेड्याच्या) चिन किलीचखानाच्या हाताला बंदुकीची जखम झाली आणि त्याचा घोडा मारला गेला.

**सुरत बंदरातील घडामोडी :** डचांची जहाजे सुरतेच्या बंदरावर आली होती हे मी (मनुचि) पूर्वी सांगितले आहे. यामधील काळात डचांनी सुरतेच्या व्यापाऱ्यांची तीन जहाजे पकडली. आपल्याला झालेल्या नुकसानीची भरपाई करून द्यावी, अशी डचांनी मागणी केली व तसे सुरतेच्या सुभेदाराला कळविले. सुभेदाराने डचांचे पत्र बादशहाकडे पाठविले. या काळात पावसाळ्यामुळे डचांना आपली जहाजे सुरतेहून हलवावी लागली. हे प्रकरण निकालात निघाले नाही.

पोर्तुगीजांनीही मोगलांचे असेच एक जहाज पकडले होते. हे जहाज मक्केला चालले होते. जहाजावर ५ लाखांचा माल होता. आमचा परवाना घेतला नाही अशी पोर्तुगीजांची तक्रार होती. यावर शिक्षा म्हणून औरंगजेबाने आपला सेनापती कुतुबखान याला दमण आणि वसई या भागावर आक्रमण करण्याची आज्ञा केली. कुतुबखानाने दमण आणि वसई या इलाख्यांत जाळपोळ केली. याशिवाय त्याने अनेकांची कत्तल केली. गोव्याच्या व्हॉइसरायने आग्र्याच्या फादर रेक्टरला मोगलांशी वाटाघाटी करण्यास सांगितले. हा रेक्टर अद्याप बादशहाच्या छावणीत आहे. तेथे त्याला सैन्याचे कूच आणि अन्नाची टंचाई यामुळे कष्ट पडत आहेत. पण अद्याप त्याच्या प्रकरणाचा निकाल लागला नाही.

**तंजावरचा राजा व ख्रिस्ती लोक :** तंजावर येथे आलेल्या ख्रिस्ती लोकांचा जेव्हा छळ झाला तेव्हा तिकडील ख्रिस्ती लोकांना मी काय साह्य केले हे मी मागे सांगितले

आहे. पण जेसुइट पाद्र्यांचे मी (मनुचि) केलेल्या साहाय्याने समाधान झाले नाही. मी दिलेला सल्लाही ते मानीनात. आपलीं कट्टर मतें स्वीकारलीं जावीत अशी दुराग्रही भूमिका या जेसुइट पाद्र्यांनी घेतली. यात त्यांनी मैलापूरच्या लॉर्ड बिशप डॉन गॅस्पर ऑफोन्को याचे साहाय्य घेतले. दाऊदखान हा सैन थोमला आला असताना लॉर्ड बिशप ऑफोन्को हा त्याला भेटला. जेसुइट पाद्र्यांना अनुकूल असे पत्र तुम्ही तंजावरच्या राजाला[1] लिहा अशी लॉर्ड बिशपने दाऊदखानाला गळ घातली. या जेसुईट पाद्र्यांच्या मागण्या तरी काय होत्या? त्या पुढील प्रमाणे होत्या :– (१) तंजावरच्या राजाने त्यांचे चर्च बांधून द्यावे, (२) आपल्या राज्यात जेसुइट पाद्र्यांना आपले काम करण्याचे अनिर्बंध स्वातंत्र्य द्यावे, (३) जेसुइट पाद्री हे पालख्यांतून प्रवास करतील तेव्हा आणि अशाच इतर कामांत त्यांना कोणत्याही प्रकारे अडथळा न व्हावा. दाऊदखान हा शिष्टाचारात मुरलेला माणूस. त्याने लॉर्ड बिशपने म्हटल्याप्रमाणे तंजावरच्या राजाला पत्र पाठविले. असे पत्र पाठविण्यात आपले काही जात नाही, हे त्याला दिसत होते.

त्या पत्राला तंजावरच्या राजाने पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले. "मी मोगल बादशहाचा मांडलीक आहे. आपण (दाऊदखान) माझे मित्र आणि रक्षक आहात. माझ्या प्रजेवर हे परदेशी आपले नवीन आचारविचार लादून आमचा धर्म नष्ट करू पाहत आहेत. या परदेशींना आपण असे करू देऊ नये. त्यांचे चर्च बांधून देणे आणि त्यांचा धर्म चालू देणे हे करण्यास आपण जर मला भाग पाडीत असाल तर कर्नाटकातील कांजीवरम आणि इतर ठिकाणी असलेली जुनी हिंदु देवालयें यांचा जीर्णोद्धार करण्याचीही मला परवानगी मिळाली पाहिजे आणि याचा तर्कशुद्ध परिणाम म्हणून ब्राह्मणांना त्यांच्या ठिकाणी राहून आपल्या पूर्वीच्या परंपरेप्रमाणे आपले आचारविचार पाळण्याची परवानगी दिली पाहिजे."

हे पत्र दाऊदखानाला मिळाले. त्याने तंजावरच्या राजाने पाठविलेल्या भेटींचा आनंदाने स्वीकार केला. दाऊदखानाने राजाला पुढीलप्रमाणे तावडतोब पत्र लिहिले. "तुम्ही मोगलांना पूर्वीप्रमाणेच खंडणी देत राहिले पाहिजे. बाकीच्या मजकुरासंबंधी (जेसुइट पाद्र्यांविषयी) म्हणाल तर तुमची विचारसरणी अत्यंत योग्य आणि मनाला पटेल अशी आहे. माझ्यापुरते म्हणाल तर मी नेहमीच तुमच्या हितसंबंधाची उपासना करीत राहीन."

जेसुइट पाद्र्यांनी यासंबंधी माझे मन वळविण्याचा पुनः प्रयत्न केला. त्यांची अशी इच्छा होती की, मी दाऊदखानास पत्र लिहून, तंजावरच्या राजावर स्वारी करण्याची त्यास विनंती करावी. याबद्दल दाऊदखानास दहा हजार पटाका (वीस हजार रुपये)

1. तंजावरचे राजे : व्यंकोजीचा मुलगा, शहाजी राजे भोसले. इ. स. १६८४ ते १७११.

देण्याचे त्यांनी ठरविले होते. परंतु या बाबतीत ढवळाढवळ करण्याचे मी साफ नाकारले.

दाऊदखानाच्या वरील पत्रामुळे तंजावरच्या राजाचा मार्ग मोकळा झाला. त्याने प्रत्येक खिस्ती माणसावर जबर कर बसविला. हा कर देणे त्यांना असह्य झाले. आमच्या देवळात तुम्ही आले पाहिजे, नाहीतर तुम्हाला जबर शिक्षा करण्यात येईल अशी धमकी त्याने दिली. भीतिमुळे हे खिस्ती लोक देवळात जाऊ लागले. तंजावरच्या शेजारील राजेही आपापल्या इलाख्यात खिस्ती लोकांना अशीच वागणूक देऊ लागले आहेत. हे जेसुइट पाद्री प्रबळ राजांना बटणीला आणण्याचा आणि आपल्या इच्छेनुसार त्यांना वागावयास लावण्याचा हट्ट धरून बसले होते. त्यांच्या या कट्टरपणाचा असा हा शोचनीय शेवट झाला आहे. आम्ही म्हणू तसेच झाले पाहिजे आणि आम्ही योजू तेच घडून आले पाहिजे त्यावर कोणीही शंका व्यक्त करता कामा नये, अगर चर्चा करता कामा नये, हा या जेसुइट कट्टर लोकांचा हट्ट. या घटनेत तंजावरच्या भागात कोणी जेसुइट राहिला नाही आणि खिस्त्यांचा मेळावा नष्ट झाला आहे.[1]

**सुरतेतील फ्रेंच व्यापारी :** सुरतेच्या[2] फ्रेंच व्यापाऱ्यांकडून पैशाची जी मागणी करण्यात आली ती औरंगजेबाच्या आज्ञेने होय हे निश्चित आहे. अमानतखान हा सुरतेचा सुभेदार होता. दोन फ्रेंच जहाजांवर माल चढत असताना त्याने ते थांबविले आणि भरमसाठ पैशाची मागणी केली. फ्रेंचांचा डायरेक्टर पिपाला हा ही रक्कम भरण्याचे नाकारीत होता. त्यांनी जहाजावर चढविण्याचा माल फ्रेंचांचा असूनही त्याला आग लावली आणि फ्रेंच आणि मोगल यांच्यातील मैत्रीचे संबंध बिघडविण्याचा प्रयत्न करीत असल्याबद्दल सुभेदाराकडे तक्रार केली. "असे काही नाही. मला जे करावे लागते ते बादशहाच्या आज्ञेवरून होय, असे सांगून अमानतखानाने बादशहाकडून आलेली पत्रे फ्रेंचांना दाखविली पण आपण हट्ट चालू ठेवला तर फ्रेंच सुरतेचे नुकसान करतील असे वाटून त्याने फ्रेंचांना आपला माल जहाजावर चढविण्याची परवानगी दिली."

**अमानतखान :** येथे अमानतखानाची थोडी माहिती सांगितली पाहिजे. बादशहाने सुरतेस अमानतखानाला आणि बंगालमध्ये आपला नातु सुलतान अझिमुद्दिन[3] याला आज्ञा केली की बंदरातून बाहेर पडणाऱ्या मोगल जहाजांना काही उपसर्ग

१. जेसुइट लोकांच्या हडेलहप्पीपणाची अनेक उदाहरणे मनुचीने येथे दिली आहेत.

२. वरील वाक्य संदर्भाशिवाय सुरू होत आहे. बरचा काही भाग सुटला असावा.

३. अझिमुद्दीन याची बंगालचा सुभेदार म्हणून १६९७ च्या मार्च महिन्यात नेमणूक झाली. दयानी अमानतखानाला जबरदस्तीने लिहून दिलेल्या मुचलक्याची तारीख ४ फेब्रुवारी १६९९ आहे.

होणार नाही अशा अर्थाचे मुचलके सर्व युरोपियन जमातींकडून करून घेण्यात यावेत. अमानतखानाने असे मुचलके घेतले आणि बादशहाकडे पाठवले. बादशहा खूष झाला.

अझिमुद्दिनकडून असे काही न घडल्यामुळे बादशहाने त्याच्यावर टीका केली. यावर अझिमुद्दिनने उत्तर पाठविले. "या (बंगाल) प्रांतात हिंदु राजे दमेघोपे माजलेत आहेत. त्यांना मोड करण्यातच माझा सगळा वेळ जातो. युरोपियनांना मी आपल्या म्हणण्याप्रमाणे त्रास देऊ लागलो तर ते हिंदु बंडखोरांना मिळाले असते आणि बंगाल प्रांत हातचा गेला असता." या उत्तराने बादशहा गप्प बसला.

तिकडे अझिमुद्दिन याने अमानत खानाला पत्र लिहिले. "बादशहाचे हुकूम तुम्ही का अमलात आणलेत, त्यामुळे काय अनर्थ ओढवेल, याचा तुम्ही विचार केला नाही. फक्त बादशहाची मर्जी संपादण्यासाठी तुम्ही हे केले. असून, थोडे दिवस जाऊ द्या मी तुमचा नक्षा उतरवीन." या पत्राने अमानतखानाला मोठा धक्का बसला आणि तो अल्पावधीत मरण पावला.

या अमानतखानाचा बाप मीरक मुइनोद्दिन अहमद[1] हा प्रथम काबूल प्रांताचा दिवाण होता. त्यानंतर तो लाहोर प्रांताचा दिवाण झाला. ४० वर्षांपूर्वी माझी (मनुचि) आणि त्याची ओळख झाली. तो स्वभावाने सज्जन होता. माझ्याशी आणि इतर सर्व ख्रिस्ती लोकांशी (युरोपियन) तो मित्रत्वाने वागत असे. त्याला रासायनिक क्रिया करण्याचा नाद होता. काही रासायनिक क्रियेने सोने तयार करण्याचा तो सतत प्रयत्न करीत असे. त्याचा मुलगा मी उल्लेखलेला सुरतेचा सुभेदार अमानतखान (दुसरा)[2] हा होय. यालाही रासायनिक क्रियेच्याद्वारे सोने तयार करण्याचा नाद होता. अर्थात त्यात त्याला यश आले नाही. पण सुरतेच्या सावकारांकडून बरीच संपत्ति उकळण्यात त्याला यश आले. परंतु तो लवकरच मृत्यु पावल्यामुळे ती संपत्ती नाहिशी झाली.

**इराणमध्ये गेलेल्या आपल्या सुलतान अकबर या मुलाला कह्यात आणण्याचे औरंगजेबाचे प्रयत्न :** जरी औरंगजेब बादशहा मराठ्यांशी लढण्यात व इतर अनेक मोहिमांत गुंतला होता, तरी आपला मुलगा सुलतान अकबर याला कह्यात आणण्याचे

१. मीरक मुइनोद्दिन अहमद उर्फ अमानतखान (पहिला) याची नेमणूक १६८१ मध्ये औरंगाबादेचा सुभेदार म्हणून झाली. औरंगजेब अहमदनगरकडे रवाना झाला तेव्हा त्याने अमानतखानाला औरंगाबादेस ठेवले. याचे कारण असे की, मुसलमान राज्याविरुद्ध लढाई करणे अमानतखानाला पसंत नव्हते. तो औरंगाबादेस १६८४ च्या सुमारास मरण पावला. औरंगाबादेच्या सुप्रसिद्ध शाहनूर हमीन यांच्या दर्ग्यात त्याची कबर आहे.

२. त्याचा मृत्यु सुरत येथे २८ ऑक्टोबर ते १८ नोव्हेंबरच्या दरम्यान इ. स. १६८९ मध्ये झाला.

तो सतत प्रयत्न करीत होता. हा त्याचा मुलगा त्यावेळी इराणमध्ये होता. अनेक पत्रे लिहून बादशहाने त्याला परत बोलावले होते. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. शेवटी १६८९ मध्ये त्याने मोठ्या प्रेमळपणे आणि मोठ्या जिव्हाळ्याने जे पत्र लिहिले ते शेवटचेच होते. त्याचा आशय असा होता.

**औरंगजेब बादशहाचे राजपुत्र अकबर यास पत्र :** "हे माझ्या लाडक्या पुत्रा, तू माझ्या नेत्राचा प्रकाश आहेस. माझ्या काळजाचा तुकडा. परमेश्वर साक्ष आणि कुराणाची शपथ, माझ्या इतर कोणत्याही मुलापेक्षा तू मला अधिक लाडका आणि हवा आहेस. तू म्हणजे माझी शक्ति आणि समाधान यांचे स्थान. तू जवळ असलास की माझी दुःखे हलकी होत. आता तू दूर गेला आहेस. मला आपल्या दुःखाचा सर्व भार स्वतःच सहन करणे भाग आहे. राजपूत म्हणजे मानवरूप धारण करणारे सैतानच. त्यांनी तुझे मन वळविले. तू बंड केलेस. यामुळे परमेश्वराची तुझ्यावरची कृपा नष्ट झाली. परमेश्वराने तुझी साथ सोडली. मला काय करता येणे शक्य आहे ? तू आता जी दुःखे भोगत आहेस यासाठी मी तुझे काय बरे साह्य करू शकेन ? या संबंधी मी जेव्हा विचार करतो तेव्हा मला अत्यंत दुःख होते. अधिक दिवस जगावे असे मला वाटेनासे झाले आहे. या राज्यापासून तू अतिशय दूर गेला आहेस. या राज्यातील तुझी प्रतिष्ठा आणि मानसन्मान यांना तू मुकला आहेस. तुझ्या हाती सत्ताही राहिली नाही. तुझा राजपुत्राचा दर्जाही राहिला नाही. हे सगळे पाहून मला आत्यंतिक शोक सहन करावा लागत आहे. तू मला अत्यंत प्रिय आणि म्हणूनच तुझ्या शोचनीय अवस्थेबद्दल मी दुःखाचे अश्रु ढाळीत आहे. तुला आपल्या तारुण्याचा आणि कुटुंबवत्सलतेचा विसर पडला. आपली बायका, मुले आणि मुली यांच्यापासून दूर असे जिणे तुला जगावे लागत आहे. तुझ्या मनस्वी स्वभावामुळे तू या सैतान रजपूतांच्या हाती सापडलास. चेंडूला इकडून तिकडे फटकारावे तशी रजपुतांनी तुला वागणूक दिली. यामुळे तुला एकदा एका ठिकाणी, तर पुनः दुसरीकडे आश्रय घेणे भाग पडले. तुझ्या हातून फार मोठा अपराध घडला आहे. पण तू मला प्रिय असल्यामुळे वरील गोष्टी घडल्या असूनही तुला अधिक शिक्षा व्हावी अशी माझी इच्छा नाही.

कविता : "मूल म्हणजे काय मातीचा गोळाच ना ? पण तो
आई-बापाना आपल्या डोळ्याचे प्रीती रसायनच–"

(सुरमा–डोळ्यांना थंड वाटण्याकरिता औषधाप्रमाणे वापरायचा)

आता दैव तुला अनुकूल होत आहे. तुला पश्चात्ताप झाला असेल तर तू माझ्याकडे येऊ शकतोस. तुझ्या अपराधांची क्षमा करण्यात येईल याची खात्री बाळग. इतकेच नव्हे तर तुला स्वप्नातही खरे वाटणार नाही अशी कृपा तुझ्यावर करून मी तुला मोठ्या पदावर चढवीन. यामुळे तू आतापर्यंत जे जे कष्ट भोगले आहेस त्याची

मरपाई होईस. तू आमच्या जवळ असावास या एकाच इच्छेने मी तुला बोलावीत आहे, अरे, तू समजू नकोस. तू एकाकी झाला आहेस. तुझी प्रतिष्ठा नाहिशी झाली आहे. तुझी अत्यंत दैन्यावस्था झाली आहे. हे सगळे दूर व्हावे हाही तुला बोलावण्यात माझा हेतु आहे. मी राजा जसवंतसिंगाच्याबद्दल बोलत नाही. तो रजपुतांचा मुख्य आणि दाराचा अनुयायी होता. माझ्या मुला, अशांच्या (रजपुतांच्या) वर विश्वास ठेऊ नकोस. त्यांच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नकोस. मी जे सांगत आहे ते तुझ्या भल्यासाठी आहे. त्याच मार्गांनी जाणे योग्य आहे. मी सांगितलेल्या गोष्टी समजून घे आणि त्या अटळ आहेत हे लक्षात ठेव. त्यांचे मनन कर. मी तुला पुनः लिहिणार नाही."

**अकबराचे आपल्या बापाला उत्तर :** आपले पत्र मिळाले. त्याचे मी थोडक्यात उत्तर देत आहे :–

"मी बंड केले. मी रजपुतांच्या हातात सापडलो आणि त्यामुळे मला माझा हुद्दा आणि प्रतिष्ठाही गमवावी लागली आणि असे असूनही आपण माझ्यावर प्रेम करता असे आपण लिहिले आहे. मुलाने आपल्या जन्मदात्या पित्याची आज्ञा पाळली पाहिजे हे खरेच. पण त्या बरोबर बापानेही पाळण्यासारख्या रास्त अशा आज्ञा द्याव्यात हे ही तितकेच खरे. परमेश्वरकृपेने आज्ञाधारकपणात आणि योग्य तो आदर दाखविण्यात माझ्याकडून काही कसूर झाली नाही. आपल्या कृपेची मला जाणीव आहे. मला इतकी कृतज्ञता वाटते की, ती मी पुरेशी व्यक्त करू शकत नाही. खरोखरच आपण मला देत असलेल्या आश्वासनाचा अत्यल्प भाग जरी माझ्या वाट्याला आला तरी त्यात माझे समाधान होईल.

मी आपला धाकटा मुलगा. इतर मुलांच्या मानानी आपण माझ्याबद्दल अधिक जिव्हाळा आणि अधिक कृपा दाखविणे आवश्यक होते. तरी पण आपली दयाळु वृत्ति लक्षात घेता मी अद्याप निराश झालो नाही. आपण जगाचे सामान्य नियम धुगारून दिले आहेत. आपण आपल्या इतर मुलांच्यावर अधिक कृपा केली. पण मला मात्र आपल्या कृपेपासून वंचित केले. आपल्या[1] सर्वांत मोठ्या मुलाला आपण शाहा म्हणजे बादशहा ही पदवी दिलीत. इतकेच नव्हे तर त्याला आपण साम्राज्याचा वारस म्हणून जाहीर केले. न्यायाची ही कोणती पद्धत ? कोणत्या न्यायालयाने हा निर्णय दिला ? असे कोणी ऐकले आहे काय ? बापाच्या वारसात सर्व मुलांना वाटा मिळाला पाहिजे. आपण या नियमाच्या उलट एका मुलाला मोठ्या पदावर चढविले. त्याच्यावर पदव्यांची आणि संपत्तीची खैरात केली. इतर मुलांना मात्र निर्धन ठेवण्यात आले. अशा गोष्टी कोठल्या कायद्यात बसतात ?

१. औरंगजेबाचा मोठा मुलगा मोअज्जम उर्फ शाहाआलम.

परमेश्वरा ! तू सत्यस्वरूप आहेस. तुझी कृपा सर्वांवर समान आहे. हे जगजाहीर आहे आणि धार्मिक ग्रंथात नमुद आहे. परमेश्वराला जो संतुष्ट करतो, त्यालाच परमेश्वर मोठेपणा देतो.

आपण माझे गुरू. मी कोणत्या वाटेने जावे हे आपणच मला दाखविले. आपले अनुकरण इतरांनी केले आणि ते त्याप्रमाणे वागले. माझ्या वडिलांनी ज्या मार्गाने जाण्यास मला शिकविले, त्या मार्गानी गेल्याबद्दल मला दोष देऊ शकेल असा कोणी तरी असेल काय ? आदिमानव आदम याला गव्हाच्या दोन दाण्यासाठी परमेश्वरी कृपेस मुकावे लागले. मला मात्र एका दाण्यासाठी नरकात पाठविण्यात येत आहे. पण मला मिळालेला एक दाणा जर मी नखाने विकला नाही तर माझ्या सारखा मूर्ख मीच. तैमूरलंग आणि शहाजहान या माजी बादशहांनी अविश्रांत श्रम व कष्ट केले आणि शेवटपर्यंत ते बलाढ्य व सुखी राहिले. जो कष्ट सहन करण्यास तयार नसतो, अशाला कधीही श्रेष्ठत्व येत नाही. त्याच्यावर परमेश्वराची कृपा होत नाही. त्याला आपला काळ वैभवात घालविता येत नाही. काट्यांवाचून गुलाब नाही, सर्पावाचून पर्वत नाही.

कविता : "भाग्य माझ्या पाठीशी असेल तर तीक्ष्ण तलवारींची मला काय म्हणून भीति."

नेहमीसारखे थकव्यानंतर विश्रांती मिळणे हे क्रमप्राप्त आहे. त्यामुळे आजही मी भोगत असलेल्या आपत्तीतून परमेश्वर कृपेने माझी सुटका होईल अशी आशा आहे.

जसवंतसिंग हा रजपुतात सर्वश्रेष्ठ होता. तो दाराचा मित्र होता, असे आपण म्हणता आणि या लोकांवर विश्वास ठेवू नये असा आपण सल्ला देता. आपण योग्य तेच सांगितले. पण त्याविषयी आपण अधिक न बोललेले बरे. रजपूत हे दारावर प्रेम करीत नसत. तो त्यांचा शत्रु होता. दाराने रजपुतांशी स्नेह राखला असता तर त्याचा पराजय झाला नसता. शहाजहानचा रजपुतांवर लोभ होता. त्यांच्याशी त्याचे आप्त संबंध होते. रजपुतांच्या सहाय्याने तो हिंदुस्तानचा बादशहा बनला.

याच लोकांचे (रजपुतांचे) सहाय्य घेऊन पराक्रमी महाबतखानाने जहांगीर बादशहाला कैद केले आणि आपल्या शत्रुंचा पाडाव केला. आपल्याच समोर दरबारात रजपुत या शूर वीर जातीने काय केले, त्याची आपण आठवण ठेवा. ते इतक्या शौर्याने लढले आहेत की जगाच्या इतिहासात त्याची नोंद झालेली आहे. प्राचीन कथांमधून त्यांच्याइतक्या पराक्रमाची नोंद इतर कोणाचीही सापडत नाही. आता जसवंतसिंगाची गोष्ट. शहाशुजाशी झालेल्या युद्धप्रसंगी त्याचे अपराध काय कमी होते ? त्याला क्षमा करण्याऐवजी कडक शिक्षा करणेच योग्य ठरले असते. पण आपण तसे काही केले नाही कारण आपण जसवंतसिंगाला ओळखत होता. इतकेच

नव्हे तर त्याला आपण भीत होतो. आपल्या गोड बोलण्यास भुलून त्याने दाराचा पक्ष घेण्याचे टाळले. त्याने दाराचा पक्ष घेतला असता तर आज आपण राज्य करू शकलो नसतो. जसवंतसिंगामुळेच आपल्याला जय मिळाला.

इमानीपणाबद्दल हे रजपूत स्तुतीस पात्र आहेत, यात काय संशय? जसवंतसिंग मेला तेव्हा त्याच्या लहान मुलांना रजपुतांनी आपल्या ताब्यात घेतले आणि त्यांचे रक्षण करण्यासाठी निकराने लढून आपले प्राण दिले. सैन्य त्यांच्यावर चालून आले. पण २०० रजपूत स्वार हे सतत १२ तासपर्यंत तुमच्या सैन्याशी लढत होते. त्यांनी तुमचे कसलेले आणि नामांकित योद्धे मारले; आणि ते शेवटी सुरक्षितपणे निघून गेले. रजपूत जमातीची, रजपूतांच्या शौर्याची, इमानीपणाची स्तुति केली पाहिजे.

मागे हिंदुस्तानचे बादशहा, राजेरजवाडे किंवा प्रमुख सेनापती यांना सैनिकांची भरती करण्याची जरूर भासे, तेव्हा एकेका जागेकरिता शंभर शंभर रजपुतांच्या उड्या पडत आणि आजची परिस्थिती पहा. थोड्या सैनिकांची भरती करावयाची असल्यास तीन तीन वर्षे लागतात. ही घटना आपणाशी किती बोलकी असावी? हे असे का घडत आहे? आपल्या राजवटीच्या प्रारंभापासून सुभेदार, सेनापती, अमीर उमराव ढीगभर आहेत. पण एकापाशीही निष्ठा असेल तर शपथ! सैनिक शिपायी तर रंक झाले आहेत. त्यांना वापरण्यास शस्त्रेही मिळत नाहीत. उत्तमोत्तम लेखक बेरोजगार झाले आहेत आणि ते काही साहित्य निर्माण करीत नाहीत. व्यापाऱ्यांचे खून तरी पडतात, अगर त्यांची मालमत्ता लुबाडण्यात येते. प्रजेचा नाश होत चालला आहे. दक्षिणचा विशाल प्रदेश हा एकेकाळी भूलोकावरील नंदनवनच वाटे. आज त्याची काय स्थिती आहे? हा प्रदेश ओसाड पडला आहे. जमिनी शेतीखाली येत नाहीत. नापिकी सर्व ठिकाणी दिसून येत आहे.

विजापूरच्या राज्याविषयी काय सांगावे! एकेकाळी हिंदुस्तानचे रत्न गणले गेलेले हे राज्य आज पूर्णपणे उध्वस्त झाले आहे आणि प्रांताची राजधानी असलेले आणि तुम्ही वसविलेले औरंगाबाद शहर! या शहराला तुमचे नाव लागले आहे म्हणून शत्रूंनी ते उध्वस्त केले आहे. पारा जसा एका क्षणात विखरावा तसे या नवीन शहराचे झाले आहे. आज औरंगाबाद म्हणजे केवळ मातीचा ढिगारा बनलेला आहे. तुम्ही हिंदूंच्यावर कर लादला ना? या सर्व नाशाचे हेच ते कारण होय. तुमचे हे धोरण शत्रूंच्या पथ्यावर पडले आहे. त्यांनी तुमच्या राज्यात इतकी विलक्षण धामधूम केली की सर्व प्रदेश उजाड बनून गेला आहे.

कोणत्या बाबतीत आपण भले केले असे मी म्हणावे? जुनी व खानदानी कुटुंबे नामशेष झाली आहेत. राज्य व्यवस्था, कायदेकानू, सल्ला मसलती हा सर्व कारभार आता हलक्या आणि असंस्कृत अशा माळी, परीट, न्हावी, सुतार, लोहार, शिंपी अशा लोकांच्या हाती आला आहे.

मोठमोठी पागोटी घालून मिरविणाऱ्या दांभिक लोकांवर तर आपला नितांत विश्वास. त्यांना आपण मोठे धर्मशास्त्रज्ञ समजता याचे कारण काय? हे दांभिक लोक बगलेत कुराण, हातात जपमाळ धरून मिरवतात म्हणून ना? हे लोक साधुत्वाला दांभिक असा बाह्य देखावा करतात. वास्तविक पाहता या लोकांना नरकाचे पाशच म्हटले पाहिजे. हे लोक खोटा सल्ला देतात. यांच्या बाह्य अवडंबरावरून जगाची फसवणूक होते. अशा कचऱ्यासारख्या वर्गातूनच आपण आपले सल्लागार आणि दरबारी निवडले आहेत. खऱ्याचे खोटे करण्यात पटाईत असलेली ही माणसे म्हणजे आपल्याला गॅब्रिअल, मायकेल, राफेल इत्यादि सारखे देवदूत वाटतात. अशी माणसे भर दरबारात राई दाखवतील आणि तो पर्वत आहे असे आपल्याला भासवतात.

**कविता** : वरील विषयाच्या विस्ताराला धरून दिलेल्या कवितेचा आशय खालीलप्रमाणे आहे :—

औरंगजेबाच्या राजवटीत हलके व नीच लोक यांचे फावले आहे. हे लोक रस्त्याने मोठ्या तोऱ्यात व गुर्मीने जात असतात. बादशहाचे सल्लागार, मानकरी ते हेच लोक. राज्य कारभार हेच पाहतात. विद्वान, शहाणे व चारित्र्यवान लोक निकामी झाले आहेत. त्यांना दरबारात स्थान नाही. सारे जग असली ही बेबंदशाही पाहून आश्चर्य करून आहे. पहा, काय आमची दुर्दशा करून टाकण्यात आली आहे! गाढव उमद्या घोड्यांना लाथा झाडीत आहेत. श्रेष्ठ लोकांना रस्त्याने जाताना भय वाटत आहे. एकही मनुष्य बादशहाच्या आज्ञेला मानत नाही. अधिकारी, दरबारात अधिकाराच्या जागांची खरेदी-विक्री करतात आणि निमकहरामीने वागतात.

तुमच्या साम्राज्याचा असा नाश होत चालला आहे. असे असूनही आपल्याला व्यवस्थितपणे राज्य करता येत नाही. चहूकडे गोंधळ माजलेला आहे. माझी वृत्ति अगदी याच्या उलट आहे. बेशिस्तपणा, असंस्कृतपणा, गोंधळ ही माझ्या स्वभावाला पटत नाहीत. राज्यातील गोंधळ माझ्याच्याने पाहवेना म्हणून माझा अस्वस्थपणा घालविण्यासाठी आणि शांततेने राहण्यासाठी मला अत्यंत खेदाने आणि निराशेने आपल्या राज्यातून निघून यावे लागले.

आपल्याला दीर्घायुष्य लाभो. आपण आता राज्याचा त्याग करावा. मी राज्याचा कारभार जसा करावयास हवा तसा करीन. आपण मक्केला निघून जावे. असे आपण केले तर लोक आपली थोरवी गातील. आजपर्यंत आपण वैभवात राहिला आणि मनासारखे केले. आता आपल्या आयुष्याची संध्याकाळ झाली आहे. आता आपण निवृत्त होऊन आपल्या आत्मोद्धाराची काळजी वाहण्यास हवी. मला आपल्याकडे येण्याचा आपण आग्रह करून आहात मी अजून तरुण आहे. माझ्यावर काय आपत्ती ओढवतील याबद्दलचे जर मला भय वाटत नसते, तर मी मोठ्या खुषीने तिकडे आलो असतो.

तरीपण आपण अगदी थोडी माणसे घेऊन जर आला तर मी, आपला सगळ्यात अल्प मतीचा मुलगा म्हणून येऊन आपल्या पायावर पडेन आणि प्रत्येक बाबतीत आपल्या आज्ञेचे पालन करीन. मी अधिक काही लिहित नाही. त्यामुळे आपल्याला कंटाळाच येईल. आपल्या आणि आपल्या मुलांवर सूर्यांचा प्रकाश सतत राहो."

**जानी बेगमचा मृत्यु :** फेब्रुवारी १७०५ मध्ये राजपुत्र आझमशहाची[1] बायको जानी बेगम मरण पावली. ही दारा शुकोची मुलगी. जानी बेगमच्या मृत्युने मोगल छावणीत सर्वांना अतिशय हळहळ वाटली. त्यातल्या त्यात अधिक दुःख, प्रतिष्ठित माणसे आणि जुने सरदार यांना झाले. दाराचे सद्गुण त्याचा विवेक, आणि पोक्त बुद्धी त्याचा उत्तम राज्यकारभार इत्यादींच्या आठवणी या जुन्या सरदारांच्या मनात पुनः उचंबळून आल्या.

उदार आणि न्यायाची चाड असलेली स्त्री म्हणून जानी बेगम चांगली कीर्ति संपादन केली. औरंगजेबाच्या विरुद्ध तिचा पती आझम याने अनेक वेळा बंड करण्याचे मनात आणले. पण जानी बेगमने त्याला या इच्छेपासून प्रत्येक वेळी परावृत्त केले. आता यापुढे दाराच्या रक्ताचा कोणीही माणूस हयात नाही. त्याचा मुलगा सुल्तान सिपीर शुकोला औरंगजेबाची मुलगी दिली होती. सिपीर शुकोला सलीमगडच्या किल्ल्यात कैद करून ठेवले होते हे मागेच सांगितले आहे. अलिकडे त्याच्यासंबंधी काहीच ऐकू येत नाही. तो जिवंत आहे की नाही हेही ठाऊक नाही

**जेसुइटांची वागणूक :** आता मी येथे जेसुइटांच्या वागणुकीसंबंधी माझ्या मित्रांनी पाठविलेली माहिती, ती थोडी पुढे देत आहे. पाँडेचेरीच्या जेसुइटांनी ५ सप्टेंबर १७०५ ला रात्री नऊच्या सुमारास हिंदूंच्या एका देवालयात बळजबरीने प्रवेश केला.[2] तेथे उत्सव चालू होता. हिंदूंनी अधिक संख्येने पाँडिचेरीत येऊन वसावे म्हणून हा उत्सव साजरा करण्याची फ्रेंच अधिकाऱ्यांनी परवानगी दिली होती. पण जेसुइटांना त्याचे काय होय! त्यांनी आत प्रवेश केल्यावर तेथे असलेल्या अनेक ब्राह्मणांना जोड्यांनी मारले. त्यांच्या शेंड्या उपटल्या. इतरांनाही अशाच प्रकारे मारहाण करण्यात आली. त्यांच्या देवालयातील मूर्तींच्यावर लघुशंका करून जेसुइटांनी त्यांची विटंबना केली, आणि त्या मूर्ती फोडून टाकल्या.

या अपमानामुळे हिंदु आपली घरेदारे सोडून सामुदायिकरीत्या गाव सोडून जाण्यासाठी एकत्र आले. हे सुमारे चाळीस हजार लोक होते. तेथील फ्रेंच गव्हर्नर मॉ. मार्टिन याला ही घटना समजली. या लोकांना बाहेर जाऊ देण्यास प्रतिबंध करण्याच्या विचाराने त्याने वेशींची दारे बंद करण्यास सांगितले. पण यामुळे उलट अधिक

१. आझमशाह—औरंगजेबाचा मुलगा.

२. जेसुइटांच्या हलकटपणाची अनेक उदाहरणे मनूचिनी दिली आहेत. त्यांपैकी हे एक.

गोंधळ माजला. लोकांनी दुकाने बंद केली, कोळी पळून गेले. अधिकारी निघून गेले. गावाच्या संरक्षणासाठी चालू असलेल्या बांधकामावरचे सुतार, गवंडी, पाथरवट वगैरे लोक असेच निघून गेले. मालाचा पुरवठा बंद पडल्यामुळे या दोन हजार लोकांना जाणे भाग पडले. त्यांच्या जाण्यामुळे तेथील रहिवाश्यांचे फार हाल झाले. ही दंगल बारा दिवस चालू होती. गव्हर्नरच्या समजसपणाच्या वागणुकीमुळे लोक शांत झाले. परंतु त्यांचे पूर्ण समाधान झाले नाही. कारण जेसुइटांच्या गैर-वागणुकीची ही दुसरी वेळ होती.

जेसुइटांनी केलेल्या अपमानामुळे व गडबड, गोंधळाच्या परिस्थितीमुळे, पाँडिचेरीचे अनेक सुस्थितीतील व्यापारी गाव सोडून गेले. रस्त्यात हिंदू भेटले की जेसुइट त्यांच्या तोंडावर थुंकत त्यांची व त्यांच्या देवतांची निंदानालस्ती करीत. वर सांगितलेल्या दंगलींच्या वेळी सर्व हिंदू एका मोठ्या रस्त्यावर जमा झाले होते. हे पाहून, या दंगलीतील जेसुइटांचा पुढारी पाद्री डाकर्ड संतापाने किल्ल्यावर गेला. व किल्ल्यात असलेल्या फ्रेंच गव्हर्नरला, जमलेल्या लोकांवर तोफा डागण्याचा त्याने सल्ला दिला. त्याच्या मते लोकांना ठार मारण्याची ही नामी संधी चालून आली आहे. त्याने फ्रेंच सैन्यातील अधिकाऱ्यांना धमक्या दिल्या. अधिकारी चकीत झाले. त्यांनी त्यांना शांत करण्याचा प्रयत्न केला. मग फ्रेंच गव्हर्नरने जेसुइट हे विनाकारण दंगल माजवितात असे फ्रेंच दरबाराला कळविले. तरीपण जेसुइटांचे भांडणे लावणे, दंगली माजविणे हे प्रयत्न चालूच आहेत.

कर्नाटकचा कारभार करण्यासाठी दाऊदखान येऊन जवळ जवळ पाच वर्षे झाली. डचांनी त्याच्याकडे भेटी पाठवून आपल्याला पाँडिचेरीच्या उत्तरेस १० मैलांवर समुद्राच्या काठावर असलेले कनीमेडू हे गाव द्यावे. अशी विनंती केली दाऊदखानाने ती विनंती मान्य केली. गाव वाढविण्यासाठी डचांनी पाँडिचेरी आणि इतर गावे येथून माणसांनी यावे म्हणून आमंत्रण दिले. तुमच्या धर्मात आम्ही ढवळाढवळ करणार नाही, अशी डचांनी हमी दिली. आज तो गाव भरभराटीस आहे आणि त्यांना[1] आपल्या प्रजेला संतुष्ट राखता येत नाही. अशांची मात्र कमालीची हानी होत आहे.

**मराठ्यांनी सुरत लुटले** : इ. स. १७०६ च्या मार्च महिन्यात मराठ्यांनी सुरत आणि त्याच्या भोवतालच्या प्रदेश लुटण्याकरिता आक्रमण केले. मराठ्यांनी या मोहिमेत गणदेवी[2] हे गाव लुटून उध्वस्त केले. हे गाव सुरत आणि दमण या दोन गावांच्या मधोमध आहे. या गावात अनेक व्यापारी राहत होते. त्यामुळे गावात संपत्ति बरीच होती.

१. पाँडिचेरीतील फ्रेंच आणि जेसुइट लोक.

२. गणदेवी–हे गाव सुरत जिल्ह्यात आहे. सुरतेपासून दक्षिणेस ३० मैलांवर गणदेवी हे गाव आहे.

मराठे गणदेवी लुटत असताना योगायोगाने सुरत शहराचा काजी गणदेवीत आलेला त्यांना आढळला. काही रकमेची वसुली, काही हिशेब तपासणी आणि काही फेरफटका म्हणून तो गणदेवीला आला होता. वेळेवर त्याला गणदेवी सोडून पळून जाता आले नाही. तो मराठ्यांच्या तावडीत सापडला. त्याच्याकडून पैसे काढून घेण्यासाठी मराठ्यांनी त्याला अनेक प्रकारे पीडा दिली. तिच्यामुळे तो मरण पावला. त्याला मिळालेली ही शिक्षा योग्यच होती. कारण तो प्रजेला पीडा देत असे. इतकेच नव्हे तर न्यायाधीश म्हणून ही त्याची वागणूक अतिशय अन्यायाची असे.

मक्केला जाणारी जहाजे पोर्तुगीजांनी धरल्याबद्दल मोगल व्यापारी बादशहाकडे सतत तक्रार करीत होते. बादशहाने अनेक वेळा पोर्तुगीजांना लिहून जहाजांची परत मागणी केली. पण पोर्तुगीजांनी ते कबूल केले नाही. यामुळे रागावून बादशहाने पोर्तुगीजांच्या तर्फे आलेला आग्र्याचा रेक्टर फादर डार्बो याला त्रास देऊन छावणीतून हाकलून लावले. यानंतर बादशहाने, दमणच्या पोर्तुगीजांना शिक्षा करावी म्हणून सुरतेच्या सुभेदाराला आज्ञा केली. मोगल सुभेदार ६ हजार पायदळ आणि घोडेस्वार घेऊन दमणच्या दिशेने निघाला. पोर्तुगीज लोकवस्तीतील लोक घाबरून पळून गेले. पण सुभेदाराने दिलासा देऊन त्यांना परत आणले. यानंतर दमणहून ४ मैलांवर असलेल्या एका लहानशा पोर्तुगीज किल्ल्यावर सुभेदाराने हल्ला केला. किल्ल्यात ४० शिपायी आणि ५ तोफा होत्या. दीड तासाच्या हल्ल्यानंतर किल्ल्याचा पाडाव झाला. या सुमारास सुभेदारास कळले की, डचांची ७ जहाजे सुरतेच्या बंदरात आली आहेत. हे ऐकून सुभेदार पोर्तुगीज इलाख्यातून निघून सुरतेकडे परत गेला.[1]

या ठिकाणी हिंदु हे सर्वत्र काय बोलतात हे मी (मनुचि) सांगतो. अर्थात माझा त्याच्यावर विश्वास नाही. हिंदूंच्यामध्ये जी भविष्ये वर्तविली गेली आहेत, त्यात असे म्हटले आहे की औरंगजेबाच्या मृत्युनंतर तैमूरलंगाचा वंश संपुष्टात येईल आणि हिंदुस्तानावर प्राचीन काळाप्रमाणे हिंदुचे राज्य चालू होईल. काय घडणार आहे ते काळच दाखवील. मला आणखी आयुष्य लाभले तर त्याचा वृत्तांत मी देईनच.

**बहादूरखानास कैद व त्याची मराठ्यांच्याकडून मुक्तता :** सुमारे ५ वर्षांपूर्वीची गोष्ट. मी (मनुचि) काही वाटाघाटी करण्यास नवाब दाऊदखान याच्याकडे गेलो होतो.[2] एके दिवशी रात्री माझी त्याच्याशी काही चर्चा चालू असता, बादशहाकडून त्याला एक पत्र आले. त्याचा आशय असा की, पत्र वाचताच तुमच्या सैन्यातील अधिकारी बहादूरखान याला तावडतोब कैदेत टाकावे. हा हुकूम पार

१. ऑक्टोबर १७०३.

२. मनुची हा १७०१ मध्ये दाऊदखानाला अर्कॉट येथे भेटला त्यावेळचा उल्लेख असावा.

पाडण्यासाठी नबाब दाऊदखानाने एक मोठेच कारण सांगून त्या अधिकाऱ्याला बोलावू पाठविले. कारण असे दिले की, दरबारातून एक चांगली बातमी आली आहे, आणि ती तुम्हाला तावडतोब कळविणे आवश्यक आहे.

ही बातमी खरी असावी या समजुतीने, तो अधिकारी एकाही शिपायाला बरोबर न घेता वरिष्ठासमोर हजर झाला. तावडतोब त्याला पकडण्यात आले. त्याच्या हातापायात बेड्या घालण्यात आल्या आणि अर्काटच्या किल्ल्यात त्याला कैदेत ठेवण्यात आले. तेथे तो खितपत पडला होता. त्याच्यावर कडक पाहारा ठेवला होता. बहादूरखान हा दाऊदखानाच्या हाताखालचा अधिकारी असून त्याच्याकडे २०० घोडेस्वारांची तुकडी होती. शिवाय अनेक हत्तीही त्याच्याकडे होते.

बहादूरखानला कैदेत का टाकण्यात आले? त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवण्यात आले होता. मराठ्यांशी गुप्तपणे त्याचा पत्रव्यवहार चालू आहे, अशाच प्रकारचा पत्रव्यवहार तो इतर बंडखोर राजांशीही करत असतो. या आरोपात तथ्य असले पाहिजे कारण मराठ्यांनी बहादूरखानाला सोडविण्याचा आणि त्याला आपल्या नोकरीत घेण्याचा प्रयत्नात प्रयत्न केला. या प्रयत्नात त्यांना यश आले.

मराठ्यांनी त्याच्या मुक्ततेसाठी एका धनगरचा उपयोग करून घेतला. हा धनगर कैद्याला पिण्याकरिता रोज एक भांडे भरून दूध नेत असे. या भांड्यात काही अवजारे लपवून पाठविण्यात आली. त्यांच्यायोगे बहादूरखानाने आपल्या बेड्या सोडविल्या. मुसलमानांचा रमजानचा सण (इ. स. १७०६)[१] होता. त्या दिवशी बहादूरखानाने पळून जावे असे ठरले होते. हा दिवस उजाडला. बहादूरखानाने आपण आजारी असल्याचे सोंग केले. पहारेकरी त्याला सोडून नाच, गाणे व आतषबाजी पाहण्यासाठी निघून गेले.

त्या क्षणी बहादूरखान किल्ला सोडून निघाला. बाहेर घोडे घेऊन त्याचे मित्र त्याची वाट पाहात होते. त्यांच्याबरोबर तो निघून गेला आणि अधोनी प्रदेशात असलेल्या मराठा सैन्याला जाऊन मिळाला. त्यांनी त्याचे आनंदाने स्वागत केले आणि त्याच्या नेतृत्वाखाली सैन्याची एक तुकडी लावून दिली. दाऊदखानाला, बहादूरखानाने मी लवकरच सूड घेण्यास येत आहे असा निरोप पाठविला. यामुळे दाऊदखान फार अस्वस्थ झाला.

वाकिनखेड्याच्या मोहिमेनंतर औरंगजेबाने जवळच असलेल्या कृष्णा नदीच्या काठावर छावणी घातली. विजापूर राज्याचे अंकित असे लहान मोठे जमीनदार यांच्या विरुद्ध चालून जाण्यासाठी, त्याने झुल्फिकारखान यास एका दिशेने आणि

१. ही घटना १७०१ मध्ये घडली असावी. तारीख ११ मार्च १७०१. कारण मनुचि हा अर्काट येथे दाऊदखानाला भेटून ३ फे. १७०१ रोजी मद्रासला परतला होता.

चिन-किलीचखान[1] यास दुसऱ्या दिशेने पाठविले. या सरदारांनी जमीनदारांशी लढून मुबलक पैसे गोळा केले. एका जमीनदाराकडून ३० हजार रुपये आणि दुसऱ्याकडून २० हजार रुपये असे पैसे वसूल झाले. औरंगजेबाने बक्षिस म्हणून ही रकम त्या सरदारांच्याकडे राहू दिली आणि जमीनदारांचा संपूर्ण नाश करण्यासाठी प्रयत्नशील राहण्यास त्यांना आज्ञा केली. ही बादशाहाची सवयच आहे. अर्थात त्याच्या आज्ञा तंतोतंत पाळल्या जात नाहीत.

दरम्यान, म्हैसूरवरच्या स्वारीची तयारी म्हणून त्या भागाची पाहणी करण्यासाठी त्याने लोक पुढे पाठविले. स्वारीची ही नुसती हूल उठविण्यात आली होती. असाच प्रकार तंजावर व त्रिचनापल्ली येथील राजांच्या बाबतीतही करण्यात आला. या राजांना भिवविण्याचा व त्यांच्याकडून पैसे उकळण्याचा त्याचा इरादा होता. दाऊदखान हा वाकिनखेड्याच्या मोहिमेत हजर होता. वरील हेतूने औरंगजेबाने त्याला कर्नाटकात परत पाठविले.

वाकिनखेडा जिंकल्यावर बादशहाने जवळच छावणी केली होती. मराठे, तो प्रदेश सोडून आपल्या देशात परत गेले. त्यांच्या देशातील किल्ले औरंगजेबाने जिंकून घेतले होते. त्यात त्याला अनेक वर्षे खर्ची घालावी लागली होती. पण मराठ्यांनी अवघ्या तीन महिन्यात ते सगळे किल्ले परत जिंकून घेतले.

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे दाऊदखान कर्नाटकात परतला. युरोपियनांनी त्याच्याकडे भेटी पाठविल्या. फ्रेंचांची भेट मात्र त्याने स्वीकारली नाही. फ्रेंचांनी डचांकडून घेतलेले 'फिनिक्स' हे जहाज व त्यावरील माल हा डचांना परत करावा, अगर आपल्याला एक लाख रुपये द्यावे अशी त्याने मागणी केली. फ्रेंच गव्हर्नर मार्टिन याने दाऊदखानाची ही मागणी नाकारली. पण आपल्या संरक्षणाची तयारी करीत असतानाच मार्टिनने दाऊदखानाशी वाटाघाटी चालू ठेवल्या. तडजोड झाली. अद्यापपर्यंत दाऊदखानाने फ्रेंचांना काही त्रास दिला नाही. धमक्या मात्र तो देत असतो. पण ही या लोकांची पद्धतच आहे.

**म्हैसूरच्या राजाने औरंगजेबास पाठविलेली खंडणी मराठे लुटतात :** म्हैसूर राजानेही औरंगजेबाशी लढण्याची तयारी ठेवली. मोगल साम्राज्यातील बेकार असलेले पठाण, रजपूत, मोगल इत्यादी त्याला जाऊन मिळाले. त्यांची संख्या १५ हजार होती. म्हैसूरच्या राजापाशी स्वतःचे असेही बरेच मोठे सैन्य होते. तरीपण म्हैसूरच्या राजाने औरंगजेबाला दीड कोटी रुपये आणि पाच हत्ती देऊ केले. याशिवाय आपण दुप्पट खंडणी देत जाऊ असेही त्याने कळविले. औरंगजेबाने म्हैसूरच्या राजाचे म्हणणे मान्य केले. राजानी पाठविलेली ही रकम घेऊन येण्यासाठी त्याने

१. पुढे प्रसिद्धीस आलेला निजाम घराण्याचा संस्थापक निजाम उल्मुल्क.

एक हजार स्वार पाठविले. मराठ्यांना याची बातमी लागली. त्यांनी वीस हजार स्वारानिशी वरील मोगलांचा पाठलाग केला. हे पाहून मोगल घाबरून खजिन्यासहित एका किल्ल्यात जाऊन बसले अद्यापपर्यंत तो खजिना ह्या किल्ल्यात पडून आहे.

**औरंगजेब बादशहाचा आजार :** या वर्षाच्या ( १७०५ ) च्या सप्टेंबर महिन्यात औरंगजेब आजारी पडला.[१] बारा दिवस तो दरबारात आला नाही. बादशहाच्या आजाराने छावणीत एकच हाहाःकार उडाला. एकदा बादशहाची शुद्ध गेली. तीन तास बेशुद्ध होता. तो एक शब्दही बोलू शकला नाही. छावणीमधील बहुतेकांची समजूत तो मेला अशी झाली. राजपुत्र कामबक्षला असेच वाटले. त्याने छावणी-वर ताबा मिळविण्यासाठी वजीर असदखान याला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले, "तुम्ही निश्चित राहा. तुम्हाला कोणी त्रास देणार नाही." असदखानाने त्याला पुढीलप्रमाणे मोघम उत्तर पाठविले, "परमेश्वर बादशहांना दीर्घायुष्य देवो ! आणि त्यांना जर मरण आले, तर त्यांच्या चार मुलांपैकी जो गादीवर येईल, त्याला सर्व संपत्ति, सर्व खजिना आणि सर्व सेना देणे मला भाग आहे. मी ती त्याच्या स्वाधीन करीन."

औरंगजेबाला, त्याच्या आजारीपणात, कामबक्ष व वजीर यांच्यात काय घडले, ते कळले. वजीराची निष्ठा पाहून त्याला फार समाधान वाटले. बादशहाने त्याचा हुद्दा वाढविला. तथापि काही विश्वासघात होईल, काही बंडाळी माजेल ही त्याला भीति वाटत होती. आपण दरबारात दिसलो नाही तर गडबड उडण्याचा संभव आहे, असे वाटून औरंगजेब हा अशक्त अवस्थेतही दरबारात गेला, आणि तेथे अर्धा तास बसून राहिला त्यामुळे तर्ककुतर्कांना आळा बसला आणि छावणीतील लोक शांत झाले.

औरंगजेबाची प्रकृति चिंताजनक झाली होती, त्या सुमारास, अशा वेळच्या शिरस्त्याप्रमाणे, काही उमरावांनी बारा उंटावर सोन्याची नाणी लादून ती जवळच्या किल्ल्यात नेऊन ठेवण्याचा प्रयत्न केला, पण बादशहाच्या खजिन्यावरील अधिकाऱ्यांनी त्यांना मनाई केली. बादशहा पुनः दरबारात आला तेव्हा ही गोष्ट त्याच्या कानावर घालण्यात आली. त्याने तो पैसा हस्तगत करण्याकरिता तावडतोब लोक पाठविले. त्या पैशाच्या मालकांचा पत्ता लागू नये म्हणून बरोबर असलेले लोक पळून गेले. नंतर हा पैसा सैन्याचा पगार वाटण्याकरिता खर्च करण्यात आला. कारण त्यांना कित्येक वर्षे पगार वाटलाच गेला नव्हता. पगाराच्या या वाटपामुळे सैन्यांत आनंदीआनंद झाला. त्या पैशांच्या मालकांचा मात्र शोध लागला नाही.

---

१. पावसाळ्यात (जून ते ऑक्टोबर,) १११७ हि. (एप्रिल २४, १७०५ ते एप्रिल १३, १७०६) औरंगजेबाने आपली छावणी वाकिनखेडपासून ३ कोसांवर असलेल्या देवापूर या गावी घातली. तेथे तो आजारी पडला. शक्यतोवर ही बातमी गुप्त ठेवण्यात आली. पण आजार वाढून त्याची शुद्ध जाऊ लागली. असे बारा दिवस चालले होते. यानंतर तो हळूहळू बरा झाला आणि दरबारात येऊ लागला. (मासीरे आलमगिरी पा. ५०७-५०९).

ज्या हकीमाने बादशहाच्या या आजारात औषधोपचार केला, तो मुरशीनखानाचा मुलगा आहे. (खंड ३ रा) या हकीमाला आपल्या बापाची पदवी मिळाली आहे. औषध योजनेत त्याला यश मिळाल्याबद्दल बक्षिस म्हणून त्याची चांदीच्या रुपयांनी तुला करून ते रुपये त्याला देण्यात आले. हे रुपये साडे-सहा हजार भरले होते म्हणून त्यात पाचशे रुपये अधिक घालून एकंदर सात हजार रुपये त्याला बक्षिस देण्यात आले.

या आजारातून उठून बादशहा हिंडू फिरू लागला तेव्हा पावसाळ्याचे दिवस संपले होते. मग त्याने नद्यांतील पाण्याचा अदाज घेण्यासाठी लोक पाठविले. कारण त्याला आता म्हैसूरवर स्वारी करायची होती. आणि तशा धमकीचे पत्रही त्याने त्या राजाला पाठविले होते. इतक्यात बातमी आली की, आग्रा भागातील मेवू-तांनी बंडाळी माजविली, उपनगरे लुटली आणि त्या भागातील सर्व रस्ते बंद केले.[1] नंतर थोड्याच दिवसांनी इतर बातम्या आल्या की, काबुल व सिंधू नद्यांमधील प्रदेशातील पठाणांनी बंड पुकारले आणि बादशहाचा मुलगा शाहा आलम याच्या फौजेतील अनेक सैनिकांना ठार केले.

या बातम्यांमुळे म्हैसूरच्या स्वारीचा बेत बारगळला आणि बादशहा औरंगाबादे-कडे रवाना झाला. (औरंगाबाद नव्हे, अहमदनगर, पाहिजे.) बादशहा, अहमद-नगरकडे परतत असताना, मराठे त्याचा सतत पाठलाग करीत होते. अहमदनगर येथे औरंगजेबाला कळले की, आपण मेलो असे समजून आपला मुलगा आणि गुजरातचा सुभेदार आझम याने मोठ्या सैन्यासह आग्र्याची वाट धरली आहे असे कळले. आझमला विरोध करण्यासाठी दुर्गादास १२ हजार स्वार घेऊन पुढे आला. राजपुत्र अकबर याने जेव्हा बंड केले तेव्हा त्याला पाठिंबा देणारा जोधपूरचा दुर्गा-दास तो हाच. प्रथम आझमला वाटले की दुर्गादास आपल्याला मिळण्यासाठी येत आहे. पण दुर्गादास जवळ आल्यावर खरी वस्तुस्थिती उघडकीस आली चकमकीत ४०० रजपूत आणि आझमची १,२०० माणसे अशी हानी झाली. यामुळे आझमला गुजरातकडे परतावे लागले.[2]

**औरंगजेब याला त्याच्या मोहिमांत आलेले अपयश :** म्हैसूरवर स्वारी करण्याची औरंगजेबाची इच्छा होती. पण वरील प्रकारच्या बंडाळीमुळे त्याला म्हैसूरची स्वारी सोडून द्यावी लागली. तो आपल्या मर्जीविरुद्ध अहमदनगरकडे (औरंगाबादकडे नव्हे) परतला.[3] वरील बंडाळीमुळे बादशहा फार अस्वस्थ झाला. आपण आतापर्यंत

१. मथुरेजवळील सनाम्सी हे राजाराम जाट याचे अगत सुरक्षित असे स्थान होते. १११७ हि. (२० ऑक्टोबर १७०५) येथे हा दुसऱ्यांदा हल्ला झाला.

२. वरील घटनेस विश्वसनीय आधार सापडत नाही.

३. बादशहाने रजबच्या १६, १११७ हि.—२ नो. १७०५ ला देवापूर सोडले. तो रमजान १७ डिसेंबर १७०५ ला बहादूरगडला आणि शव्वाल १६ ला — ३१ जानेवारी १७०६ ला अहमदनगरला पोहोचला (मसीरे-आलमगिरी पा. ५१० ) औरंगाबाद ऐवजी अहमद नगर वाचावे.

केलेल्या मोहिमांना पाहिजे तसे यश मिळाले नव्हते याची त्याला जाणीव होती. बादशहा सतत पायपीट करीत असतो, आणि त्याच्या ह्या स्वाऱ्या निष्फळ निरर्थक होत अशा प्रकारचे टिंगलीचे उद्‌गार सामान्य जनता काढू लागली होती. हे थांबविण्यासाठी बादशहाने जाहीर केले की आपल्या स्वाऱ्यांच्याबद्दल कोणी टिंगलीचे उद्‌गार काढील तर त्याची जीभ हाडसून काढण्यात येईल.

या जाहीर हुकुमानंतर जेव्हा सैन्य निघाले तेव्हा कोणतीच वाद्ये वाजत नव्हती. सर्व सैन्य मुकपणे चालले होते. सैन्याच्या या चालीवरून, आपल्या नशिबी पुनः परतायचे असावे अशी सैन्याची भावना झाली असावी असे वाटत होते. अशा परिस्थितीत मोगल सैन्य १५ दिवस कूच करीत होते. कुचाच्या दुसऱ्या दिवशी पुढील घटना घडली. मोगलांच्या पुढील मुक्कामाचे तंबू आणि सरंजाम पुढे पाठविण्यात आला होता. मराठ्यांनी त्याच्यावर हल्ला केला. या हल्ल्यात मोगलांची एक हजार सेना मारली गेली. बादशहाच्या खास निवासस्थानाचा तंबू जाळून टाकण्यात आला. या चकमकीत मोगल अधिकारी जखमी झाला. त्याच्या डोळ्यांना गोळ्या आणि बाण यांच्या जखमा होऊन त्याची दृष्टी गेली. मराठ्यांनी त्याला पकडले आणि एका किल्ल्यात कैदेत ठेवले. त्याची सुटका करण्यासाठी त्यांनी त्याच्याकडून ५ लाख रुपयांची खंडणी मागितली.[1]

खुद्द बादशहावर हल्ले करण्यास मराठ्यांना अनेकदा आणि अनेक प्रकारे संधी मिळत. पण त्यांनी मुद्दामच त्यांचा उपयोग करून घेतला नाही. मराठ्यांच्या हातात मोगलांची संपत्ति सारखी येत होती. औरंगजेब जीवंत होता तोपर्यंत असेच चालू राहणार होते. मग त्याला मारण्याची इच्छा त्यांनी का करावी ? औरंगजेब हा मोगल साम्राज्याचा अधिपती. खंडणी, महसूल, व्यापार इत्यादींच्या निमित्ताने मुबलक खजिने बादशहाच्या छावणीत सतत येत. हल्ले करून ते खजिने ताब्यात घेण्यातच मराठ्यांचा फायदा होता.

**राजारामाचा मुलगा (दुसरा) शिवाजी गादीवर येतो :** रामराजाचा (राजारामाचा) मुलगा शिवाजी[2] (दुसरा) याला गादीवर बसविण्यात आले आहे, असे औरंगजेबाला कळले. हा मुलगा लहान असला तरी मराठे मोहीम चालूच ठेवणार

१. समकालीन इतिहासकार भीमसेन सक्सेना आपल्या तारीख दिल कुषामध्ये पुढीलप्रमाणे लिहीतो, बादशहासमोर अर्जी ठेवण्याच्या कामावरचा दारोगा सीयादतखान हा मराठ्यांच्या कैदेत सापडला होता. त्याने खंडणी भरून आपली सुटका करून घेतली आणि तो बादशाही छावणीत पोहचला. बंदुकीच्या गोळ्यांनी आणि बाणांनी त्याचे दोन्ही डोळे जाया होऊन तो पूर्ण आंधळा बनला होता. (१७०५ अखेर)

२. शिवाजी (दुसरा) हा रामराजा (राजाराम) व ताराबाई यांचा मुलगा. याचा जन्म १६९० च्या सुमारास झाला असावा. तो १७१२ सालेबारीत मरण पावला. (खेटाफ इतिहास १७५, १७८).

हेही त्याला समजले. यावेळी मराठ्यांच्यापाशी घोडदळ आणि पायदळ मिळून दोन लाखांचे सैन्य आहे. मराठे हे अत्यंत धाडसाने सतत मोहीम करीत आणि लुटालूट करीत चारी दिशेने फिरत असतात.

औरंगजेबाचा मुलगा राजपुत्र आझमतारा : औरंगजेबाच्या सर्व मुलांपैकी आझमताराबद्दल लोकांना जास्त आदर वाटतो. शाहा आलमबद्दल सरदार आणि राजपुत्र यांना तिटकाराच वाटतो. शाहा आलमला जेव्हा औरंगजेबानी कैद केले[1] त्यावेळी वजीर असदखानाने शाहा आलमची तलवार काढून घेतली. सरदार शाबि-उद्दिनखान याने शाहा आलमच्या पायात बेड्या घातल्या आणि इतर सरदारांनी शाहा आलमच्या लोकांबरोबर अशिष्ट वागणूक केली. वरील कारणांमुळे ही मंडळी आझमच्या पक्षाची आहेत. याशिवाय आणखी एक कारण आहे. आझमची आई ही शाहानवाझखानाची मुलगी होती. शाहानवाझखान हा इराणच्या राजघराण्यापैकी होता. असे असले तरी गादीवर कोण येणार हे परमेश्वराच्या इच्छेवरच अवलंबून आहे. राजपुत्र शाहा आलम हा आता ६६ वर्षे वयाचा झाला आहे. तो आपल्या सैनिकांची निगा ठेवीत नाही. त्यांची उपासमार होते. महत्त्वाच्या कामाकडेही त्याचे विशेष लक्ष नसते. मदिरा आणि मदिराक्षी यांच्या अमर्याद उपभोगात त्याचा सर्व वेळ जातो.

म्हैसूरच्या राजाने खंडणी म्हणून बादशहाकडे मुबलक रकम पाठविली होती. ती मराठ्यांच्या हातीं पडेल अशा भितीने मोगलांनी एका किल्ल्यात ठेवली होती; हे मागे सांगितले आहे. औरंगजेब वाकिनखेड्याहून अहमदनगरकडे परत चालला आहे हे पाहून म्हैसूरच्या राजाने त्या किल्ल्यातील मोगलांना लाच चारून किल्ला—सिर्पी किल्ला[2]—१८ एप्रिल[3] रोजी घेतला.

औरंगजेबाची हानी किती होत चालली आहे याची वरील घटनांवरून कल्पना यावी, असे असूनही औरंगजेब मोहिमा चालविण्याची जिद्द बाळगूनच आहे. आपले सैन्य, आपल्या मोहिमा, आपल्या लढाया, यांचा काही परिणाम होत नाही हे त्याला पूर्णपणे पटले आहे. पण त्याला आपल्या कुटिल नीतीवर पूर्ण भरवसा आहे. त्याने आपल्या कैदेत असलेल्या संभाजीच्या मुलाला[4] मुक्त केले (खंड दुसरा १४६) आणि त्याला झुल्फिकारखानाच्या स्वाधीन केले.[5] यानंतर त्याने मराठा सरदारांना

१. गोवळकोंडा प्रकरण.

२. सिर्पी—सध्याच्या कर्नाटक राज्यातील मध्य भागात असलेला 'सिरा' हा किल्ला असावा.

३. इ. स. १७०६.

४. शाहू.

५. शाहू हा संभाजीचा मुलगा. हा बादशहाच्या छावणीत राहत होता. २१ शव्वाल ११२७ फे. ९, १७०६ला काही राजकीय कारणामुळे याला झुल्फिकारखानाच्या देखरेखीखाली ठेवण्यात आले. त्याचा

पुढीलप्रमाणे पत्रे लिहिलीं. शाहुला मी बंधमुक्त केले आहे. तुम्ही यावे आणि तुमच्याच राजाची सेवा बजवावी. तुमच्या सरंजामासाठी मी तुम्हाला दक्षिणचा सुभा आणि याचे इलाखे यांच्या उत्पन्नाचा १/१० (एक-दशांश) भाग देण्यास तयार आहे."

मराठे सरदारांनी बादशहाला पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले, "राजारामाचा मुलगा शिवाजी याला आम्ही आपला राजा मानले आहे. आम्ही त्याची आज्ञा पालन करतो आणि त्याची सेवा बजावण्यात आम्ही वचनबद्ध आहोत बंधमुक्त शाहुला आम्ही कोणत्याही परिस्थितीत मान्यता देण्यास तयार नाही. दक्षिण सुभ्याच्या उत्पन्नाचा १/१० भाग आपण आम्हास देऊ करीत आहात. त्यासाठी आपण कष्ट घेण्याचे कारण नाही. कारण आमच्या सैन्याच्या बळावर ती रक्कम आम्ही वसूल करणारच आहोत."

**मराठ्यांची आक्रमणे :** मराठ्यांनी औरंगजेबाला वरील प्रकारे उत्तर पाठविले. यानंतर मराठ्यांनी नर्मदा ओलांडली आणि उत्तर भारतात आक्रमण केले; त्याच्याही पुढे जाऊन बंगालला लागून असलेल्या ओरिसा प्रांताच्या सदरीवर पोहोचले. त्यांनी पुढे आक्रमणे करून बंगालमधील ढाका, राजमहाल इत्यादी शहरेही लुटली असती त्यात काही संशय नाही, पण एका हिंदु राजाने[1] आपल्या राज्यातील डोंगरी वाटा अडवून धरल्या. मराठ्यांना परतावे लागले. पण या मोहिमेत त्यांनी बरीच संपत्ति आणली. उत्तरेच्या दिशेने आक्रमण करण्याची मराठ्यांची ही तिसरी खेप होय.

फेब्रुवारी[2] महिन्यात मराठ्यांचे ४० हजारांचे सैन्य गुजरात प्रांतात चालून गेले. त्यांनी सुरत प्रदेशात लुटालुट केली. हे सैन्य भडोच शहरापर्यंत जाऊन पोहचले. त्याला प्रतिकार करण्यासाठी मोगल सेनाधिकारी नझर अलीखान आणि ख्वाजा हमीद-खान हे सहा हजार सैन्य घेऊन त्यांच्यावर चालून आले. या लढाईत[3] (४ मार्च १७०६) मोगलांचा पाडाव झाला. वरील दोन सेनापतींची मुले मारली गेली आणि सेनापती खुद्द मराठ्यांच्या हाती सापडले. मराठ्यांनी त्यांच्याकडून आठ लाख रुपयांची खंडणी मागितली.

---

तंबू नजिकच ठोकण्यात आला. त्याला खिलातीची वस्त्रे देण्यात आली (मासीरे-आलमगिरी पा. ८११). त्याला दिलेल्या सरदेशमुखीचा (१० टक्के रेव्हन्यू) उत्पन्नाचा भाग व मराठा अधिकाऱ्यांना लिहिलेल्या पत्रांचा ग्रँट डफने उल्लेख (इतिहास पा. १७९–१८०) केला आहे. त्याकरिता त्याने खाफीखानाचा आधार घेतला आहे.

१. वेबरीजच्या मते हा छोटा नागपूरातील पालमौचा राजा असावा.

२. इ. स. १७०६.

३. याला रतनपूरची लढाई म्हणतात.

रामगीर[1] या किल्ल्यावर महम्मदखान हा किल्लेदार होता. औरंगजेबाने या किल्ल्यावर महम्मद रीझाखान[2] याची नेमणूक केली.[3] महम्मदखानाने या नेमणुकीला विरोध केला. पण रीझाखानाने त्याला कैद करून त्याचा विरोध मोडून काढला. आता हाच रीझाखान १५ हजार स्वार आणि ३० हजार पायदळ घेऊन रामगीरच्या भोवतालच्या मोंगल प्रदेशात धामधूम करीत आहे; आणि पैसे वसूल करीत आहे. गेल्याच वर्षी त्याने गोवळकोंड्याच्या मुलुखातून बरीच रक्कम वसूल केली आणि मच्छलीपट्टमपर्यंत धामधूम केली. अशा रीतीने तो मराठ्यांचेच अनुकरण करू लागला आहे.

१७०५ च्या मार्च महिन्यात मराठ्यांनी पेनुकोंड्याचा प्रबळ किल्ला जिंकून घेतला. हा किल्ला मोंगल कर्नाटकाच्या दोन्ही भागांवर[4] लक्ष ठेवण्यास फार उपयोगी होता. पेनुकोंडा[5] हे एकेकाळी विजयनगरच्या साम्राज्याच्या राजधानीचे शहर होते. ही बातमी कळल्यावर समुद्र किनाऱ्यावर छावणी करून युरोपियनांच्याकडून कर वसूल करीत असलेला दाऊदखान हा कर्नाटकात परतला. मराठे इतरत्र्यातील किल्ले घेतील की काय अशी त्याला भीती वाटली.

पोर्तुगीजांच्यावर मराठ्यांनी अनेक वेळा आक्रमणे केली. त्यांचे अगदी अलीकडील आक्रमण म्हणजे १७०६ च्या फेब्रुवारीतील होय. त्यांनी साष्टी[6] लुटली. गोव्याचा व्हॉइसरॉय केटेनो डिमेलो हा स्वतः त्यांच्यावर चालून गेला आणि त्यांना परतवून लावले. उभयपक्षी प्राणहानी झाली. व्हॉइसरॉय स्वतः चालून गेला नसता तर मराठे साष्टीच्या पुढेही गोव्याकडे गेले असते.

राजपुत्र आझमतारा हा औरंगाबाद (अहमदनगर पाहिजे) मुक्कामी औरंगजेबाला येऊन भेटला.[7] औरंगजेबाने त्याला मोठ्या प्रेमाने वागविले. तो त्याला म्हणाला, "माझे आता वय झाले आहे. काफरांच्या विरुद्ध यापुढे वार्धक्यामुळे युद्ध चालू ठेवणे मला शक्य होत नाही. आता काफरांचा सूड घेणे आणि त्यांचा नाश करणे हे काम तू केले पाहिजेस. सगळा दक्षिण म्हणजे विजापूर, गोवळकोंडा आणि त्याच्या खालील इलाखे हे आता आपल्या ताब्यात आले आहेत. माझी इच्छा आहे

१. रामगीर किल्ला हा आंध्रप्रदेशात करीमनगर जिल्ह्यात आहे.

२. महम्मद रीझाखान हा सुप्रसिद्ध सरदार आणि एके काळचा अर्काटचा फौजदार आणि नंतरचा वऱ्हाडचा नायब सुभेदार अलीमर्दानखान याचा मुलगा होय. जिंजीच्या मोहिमेच्या प्रसंगी मराठ्यांनी अलिमर्दानखान याला पकडला होता.

३. जुलै १७०५.

४. विजापूर कर्नाटक आणि गोवळकोंडा कर्नाटक.

५. पेनुकोंडा—हे आंध्रप्रदेशात अनन्तपूर जिल्ह्यात आहे.

६. साष्टी—ही गोव्याजवळील साष्टी होय.

७. ५ फेब्रुवारी १७०६.

की, येथून निघून जावे आणि विश्रांती घ्यावी. बादशहा हुमायूंच्या दर्ग्यात माझे दफन व्हावे. राजपुत्र आझमतारा म्हणाला, "आपण मला एक महिन्याची मुदत द्या. आपण जी कामगिरी मला सांगत आहात, ती पत्करावी किंवा नाही, याचा निर्णय मी या अवधीत घेईन."

मराठ्यांनी ४० हजार स्वार आणि पायदळ घेऊन नर्मदा ओलांडली होती हे मी ( मनूची ) पूर्वी सांगितले आहे. ते गुजरातेत दूरवर पसरले. त्यांनी अहमदाबादचे शहर लुटले.[1] आणि बरीच संपत्ति गोळा केली.

बहादूरखान नावाचा दाऊदखानाचा सरदार मागे कैदेतून पळाला होता असे मी यापूर्वी सांगितले आहे. तोच बहादूरखान आज पेनुकोंडा किल्ल्याचा किल्लेदार आहे. किल्ल्याच्या रक्षणासाठी त्याने १५ हजार स्वार आणि पायदळ बाळगले आहे.

या बहादूरखानाची थोडी पूर्वीची हकीगत सांगितली पाहिजे. दाऊदखानाच्या कैदेतून निसटल्यावर बहादूरखान हा मराठ्यांना मिळाला होता. पेनुकोंड्याचा किल्ला त्याच्यामुळे मराठ्यांना विनायास मिळाला, त्याची हकिकत अशी:– पेनुकोंड्याचा मोगल किल्लेदार रामदास नावाचा रजपूत होता. तो बहादूरखानाचा मित्र होता. रामदास आणि त्याची शिबंदी यांना बादशहाकडून कित्येक दिवस पगार मिळाला नव्हता. बहादूरखानाने रामदासला कळविले की, "माझ्या येण्यासाठी किल्ल्याचे एक दार मोकळे ठेवा. किल्ला मिळाला की मी तुम्हाला दहा हजार रुपये देईन. याशिवाय तुम्हाला आणि तुमच्या सैनिकांना चांगल्या पगारावर ठेऊन घेईन." किल्लेदाराने बहादूरखानाचे म्हणणे कबूल केले, पण एकदा प्रवेश मिळाल्यावर किल्लेदाराला पकडून त्याची मालमत्ता जमा करण्यात आली. त्याला सोडून देण्यासाठी मराठे आता ३ हजार रुपयांची मागणी करीत आहेत. किल्ला हाती आल्यानंतर मराठ्यांनी आता सिरा (सराई)[2] गावाला वेढा घातला आहे. बहादूरखान तेथेच आहे. मराठ्यांच्या आक्रमणाची दाऊदखानाला बातमी मिळाली असून तो मनातून अतिशय घाबरला आहे. आपल्याकडून शक्य ती तयारी तो करत आहे. या सुमारास हुकूम आला की वरील प्रदेशातून मराठ्यांना काढून लावावे. दाऊदखान स्वारीची तयारी करत आहे. बादशहाने त्याची मनसब वाढविली असून त्याला सहा हजारी मनसबदार केले आहे.

मराठे, विजापूर व गोवळकोंड्याचे बादशहा व इतर अनेक राजे यांच्या विरुद्ध औरंगजेब बादशहाने लढाई सुरू केलेल्यास आता शेहेचाळीस वर्षे झाली आहेत. युद्धाच्या सुरुवातीच्या काळात, त्याने युद्धाचे नेतृत्व सेनापतींच्यावर सोपविले होते आणि तो स्वतः साम्राज्याच्या शासनात लक्ष घालत होता. परंतु हे अधिकारी आपल्या

१. फेब्रुवारी १७०७.
२. सिरा हे म्हैसूर राज्याच्या (आता कर्नाटक राज्याच्या) तळदुर्ग जिल्ह्यात आहे.

अपेक्षेप्रमाणे वागत नाहीत, आणि पुरेसे तडफदारही नाहीत असे पाहून मी मागे सांगितल्याप्रमाणे १६८० साली त्याने सेनेचे नेतृत्व आपल्या हातात घेतले. गेली सव्वीस वर्षे बादशहा सतत रणांगणावर आहे. या काळात त्याने मी वर उल्लेखिलेले विजय संपादन केले आहेत.[1]

१७०६ मार्चला तो माघार घेऊन अहमदनगरास (औरंगाबादेस नव्हे) गेला. मागे सर्व प्रदेश उजाड झाला आहे. शेतात कोणतीच पिके नाहीत. झाडे झुडपे फार नाहीशी झाली आहेत आणि जागजागी माणसांची आणि प्राण्यांची हाडे पडलेली आहेत. कोठेही हिरवळ दिसत नाही. प्रदेश इतका उजाड आणि निर्जन झाला आहे की, तीन-तीन, चार-चार दिवसांच्या प्रवासात दिव्याचा अथवा चुलीचा प्रकाश दिसत नाही आणि शत्रुशी आपली गाठ पडेल की काय अशी लोकांना भीती वाटत असते.

आझमताराने औरंगजेबाला आपला निर्णय कळविण्याकरिता मागून घेतलेला महिन्याचा अवधी संपला होता. त्याने बादशहाला आपला निर्णय पुढीलप्रमाणे कळविला, "गेली सव्वीस वर्षे आपण आपली साधने, सामुग्री, संपत्ति आणि शक्तिही पणास लावून मराठे झटत आहात. तरी पण आपल्या इच्छेप्रमाणे, आपल्या शत्रुंना ताब्यात आणू शकला नाहीत. मी तर राजपुत्र, माझी शक्ती किती, आणि माझी साधने ती काय? मी हे काम कसे बरे करू शकेन? इतक्या महत्त्वाच्या मसलतीत स्वतःला गुंतवून घेण्यास मी उत्सुक नाही. माझी इच्छा एवढीच की आपल्या हुजुरात राहावे आणि इतर कोणा सेनाधिकाऱ्याप्रमाणे आपली सेवा करावी. राजपुत्र शाहा आलम हा माझ्याहून अधिक श्रीमंत आहे. त्याच्या पाठीशी त्याची चार मुले आहेत. युद्धाच्या या कामावर आपण त्याची नेमणूक करणे योग्य होईल."

याच सुमारास एक घटना घडली. बादशहाच्या खोजा नोकरांपैकी एकाने उद्धटपणा केला, असे वाटून कामबक्षाच्या दूध भावाने त्या खोजाचा खून केला. खुनी माणसाला आपणाला पकडण्यात येणार आहे असे कळले. त्याने कामबक्षाचा आश्रय घेतला. कामबक्षानेही त्याला आश्रय दिला. हे ऐकून बादशहाला अतिशय राग आला. त्याने कामबक्षाला कळविले की, "खुनी माणसाला जबरदस्तीने बाहेर काढण्यात येईल."

यावर कामबक्षाने आपल्या दूध भावाचा हात धरून दरबारात प्रवेश केला आणि तो म्हणाला, "माझ्या दूध भावाला जो हात लावील त्याला मी बजावून ठेवतो की, त्याच्या बरोबर माझीही मरणाची तयारी आहे." त्याचे हे बोलणे ऐकून औरंगजेबाने आपला राग लपविला आणि कामबक्षाला म्हटले, "अरे, तुझ्या दूध भावाला जीवदान दिले आहे. त्याला काही इजा करण्यात येणार नाही."

बापाचे हे बोलणे ऐकून भोळेपणाने कामबक्षाने आपल्या दूध भावाचा हात सोडला. त्याक्षणी कामबक्ष आणि त्याचा दूध भाऊ यांना पकडण्यात येऊन निःशस्त्र

1. विजापूर, गोवळकोंडा ही राज्ये खालसा करणे इत्यादी.

करण्यात आले. कामबक्षाला राजवाड्यात निर्बंधात ठेवण्यात आले. त्याच्या दुध भावाला दुसऱ्या ठिकाणी कैदेत ठेवण्यात आले. काही दिवसांनी कामबक्षाची आई उदेपुरी बेगम हिच्या विनंतीवरून कामबक्षाला मुक्त करण्यात आले. पण औरंगजेबाने कामबक्षाची चांगली कानउघाडणी केली आणि बोलावल्याखेरीज दरबारात हजर राहू नये अशी आज्ञा केली. आपली अवज्ञा करणाऱ्यांच्यावरील राग औरंगजेबाने अशा रीतीने व्यक्त केला.

१७०६ च्या मार्च महिन्यात कॅप्टन इम्नेशिओ हा मद्रासेला आला. तो मनिल्याहून (फिलिपाईन्स) मद्रासला परत आला होता. तेव्हा त्याने आपल्याबरोबर मनिल्याहून कुत्री आणली होती. त्यापैकी दोन कुत्री अतिशय हिंस्र होती. जनावरे काय, माणसे काय, यांना ते हल्ला करून मारून टाकीत. त्यांना साखळदंडांनी बांधून ठेवावे लागे. तिसरा कुत्रा मात्र पाळीव असून तो पांढरा शुभ्र, मोठा आणि देखणा होता. दाऊदखानाच्या विनंतीवरून कॅप्टन इम्नेशिओ याने वरील तीन कुत्री दाऊदखानाला भेट म्हणून दिली. या पाळीव कुत्र्याचे कौतुक काय सांगावे! त्याला पालखीतून नेण्यात आले. त्याच्या दिमतीला बरेच नोकर ठेवण्यात आले होते. दाऊदखानासमोर तो कुत्रा आणण्यात आला. खानाला फार आनंद झाला. तो त्यास पोटाशी धरून त्याचे मुके घेऊन, माझ्या भावा, माझ्या मित्रा असे म्हणू लागला. कुत्र्यासाठी सोन्याची साखळी तयार करण्यात आली. दाऊदखानाच्या पलंगाला कुत्र्याला बांधून ठेवण्यात येत असे. त्याला अन्न मिळे तेही दाऊदखानाच्या ताटातलेच.

**दाऊदखानाचे छंद** : दाऊदखानाला शिकारीचा फार नाद आहे आणि तऱ्हेतऱ्हेचे प्राणी बाळगण्यात त्याला अतिशय आनंद वाटतो. त्याच्या परिवारात तो वाघ, चित्ते, बहिरीससाणे वगैरे बाळगतो. त्याच्या जवळ एक हजार बदके आहेत. इतर पक्षीही अनेक आहेत. या पक्ष्यांच्या व प्राण्यांच्याकरिता तो वार्षिक अडीच लाख रुपये खर्च करतो. जेव्हा जेव्हा त्याला पोपट, काकाकुवा वगैरे पक्ष्यासंबंधी अथवा दुर्मिळ प्राण्यासंबंधी बातमी लागते, तेव्हा तेव्हा तो ते खरेदी करण्याकरिता माणसे पाठवितो. मग काहीही किंमत पडो, त्याचा तो विचारच करीत नाही.

एकदा मद्रासच्या एका बच्च थ्यु कडून दाऊदखानाने एक दुर्मिळ माकड विकत घेतले. काही दिवसांनी ते मेले. त्याच्या मृत्यूचा शोक अनावर होऊन त्याची हयगय केली म्हणून दाऊदखानाने रखवालीवर नेमलेल्या माणसाला ठार मारावे म्हणून आज्ञा केली. आपण घेतलेली कुत्री किती हिंस्र आहेत हे पाहाण्यासाठी त्याने ती कुत्री दोन गुन्हेगारांवर सोडून त्यांचे तुकडे तुकडे करून घेतले होते.

कधी जनावरावर तर कधी गरीब माणसावर तर गरीब भिकाऱ्यावर ही कुत्री सोडण्याचा दाऊदखानाला छंद होता. एकदा त्याने अधिकाऱ्यावरही कुत्री सोडली.

यामुळे चिडून त्याच्या अधिकाऱ्यांनी ती कुत्री मारून टाकली. ती पाळविण्यास दाऊदखान धावून गेला, तेव्हा त्यालाही जखमा झाल्या. छावणीत एकच गोंधळ माजला. दाऊदखानाला वेड लागले आहे असे ठरवून त्याचे अधिकारी त्याच्या पायात बेड्या घालण्याचा प्रयत्न करू लागले. दाऊदखानाला हे कळले. आपला सर्वनाश होणार हे पाहून तो प्रत्येक अधिकाऱ्याकडे जाऊन त्याच्या पाया पडला आणि त्याने त्यांची क्षमा मागितली. अशा रीतीने ही दंगल शांत झाली.

या सुमारास दाऊदखानाकडे बादशहाचे चार दंडधारी नोकर बादशहाचा हुकूम घेऊन आले. दाऊदखानाने पेनुकोंड्याच्या किल्ल्याकडे ताबडतोब कूच करावे आणि मराठ्यांच्याकडून तो परत घेण्यास झटावे अशी बादशहाची तातडीची आज्ञा होती. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे दाऊदखानाने १ जुलै १७०६ रोजी कूच केले. पेनुकोंडा किल्ल्याजवळ आल्यावर त्याची खात्री पटली की हा किल्ला शस्त्रांच्या बळावर घेणे शक्य नाही म्हणून त्याने पेनुकोंड्याचा किल्लेदार हिंदुराव[1] यास ७ लाख रुपये देऊ केले. हिंदुरावाने वेढा लढविण्याचे सोंग करून ११ ऑगस्ट १७०६ रात्री किल्ला दाऊदखानाला देऊन टाकला. मोगल अधिकाऱ्यांनी अशीच पद्धत आहे. अशा रीतीने ते किल्ले घेतात. बादशहा त्यांचा मानमरातब आणि पगार वाढवितो. इकडे या अधिकाऱ्यांची शत्रुशीही (मराठ्यांशी) मैत्री टिकून राहते. मराठे तर काय, आपले सैन्य बाळगण्यासाठी म्हणून ते वाटेल त्या बाजूनी पैसे गोळा करतात.

**राजपुत्र अकबराचा इराणमध्ये मृत्यु :** इ. स. १७०६ च्या एप्रिल महिन्यात राजपुत्र शाहा आलम याने औरंगजेबाला पत्र पाठविले. इराणमध्ये असलेल्या राजपुत्र अकबरजवळ असलेले मोगलांचे हेर यांनी पाठविलेली पत्रेही शाहा आलमने आपल्या पत्राबरोबर पाठविली. त्यावरून राजपुत्र अकबर याचा इराणमध्ये मृत्यु झाला हे बादशहाला कळले.[2]

या आनंददायक बातमीची तो कित्येक दिवस वाट पाहत होता. पण त्याने आपल्याला अत्यंत दुःख झाल्याचे सोंग केले. तो म्हणाला, "अरेरे ! परदेशात माझ्या मुलाचा मृत्यु व्हावा ना ? तो आपण होऊन हिंदुस्तान सोडून गेला. बापाचा सल्ला त्याने मानला नाही. मुसलमानी आचारविचाराप्रमाणेही वागला नाही. यामुळे परमेश्वराने त्याला ही शिक्षा केली."

बादशहाइतकाच राजपुत्र शाहा आलम व राजपुत्र आझमतारा यांना आनंद झाला होता. परंतु धोरणीपणामुळे त्यांनी आपल्याला दुःख झाल्याचे दाखविले.

१. हिंदुराव घोरपडे.

२. राजपुत्र अकबर हा १७ जिल्हज, १११७ हि. ३१ मार्च १७०६ ला सुराभानमधील मशहद येथे मरण पावला.

बापाच्या मृत्युनंतर उभी राहणारी एक अडचण तरी अकबराच्या मृत्युमुळे नाहिशी झाली होती. कारण मोगल दरबारात राजपुत्र अकबरचे अनेक हितचिंतक होते. इराणच्या बादशहाने अकबरला नक्कीच मदत केली असती.

राजपुत्र अकबर याला इराणच्या शाहाच्या आज्ञेने मशहद या पवित्र शहरी दफन करण्यात आले.

कर्नाटकात असलेल्या मोगल अधिकाऱ्यांनी सॅन थोम येथे किल्ला बांधण्याची परवानगी मागितली. औरंगजेबाने आपल्या अधिकाऱ्यांना किल्ला बांधण्यास परवानगी दिली नाही. परवानगी नाकारण्याचे कारण त्याने पुढीलप्रमाणे दिले, "मोगलांनी हा किल्ला बांधला की, समुद्राला तो लागून असल्यामुळे युरोपियन तो ताब्यात घेतील. यामुळे किल्ला बांधू नये. इतकेच नव्हे तर ज्या शहरात ते (युरोपियन) सध्या राहतात, ती शहरेही त्यांच्याकडून काढून घेणे शक्य झाले तर मला आनंदच वाटेल."

परदेशातील वकील आले तर दरबारी शिष्टाचाराप्रमाणे त्यांनी वागावे असा औरंगजेबाचा आग्रह असतो. असे केल्याने आपला मोठेपणा दिसून येईल असे त्याला वाटते. आपण पराक्रमी आणि प्रबळ सत्ताधीश आहोत, अशी आपली कीर्ति व्हावी अशी त्यांची इच्छा असते. काही रजपूत सरदारांना आणि राजेरजवाड्यांना त्याच्याबद्दल असे वाटते याबद्दल शंका नाही. पण औरंगजेबाच्या अशा युक्त्यांचा मराठ्यांच्यावर काहीच परिणाम होत नाही. ते त्याच्या वाढत्या प्रमाणात आणि विलक्षण असा कोंडमारा करीत आहेत. मराठ्यांची आक्रमणे, यांची माहिती जेव्हा त्याला देण्यात येते, तेव्हा त्याला काही उत्तर सुचत नाही. तो इतकेच म्हणतो की, "चोर हे सगळीकडे असावयाचेच." असे उद्गार बादशहाने का बरे काढावेत? ही केवळ आपली नाहिशी होत असलेली प्रतिष्ठा टिकविण्याची धडपड होय. औरंगजेबाला आतून अत्यंत दुःख झालेले आहे. पण त्यावर त्याला उपाय सुचत नाही.

मराठ्यांच्या बरोबर या युद्धात गुंतल्याबद्दल औरंगजेबाला आता पश्चात्ताप होत आहे. कारण त्यामुळे जे जिंकलेले आहे ते टिकविण्यासाठी त्याला दख्खनमध्ये राहणे भाग पडले आहे. सध्या तो अहमदनगरजवळ[1] छावणीत राहत आहे. त्याच्या मुलांपैकी एकही मुलगा ही मोहीम चालू ठेवण्याचे काम अंगावर घेण्यास तयार नाही. दरम्यान मराठे आपल्या फौजा घेऊन या साम्राज्यात चौफेर लुटालूट करीत फिरत आहेत. मराठ्यांचे वरील एक सैन्य उत्तरेकडे गेले होते. त्यांचे सामर्थ्य व धाष्ट्य इतके आहे की, दिल्लीच्या आसपास ते पोहचले. दुसरे सैन्य

१ औरंगजेब १६ शव्वाल १११७ हि. ३१ जानेवारी १७०६ ला अहमदनगरला पोहचला (मासीरे-आलमगिरी).

गोवळकोंड्यात धुडाकूळ करीत होते. मराठ्यांचे वाढते बळ मोगल साम्राज्याच्या प्रत्येक भागाला दिवसेंदिवस जाणवू लागले आहे.

हा गोंधळ मोडून काढण्यासाठी बादशहा सतत हुकूम काढीत असतो. परंतु त्याचा काहीही उपयोग होत नाही. शिवाय त्याला सतत भीती वाटते की हो की आझमतारा आणि कामबक्ष ही आपली दोन मुले आपल्या विरुद्ध आता बंड करतील. याला काहीतरी आळा बसावा म्हणून तो प्रयत्न करीत आहे. तो, आपल्या फौजेचा एक मोठा भाग सेनापतींच्या नेतृत्वाखाली देऊन, त्यांना मोहिमेवर एकदा इकडे, एकदा तिकडे असा पाठवीत असतो.

**बादशहा औरंगजेबाचा आजार :** १७०६ सालच्या नोव्हेंबर महिन्यात बादशहा पुनः आजारी पडला.[1] पाच दिवस तो बाहेर आला नाही. त्याच्या आजारामुळे सैन्यात गोंधळ माजला. लोकांना वाटले की, बादशहा मरण पावला असावा. अनेक अधिकारी यापूर्वीच आझमताराला जाऊन मिळाले होते. काहींनी कामबक्षाची बाजू घेतली होती. राहिलेले अधिकारी, जे मिळेल त्यावर ताव मारण्याच्या तयारीत होते.

बादशहा धूर्त. छावणीतील असंतोष कानी आताच पालखीतून बसून तो दरबारात आला. छावणीतील वाद्ये वाजू लागली तसे बादशहा जिवंत असून दरबारात आहे हे लोकांना समजले. अशा रीतीने छावणीतील वाढता असंतोष थांबला.

**मनुचीच्या पत्नीचा मृत्यु :** १५ डिसेंबर १७०६ रोजी माझी (मनुचीची) पत्नी मरण पावली. तिच्या बरोबर मी २० वर्षाहून अधिक काळ संसार केला. तिच्या मृत्युने मला जे दुःख झाले त्याचे वर्णन कसे करावे कळत नाही. त्याच महिन्याच्या २९ तारखेस पाँडेचेरीचा गव्हर्नर डिच हा वारला. तो माझा जुना आणि खरा स्नेही होता. त्याच्याकडून मला नेहमी प्रतिष्ठेची सौहार्दाची वागणूक मिळत गेली. माझ्यावर आणखी एक मोठी आपत्ती आली आणि ती म्हणजे कॅप्युचिन पाद्री व जेसुइट पाद्री यांच्यामधील भांडणात गोवले जाण्याची. हा वाद बराच काळपर्यंत माजला होता.

बादशहा अहमदनगरच्या किल्ल्याजवळील आपल्या छावणीत आहे. आता तो अगदी आसन्नमरणावस्थेला पोहचला आहे. ७ फेब्रुवारी १७०७ ला तो आजारी पडला आणि त्यानंतर तो कोणत्याच दिवशी दरबारात जाऊ शकला नाही. यामुळे छावणीत एकच गडबड माजली. लोकांनी दुकाने बंद केली. वस्तू महागल्या आणि इतर अनेक गोंधळ उद्भवले.

१. औरंगजेब सन्नाळच्या शेवटी १११८ हि. (अमदानीचे ५१ वे वर्ष) आजारी पडला (३ फे. १७०७). मग तो बरा झाला (मासीरे आलमगिरी पान. ५२०).

सरदारांना व सामान्य लोकांना शांत राखण्यासाठी वजीर असदखान याला अतोनात श्रम करावे लागले. गेल्या सेपेसारखे बादशहाला दरबारात आणण्याचे त्याने प्रयत्न केले, पण बादशहाचा अशक्तपणा अतिशय वाढलेला असल्यामुळे ते घडू शकले नाही. दरम्यान आझमतारानें बादशहाला विशेष भय वाटत असल्यामुळे बोलावल्याशिवाय भेटीस न येण्याची त्याला आज्ञा करण्यात आली. परंतु कामबक्ष हा आपल्या बापाची प्रकृती पाहण्यासाठी वारंवार येत असे. त्याला कळून आले होते की, बादशहाचा आजार हा आता इतक्या गंभीर स्वरूपाचा झाला आहे की, तो फार काळ जगण्याची आता आशा नाही. म्हणून त्याने बादशहाला विनंती केली की, "वचन दिल्याप्रमाणे मला येथून जाण्याचा निरोप द्यावा. नाहीतर माझ्या जीविताला धोका आहे." बादशहाने त्याला आपल्या स्वतःच्या पथकातील पहारेकरी आपल्या तंबूभोवती ठेवण्यास सांगितले. या हुकुमाची तत्काळ अंमलबजावणी करण्यात आली.

आझमताराला हे सगळे सहन होणे शक्य नव्हते. कामबक्ष हा संपूर्ण ताबा घेत आहे असे त्याला वाटले. त्याने आपल्या सैनिकांना आज्ञा केली की, "बादशाही तंबूवर तुम्ही जाऊन कामबक्षाने नेमलेल्या पहारेकऱ्यांना व सैनिकांना हुसकून लावा आणि त्यांच्या जागा तुम्ही घ्या. दोन्ही बाजूंनी झटापट झाली. कामबक्षाच्या सैन्यातील बारा आणि आझमताराचे आठ, अशी माणसे मारली गेली. हा गोंगाट ऐकून यासंबंधी बादशहाने चौकशी केली. तेव्हा वजीर असदखानाने घडलेली हकीकत बादशहापाशी सांगितली. ती ऐकून बादशहाने त्यांचे आणि इतर माणसे यांना बरोबर घेऊन दगल मोडा अशी असदखानाला आज्ञा केली. औरंगजेबाने आझमताराला औरंगाबाद, बऱ्हाणपूर, वऱ्हाड या प्रांतावर सुभेदार नेमून त्याला छावणी सोडून आपल्या सुभ्याकडे निघून जाण्यास आज्ञा केली. कामबक्षाला विजापूर, गोवळकोंड्याच्या सुभ्यावर नेमण्यात आले. विजापूरच्या सुभेदाराला, विजापूरचा किल्ला कामबक्षाच्या हवाली करण्यात यावा असा हुकूम देण्यात येऊन, हुकुमाचे पत्र कामबक्षापाशी देण्यात आले.[1]

धोरणी वजीर असदखान याने मोठ्या कुशलतेने हे प्रकरण हाताळले. आझमतारा आणि कामबक्ष हे दोघेही राजपुत्र औरंगजेबाची छावणी सोडून आपापल्या सुभ्याकडे रवाना झाले. आझमताराचे कूच रेंगाळत, रेंगाळत चालू होते. उलट कामबक्षाला विजापूरच्या किल्ल्याचा ताबा घेण्याची घाई असल्यामुळे तो छावणी सोडून लांब लांब मजला मारीत निघाला होता.

**औरंगजेब बादशहाचा मृत्यू** : वरील घटनेला चार दिवस झाले. बादशहाची प्रकृती तशीच होती. तो मृत्युपंथाला लागला होता. असदखान वजीर हा आझमताऱ्याचा

1. कामबक्ष दक्षिणेकडे १७ फेब्रुवारी १७०७ (न.प.) रोजी निघाला आणि आझम हा २२ फेब्रुवारी १७०७ ला उत्तरेकडे जाण्यास निघाला.

पक्षपाती. त्याने आझमताऱ्याला तातडीने परत येण्यासाठी निरोप पाठविला. आझमतारा येईपर्यंत बादशहा एक दिवस आधी म्हणजे शुक्रवारी मरण पावला होता. ती तारीख ४ मार्च १७०७ आणि वेळ मध्यान्हीनंतर एक तास, ही होती.[1] आपला मृत्यु जवळ येऊन ठेपला आहे हे समजताच बादशहाने असदखानाला बोलावून घेतले. त्याला तिजोरी उघडून सैन्याला जितका पगार देणे होता तितका देऊन टाकण्यास सांगितले. "यात दुर्लक्ष केलेस तर माझ्या मनाला टोचणी लागून राहील" असे बादशहा म्हणाला. औरंगजेबाची ही आज्ञा असदखान वजीर याने, नवीन बादशहा आझमतारा याच्या संमतीने अंमलात आणली. मृत्युच्या काही क्षणांपूर्वी बादशहा म्हणाला, "मुसलमानी धर्माचे शत्रु आहेत त्यांचा नाश करण्यासाठी मी हरप्रकारे झटलो. एवढे तरी जग माझ्याबद्दल म्हणू शकेल. यामुळे मी आता सुखाने मरत आहे."

त्या सुमारास दरबारात राजपुत्र शाहा आलम याचे बरेच हितचिंतक होते. बादशहाने मरणापूर्वी शाहा आलमला आपला वारसा आणि गादीचा अधिकारी म्हणून नेमावा, अशी त्यांनी बादशहापाशी खटपट केली. पण बादशहा म्हणाला, "शाहा आलमला मी हिंदुस्तान (उत्तर भारत) चे स्वामित्व या पूर्वीच दिले आहे. पण तो येथे अगर इतर कोठे राज्य करील हे मी काय सांगू शकणार? हे केवळ परमेश्वराच्या हाती आहे."

बादशहा मरण पावला त्यावेळी एक प्रचंड वावटळ उठली. छावणीतील सर्व तंबू उखडून पडले. अनेक लोक धुळीने गुदमरून मृत्युमुखी पडले. तीच अवस्था अनेक जनावरांची झाली. इतका काळोख निर्माण झाला की, आपण कोठे जात आहोत हे न कळून लोक एकमेकांच्या अंगावर कोसळत होते. झाडे उन्मळून पडली. शेती उध्वस्त झाली. हे वादळ संध्याकाळी ६ वाजेपर्यंत चालू होते.

**आझमतारा राज्यारोहणाची तयारी करतो :** गादीवर बसण्यापूर्वी काही दिवस आझमताराने आपल्या दरबारी लोकांना (शोकवस्त्रे टाकून देऊन) दरबारी पोशाख घालण्याची परवानगी दिली. १५ मार्च १७०७ या तारखेस गादीवर बसण्याचे आझमताराने ठरविले. हा मुहूर्त ज्योतिष्यांनी पाहून दिला होता. राज्यारोहणाच्या दिवशी आझमतारा दरबारात आला. आपण बसण्याचे सिंहासन त्याच्या दृष्टीस पडले. त्यावर बसण्यापूर्वी आझमने हात वर करून परमेश्वराची पुढीलप्रमाणे प्रार्थना केली "परमेश्वरा! तुझी माझ्यावर कृपा असू दे. मला निःपक्षपातीपणे न्याय करण्यास लागणारी बुद्धी आणि शत्रुवर जय मिळविण्यासाठी लागणारी शक्ती प्रदान कर." आझमने उंची वस्त्रे परिधान केली होती. याशिवाय त्याने मूल्यवान रत्नेही घातली

१. औरंगजेबाचा मृत्यु नवीन कालगणनेप्रमाणे ३ मार्च १७०७ रोजी झाला. जुन्या कालगणनेप्रमाणे ती तारीख २० फेब्रुवारी १७०७ येते.

होती. प्रार्थना संपविल्यानंतर आझम हा सकाळी दहा वाजता सिंहासनारूढ झाला. तेथे तो मध्यान्हीपर्यंत होता. नवीन नाणी पाडण्याची त्याने आज्ञा केली. ती नाणी पूर्वीच्या नाण्यापेक्षा आकाराने थोडी मोठी होती. चिल्लर नाण्यासाठी त्याने दोन नाण्यांचे एक नाणे करण्याची आज्ञा केली. यामुळे आजकाल एक रुपयाचे ३२ तांब्याचे पैसे होतात. नवीन नाण्यावर आझमताऱ्याचे नाव कोरण्यात आले.

## सुटी पाने

बापाच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर आझमतारा घाईघाईने छावणीत आला. त्याने खजिना ताब्यात घेतला आणि आपली सत्ता स्थापन केली. औरंगजेब बादशहाचे शव पालखीतून औरंगाबादेकडे नेण्यात आले. तेथून जवळच असलेल्या एका स्थळी[1] ते दफन करावयाचे होते. सत्ता हाती आल्यावर आझमताराने आपले सैनिक वा अधिकारी यांची मने वळवून घेण्यासाठी त्यांचे पगार वाढविले. १९ मार्च १७०७ ला तो गादीवर बसला.[2] यानंतर त्याने आग्र्याकडे तातडतोब निघण्याची तयारी केली. आग्र्याला पोहचल्यानंतर त्याने शहराचा ताबा घेतला. आग्र्याच्या लोकांनी त्याचे स्वागत केले.

**आझमतारा यास शाहा आलमचे पत्र :** आझमतारा आपल्यावर चाल करून येत आहे. असे ऐकून शाहा आलमने त्याला पुढीलप्रमाणे सौजन्याचे एक पत्र पाठविले, "आपल्या दोघांचेही आयुष्य आता थोडे राहिले आहे. हा काळ आपण एकमेकांशी स्नेहभावाने आणि शांततेने घालविला पाहिजे. आपण दोघेही वयस्क झालो आहोत. आपल्या वडिलांनी तुम्हाला जे सुभे दिले आहेत, ते घेऊन तुम्ही समाधान मानावे. मी त्यात मुळीच ढवळाढवळ करणार नाही आणि माझ्याकडे जे सुभे देण्यात आले आहेत, त्यात मी तुम्हाला ढवळाढवळ करू देणार नाही." आझमताराचे या पत्राने समाधान झाले नाही. त्याने शाहा आलमच्या पत्राला पुढीलप्रमाणे उत्तर पाठविले, "मला बादशहा आणि अनियंत्रित सत्ताधीश व्हावयाचे आहे. यासाठी मी तिकडे येत आहे". यावर शाहा आलमने पुनः पत्र लिहून आझमताराला कळविले की "आपली इच्छा असेल तर आपण या. आपले पुतणे आपल्या स्वागतास तयार राहतील आणि ते आपली कामगिरी उत्तम बजावतील."

**आझमतारा-शाहा आलम यांची लढाई :** आझमतारा मजल दरमजल करीत आला आणि ज्या ठिकाणी औरंगजेबाची व दाराची लढाई झाली त्याच ठिकाणी दोन्ही

१. औरंगजेबाची कबर औरंगाबादेच्या वायव्येस सुमारे १४ मैलांवर आहे. हा स्थानाला रोझा अथवा खुल्दाबाद असे म्हणतात.

२. आझमताऱ्याचे राज्यारोहण १० जिल्हेज १११८ हि. मार्च १५, १७०७ ला झाले. (खाफीखान पाहा. II ३९६) फ्रांकलिन ३४१ मध्ये मनुची स्वतःच म्हणतो की राज्यारोहण १५ मार्चला झाले. (मार्च १९ ला नाही.)

फौजा येऊन भिडल्या. हे ठिकाण चंबळ नदीच्या पात्राजवळ धोलपूर येथे, आणि आग्र्यापासून दक्षिणेस सुमारे ४० मैल अंतरावर आहे. ह्या लढाईची सुरवात जून १९, १७०७ ला झाली.[1]

**आझमतारा आत्महत्या करतो :** दुसऱ्या दिवशी लढाई चालूच होती. उभय पक्षांचे लोक अतिशय निकराने लढले. ही लढाई संध्याकाळपर्यंत चालू होती. लढाईत असंख्य माणसे ठार झाली. रणांगणावर उठलेली धूळ १४–१५ मैलांपर्यंत दिसत होती. अशी लढाई पूर्वी झाली नसावी असे म्हणता येईल. आपला पराजय होतो आहे हे आझमताराने पाहिले. शत्रूच्या हाती जिवंत सापडू नये म्हणून आझमताराने आपल्या छातीत खंजीर खुपसून घेऊन आत्महत्या केली.[2] शाहा आलमला जय मिळाला. हिंदु राजेरजवाड्यांना त्याने या प्रसंगी आश्वासने दिली होती. ती मोडून त्यांची राज्ये ताब्यात घेण्यासाठी त्याने हालचाली केल्या.

औरंगजेबाचा धाकटा मुलगा कामबक्ष हा विजापूर येथे होता. तेथे त्याला वरील लढाईची बातमी कळली. तो विजापुरहून गोवळकोंड्याकडे रवाना झाला. गोवळकोंड्याचे सुभेदार आणि इतर अधिकारी यांना त्याने ठार मारून तो सुभा पूर्णपणे आपल्या ताब्यात आणला. आता आपले बळ वाढले आहे असे वाटून कामबक्षला आपण शाहा आलमच्या जागी साम्राज्याचा बादशहा व्हावे असे वाटू लागले.

हे शाहा आलमला कळले. तो त्यावेळी हिंदु राजांच्या[3] विरुद्ध मोहिमेत गुंतला होता. कामबक्षवर चालून जाणे त्याला आता भाग होते. म्हणून त्याने वरील राजांशी कसाबसा तह केला. त्यानंतर तो दक्षिणेकडे रवाना झाला. (फेब्रुवारी १७०८) जून महिन्याच्या सुरवातीस तो बिदरला[4] होता. त्याच्या सैन्यात १ लाख २० हजार स्वार आणि २ लाख पायदळ होते. कामबक्षने गोवळकोंड्यापासून ४ मैलांवर आपला तळ दिला. शाहा आलमने कामबक्षच्या अनेक अधिकाऱ्यांची मने वळवून त्यांना आपल्याकडे बोलावून घेतले. ऑगस्ट महिन्यात पाऊस कमी झाल्यावर शाहा आलमने आपला एक वकील कामबक्षकडे पाठवून तडजोड करण्याचा प्रयत्न केला.

**कामबक्ष-शाहा आलम यांची लढाई :** कामबक्षने ते मान्य केले नाही. शाहा आलमने कूच करून कोहीर[5] येथे तळ दिला. तेथून त्याने ३० हजार स्वार आणि

---

१. ही लढाई आग्र्याच्या दक्षिणेस २० मैलांवर आणि धोलपूरच्या उत्तरेस ३० मैलांवर असलेल्या जाजौ या गावाजवळ झाली. रबी १८, १११९ हि. १८ जून १७०७. (न.प.)

२. आझमने आत्महत्या केली नाही, तो मारला गेला.

३. जयपूर आणि जोधपूर.

४. शाहा आलमने आग्र्याहून १२ नोव्हेंबर १७०७ ला प्रयाण केले (खाफीखान ii ६०५). आता बहादूर शाहा झालेला शाहा आलम फेब्रुवारी १७०८ मध्ये अजमीरजवळ होता. मे १७ ला त्याने नर्मदा ओलांडली आणि नोव्हेंबर १, १७०८ ला तो जफराबाद-बिदरला पोहचला.

५. कोहीर—हे गाव हैद्राबादच्या पश्चिमेस ५५ मैलांवर असून ते आंध्र राज्यात आहे.

५० हजार पायदळ असे एक सैन्य पुढे रवाना केले. त्या सैन्याचे नेतृत्व शाहा आलमचा मुलगा सुलतान मोइजुद्दिन याजकडे होते. त्याच्याबरोबर झुल्फिकारखान आणि इतर प्रसिद्ध सरदार होते. शाहा आलम कामबक्षला स्नेहभावाची पत्रे लिहून, आहे त्यावर समाधान माना, लढाई करू नका असे सुचवित होता. पण कामबक्षाने तिकडे लक्ष दिले नाही.

कामबक्षाचा मृत्यु : या अवधीत शेकडो माणसे कामबक्षाला सोडून गेली. त्याच्यापाशी अवघे ४ हजार स्वार आणि ८ हजार पायदळ शिल्लक राहिले. हे पाहून कामबक्ष मागे फिरला आणि त्याने गोवळकोंड्याहून ६ मैलांवर तळ दिला.[1] या ठिकाणी सुल्तान मोइजुद्दिन व कामबक्ष यांची १५ जानेवारी[2] १७०९ ला लढाई झाली. त्या लढाईत कामबक्षाचा पराजय झाला. बाणाने तो जखमी झाला. शाहा आलमच्या तळावर त्याला नेण्यात आले. तेथे तो दुसऱ्या दिवशी मरण पावला. त्याचा मुलगा दोन मुली आणि बायका आणि इतर कुटुंबिय यांना शाहा आलमच्या तळावर नेण्यात आले.

ही लढाई निर्णायक झाली. या लढाईने शाहा आलमला सर्व मोगल साम्राज्याचे आधिपत्य प्राप्त झाले. या लढाईची बातमी आम्हाला पॉंडिचरी येथे गुरुवार ३१ जानेवारी १७०९ रोजी समजली. मोगल छावणीतील काही माणसे पॉंडिचरीस २ फेब्रुवारी १७०९ ला आली. त्यांनीही या बातमीला दुजोरा दिला. शाहा आलम आता आपल्या सैन्यासहित औरंगाबादेच्या दिशेने गेला आहे. मला[3] ( मनुची ) ही बातमी देणारी माणसे उदेखानाने पाठविली होती. त्याच्या म्हणण्यावरून कळले की कामबक्षला जखमी करणारा मनुष्य उदेखानच होता.

१. हे स्थळ सध्या हैद्राबाद शहरात असलेले तळ्याच्या काठावर असावे. या तळ्याला मीर जुमल्याचा तलाव असे म्हणतात.

२. इतिहासकारांच्या मते ही लढाई ११२० हि. जिल्कादच्या ३ तारखेस नवीन कालगणनेप्रमाणे १३ जानेवारी १९०७ रोजी झाली.

३. शाहा आलम बहादूरशाह, हा जून १९, १७०९ ला औरंगाबादेस पोहचला.

# असे होते मोगल

## सूचि



औरंगजेब



बहादूरखान (औरंगजेबाचा दुधभाऊ)



शाइस्ताखान



शिवाजी महाराज



शाहा आलम (औरंगजेबाचा दुसरा मुलगा)

